# दोन शब्द

कॉंग्रेसच्या गेल्या पन्नास वर्षांचा इतिहास म्हणजे भारताच्या स्वोद्धाराचा व तज्जन्य त्यांच्या अर्वाचीन स्वातंत्र्याच्या चळवळींचा इतिहास होय. कॉंग्रेसच्या सुवर्णमहोत्सवाच्या दिवशीं स्वातंत्र्यप्रिय महाराष्ट्राला तो अर्पण करण्यांत महाराष्ट्र प्रां. कॉंग्रेस कमिटीला आनंद होत आहे. प्राचीन भारताच्या वाचनानें ज्याप्रमाणें आजपर्यंत शेंकडों हजारों भारतीयांना स्वातंत्र्यासाठीं लढण्याला स्फूर्ति मिळाली आहे त्याचप्रमाणें या अर्वाचीन भारताच्या वाचनानें यापुढे शेंकडों हजारों भारत सुपुत्र व सुकन्यांना आपल्या मायभूमीच्या स्वातंत्र्यासाठीं कराव्या लागणाऱ्या बलीदानासाठीं स्फूर्ति मिळेल अशी मला खात्री आहे. महाराष्ट्रांतील प्रत्येक कुटुंबांत याचें प्रेमानें व आदरानें स्वागत होईल व लहानापासून थोरापर्यंत सर्व स्त्रीपुरुषाच्या नित्य वाचनांत हा इतिहास येईल तर हिंदुस्थानच्या स्वातंत्र्य-संग्रामांत महाराष्ट्र स्वयंस्फूर्तीनें आपलें योग्य स्थान घेईल अशी माझी श्रद्धा आहे.

राष्ट्राधिपति बाबू राजेन्द्र प्रसाद यांच्या इच्छेप्रमाणें हा इतिहास कॉंग्रेस सुवर्ण महोत्सवाच्या दिवशीं प्रसिद्ध होत आहे. याचें सर्व श्रेय महाराष्ट्रांतील जनतेसच आहे. कारण महाराष्ट्रांत राजेन्द्र प्रसादाचा दौरा झाला तेव्हां उदार अंतःकरणानें महाराष्ट्र जनतेनें राजेन्द्र निधी उभारण्याला जें सहाय्य केलें, त्यामुळेंच हें ग्रंथ प्रकाशन शक्य झालें. कॉंग्रेस वर्किंग कमिटीचे एक सभासद व आद्य पुढारी श्री. पट्टाभिसीतारामय्या यांनीं हा ग्रंथ मूळ इंग्रजींत लिहिला असल्यामुळें, अल्पावधींत एवढ्या मोठ्या ग्रंथाचा मराठींत अनुवाद करून तो वेळेवर छापवून प्रसिद्ध करणें हें काम मोठ्या श्रमाचें व कार्यकुशलतेचें होतें. अनेक सहकारी कार्यकर्त्यांनीं स्वयंस्फूर्तीनें पुढें येऊन रात्रीचा दिवस करून हें कार्य करण्याची तयारी दाखविली. ती दाखविली नसती तर इच्छा असूनही हें काम वेळेवर होणें अशक्य झालें असतें. तथापि ह्या ग्रंथ प्रकाशनाच्या कामीं ज्यांचें साहाय्य मिळालें त्यांपैकीं, कांहीं प्रमुख सहकाऱ्यांचा उल्लेख करणें जरूर आहे. श्री. विनायकराव भुस्कुटे व श्री. गं. भा. निरंतर यांनीं अतिशय परिश्रम घेऊन अत्यल्पावधींत जर अनुवाद केला नसता तर वेळेवर पुस्तक तयार होणें अशक्य

झालें असतें. पुस्तकाचीं मुद्रितें पाहाण्याचें काम महाराष्ट्र प्रांतिक कॉं. क. चे चिटणीस श्री. स. के. भावे यांनीं विशेष परिश्रम घेऊन केलें; त्याचप्रमाणें श्री. वा. वा. अतीतकर व्यवस्थापक लोकशक्ति यांनीं छपाईचें सर्व काम इतक्या थोड्या वेळांत सुबक रीतीनें करून दिलें; श्री. गो. आ. देशपांडे, श्री. रा. प्र. कानिटकर, श्री. सी. गो. रानडे, श्री. व. चिं. भिडे, श्री. क. र. पुराणिक, या व इतर मित्रांचें त्यांच्या साहाय्यावद्दल मी अंतःकरणपूर्वक आभारी आहे. सदर ग्रंथ घाईघाईनें लिहिला व छापला गेल्यामुळें कांहीं चुका रहाण्याचा संभव आहे. त्यावद्दल वाचक क्षमा करतील अशी आशा आहे. हा इतिहास अखिल भारताचा असल्यामुळें त्यांत महाराष्ट्रांतील चळवळींचा तपशीलवार इतिहास येथें शक्य नाहीं ही गोष्ट कृपा करून वाचकांनीं लक्षांत ठेवावी.

या स्फूर्तिदायक स्वातंत्र्याच्या इतिहास वाचनानें भारत स्वातंत्र्यप्राप्तीला अधिकारी होवो एवढीच ईश्वराला प्रार्थना.

ता. ३०।११।३५

शंकर दत्तात्रय देव.
अध्यक्ष म. प्रां. कॉं. क.

# अनुक्रमणिका

## भाग १ ला

# भाग २ रा

## भाग २ रा

## भाग ४ था.

## भाग ५ वा

# भाग ६ वा



# भाग ७ वा.

# हिंदी राष्ट्रीय सभेचा इतिहास

## प्रकरण पहिलें

## कॉंग्रेसचा जन्म

ईस्ट इंडिया कंपनीनें अनेक व्यापारी व राजकीय उलाढाली करून जवळ जवळ शंभर वर्षांत हिंदुस्थानांतील बराच मुलूख काबीज केला व राज्यसत्तेचे सर्व अधिकार ती उपभोगूं लागली. त्यामुळें अर्थातच कंपनीच्या या कारवाई-कडे ब्रिटिश पार्लमेंटचें लक्ष गेलें व १७७२ नंतर कंपनीला वेळोवेळीं ज्या ज्या नवीन सनदा देण्यांत आल्या त्या त्या वेळीं कंपनीच्या कारभाराची ब्रिटिश सरकार-तर्फे पूर्ण चौकशी करण्यात येऊं लागली. उत्तरोत्तर व्यापार वाढविण्याचा कंपनीचा मूळ उद्देश मागें पडून ती राजकारणप्रधान होत गेली, त्याबरोबर इंग्लंडमधील एडमंड बर्क, शेरिडन, फॉक्स वगैरे मंडळींचें कंपनीच्या हिंदुस्थानांतील कारभाराकडे १८व्या शतकाच्या अखेरीस विशेष लक्ष गेलें व तिच्या एजंटांचीं येथील दुष्कृत्यें त्यांनी उजेडांत आणलीं. वॉरन हेस्टिंग्जवर दोषारोप ठेवून त्याला योग्य तें शासन करण्याचा या मंडळींचा उद्देश जरी साध्य झाला नाहीं तरी कंपनीचे अधिकारी हिंदी जनतेवर कशा प्रकारचे जुलूम व अत्याचार करीत आहेत ही गोष्ट त्यांनीं ब्रिटिश जनते-पुढें मांडली. कंपनीच्या एजंटांनीं यापुढें राज्यविस्तार करण्याचा यत्न करूं नये या धोरणाचें अवलंबन करण्यास कंपनीला नव्या नव्या सनदा देत असतांना अनेक वेळां सांगण्यांत येत असे; पण कंपनीनें पार्लमेंटचे हे हुकूम धाब्यावर बसविले

व हिंदुस्थानांतील एकेक प्रांत संधि साधून अगर निर्माण करून घशांत टाकले. ही मुलखागिरी करीत असतांना कंपनीनें कोणकोणतीं कृष्णकृत्यें केलीं, तिनें कोणाकोणाचा विश्वासघात केला व कसकसे तहनामे व वचनें मोडलीं, मानवी स्वभावांतील लोभी व नीच वृत्तीचें तिनें कसें प्रदर्शन केलें हें येथें सांगत बसण्याची आवश्यकता नाहीं. तसेंच हिंदुस्थानांतील लोकांनींही परस्परांशीं कसें निमकहरामीपणाचें वर्तन केलें याचाही विचार करण्याचें हें स्थळ नव्हे. कंपनीच्या एजंटांनीं कंपनीला व डायरेक्टराना तर गबर केलेंच पण स्वतःसाठीं अगणित सपात्ति मिळविण्याकरितां कोणत्या मार्गाचा व साधनांचा अवलंब केला त्याचाही इतिहास सांगणें नको. वाफेच्या एंजिनाचा शोध लागून यांत्रिक युगाला आरंभ झाल्यानंतर एकोणिसाव्या शतकांत आपलें औद्योगिक वर्चस्व वाढविण्याच्या कामीं इंग्लंडला भांडवल म्हणून या संपत्तीचा चांगला उपयोग करतां आला एवढें सांगितलें म्हणजे पुरें.

१७७४ सालीं रेग्युलेटिंग ॲक्ट मंजूर करून कंपनीनें हिंदुस्थानांत मिळविलेल्या मुलखाचा कारभार पाहण्याची जबाबदारी ब्रिटिश पार्लमेंटानें प्रथमच आपल्या अंगावर घेतली. हें नियंत्रण हळू हळू वाढत जाऊन १७८५ साली दुसरा एक कायदा पास करण्यांत आला. पुढें १७९३, १८१३, १८३३ व १८५३ या साली प्रत्येक वेळीं चौकशी करून कपनीला नव्या नव्या सनदा देण्यांत आल्या. "कंपनीनें मिळविलेल्या मुलखांतील रहिवाशाला व ब्रिटिश राजाच्या जन्मजात रयतेला धर्म, जन्मस्थान, वंश व वर्ण वगैरे कोणताही भेदाभेद न करतां कंपनीनें आपल्या राज्यकारभाराच्या खात्यांतून नोकऱ्या द्याव्या" असा एक कायदा १८३३ सालीं करण्यांत आला; पण कोर्ट ऑफ डायरेक्टरांनीं त्याचा सोइस्कर अर्थ करून तो धुडकावून लावला. १८३३ च्या या कायद्यानें कंपनीचे हिंदुस्थानांत व्यापार करण्याचे हक्कही काढून घेण्यांत आले व त्यामुळें कंपनीचें व्यापारी स्वरूप जाऊन ती पूर्ण राज्यसत्ताधारी बनली.

हिंदुस्थानांत इंग्रजी शिक्षण सुरू करावें कीं नाहीं यासंबंधानें यावेळीं बरीच चर्चा झाली. येथें हिंदुस्थानांतील भाषांचें व वाङ्मयाचें शिक्षण सुरू करावें असें म्हणणारा एक पक्ष होता, पण हिंदवासियांपैकीं राजा राममोहन राय व इंग्रजांपैकीं मेकॉले यांनीं इंग्रजी शिक्षणाचाच जोरानें पुरस्कार केला व त्यांचें म्हणणें ग्राह्य ठरून प्रचलित शिक्षणपद्धतीचा पाया घालण्यांत आला.

या वेळीं हिंदुस्थानांत वर्तमानपत्रें नव्हती. कांहीं इंग्रज लोकांनीं वर्तमानपत्रें काढून ती चालविण्याचा प्रयत्न केला: पण त्यांच्यापैकीं कांहींना हद्दपार व्हावें लागलें! लॉर्ड विल्यम बेंटिंक यांनीं वृत्तपत्रांकडे दयार्द्रदृष्टीनें पाहिलें व त्यांचे अनुयायी सर चार्लस मेटकॉफ यांनीं मुद्रणावरील सर्व बंधनें काढून टाकलीं. त्यामुळें १८५७ च्या बंडाचा काळ सोडून लॉर्ड लिटनच्या कारकीर्दीपर्यंत वृत्तपत्रांनीं हें स्वातंत्र्य भोगलें.

१८३३ ते १८५३ या वीस वर्षांत पंजाब व सिंध हे दोन प्रांत जिंकण्यांत आले. लॉर्ड डलहौसीनें दत्तक घेण्याची परवानगी नाकारून कांहीं संस्थानिकांचा मुलूख बळकावला, तर औधच्या संस्थानिकाला आपल्या संस्थानांत नीट बंदोबस्त ठेवतां येत नाहीं व योग्य प्रकारें राज्यकारभार चालवितां येत नाहीं असें निमित्त करून तोही मुलूख खालसा केला. याप्रमाणें हिंदुस्थानचा मुलूख खालसा होऊन एकीकडे परकीय राजसत्ता झपाट्यानें प्रस्थापित होत होती व दुसरीकडे आर्थिक शोषणामुळें हिंदी जनतेचें दारिद्र्यही वाढत चाललें होतें. वरील असंतोषच १८५७ च्या बंडाला कारणीभूत झाला. १८५७ चें बंड म्हणजे परकीय राजसत्तेचें जूं झुगारून देण्याचा हिंदुस्थानचा शेवटचा सशस्त्र प्रयत्न होय. या बंडाला धार्मिक हेतु थोडासा कारणीभूत झाला होता हें खरें असले तरी अकबर-औरंगजेबाचा वंशज असलेला दिल्लीचा बादशहा व पुण्याच्या पेशव्याचा वंशज यांनीं उभारलेल्या निशाणाखालीं हे बंडवाले एकत्र झाले होते. १७५७ च्या प्लासीच्या युद्धापासून शंभर वर्षांत इंग्रजांनीं हिंदुस्थानांतील जो मुलुख बळकावला तो पुन्हां काबीज करून हिंदुस्थानांत हिंदी राज्य प्रस्थापित करावें या हेतूनें हें बंड उभारण्यांत आलें होतें. आपल्या लोकांवर व राष्ट्रावर आपण स्वतःच राज्य चालवावें, त्यावर दुसऱ्या कोणाची सत्ता असूं नये ही मानवी हृदयांतील स्वाभाविक भावना या बंडाला कारणीभूत झाली होती.

हें बंड अयशस्वी झालें व त्याबरोबर ईस्ट इंडिया कंपनीही अस्तंगत झाली आणि ब्रिटनचा राजा म्हणजेच ब्रिटिश पार्लमेंट याच्या हातांत प्रत्यक्ष हिंदुस्थान सरकारच्या राज्यकारभाराचीं सूत्रें गेलीं. यानंतर राणीचा जाहीरनामा प्रसिद्ध झाला. त्यामुळें देशांत शांततेचें व विश्वासाचें वातावरण निर्माण झालें. परकीय राजसत्तेबद्दलचा असंतोष कांहीं लोकांच्या अंतःकरणांत धुमसत होता पण ते अगदीं असहाय्य झाले होते. देशांतील सर्व सरदारघराणीं विशेषतः मुसलमान सरदार-

घराणीं जवळ जवळ नष्ट करून टाकण्यांत आलीं होती. १८५७ प्रमाणें ज्याच्या निशाणाखालीं जमता येईल अशी एकही राजघराण्यांतील व्यक्ति शिल्लक ठेवली नव्हती. ईश्वरी कृपेमुळें हिंदुस्थानावर ब्रिटिशांची सत्ता प्रस्थापित झाली आहे असेंही कांहीं लोकांना वाटूं लागलें होतें आणि आमचा राष्ट्रीय स्वभावधर्म जो दैववाद त्यावर हवाला ठेऊन लोक स्थिरस्थावर झाले होते.

ब्रिटिश राजमुकुट धारण करणाऱ्या व्यक्तीकडे हिंदुस्थानची राज्यसूत्रें गेली तरी राज्यकारभाराच्या पूर्वीचे धोरणांत कांहीं बदल झाला नाहीं. फक्त यापुढील २० वर्षांत कोठें लढाया वगैरे झाल्या नाहींत व राज्यकारभाराच्या एकसूत्री-पणाला कोठें अडथळा आला नाही एवढेंच. पण इतकें असलें तरी हिंदुस्थानात कोठेंही अशांतता व गडबड नव्हती असे मात्र म्हणतां यावयाचें नाहीं. ब्रिटिशाच्या राज्यकारभारांतही भयंकर दोष होते व त्यांचें आविष्करण करून ते काढून टाकण्याचा प्रयत्न हिंदुस्थानाविषयी सहानुभूति बाळगणारे मि. ह्यूमसारखे ब्रिटिश अधिकारी करीत होते.

वर्ण, जात, धर्म, वंश वगैरे बाबतीत भेदाभेद न करतां कोणत्याही हिंदी इसमाला त्याच्या शिक्षणानुसार सरकारी खात्यातून जागा देण्यात यावी असें १८३३ च्या कायद्यानें ठरविण्यांत आले होते. १८५३ सालीं कंपनीला नवीन सनद देण्याचा विचार चालू असतां कंपनीनें गेल्या वीस वर्षांत या कायद्याची अंमलबजावणी केली नाही असें पार्लमेंटांत स्वच्छपणें सांगितलें गेलें. याच सालीं इंग्लडमध्यें सिव्हिल सर्विसची चढाओढीची परीक्षा घेण्याची पद्धति सुरू करण्यांत आली. या पद्धतिमुळे सरकारी खात्यांत मोठ्या नोकऱ्या मिळण्याच्या बाबतीत हिंदी लोकांच्या मार्गांत मोठाच अडथळा उत्पन्न झाला. या अडथळ्याला न जुमानतां कांही हिंदी लोक सातासमुद्रापलीकडे इंग्लडमध्यें जाऊन ही परीक्षा पास होऊन येऊं लागले, तेव्हां लॉर्ड सॉल्सबरीनें या परीक्षेला बसणाऱ्या विद्यार्थ्यांच्या वयाची मर्यादा कमी करून हिंदी लोकांच्या मार्गांत आणखी एक नवीनच अडथळा निर्माण केला. इंग्लंड व हिंदुस्थान या दोन्ही देशांत सिव्हिल सर्विसची एकाच वेळीं परीक्षा झाली पाहिजे अशीं मागणी हिंदी पुढारी कित्येक वर्षे करीत होते व त्यांच्या या मागणीला इंग्रज गृहस्थांनींही पाठिंबा दिला होता; पण तिच्याकडे मुळींच लक्ष देण्यांत आलें नाहीं. पुढें लॉर्ड लिटन यांची कारकीर्द सुरू झाली. त्यांनीं देशी वर्तमानपत्रांची मुस्कट-

दावी केली. हत्यारांचा कायदा मंजूर करून हत्यारें वापरण्याचा हिंदी लोकांचा हक्क त्यांनीं नष्ट केला; इतकेंच नव्हे, तर हिंदी व युरोपियन यांच्यांत उपमर्दकारक भेदाभेद सुरू केला.

यानतर हिंदुस्थानांत दुष्काळ पडला. या दुष्काळाच्या दिवसांत धान्याच्या टचाईमुळें लोकाना खावयास मिळालें नाहीं असें नव्हे तर धान्य असूनही तें विकत घेण्याचा त्राणच लोकांपाशीं उरला नव्हता. या दुष्काळांत सर्व देशभर लाखों माणसें मृत्युमुखीं पडली. नंतर अफगाण युद्ध झालें व त्यांत हिंदुस्थानचा अतोनात पैसा खर्च झाला. इकडे देशामध्यें दुष्काळानें व मृत्यूनें धुमाकूळ माडला होता तर तिकडे दिल्ली येथें एक दरबार भरविण्यात आला व इंग्लडच्या राणीला हिंदुस्थानची सम्राज्ञी हा किताब देण्यांत आला.

या काळांत देशातील शेतकरीवर्गही त्याच्यावर रोजच्या रोज होत असलेल्या अन्यायांनीं गांजून गेला होता. अतिशय खर्चाची व गैरसोयीची दिवाणी कोर्टें, लाचखाऊ व जुलमी पोलीस, सारा वसूल करण्याची कडक पद्धति, हत्यारांच्या कायद्याची व जंगल कायद्याची त्रासदायक अमलबजावणी वगैरे प्रकारच्या या सर्व अन्यायांपासून आपला बचाव करण्याबद्दल शेतकरीवर्ग सरकारपाशीं मागणी करीत होता; पण त्याची ही मागणी मान्य न झाल्यामुळें तो निराश झाला होता. १८८० च्या सुमारास हिंदुस्थानात ही परिस्थिति होती. नोकरशाहीने नव्या सवलतीना विरोध केला एवढेच नव्हे तर पूर्वीच्या पिढीतील सुधारणावाद्यानीं जें मुद्रणस्वातंत्र्य, सभा भरविण्याचा हक्क, स्थानिक स्वराज्याचे स्वातंत्र्य व विश्वविद्यालयाचे स्वातंत्र्य या संबंधींचे हक्क दिले होते तेही काढून घेतले. याच्या जोडीला पोलिसांच्या दडपशाहीची रशियन पद्धति नोकरशाहीने अमलात आणली होती; यामुळें लॉर्ड लिटनच्या कारकीर्दीत क्रांतीकरिता बंड उपस्थित होण्याचा प्रसग अगदीं जवळ येऊन ठेपला होता. अशा वेळीं मि. ह्यूम याना मध्यें पडण्याची स्फूर्ति मिळाली असें सर विल्यम वेडरबर्न यानीं म्हटलें आहे. हिंदुस्थानातील अनेक धर्मगुरु व त्यांचे शिष्य आपसात पत्रव्यवहार करून हिंदुस्थानांतील अनेक जिल्ह्यातून बंडाची उठावणी करण्याच्या तयारींत आहेत अशा प्रकारच्या पुराव्याचीं सात पुस्तकें मि. ह्यूम यांना मिळालीं होतीं. या बाबतींत मि. ह्यूम याच्या हातीं जे रिपोर्ट लागले होते त्यावरून ह्या बंडाचा प्रयत्न फारसा संघटित स्वरूपाचा नसला तरी निश्चयें

व्याप्त झालेले लोक कांहीं तरी करण्यास प्रवृत्त झाले होते असें त्यांना आढळून आलें. हें " कांहीं तरी " म्हणजे खून, मारामाऱ्या, सावकारांच्या घरावर दरवडे व बाजारांची लूटालूट याच्याशिवाय दुसरें काय असणार ? ही सर्व कृत्यें बेकायदेशीर खरीं पण त्यांना दुसऱ्या राजकीय शक्तींचा पाठिंबा मिळाल्यास याच कृत्यांचें राष्ट्रीय क्रांतींत रूपांतर होण्याचा संभव असतो. मुंबई इलाख्यांतील शेतकरी लोकाचे दंगे अशाच स्वरूपाचे होते. मि. ह्यूम यांनीं हें सर्व जाणूनच देशातील असंतोषाची वाफ बाहेर सोडण्याकरितां कॉंग्रेसची योजना केली. याच हेतूनें मि. ह्यूम यांनीं हिंदुस्थानांत एक राष्ट्रीय संमेलन भरविण्याचे ठरविलें व कलकत्ता युनिव्हर्सिटीच्या ग्रॅज्युएटांना त्यांनी १ मार्च १८८३ रोजीं एक हृदयाला हलवून सोडणारें पत्र पाठविलें. सुशील, सत्यनिष्ठ, निःस्वार्थी, प्रामाणिक, संयमी, समाजाची प्रत्यक्ष सेवा करण्याची इच्छा असलेले व त्याकरितां लागणारें नीतिधैर्य असलेले असे पन्नास लोक मिळाले तर वरील परिषदेसारखी एक राष्ट्रीय संस्था स्थापन करतां येईल असें त्यांनीं त्या पत्रांत लिहिलें होतें. त्यांच्यापुढें त्यानी पुढील ध्येय मांडलें. 'लोकसत्ताक राज्यपद्धति, वैयक्तिक महत्त्वाकांक्षेपासून अलिप्तपणा व " तुमच्यापैकीं जो सर्वात श्रेष्ठ आहे त्यानें तुमचा सेवक व्हावें " हा सिद्धांत असून उलटपक्षीं जर तुम्हांला स्वतःच्या सुखावर व ऐषआरामावर पाणी सोडतां येत नसेल तर प्रगतीच्या सर्व आशा फुकट आहेत. हिंदुस्थानावर आज जें सरकार आहे त्याच्या हाताखालीं राहण्यासच तें लायक आहे, व यापेक्षां जास्त कांहीं मिळविण्याची त्याची इच्छा नाही असेंच म्हणावें लागेल, असें निर्भीडपणाचे विचार त्यानीं या पत्रांत मांडले होते.

कॉंग्रेसच्या जन्मासंबंधाची विस्तृत हकीकत सांगण्यापूर्वी देशांतील सार्वजनिक जीवनाचा पाया ज्यांनी घातला अशा कॉंग्रेसपूर्वीच्या पुढाऱ्यांसंबंधानें व त्यांच्या चळवळीसंबंधानें आपण थोडासा विचार करूं.

१८५१ सालीं बंगालमध्यें ब्रिटिश इंडियन असोसिएशन नांवाची संस्था स्थापन झाली व तिच्या द्वारां डॉ. राजेंद्रलाल मित्र व रामगोपाळ घोष यांनीं कित्येक वर्षे सार्वजनिक कामें केलीं. ही संस्था अर्धशतकापर्यंत एक जागृत शक्ति होती. मुंबईमध्यें सार्वजनिक कार्य करणारी बॉबे असोसिएशन नांवाची संस्था होती. बंगालमधील वरील संस्थेच्या मानानें ही संस्था फार दिवस टिकली नाहीं तरी सर मंगलदास नथूभाई व मि. नवरोजी फर्दुनजी यांच्या नेतृत्वाखालीं

या संस्थेनें तितकींच महत्त्वाचीं सार्वजनिक कामें केलीं. दादाभाई नवरोजी व जगन्नाथ शंकर शेठ यांनीं या असोसिएशनची स्थापना केली होती. १८७०च्या सुमारास ईस्ट इंडिया असोसिएशन या नांवाची एक संस्था स्थापन करण्यांत आली. या संस्थेनें मोठ्या नेटानें सार्वजनिक कामें करून वरील संस्थेला मागें टाकलें. दक्षिणेंत 'हिंदू'नें सार्वजनिक जीवनाला सुरवात केली. एम्. वीर राघवाचारियर, ऑ. रंगय्या नायडू, जी. सुब्रह्मण्य अय्यर व एन्. सुब्बाराव पंतलू वगैरे सन्माननीय गृहस्थांनीं हें पत्र सुरु केलें होतें. 'हिंदू' पत्र ज्या सुमारास सुरू झालें त्याच सुमारास पुण्यांत 'पुणें सार्वजनिक सभे'ची प्रस्थापना झाली. रा. ब. के. एल्. नूलकर व एस्. एच्. चिपळूणकर यांनीं या संस्थेच्या पुरस्कर्तृत्वाखालीं अनेक सार्वजनिक कार्यें केलीं.

बंगालमध्यें १८७६ सालीं इंडियन असोसिएशन नावाची संस्था स्थापण्यात आली. सुरेंद्रनाथ बानर्जी हे या संस्थेचे चालते बोलते प्राण होते व आनंद मोहन बोस हे या संस्थेचे पहिले सेक्रेटरी होते.

या सर्व सावर्जनिक चळवळी फारशा संघटित रीतीनें चालविल्या जात नव्हत्या. तरी १८७० सालच्या या काळांत देखील अधिकारीवर्गावर त्यांचा परिणाम होऊं लागला होता. वर्तमानपत्रद्वारा होणारा मतप्रसार हा या चळवळींतील एक सामर्थ्यवान घटक होता. कारण १८७५ सालीं हिंदुस्थानांत ४७५ वर्तमानपत्रें प्रसिद्ध होत होती. यापैकीं बहुतेक सर्व पत्रें देशी भाषांतूनच प्रसिद्ध होत होती. सुरेंद्रनाथ बानर्जी हे आय. सी. एस्. होते; पण राष्ट्राच्या सुदैवानें ते आपल्या कामातून मोकळे झाले होते. त्यांनीं सेवानिवृत्त झाल्यावर उत्तर हिंदुस्थानांत, पंजाब प्रांतांत व संयुक्त प्रांतांत पहिला राजकीय दौरा काढला. १८७७ सालीं दिल्लीला झालेल्या दरबाराला ते हजर होते. व त्यानी तेथें उपस्थित झालेल्या मोठमोठ्या संस्थानिकांच्या व इतर पुढाऱ्यांच्या भेटी घेतल्या. १८७७ सालीं दिल्ली येथें देशांतील बड्या संस्थानिकांचें व इतर नामांकित व्यक्तींचें जें दरबारच्या निमित्तानें संमेलन झालें तें पाहूनच अशा प्रकारची एक प्रचंड राजकीय परिषद भरवावी अशी कल्पना सुरेंद्रनाथ बानर्जींना सुचली अशी कांहीं लोकाची समजूत आहे. १८७८ सालीं मुंबई व मद्रास इलाख्यांत त्यांनीं दौरा काढला व लॉर्ड साल्सबरी यांनीं सिव्हिल सर्व्हिस परीक्षेच्या उमेदवारांच्या वयाची मर्यादा १९ वर्षांपर्यंत खालीं ओढली या प्रतिगामी धोरणाविरुद्ध लोकमत त्यांनीं

जागृत केलें. सिव्हिल सर्व्हिसच्या प्रश्नाबाबत सर्व हिंदुस्थानातर्फे कॉमन्स सभेला एक अर्ज पाठविण्याचीही त्यांनीं तयारी केली.

याचवेळीं लॉर्ड लिटननें आपल्या प्रतिगामी कारकीर्दीला सुरवात केली आणि १८७८ चा व्हर्नाक्युलर प्रेस अॅक्ट, अफगाण युद्ध, १८७७ चा उधळा दिल्ली दरबार व कापसावरील आयात कराचा यज्ञ इतक्या गोष्टी केल्या. लॉर्ड लिटन यांच्या कारकीर्दीनंतर लॉर्ड रिपन यांची नव्या युगाला प्रारंभ करून देणारी कारकीर्द सुरू झाली. लॉर्ड रिपननें अफगाणिस्थानच्या अमीराशीं तह केला, व्हर्नाक्युलर प्रेस अॅक्ट रद्द केला, स्थानिक स्वराज्याच्या हक्कांची तरफदारी केली व इल्बर्ट बिलाचा पुरस्कार केला. १८८३ सालीं हें बिल त्या वेळचे हिंदुस्थानसरकारचे कायदेमंत्रि मि. इल्बर्ट यांनीं विचाराकरितां मांडले. युरोपियन व त्याचप्रमाणें अमेरिकन गुन्हेगारांवरील खटल्याची चौकशी करण्याच्या बाबतींत हिंदी मॅजिस्ट्रेटांना जी मनाई करण्यांत आली होती ती रद्द करण्याचा या बिलाचा उद्देश होता. हिंदुस्थानातील अॅंग्लो-इंडियनांना ही गोष्ट आवडली नाहीं व त्यांचीं मनें प्रक्षुब्ध झालीं. "गव्हर्नमेंट हाउसवरील पहारेकऱ्यांवर हल्ला करून व्हाइसरॉयला आपल्या ताब्यांत घ्याव-याचें व चटपाल घाटावरील बोटींत त्याला बसवून इंग्लंडला पाठवावयाचे" असा गुप्त कट काहीं प्रक्षुब्ध अॅंग्लो-इंडियनांनीं केला. वरील कायद्यास सर-कारनें पाठिंबा दिल्यास आपला हा बेत तडीस न्यावयाचा असा या कटवाल्यांनीं निश्चय केला होता. कलकत्त्यातीलच पुष्कळ अॅंग्लो-इंडियनांनी हा कट रचला होता. १८८३ सालचें मूळचे बिल जवळ जवळ रद्दच करण्यांत आलें. फक्त सेशन्स जज्ज व डि. जज्ज यांच्या बाबतींतच तेवढें वरील बिलांतील तत्त्व मान्य करण्यात आलें. लॉर्ड रिपन आपली कारकीर्द संपवून परत मातृभूमीस जाण्यास निघाले त्या वेळीं हिंदुस्थानातील सर्व हिंदी लोकांनीं त्यांना आदरपूर्वक निरोप दिला, हें पाहून इंग्रजांना त्याच्याबद्दल हेवा वाटला व त्यांपैकीं पुष्कळांचे डोळे उघडले. "ही गोष्ट खरी असेल तर याचा अर्थ काय" असे उद्गार या प्रसंगीं सर ऑकलंड काल्व्हिन यांनीं काढले असें आपल्या "A nation in the making" या पुस्तकात सर सुरेंद्रनाथ बानर्जी यांनीं म्हटलें आहे.

इल्बर्ट बिलाच्या बाबतींत अॅंग्लो-इंडियनांचा विजय झाला. आपलें जातीय वर्चस्व प्रस्थापित करण्यासाठी व तें कायम ठेवण्यासाठीं अॅंग्लो इं

प्रयत्न होता, ही गोष्ट हिंदी लोकांच्या लक्षांत आल्याशिवाय राहिली नाहीं. संघटित चळवळीचा कसा उपयोग होतो याचा धडाच या प्रकरणापासून हिंदुस्थानांतलि सार्वजनिक कार्यकर्त्यांना शिकावयास मिळाला व यानंतर थोड्याच दिवसांनीं १८८३ सालीं कलकत्ता येथील आल्बर्ट हॉलमध्यें एक राजकीय परिषद भरविण्यांत आली. सुरेंद्रनाथ बानर्जी व ए. एम्. बोस या परिषदेला हजर होते. सुरेंद्रनाथ बानर्जींनी दिल्ली येथील समेलनाची आठवण या परिषदेंतील श्रोत्यांना करून दिली. " या परिषदेस हजर असलेल्या लोकांना एक नवीनच प्रकाश व स्फूर्ति मिळाली " असें मि. अंबिकाचरण मुजुमदार यांनी आपल्या " The Indian National Evolution " या पुस्तकांत म्हटलें आहे. याच्या पुढच्या सालीं कलकत्ता येथें आंतरराष्ट्रीय प्रदर्शन भरलें. इंडियन नॅशनल कॉंग्रेसची मूळ स्फूर्ति या प्रदर्शनापासून मिळाली असे रे. जॉन मरडॉक यांना म्हटलें आहे. १८८१ सालीं मद्रास महाजन सभा प्रस्थापित झाली, व मद्रास येथे प्रांतिक परिषद भरविण्यात आली आणि इकडे पश्चिमेकडे मेथा, तेलंग व तय्यबजी यांनी १८८५च्या ३१ जानेवारीला बाँबे प्रेसिडेन्सी असोसिएशन स्थापन केली.

या सर्व घटनांवरून कोणत्या तरी धर्तीची अखिल भारतीय संघटना निर्माण केली पाहिजे, अशी आवश्यकता हिंदुस्थानाला भासूं लागली होती, ही गोष्ट स्पष्ट आहे. अखिल भारतीय राष्ट्रीय सभेची कल्पना प्रथम कोणाच्या डोक्यांत आली हें एक अगम्य गूढ आहे. १८७७ सालचा वडा दरबार व कलकत्त्यांतील आंतरराष्ट्रीय समेलन पाहून राष्ट्रीय परिषदेची कल्पना कांहीं लोकांच्या मनांत आली असें ज्याप्रमाणें म्हणण्यात येते, त्याचप्रमाणें १८८४ च्या डिसेंबरमध्यें मद्रास येथें भरलेल्या थिऑसॉफिकल कन्व्हेन्शननतर १७ गृहस्थांची एक सभा झाली व त्या मंडळींना ही कल्पना सुचली असेही म्हणतात. सिव्हिल सर्विसमधून रिटायर झाल्यानतर मि डेव्हिड ह्यम यांनी जी इंडियन यूनियन स्थापन केली तीच कॉंग्रेस भरविण्याच्या कामी कारणीभूत झाली अशीही कांहीं लोकांची कल्पना आहे. कॉंग्रेसची मूळ कल्पना कशावरूनही सुचलेली असो किंवा ती कोणीही काढलेली असो, वरील सर्व घटना पाहून आपण अशा एका निर्णयाला येऊन पोंचतों कीं, हिंदुस्थानच्या वातावरणांत ती कल्पना वावरत होती, असल्या संघटनेची जरूरी लोकांना भासूं लागली होती. अशा वेळीं मि. आक्टेव्हियन ह्यूम यांनीं पुढाकार घेतला व १८८५ च्या मार्चमध्यें त्या सालच्या डिसेंबरांत पुणें येथें

इंडियन नॅशनल यूनियनचें पहिलें अधिवेशन भरविण्याची पहिली नोटीस प्रसिद्ध झाली. अशा रीतीनें जी अव्यक्त कल्पना वातावरणात सामान्यतः वावरत होती व हिंदुस्थानांतील पूर्व, पश्चिम, दक्षिण, उत्तर भागांतील विचारी लोकांच्या मनावर जिनें पगडा बसविला होता त्या कल्पनेला निश्चित स्वरूप प्राप्त झालें व ती सत्यसृष्टीत उतरली.

राजकीय गुलामगिरीच्या जाणीवेनें व राजकीय खळबळाटांनीच केवळ कॉंग्रेसला जन्म दिला नाहीं. कॅांग्रेस ही राजकीय ध्येयानें प्रेरित झाली होती हें खरें; पण ती राष्ट्रीय पुनरुज्जीवनाच्या चळवळीचाही पुरस्कार करीत होती. कॉंग्रेसच्या जन्मापूर्वी ५० वर्षांवर देशांत राष्ट्रीय पुनरुज्जीवनाच्या कार्याला आरंभ झाला होता. विविध स्वरूपाचें हिंदी राजकीय जीवन हे राजा राममोहन राय यांच्या काळांतच क्षुब्ध झालें होतें. राजा राममोहनराय हे भारतीय राष्ट्रीयत्वाचे पैगंबर व अर्वाचीन भारत वर्षाचे एका अर्थाने जनक होत. देशाच्या त्या वेळच्या धार्मिक व सामाजिक सुधारणांकडे त्यांचें विशेष लक्ष होतें तरी राष्ट्रावर होणाऱ्या भयंकर राजकीय अन्यायांची त्यांना तीव्र जाणीव होती व या अन्यायाचा त्वरित परिहार करण्याकरिता ते जोराचा प्रयत्नही करीत होते. राममोहन राय हे १७७६ साली जन्मले व १८३३ सालीं ब्रिस्टल येथें ते मरण पावले. सतीची चाल बंद करण्याच्या कामी त्यांनीं पुढाकार घेतला व हिंदुस्थानांत पाश्चात्य शिक्षण देण्याला सुरुवात करण्याच्या कामींही त्यांचे प्रयत्न कारणीभूत झाले. आपल्या आयुष्याच्या शेवटच्या दिवसांत इंग्लंडला जाण्याचे त्यांनी ठरविलें. स्वातंत्र्यासंबंधीचें त्यांचें प्रेम अलोट होतें. केप ऑफ गुडहोपला पोंचल्यानंतर फ्रेंच बोटीमधून प्रवास करण्याचा त्यांनी आग्रह धरला व या बोटीवरील स्वातंत्र्याचा ध्वज जेव्हां त्यांनीं पाहिला तेव्हा "स्वातंत्र्यध्वजाचा विजय असो" "Glory, Glory, Glory to flag" असा त्यांनी जयजयकार केला. मोंगल बादशहाचा वकील म्हणून ते जरी लंडनला गेले होते तरी त्यांनीं हाउस ऑफ कॉमन्सच्या कमिटीपुढें हिंदी लोकांची गाऱ्हाणी मांडलीं. हिंदुस्थानांतील सारा वसूल करण्याची पद्धति आणि हिंदुस्थानची आर्थिक स्थिती या विषयावरील तीन निबंध त्यांनी कमिटीपुढें सादर केले. ईस्ट इंडिया कंपनीनें त्यांना सार्वजनिक मेजवानी देऊन त्यांचा गौरव केला. १८३२ सालीं पार्लमेंटपुढें चार्टर ॲक्टासंबंधानें विचार चालू होता आणि हें बिल पास झालें नाहीं तर आपण

ब्रिटिश साम्राज्याचा त्याग करूं व अमेरिकेंत जाऊन राहूं अशी त्यांनी प्रतिज्ञा केली होती. राममोहन राय यांच्या काळांत हिंदुस्थानांतील मुद्रणस्वातंत्र्याची गळचेपी करण्यांत आली होती. लॉर्ड हेस्टिंग्जनंतर हंगामी गव्हर्नर झालेला मि. जॉन ॲडम यानें वर्तमानपत्रांवर कडक निर्बंध घातले, व सरकारच्या कार-भारावर टीका केली म्हणून 'कलकत्ता जर्नल' चा संपादक मि. बकिंगहॅम व दुय्यम संपादक मि. सॅन्फर्ड यांना हद्दपार केलें. ॲंग्लो इंडियन व हिंदी या दोन्हीं वर्तमानपत्रांवर त्यानें कडक सेन्सॉरशिप ठेवली व वर्तमानपत्र सुरू करा-वयाचें झाल्यास त्याच्या प्रकाशकानें व मालकानें गव्हर्नर जनरलकडून लायसेन्स घेतलें पाहिजे असा नियम केला. या प्रेस आर्डिनन्सविरुद्ध राममोहन राय यांनीं वकील देऊन कोर्टात काम चालविलें पण त्यांत त्यांना यश आलें नाहीं. इंग्लंडच्या राजाकडे त्यांनीं या बाबतीत एक सार्वजनिक अर्जही केला पण त्याचाही कांहीं उपयोग झाला नाहीं. राममोहन राय यांनीं पेरलेलें हें बीं फुकट मात्र गेलें नाहीं. १८३५ सालीं सर चार्लस मेटकाफ यांनीं वर्तमानपत्रा-वरील सर्व निर्बंध काढून टाकले. सतीची चाल रद्द करण्यात आली तेव्हां त्या कायद्याविरुद्ध राममोहन राय यांच्या प्रतिस्पर्ध्यांनीं केलेलें अपील पार्लमेंटानें फेटाळून लावलें व पुढें चार्टर ॲक्टही पास झाला हें पाहून राजा राम-मोहन राय यांच्या मनाचें समाधान झालें.

१८५७ चें बंड मोडल्यानंतर १८५८ सालीं हिंदुस्थानांत विश्वविद्यालयें व हायकोर्टें स्थापन करण्यात आलीं. १८६१ ते १८६३ च्या दरम्यान कायदेमंडळेंही निर्माण करण्यांत आली. बंडाच्या अगदीं थोडें अगोदर विधवा विवाहाचा कायदा पास झाला होता. १८६० चे सुमारास हिंदुस्थानांत पाश्चात्य वाङ्मयाचा व शिक्षणाचा निकट परिचय होऊं लागला. पाश्चात्य पद्धतीवर न्यायदानाच्या संस्था स्थापण्यांत आल्या व पार्लमेंटरी पद्धतीनें कायदे करणारीं कायदेमंडळेंही निर्माण झालीं यामुळें हिंदुस्थानांत एका नव्या युगालाच प्रारंभ झाला आणि ज्या हिंदी लोकांचा या संस्थांशीं संबंध आला त्यांच्यावर पाश्चात्य संस्कृतीचा गाढ परिणाम झाल्याशिवाय राहिला नाही.

राजा राममोहन राय यांनीं ब्राह्मो समाज स्थापन करून सुरू केलेल्या धार्मिक बीजारोपणाचा त्यांच्या मरणानंतर जोरानें प्रसार होऊं लागला. राजा राममोहन राय यांचें कार्य पुढें चालविणारे ब्राह्मो समाजाचे

वर्षभर ज्या राजकीय चळवळी करावयाच्या त्यासंबंधानें चर्चा करून त्यांना निश्चित स्वरूप द्यावें.

या परिषदेला अप्रत्यक्ष रीत्या नॉटिव्ह पार्लमेंटचें स्वरुप प्राप्त होईल आणि योग्य त्या धोरणानें परिषदेचें काम चालविल्यास कोणत्याही प्रकारची प्रातिनिधिक संस्था चालविण्यास हिंदुस्थान सर्वस्वीं नालायक आहे, या त्याच्यावर असलेल्या आक्षेपाला ती बिनतोड उत्तर देईल.

या वर्षाची परिषद पुण्यासच भरावयाची असल्यानें सार्वजनिक सभेची श्री. चिपळूणकरप्रभृति मंडळीच स्वागतमंडळाचें काम करतील. परिषदेला आलेले प्रतिनिधि परिषदेच्या कामाकरितां पुण्यास असेपर्यंत वाहनाची, जेवणाखाण्याची व राहण्याची वगैरे सर्व व्यवस्था स्वागत मंडळ करील व त्याकरितां प्रतिनिधींना कोणत्याही प्रकारचा खर्च पडणार नाहीं.

पुण्याचे प्रतिनिधि खेरीज करून मुंबई इलाखा (सिंध व वऱ्हाड मिळून), मद्रास, व लोअर बंगाल या प्रांतांना २० व नार्थवेस्ट प्रॉव्हिन्स, औध व पजाब यांना प्रत्येकीं १० प्रतिनिधि परिषदेला पाठवितां येतील.

कॉंग्रेस भरविण्याच्या कामीं मि. ह्यूम यानीं व्हाइसरॉयांची शुभेच्छा संपादन करून घेतल्यानंतर ते इंग्लंडला गेले व लॉर्ड रिपन, लॉर्ड डलहौसी, सर जेम्स केअर्ड, जॉन ब्राइट, मि. रिड, मि. स्लॅग वगैरे प्रमुख मंडळींचा त्यानीं या बाबतींत अगाऊ सल्ला घेतला व त्यांची संमतिही मिळविली.

मिसेस बेझंट यांनीं आपल्या "How India wrought for freedom" या पुस्तकांत कॉंग्रेसच्या या अधिवेशनाचें यथार्थ वर्णन केलें आहे.

"नाताळापूर्वी अगदीं थोडे दिवस पुण्यांत कॉलऱ्याच्या सांथीला सुरुवात झाली त्यामुळें ही पहिली कॉंग्रेस मुंबईस भरविण्याचें ठरविण्यांत आलें. गोकुळदास तेजपाल संस्कृत कॉलेजच्या चालकांनीं कॉलेजच्या सर्व सुंदर इमारती व त्याचें वसतिगृह कॉंग्रेसच्या स्वागत मंडळाच्या स्वाधीन केलें. आणि २७ डिसेंबर सकाळपूर्वी कॉंग्रेस भरविण्याची सर्व प्रकारची जय्यत तयारी करण्यांत आली. हिंदुस्थानच्या स्वातंत्र्याच्या चळवळींत ज्यांनीं पुढें आपलें नांव गाजविलें अशी कितीतरी नामांकित मंडळी या परिषदेला हजर होती. मद्रासचे डेप्युटी कलेक्टर व सुधारकाग्रणी दि. ब. रघुनाथराव, पुण्याच्या स्मालकॉज

कोर्टाचे त्या वेळचे जज्ज व पुढे हायकोर्टाचे जज्ज झालेले महादेव गोविंद रानडे, –न्या. रानडे हे त्या वेळच्या कायदेमंडळाचेही सभासद होते–आग्र्याचे विद्वान लेखक लाला वैजनाथ, प्रो. के. सुंदरम् व आर. जी. भांडारकर वगैरे मंडळी या कॉंग्रेसला हजर होती, पण त्यांना परिषदेचे प्रतिनिधि म्हणून तिच्या कामांत भाग घेतां आला नाहीं. ज्ञानप्रकाश, पुणें सार्वजनिक सभेचे त्रैमासिक, मराठा, केसरी, नवविभाकर, इंडियन मिरर, नासीम, हिंदुस्थानी, ट्रिब्यून, इंडियन यूनियन, स्पेक्टेटर, इंदुप्रकाश, हिंदू, क्रेसेंट वगैरे पत्रांचे सपादक तसेंच सिमल्याहून मि. ह्यूम, कलकत्त्याचे डब्ल्यू. सी. बानर्जी, नरेंद्रनाथ सेन, पुण्याचे डब्ल्यु एस्. आपटे व जी. जी. आगरकर, गंगाप्रसाद वर्मा ( लखनौ ), दादाभाई नौरोजी, तेलंग, मेथा, वाच्छा, सलवारी, चंदावरकर ( मुंबई ) मद्रास महाजन सभेचे अध्यक्ष रंगय्या नायडू, एस्. सुब्रह्मण्य अय्यर, पी. आनंदाचार्लू, जी. सुब्रह्मण्य अय्यर, वीर राघवाचारीयर, केशव पिले वगैरे मंडळी प्रतिनिधि म्हणून या परिषदेला हजर होती.

ता. २८ डिसेंबर १८८५ रोजीं दोन प्रहरीं बारा वाजतां गोकुळदास तेजपाल संस्कृत कॉलेजमध्यें कॉंग्रेसच्या अधिवेशनास सुरुवात झाली. मि. डब्ल्यू सी. बानर्जी हे या पहिल्या अधिवेशनाचे अध्यक्ष होते. मि. ह्यूम, मि. एस्. सुब्रह्मण्य अय्यर, ऑ. के. टी. तेलंग यांचीं या परिषदेंत पहिलीं भाषणें झालीं. अध्यक्षांनीं आपल्या भाषणांत कॉंग्रेसच्या ध्येयासंबंधानें विस्तृत विवेचन केलें. या परिषदेत पुढील नऊ ठराव पास झाले.

१ हिंदुस्थानच्या राज्यकारभारासंबंधानें चौकशी करण्यकारितां रॉयल कमिशन नेमावें. २ इंडिया कौंसिल रद्द करावें. ३ कायदेमंडळात लोकनियुक्त सभासद घ्यावे. प्रश्न विचारण्याचा हक्क असावा. पंजाब, वायव्येकडील प्रांत, औध यांना कायदेमंडळें द्यावीं. कौंसिलांतील बहुसंख्य पक्षानें केलेल्या तक्रारींचा विचार करण्याकारितां हाऊस ऑफ कॉमन्समध्यें स्टॅंडिंग कमिटी नेमण्यांत यावी. ४ आय. सी. एस्. च्या परीक्षा इंग्लंड व हिंदुस्थान या दोन्ही ठिकाणीं एकाच वेळीं घ्याव्या. ५–६ लष्करावरील खर्चासंबंधानें एका ठरावात विचार करण्यांत आला होता. ७ अप्पर ब्रह्मदेश खालसा करून तो हिंदुस्थानला जोडण्याचा जो विचार चालू आहे त्याचा निषेध दुसऱ्या एका ठरावानें करण्यात आला ८ देशांतील प्रांतिक संस्थाकडे कॉंग्रेसमध्यें पास झालेले ठराव पाठवावे व या संस्था

ठिकठिकाणीं सभा भरवून काँग्रेसच्या ठरावाला मान्यता द्यावी. ९. १८८६ च्या ता. २८ डिसेंबरमध्यें कॉंग्रेसचें आधिवेशन कलकत्ता येथें भरवावें, हा शेवटचा ठराव होता.

जगांतील महानद्यांचा उगम जसा लहान झुळझुळ वाहणाऱ्या ओढ्यापासून होत असतो, त्याचप्रमाणें मोठ्या संस्थांचा प्रारंभही अल्प प्रमाणावरच होत असतो. आरंभींआरंभी या नद्यांचा ओघ जोरांत असतो, व त्याला खळखळाटही फार असतो. पण त्यांना पुढें पुढें ठिकठिकाणच्या लहान नद्या येऊन मिळाल्या म्हणजे त्यांचा प्रवाह शांत व स्थिर होऊं लागतो व त्यांचें पात्र रुंदावूं लागतें. इंडियन नॅशनल कॉंग्रेसचा विकासही याच नियमाप्रमाणें झाला. काँग्रेसला प्रथम प्रथम प्रबल संकटाला तोंड द्यावें लागलें व त्यामुळें तिला आपलें ध्येयही नेमस्तपणाचें ठेवावें लागलें. जेव्हां तिनें लोकांच्या हृदयांत प्रेमाचें स्थान पटकावलें तेव्हा तिचाही प्रवाह फुगत चालला व अनेक सामाजिक, नैतिक व आर्थिक चळवळींचा तिच्यात समावेश झाला. कॉंग्रेसचें पाऊल आरंभीं संशयग्रस्ततेनें व आत्मविश्वासाच्या अभावानें पडत होते. कॉंग्रेस जसजशी प्रौढ झाली तसतशी तिला आपल्या सामर्थ्याची जाणिव होऊ लागली, दृष्टि विशाल झाली व हिंदी जनतेची प्रतिनिधि या नात्यानें धैर्यानें व आत्मविश्वासानें तिनें आपल्या मागण्या मांडण्यास सुरवात केली. जरी प्रथमावस्थेंत कॉंग्रेस सामाजिक बाबींचा विचार करतांना कचरत असें तरी तिनें पुढें जीवनात निरनिराळे स्वतंत्र भेद असतात या तत्त्वाला मान्यता दिली नाहीं. कॉंग्रेस ही एक राष्ट्रीय संघटना आहे. ब्रिटिश हिंदुस्थान व हिंदी हिंदुस्थान असा ती भेदाभेद करीत नाहीं. प्रांतिक भेदांना तिच्यापाशीं वाव नाहीं. उच्च वर्गाचे लोक व सामान्य जनता, श्रीमंत व गरीब, शहरें व खेडी, शेतकीविषयक हितसंबंध व औद्योगिक हितसंबंध, याच्यांतही ती भेदाभेद करीत नाहीं. त्याचप्रमाणें जातिविषयक व धर्मविषयक् भेद ती मानीत नाहीं. गांधीजींनीं दुसऱ्या गोलमेज परिषदेच्या वेळीं फेडरल स्ट्रक्चर कमिटीपुढें कॉंग्रेसचें हें धोरण स्पष्टपणें मांडलें असून त्याच्या त्या वेळच्या ओजस्वी भाषणांतील जरूर तो उतारा खाली दिला आहे:—

“ राष्ट्रीय सभा ही हिंदुस्थानातील राजकीय संघटनेंत सर्वात जुनी राजकीय संघटना आहे. या काळांत अव्याहतपणें तिचें वार्षिक अधिवेशन होत आलें आहे. याचाच अर्थ ती सभा राष्ट्रीय आहे. काँग्रेस कोणत्याही एका विवक्षित

महर्षि दादाभाई नौरोजी.
स्वराज्याची पहिला घोषणा करणारे.

जातींची, पंथांची किंवा हितसंबंधांची प्रतिनिधि नाहीं. अखिल भारतवर्षाच्या कल्याणासाठीं व हिंदुस्थानच्या सर्व जातींसाठीं व वर्गासाठीं ती झटत आहे. मला सांगायला आनंद वाटतो कीं, एका इंग्लिश माणसाच्या मेंदूंत राष्ट्रीय सभेची कल्पना उदय पावली. ॲलन ऑक्टेव्हियन ह्यूम हे कॉंग्रेसचे जनक आहेत. हिंदी जनतेनें पितामह म्हणून मान दिलेले दादाभाई नौरोजी व फेरोजशहा मेथा या दोन पार्शी गृहस्थांनीं राष्ट्रीय सभेचें तिच्या बाल्यावस्थेंत संगोपन केलें. सुरुवातीपासूनच मुसलमान, ख्रिश्चन, ॲंग्लो इंडियन वगैरे सर्वधर्मीयांनीं अंशतः किंवा पूर्णपणें कॉंग्रेसचें प्रतिनिधित्व स्वीकारलें होतें. मी तर म्हणतों कीं, सर्व धर्म, जाति व पक्ष कॉंग्रेसचे पहिल्यापासून प्रातिनिधि होते. राष्ट्रीय सभेच्या अध्यक्षस्थानीं मुसलमान व पार्शी गृहस्थ विराजमान झाले आहेत. या क्षणी मला एका ख्रिश्चन गृहस्थाचीही आठवण होते. कालीचरण बानर्जी हे ख्रिश्चन गृहस्थ कॉंग्रेसशीं पूर्णपणें एकरूप झाले होते. त्यांच्याइतकी शुद्ध हिंदी अंतःकरणाची व्यक्ति मला आढळली नाहीं. आपल्यामध्यें आज श्री. के. टी. पाल नाहींत. कॉंग्रेसच्या अधिकारीक्षेत्रात कोणत्याही जागेवर त्यांनीं काम केल्याचें मला माहीत नाहीं; तरी मी खात्रीनें सांगूं शकतों कीं, ते पूर्णपणें राष्ट्रीय वृत्तीचे होते. ज्याची उणीव आज भासत आहे ते मौलाना महंमदअल्लीही राष्ट्रीय सभेचे एकदां अध्यक्ष होते. राष्ट्रीय सभेच्या आजच्या कार्यकारी मंडळांतील १५ सभासदांपैकीं ४ मुसलमान आहेत. स्त्रियाही राष्ट्रीय सभेच्या अध्यक्ष होत्या. डॉ. ॲनी बेझंट या पहिल्या स्त्री अध्यक्ष व त्यांच्या मागून श्री. सरोजिनी नायडू या दुसऱ्या स्त्री अध्यक्ष होत. या कार्यकारी मंडळाच्याही सभासद आहेत. याप्रमाणें जात व वर्ग या भेदाप्रमाणेंच स्त्री-पुरुष हाही भेद राष्ट्रीय सभेंत नाहीं, हें दिसून येईल.

राष्ट्रीय सभेनें सुरुवातीलाच अस्पृश्यतेचा प्रश्न हातीं घेतला. एके काळीं प्रत्येक अधिवेशनाच्या शेवटीं सामाजिक परिषद भरत असे. कै. न्या. रानडे यांनीं सामाजिक परिषदेसाठीं आपलें शक्तिसर्वस्व वाहिलें होतें. न्या. रानडे यांच्या नेतृत्वाखालीं अस्पृश्यांचा प्रश्न सामाजिक परिषदेच्या कार्यक्रमांत अत्यंत महत्त्वास पोंहोचलेला होता. परंतु १९२० मध्यें कॉंग्रेसनें स्वतः होऊनच अस्पृश्यतानिवारणाच्या प्रश्नाला राजकीय प्रश्नांच्या बरोबरीचा दर्जा दिला. आणि राजकीय कार्यक्रमांत या प्रश्नाला महत्त्वाचें स्थान देऊन फार मोठें आक्रमण केलें.

हिंदु-मुसलमानांचें ऐक्य याचा अर्थ सर्व जातींचें ऐक्य असा काँग्रेसचा अभिप्राय आहे. स्वराज्यप्राप्तीसाठीं हिंदु-मुसलमानांचें ऐक्य ही अत्यंत आवश्यक व अपरिहार्य गोष्ट आहे असें काँग्रेसचें ठाम मत आहे. त्याचप्रमाणें अस्पृश्यतेचा कलंक पूर्ण धुतल्याखेरीज संपूर्ण स्वातंत्र्य अशक्य आहे अशी काँग्रेसची तितकीच दृढ समजूत आहे.

१९२० साली काँग्रेसचें जें स्वरूप होतें तेंच आजही आहे. सर्वांगीण राष्ट्रीयत्व उत्पन्न करण्याचाच प्रयत्न तिनें आजवर केलेला आहे. काँग्रेसनें अगदीं बाल्यावस्थेंत तुमचाही (संस्थानिकांचाही) पक्ष उचलून धरला होता. काश्मीर व म्हैसूर यांचा प्रश्न उपस्थित झाला असतां तुम्हांला पितामह दादाभाई नौरोजी यांनींच मदत केली. आणि या प्रयत्नामध्यें ही दोन संस्थानें काँग्रेस व दादाभाई नौरोजी यांची ऋणी राहिलीं आहेत. संस्थानिकांच्या खासगी व अंतर्गत गोष्टींपासून सर्वस्वीं अलिप्त राहून काँग्रेस आजसुद्धां संस्थानिकांना साहाय्य करण्याचा प्रयत्न करीत आहे.

ब्रिटिश हिंदुस्थानांतील असोत किंवा हिंदी हिंदुस्थान म्हणून ज्याला म्हणतात त्या प्रांतांतील असोत, अखिल हिंदुस्थानांत एकंदर जीं ७ लक्ष खेडीं आहेत त्या खेड्यांतून पांगलेली अर्धपोटीं, मुकी, दुबळी अशी जी लक्षावधी प्रजा आहे त्या प्रजेचें प्रतिनिधित्व हेंच काँग्रेसचें मूलस्वरूप आहे. ज्या ज्या हक्काचें संरक्षण करणें काँग्रेसला जरूर वाटत आहे त्या सर्व हक्कांचें संपादन शेवटीं या दीन प्रजेच्या हितासच कारणीभूत झालें पाहिजे असें काँग्रेसला वाटतें. याच कारणांमुळें निरनिराळ्या हितसंबंधांत तेढ उत्पन्न झालेली तुम्हांला दिसतें परंतु ती नुसती दिखाऊ आहे. आणि खरोखरच अशी तीव्र तेढ असेल तर काँग्रेसच्या वतीनें मी असें अत्यंत स्पष्टपणें सांगूं शकतों कीं, या लक्षावधि गरीब लोकांसाठीं काँग्रेस आपल्या सर्व हक्कांवर पाणी सोडण्यास तयार होईल. याच कारणासाठीं ही शेकतऱ्यांची संघटना आहे आणि तिचें स्वरूप दिवसेंदिवस व्यापक होत आहे. या संघटनेच्या जोरावरच अखिल भारतीय चरखा संघानें २ हजार खेड्यांतील ५० हजार स्त्रियांना काम मिळवून दिलें आहे. यांपैकीं शें. ५० मुसलमान स्त्रिया आहेत. अस्पृश्य गणल्या जाणाऱ्या वर्गांपैकींही हजारों स्त्रियांना या संघानें काम मिळवून दिलें आहे. अशा विधायक मार्गानें आम्हीं या खेड्यांतून प्रवेश केला आहे व सर्व ७ लाख खेड्यांपर्यंत हें कार्यक्षेत्र

व्यापक करण्याचे प्रयत्न चालू आहेत. हें कार्य प्रचंड स्वरूपाचें आहे. परंतु जर तें मानवी प्रयत्नांनीं पुरें करणें शक्य असलें तर काँग्रेसनें ही सर्व खेडीं व्यापून टाकून चरख्याचा संदेश घरोघर पोंहोचवला आहे, हें तुम्हांला लवकरच दिसेल."

या प्रचंड राष्ट्रीय संघटनेचें स्वरूप काय हें गांधीजींनीं याप्रमाणें थोडक्यांत सांगितलें आहे. काँग्रेसनें दुसरें कांहींही मिळविलें नसलें तरी आपलें भावी ध्येय तिनें ठरविलें आहे आणि आपली सर्व विचारशक्ति या एकच एक ध्येयावर तिनें केंद्रीभूत केली आहे. हिंदुस्थानांतील लक्षावधि लोकांत तिनें चैतन्य निर्माण केलें आहे. ऐक्याचें महत्त्व त्यांना तिनें पटवून दिलें आहे, त्यांच्यांत आत्मविश्वास उत्पन्न केला आहे व त्यांना आशावादी बनविलें आहे.

---

# प्रकरण दुसरें

# कॉंग्रेसच्या ठरावांचें पर्यालोचन

१८८५ ते १९१५ पर्यंत कॉंग्रेसमध्यें झालेल्या ठरावांचें आतां थोड-क्यांत पर्यालोचन करूं.

१ इंडिया कौन्सिल. २ घटनाविषयक फेरफार. ३ पब्लिक सर्व्हिसेस. ४ लष्करी प्रश्न. ५ कायदा व न्यायदान. ६ कायमधारापद्धति, पाणीपट्टी, दारिद्र्य व दुष्काळ. ७ जगलचे कायदे. ८ व्यापार व उद्योगधंदे. ९ स्वदेशी, बहिष्कार व 'स्वराज्य'. १० जातीय प्रतिनिधित्व. ११ परराष्ट्रांतील हिंदी लोक. १२ मीठ. १३ मद्य व वेश्याव्यवसाय. १४ स्त्रिया व दलितवर्ग. १५ किरकोळ. १६ कॉंग्रेसची घटना.

सालोसाल भरलेल्या कॉंग्रेसच्या अधिवेशनाचा विचार या प्रकरणांत करण्यांत आलेला नाहीं. १९१५ पर्यंतच्या कॉंग्रेसच्या अधिवेशनांतून ज्या महत्त्वाच्या विषयांवर चर्चा झाल्या त्यांचा विचार करून या सालापर्यंत कॉंग्रेसचे धोरण व कार्यक्रम कशा प्रकारचा होता याचें थोडक्यांत पर्यालोचन यात केलें आहे. याकरितां या विपयांचे व ठरावांचे निरनिराळे मुख्य भाग पाडून त्यांचा विचार एकामागून एक करण्यांत आला आहे.

## १ इंडिया कौंसिल

कॉंग्रेसच्या अगदीं पहिल्या अधिवेशनात सेक्रेटरी ऑफ स्टेटचें कौंसिल रद्द करण्यांत यावें अशी मागणी कॉंग्रेसनें केली होती. यानतर लागोपाठ झालेल्या दोन अधिवेशनांतून या ठरावाचा पुनरुच्चार करण्यात आला. कॉंग्रेसच्या दहाव्या अधिवेशनांत सेक्रेटरी ऑफ स्टेटला सल्ला देण्याकरितां हाऊस ऑफ कॉमन्सनें एक स्टॅंडिंग कमिटी नेमावी असा ठराव माडण्यांत आला. हा ठराव मि. अर्डले नॉर्टन यार्नी मांडला. पण त्यासंबंधानें स्वतः त्याचेंच मन संशयग्रस्त होतें. ते म्हणाले कीं 'अशा प्रकारची स्टॅंडिंग कमिटी नेमल्यास पेन्शन घेऊन स्वदेशीं गेलेल्या अँग्लो-इंडियन अधिकाऱ्याची ती एक

वतनदारीच होऊन बसेल. इंडिया कौंसिलमध्यें कांहीं दुरुस्ती सुचवावी या मताचा मी नाहीं, तर त्याची अजीबात अखेरच झाली पाहिजे असें माझें मत आहे. तथापि अशी कमिटी नेमल्यास सध्यांच्या कौंसिलमधील सद्गृहस्थांना दरसाल जे १२०० पौंड दिले जातात ते वांचतील हा पहिला फायदा होईल, व दुसरा फायदा असा कीं, या स्टेंडिंग कमिटींतील लोकाना जाहीरपणें बोलावें लागेल, त्याच्या भाषणावर लोकमत प्रगट होईल, चर्चा होईल व त्याच्यावर टीकाही करता येतील. माझ्या मतें ठरावांतील हा स्टडिंग कमिटीसंबंधाचा भाग केवळ तात्पुरता आहे. या कौंसिलच्या जागीं दुसरी एकादी यापेक्षांही चांगली व्यवस्था कोणी सुचवीत असल्यास तिचा विचार करण्यास मी तयार आहे.

१९१२ सालीं कराची येथें झालेल्या अधिवेशनांतील ठरावांत या सुधारणेसंबंधानें स्पष्ट सूचना माडण्यांत आल्या होत्या.

‘ हल्लीं असलेलें इंडिया कौंसिल रद्द करावें असें या कॉंग्रेसचें मत असून ती पुढील सूचना करीत आहे—( क ) स्टेट सेक्रेटरीचा पगार इंग्लिश बजेटांत दाखल करावा. ( ख ) हें कौंसिल अंशतः निवडलेलें व अंशतः सरकारनियुक्त असावें. ( ग ) कौ. च्या सभासदाची संख्या नऊपेक्षां जास्त असूं नये. ( घ ) कौंसिलांतलि लोकनियुक्त सभासदांची सख्या एकंदर सभासदांच्या संख्येच्या एकतृतीयांशापेक्षा जास्त असावी. हे बिनसरकारी हिन्दी गृहस्थ असावे आणि वरिष्ठ व प्रांतिक कायदेमंडळांतून त्यांची निवडणूक करण्यात यावी. ( च ) बाकीचे सरकारनियुक्त असावे पण त्यांनीं हिंदुस्थानांत १० वर्षांहून जास्त वर्षें नोकरी केलेली असावी व ते हिंदुस्थानबाहेर २ वर्षांवर नसावेत. ( छ ) कौंसिलनें फक्त सल्ला देण्याचें काम करावें, राज्यकारभारविषयक काम त्यांनीं करूं नये. ( ज ) कौंसिलच्या सभासदांची कामाची मुदत पांच वर्षांची असावी. ’

यापुढील अधिवेशनांतून या ठरावांत पुन्हां दुरुस्त्या करून ते मंजूर करण्यांत आले तरी हें कौंसिल रद्द करावें या तत्त्वासंबंधानें कॉंग्रेसला पूर्ण खात्री वाटत होती. १९१७ च्या सुधारणेच्या कायद्यात हें कौंसिल रद्द करावें असा पुरस्कार केलेला असल्यामुळें या कौंसिलच्या निरुपयोगित्वाबद्दल कॉंग्रेसला जी खात्री वाटत होती तिला पुष्टिच मिळाली आहे.

## २ घटनाविषयक फेरफार

वरिष्ठ व प्रांतिक कायदेमंडळाच्या सभासदांची संख्या वाढवावी, लोकनियुक्त सभासदांचें त्यांत बरेंच मोठें प्रमाण असावें, वायव्य प्रांत व औध (संयुक्त प्रांत), व पंजाब या प्रांतांत कायदेमंडळें स्थापन करावीं, सर्व अंदाजपत्रकें या कायदेमंडळापुढें मांडण्यांत यावीं, कायदे मंडळांतून प्रश्न विचारण्याचा हक्क द्यावा, हाऊस ऑफ कामन्समधून एक स्टॅंडिंग कमिटी नेमण्यांत यावी व सरकारी अधिकाऱ्यांच्या कृत्यांविरुद्ध लोकांच्या ज्या तक्रारी असतील त्यांचा विचार या स्टॅंडिंग कमिटीनें करावा; अशा साध्या मागण्या पहिल्या कॉंग्रेसमध्यें करण्यांत आल्या. नोकरशाहींतील अधिकाऱ्यांवर पार्लमेंटची देखरेख असावी व त्यांच्या कृत्यांविरुद्ध पार्लमेंटचें संरक्षण मिळावें याच हेतूनें वरील मागणी करण्यात आली होती. दुसऱ्या कॉंग्रेसनें कौंसिलसुधारणांची एक विस्तृत योजना सुचविली. कौन्सिलांतील लोकनियुक्त सभासदांचें प्रमाण शें. ५० असावें अशी या योजनेंत मागणी केली होती. म्युनिसिपालिटया, लोकल बोर्डें, चेंबर्स ऑफ कॉमर्स ( व्यापारी मंडळें ) व युनिव्हर्सिटया यांच्यांतून प्रांतिक कौंसिलांतील सभासद व प्रांतिक कौंसिलानें वरिष्ठ कौंसिलाकरितां सभासद निवडावे, या अप्रत्यक्ष निवडणुकीच्या तत्त्वाला कॉंग्रेसनें मान्यता दिली होती. हाच ठराव १८८७, १८८८ व १८८९ सालीं मंजूर करण्यांत आला. चार्लस ब्रॅडला यांनीं आणलेल्या हिंदी कायदेमंडळाच्या दुरुस्तीसंबंधाच्या बिलाला १८९० सालीं कॉंग्रेसनें पाठिंबा दिला. या बिलांत बऱ्याच महत्त्वाच्या सुधारणा सुचविण्यांत आल्या होत्या; पण या बिलाला डुबकी देण्यांत आली हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. कायदेमंडळांतून प्रभावी लोकमत प्रकट करण्यास वाव मिळाल्याशिवाय हिंदुस्थानचा कारभार चांगल्या रीतीनें चालणें शक्य नाहीं, या आपल्या खात्रीलायक मताचा १८९१ सालीं कॉंग्रेसनें पुनरुच्चार केला. १८९२ साली लॉर्ड क्रॉस यांचा कौन्सिल-सुधारणांचा कायदा पास झाला. यानंतर हिंदुस्थानसरकारचे नियम व स्थानिक सरकारांचा कारभार यावर हल्ला चढविण्याचे कामीं कॉंग्रेसनें आपली शक्ति केंद्रीभूत केली. कारण या बाबतींत बरेच फेरफार होणें जरूरीचें होतें.

१८९२ सालीं कौंसिलसुधारणाच्या कायद्याला कॉंग्रेसनें राजनिष्ठापूर्वक

मान्यता दिली तरी या सुधारणांमुळें कौन्सिलांतून आपले प्रातिनिधि निवडून देण्याचा हक्क आपल्याला मिळालेला नाही याबद्दल या कॉंग्रेसमध्यें खेदही प्रदर्शित करण्यांत आला. या कायद्याची अमलबजावणी करण्याच्या बाबतींत सरकारनें जें उदार धोरण स्वीकारलें त्याबद्दल १८९३ मध्यें सरकारचे आभार मानण्यांत आले; पण या कायद्याचा खरा उपयोग व्हावा अशी इच्छा असल्यास त्यांत महत्त्वाचे फेरफार करण्यांत आले पाहिजेत असेंही सुचविण्यांत आलें. पंजाबला कायदेकौंसिल द्यावें या मागणीचा या कॉंग्रेसमध्येंही पुनरुच्चार करण्यांत आला. १८९४ व १८९७ साली याच विनंतीची उजळणी करण्यांत आली. कौन्सिलांतून विचारण्यांत येणाऱ्या प्रश्नांना प्रस्तावनेदाखल छोटेसें स्पष्टीकरण जोडण्याचा हक्क १८९५ सालीं मागण्यांत आला होता. पण अशी परवानगी अद्यापही देण्यांत आलेली नाहीं.

पुढें १९०४ सालीं कॅांग्रेस पुन्हां या प्रश्नाकडे वळली. प्रत्येक प्रांतांतून दोन सभासद याप्रमाणें कॉमन्स सभेंत हिंदुस्थानचें प्रत्यक्ष प्रतिनिधित्व मान्य करण्यात यावें अशी मागणी देखील या सालीं करण्यात आली. १९०५ मध्यें या कायद्यांत आणखी सुधारणा व्हावी असें कॅांग्रेसनें आग्रहानें सुचविलें. स्वायत्त वसाहतीच्या धर्ती-वर हिंदुस्थानच्या राज्यकारभारांतही सुधारणा करण्यात याव्या असें आपलें मत कॉंग्रेसनें १९०६ सालीं व्यक्त केलें. आगामी सुधारणासंबंधानें १९०८ सालीं कॉंग्रेसनें आनंद व्यक्त केला व सुधारणांतील कलमें उदार अंतःकरणानें अमलांत आणावीं असें सुचविलें. पण या सुधारणामुळें लोकांची निराशा झाली.

मोर्ले-मिंटो-सुधारणा या नांवानें या सुधारणा प्रसिद्ध आहेत. या सुधारणांचे स्वरूप थोडक्यात पुढीलप्रमाणें होतें:—वरिष्ठ कौंसिलात ६० अधिक सभासद घेण्यांत आले. त्यांपैकीं २७ लोकनियुक्त होते. व बाकीच्या ३३ बिनसरकारी सभासदांपैकीं २८ पेक्षां जास्त सरकारी अधिकारी असूं नयेत असें ठरविण्यांत आलें. लोकनियुक्त जागांपैकीं ३ जागा विशिष्ट ज्ञातीय संस्थातर्फे भरण्यात याव्या व २ विशिष्ट हितरक्षणार्थ ठेवाव्या, असें तत्त्व या सुधारणांत मान्य करण्यांत आलें. त्याचप्रमाणें व्यापारीमंडळें, जमीनदार व मुसलमान यांच्या मतदार-संघांना आपले प्रतिनिधि निवडून देण्याचा हक्क देण्यांत आला, व बाकीच्या जागांकरितां ९ प्रांतिक कायदेमंडळांतील बिनसरकारी सभासदांनीं आपले प्रतिनिधि निवडून द्यावें असें ठरविण्यांत आलें. "या सुधारणांमुळें हिंदुस्थानांत

पार्लमेंटरी पद्धतीची प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष रीत्या प्रस्थापना होत आहे असें जर म्हणतां आलें तर त्याच्याशीं मला कांहींच कर्तव्य नाहीं" असें मोर्ले यांनीं म्हटलें होतें. लॉर्ड चेम्सफर्ड व मि. मॉंटेग्यू यांनीं या सुधारणांच्या बाबतींत यापेक्षां जास्त अधिकृत व निर्णयात्मक मत दिलें होतें. "सुधारणांच्या हक्कांमुळें हिंदी लोकांचें समाधान होईनासें झालें आहे. या सुधारणांची अमलबजावणी चालू ठेवल्याने हिंदी सभासद व सरकार यांच्यांत अधिकाधिकच फूट पडत जाईल व बेजबाबदारपणाच्या टीकेला अधिकच वाव मिळेल."

१९०९ च्या कॉंग्रेसनें सुधारणांच्या बाबतींत चार ठराव मंजूर केले. धर्माच्या पायावर स्वतंत्र मतदार संघ निर्माण करण्यांत आले, हिंदु व मुसलमान याच्याकरितां कौंसिलांतील जागांचें प्रमाण ठरविण्याच्या बाबतींत अन्याय करण्यांत आला, उमेदवारांची लायकी ठरवितांना सामान्यतः सुशिक्षित वर्गाबद्दल अविश्वास दाखविण्यांत आला व बिनसरकारी सभासदांचें बहुमत ठेवून प्रांतिक कायदेमंडळें कुचकामाचीं बनविण्यांत आलीं, याबद्दल पहिल्या ठरावांत निषेध व्यक्त करण्यांत आला. सं. प्रांत, पंजाब, पूर्व बंगाल, आसाम व बर्मा या प्रांतांच्या गव्हर्नरांच्या मदतीकरितां कार्यकारी मंडळें देण्यांत यावीं असा दुसरा ठराव होता. पजाब कायदे–कौंसिलातील सभासदांचें प्रमाण अपुरें आहे, इतर प्रांतांतील अल्पसख्यांक मुसलमानांना जे हक्क व ज्या सवलती दिल्या आहेत तशा प्रकारच्या संरक्षक सवलती व हक्क पजाबांतील मुसलमानेतर अल्पसंख्यांकांना दिलेले नाहीत, याबद्दल तिसऱ्या ठरावांत असमाधान व्यक्त केलें होतें; आणि मध्यप्रांत व वऱ्हाड या प्रांतातून कायदेमंडळें निर्माण करण्यात आलीं नाहींत याबद्दलही असमाधान वाटत आहे, असें चौथ्या ठरावांत म्हटलें होतें.

१९१० व १९११ सालीं १९०९ च्या अधिवेशनांतील सुधारणाविषयक ठरावालाच पुष्टि देण्यांत आली व स्वतंत्र मतदारसंघाचें तत्त्व जिल्हा लो. बोर्ड व म्युनिसिपालिटया यांनाही लागू करण्यांत आलें, याबद्दल निषेध व्यक्त करण्यांत आला.

१९१२ च्या कॉंग्रेसनें वरिष्ठ व प्रांतिक कायदेकौंसिलांत लोकनियुक्त सभासदांचें बहुमत असावें व सभासदांना पुरवणीप्रश्न विचारण्याचा हक्क असावा अशी मागणी केली. इंग्रजी न जाणणारा इसम कौंसिलचा सभासद होण्यास नालायक मानला जावा, असें एक विलक्षण कलम कॉंग्रेसच्या सुधारणाविषयक

ठरावांत नमूद करण्यांत आलें होतें, हें लक्षांत ठेवण्याजोगें आहे. प्रांतिक स्वायत्तता स्थापन करण्याच्या आवश्यकतेला हिंदुस्थान सरकारनें मान्यता दिली यावद्दल या कॉंग्रेसनें समाधान व्यक्त केलें. १९१३ सालीं जवळ जवळ हाच ठराव पुन्हां मंजूर करण्यांत आला.

१९१५ सालीं हिंदुस्थान सरकारचे पहिले कायदेमंत्री सर एस्. पी. सिंह यांच्या अध्यक्षतेखालीं मुंबई येथें कॉंग्रेसचें अधिवेशन झालें. या कॉंग्रेसच्या ठरावाप्रमाणें ऑ. इं. कॉं. कमिटी व ऑ. इं. मुस्लिम लीग यांची संयुक्त बैठक भरली व संयुक्त हिंदुस्थानच्या आकांक्षा ज्यांत ग्रथित केल्या आहेत अशी एक योजना तींत तयार करण्यात आली. १९१६ च्या लखनौ कॉंग्रेसनें या योजनेला संमति दिली. ब्रिटिश साम्राज्यांतील इतर वसाहतींप्रमाणें हिंदुस्थानालाही समान दर्जा मिळावा व स्वराज्याच्या हक्काच्या दृष्टीनें निश्चित पाऊल टाकण्यांत यावें अशी मागणी या कॉंग्रेसमध्यें करण्यात आली. प्रातिक कायदेमंडळांत चारपंचमांश लोकनियुक्त व एकपंचमांश सरकारनियुक्त सभासद असावे या चमत्कारिक तत्त्वाला या योजनेंत मान्यता देण्यांत आली होती! प्रत्यक्ष निवडणूक व व्यापक मतदानाचा हक्कही या योजनेंत नमूद करण्यांत आला होता. स्वतंत्र मतदारसंघातर्फे मुसलमान प्रतिनिधींची निवडणूक करण्यात यावी व अल्पसख्यांक मुसलमानांचें प्रां. कौन्सिलांतील लोकनियुक्त सभासदांमध्यें पुढील प्रमाण असावें असेंही या योजनेंत म्हटलें होतें:—पंजाब शें. ५०; सं. प्रांत शें. ३०; बंगाल शें. ४०; बिहार २५; मध्यप्रांत शें. १८; मद्रास शें. १५; आणि मुंबई एक तृतियांश. वरिष्ठ कायदेकौंसिलांत लोकनियुक्त सभासदांचें चारपंचमाश प्रमाण असावें. आणि या लोकनियुक्त सभासदांपैकीं स्वतंत्र मतदारसंघातर्फे एकतृतीयांश सभासद मुसलमान असावे. हिंदुमुसलमानांच्या मिलाफानें व संमतीनें लखनौ येथें तयार झालेल्या योजनेंत वरील कलमे होतीं. मॉटफर्डयोजनेंत ही योजना जशीच्या तशी सामील करण्यांत आली.

स्वराज्याच्या योजनेबाबत केवळ ठरावच करून ही कॉंग्रेस थांबली नाहीं तर सर्व देशभर याबद्दल जागृति करण्याची तिनें व्यवस्था केली. या वर्षांत अनेक चळवळी व उलाढाली झाल्या. बेझंट यांची होमरूलची चळवळ, त्यांना झालेली अटक, निःशस्त्र प्रतिकाराची योजना, मेसोपोटेमियांतील घोटाळ्यासंबंधींचें मॉंटेग्यू यांचें प्रसिद्ध भाषण, त्या वेळचे स्टेटसेक्रेटरी ऑस्टिन चेंबरलेन यांचा

राजीनामा, मॉंटेग्यू यांची स्टेटसेक्रेटरीच्या जागेवर नेमणूक, २० आगस्ट १९१७ चा प्रसिद्ध जाहीरनामा, मॉंटेग्यूंचें हिंदुस्थानास भेट देण्याचें वचन, बेझंटबाईंची मुक्तता व त्यांची १९१७ च्या कॉंग्रेसच्या अध्यक्षांचे जागी निवडणूक या सर्व घटनांच्या पार्श्वभूमीवरच १९१७ च्या कॉंग्रेसचें मूर्त चित्र रंगविण्यांत आलें.

१९१७ च्या कलकत्ता कॉंग्रेसनें जबाबदार स्वराज्याच्या जाहीरनाम्याबद्दल कृतज्ञतापूर्वक समाधान व्यक्त केलें व कॉंग्रेस-लीगच्या योजनेनुसार स्वराज्याच्या हक्कांची पूर्ण अंमलबजावणी करण्याबाबत कालमर्यादा निश्चित करण्यांत यावी अशीही मागणी केली.

१९१७ च्या नोव्हेंबरमध्यें मि. मॉंटेग्यु हिंदुस्थानांत आले. १९१८ च्या जूनमध्यें मॉंटफर्ड रिपोर्ट प्रसिद्ध करण्यांत आला. १९१८ सप्टेंबरमध्यें मुंबई येथें भरलेल्या जादा कॉंग्रेसमध्यें या रिपोर्टातील योजनेवर चर्चा करण्यांत आली. मि. हसन इमाम हे या कॉंग्रेसचे अध्यक्ष होते. या जादा अधिवेशनांत द्विदल राज्यपद्धतीला मान्यता देण्यात आली आणि वरिष्ठ कायदेमंडळांतही द्विदल राज्यपद्धतीचें तत्त्व मान्य करण्यात आल्यास वरिष्ठ सरकारांतही दुय्यम कायदेमंडळ नेमण्यांत यावें या कॉंग्रेस-लीग-योजनेंतलि कलमालाही या कॉंग्रेसनें मान्यता दिली. सरकारनें कॉंग्रेस-लीग योजनेनुसार कौंसिल ऑफ स्टेट निर्माण केलें, पण वरिष्ठ सरकारांत द्विदल राज्यपद्धतीचा अवलंब करावयाचा हें मात्र मान्य केलें नाहीं. मॉंटफर्ड योजना असमाधानकारक व निराशाजनक आहेत असा या कॉंग्रेसनें आपला अभिप्राय व्यक्त केला. यापूर्वीच्या दोन अधिवेशनांतून करण्यांत आलेल्या मागण्याना पाठिंबा देऊन कायद्याच्या दृष्टीनें सर्व प्रजेला समानतेनें वागविण्यात यावें; स्वातंत्र्य, जीवित व मालमत्ता याच्या संरक्षणाची हमी; भाषण, लेखन व सभा-स्वातंत्र्य, शस्त्रें बाळगण्याचा हक्क, मुद्रणस्वातंत्र्य इत्यादि जन्मसिद्ध हक्कांची मागणी करण्यांत आली.

१९१८ चें अधिवेशन दिल्ली येथें पं. मालवीय यांच्या अध्यक्षतेखालीं झालें. सर्व प्रांतांत पूर्ण जबाबदारीचें स्वराज्य स्थापण्यांत यावें अशी या कॉंग्रेसनें मागणी केली. वरिष्ठ सरकारांत द्विदल राज्यपद्धति सुरू करावी या गोष्टीचा दिल्लीच्या अधिवेशनांतही पुरस्कार करण्यांत आला. दुय्यम कायदेमंडळाच्या बाबतींत मुंबईच्या जादा अधिवेशनांत जो ठराव पास झाला होता त्यालाच याही वेळीं दुजोरा देण्यांत आला.

ता. ११ नोव्हेंबर १९१८ रोजीं युद्धतहकुबीचा जाहीरनामा निघाला. प्रे. विल्सन, लाईड जॉर्ज व इतर ब्रिटिश मुत्सद्दी यांच्या भाषणांचा उल्लेख करून स्वयंनिर्णयाचें तत्त्व हिंदुस्थानासही लागू करण्यांत यावें व सर्व दडपशाहीचे कायदे रद्द करण्यांत यावेत, असा ठराव या अधिवेशनांत मजूर करण्यांत आला.

कॉंग्रेसचा यापुढचा काल जाचक गेला. यापुढील अधिवेशन अमृतसर येथें भरलें; पण त्यापूर्वी रौलेट बिलें, सत्याग्रहआंदोलन, विरमगांव व दिल्ली येथील गोळीबार, जालियनवाला बागेंतील शोचनीय प्रसंग, पंजाबातील लष्करी कायदा, सर शंकर नायर यांची सरकारी नोकरींतील राजीनामा, हंटर कमिशन व त्याला मिळालेलें अपयश, वगैरे मुख्य मुख्य घटनांनीं राष्ट्राचें मन प्रक्षुब्ध करून सोडलें होतें.

## २ पब्लिक सर्व्हिस

सरकारी नोकरींत विशेषतः सनदी नोकरींत हिंदी लोकांना प्रवेश मिळावा या प्रश्नाला कांग्रेसनें प्रथमपासूनच विशेष महत्त्व दिलें आहे. कोणतीही सरकारी नोकरी करण्यास हिंदी लोक लायक आहेत हें तत्त्व १८३३ सालीं कायद्यानें मान्य करण्यांत आलें आणि १८५३ सालीं सिव्हिल सर्व्हिसच्या परीक्षा इंग्लंड-मध्यें घेण्याचें ठरविण्यांत आलें. तेव्हां हिन्दी लोकांना ही एक अडचणच आहे असें सांगितलें गेलें. लॉर्ड सात्सबरी यांनीं या परीक्षेस बसणाऱ्या उमेदवाराचें वय १९ असावें असें जेव्हां ठरविलें तेव्हां ही एक भरीस नवी अडचण पडली असें समजलें गेलें. याप्रमाणें वरिष्ठ सरकारी नोकरींच्या बाबतींत हिंदी लोकांच्या मार्गांतून अनेक अडथळेच उत्पन्न करण्यांत आले. इंग्लंड व हिंदुस्थान या दोन्ही देशांत एकाच वेळीं या परीक्षा घेण्यांत याव्या म्हणजे हे सर्व अडथळे अंशतः दूर होतील या हेतूनें कॉंग्रेसनें पहिल्यापासूनच तशा प्रकारचे ठराव केले आहेत. १८८५ च्या अगदीं पहिल्या अधिवेशनांत इंग्लंड-हिंदुस्थानांत एकदम परीक्षा घेण्याचा ठराव मंजूर केला असला तरी या प्रश्नासंबंधाची चळवळ त्याच्यापूर्वी १८ वर्षें म्हणजे १८६१ पासूनच सुरू झाली होती. याच सालीं इंडिया कौंसिल-च्या कमिटीनें समकालीन परीक्षासंबंधानें शिफारस केली होती. पार्लमेंटनें आजवर जीं वचनें दिलीं आहेत तीं पूर्ण करण्यासाठीं असें करणें अवश्य आहे, असें या कमिटीचें म्हणणें होतें. जून १८९३ मध्यें हाऊस ऑफ कॉमन्स सभेंत

अशाच प्रकारचा ठराव पास करण्यांत आला. कॉंग्रेसला व सगळ्या देशाला त्याबद्दल बरें वाटलें पण सरकारनें या ठरावाची अमलबजावणी करण्याचें पुढील सालीं नाकारलें, त्यामुळें अतिशय निराशा झाली. ही सुधारणा घडवून आणली नाहीं तर हिंदी लोकांच्या बाबतीत न्यायाचें वर्तन करण्यांत आलें असें केव्हांही म्हणतां यावयाचें नाही, असें पब्लिक सर्व्हिसेसपुढें झालेल्या अनेक हिंदी लोकांच्या साक्षींत सांगण्यांत आलें. कॉंग्रेसच्या म्हणण्याप्रमाणें उमेदवाराची वयाची मर्यादा २३ पर्यंत वाढविण्यांत आली पण इतर अडचणी कायमच राहिल्या. कॉंग्रेसच्या अधिवेशनाच्या वेळीं गोखले यांनीं अगदीं जळजळीत भाषण करून इंग्लंडच्या या बाबतींतील धोरणाचा निषेध केला. प. स. कमिशनच्या रिपोर्टाच्या बाबतींत हिं. सरकारनें जें धोरण स्वीकारलें त्याबद्दल खेद प्रदर्शित केला. स्टॅट्युटरी सनदी नोकऱ्यांमध्यें एकंदर ९४१ जागा होत्या, त्यांतील १५८ जागा हिंदी लोकांच्या हक्काच्या होत्या, पण प. स. कमिशननें यांपैकीं १०८ जागा हिंदी लोकांना द्याव्या अशी शिफारस केली आणि सरकारनें तर त्याच्याही मागें जाऊन अवघ्या ९३ च जागा हिंदी लोकांना १८९२ त दिल्या. सिव्हिल, मेडिकल, पोलिस, एंजीनिअरिंग, टेलिग्राफ, जंगल वगैरे खात्यांतून हिंदी लोकांना जागा मिळतील अशा सवलती सरकारनें द्याव्या अशा मागण्या कॉंग्रेस करीत होतीच. सरकारनें या सवलती दिल्या नाहींतच, उलट या बाबतींत माघार घेतली. शिक्षणखात्यांत तर वरिष्ठ जागांवर हिंदी इसमांची नेमणूक करावयाचीच नाहीं असें सरकारनें ठरविलें. शिक्षणखात्यांतील नव्या योजनेप्रमाणें वरिष्ठ जागांना आय्. ई. एस्. म्हणत व त्या इंग्लंडांत भरत आणि खालच्या जागाना पी. ई. एस्. म्हणत व त्या हिंदुस्थानांत भरत. १८८० पूर्वी या खात्यांतील वरिष्ठ जागांवर असलेल्या हिंदी व युरोपियन या दोघांनाही सारखाच म्हणजे ५०० रु. पगार मिळत होता. १८८० सालीं हा पगार हिंदी लोकांच्या बाबतींत कमी करून तो ३३३ रु. वर आणला. १८८९ सालीं तो २५० रु. झाला. हिंदी माणूस जरी इंग्लिश युनिव्हर्सिटिचा ग्रॅज्युएट असला तरी त्याला एवढाच पगार देत असत! १८९६ सालीं हिंदी इसम कितीही मोठ्या जागेवर असला किंवा कितीही वर्षें त्यानें नोकरी केलेली असली तरी ७०० रु. पेक्षां जास्त पगार त्याला मिळत नसे. पण इंग्रज इसमाला मात्र १० वर्षांच्या नोकरीनंतर १००० रु. पगार देण्यांत येत असे. शिक्षण खात्यां-

तील नोकरांच्या बाबतींत जी नवी योजना करण्यांत आली तीमुळें कांहीं कॉलेजाच्या प्रिन्सिपालांच्या जागा केवळ युरोपियनांकरितांच राखून ठेवण्यांत आल्या.

१८९६ व १८९७ सालीं मुंबई व मद्रासच्या एक्झिक्यूटिव्ह कौन्सिलमध्यें हिंदी लोकांना घेण्यांत यावें अशी कॉंग्रेसनें मागणी केली. पुढें इंडियन सिव्हिल मेडिकल व मिलिटरी मेडिकल सर्व्हिस असा भेद करण्यांत आला तेव्हां तोहीं एक चळवळीचा विषय होऊन बसला. पी. डब्ल्यू. डी., रेलवे, अफू, कस्टम, टेलिग्राफ या खात्यांतील वरिष्ठ जागा हिंदी लोकांना देण्यांत येऊं नयेत असें ठरविण्यात आलें त्या वेळीं १९०० च्या कॉंग्रेसमध्यें याबद्दल खेद प्रदर्शित करण्यांत आला. याप्रमाणें वरिष्ठ सरकारी नोकऱ्यासंबंधाचें हें गाऱ्हाणें बरेंच दिवसाचें असून यानंतरच्या बऱ्याच अधिवेशनातून त्याच्याबद्दलच्या ठरावांचा पुनरुच्चार करण्यांत आला.

## ४ लष्कराचा प्रश्न

१८८५ ते १९१५ पर्यंतच्या तीस वर्षांत जवळ जवळ दोनशें विषयांसंबंधानें कॉंग्रेसनें विचार केला. पण कितीही वर्षें गेलीं तरी ज्या विषयाबद्दलचें लोकांचें लक्ष कमी झालेलें नाही व ज्याच्या बाबतींत कितीही निषेध प्रकट करण्यांत आला किंवा कितीही याचना करण्यात आल्या तरी ज्याच्याबद्दलची गाऱ्हाणी नष्ट झालीं नाहीत असा " लष्करी प्रश्न " हा एकच विषय होता. लष्करी खर्च वाढविण्याच्या त्या वेळच्या सरकारच्या योजनेबद्दल पहिल्या कॉंग्रेसनेंच निषेध व्यक्त केला. असा खर्च वाढविणे अपरिहार्यच असेल तर राज्यकारभारांतील इतर खर्चांत काटकसर करण्यांत यावी व कस्टम ड्यूटी वाढवावी असें या कॉंग्रेसनेच सुचविलें होतें. हिंदी लोकांना स्वयंसैनिक दलात प्रवेश मिळावा अशी विनंति याच्या पुढच्या सालच्या अधिवेशनांत करण्यांत आली. तिसऱ्या कॉंग्रेसनें १८५८ सालच्या राणीच्या जाहीरनाम्यांतील वचन पुरें करण्याकरितां लष्करांतील वरिष्ठ जागांवर हिंदी लोकांची नेमणूक करण्यांत यावी अशी मागणी केली व ही मागणी पूर्ण करण्याच्या दृष्टीनें हिंदुस्थानांत लष्करी कॉलेज स्थापन करावें असें सुचविलें. चौथ्या व पांचव्या अधिवेशनांतून पूर्वीं झालेल्या ठरावांनाच पुष्टि देण्यांत आली. सहाव्या अधिवेशनांत

-या विषयाकडे दुर्लक्ष करण्यांत आलें. सातव्या अधिवेशनांत पुन्हां या विषयावर विचार करण्यांत आला. आर्म्स ॲक्टमधील नियम सरकारनें थोडे ढिले करावे, मिलिशिया सर्व्हिस व स्वयंसैनिक दल उभारण्याची पद्धति सुरू करून साम्राज्यां-तील क्षात्रवृत्तीच्या लोकांची संघटना करावी असें या अधिवेशनांत सरकारला आग्रहपूर्वक सुचविण्यांत आलें. लष्करी खर्चासंबंधानें आठव्या अधिवेशनांत चर्चा करण्यांत आली व हिंदुस्थानाबरोबर इंग्लंडनेंही या खर्चाचा कांहीं अंश सोसावा असा ठराव करण्यांत आला. या प्रश्नाच्या सामाजिक बाजूचा म्हणजे हिंदी लष्करी हद्दींत वाढत चाललेल्या स्पर्शजन्य रोगांचा व वेश्याव्यवसायाचा विचार नवव्या अधिवेशनांत करण्यांत आला. दहाव्या अधिवेशनांत या बाबतींत केलेल्या पूर्वीच्याच ठरावांना पुष्टि देण्यांत आली. इंग्लंड व हिंदुस्थान यांच्यांत लष्करी खर्चाची विभागणी कशी करावी याचा विचार करण्याकरितां वेल्बी कमिशन नेमण्यांत आलें. पुढें तेराव्या अधिवेशनांत या प्रश्नासंबंधानें ठराव कर-ण्यांत आला. सरकारनें सरहद्दीच्या बाबतींत स्वीकारलेल्या धोरणाचा विचार करून याकरितां होणाऱ्या खर्चांत इंग्लंडनें भागीदार होणें जरूर आहे असें या ठरावांत म्हटलें होतें. पंधराव्या बैठकींत या प्रश्नाचा एका निराळ्याच दृष्टीनें विचार करण्यात आला. बऱ्याच मोठमोठ्या पलटणी आपल्या देशांतून बाहेर देशीं नेणें सुरक्षितपणाचें आहे व दूरदर्शीपणाचें आहे असें सरकारला वाटल्यामुळें २० हजार ब्रिटिश लष्कराचा खर्च ब्रिटिश सरकारनें सोसावा असा ठराव या बैठकींत करण्यांत आला. सरहद्दीवरील संकटाचा प्रश्न मार्गे पडतांच पुन्हां कॉंग्रेसनें १६ व्या अधिवेशनांत लष्करी कॉलेज-संबंधाचा ठराव पास केला. अशा रीतीनें १९ वें शतक समाप्त झालें. व्हिक्टोरिया राणी १९०१ सालीं मरण पावली. नवे राजे ( किंग एडवर्ड ) गादी-वर आले, पण लष्करविषयक हिंदी लोकांची गाऱ्हाणीं जशींच्या तशींच राहिलीं. १९०२ मधील १७ व्या अधिवेशांत लष्करावर होणारा खर्च इंग्लंड व हिंदु-स्थान यांनी भागीदारीनें सोसावा असा ठराव कॉंग्रेसनें पुन्हां केला. पुढें लवकरच या प्रश्नाला निश्चित स्वरूप प्राप्त झालें. १८९४ सालीं नेमलेल्या वेल्बी कमिशन-चा रिपोर्ट प्रसिद्ध झाला. या रिपोर्टांतील शिफारशी पाहून हिंदुस्थानला थोडें बरें वाटलें पण ब्रिटिश सोल्जरांच्या पगारांत वाढ करून दरसाल ११७९०००० रु. नीं लष्करी खर्च वाढविल्यामुळें वरील आनंद कोठच्या कोठें मावळून गेला. १८ व्या

अधिवेशनांत याच गोष्टीचा निषेध करण्यांत आला. चीनमध्यें चालू असलेल्या हाल-चालींत व बोअर युद्धांत हिंदी पलटणी व अधिकाधिक ब्रिटिश लष्कर हिंदुस्थाना-वर लादण्यांत आलें या प्रश्नाचा व्यापक विचार १९ व्या अधिवेशनांत करण्यांत आला. हिंदुस्थानांतील लष्करी धोरण साम्राज्यसंरक्षक दृष्टीनें आंखलें जातें. 'इंपीरियल गॅरिझन' म्हणून जें ब्रिटिश लष्कर हिंदुस्थानांत ठेवलें जातें तें सर्व ब्रिटिश लष्कराच्या एक तृतीयांश असतें. अशा परिस्थितींत हिंदी लष्करावर होणाऱ्या खर्चापैकीं आपल्या वांटयाचा खर्च इंग्लंडनें सोसलाच पाहिजे अशी या कॉंग्रेसनें मागणी केली. लॉर्ड कर्झन यानीं तिबेटमध्यें चढाईचें धोरण स्वीकारलें. या स्वारीला त्यांनीं 'पोलिटिकल मिशन' असें नांव दिलें होतें. १८५८ चा कायदा धाब्यावर बसवून पार्लमेंटची मंजुरी न घेता लॉर्ड कर्झन यानीं तिबेट-च्या स्वारीचा खर्च हिंदुस्थानच्या तिजोरीवर लादला. लॉर्ड किचनेर यांच्या पुनर्घटनेच्या योजनेमुळें हिंदुस्थानचा लष्करी खर्च १ कोटी पौंडांनीं वाढला, त्याचा कॉंग्रेसनें निषेध केला. लष्करावर सिव्हिल अधिकाऱ्यांचा ताबा असावा कीं नाहीं, या प्रश्नासंबंधानें लॉर्ड किचनेर व लॉर्ड कर्झन यांच्यांत वाद चालू होता. लॉर्ड कर्झन हे लष्करावर सिव्हिल अधिकाऱ्यांचा ताबा असावा अशा मताचे होते.

१९०५ सालच्या २१ व्या अधिवेशनांत लॉर्ड कर्झन यांनीं पुरस्कृत केलेल्या वरील मताचा निषेध करण्यांत आला आणि कर देणाऱ्यांच्या प्रतिनिधीशिवाय असा ताबा दुसरा कोणीही चालवूं शकणार नाहीं या तत्त्वाचा पुरस्कार केला. १९०६ सालीं राष्ट्रीय पुनरुज्जीवनाच्या नवीन नवीन शक्ति निर्माण झाल्या तरी या सालोसालच्या बिकट प्रश्नांकडे दुर्लक्ष करण्यांत आलें नाहीं. या पूर्वीच्या वीस वर्षांत १७ कोटीपासून ३२ कोटींपर्यंत म्हणजे जवळ जवळ दुपटीनें लष्करी खर्च वाढला आणि याच काळांत हिंदुस्थानांत वरचेवर पडलेल्या दुष्काळांतून उपासमारीनें ११०००००० लोक मरण पावले; या गोष्टींकडे कॉंग्रेसनें सरकारचें लक्ष वेधलें.

ब्रिटिश वॉर ऑफिसनें रोम कमिटीच्या शिफारशीप्रमाणें हिंदुस्थानावर आणखी ३००००० पौंड लादले. त्याबद्दल १९०८ मध्यें जोराचा निषेध करण्यांत आला. १९०९ व १९१० मध्यें नेहमींच्या रिवाजाप्रमाणें वाढत्या लष्करी खर्चा-बद्दल सरकारवर टीका करण्यांत आली. लष्करांतील वरिष्ठ नाकेऱ्यांच्या बाब-

तींत हिंदी लोकांना मज्जाव करण्यांत आल्यामुळें होत असलेल्या अन्यायाविरुद्ध १९१२ व १९१३ सालच्या अधिवेशनांतून ठराव करण्यांत आले. १९१४ सालीं लष्करी खात्यांतील वरिष्ठ जागा हिंदी लोकांना द्याव्या व मिलिटरी स्कूल व कॉलेज काढावें आणि हिंदी लोकांना स्वयंसेवक होऊं द्यावें ही मागणी पुन्हां करण्यांत आली. हिंदी लोकांना मेजरच्या जागा द्यावयास हरकत नाहीं असें लॉर्ड किचनेर यांचें मत होतें आणि बादशहा आपल्या १९११ च्या प्रसिद्ध दरबारांतील भाषणांत या जागांसंबंधानें कांही तरी बोलतील अशी लोकांना आशा वाटत होती.

१८९८ पूर्वी हिंदी लोकांना व्हालंटीअर म्हणून घेण्यांत येत होतें. काँग्रेसच्या आरंभींच्या अधिवेशनांतून आपण व्हालंटीअर आहों असें मि. एस्. वी. शंकरन् हे सांगतही होते; पण १८९८ सालीं ही पद्धति बंद झाली व १९१४ सालीं फक्त हिंदी ख्रिश्चनाशिवाय दुसऱ्या कोणालाही व्हॉलंटीअर होता येणार नाहीं असें ठरविण्यांत आलें. १९१७ साली सरकारच्या या धोरणांत किंचित् बदल झाला. जातीय भेद न मानतां हिंदी लोकांना कमिशन्ड रँक्सच्या बाबतींत प्रवेश मिळाला व नऊ हिंदी इसमांना या जागेवर नेमण्यांत आलें. कलकत्ता काँग्रेसनें ( १९१७ ) सरकारच्या या कृत्याबद्दल समाधान व्यक्त केलें व १६ ते १८ वर्षांच्या तरुणांचें कॅडेट कोर बनविण्याबद्दल सरकारला विनंति केली.

## ५ कायदा व न्यायदान

काँग्रेसमध्यें पहिल्यापासूनच मोठमोठे विद्वान कायदेपंडित असल्यामुळें लोकांचे कायदेशीर हक्क सुरक्षित राखण्याची त्यांनीं साहजिकच काळजी घेतली. जनतेचे हक्क हे सामान्य काळात व शरणागतीच्या वृत्तीनें राहाणाऱ्या लोकांकरताच असतात ही गोष्ट नोकरशाहीनें आपल्या दडपशाहीनें सिद्ध केली. राष्ट्रीय जागृतीचे काळांत हे हक्क टिकत नाहींत ही गोष्ट ज्यूरीचे प्रश्नांत उघड झाली. सरकारनें ज्यूरीची पद्धति हिंदुस्थानात सुरू केली खरी, पण १८७२ सालीं या पद्धतींत बदल घडवून आणण्याचें सरकारनें ठरविलें व ज्यूरीनें दिलेले निकाल कांहीं प्रसंगीं बाजूला ठेवण्याचा अधिकार सेशन्स जज्जाना व हायकोर्ट जज्जांना देण्यांत आला. काँग्रेसच्या दुसऱ्या अधिवेशनातच ( कलकत्ता १८८६ ) सरकारनें स्वीकारलेलें हें धोरण अपायकारक असून या पद्धतींत असले प्रतिगामी

उमेशचंद्र बानर्जी
सन १८८५ मुंबई व १८९२
अलाहाबाद कॉंग्रेसचे अध्यक्ष.

दादाभाई नौरोजी
सन १८८६ कलकत्ता, १८९३ लाहोर
व १९०६ कलकत्ता कॉंग्रेसचे अध्यक्ष.

बद्रुद्दिन तैय्यबजी
१८८७ मद्रास कॉंग्रेसचे अध्यक्ष.

जॉर्ज यूल
१८८८ अलाहाबाद कॉंग्रेसचे अध्यक्ष

सर वुइल्यम वेडरबर्न
१८८९ मुंबई व १९१० आलहाबाद
कॉंग्रेसचे अध्यक्ष.

सर फेरोजशहा मेहता
१८९० कलकत्ता कॉंग्रेसचे अध्यक्ष.

बदल करण्यांत येऊं नयेत अशी विनति करण्यांत आली. यापुढील अधिवेशनां-तूनही या विनंतीची उजळणी झाली. पण अद्यापपर्यंत तिचा कांहींही उपयोग झालेला नाहीं. ज्यूरीचे अधिकार काढून घेण्यापेक्षां न्याय व अमलबजावणी हीं दोन्हीं कामें एकाच व्यक्तीच्या हातीं ठेवणें ही गोष्ट अधिक अनिष्ट आहे. न्याय व अमलबजावणी ही खातीं वेगळीं करावीं याबद्दलची चळवळ फार जुनी आहे. राजा राममोहन राय यांनीं इंग्लंडमध्यें असतांना जो खलिता पार्लमेंटरी कमिटीपुढें मांडला त्यांतील अनेक प्रश्नापैकीं या सुधारणेबाबतींतही त्यांनीं आपले विचार कमिटीपुढें मांडले होते. हिंदुस्थानचे एकदां गव्हर्नर जनरल असलेले लॉर्ड डफरिन, स्टेट सेक्रेटरी न्हायकौंट क्रॉस व अर्ल ऑफ किंबरले, हिंदुस्थान सरकारचे होममेंबर सर हार्वे अॅडॅम्सन यांनीं कॉंग्रेसची या बाबतींतील मागणी योग्य आहे असें अनेक वेळां कबूल केलें होतें; आणि १९०८ सालीं कॉंग्रेसची सूचना प्रयोगादाखल अमलांत आणून पाहूं असें वचनही सर हार्वे अॅडॅम्सन यांनीं सरकारतर्फे दिलें होतें; पण त्याचा कांहीं उपयोग झाला नाही. राममोहन राय नंतर दादाभाई नवरोजी यांनी ही चळवळ पुढें चालविली व बंगाल, मुंबई, मद्रास वगैरे ठिकाणीं या कामाकरितां मंडळें स्थापण्यात आलीं. बंगालमधील बंगाल नॅशनल लीगचा या बाबतींत विशेष उल्लेख करावयास हरकत नाही. १८८५ च्या अगदीं पहिल्या अधिवेशनापासून तो त्यापुढील बहुतेक सर्व अधिवेशनांतून या विषयासंबंधानें कधीं स्वतंत्र ठराव करून तर कधीं कंठाळी ठरावांत त्याचा समावेश करून कॉंग्रेसनें आपलें मत व निषेध व्यक्त केला. या प्रश्नासंबंधानें हिंदुस्थानात चालू असलेल्या चळवळी-मुळें बऱ्याच इंग्रज गृहस्थांनीं या सुधारणेबद्दल आपली सहानुभूति व्यक्त केली होती. लॉर्ड हॉब हाऊस, सर रिचर्ड गार्थ, सर चार्लस सार्जंट, सर डब्ल्यू मार्कबी, सर जॉन बडफाअर, सर जॉन स्कॉट, सर रोलंड के. विल्सन वगैरे विख्यात जज्जांनीं व मि. हर्बर्ट जे. रेनॉल्ड व सर विल्यम वेडरबर्न वगैरे इंग्रज पुढाऱ्यांनी सेक्रेटरी ऑफ स्टेटकडे अर्ज पाठवून न्याय व अमलबजावणी हीं खातीं स्वतंत्र करावीं अशी सूचना केली होती. फक्त १९०८ सालीं या बाबतींत थोडी प्रगति झालेली दिसली. बंगाल सरकारनें या सूचनेला मान्यता दिली व कोणत्या ना कोणत्या स्वरूपांत त्याची अमलबजावणी करण्याचें ठरविलें असें पाहून कॉंग्रेसनें आपलें समाधान व्यक्त केलें; पण पुढें एक वर्ष निघून गेलें तरी या गोष्टीला कोणतेंही निश्चित स्वरूप न मिळालेलें पाहून कॉंग्रेसची निराशाच झाली.

या इतक्या वर्षांत कॉंग्रेसनें सुचविलेल्या सुधारणांकडे सरकारनें लक्ष दिलें नाहीं इतकेंच नव्हे तर १८१८-चा तिसरा रेग्युलेशन ( बंगाल ), १८१९-चा दुसरा रेग्युलेशन ( मद्रास )-व १८२७-चा १९ वा रेग्युलेशन ( मुंबई ) हे जुने अंधारांत पडलेले कायदे उजेडांत आणले गेले. या कायद्यान्वयें कोणालाही विनाचौकशी हद्दपार करतां येतें. सरकारनें सरदार नातूंना या कायद्याचा आधार घेऊनच १८९७ च्या कॉंग्रेसच्या सुमारास अटक केली. हें साल फारच जाचक होतें. लोकमान्य टिळकांना याच सालीं राजद्रोहाच्या आरोपावरून शिक्षा करण्यात आली. जो मजकूर प्रसिद्ध केला म्हणून त्यांना ही शिक्षा देण्यांत आली तो त्यांनीं लिहिलाही नव्हता. पुण्यावर जादा पोलिस बसविण्यात आले व १२४ ( अ ) या कायद्याचें स्वरूप जास्त तीव्र करण्याकरितां त्यांत दुरुस्ती करण्याचें ठरविण्यांत आलें. लोकांच्या हक्कांवर सरकारनें चढविलेल्या या हल्ल्याविरुद्ध कॉंग्रेसनें निषेध व्यक्त केला. सुरेंद्रनाथ बानर्जींनीं सरकारच्या या कृत्याच्या निषेध करताना जें अत्यंत परिणामकारक व वक्तृत्वपूर्ण भाषण केलें त्यांतील एक लहानसा उतारा खालीं दिला आहे:—

" पुण्यावर जादा पोलिस बसवून सरकारनें एक चूक केली आहे. मि. टिळक व इतर पुण्यांतील संपादकांना अटक करून सरकारनें यापेक्षांही मोठी चूक केली आहे. मि. टिळक यांच्याबद्दल मला अंतःकरणपूर्वक सहानुभूति वाटते. तुरुंगाच्या कोठडींत कोंडून ठेवलेल्या टिळकांकडे माझ्या अंतःकरणांतील भावना धाव घेतात. टिळकांबद्दल सर्व राष्ट्र आज अश्रु गाळीत आहे. हेबीयस कॉर्पस ॲक्ट व मॅग्ना चार्टा हे कायदे इंग्लिश लोकांनीं आपल्याकरितां मिळवून ठेवले आहेत. इंग्रजांच्या वैभवशाली राज्यघटनेला या कायद्यांनीं भूषविलें आहे. या घटनेवर आमचाही जन्मसिद्ध हक्क आहे. आम्हीही जन्मसिद्ध ब्रिटिश प्रजाजन असल्यामुळें ब्रिटिश प्रजाजनांना असलेल्या हक्कांवर आमचाही हक्क आहे. आमचे हे हक्क कोण लुबाडून घेऊं शकेल ? आमचा या बाबतींत निश्चय झाला आहे. ही कॉंग्रेस, तुम्हीं आम्हीं सर्वजण एक गंभीर प्रतिज्ञा करूं. या सभागृहांतून आमच्या या निश्चयाच्या भावना बाहेर पडूं देत व सर्व हिंदी जनतेचीं मनें त्यांनीं भारून जाऊं देत. ब्रिटिश प्रजाजन या नात्यानें असलेल्या आमच्या हक्काचा पुरस्कार करण्याचा आम्हीं निश्चय केला आहे. प्रत्येक सनदशीर मार्गाचा अवलंब करून आम्हीं या हक्काचें संरक्षण करण्याचें ठरविलें आहे. व्यक्ति-

स्वातंत्र्य हा सर्वांत अत्यंत महत्त्वाचा व अमूल्य हक्क आहे. या हक्काच्या संरक्षणाकरितां झगडत राहण्याचा आम्हीं निश्चय केला आहे. "

## ६ कायमधारापद्धति, पाणीपट्टी, दारिद्र्य व दुष्काळ

हिंदुस्थान हा शेतीप्रधान देश आहे. तेव्हां शेतांची वेळोवेळीं पाहणी होऊन सारावाढ, पाणीपट्टी व त्यांचे जोडीस दारिद्र्य व दुष्काळ या चतुष्टयीनें उद्भवणाऱ्या प्रश्नांचा कॉंग्रेसला विचार करावाच लागला. चौथ्या ( १८८८ ) कॉंग्रेसनें एक कमिटी नेमली त्या वेळचा बाबू वैकुंठनाथ सेन यांचा १८८९ चा रिपोर्ट दाखल आहे. १८६० सालीं दुष्काळ पडला व दुष्काळ कमिशननें कायमधारापद्धतीचा पुरस्कार केला. १८६२ सालीं भारतमंत्र्यांनीं या सूचनेला संमति दर्शविली, पण अंमल झाला नाहीं.

जंगल खात्याच्या अंमलबजावणीनें शेतकरी वर्गाच्या हालांचें वर्णन डॉ. बेझंट यांनीं स्पष्ट व मार्मिक शद्बांत केलें आहे. त्या म्हणतात:—" लांकूड विपुल असूनही जात्याला खुंटा लागला तर अधिकारी वर्गाकडे आठवडाभर धांवपळ करून जागोजाग द्रव्य अर्पावें लागतें. आमच्या पिकांची नासाडी करणाऱ्या जनावरांना शस्त्राच्या कायद्यामुळें आम्हीं ठार मारूं शकत नाहीं. आफ्रिकेंतील निग्रो येथें आला तर त्याला पाटीभर शस्त्रें मिळतात पण आमच्या शेतकरी वर्गाला मात्र पिकाच्या रक्षणार्थ हत्यारांचे परवाने मिळत नाहींत.

१८९२ सालीं कायमधाऱ्याच्या ठरावाचा पुन्हां एकदां उच्चार करण्यांत आला व शेतकी बँकांची मागणी करण्यांत आली. १८६२ व १८६५ तील कायमधारापद्धतीबाबत भारतमंत्र्यांनीं दिलेल्या आश्वासनाची आठवण करून देण्यांत आली. पुढें १८९६ सालीं असा ठराव करण्यांत आला कीं, निदान ६० वर्षांची तरी मुदत सारावाढीस असावी. सरकारनें २२ डिसेंबर १९०० च्या ठरावानें ही मागणी फेंटाळली. १९०३ साली सारावाढीवर कायदेमंडळें व कोर्टें यांचें नियंत्रण असावें असें सुचविण्यांत आलें. १९०६ सालीं कॉंग्रेसनें दाखवून दिलें कीं, १८६२ सालचें लॉर्ड क्यानिंग यांचें, तसेंच १८८२ सालचें लॉर्ड रिपन यांचें धोरण कर्झन साहेबांनी १९०२ च्या ठरावानें पार उलटून टाकलें. शेतसारा हा कर नसून खंड आहे हा सरकारचा मुद्दा कॉंग्रेसनें केव्हांही मान्य केलेला नाहीं. १९०८ सालीं कॉंग्रेसनें पुन्हां एकदा या विषयावर ठराव केलें आणि अखेर कंटाळून हा विषय सोडून दिला.

आतां पाणीपट्टी, दुष्काळ व दुष्काळनिवारण यांचा विचार करूं. पाणीपट्टीचा विषय एकदाच १८९४ साली विचारांत घेतलेला आढळतो. त्या सालीं एकरीं ४ ते ५ रु. पट्टीची वाढ झाली होती. सारावाढ व दुष्काळ याचा अन्योन्य संबंध कॉंग्रेसनें प्रथमपासून स्वीकारलेला आहे. १८९६ सालच्या तीव्र दुष्काळानें लष्करी खर्चाच्या धोंडीबद्दलचा विरोध दुणावला. स्वदेशी धंद्यांचा पाडाव व उपासमार हेही कांग्रेसच्या मतें दुष्काळाचें दुसरें प्रबळ कारण होय. फॅमिन इन्शुअरन्स फंड स्थापन करण्याचें अभिवचन सरकारनें पाळलें नाही. अखेर फॅमिन कमिशन नेमावें लागलें. तत्पूर्वी इंग्लंड व अमेरिका याना सढळ हातानें दुष्काळफंड उभारून हिंदुस्थानास मदत करावी लागली. या उपकृतीचें स्मरण म्हणून स्मारकाप्रीत्यर्थ हिंदुस्थानानें एक हजार पौंड लॉर्ड मेयर ऑफ लंडन यांजकडे पाठविले ( १८९८ ).

१८९९ साली पुन्हां या प्रश्नाचा ऊहापोह होऊन द्रव्यशोषण थांबवावें, लष्करीखर्च कमी करावा, करआकारणींत सौम्यता यावी आणि देशी धंद्यास उत्तेजन देऊन ते वाढवावे, अशा व्यापक धोरणाचा पुरस्कार करण्यात आला. पुढील सालीं ( १९०० ) आर्थिक पाहणीची मागणी करण्यांत आली. यापुढें मात्र कॉंग्रेस या विषयास कंटाळलेली आढळते.

## ७ जंगलचे कायदे

सारावाढ व मीठाचा कर यांच्याप्रमाणेंच जंगलच्या कायद्यांनीं लोकांचें जीवित असह्य करून सोडलें आहे. सरकारनें लेखणीच्या फटकाऱ्यानें रयतांचे परंपरागत चालत आलेले शाश्वत हक्क नष्ट केले व खेडेगांवांतील समाजांत क्रांति घडवून आणली.

ह्या जंगलच्या कायद्यामुळें शेतकऱ्यांना ब्रिटिश राज्याबद्दल जेवढा वीट आला तेवढा दुसऱ्या कोणत्याही कारणानें आला नाहीं. १८९१ सालीं अवघ्या नऊ महिन्यांत नॉर्थ अर्काट जिल्ह्यांतील ३ लाख जनावरें मृत्युमुखीं पडलीं. टेकडयांवरील जमीन आमची खरी, पण त्यांतील एखाद्या झुडुपावर अगर पानावरही आपली सत्ता नाहीं, अशी स्थिति ह्या जंगलच्या कायद्यानें करून टाकली आहे. जंगलच्या कायद्यामुळें शेतकऱ्यांना किती हाल सोसावे लागतात ह्यासंबंधानें चौकशी करण्याबद्दल १८९२।९३ सालामध्यें सरकारला कॉंग्रेसनें अत्यंत कळकळीची

विनंति केली. विशेषतः द्वीपकल्पमय हिंदुस्थान व डोंगराळ पंजाब येथें सरकारनें केलेले कायदे अतिशय दुष्टपणाचे व अन्यायाचे आहेत. सुधारलेल्या सरकारला ते शोभण्यासारखे नाहीत, असें नवव्या अधिवेशनामध्यें पंडित मेघराम यांनीं बोलून दाखविलें. या चळवळीचा सरकारवर थोडा परिणाम झाला. २० ऑक्टोबर १८९४ रोजीं सरकारनें सर्क्युलर काढून जंगलचे कायद्याची अंमलबजावणी करतांना शेतकऱ्याच्या हिताकडे व गरजांकडे जास्त लक्ष दिलें जाईल, महसूल कसा वाढेल ही एकच आर्थिक दृष्टि ठेवली जाणार नाहीं हे तत्त्व मान्य केलें.

जंगलांत उत्पन्न होणाऱ्या गवत, लांकूड व कंदमुळें, फळें यांचा मोफत उपयोग रयतांना करूं द्यावा अशी विनंति ह्या अधिवेशनांत केली होती. अकराव्या व चौदाव्या अधिवेशनात ह्याच ठरावाला पुष्टि देण्यांत आली. १८९९ नंतर कंठाळी ठरावांत जंगल कायद्यासंबधाचा ठराव समाविष्ट करण्यांत आला. याचें कारण असें की, बोअर व रुस्सो-जपानी युद्ध यामुळें राजकीय पुढाऱ्यांचा दृष्टिकोण बदलला आणि जंगल, पाणी, मीठ, अबकारी अशा प्रश्नांपेक्षां राष्ट्रीय प्रश्नांची व स्वराज्याची त्यांना आधिक मातब्बरी वाटूं लागली.

## ८ व्यापार व उद्योगधंदे

ब्रिटिश राजवटींत लँकेशायरच्या हिताकडे हिंदुस्थानच्या हितापेक्षां अधिक लक्ष दिलें जातें ही गोष्ट हिंदुस्थानातील राजकारणी पुरुषाच्या पूर्वीपासूनच लक्षांत आली होती. लोकमान्य टिळकांचे एकनिष्ठ अनुयायी श्रीयुत आर. पी. करंदीकर, श्री. केळकर व खापर्डे हे होते. त्यापैकीं करंदीकरांनीं मुंबई येथील काँग्रेसच्या ( १९०४ )अधिवेशनांत मि. आर्थर बॉलफर याचे आयर्लंडांतील भाषणाचा पुढील एक उतारा वाचून दाखविला होताः—

" एकामागून एक आमच्या सर्व वाढत्या उद्योगधंद्यांची गळचेपी करण्यांत येत आहे. इंग्लंडांतील धंदेवाल्याच्या हितरक्षणाकडेच जास्त लक्ष देण्यांत येत आहे. यामुळें संपत्तीच्या उत्पादनाचा प्रत्येक झरा आटून जात असून सर्व राष्ट्रालाच जमिनीवर उपजीविका करणें प्राप्त झालें आहे."

इंग्लीश राजवटींत शिक्षण मिळतें, सुरक्षितता वाटते व रेल्वेच्या गाड्याही सुरूं झाल्या आहेत; परंतु सांपत्तिक फायद्याच्या दृष्टीनें विचार केला असता इंग्रजी राज्यापेक्षा मुसलमानांचेंच राज्य अधिक हितावह होतें. मुसलमान हिंदुस्थानांत येऊन हिंदी बनले व देशांतील सर्व संपत्ति देशांतच राहिली अशी

तुलना एका राजकीय पुढाऱ्यानें केली आहे. नवव्या अधिवेशनामध्यें (१८९३) राजा रामपालसिंग ह्यांनीं असें सांगितलें कीं, इंग्रजी सनदी नोकरांनीं हिंदुस्थानाला आपलें शिकारीचें कुरण बनविलें आहे. ब्रिटिश हिंदुस्थानांत तयार झालेल्या मालावर एक्साईज ड्यूटी बसविण्यासंबंधीं जेव्हां विचार सुरूं झाला त्या वेळीं काँग्रेसनें (१८९४) आपला निषेध व्यक्त केला. वीस नंबराच्या खालील हिंदुस्थानांतील सुतावर एक्साईज ड्यूटी घेण्यांत येत नाहीं, ह्याबद्दल लँकेशायरनें तक्रार केली. अकराव्या काँग्रेसमध्यें लँकशायरची ही तक्रार कशी निराधार आहे, हें दाखविण्यांत आलें. कलकत्त्याच्या प्रख्यात अधिवेशनांत (१९०६) पं. मालवीयांनीं उद्योगधंद्याच्या अपयशाबद्दलचें पुढील कारण सांगितलें. "देशांतून कच्चा माल बाहेर जातो व तो पक्का होऊन देशांत परत येतो. उद्योगधंदे वाढत असताना सर्व देशांतील सरकार त्यांना संरक्षण देत असतात. आम्ही स्वतंत्र असतों तर आम्हीं तेंच केलें असतें." मध्यम वर्गाचे लोकच परदेशी माल मोठ्या प्रमाणांत खपवितात, ही शोचनीय गोष्ट आहे. आपले उद्योगधंदे वाढविणें असल्यास स्वावलंबन, निश्चय व त्याग ह्या गोष्टींची जरूरी आहे" असें लोकमान्य टिळक म्हणाले. स्वदेशीची भावना, बहिष्काराची चळवळ ह्यांमुळें हिंदी उद्योगधंद्याचे पुनरुज्जीवनाकडे लोकांचें लक्ष लागलें. १९१० सालीं स्वदेशीचा ठराव मि. चिंतामणी यांनीं अलाहाबादला मांडला. त्यावेळीं त्यांनीं रानडे यांचे भाषणांतील पुढील उतारा वाचून दाखविला. "हिंदुस्थानाला इंग्लंडनें अगदीं आपला मळा बनवून टाकला आहे. हिंदुस्थानांत कच्चा माल तयार करावा. ब्रिटिश एजंटानें ब्रिटिश बोटींतूनच तो इंग्लंडला रवाना करावा. ब्रिटिशाच्या कौशल्यानें व भांडवलानें त्याला कापडाचें स्वरूप द्यावें व पुनः ब्रिटिश व्यापाऱ्यांनीं आपल्या ब्रिटिश एजंटाच्या मदतीनें तो हिंदुस्थानांत पाठवावा."

खेडेगांवांतील नष्ट होणाऱ्या उद्योगधंद्यांकडे व शेतीकडे हिंदी पुढाऱ्यांचें पहिल्यापासूनच लक्ष होतें. देशी उद्योगधंद्यांना व कलांना सरकारनें मदत केली पाहिजे अशी सूचना प. मदनमोहन मालवीय यांनीं सरकारला केली (१८९८). १८९१ च्या नागपूरच्या काँग्रेसमध्यें लाला मुरलीधर यांनीं उर्दूत भाषण करून या विषयावरील ठरावाला पुष्टी दिली. ते म्हणाले, "आपल्या बंधूंचें रक्त शोषून घेण्याचे कामीं आपण परदेशी व्यापाऱ्यांना मदत करीत आहोंत. युरोपियन

वस्तूकरितां एक रुपाया खर्च करणें म्हणजे आपल्या दरिद्री बंधूला लुबाडण्या-सारखेंच आहे. त्यांचा प्रामाणिक धंदा बुडाल्यामुळें तो आतां आपला उदर-निर्वाह करूं शकत नाही. आपले सर्व उद्योगधंदे बुडत चालल्यामुळें आपल्या देशबंधूची उपासमार होत आहे. असें सांगतात की, ३० वर्षांपूर्वी रुपयाला दीड मण गहूं व दोन मण हरबरे मिळत होते. आमच्या देशांतून त्या वेळीं धान्य बाहेर जात नव्हतें. खुला व्यापार आणि राष्ट्राराष्ट्रांमध्यें चोख व्यवहार हा सर्व तिरस्करणीय देखावा आहे. दरिद्री हिंदुस्थान व श्रीमंत भांडवलवाले इंग्लंड यांच्यात न्यायव्यवहार कसा होणार ? ससा व अजगर ह्यांच्यामध्ये न्यायव्यवहाराची अपेक्षा करण्यासारखेंच हें आहे." १८९३ च्या अधिवेशनात पंडित मालवीय यांनीं ब्रिटिश माल हिंदुस्थानांत आल्यामुळें गरीब धंदेवाल्यांचें किती नुकसान होत आहे हें सांगितलें व पन्नास वर्षांपूर्वी कारागिराना जी किफायत होत होती त्याच्या शतांशानेंही हल्लीं होत नाही, असें ते म्हणाले. सर एस्. सुब्रह्मण्य यानीं खेडेगांवांतील धंद्याचें पुनरुज्जीवन करण्याकरितां कर्ज देणाऱ्या सोसायटया उघडण्याची किती आवश्यकता आहे, ह्याचें प्रतिपादन केले होतें. १८९९ साली शैक्षणिक व औद्योगिक विषयावर अर्धा दिवस वादविवाद झाला. लाला लजपतराय यांनीं ह्या बाबतींत पुढाकार घेतला होता. या अधि-वेशनांत या प्रश्नाचा विचार करण्याकरितां एक कमिटी नेमण्यांत आली. कमिटीच्या ह्या उपक्रमामुळें १९०१ सालीं कलकत्ता येथें पहिले औद्योगिक प्रदर्शन भरविण्यांत आलें. हें प्रदर्शनाचें कार्य आजवर चालू असून त्यांत सारखी सुधारणा होत आहे. ह्या प्रदर्शनाचें जुनें स्वरूप नाहीसें होऊन तें आतां खादी व स्वदेशीचें प्रदर्शन बनलें आहे. कापडावरील एक्साईज ड्यूटी-विरुद्ध कॉंग्रेसनें बरीच चळवळ केली (१८९४). त्या वेळचे गव्हर्नर जनरल यानींही ह्या गोष्टीचा निषेध केला, पण तिचा कांहींएक उपयोग झाला नाहीं. ह्यापुढें ह्या बाबतींतील हिंदुस्थानची विनंति मुळींच मानण्यांत आली नाहीं. एवढेंच नव्हे तर उलट हिंदुस्थानांतील व्यापारी स्पर्धेपासून ब्रिटिश कार-खानदारांचें संरक्षण केलें पाहिजे असें लॉर्ड सॉल्सबरी यानीं उद्गार काढले. खेडे-गांवांतील दारिद्र्य सारखें वाढत चाललें आहे, हें केवळ कल्पनामय चित्र नव्हतें. चार कोटी लोकांना दिवसांतून एकदांच खायला मिळतें असें आपण नेहमीं म्हणतों. वाच्छा आणि मुधोळकर यांनीं ही गोष्ट अँग्लो इंडियन अधिकाऱ्यांच्या

रिपोर्टावरूनच सिद्ध करून दाखविली आहे. पोटभर जेवण म्हणजे काय, हीं गोष्ट हिंदुस्थानांतील निम्म्या शेतकरी लोकांना वर्षानुवर्षे माहीत नसते, असें सर चॉर्लस इलॅाइट ह्यांनीं म्हटलें नाहीं काय? १८९१ सालीं एका तालुक्यांत शें.६६ या प्रमाणांत साऱ्याची वाढ झाली तर दुसऱ्या एका तालुक्यांत शें. ९९ नें वाढ झाली, तिसऱ्या एका ठिकाणीं शें. ११६ या प्रमाणांत वाढ झाली. आणि कांहीं खेडेगांवांतून तर शें. ३०० ते १५०० शेंपर्यंतही वाढ झाली आहे ! लष्करी खर्च तर बेसुमार वाढला आहे. लष्करांतील एका शिपायामागें जर्मनींत १४५ रु., फ्रान्समध्यें १८५, रु. इंग्लंडमध्यें २८५ रु. खर्च होतात. परंतु हिंदुस्थानांत मात्र ७५ रु. खर्च होतात. हा खर्च आणि दरमाणशीं उत्पन्न हें ताडून पाहिलें असतां, इंग्लंडमध्यें दर माणशीं उत्पन्न ४२ पौंड, फ्रान्स २३ पौंड, जर्मनी १८ पौंड आणि हिंदुस्थानचें दर माणशीं उत्पन्न १ पौन्ड!! १८९१ सालचे हे आंकडे आहेत. १८८७ पासूनच दुष्काळासंबंधानें अनेक वेळां ठराव करण्यांत आले आणि वेठबिगारीची पद्धत बंद करण्यासंबंधानें विनंति करण्यांत आली.

## ९ स्वदेशी, बहिष्कार व स्वराज्य

बंगालच्या फाळणीनतर राष्ट्रामध्यें नवचैतन्य निर्माण झालें. त्यानेंच या चळवळीला जन्म दिला. काशी येथें झालेल्या २१ साव्या अधिवेशनांत बंगालच्या फाळणीविरुद्ध निषेध व्यक्त करण्यांत आला; व बंगालमध्यें व सर्वत्र या गोष्टीचा निषेध झाला व ही फाळणी रद्द करावी अशी सर्वांकडून मागणीही करण्यांत आली. तथापि त्यांना न जुमानता सरकारनें आपलें धोरण कायम ठेवलें. म्हणूनच केवळ एक परिणामकारक शेवटचा सनदशीर मार्ग म्हणून लोकांना परदेशी मालावर बहिष्कार घालणें भाग पडलें, असें ह्या निषेधाच्या ठरावांत नमूद केलें आहे. परदेशी मालावर बहिष्कार घालण्याचें हें तत्त्व मान्य होतें किंवा नाहीं हे ह्यावरून स्पष्ट होत नाहीं. केवळ एक कायदेशीर शस्त्र ह्या नात्यानेंच ह्या बहिष्कारासंबंधानें कॉंग्रेसनें आपल्या तात्त्विक मताचें दिग्दर्शन केलें आहे. लाला लजपतराय यांनीं ह्या ठरावाला दुजोरा दिला. "ह्यापुढें आम्ही याचकवृत्ति सोडून दिली पाहिजे. आम्ही एका साम्राज्याचें प्रजाजन असून आमचे हक्काकरितां आम्ही झगडत आहोंत, ही जाणीव आपण ठेवली पाहिजे." १९०५ सालीं जें धैर्य दिसून आलें नाहीं, ती धीटपणाची वृत्ति १९०६ सालीं दिसून आली. फाळणी-

संबंधाच्या ठरावांत 'बंगाल'नें सुरूं केलेली बहिष्काराची चळवळ न्याय्य व कायदे-शीर आहे ' असा अभिप्राय देण्यांत आला. ' झीज सोसूनही ' देशी धंद्यांना उत्तेजन द्यावें, असें ह्या अधिवेशनांत सांगण्यांत आलें. हा विषय येथेंच थांबला. एकाच वेळी परीक्षा, कायदेमंडळांत लोकप्रतिनिधित्व परिणामकारक होईल अशी प्रतिनिधींची वाढ, सेक्रेटरी ऑफ स्टेटच्या कौन्सिलांमध्यें व हिंदुस्थानांतील एक्झीक्यूटिव्ह कौन्सिलामध्यें हिंदी लोकाची नेमणूक या पलीकडे स्वराज्याच्या कल्पनेनें धांव मारली नाहीं. १९०६ मध्यें उत्पन्न झालेल्या राष्ट्रीय आकांक्षांची ही परिसीमा होती. दुसऱ्या वर्षी सुरतेची फूट घडून आली व नेमस्तांच्या कांग्रेसनें बहिष्काराचा विषय गाळून टाकला. स्वदेशीलाच फक्त ते चिकटून राहिले. मोर्ले-मिंटो सुधारणेच्या योजनेचें परीक्षण करणें हाच त्यांच्या स्वराज्याचा ठरावाचा विषय बनला. १९१० सालीं दुसरे व्हॉइसरॉय आले. सर्व राजकीय कैद्याची मुक्तता करावी, अशी नवीन व्हाइसरॉय लॉर्ड हार्डिंज ह्यांना एका ठरावानें विनंति करण्यांत आली. दुसरे वर्षी ह्याच विनंतीचा पुनरुच्चार करण्यांत आला. १९११ सालीं दिलेले प्रांतिक स्वायत्ततेचें वचन पूर्ण करण्यांत यावें व ब्रिटिश साम्राज्यांतील एक स्वतंत्र घटक म्हणून हिंदुस्थानला मानण्यांत यावें, अशी धीटपणाची मागणी मद्रास येथें ( १९१४ ) करण्यांत आली.

## १० जातीय प्रतिनिधित्व

जातीय प्रतिनिधित्वाची कल्पना अलीकडची आहे असें वाटण्याचा संभव आहे. सं. प्रांतांचे लेफ्टनंट गव्हर्नर सर ऑकलंड कोल्व्हील यांच्या कारकीर्दीपासूनच ( १८८८ ) या कल्पनेनें डोकें वर काढले आहे. मुसलमान कॉंग्रेसच्या विरुद्ध आहेत असें दाखविण्याचा या वेळी प्रयत्न करण्यात आला. मि. ह्यूम यांनीं सर ऑकलंड यांना एक लांबलचक पत्र पाठवून वरील गोष्टींत सत्याचा अंश नाहीं असें दाखवून दिलें. पहिल्या दोन तीन कॉंग्रेसच्या यशस्वी अधिवेशनामुळें नोकरशाही गडबडून गेली हे निर्विवाद आहे. नोकरशाहीचा हा जळफळाट सर ऑकलंडच्या मुखानें बाहेर पडला. मुसलमानांना बगलेंत मारण्याची अधिकाऱ्यांची वृत्ति मुसलमान पुढाऱ्यांना मात्र आवडली नाहीं. चौथ्या कॉंग्रेसमध्यें [ अलाहाबाद ] मि. यूल यांनीं अध्यक्षपद स्वीकारण्याबद्दल विनंति करतांना शेख

रेझाहसन खान यांनीं कॉंग्रेसला पाठिंबा देण्यासंबंधाचा एक फतवा वाचून दाखविला, हें मुसलमानांच्या नापसंतीचें द्योतक आहे. लखनौ येथील सुनी पंथाच्या धर्मगुरूंनी हा फतवा काढला होता. मुसलमान समाज कॉंग्रेसला विरोधी नसून सरकारी अधिकाऱ्यांनाच कॉंग्रेसची चळवळ नको आहे असें त्यांनीं सांगितलें. १९२१ सालच्या फतव्याचा ज्यांना माहिती आहे त्यांना या गोष्टीचें महत्त्व खात्रीनें समजेल.

लॉर्ड मिंटो यांच्या कारकीर्दींत जातीय प्रतिनिधित्वाच्या कल्पनेला मूर्त स्वरूप आले. ज्या प्रांतांत मुसलमान बहुसंख्याक आहेत असा पूर्व बंगाल व आसाम प्रांत बंगालपासून वेगळा काढून जातीय भेदाची आग लॉर्ड कर्झन यांनीं पेटवून दिली. लॉर्ड कर्झन यांच्या कारकीर्दींत प्रक्षुब्ध झालेल्या हिंदुस्थानास शांत करण्याकरितां लॉर्ड मिंटो यांना पाठविण्यांत आलें. पण जातीय भेदाची ही कीड त्यांनीं कायमच ठेवली. मिंटो यांच्या योजनेंत मुसलमानांना स्वतंत्र मतदार संघ दिले आहेतच. शिवाय संयुक्त मतदारसंघांतही मत देण्याचा त्यांचा हक्क कायम ठेवला आहे. पूर्व बंगाल, आसाम व पंजाब यांतील अल्पसंख्याक हिंदुजमातींना मुसलमानांसारखेच हक्क दिले नाहींत अशी कांहीं संकुचित मनाच्या लोकांनीं तक्रार केली; पण असल्या तक्रारींत खरोखरी कांहीं अर्थ नव्हता. या दोन्ही समाजांत मतदारीच्या हक्काच्या दृष्टीनें जे भेदाभेद करण्यांत आले होते तेच अतिशय संतापजनक होते. दरसाल ३००० रु. इन्कम टॅक्स देणाऱ्या मुसलमानाला मतदानाचा हक्क प्राप्त होत असे, पण मुसलमानेतराला मात्र दरसाल तीन लाख रु. इन्कम टॅक्स तो भरीत नसेल तर मतदार होतां येत नसे. ग्रॅज्यूएट होऊन तीन वर्षे झालीं कीं, मुसलमान इसम मतदार होऊं शकत असे, पण मुसलमानेतराला मतदार व्हावयाचे असल्यास ही मुदत ३० वर्षांची ठेवण्यांत आली होती. कोणीकडे ३ हजार व कोणीकडे ३ लाख! कोणीकडे ३ वर्षे व कोणीकडे ३० वर्षे!

१९१० सालीं म्युनिसिपालिटया व लोकलबोर्डे यांच्या निवडणुकांच्या बाबतींतही जातवार स्वतंत्र मतदार संघाचें तत्त्व मान्य करण्यांत आल्यामुळें सर विल्यम वेडरबर्न यांनीं हिंदु व मुसलमान या दोन्ही जमातींच्या पुढाऱ्यांची संयुक्त सभा बोलावून दोघांनाही पसंत पडेल अशी योजना तयार करण्याची खटपट केली. स्वतंत्र मतदारसंघाचें तत्त्व स्थानिक स्वराज्याच्या बाबतींतही लागू करण्यांत आलें या गोष्टीबद्दल मि. जिना यांनींही निषेध व्यक्त केला होता.

स्वतंत्र मतदारसंघाचें तत्त्व याप्रमाणें सर्वत्र लागू करण्यांत आल्यास दोन्ही समाजांतिल मित्रत्वाचें व प्रेमाचें नातें अधिकच बळावेल असें, " वर्न " सर्क्यूलरमध्यें म्हटलें होतें ' आमच्यांतील ऐक्य साधण्याकरिता अशा प्रकारची कळकळ दाखविणें म्हणजे आमच्या भोळेपणाला चांगलेंच सर्टिफिकेट देण्यासारखेंच आहे ' असें २६ व्या कॉंग्रेसचे [ कलकत्ता १९११ ] अध्यक्ष विशन नारायण धार यानी म्हटलें होतें. सर विल्यम वेडरबर्न व आगाखान यांच्या सल्याप्रमाणें दोन्ही जमातीच्या पुढाऱ्यांची सभा भरवून ऐक्याचे प्रयत्न चालू असता सिव्हिल सर्वंटाचें मुखपत्र असलेल्या एका अँग्लो इंडियन पत्रानें " हिंदु व मुसलमान दोन्ही जमातींत ऐक्य घडवून आणून त्यांना सरकारविरुद्ध उठविण्याचा प्रयत्न आहे " असें लिहिलें होतें. अँग्लो इंडियन पत्राच्या या वरील उद्गाराचा दाखला देऊन हिंदुस्थानची राजकीय परिस्थिति किती विकट आहे, हें विशन नारायण धार यांनीं आपल्या भाषणांत दाखवून दिलें.

पुढें लवकरच बाल्कन युद्ध सुरू झाल्यामुळे सर्वच परिस्थिति बदलली. " या युद्धामुळें युरोपांतील ऑटोमन साम्राज्य नष्ट होण्याची वेळ आली आहे व आशियांतील इराणी राज्याचीही गळचेपी होण्याचा प्रसंग आला आहे. तुर्की साम्राज्यावर आलेल्या या संकटामुळें सर्व मुसलमान समाजाला दुःख वाटत आहे. अशा वेळीं हिंदु व मुसलमान दोघांनीं एक होऊन आपल्या मातृभूमीचे संरक्षण करण्यास तयार झालें पाहिजे" असे उद्गार कराची कॉंग्रेसचे ( १९१३ ) अध्यक्ष नवाव सय्यद महमद वहादुर यानीं आपल्या अध्यक्षीय भाषणात काढले. ह्या उद्गारावरून खिलाफत चळवळीची आठवण होते. तुर्कस्थाननें हिंदुस्थानातील राजकारणाला वळण लावण्याचें महत्वाचें कार्य अनेक वेळां केलें आहे. या परिस्थितीमुळेंच १९१३ च्या कराची कॉंग्रेसमध्यें हिंदु व मुसलमान एक झाले. ब्रिटिश साम्राज्यातर्गत स्वराज्याचें ध्येय ऑ.इं. मुस्लीम लीगनें मान्य केलें याबद्दल कॉंग्रेसनें अभिनंदन केलें व दोन्ही जमातींनीं यापुढें सहकार्यानें सर्व प्रकारच्या चळवळी कराव्या असें ठरविण्यांत आलें.

" आजचें हिंदुस्थान हें केवळ हिंदूंचें नाहीं किंवा मुसलमानांचें नाहीं, अँग्लो इंडियनांचेंही तें नाहीं आणि युरोपियनांचें तर नाहींच नाहीं; तेव्हां हिंदूंनीं व मुसलमानांनीं एक होऊन आपलें ध्येय साध्य करण्याकरितां आपल्या सर्व शक्ति खर्ची घालाव्या," असें भूपेंद्रनाथ वसू यांनीं कराची कॉंग्रेसमध्यें वरील

ठरावावर भाषण करतांना बोलून दाखविलें. पण एकीच्या या सर्व प्रयत्नामुळें जातवार मतदारसंघाचें दुखणें कमी झालें नाहीं. तर उलट त्यानें राजकीय चळवळींत कायमचेंच स्थान पटकावलें. पण या दुखण्याचा राजकारणांत प्रवेश झाला व तें वाढूं लागलें असें पाहिल्यावर मुसलमानांना जें काय पाहिजे होतें तें हिंदूंनीं खुषीनें व शांतपणें दिलें असतें तर हा प्रश्न लवकरच सुटण्याच्या पंथास लागला असता. खावें तसतशीं भूकही वाढत जातें हें जरी खरें असलें तरी सारखें पुनः पुनः खात राहिल्यामुळें आकंठ तृप्तिही होतें हेंही तितकेंच खरें आहे. अखेरीस जातवार मतदारसंघाची मॉर्ले-मिंटो सुधारणा लोकावर लादण्यांत आली. लोकांचें या बाबतींत मतही विचारलें नाहीं. यामुळें १९१६ सालीं सुधारणेचा नवीन हप्ता देण्याची भाषा जेव्हां सुरू झाली तेव्हां दोन्ही जमातींनी एकत्र जमून एक सर्वसंमत योजना तयार करण्याचें ठरविण्यात आलें. १९१५ च्या कॉंग्रेसच्या आज्ञेप्रमाणें १९१६च्या नोव्हेंबरमध्यें कलकत्ता येथें कॉंग्रेस व लीग याच्या प्रतिनिधींची एक सभा भरविण्यांत आली. त्यावेळीं स्वयंनिर्णयाचें तत्त्व हवेंत होतें. या बैठकींत कॉंग्रेसच्या जुन्या पुढाऱ्यापेक्षा नव्या तरुण पुढाऱ्याचाच जास्त उपयोग झाला. त्यांनींच या बाबतींत पुढाकार घेतला व देवाणघेवाण होऊन मुसलमानांची लोकसंख्या ज्या प्रांतात शें. १५ पेक्षांही कमी आहे तेथें सुद्धां त्याना किमानपक्ष शें. १५ जागा मिळाव्या असें ठरलें. नेहमींप्रमाणें पंजाब व बंगाल यांचा प्रश्न या बैठकींत सुटला नाहीं. पण लखनौच्या कॉंग्रेसमध्यें (१९१६) ही कोंडी फुटली व दोन्ही पक्षांच्या संमतीनं एक योजना मुक्रर करण्यांत आली व मि. मॉंटेग्यू यांनीं ही योजना जशीच्या तशी मान्य करून घेतली. तिसऱ्या पक्षाच्या मध्यस्तीमुळें आपले हक्क सुरक्षित राहतात या कल्पनेपेक्षां, प्रतिस्पर्धी जातीनें, मित्रत्वाच्या नात्यानें दिलेल्या सवलतींची जाणीव ही अधिक शक्ति निर्माण करते व ऐक्य घडविते. पण स्वतंत्र मतदारसंघाचें मूळ रुजलें ही गोष्ट मान्य केली पाहिजे. जातीविशिष्ट व सर्वसाधारण संघ हे सवते झाले, त्याचप्रमाणें उमेदवार म्हणून उभे राहण्याचा हक्कही सवता झाला.

## ११ परदेशांतील हिंदी लोक

नाताळांतील मुदतबंद मजूरानीं आपले करार पुन्हां नवीन लिहून द्यावे किंवा त्यांनीं डोईपट्टी द्यावी असा कायदा १८९६ मध्यें करण्यांत आला. आपल्या

वार्षिक उत्पन्नापैकीं निम्म्याहून अधिक रक्कम डोईपट्टी म्हणून मजूरांना द्यावी लागत होती. डोईपट्टीचें प्रमाण इतकें जबर होतें. डॉ. मुंजे अँब्युलन्स कोरच्या संबंधांत बोअर युद्धाच्या वेळीं आफ्रिकेला गेले होते. तेथून ते परत हिंदुस्थानांत आले (१९०३) त्या वेळीं "आमचें सरकार आम्ही मनुष्यें आहोंत असें समजत नाहीं" असे उद्गार त्यांनी काढले. साम्राज्यांतलि एका जातीचें वर्चस्व दुसऱ्या जातीवर कायमचें राहणें शक्य नाहीं असें मि. वी. एन्. शर्मा यांनी २१व्या अधिवेशनांत (काशी १९०५) सरकारला बजावून सांगितलें. मि. मदनजित हे कित्येक वर्षें तरी दरसाल कॉंग्रेसपुढें द. आफ्रिकेंतलि हिंदी लोकांचें गाऱ्हाणें मांडीत असत. भगवी वस्त्रें परिधान केलेली व हातांत लांब कांठी असलेली त्यांची ठेंगणी मूर्ति कोणीही विसरणें शक्य नाहीं. वयोवृद्ध होऊन नुकतेंच त्यांचें निधन झालें.

द. आफ्रिकेच्या प्रश्नासंबंधानें अगदीं पहिला निषेध १८९४ सालीं व्यक्त करण्यांत आला. हिंदी लोकांच्या मतदारांचा हक्क काढून घेणारें वसाहतसरकारचें बिल व्हेटोच्या अधिकारांत फेटाळून लावावें असा ठराव या अधिवेशनांत करण्यांत आला. यानंतर एक महत्त्वाचा प्रश्न म्हणून या विषयाची चर्चा दरसाल कॉंग्रेसमध्यें होऊं लागली. द. आफ्रिकेंतील हिंदी लोकांचा पदोपदीं अपमान करण्यांत येत असे, पासाशिवाय त्यांना कोठेंही प्रवास करतां येत नसे, रात्रीं नऊ वाजल्यानंतर बाहेर फिरण्याची त्यांना मनाई करण्यात येत असे, ज्या ठिकाणीं उकिरडा सांठवावयाचा त्या जागांतून त्यांना ट्रान्सवालमध्यें राहावें लागत असें, रेलवेंतून सेकंड व फर्स्ट क्लासमधून प्रवासास त्यांना परवानगी नसे, ट्रामधून त्याना बाहेर ढकलून देण्यांत येत असे, व फूटपाथवर त्यांना धक्के मारण्यात येत असत, हॉटेल-मध्यें त्यांना मज्जाव करण्यांत आला होता, सार्वजनिक बागाचा त्यांना उपयोग करतां येत नसे, गोरे लोक त्यांच्यावर थुंकत असत, त्यांना हिडिस फिडिस करीत असत, त्यांना शिव्याशाप देत असत, व मनुष्य कितीही शांत असला तरी त्याला सहन करणें अशक्य होईल असें त्यांचे अनेक प्रकारचे छळ करण्यांत येत असत. द. आफ्रिकेंतील हिंदी लोकांवर माणुसकीला न शोभतील असे अनेक अत्याचार व जुलूम कसें करण्यांत येतात याची चर्चा या अधिवेशनांतून होत असे. हिंदी लोकांना अधिकाधिकच नालायक बनविणारे तीन कायदे १८९८ सालीं पास झाले. ह्याच सुमारास गांधींनीं

आपली चळवळ सुरू केली. त्या वेळचे गव्हर्नर लॉर्ड एल्जिन यांनीं या नाताळ-कायद्याला संमति दिली व स्टेट सेक्रेटरी लॉर्ड जॉर्ज हॅमिल्टन यांनीं "रानटी लोकांचें राष्ट्र" असें हिंदुस्थानाच्या बाबतींत उद्गार काढले! नाताळांत जाणाऱ्या हिंदी लोकांवरील निर्बंध व हिंदी व्यापाऱ्यांवर लादलेले लायसेन्सचे कायदे रद्द करावेत अशी १६व्या कॉंग्रेसनें (१९००) आग्रहाची मागणी केली. द. आफ्रिकेंतील एक लाख लोकांचा 'अर्जदार' या नात्यानें गांधीजींनीं १७ व्या अधिवेशनांत (कलकत्ता १९०१) द. आफ्रिकेसंबंधाचा ठराव मांडला. १९०२ सालीं या प्रश्नाबाबत एक शिष्ट-मंडळ स्टेट सेक्रेटरीकडे जावयाचें ठरलें होतें. पण तो विचार सफल झाला नाहीं. १९०३ व १९०४ सालीं पूर्वीच्याच ठरावांचा पुनरुच्चार करण्यांत आला. १९०५ सालीं द. आफ्रिकेंतील हिंदी लोकांची परिस्थिति अधिकच हलाखीची झाली. १९०६ मध्यें द. आफ्रिकेला राज्यघटना दिल्यामुळें तेथील हिंदी लोकांची स्थिती पूर्वीपेक्षांही खराब होईल अशी भीति कॉंग्रेसमध्यें व्यक्त करण्यांत आली. द. आफ्रिकेची नवीन राज्यघटना अमलांत येत असल्यामुळें १९०८ पर्यंत हिंदी लोकांच्या गाऱ्हाण्याकडे कोणीही लक्ष दिलें नाहीं. तथापि ही घटना अमलांत येत असतांना हिंदी लोकांचे हितसंबंध सुरक्षित राखण्यांत यावेत अशी कॉंग्रेसनें मागणी केली. "हिंदी लोकांना ज्या अपमानकारक रीतीनें वागविण्यात येत आहे तेंच धोरण चालू राहिल्यास त्याचा परिणाम ब्रि. साम्राज्याला घातक झाल्याशिवाय राहणार नाहीं" असा मि. किडवाई यांनीं २३ व्या मद्रासच्या अधिवेशनांत सरकारला इशारा दिला.

कितीही भाराभर अर्ज केले तरी त्यांचा कांहीं उपयोग होत नाहीं असें पाहिल्या-वर १९०९ सालीं गोखले यांनीं या ठरावावर भाषण करतांना सरकारच्या विश्वासभंगाचा आणि गांधींच्या नेतृत्वाखालीं चाललेल्या चिकाटीच्या चळवळीचा उल्लेख केला व प्रत्यक्ष परिणामकारी मार्गाचा अवलंब केल्याशिवाय गत्यंतर नाहीं असें सांगून गांधीजींनीं सुरू केलेल्या नि:शस्त्र प्रतिकाराच्या चळवळीसंबं-धानें आपले विचार प्रकट केले. "नि:शस्त्र प्रतिकाराची चळवळ ही स्वाभाविकच संरक्षक स्वरूपाची आहे. हें युद्ध नैतिक व आध्यात्मिक शस्त्रांनीं लढावयाचें असतें. स्वतः कष्ट सहन करून नि:शस्त्र-प्रतिकारी-सैनिक जुल्मांचा प्रतिकार करीत असतो. तो पाशवी शक्तीविरुद्ध आत्मशक्ति उभी करतो. मनुष्यातील

पाशवी वृत्तीविरुद्ध त्याच्यांतील दैवीवृत्ति, जुलमाविरुद्ध ढाल, शक्तीविरुद्ध विवेक बुद्धी, अन्यायाविरुद्ध श्रद्धा व न्याय उभे करतो." द. आफ्रिकेंत चालू असलेल्या या लढयाला मदत करण्याकरितां फंडाची मागणी करण्यांत आली व जागचे जागीं १८००० रु. जमा झाले. सर जमशेटजी टाटा यांच्या दुसऱ्या चिरंजीवांनीं—रतन टाटांनीं—या फंडाला २५००० रु. दिले व त्यांचे कॉंग्रेसनें आभार मानले. २४ व्या व २५ व्या अधिवेशनाच्या वेळीं द. आफ्रिकेंतील हा लढा अगदीं जोरांत होता. या लढयांत भाग घेतलेल्यांचा कडवा देशाभिमान, धैर्य व स्वार्थत्याग यांबद्दल त्यांचें या दोन्ही अधिवेशनांत अभिनंदन करण्यांत आलें. द. आफ्रिकेंत जाणाऱ्या हिंदी लोकांवर घातलेले देशात येण्याबद्दलचे निर्बंध व त्यांची नोंद या बाबतीत करण्यांत आलेला ॲन्टी एशियाटिक कायदा रद्द करण्यांत आला याबद्दल १९११ मध्यें आनंद व्यक्त करण्यांत आला व गांधींचें अभिनंदन करण्यांत आलें. पण दुसऱ्या वर्षी कॉंग्रेसला निराळाच अनुभव आला. द. आफ्रिकेच्या सरकारनें वचनभंग केला व इमिग्रेशन ॲक्ट मंजूर करण्याचें ठरविलें, त्यामुळें कॉंग्रेसनें आपला निषेध व्यक्त केला व राजेसाहेबांनीं व्हेटोच्या अधिकाराचा उपयोग करून हा कायदा फेटाळून लावावा अशी विनंति केली. लॉर्ड हार्डिंज या वेळीं गव्हर्नर जनरल होते व त्यांनीं या बाबतींत कणखर धोरण स्वीकारलें होतें. व्हाइसरॉयांच्या या धोरणाला पुष्टि देऊन त्यांची बाजू बळकट करण्याकरितां करारबंद मजूरीची पद्धति बंद करण्याबद्दलही कॉंग्रेसनें या वर्षी ठराव केला. यानंतर ही पद्धति लवकरच बंद करण्यांत आली. या प्रकरणात अंशतः तडजोड घडवून आणल्याबद्दल हार्डिंज यांच्याविषयीं कॉंग्रेसनें कृतज्ञता व्यक्त केली. पण हें प्रकरण एवढयावरच संपलें नाहीं. १९१६ व १९१७ सालीं पुन्हां या प्रश्नासंबंधानें कॉंग्रेसला विचार करावा लागला. १९१३ च्या कराची कॉंग्रेसमध्यें म. गांधी व त्यांचे अनुयायी यांनीं या लढयांत दाखविलेल्या चिकाटीबद्दल त्यांचें कौतुक करण्यांत आलें. गांधींची हिंदुस्थानला याच प्रकरणीं ओळख झाली.

कानडा सरकारच्या प्रीव्हि कौंसिलच्या एका हुकुमांतील "Continuous Journey clause" अखंडित प्रवासाच्या कलमामुळें एक नवीनच प्रकरण कराची कॉंग्रेसचे वेळीं उपस्थित झालें. "कानडा देशांत पूर्वी न राहिलेल्या इसमाखेरीज दुसरा कोणीही इसम कानडांत येऊं पहात असेल तर त्याला तसें

करण्यास या कायद्यानें बंदी करण्यांत आली होती. या देशाला जाण्याकरितां डायरेक्ट स्टीमशिप सर्विस नसल्यामुळें कानडाला जाणाऱ्या लोकांना थेटपर्यंतचें तिकिट मिळत नव्हतें. शिवाय कानडांत येऊं पाहणाऱ्या पूर्वींच्या वसाहतवाल्या हिंदी मजूरांनाही आपली बायकामुलें कानडांत आणण्याची बंदी केली होती." तेव्हां हें अन्यायमूलक बिल साम्राज्य सरकारनें रद्द करावें अशी विनंति कराची काँग्रेसमध्यें (१९१३) करण्यांत आली.

महायुद्धाचे वेळीं या हुकुमाचे अन्याय्य स्वरुप उघडकीस आणण्यासाठीं बाबा गुरूदत्तसिग यांनीं **कोमागातामारू** नांवांची एक बोट भाड्यानें घेतली व ६०० शिखांना बरोबर घेऊन हॉगकॉग टोकियोसारख्या नेहमींच्या बंदरांत न उतरतां ते थेट कानडाला गेले पण तेथें उतरण्यास त्यांना परवानगी देण्यांत आली नाहीं त्यामुळें त्यांना परत हिंदुस्थानास यावें लागलें. येथें आल्यावर त्यांनीं बजबजहून थेट पंजाबमध्यें आपापल्या गांवीं जावें ,मध्यें कोठेंही उतरूं नये असा हुकूम सोडण्यांत आला. हा हुकूम अन्यायाचा असून त्यामुळें आपलें किती नुकसान होणार आहे हें अर्जद्वारां सरकारला कळविल्याशिवाय तेथून न हलण्याचें त्यांनी ठरविलें. हा हुकूम मोडल्यामुळें अटक करण्यांत आली तरी तो त्रास सहन करण्याची त्यांनीं तयारी केली. पुढें हें प्रकरण कसें विकोपास गेलें, त्यांत प्रो. मनसुखानी (गोस्वामी गोविंदानंद) कसें सांपडले, तेथें दंगा कसा झाला, गोळीबार झाल्यामुळें किती लोक मरण पावले, किती लोकांना अटक करण्यांत आली, बाबा गुरूदत्तसिंग कसे फरारी झाले, ७।८ वर्षे अज्ञात-वासांत राहून त्यांनीं गांधीजींची नोव्हेंबर १९२१ मध्यें कशी भेट घेतली, गांधींनीं त्यांना सरकारच्या स्वाधीन व्हावयास कसें सांगितलें, व शेवटीं आपण होऊन ते सरकारच्या कसे स्वाधीन झाले, त्यांना अटक कशी झाली व ते १९२२ फेब्रुआरींत, वटहुकूम संपल्यामुळें कसे सुटले वगैरे सर्व सांगत बसण्याचें हें स्थळ नव्हे.

## १२ मीठ

१९३० च्या सत्याग्रहाच्या चळवळीमुळें मिठावरील कराच्या प्रश्नाला हिंदी राजकारणांत विशेष महत्त्व प्राप्त झालें आहे. मिठाचा कर कसा सुरू झाला याचा विचार केला किंवा १८३६ च्या सॉल्ट कमिशनच्या शिफारशी पाहिल्या म्हणजे हा कर अन्यायमूलक आहे किंवा ब्रिटिशांच्या नाविक धंद्याला किंवा

त्यांच्या निर्गत व्यापाराला या कराची मदत होते म्हणून १८८८ च्या कॉंग्रेसनें या करावर हल्ला चढविलेला दिसत नाहीं. या करामुळें गरीब लोकांवर आणखी बोजा पडतो एवढेंच कॉंग्रेसचें म्हणणें होतें. १८९० सालीं या कराची झालेली वाढ कमी करण्यांत यावी अशीच कॉंग्रेसनें मागणी केली. हा कर अजीबात रद्द करावा असें कॉंग्रेसनें कधींही म्हटलेलें नाहीं. यापुढें आठ वेळां कॉंग्रेसनें या प्रश्नासंबंधानें ठराव केले. या सर्व प्रसंगीं १८६८ सालीं किंवा १८८८ सालीं मिठाच्या कराचें जें प्रमाण होतें तितक्या प्रमाणापर्यंत मिठाचा कर कमी करावा अशीच कॉंग्रेसनें मागणी केली. कमी मीठ खावयास मिळाल्यामुळें रोगांची उत्पत्ति होते असें एक कारण १९०२ च्या कॉंग्रेसमध्यें दाखविण्यांत आलें होतें. यानंतर या प्रश्नानें कॉंग्रेस सोडली व कौन्सिल गाठलें व तेथें ना. गोखले याचा हा खास विषय होता.

## १३ मद्य व वेश्याव्यवसाय

दारूचा खप जोरानें वाढत चालल्यामुळें या प्रश्नाकडे लोकाचें लक्ष लागलें. मेसर्स केन व स्मिथ यांनीं हाउस ऑफ कॉमन्सपुढें हा प्रश्न विचाराकरितां मांडला. हिंदुस्थानांतील दारूच्या खपाला आळा बसावा या दृष्टीनें कॉमन्स सभेंत एक ठरावही पास झाला (१८८९) व या ठरावाची अमलबजावणी हिंदुस्थानांत करावी अशी कॉंग्रेसनें विनंति केली. देशांत आयात होणाऱ्या व खुद्द देशांत तयार होणाऱ्या मद्यावरील कराची वाढ करण्यांत आली, याबद्दल कॉंग्रेसनें (१८९०) समाधान व्यक्त केलें. बंगाल सरकारनें मद्य गाळण्याची औट स्टिल पद्धति बंद केली व मद्रास सरकारनें १८८९–९० सालीं ७००० दारूची दुकानें बंद केली याबद्दल कॉंग्रेसला समाधान वाटलें. पण या बाबतींत हिंदुस्थान सरकारनें पाठविलेल्या खालित्याप्रमाणें इतर कोणत्याही प्रांतानें वर्तन केलें नाहीं. मद्याचा स्वस्त दरांत पुरवठा होतो म्हणूनच त्याचा खप सारखा वाढत आहे या गोष्टीकडे कॉंग्रेसनें (१९००) सरकारचें लक्ष वेधलें. अमेरिकेचा 'मेन लिकर लॉ,' व सर विलिफ्रेड लॉसन यांचे 'पर्मिसिव्ह बिल' किंवा 'लोकल ऑप्शनचा' कायदा यासारखे कायदे करावे व औषधोपयोगी खेरीजकरून इतर मादक द्रव्यांवर जादा कर बसवावा अशी सरकारकडे कॉंग्रेसनें विनंति केली. "ब्रिटिश सरकार आमच्याकडे शेक्सपीअर व मिल्टन यांना ज्याप्रमाणें घेऊन आले त्याचप्रमाणें ब्रँडीच्या बाटल्याही त्यांनीं इकडे आणल्या"

या केशवचंद्र सेन यांच्या तक्रारीचा उल्लेख कुमार एन्. एम्. चौधरी यांनीं या काँग्रेसमध्यें केला. १८८३ च्या एक्साइज कमिशननें मजूर वर्गात दारूचा प्रसार वाढत आहे; असें दाखवून दिलें. हिंदुस्थानांतील कलाकौशल्याची व व्यापाराची वाढ व्हावी अशी सरकारची इच्छा असल्यास सरकारनें या व्यसनाचा बंदोबस्त करावा असें कॉंग्रेसनें सरकारला बजावून सांगितलें.

लष्करांतील सोल्जर कँपांत असोत किंवा स्वारीवर असोत, त्यांना बायका पुरविण्याचें काम सरकार करीत असतें, ही गोष्ट सर्वांना माहीत आहे. तेव्हां या सरकारसंमत वेश्याव्यवसायाकडे काँग्रेसचें सहजच लक्ष गेलें. मि. यूल यांच्या अध्यक्षतेखालीं झालेल्या चौथ्या काँग्रेसपुढें ( अलाहाबाद १८८८ ) हा प्रश्न विचाराकरितां आला. वेश्याव्यवसाय व्यवस्थितपणें चालू राहण्याकरितां हिंदुस्थान सरकारनें जे कायदे केले आहेत ते रद्द करून घेण्याचा प्रयत्न हिंदुस्थानबद्दल सहानुभूति वाटणारे कांहीं इंग्रज मित्रही करीत होते त्यांच्याशीं सहकार्य करण्याचें या अधिवेशनांत ठरविण्यांत आलें. या गलिच्छ कामाकरितां सरकारनें २००० वर स्त्रिया मिळविल्या आहेत व स्वैर जीवन घालविण्यास पोरसवदा सोल्जरांना उत्तेजन दिलें आहे असें कॅ. बॅनन यांनीं या अधिवेशनांत सांगितलें. हिंदुस्थान सरकारनें 'प्यूरिटी लेजिस्लेशन' या नांवाखालीं जे कायदे केलें आहेत त्याबाबतींत कॉमन्स सभेमार्फत चौकशी करण्यात आली, याबद्दल ८ व्या काँग्रेसनें ( अलाहाबाद १८९२ ) कॉमन्स सभेचे आभार मानले, व या देशांत चालू ठेवलेल्या सरकारनियंत्रित अनीतीच्या प्रसाराविरुद्ध आपला निषेध व्यक्त केला. हिंदुस्थानांतील कँटोन्मेंटमध्यें वाढत चाललेल्या वेश्याव्यवसायासंबंधानें व स्पर्शजन्य रोगासंबंधानें इंडिया ऑफिसच्या कमिटीनें पार्लमेंटपुढें आपला रिपोर्ट सादर केला. १८८८ जून ५ रोजीं कॉमन्स सभेंत यासंबंधांत एक ठराव करण्यांत आला. या ठरावांत अंतर्भूत असलेला साधा व सरळ हेतु हिंदुस्थानांतील प्रत्यक्ष व्यवहारांत मात्र साध्य होत असलेला दिसत नाहीं हें पाहून ही दुष्ट प्रथा बंद करण्याकरितां पार्लमेंटनें स्पष्ट स्वरूपाचे कायदे करावे अशी काँग्रेसतर्फे विनंति करण्यांत आली.

## १४ स्त्रिया व दलित वर्ग

स्त्रियांच्या नागरिकत्वाचा हक्कांच्या प्रश्नाला मि. मॉंटेग्यू यांच्या भेटीच्या प्रसंगीं चालना मिळाली आणि आश्चर्याची गोष्ट ही कीं पुरुषाच्या बरोबरीनें स्त्रियांना

पूर्ण समतेचे हक्क देण्यांत आले. "मतदानाच्या बाबतींत व स्थानिक स्वराज्य संस्था व शिक्षण सस्था याकरितां उमेदवार होण्यासंबंधानें पुरुषाला जे नियम लागू केले आहेत तेवढेच नियम स्त्रियांना लागू करावे" असा एक ठराव कलकत्ता कॉंग्रेसनें ( १९१७ ) केला होता. या विषयाच्या जोडीचा दलित वर्गासंबंधाचा प्रश्न याच अधिवेशनांत विचारात घेण्यांत आला. "सत्य, न्याय व आवश्यकता या दृष्टीनें दलित वर्गावर रूढींनीं लादलेलीं सर्व त्रासदायक व जुलमी बंधनें काढून टाकण्यांत यावीं" असा एक ठराव याच अधिवेशनांत करण्यांत आला.

## १५ किरकोळ प्रश्न–ब्रह्मदेश

शिक्षण( प्राथमिक, उच्च, संशोधनात्मक व औद्योगिक ), प्रांतिक व हिंदुस्थान सरकारचा महसूल, चादीवरील कर, प्राप्तीवरील कर, हुंडणावळीचे फायदे, स्थानिक स्वराज्य, कलकत्ता व मद्रास कॉरपोरेशन, आरोग्य, प्लेग व कारंटाइन, बिगारीची पद्धति, वगैरे अनेक विषयांसंबंधानें कॉंग्रेसनें वेळोवेळीं ठराव केले. राजनिष्ठेचेही ठरावही वेळोवेळीं पास होत. व्हिक्टोरिया व एडवर्ड यांच्या निधनाच्या प्रसंगीं कॉंग्रेसनें आपली राजनिष्ठा व्यक्त केली. किंग एडवर्ड व किंग जॉर्ज, प्रिन्स ऑफ वेल्स या नात्यानें १९०५ व राजे या नात्यानें १९१० त, हिंदुस्थानांत आले त्या वेळी कॉंग्रेसनें त्यांचें स्वागत केलें.

ब्रह्मदेशच्या विभक्तीकरणासंबंधानें आज रणें माजून राहिलीं आहेत. ब्रह्मदेश खालसा करून तो हिंदुस्थानास जोडण्यांत आला, त्या वेळीं अगदीं पहिल्या अधिवेशनांत ( १८८५ ) यासंबंधांत पुढील ठराव करण्यांत आला :—

"उत्तर ब्रह्मदेश खालसा करण्यांत आला याबद्दल ही कॉंग्रेस आपली नापसंती दर्शवीत असून हा देश खालसा करणें अपरिहार्यच असेल तर अखिल ब्रह्मदेश हिंदुस्थानापासून विभक्त करावा व या देशाची सिलोनप्रमाणें हिंदुस्थानशीं कोणत्याही बाबतींत संबंध नसलेली क्राऊन कॉलनी बनवावी."

## १६ कॉंग्रेसघटना

कॉंग्रेसच्या घटनेमध्यें ५० वें वर्षी जे आमूलाग्र बदल घडून आले आहेत त्यामुळें या प्रश्नाकडे विशेष लक्ष वेधलें आहे. जॉइंट स्टॉक कंपनीप्रमाणें किंवा १८६० च्या १९ व्या कायद्यान्वयें रजिस्टर झालेल्या सोसायटीप्रमाणें कॉंग्रेसला सुरुवात झालेली नाहीं ही गोष्ट सर्वश्रुत आहे. कांहीं थोड्या सुप्रसिद्ध लोकांची ही एक खाजगी स्वरूपाची बैठक होत

राष्ट्रीय भावनेनें इतकी भारून गेली होती कीं, कॉंग्रेसच्या संघटनेचें जाळें सर्व देशभर पसरण्याकरितां व प्रांताप्रांतांतून प्रांतिक परिषदा भरविण्याकरितां प्रांतिक कॉंग्रेस कमिट्या नेमाव्या व अखंड व नेटाचें कार्य करण्याकरितां या प्रां. कॉं. कमिट्यांनीं जिल्हा मंडळें नेमावीं, असें ठरविण्यांत आलें. अध्यक्षांच्या निवडणुकीच्या पद्धतीसंबंधानेंही ह्या कॉंग्रेसमध्यें दुरुस्ती करण्यांत आली. प्रांतिक कमिट्यांनीं सुचविलेल्या अध्यक्षांपैकीं ज्याला बहुमत मिळालें असेल त्याची निवडणूक स्वागत कमिटीनें तीन चतुर्थांश बहुमतानें करावी व तें न जमल्यास मध्यवर्ती स्टॅंडिंग कमिटीनें अखेर निर्णय द्यावा असें ठरविण्यांत आलें. विषयनियामक कमिटी नेमण्याची नूतन पद्धतिही याच कॉंग्रेसमध्यें निश्चित करण्यांत आली. विषयनियामक कमिटींत ५८ लोक प्रांतवार प्रतिनिधींनीं निवडलेले असावे. ज्या प्रांतांत कॉंग्रेस भरत असेल तेथील १० जादा सभासद स्वागत मंडळानें निवडावे. याशिवाय स्वयंसिद्ध म्हणून अध्यक्ष, माजी अध्यक्ष, स्वागतमंडळाचे अध्यक्ष, जनरल सेक्रेटरी व स्थानिक सेक्रेटरी यांचा समवेत व्हावा. सुरतेच्या कॉंग्रेसनंतर नेमस्तांनीं जें कन्व्हेन्शन भरविलें त्यांत कॉंग्रेसची घटना अधिक सक्त व नियमबद्ध करण्यात आली. अध्यक्षाची एकदां योग्य प्रकारें निवडणूक झाल्यानंतर त्याच्या निवडणुकीविरुद्ध कोणीही ब्र काढूं नये, असें ठरविण्यांत आलें. सुरतेच्या अधिवेशनाचे प्रसंगीं कॉंग्रेसचे 'क्रीड' कोणतें असावें ह्यासंबंधानेंच मुख्यतः वादविवाद चालू होता. सुरतेची कॉंग्रेस मोडल्यानतर दुसरे दिवशी २८ डिसेंबर १९०७ रोजीं भरलेल्या कन्व्हेन्शनमध्यें नेमस्तांनी ठरविलेल्या क्रीडवर सही केलेल्या लोकानींच तेवढा भाग घेतला होता. हें क्रीडच पुढें कॉंग्रेस घटनेंतील पहिलें कलम म्हणून प्रसिद्धीस आलें. ब्रिटिश साम्राज्यांतील स्वायत्त वसाहती जे स्वराज्याचे हक्क भोगीत आहेत, तशा प्रकारचे हक्क संपादन करणें व वसाहतींतील प्रजाजन साम्राज्यात राहून जे हक्क व जबाबदाऱ्या उपभोगतात ते बरोबरीच्या नात्यानें भोगणें हेंच इंडियन नॅशनल कॉंग्रेसचें ध्येय आहे, असें ह्या पहिल्या कलमामध्यें नमूद करण्यांत आलें होतें.

१९०८ सालीं ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटीची जी घटना करण्यांत आली तींत पुढीलप्रमाणें प्रांतवार सभासद घेण्याचें ठरविलें गेलें. मद्रास १५, मुंबई

१५, संयुक्त बंगाल २०, संयुक्त प्रांत १५, पजाव (सरहद्द प्रांतासह) १३ मध्यप्रांत ७, विहार* ५, वऱ्हाड ५, ब्रम्हदेश २.

प्रांतातील प्रतिनिधींच्या एकूण संख्येपैकी एक पंचमांश सभासद मुसलमान असतील अशी शक्य तितकी काळजी घेण्यांत यावी, कॉंग्रेसचे सर्व माजी अध्यक्ष व ऑल इंडिया कॉंग्रेसचे सेक्रेटरी ह्यांना ऑ. इं. कॉ. कमिटीचे एक्स् ऑफिशिओ सभासद म्हणून समजण्यांत यावे, ऑ. इं. कॉ. कमिटीचे सभासदांचें विषय नियामक कमिटी बनवावी व तींत प्रांतनिहाय प्रतिनिधींनीं निवडून दिलेले काहीं लोक असावे. वरील ध्येय पुढील साधनांनीं प्राप्त करावे. राष्ट्रैक्यसंवर्धन करून जनसेवेची वृत्ति वाढवून आणि देशांतील बौद्धिक, नैतिक, आर्थिक व औद्योगिक साधनांची वाढ व संघटना करून चालू राज्यपद्धतींत बेतावेतानें सुधारणा घडवून आणावी असें ठरलें. जो ठराव तीन चतुर्थांश हिंदु किंवा मुसलमान सभासदांना नापसंत वाटेल तो वगळला जावा असें १९०८ च्या घटनेत होतें. या प्रतिबंधक नियमाचा उपयोग केल्याचा गमतीदार दाखला १८९९ मध्यें सांपडतो. तो पंजाब लॅंड एलिनेशन बिलासंबंधीं आहे.

पुढें १९१० पासून १९१५ पर्यंत कॉंग्रेसला काहींच काम करतां आलें नाहीं. १९१४ मध्यें महायुद्धाला सुरवात झाली. मिसेस बेझंट यानीं ऑल इंडिया होमरूल लीगच्या मार्फत राजकीय चळवळीला सुरवात केली. लोकमान्य टिळकानींही महाराष्ट्रामध्यें स्वतंत्र होमरूल लीग स्थापन केली. (२३ एप्रिल १९१६). या दोन्ही स्वराज्यसंघांच्या चळवळीमुळें कॉंग्रेसला पुन्हां महत्त्व प्राप्त झालें.

१९१५-१६ सालीं आंध्र प्रांताला स्वतंत्र कॉंग्रेस प्रांत समजण्यांत यावा किंवा नाहीं यासंबंधानें चर्चा झाली. १९१७ च्या कलकत्त्याच्या अधिवेशना-मध्यें आंध्र प्रांताचें स्वतंत्र अस्तित्व मान्य करण्यांत आलें. या बाबतींत कॉंग्रेसचें अध्यक्ष असलेल्या मिसेस बेझंट व तामीळ प्रतिनिधि यानीं विरोध केला. गांधीजींनींही नव्या सुधारणा अमलांत येईपर्यंत ह्या प्रश्नाचा विचार तहकूब

---

* ह्या घटनेप्रमाणें पूर्व बंगालचा भाग असलेल्या बिहारला कॉंग्रेसचा स्वतंत्र प्रांत म्हणून समजण्यांत येऊं लागले व बिहारमध्यें १९०८ सालीं पहिली प्रांतिक सभा भरली. सय्यद अल्ली इमाम (जे पुढें ' सर ' झाले) हे या परिषदेचे अध्यक्ष होते.

ठेवावा असें सांगितलें; परंतु लोकमान्य टिळक यांच्या दूरदर्शित्वामुळें आंध्र प्रांताला कॉंग्रेसचा प्रांत म्हणून स्वतंत्र अस्तित्व प्राप्त झालें. त्यांच्या अनुषंगानें ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटींत प्रांतवार प्रतिनिधींचें प्रमाण किती असावें, हें निश्चित करण्याकरितां एक सब्कमिटी नेमण्यांत आली. ह्यानंतर १९१८ सालीं सिंध प्रांतालाही स्वतंत्र कॉंग्रेस प्रांत म्हणून मानण्यांत येऊं लागलें. कर्नाटक व केरळ यांना मात्र १९२१ पर्यंत थांबावें लागलें. या वेळीं सर्व कॉंग्रेस प्रांतांची पुनर्घटना झाली.

## १९१८ पर्यंत दाद न लागलेल्या मागण्या

हिंदुस्थानची स्वराज्याची राष्ट्रीय मागणी केवळ भावनामय नव्हती. हिंदुस्थानच्या आजच्या राजकीय परिस्थितींत कोणत्याही सुधारणा होणें शक्य नाहीं, आपण ज्या मागण्या सरकारपुढें मांडतों किंवा सरकारच्या ज्या कृत्यांचा आपण निषेध करतों त्यांबद्दल कांहींच विचार करण्यांत येत नाहीं असें ३२ वर्षांचे अनुभवावरून कॉंग्रेसला कळून चुकलें होतें. १९१८ पर्यंत ज्या मागण्या हिंदुस्थान सरकारच्या व प्रांतिक सरकारच्या विरोधामुळें प्राप्त झाल्या नाहींत त्या पुढीलप्रमाणें होत्या; (१) इंडिया कौन्सिल रद्द करणें–१८८५ (२) एकाच वेळीं आय. सी. एस. परिक्षा, १८८५ (३) इंग्लंड व हिंदुस्थान ह्यांचें बाबतींत लष्करी खर्चासंबधीं न्याय्य विभागणी. (४) ज्यूरीपद्धतीची वाढ–१८८६ (५) ज्यूरीच्या निकालास मान्यता, –१८८६. (६) सेशन्स कोर्टाकडे आपला खटला नेण्याबद्दल वारंट केसेसमधल्या आरोपींना अर्ज करण्यास परवानगी, –१८८६. (७) न्याय व अमलबजावणी खात्यांची फारकत. (८) हिंदी लोकांना स्वयंसैनिक होण्याची परवानगी.–१८८७. (९) मिलिटरी कॉलेजची अधिकारी म्हणून नेमण्याबद्दल स्थापना–१८८७ (१०) हत्यारांचे कायद्यांत व नियमांत सुधारणा. (११) यांत्रिक व औद्योगिक शिक्षणाची तरतूद,–१८८८. (१२) जमिन महसूलाच्या पद्धतींची सुधारणा, –१८८९. (१३) चलनाचें धोरण, –१८९२. (१४) हिंदुस्थानांत स्वतंत्र सिव्हिल मेडिकल सर्विसची योजना. (१५) एक्सचेंज कोंपेन्सेशन अलाऊन्स रद्द करणें,–१८९३. (१६) वेठबिगारीची व रसदीची पद्धत नष्ट करणें,–१८९३. (१७) होम चार्जेस कमी करणें. (१८) कॉटन एक्साईज ड्यूटी रद्द करणें–१८९३. (१९) न्याय खात्यांतील वरिष्ठ जागांवर वकील वर्गांतील इसमांची नेमणूक.

( २० ) वसाहतींतील हिंदी लोकांची परिस्थिति, –१८९४. ( २१ ) हिंदी संस्थानांतील वर्तमानपत्रांसंबंधींचें हिंदुस्थान सरकारचें नोटिफिकेशन रद्द करणें. ( २२ ) शेतकऱ्यांची कर्जमुक्तता, –१८९५. ( २३ ) तिसऱ्या वर्गाच्या उतारूंची सोय, –१८९५. ( २४ ) प्रांताकरितां आर्थिक स्वातंत्र्य –१८९६. (२५) शिक्षण खात्यांतील वरिष्ठ नोकऱ्यांची योग्य अशी पुनर्घटना, –१८९६. (२६) बंगाल, मद्रास, मुंबई रेग्युलेशन (अनुक्रमें १८१८।१९।२७) रद्द करणें–१८९७. ( २७ ) –१८९८ चा राजद्रोहाचा कायदा. ( २८ )–१८९८ चा क्रीमिनल प्रोसिजर कोड अमेंडमेंट ॲक्ट ( २९ ) कलकत्ता म्युनिसिपल ॲक्ट,–१८९९. ( ३० ) पंजाब लॅन्ड ॲलिनेशन ॲक्ट,–१९००. (३१) हिंदी जनतेची आर्थिक पहाणी १९०० ( ३२ ) हलक्या हलक्या मुलकी नोकऱ्यांत हिंदी लोकांची मोठ्या प्रमाणात नेमणूक. ( ३३ ) पी. डब्ल्यू. डी.मधील वरिष्ठ जागांवर हिंदी लोकांची नेमणूक. ( ३४ ) पोलीस खात्यांतील वरिष्ठ जागांवर हिंदी लोकांची नेमणूक. ( ३५ ) लष्करावरील कॅपिटेशनचा खर्च. –१९१०. (३६) इंडियन युनिव्हर्सिटी कमिशनच्या शिफारसी, –१९०२. ( ३७ ) इंडियन युनिव्हर्सिटी शिफारसी ॲक्ट, –१९०४. ( ३८ ) ऑफिशिअल सीक्रेट ॲक्ट, –१९०४. ( ३९ ) इंडियन ऑफिसचा खर्च व स्टेट सेक्रेटरीचा पगार, –१९१०. ( ४० ) हिंदुस्थानचे परिस्थितीसंबंधानें पार्लमेंटमध्यें चौकशी. –१९०५. ( ४१ ) स्थानिक स्वराज्याच्या हक्कांत सुधारणा, –१९०५. ( ४२ ) क्रिमिनल लॉ अमेंडमेंट ॲक्ट, –१९०८. ( ४३ ) न्यूज पेपर्स ॲक्ट, –१९०८, ( ४४ ) सक्तीचे मोफत प्राथमिक शिक्षण, –१९०८. ( ४५ ) कायदेमंडळाच्या नियमाची सुधारणा, –१९०९. ( ४६ ) सरहद्द प्रांताच्या कारभारासंबंधीं चौकशी, –१९०९, ( ४७ ) लॉ मेंबरची जागा ॲडव्होकेट्स् वकीलाना देणें, –१९१०. ( ४८ ) सिडिशस् मिटींगज् ॲक्ट, –१९१०. ( ४९ ) इंडियन प्रेस ॲक्ट, –१९१०. (५०) राज्यकारभाराच्या वाढत्या खर्चाची चौकशी, –१९१०. (५१) राजकीय कैद्यांची सुक्तता, –१९१०. ( ५२ ) गोखले यांचें प्राथमिक शिक्षण बिल, –१९१०. (५३) संयुक्त प्रांतावर गव्हर्नर इन् कौन्सिलची नेमणूक—१९११. ( ५४ ) पंजाबमध्यें एक्झीक्यूटिव्ह कौन्सिलची घटना, ( ५५ ) इंडिया कौन्सिलची सुधारणा, –१९१३. ( ५६ ) इंग्लंडमधील हिंदी विद्यार्थी. –१९१५.

---

## प्रकरण तिसरें

# कॉंग्रेसचें आरंभींचें स्वरूप

——:*:——

कॉंग्रेसची स्थापना होऊन आतां ५० वर्षें लोटली आहेत. या दीर्घ कालांत तिच्यांत अनेक स्थित्यंतरें झालीं आहेत. १८८५ ते १९१५ व पुढें १९२१ पर्यंत देखील कॉंग्रेसने जे कार्यक्रम आंखले ते कॉंग्रेसमधील निरनिराळ्या विचाराच्या पक्षांच्या लोकाना सामान्यतः संमत असेच होते. या कालांत दिसून आलेले मतभेदही फारसे महत्वाचे नव्हते. चढाईचें धोरण स्वीकारावें कां बचावाचें धोरण स्वीकारावें, प्रार्थना कराव्या का निषेध करावा, शत्रू आपल्या गोटांत येईपर्यंत धीमेपणानें आपल्या हालचाली बदलत राहून लढत राहावें किंवा संधीचा फायदा घेऊन शत्रूवर एकदम हल्ला चढवावा व त्याला न कळत घेरून टाकावें, या सर्व डावपेचांचा विचार राजकीय लढा चालविणाऱ्यांचीं डोकीं शिणवून टाकतो. चळवळ करायची असेल तर ती शब्दाची का कृतीची आणि कृतीची असेल तर प्रत्यक्ष कां अप्रत्यक्ष, हेही प्रश्न पुढाऱ्यांना सोडवावे लागतात. राजकीय लढ्याच्या एका अवस्थेतून दुसऱ्या अवस्थेंत पदार्पण करण्यास दशकानुदशकें लागत असतात. कॉंग्रेसनें दीर्घकालपर्यंत चालविलेल्या या लढ्यांत तिच्यावर जे प्रसंग आले त्याचा विचार केला असता वरील गोष्टच अनुभवास येते. पन्नास वर्षें सारखा चिकाटीनें लढा चालविल्यानंतर आज ज्या गोष्टी आपल्याला अगदीं साध्या व सोप्या वाटतात त्याची कल्पनाही सुद्धा ज्यानीं कॉंग्रेसला प्रथम सुरवात केली त्या आपल्या पूर्वजाना आली नसती. समजा, परदेशी मालावर बहिष्कार, शाळा, कॉलेजें, कोर्टें, कौंसिलें याच्यावर बहिष्कार किंवा कांहीं निवडक कायद्याचा भंग करणें अशा सूचना डब्ल्यू. सी. बानर्जी, सुरेंद्रनाथ बानर्जी, सर फेरोजशहा मेथा, पं. अयोद्धयानाथ, लालमोहन घोष, मनमोहन घोष, सुब्रह्मण्य अय्यर, आनंदाचार्लू, ह्यूम, वेडरबर्न यांच्यापुढें मांडण्यांत आल्या असत्या तर त्यांना अशा कल्पनानीं धक्काच बसला असता. तसेंच बंगालची फाळणी, कर्झन व मिंटो यांचें प्रतिगामी धोरण, गांधीजींचे दक्षिण आफ्रिकेंतील अनुभव व जालियनवाला बागेंतील कत्तल हे प्रसंग घडून येण्यापूर्वी असले जहाल कार्यक्रम राष्ट्रापुढें ठेवताही आले नसते.

कॉंग्रेसची सर्व चळवळ पहिल्या पंधरा वर्षांत मुख्यत. मोठमोठ्या नामांकित विद्वान् वकीलांनींच चालविली होती; कांहीं थोडे डॉक्टर व व्यापारीही कॉंग्रेस-मध्यें त्या वेळीं होते. आपलें म्हणणें गोड व समतोल भाषेंत इंग्रजांपुढें व पार्लेमेंटपुढें मांडण्याकरितां एखादी राजकीय संस्था या मंडळींना पाहिजे होती. राष्ट्राचीं गाऱ्हाणी व त्याच्या आकांक्षा राज्यकर्त्यांपुढें या संस्थेतर्फे संघटितपणें मांडल्यास त्याचा विचार झाल्याशिवाय राहणार नाहीं असा पूर्ण विश्वास या मंडळींना वाटत होता. इंग्रज लोक हे स्वभावत:च न्यायप्रिय व विचारी आहेत व आमच्यावर होत असलेले अन्याय त्यांना योग्य प्रकारें कळल्यास सत्य व न्याय यांपासून ते ढळावयाचे नाहींत. त्या वेळीं मुख्य प्रश्न ॲंग्लो इंडियनांचा होता, इंग्लिशांचा नव्हता. इंग्रज व्यक्तीश: सच्चा व प्रामाणिक आहे, जे कांहीं दोष आहेत ते राज्यपद्धतींत आहेत. कॉंग्रेस राजनिष्ठ आहे. हिंदी नोकरशाहीशींच काय तें तिचे पटत नाहीं. इंग्लिश पार्लमेंट लोकसत्तेची जननी आहे. ब्रिटिश राज्यपद्धती सर्वांत उत्तम आहे. कॉंग्रेस ही राजद्रोही संस्था नसून, हिंदी जनतेला जे काय वाटतें ते सरकारपुढे मांडणारी संस्था आहे. कॉंग्रेसनें मध्यस्थाची भूमिका स्वीकारली आहे. याप्रमाणे कॉंग्रेसमधील त्या वेळच्या पुढाऱ्यांची विचारसरणी होती व आपल्या भाषणातून असलेच विचार ते प्रकट करीत असत. हिंदी जनतेचें हित साधावयाचें या साध्या व सरळ हेतूनें ते प्रेरित झाले होते. म्हणूनच या हेतूला अनुरूप अशा अनेक मागण्या वेळोवेळीं त्यांनी राज्यकर्त्यांपुढें मांडल्या. १८९३ साली पं. मालवीयानीं ग्रामोद्योगाच्या पुनर्घटनेची कल्पना दूरदर्शीपणानें मांडली. हिंदी राजकीय सुधारणाचे प्रारंभींचे पुरस्कर्ते या नात्यानें त्यांच्या धोरणाबद्दल आपण त्यांना दोष देऊं शकत नाहीं. या लोकांना दोष देणें म्हणजे इमारतीच्या पायांत सहा फुटाखालीं गाडल्या गेलेल्या चुन्याला व दगडविटांना नांवें ठेवण्यासारखेंच आहे. कॉंग्रेसच्या पूर्वींच्या पुढाऱ्यांनी स्वार्थत्यागपूर्वक चिकाटीनें चळवळ चालू ठेवल्यामुळेच वसाहतीचें स्वराज्य, साम्राज्यांतर्गत होमरूल, स्वराज्य व त्या सर्वांवर पूर्ण स्वातंत्र्य असले मजल्यावर मजले उभारणें आज शक्य झालें आहे. आपल्या पूर्वजांच्या कार्याबद्दल आपण कृतज्ञ असले पाहिजे. त्यांनीं आपल्या शक्तीप्रमाणें व कल्पनेप्रमाणें स्वार्थत्यागही केले.

कॉंग्रेसच्या आरंभापासून १८८५ ते १९०५ पर्यंत इंग्रजांच्या न्यायबुद्धीवर पूर्ण विश्वास ठेवून सनदशीर मार्गानेंच कॉंग्रेसची चळवळ चालू होती. ब्रिटिश

अध्यक्ष झाले व हे के. टी. तेलंग असे तिघेही हायकोर्ट जज्ज झाले. मि. एन्. एम्. समर्थ, व बी. एन्. वसू हे दोघे सेक्रेटरी ऑफ स्टेटच्या कौन्सिलचे सभासद झाले. सर चिमणलाल सेटलवाड हे मुंबईच्या एक्झिक्यूटिव्ह कौन्सिलचे सभासद झाले. कलकत्त्यामध्यें मि. ए. चोधरी यांनीं बंगाल फाळणीविरुद्ध झालेल्या चळवळींत भाग घेतला; पण ते हायकोर्टचे जज्ज त्याच वेळीं झाले. हिं. सरकारच्या लॉ. मेंबरच्या जागेकरितां मि. जे. आशुतोष मुकर्जी व एस्. पी. सिंह यांचीं नांवें पुढें आलीं व एस्. पी. सिंह हे नेमस्त असले तरी कॉंग्रेसवाले आहेत, अशी लॉर्ड मिंटो यानीं शिफारस केली व त्यांना या जागेकरितां पसंत करण्यांत आलें. लॉर्ड चेल्म्सफर्ड यांनीं बरद्वानच्या महाराजांचें नांव सुचविलें पण मॉंटेग्यूनें वरिष्ट कौंसिलांत निवडून आलेल्या ना. शास्त्र्यांचें सुचविलें, पण चेल्म्सफर्डनीं ना. शास्त्री यांनीं ऐन वेळीं दगा दिला म्हणून बी. एन्. शर्मांना पसंत केलें. तसेंच हिं. सरकारच्या एक्झिक्यूटिव्ह कौंसिलमध्यें १९२० सालीं जागा रिकामी झाली. त्या वेळीं मि. बी. एन्. शर्मा यांना ही जागा देण्याचें कारण अमृतसर प्रकरणाच्या बाबतींत लॉर्ड चेल्म्सफर्ड यांच्या मनाप्रमाणें त्यांनीं कामगिरी केली होती. बंगालमधील मि. एस्. आर. दास व सर प्रवेशचंद्र मित्र या कॉंग्रेसवाल्यांना बंगालच्या ए. कौंसिलमध्यें सभासदांच्या जागा मिळाल्या व दास यांना लॉ मेंबरही करण्यांत आलें. सं. प्रांतांतले सर तेज बहादूर सप्रू हे हिं. सरकारचे लॉ मेंबर झाले. बिहारचे सय्यद हसन इमाम यांनीं १९१२ सालीं पाटण्याला कॉंग्रेस बोलावली व ते हायकोर्ट जज्ज झाले. सर सच्चिनानंद सिंह बिहार ए. कौंसिलचे सभासद झाले. कॉंग्रेसवाल्यांनीं बजावलेल्या कामगिरीकरितां मोठमोठ्या नोकऱ्या देऊनच सरकार त्यांचा गौरव करीत नव्हते तर मोठमोठ्या पदव्याही त्यांना देत होते. सर फिरोजशहा यांचें उदाहरण यांपैकींच होतें. त्यांना लॉर्ड कर्झनसारख्या व्हाईसरॉयनींही पदवी १९०५ मध्यें दिली. ना. गोखले यांनीं सरकारनें दिलेली 'सर'ची पदवी स्वीकारली नाहीं किंवा ए. कौं. मधील जागाही स्वीकारली नसती. त्यांना हिंदुस्थानचे साधे सेवक म्हणवून घेणें जास्त आवडलें. त्यांना सी. आय. इ. केलें नसतें तर अधिक आनंद झाला असता. मि. शास्त्री यांना युद्धाचे वेळीं लॉर्ड पेंटलंड यांनीं मद्रास कायदे कौंसिलांत सरकारनियुक्त सभासदांची जागा दिली. नंतर असेंब्लींत नेमलें. साम्राज्यपरिषदेस १९२१ सालीं हिंदुस्थानचे प्रतिनिधि म्हणून त्यांना सरकारनें

पाठविलें, पुढें लवकरच ते प्रीव्ही कौंसिलर झाले. नंतर ते अमेरिकेंत गेले व तेथें हिंदुस्थान आणि ब्रिटिश साम्राज्य या विषयावर त्यांनीं व्याख्यानें दिलीं. दक्षिण आफ्रिकेशिवाय बाकीच्या वसाहतींनी त्यांना पाचारण केलें. हिंदुस्थान सरकारनें त्यांच्या खर्चाकरितां रु. ६०००० मंजूर केले. पुढें त्यांना आफ्रिकेचे एजंट जनरल नेमून मागील वचपा काढण्यांत आला. अशा प्रकारें नाकारलेला दगड पुढें साम्राज्याच्या पायाचा दगड झाला. ही सर्व मंडळी शिक्षण, संस्कृति व चारित्र्य या दृष्टीनें कमी प्रतीची होती व या सरकारी वरिष्ठ जागांना लायक नव्हती असें कोणीं समजूं नये. सरकारला चांगलीं माणसें ज्या ज्या वेळीं लागलीं त्या त्या वेळीं त्याला कॉंग्रेसकडे पहावें लागलें एवढीच गोष्ट या सर्व उदाहरणांवरून सिद्ध झाली आहे.

---

# प्रकरण चौथें

# काँग्रेसच्या चळवळीला ब्रिटनचा विरोध

—:※:—

## नव्या शक्ति व नवे पक्ष यांची उभारणी

हिंदुस्थानांतील ब्रिटिश राज्याचा इतिहास म्हणजे दडपशाही व सुधारणा यांचा इतिहास होय. लोकांना चांगलें झोडपून काढल्याशिवाय त्यांना कांहीं सवलती द्यावयाच्या नाहीत किंवा त्यांच्या मागण्या मान्य करावयाच्या नाहींत असाच ब्रिटिश राज्यकर्त्यांचा दंडक आहे. १८७० मधला लॉर्ड लिटन यांचा प्रेस ॲक्ट पुढें लवकरच मागें घेण्यांत आला व ब्रि. राज्याच्या वरील धोरणाला येथूनच आरंभ झाला. राष्ट्राच्या वाढत्या जागृतीला हत्याराच्या कायद्यानें उत्तर देण्यांत आलें आणि हें दुखणें कायमचें होऊन बसलें. १८८६ सालीं इन्कमटॅक्स ॲक्ट करण्यांत आला त्या वेळीं लोकांनीं जोराचा विरोध केला. सालोसाल काँग्रेसची शक्ति जसजशी वाढत चालली तसतशी ती अधिकाऱ्यांच्या डोळ्यांत खुपूं लागली व तिच्याकडे शंकित दृष्टीनें ते पाहूं लागले. केवळ सामाजिक सुधारणेचें कार्य हातीं न घेतां राजकीय संघटनेचें कार्य काँग्रेसनें करावें असा सल्ला लॉर्ड डफरिन यांनीं मि. ह्यूम यांना दिला व तेच स्वतः काँग्रेसचे उघड शत्रू झाले व ती राजद्रोही संस्था आहे असा त्यांनीं अभिप्राय दिला. प्रांतिक गव्हर्नर तर पुढें पुढें काँग्रेसला विरोध करूं लागले. सं. प्रांताचे गव्हर्नर सर ऑकलंड कॉल्व्हिन यांच्यासारख्यांनी काँग्रेसनें सामाजिक सुधारणांकडेच लक्ष द्यावें असा सल्ला दिला! काँग्रेसची चळवळ ही अकालीं असून ती भयप्रदही आहे असें आपलें मत त्यांनीं प्रकट केलें. निषेधात्मक धोरणामुळें राजनिष्ठ व राष्ट्रीय यांच्यांत ती द्वेषाची भावना उत्पन्न करीत आहे असें त्यांचें म्हणणें होतें. द्वेष तर प्रथमच निर्माण झाला आहे व तो शमविण्याची आवश्यकता भासूं लागली आहे असें मि. ह्यूम यांनीं त्याना उत्तर दिलें. मुसलमान काँग्रेसच्या विरुद्ध आहेत असें उठवून हिंदु-मुसलमानांत फूट पाडण्याचा प्रयत्न यावेळीं कांहीं चुकीचा सल्ला मिळालेल्या अधिकाऱ्यांकडून करण्यांत आला. हिंदूंपेक्षां मुसलमान कमी दर्जाचे आहेत असें जेव्हां या

रा. ब. आनंदाचार्लू.
१८९१ नागपूर कॉंग्रेसचे अध्यक्ष.

आल्फ्रेड वेब.
१८९४ मद्रास कॉंग्रेसचे अध्यक्ष.

सुरेंद्रनाथ बानर्जी.
१८९५ पुणे व १९०६ अमदाबाद कॉंग्रेसचे अध्यक्ष.

रहिमतुल्ला सयानी.
१८९६ कलकत्ता कॉंग्रेसचे अध्यक्ष.

सर शंकरन् नायर.
१८९७ उमरावती कॉंग्रेसचे अध्यक्ष.

आनंदमोहन बोस.
१८९८ मद्रास कॉंग्रेसचे ·

अधिकाऱ्यांपैकीं कांहीं लोक म्हणू लागले त्या वेळीं सर सालरजंग, जस्टिस बद्रुद्दिन तय्यबजी, जस्टिस सय्यद महंमद यांची उदाहरणे देऊन मि. ह्यूम यांनीं त्याची तोंडें बंद केलीं. कॉंग्रेस हिंदुस्थानची प्रतिनिधी नाहीं या आक्षेपाला इंग्लंडचाच दाखला देऊन त्यांनी उत्तर दिलें. पार्लमेंटची निवडणूक होते त्या वेळी अबर्डीन-सारख्या मतदारसंघात लोकसंख्येपैकीं एक दशांश लोकच तेवढे मतें देतात व कांहीं जागा तर विकल्याही जातात असें त्यांनीं दाखवून दिलें. आत्मिक, नैतिक, सामाजिक व राजकीय दृष्टीनें राष्ट्राचा पुनरुद्धार करण्याचा कॉंग्रेसचा उद्देश आहे. कॉंग्रेसची चळवळ अकालपक्व व दुष्टपणाची नाहीं, उलट अधिकाऱ्यांच्या भोवतीं स्वार्थी व खुषमस्कऱ्या लोकांचा गराडा असल्यामुळें खरें लोकमत त्यांना कळत नाहीं असें मि. ह्यूम यांनी प्रतिपादन केलें. या अधिकाऱ्यांची बुरबोन लोकांशीं तुलना करून त्यांना डोळे असून दिसत नाहीं व कान असून ऐकूं येत नाही असें मि. वेडरबर्न यांनींही म्हटलें होतें.

अलाहाबाद येथें झालेल्या चौथ्या कॉंग्रेसच्या मार्गांत तर अनपेक्षित अड-चणी आल्या. तंबू ठोकण्याकरितांही त्यांना जागा मिळाली नाहीं. जिल्हाधिकाऱ्या-ला न मानतां मद्रास कॉंग्रेसला (१८८७) एक गृहस्थ हजर राहिले; पण त्याच्या-कडून २० हजाराचा जामीन शांततारक्षणाकरिता घेतला ही गोष्ट मिसेस बेझंट यांनीं आपल्या कॉंग्रेसवरील पुस्तकांत नमूद केली आहे. १८९० सालीं सरकारी नोकरांनीं कॉंग्रेससारख्या सभाना हजर राहूं नये असें सर्क्यूलर बंगाल सरकारनें काढलें. गव्हर्नरांच्या प्रायव्हेट सेक्रेटरींना पाठविण्यांत आलेलीं कॉंग्रेसचीं सात निमंत्रणकार्डें परत पाठविण्यांत आलीं. २५ जून १८९१ रोजीं संस्थानांतील वर्तमानपत्रांची गळचेपी करणारें एक नोटिफिकेशन हिंदुस्थान सरकारने काढलें. " पोलिटिकल एजंटाच्या परवानगीशिवाय संस्थानच्या हद्दींत वर्तमानपत्र किंवा बातम्या व त्यावर टीका असलेला मजकूर असलेलें दुसरें कांहींही छापूं नये व प्रसिद्ध केलें जाऊं नये. हा हुकूम मोडणारास ७ दिवसांचें आत हद्दपारीची शिक्षा दिली जाईल, व त्याला परवानगीशिवाय परत येतां येणार नाहीं. " अशा आशयाचें हें नोटिफिकेशन होतें. १८९२ सालीं कायदेमंडळांतून मद्रास ७, मुंबई ६ आणि बंगाल ७ असे लोकप्रतिनिधी घेण्यांत आले आणि दुसरीकडे सरकारी नोकऱ्यांच्या बाबतींत हिंदी लोकांना मिळालेल्या सवलती काढून घेण्यांत आल्या. शिक्षणखात्यांत युरोपियन व हिंदी यांच्यामधील ग्रेडमध्यें

भेदाभेद नव्हते, पण पुढें हिंदी लोकांचा दर्जा कमी करण्यांत आला व पगारही कमी करण्यांत आला. त्याच वेळीं युरोपियन ऑफिसरांना एक्सचेंज कॉंपेन्सेशन अलावन्स देण्यांत आला. सरकारच्या या कृत्याला २६ जून १८९३ चा गुन्हा असें लो. टिळक यांनीं म्हटलें आहे. ३० वर्षांत होमचार्जेसच्या नांवाखालीं चालू असलेलें द्रव्यशोषण ७० लाख पौंडांपासून १ कोटी ६० लाख पौंडांपर्यंत वाढलें. १२४ ( अ ) व १५३ ( अ ) ही कलमें नवीन बनाविण्यांत आलीं. १०८ व १४४ हीं कलमें राजकारणी लोकाना प्रथम लावण्यांत आली. गुप्त प्रेसकमिटया स्थापण्यांत आल्या. "या प्रेसकमिटया म्हणजे झिरझिरीत बुरखा घेतलेली सेन्सारशिपच आहे, व ती हिंदुस्थानची बदनामी करणारी आहे" असें याबाबत आलेल्या ठरावाला दुजोरा देतांना लो. टिळकांचे विद्वान व पटाईत उजवे हात श्री. केळकर यांनीं सांगितलें. "राजनिष्ठा म्हणजे काय याचा नमुना जर तुम्हाला पाहावयाचा असेल तर इंग्रजांनीं चालविलेल्या वर्तमान-पत्राकडे पहा" असे सर जेम्स फिट्झ् जेम्स स्टीफन यांनीं उद्गार काढले होते, याचा दाखला मि. मुधोळकर यानीं आपल्या भाषणांत दिला ( १८९७ ). प्लेगच्या दंग्याबाबत नातूबंधूना १८९७ सालीं पकडलें व १८९९ सालीं त्यांना मुक्त केलें. लॉर्ड कर्झन यांची कारकीर्द तर फारच त्रासाची गेली. कलकत्ता कॉरपोरेशनचे अधिकार त्यांनीं कमी केले. ऑफीशिअल सीक्रेट ॲक्ट त्यांनीं मंजूर केला. विश्वविद्यालयांना सरकारी खात्याचें स्वरुप देऊन त्यांनीं शिक्षण महाग केलें. हिंदी जनतेवर त्यांनीं अप्रामाणिकपणाचे आरोप केले. तिबेटचें मिशन या नांवाखालीं त्यानीं तिबेटवर स्वारी केली, आणि शेवटीं बंगालची फाळणी करून त्यांनीं राजनिष्ठ हिंदुस्थानचें कवरडेंच मोडलें व नवचैतन्य निर्माण केलें. लॉर्ड कर्झन यांनीं पुराणवस्तुसंरक्षक कायदा केला व *अत्याचारी कृत्याबद्दल त्यानीं रंगूनमधील एका ( गोऱ्या ) पलटणीला शिक्षा दिली, असलीं कांहीं थोडीं चांगलीं कृत्यें लॉर्ड कर्झन यानीं

---

* १८९९ मध्यें रंगून येथील ब्रिटिश पलटणींतील दोन शिपायांनीं एका हिंदी स्त्रीवर बलात्कार केला व त्यामुळें ती मरण पावली. १९०० सालीं आपल्याला बायका पुरविल्या नाहींत म्हणून शियालकोटमधील ९ व्या लॅन्सर तुकडींतील दोघां शिपायांनीं एका स्वैपाक्याला ठार मारलें. पलटणींतील शिपायां-तील एकीमुळें या दोन्ही गुन्ह्यांतील गुन्हेगार सांपडले नाहींत.

केलीं. पण एकंदरीत त्याच्या कारकीर्दीमुळें राष्ट्रीय चळवळीला तीव्र स्वरूप प्राप्त झालें. सरकारी दडपशाहीला ऊत आला. सभांना व मिरवणुकींना बंदी करण्यांत आली. सर्वत्र हरताळ पडले. राजकारणांत भाग घेतल्याबद्दल विद्यार्थ्यांना शिक्षा देण्यांत आल्या. "जरूर तर रक्तपातही करण्यांत येईल" अशी धमकी बॅम्फील्ड फुलर यांनीं एके प्रसंगीं दिली, आणि लगेच पूर्व बंगालमध्यें गुरख्यांची पलटण येऊन दाखल झाली आहे अशी बातमी पसरली. "हें सर्व केव्हां तर अत्याचाराचें यत्किंचितही चिन्ह दिसत नसताना," असें पं. मालवीय यांनींही बोलून दाखविलें होतें. पण चेंडू जितका जोरानें आपटावा तितकाच जोरानें तो उंच उडतो व नगारा जितका जोरानें वाजवावा तितका त्याचा आवाजही मोठा होतो, त्याप्रमाणें या दडपशाहीचे पुनःपुन्हा कितीही आघात झाले तरी १९०५–६ सालीं उत्पन्न झालेली राष्ट्रीय भावना जोरानें फोफावली व तिचे पडसाद सर्व देशभर उठले. बंगालची चळवळ ती सर्व राष्ट्राची चळवळ अशी वृत्ति राष्ट्रांत उत्पन्न झाली. ' कनॉल कॉलनाइझेशन " बिलामुळें पंजाबमधील जनतेचीं मनें प्रक्षुब्ध झालीं व त्याचा परिणाम पुढें लाला लजपतराय व सरदार अजितसिंग यांच्या हद्दपारींत झाला. कलकत्ता कॉंग्रेसच्या अध्यक्षपदाकरितां पितामह दादाभाई नवरोजी यांची अगदीं यथायोग्य योजना झाली. दादाभाईनीं 'स्वराज्य' हें हिंदुस्थानचें ध्येय आहे असें ठरविल्याबरोबर अँग्लोइंडियनांचें पित्त अधिकच भडकलें. राजकीय सभांतून व मिरवणुकींतून भाग घेण्याची विद्यार्थ्यांना बंदी करण्यांत आल्यामुळें शाळा कॉलेजांवर बहिष्कावर घालण्याची चळवळ सुरू झाली व बंगालमध्यें माजी न्यायाधीश सर गुरुदास बानर्जी यांच्या पुरस्कर्तृत्वाखालीं 'वंग जातीय विद्या परिषद' नांवाची राष्ट्रीय शिक्षण संस्था स्थापन झाली व तिच्या विद्यमानें २४ राष्ट्रीय शाळा काढण्यांत आल्या. बाबू सतीशचंद्र मुकर्जी हे या संस्थेचे प्रिन्सिपाल होते. बाबू बिपिनचंद्र पाल यांनीं १९०३-०४ सालापासून आपल्या 'न्यू इंडिया' नांवाच्या साप्ताहिकाच्या द्वारें राष्ट्रीय जागृतीचें उत्तम काम चालविलें होतें. ते राष्ट्रीयत्वाचे प्राण बनले. १९०७ मधील आंध्र देशांतील त्यांच्या दौऱ्याला कल्पनातीत यश मिळालें. राजमहेंद्रीला ते गेले असतांना तेथील लोकांनीं नॅशनल हायस्कूल काढण्याचा निश्चय केला. ट्रेनिंग कॉलेजमधील विद्यार्थ्यांनीं त्यांना मानपत्र अर्पण केलें. या समारंभांत

पुढाकार घेतल्याबद्दल कांहीं विद्यार्थ्यांना कोढून टाकलें आणि हेच विद्यार्थी पुढें राष्ट्रीय चळवळीतील सैनिक बनले. याप्रमाणें सरकारचें वेलगामी दडपशाहीचें धोरणच हिंदुस्थानांत देशाभिमानी राष्ट्रीय लढवय्ये निर्माण करण्यास कारणीभूत झालें. मच्छलीपट्टम येथें १९०७ साली विपिनचंद्र पाल यांनी राष्ट्रीय शिक्षणाचें लावलेलें रोप लवकरच वाढलें, १९१७ व १९२१ साली अधिकच फोफावलें व त्याचा वृक्ष होऊन त्याला फुलेंफळें आलीं. १९०७ च्या या दिवसातच स्वदेशी, बहिष्कार व राष्ट्रीय शिक्षण या चळवळींना प्रत्यक्ष सुरुवात झाली. बंगाल, महाराष्ट्र, मध्यप्रांत, पंजाब, व आंध्र या प्रांतांतून राष्ट्रीय विद्यापीठें व राष्ट्रीय शाळा स्थापन झाल्या तर स्वदेशीचा सर्वत्र पसार झाला. हातमागाच्या धंद्याला उत्ते-जन मिळालें. परदेशी मालावरील बहिष्काराची चळवळ संघटित रीतीनें सुरू झाली. ७ आगस्ट १९०५ रोजीं बहिष्काराचा राष्ट्रीय ध्वज उभारण्यांत आला व १६ ऑक्टोबरप्रमाणें हा दिवसही दरसाल पाळण्यांत येऊं लागला. नवीन उत्साहानें राष्ट्राचें वातावरण भरून गेलें. याप्रमाणें राष्ट्रीय चैतन्याची ही नवीन ज्योत एकीकडे उद्दीपित होत होती तर सरकारची दडपशाहीही तिच्यावर आक्रमण करूं पाहात होती. आगस्ट १९०७ मध्यें हिंदुस्थानची परिस्थिति अत्यंत नाजूक बनली होती. लॉर्ड मिंटो निराश झाले होते व ना. गोखले यांच्यासारख्या पुढाऱ्यावद्दलही त्याना अविश्वास वाटूं लागला होता.

"मि. गोखले हे अंतःकरणानें प्रामाणिक आहेत पण अलीकडे त्यांनी जी भूमिका स्वीकारली आहे त्यामुळें त्यांच्यावद्दल मला वीट आला आहे" यावरून कांहीं राष्ट्रीय पुढारी दोन दगडांच्यामध्यें कसे सांपडले याची कल्पना येते असे त्यांनीं उद्गार काढले.

हिंदुस्थानच्या इतिहासाला निराळे वळण देणाऱ्या दोन प्रसिद्ध व्यक्ती यावेळीं बंगालमध्यें पुढें आल्या. त्यापैकीं बाबू विपिनचंद्र पाल याच्या कार्यासंबंधानें मागें उल्लेख करण्यात आला आहे. बाबू अरविंद घोष हेही कित्येक वर्षे हिंदु-स्थानच्या राजकीय आकाशांत तेजस्वी ताऱ्याप्रमाणें चमकले. त्याचा राष्ट्रीय शिक्षणाशीं असलेला प्रारंभीचा संबंध या शिक्षणाला भारदस्तपणा व आकर्षक-पणा आणण्यास कारणीभूत झाला. इंग्लंडमध्यें त्याचा जन्म झाला. इंग्रजी वाता-वरणांत ते वाढले व इंग्रजी शाळांतून व विश्वविद्यालयांतून त्यांचें शिक्षण झालें. घोड्यावर बसण्याच्या परीक्षेंत नापास झाल्यामुळें ते आय. सी. एस्.

होऊ शकले नाहींत. नंतर ते इतर युरोपियनांप्रमाणेंच बडोदा येथील शिक्षणसंस्थेंत रूजू होण्याकरितां हिंदुस्थानांत आले. एखादी उल्का अकस्मात एकाएकी चमकूं लागावी त्याप्रमाणें अरविंदच्या बुद्धितेजानें हिंदुस्थानचें वातावरण प्रकाशित झालें. आसेतुहिमाचल अखिल भारतवर्ष त्यांनीं राष्ट्रीय चैतन्यानें भारून टाकलें.

कृष्णकुमार मित्र, पुलिन बिहारी दास, शामसुंदर चक्रवर्ति, अश्विनीकुमार दत्त, मनोरंजन गुह, सुबोधचंद्र मलिक, सचींद्रप्रसाद बोस, सतीशचंद्र चतरजी, भूपेशचंद्र नाथ या नऊ पुढाऱ्यांना बंगालमधून या वेळीं हद्दपार करण्यांत आलें. बंगाली युवकांची संघटना करण्याचें कार्य हे पुढारी करीत होते. धैर्य व शरीरबलसंवर्धन ही त्या वेळच्या तरुणांचीं ध्येयें होतीं. याच्याउलट सर बॅम्फिल्ड फुल्लर यांचा दडपशाहीचा वरवंटा बंगालमधील सर्व चळवळी चिरडून टाकूं पाहात होता. १९०८ सालीं परिस्थिति कळसास पोंहोचली. त्या वेळीं वर्तमानपत्राच्या संपादकाना सर्वत्र पकडण्यात आलें. युगांतर, संध्या, वंदे मातरम् हीं पत्रें बंद पाडण्यांत आलीं. 'संध्या' पत्राचे संपादक ब्रह्मबांधव उपाध्याय हे कडवे देशाभिमानी पुढारी हॉस्पिटलमध्यें मरण पावले. अरविंद यांनाही या दिवसांत पुष्कळ कष्ट सोसावे लागले. त्याच्यावरही तीन खटले भरण्यांत आले. त्यानंतर अरविंदांनी ब्रिटिश मुलुखाचा त्याग केला. ते पाँदीचरीला गेले व तेथें त्यांनीं एक आश्रम स्थापन केला.

३० एप्रिल १९०८ रोजीं मुझफरपूर येथें केनेडी नावाच्या दोन स्त्रियांवर बॉंब पडले. मुझफरपूरचे डि. जज्ज मि. किंग्जफर्ड यांना ठार करण्याच्या हेतूनें हे बॉंब टाकण्यात आले होते. खुदीराम बोसनें हा गुन्हा केला व त्याला फाशी देण्यात आलें. खुदीराम बोस अवघा १८ वर्षांचा होता. त्याचे फोटो सर्व देशभर वाटण्यांत आले. युगांतर पत्रांत अत्याचाराच्या या पंथाचा उघड उघड उपदेश करण्यांत येत होता. स्वामी विवेकानंद याचे बंधू भूपेंद्रनाथ दत्त हे या पत्राचे संपादक होते. या तरुण संपादकाला लांब मुदतीची शिक्षा देण्यात आली. त्या वेळीं त्यांच्या आईला आनंद झाला आणि या आईचें अभिनंदन करण्याकरितां ५०० बंगाली स्त्रिया तिच्या घरी गेल्या होत्या. आपण तुरुंगात गेलों तर आपल्यामागें पत्राच्या संपादकाचें काम करण्यास ३० कोटी लोक आहेत असें या मुलानें कोर्टात जाहीर केलें. याप्रमाणें राजद्रोह व त्याबद्दल होणारी शिक्षा

दक्षिण आफ्रिका वगैरे ठिकाणीं असलेली करारबंद मजुरीची पद्धति नष्ट करून आपली कारकीर्द चिरस्मरणीय करून टाकली, पण त्यांची कारकीर्द अधिक चिरस्मरणीय होण्यास आणखी एक गोष्ट कारणीभूत झाली. २५ ऑगस्ट १९११ चा खलिता तयार करण्याचे कामीं त्यांनीच मेहनत घेतली. या खलित्यानें हिंदुस्थानांतील भावी सुधारणांचा पाया घातला गेला. भावी राष्ट्रीय पुनर्घटनेमध्यें प्रांतिक स्वायत्तता देण्याचे महत्त्वाचे हक्क त्यांनीं विनहरकत मान्य केले.

कॉंग्रेसच्या चळवळींना ह्याप्रमाणें यश आल्यावर सुरेन्द्रनाथ बानर्जी प्रभृतींनीं त्याबद्दल आनंद व्यक्त केला; तरी सभाबंदीचा कायदा, प्रेस ॲक्ट व क्रिमिनल लॉ अमेंडमेंट ॲक्ट (१९१०) हे लोकांच्या स्वातंत्र्यावर गदा आणणारे कायदे, तसेंच १८१८ चा ३ रा रेग्युलेशन व इतर प्रांतांतील याच प्रकारचे कायदे यांचा कॉंग्रेसला विसर पडला नाहीं. १०० वर्षांपूर्वीचा १८१८ चा जुना कायदा व तसेच इतर प्रांतिक कायदे अस्तित्वांत होतेच. १९०६-०८ सालीं या कायद्यान्वयें लोकांना सररहा हद्दपार केलेंच होतें. त्याचप्रमाणें हिंदी कापडावरील जकात कायमच होती. लोकमान्य टिळकांच्या सारखें राजबंदी अद्यापि तुरुंगांतच खितपत पडले होते. लो. टिळक मधुमेहग्रस्त, एकटे पण धाडसानें मंडालेला दिवस कंठीत होते. याच वेळीं गोखल्यांचें प्राथमिक शिक्षण बिल वरिष्ठ कायदे कौन्सिलापुढें विचाराकरितां मांडलेलें होतें. हें बिल पास होईल असा भरंवसा वाटत नव्हता. दक्षिण आफ्रिकेंतील स्थिति अद्याप बदलली नव्हती. सर्व देशानें हा प्रश्न हातीं घेऊन एक मोठी चळवळ करावी, असें कांहींचें म्हणणें होतें. १९११ सालीं अशी परिस्थिति होती. १९१२ सालीं राजकीय चळवळीचा हा ताण जरा सैल पडला; परंतु या वर्षी एक शोचनीय प्रकार घडून आला. लॉर्ड हार्डिंज याना ठार करण्याकरितां त्याच्यावर एक बॉंब टाकण्यात आला. पण ते थोडक्यात बचावले. १९१२ च्या अधिवेशनामध्यें (बांकीपूर) व्हाइसरॉयावर आलेल्या प्राणसंकटाबद्दल दुःख प्रदर्शित करण्यांत आलें व असल्या अत्याचारांबद्दल व्हाइसरॉयकडे तार पाठवून दुःख व संताप व्यक्त करण्यात आला. या प्रकारणानंतर मुद्रणस्वातंत्र्याची पुन्हां गळचेपी करण्यांत आली, तेव्हां स्वाभाविकच प्रेस ॲक्ट रद्द करण्याकरिता कॉंग्रेसनें १९१३ मध्यें जोराची मागणी केली. भूपेंद्रनाथ बसू यानीं मुद्रणस्वातंत्र्याच्या बाबतींत जीं स्थित्यंतरें घडून आलीं होतीं त्यांचें चांगलें वर्णन केलें आहे. १८३५ सालीं सर चार्लस मेटकॉफ

यांनीं हिंदी मुद्रणस्वातंत्र्यावरील सर्व निर्बंध कसे काढून टाकले; लॉर्ड लिटन यांनीं [ १८७८-७९ ] व्हर्नाक्युलर प्रेस ॲक्ट] मंजूर करून त्याची गळचेपी कशी केली; मि. ग्लॅडस्टन यांनीं या बाबतींत लक्ष घातल्यामुळें हा कायदा कसा रद्द करण्यांत आला; १८९१ सालीं संस्थानी मुलखांतील वर्तमानपत्रप्रसारावर कसे निर्बंध घालण्यांत आले याचा त्यांनी इतिहास सांगितला: मुद्रणस्वातंत्र्या-वर गदा घालणाऱ्या १९०८ च्या प्रेस ॲक्टनें तर कायदेबुकांत १९१० मध्यें कायमचें स्थान पटकावलें व या कायद्यान्वयें जुन्या वृत्तपत्रांकडून व छापखान्या-कडून ५०००रु. व नव्याकडून २००० रु. चा जामीन घेण्याचा अधिकार सरकारला मिळाला. छापखान्याची जागा बदलली, मुद्रण किंवा प्रकाशक तात्पुरता परगांवी गेलेला असला, प्रेसचा पहिला मालक मरण पावला किंवा त्याचा व्यवस्थापक बदलला कीं छापखान्याचें नवीन डिक्लेरेशन केलें पाहिजे, व या प्रत्येक प्रसंगीं नवीन नवीन जामिनाची रक्कम भरली पाहिजे. या कायद्यावर शेवटचा हात फिर-वणारे सर एस्. पी. सिंह हे लॉ मेंबर असतांना ही गोष्ट घडली. १९१४ सालीं महायुद्ध सुरू झाल्यावर या कायद्याचा धडधडीत दुरुपयोग करण्यात येऊं लागला. "Come over to Macedonia and help us" 'मॅसेडोनियांत या व आम्हाला मदत करा.' हें मि. महमदअल्ली याचे पत्रक कायद्याप्रमाणें कारण नस-तांना जप्त करण्यांत आलें. मनुष्याला आपल्या बुद्धिचातुर्याचा जितका उपयोग करतां येईल तितकें चातुर्य या कायद्याची भाषा तयार करण्याचे कामीं उपयो-गात आणलें आहे, असा कलकत्त्याच्या चीफ जज्जानीं अभिप्राय दिला. या कायद्याची व्याप्ती सर्वमान्य ठरलेल्या ग्रंथापर्यंत जाते. आपण राजद्रोह केला नाहीं तर तशी प्रवृत्तीसुद्धा आपली असणें शक्य नाहीं हें आरोपीनें शाबित केलें पाहिजे, असें या कायद्याचे स्वरूप असल्याचें चीफ जज्जांनीं सांगितले व महमद-अल्लींचा अर्ज काढून टाकला.

'न्यू इंडिया' च्या बाबतींत १९१७ सालीं मिसेस बेझंट यांचे २००० रु. जप्त झाले. त्या वेळच्या मद्रासच्या चीफ जज्जानीं ३ (१) हें कलम छापखाने चालविणाराना चांगलेंच दुर्बल बनवितें असे उद्गार काढले. प्रेस ॲक्टच्या बाबतींतील आपली गाऱ्हाणीं सरकारपुढें मांडण्याकरिता प्रेस असोसिएशनतर्फे मि. हॉर्निमन यांच्या पुरस्कर्तृत्वाखालीं पं. मालवीय, चिंतामणी, सच्चिदानंद सिंह वगैरे पुढाऱ्यांचें एक शिष्टमंडळ लॉर्ड चेल्मसफर्ड यांचेकडे गेलें

## प्रकरण पांचवें

# आमचे ब्रिटिश मित्र

—:※:—

१ जॉन ब्राइट. २ हेन्री फॉसेट. ३ ए. ओ. ह्यूम. ४ सर विल्यम वेडरबर्न. ५ चार्लस ब्रॅडलॉ. ६ डब्ल्यू ग्लॅडस्टन. ७ लॉर्ड नार्थब्रुक. ८ ड्यूक अरगाइल. ९ लॉर्ड स्टॅनले ऑफ अल्डर्ली. १० अर्डले नॉर्टन. ११ जनरल बूथ.

हिंदी राजकारणाची उत्क्रांति होत असतांना ब्रि. पार्लमेंटच्या कांहीं सभासदांनीं व इतर काहीं प्रसिद्ध इंग्रज गृहस्थांनीं हिंदुस्थानच्या बावतींत महत्त्वाची कामगिरी केली आहे. जॉन ब्राइट हे यापैकीं अगदीं पहिले गृहस्थ होत. मि. ब्राइट यांनीं १८४७ सालीं पार्लमेंटमध्यें प्रवेश केला, आणि तेव्हांपासून १८८० पर्यंत हिंदुस्थानांतील राजकीय घडामोडींकडे त्यांचें सारखे लक्ष होतें.

मि. फॉसेट यांनीं १८६५ सालीं पार्लमेंटमध्यें प्रवेश केला. १८६८सालीं आय. सी. एस्. च्या एकाच वेळच्या परीक्षासंबंधाचा ठराव त्यानीं पार्लमेंटपुढें मांडला. तुर्कस्थानच्या सुलतानाला रिझविण्याकरितां लॉर्ड सॉल्सबरी यांनीं हिंदुस्थानच्या पैशानें एक नृत्यसमारंभ केला. मि. फॉसेट यांनीं लॉर्ड सॉल्सबरी यांच्या या कृत्याचा निषेध केला. त्या वेळेपासून त्यांनीं हिंदुस्थानविषयीं आपलेपणाचें धोरण ठेवलें. ॲबिसीनियन युद्धाच्या वेळीं जो खर्च आला तो इंग्लंड व हिंदुस्थान यांच्यात विभागला गेला. मि. फॉसेट यांच्या खटपटीमुळें ही गोष्ट घडून आली त्याचप्रमाणें प्रिन्स ऑफ वेल्स यांच्या आगमनानिमित्त ३० हजार पौंड हिंदुस्थानच्या नावावर खर्ची टाकण्यांत आलें होतें; मि. फॉसेट यांच्या प्रयत्नामुळें हिंदुस्थानाला हे पैसे द्यावे लागले नाहींत. दिल्लीदरबार व अफगाण युद्ध यांच्या बावतींत हिंदुस्थानावर जो खर्च लादण्यांत आला तसेंच कापसाच्या आयातजकातीवर लॉर्ड लिटन यांनीं जें पाणी सोडलें त्याबद्दल मि. फॉसेट यांनीं निषेध व्यक्त केला. १८७२ सारख्या हिंदी राजकीय चळवळीच्या अगदीं आरंभींच्या काळांत कलकत्ता येथील लोकांनीं मि. फॉसेट यांना एक मानपत्र

अर्पण केलें व पुढें १८७४ सालीं मि. फॉसेट पार्लमेंटमधील एक जागा गमावून बसले त्या वेळीं पार्लमेंटमधील जागेकरितां त्यांना पुन्हां झगडता यावें म्हणून हिंदुस्थानच्या लोकांतर्फे ७५० पौंडाची एक थैली त्यांना अर्पण करण्यांत आली.

इंडियन पार्लमेंटरी कमिटी व कॉंग्रेस स्थापन करण्याच्या कामीं मि. ह्यूम यांनीं जी कामगिरी केली होती तिचा उल्लेख मागें आलाच आहे. सरकारी अधिकारी या नात्यानें व पुढें नोकरी सोडल्यानंतर हिंदुस्थानचे कैवारी म्हणून त्यांनीं हिंदुस्थानच्या कल्याणाकरितां आपल्या आयुष्यांतील ६० वर्षें घालविलीं. इंडियन सिव्हिल सर्व्हिसचे ते एक सभासद होते. शिक्षणप्रसार, पोलिसखात्यांत सुधारणा, दारूचा व्यापार, देशी वर्तमानपत्रें या बाबतींत कलेक्टर असताना त्यांनीं बरीच कामगिरी केली होती. खेडीं व शेतकरी यांच्याबद्दल त्यांना जिव्हाळा वाटे. बंडाच्या वेळीं बंडवाल्याविरुद्ध त्यांनीं इटावा येथें हत्यार चालविलें व हिंदुस्थान ब्रिटिशांचे हातचे गमावू दिलें नाही. शांतता प्रस्थापित झाल्यानंतर हिंदी जनतेंत शिक्षणप्रसाराच्या कामाला त्यांनीं हात घातला. पोलिसखातें व न्यायखातें ह्यांची फारकत झाली पाहिजे, या दृष्टीनेंच पोलीसखात्याच्या सुधारणेला त्यांनीं हात घातला होता. अबकारी खात्यांत मिळालेला पैसा पापाचा पैसा आहे, असें त्यांचे मत होतें. या खात्यातून मिळालेला प्रत्येक रुपया जनतेला गुन्हा करण्यास प्रवृत्त करतो व ह्या गुन्ह्यांचा बंदोबस्त करण्याकरितां त्याच्या दुप्पट पैसे सरकारला खर्च करावे लागतात. असन्मार्गानें मिळविलेला पैसा कधींही बरकतीला येत नाहीं असें ते नेहमीं म्हणत असत.

१८५९ च्या अखेरीस ‘जनमित्र’ नांवाचें देशी वर्तमानपत्र काढण्याचे कामीं त्यांनीं खटपट केली. या पत्राच्या ६०० प्रती संयुक्त प्रांत सरकारच घेत असे. व्हाइसरॉयांना ही कल्पना फार पसंत पडली व त्या पत्राच्या प्रति भाषांतरासहित व्हिक्टोरिया राणीला समर्पण करण्याकरितां स्टेट सेक्रेटरीकडे पाठविण्यांत आल्या. १८६३ साली म्हणजे ब्रिटिश अमदानीच्या अगदीं आरंभीच्या काळांत गुन्हा करण्यास प्रवृत्त झालेल्या मुलांना शिक्षण देण्याकरितां ज्युव्हेनाइल रेफर्मेटरी स्थापन करण्याबद्दल त्यांनींच सरकारला आग्रह केला. कस्टम खात्याचे कमिशनर असतांना सरकारनें घेतलेल्या मिठाच्या पैदाशीच्या मक्त्याचें संरक्षण करण्याकरिता राजपुताना संस्थानांतील मिठाला बाजारांत न येऊं देण्याच्या कामीं जी २५०० मैल अंतरावर जकातीची नाकीं बसविलीं

होतीं तीं सर्व त्यांनीं हळू हळू वद करविलीं, त्यावद्दल त्यांची स्टेट सेक्रेटरींनीं वाहवा केली. शेती सुधारण्याकरितां व शेतकऱ्यांना कर्जमुक्त करण्याकरिता मि. ह्यूम यांनीं १८७९ सालीं एक योजना तयार केली होती. लॉर्ड मेयो ह्यांना ही योजना पसंत होती, पण ती अंमलांत येऊ शकली नाहीं. खेडयांतील देण्या-घेण्याचे तंटे गांवातल्या गावांत ग्रामपंचायतीपुढें बुद्धिवान व प्रामाणिक निवडक हिंदी लोकानीं मिटवावेत अशीही त्यांची एक योजना होती. मुंबई इलाख्यांतील गांजलेल्या व कर्जानें बुडलेल्या रयतांचे कल्याणाकरितांही त्यानीं एक योजना आंखली होती पण ती मुंबई सरकारनें मान्य केली नाहीं. १८७० ते १८७९ पर्यंत हिंदुस्थान सरकारचे सेक्रेटरी म्हणून त्यानीं काम केलें, पण ते अतिशयच प्रामाणिक व स्वतंत्र वृत्तीचे आहेत म्हणून त्याना त्या कामावरून दूर करण्यात आलें. सरकारच्या ह्या कृत्यावद्दल हिंदी वर्तमानपत्रातून जोराचा निषेध करण्यात आला. मि. ह्यूम ह्याना लेफ्टनंट गव्हर्नर करण्याचा लॉर्ड लिटन ह्याचा बेत होता, परंतु खुद्द ह्यूम यानीं ती जागा नाकारली. मि. ह्यूम ह्यांना होम मेंबर करण्याची दुसरी एक सूचना आली होती पण लॉर्ड सॉल्सवरी ह्यांनीं ती हाणून पाडली. कॉटनडयूटी रद्द करण्याविरुद्ध कांहीं तरी उपाय-योजना करण्याकरिता लॉर्ड नॉर्थब्रुक याच्यामागें मि. ह्यूम ह्यांनीं तगादा लावला आहे अशी लॉर्ड सॉल्सवरी ह्याची तक्रार होती. १८८२ सालीं ते सेनानिवृत्त झाले. हिंदुस्थानात ( Ornitholo~y ) ज्योतिषशास्त्राचें म्युझिअम स्थापन करण्याकरितां त्यानीं २० हजार पौंड खर्च केले. तसेंच 'Game birds of India' ह्या विषयावर एक मोठा ग्रंथ लिहिण्याची तयारी करण्याकरितां त्यांना ४००० पौंड खर्च आला.

सर विल्यम वेडरवर्न ह्यानीं केलेली हिंदुस्थानची सेवा सर्वश्रुत आहेच. ब्रिटिश कॉंग्रेस कमेटीचें काम त्यांनीं वरेंच वर्षं केलें. या कमिटीच्या कामाकरितां दरसाल रु. १०००० पासून ५०००० पर्यंत रक्कम कॉंग्रेसमध्यें मंजूर करण्यात येत असे. मुंबई ( १८८९ ) व अलाहाबाद ( १९१० ) ह्या दोन ठिकाणीं झालेल्या कॉंग्रेसचे ते अध्यक्ष होते.

मि. डेव्हिड यूल हे चौथ्या कॉंग्रेसचे ( अलाहाबाद १८८८ ) अध्यक्ष होते. " सर्वसाक्षी व अगम्य परमेश्वरानें हिंदुस्थानचा मोठा व पवित्र ट्रस्ट आपल्या स्वाधीन केला आहे असें हौस ऑफ कॉमन्समधील लोक समजतात, पण या

३५० लोकांनीं हा ट्रस्ट परमेश्वरानेंच त्याची वाटेल ती व्यवस्था करावी म्हणून त्याच्याकडे पुन्हा परत केला आहे, " असें मि. यूल हे नेहमीं म्हणत असत. यानंतरच्या भरलेल्या काँग्रेसच्या अधिवेशनांना पार्लमेंटचे सभासद भेटी देत असत. टेंपरन्स चळवळीचे प्रसिद्ध पुढारी मि. डब्ल्यू. एस्. केन, चार्लस् ब्रॅडलॉ, मि. सॅम्युअल स्मिथ, डॉ. एच्. व्ही. रूदरफर्ड, व डॉ. क्लार्क ह्यांनीं यानंतरच्या काँग्रेसच्या अधिवेशनांना भेटी दिल्या. काँग्रेसच्या अधिवेशनांतील ही दरसालची एक गोष्ट होऊन बसली होती. यानंतर इतर बरेच पार्लमेंटचे सभासद हिंदुस्थानाला भेटी देऊन गेले. रॅम्से मॅकडोनल्ड हे १९११ सालीं कॉंग्रेसचे अध्यक्ष व्हावयाचे होते; पण त्यांची पत्नी आयत्या वेळीं वारल्या-मुळें ही गोष्ट शक्य झाली नाहीं. ते काँग्रेसचे अध्यक्ष झाले असते तर त्यांच्या शोकपूर्ण आयुष्यातील तो एक मनोरंजक प्रसंग ठरला असता. केर हार्डी, हॉल-फर्ड नाइट, मॅकस्ट्न, कर्नल वेजवूड, वेन्सपूर, चार्लस रॉबर्टसन्, पेथ्वीक लॉरेन्स, ह्या पार्लमेंटच्या सभासदांनींही हिंदुस्थानला भेटी दिल्या व हिंदुस्थान-च्या प्रश्नाचा अभ्यास करण्याकरिता कॉंग्रेसच्या निरनिराळ्या अधिवेशनांना ते हजर राहिले. पण चार्लस् ब्रॅडलॉ ह्यांनीं १८८९ सालीं कॉंग्रेसला भेट दिली, तेंव्हा कॉंग्रेसच्या प्रतिनिधींनीं त्यांचें दरबारी थाटाचें स्वागत केलें. उदात्त भावना-नीं युक्त असें त्यांचें भाषण झालें. राजनिष्ठेची त्यांनीं केलेली पुढील व्याख्या लक्षात ठेवण्यासारखी आहे. " केवळ आंधळेपणानें राजसत्तेच्या जूंखालीं मान वाकविणें ही खरी राजनिष्ठा नव्हे, शासित लोक शासक वर्गातील लोकांना मदत करतात व सरकारनें करावे असे कामच शिल्लक राहूं देत नाहींत हीच खरी राजनिष्ठा होय". नोकरशाहीची व्याख्या अगदीं त्याच्या उलट आहे. लोकांनीं सर्व कामें सरकारवर सोंपविलीं पाहिजेत, त्यांनीं स्वतः काहीं करता कामा नये असे ह्या नोकरशाहीतल्या अधिकाऱ्यांचे म्हणणें असते. चार्लस ब्रॅडलॉ ह्यांनीं कायदे कौन्सिलच्या सुधारणाबाबत एक बिल तयार केलें व तें पार्लमेंटच्या सभासदां-कडेही पाठविलें. काँग्रेसच्या त्या वेळच्या पुढाऱ्यांचे विचारच ह्या बिलात ग्रथित केले होते; पण तें पुढें येऊं शकलें नाहीं.

वुईल्यम् एवर्ट ग्लॅडस्टन ह्यांचें नांव हिंदी लोकांना परिचित व प्रिय होतें. " हिंदुस्थानांत आमची सत्ता असावी कीं नाहीं ही गोष्ट हिंदुस्थानांतील २४ कोटी लोकांच्या इच्छेवरच अवलंबून राहील. हिंदी लोकांना आपलें तेथील

वास्तव्य फायदेशीर वाटले पाहिजे हें एक व तें फायदेशीर आहे असें त्यांना समजावून व पटवून दिलें पाहिजे तरच आपणांस तेथें रहाण्यास हक्क आहे." हे मि. ग्लॅडस्टन यांचें उद्गार पं. विशन नारायण धार यांनीं तिसऱ्या कॉंग्रेसमधील (मद्रास १८८७) आपल्या भाषणांत उद्धृत केले होते. ग्लॅडस्टन यांची तीव्र नापसंती असल्यामुळेंच लॉर्ड लिटनच्या कारकीर्दींतील देशवृत्तपत्राचा कायदा रद्द झाला. कॉंग्रेसच्या चळवळीबद्दल त्यांनीं प्रत्यक्ष संमति दर्शविल्यामुळें हिंदुस्थानात त्याचें नाव अधिकच लोकप्रिय झालें होते. दरसाल त्याच्या वाढदिवसानिमित्त कॉंग्रेसमध्यें अभिनंदनपर ठराव पास करण्यात येत व तो वाढदिवस २९ डिसेंबर रोजीं म्हणजे कॉंग्रेसचें वेळींच येत असे. आयर्लंडप्रमाणेंच हिंदुस्थानच्या हक्काचा ते पुरस्कार करीत असल्यामुळें ह्या दूरवर असलेल्या मुत्सद्याबद्दल हिंदुस्थानला निस्सीम प्रेम वाटत होते. प्रेसॲक्टसंबंधानें बोलताना असा कायदा पास करणें म्हणजे ब्रिटिश साम्राज्याच्या अब्रूला कलंक लावण्यासारखें आहे, असें त्यानीं म्हटलें होतें. १८९८ मध्यें त्याच्या मृत्यूबद्दल कॉंग्रेसनें दुःख प्रदर्शित केलें.

लॉर्ड नॉर्थब्रुक यानीं होम चार्जेसचा खर्च कमी करण्याबद्दल पार्लमेंटकडे खटपट केली. नवव्या कॉंग्रेसनें (१८९३) त्याचें ह्या कामाबद्दल आभार मानले. होम चार्जेससंबंधानें आपली काहीं तक्रार आहे ही गोष्ट हिंदुस्थानांत कर्णोपकर्णी होण्यापूर्वींच हें गाऱ्हाणें दूर करण्यांत आलें पाहिजे असा ड्यूक ऑफ ऑर्गाइल याचा अभिप्राय होता.

ना. गोखले ह्यांनीं आपल्या भाषणात त्याचा उल्लेख केला आहे. राजकीय गुंतागुंतीच्या प्रश्नाबाबत ड्यूक ऑफ ऑर्गाइल हे अधिकृत वाणीनें आपले विचार प्रदर्शित करीत असत. हिंदुस्थानातील खेड्यापाड्यातील जनतेची रहाणी अत्यंत निकृष्ट दर्जाची आहे, पाश्चात्य जगातील कोणत्याही देशात अशा प्रकारचें उदाहरण आढळणार नाहीं, हें ड्यूक ऑफ ऑर्गाइल याचें मत १७ व्या कॉंग्रेस मध्यें भाषण करतांना मि. वाच्छा यांनीं उधृत केलें होतें.

लॉर्ड स्टॅन्ले ऑफ आल्डर्ली हे हिंदुस्थानचे इंग्लंडमधील एक परम मित्र होते १९०२ सालीं त्याचें निधन झालें. मद्रास कॉंग्रेसमध्यें त्याच्या निधनाबद्दल दुखवट्याचा ठराव पास करण्यांत आला.

मि. अर्डले नॉर्टन हे एक प्रसिद्ध पुरुष होऊन गेले. ह्यांचे वडील जॉन ब्रूस नॉर्टन हे दक्षिण हिंदुस्थानमध्यें एक सार्वजनिक कार्यकर्ते म्हणून प्रसिद्ध होते. मद्रास येथील पच्चाप्पा हॉलमध्यें त्यांचें तैलचित्र ठेवण्यांत आलें आहे. मि. अर्डले नॉर्टन ह्यांनीं आपल्या वडिलाप्रमाणेंच हिंदुस्थानच्या उद्धाराकरितां आपल्या आयुष्यांतील बहुमोल भाग खर्ची घातला. १८९४ सालीं इंडिया कौन्सिल रद्द करण्यासंबंधींचा ठराव मांडला. ' स्टेटसेक्रेटरीवर कौन्सिलचें नियंत्रण ठेवावयाचें असेल तर स्टेट सेक्रेटरीलाच काढून लावा आणि जर स्टेट सेक्रेटरीचा तावा कौन्सिलवर रहावयाचा असेल तर हें कौंसिलच रद्द करा. ह्या दोघाचेंहीं एकत्र अस्तित्व निरूपयोगी, भयप्रद, खर्चाचें व अडचणीचें आहे ' असा त्यांनीं पेच टाकला होता. हे स्टेट सेक्रेटरी आपल्या कामांत किती नालायक असतात व व्यापार व्यवहाराच्या दृष्टीनें ते किती अडाणी असतात ही गोष्ट त्यांनी अनेक उदाहरणें देऊन सिद्ध करून दाखविली.

मि. एच. मॉर्गन ब्राऊन या एका इंग्लिश मित्रानें हिंदुस्थानच्या आर्थिक परिस्थितीसंबंधानें हाऊस ऑफ कॉमन्सतर्फे चौकशी करण्यांत यावी या १० व्या कॉंग्रेसमध्यें आलेल्या ठरावास दुजोरा दिला. फॅमिन इन्शुअरन्स फंडाचे २४ कोटी रुपये शिल्लक असून त्यांपैकीं फक्त १६ कोटी रुपयेच खर्च करण्यात आले आहेत. ' स्टोअर्स ' खातें हें अत्यंत हीन व लाचखाऊ खातें असून कॉन्स्टॅंटीनोपल येथें झालेल्या एका नाचाकरितां १ लक्ष वीस हजार रुपये हिंदुस्थानच्या नांवावर खर्ची टाकण्यात आले असें त्यांनी सांगितलें. मि. जॉन अडॅम हे प्रसिद्ध शिक्षणशास्त्रज्ञ कॉंग्रेसच्या प्रारंभींच्या दिवसांत तिला मदत करीत होते.

हिंदुस्थानच्या इंग्रज मित्रासंबंधानें विचार करतांना जनरल बूथ यांचें नांव विसरून चालावयाचें नाहीं. गरीब, बेकार व देशोधडीला लागलेल्या लोकांना देशातील पडीक जमिनी देऊन त्या ठिकाणीं त्यांची वसाहत करावी, असें त्यानीं नागपूर कॉंग्रेसमध्यें सुचविलें होतें. कॅप्टन बेनन व कॅप्टन हिअर्से ह्यानीं ४ थ्या कॉंग्रेसमध्यें ( अलाहाबाद १८८८ ) आलेल्या वेश्या-व्यवसाय-विषयक ठरावावर परिणामकारक भाषणें केलीं. लष्करातील सोल्जरांना बायका पुरविण्याचें गलिच्छ काम सरकार करीत आहे, दोन हजावावर स्त्रिया सरकारनें त्यांना आतापर्यंत पुरविल्या आहेत, आणि सरकारच्या ह्या कृत्यामुळें

६

या पोरसौदा शिपायच्यांया स्वैर वर्तनाला कसें उत्तेजन मिळालें आहे याचें त्यांनीं वर्णन केलें.

इंग्लिश मित्रांसंबंधानें ही लहानशी हकीकत सांगत असतांना सर हेन्री कॉटन ह्यांचें नांव विसरून चालावयाचें नाहीं. या कॉटन घराण्याचा हिंदुस्थानाशीं फार दिवसांपासून संबंध आहे. आसामच्या चीफ कमिशनरची जागा सोडून सेवानिवृत झाल्यानंतर त्यांना मुंबई कॉंग्रेसचे (१९०४) अध्यक्ष निवडण्यात आलें. 'संयुक्त घटनात्मक स्वराज्याचें' ध्येय त्यानीं प्रथम हिंदुस्थानपुढें ठेविलें.

---

## प्रकरण सहावें

# कॉंग्रेसचे आद्य संस्थापक व पुढारी

दादाभाई नवरोजी, आनंदाचार्लू, वाच्छा, गोखले, जी. सुब्रह्मण्य अय्यर, बंद्रुद्दिन तय्यबजी, डब्ल्यू. सी. बानर्जी, के. टी. तेलंग, सुरेंद्रनाथ बानर्जी, टिळक, मालवीय, लजपतराय, फेरोजशहा मेथा, आनंदमोहन बोस, मनमोहन घोष, लाल मोहन घोष, विजय राघवाचारियर, कालीचरण बानर्जी, नवाब सय्यद महंमद बहादूर, डी. ए. खरे, गंगाप्रसाद वर्मा, एन्. एन्. मुधोळकर, शंकरन् नायर, केशव पिले, विपिनचंद्र पाल, अंबिकाचरण, वैकुंठनाथ सेन, भूपेंद्रनाथ बसू, बिशन नारायण धार, रमेशचंद्र दत्त, सुब्बाराव पंतलू, लाला मुरलीधर, सच्चि-दानंद सिंह.

कॉंग्रेसच्या पुढील धोरणासंबंधानें व कार्यक्रमासंबंधानें विचार करण्यापूर्वी राष्ट्रोद्धाराच्या या चळवळीला ज्यांनीं सुरुवात केली, जिच्याकरितां ते झटले व जिच्याकरितां अनेक प्रकारचे कष्ट ज्यांनीं सहन केले त्या थोर पुढाऱ्यांबद्दल व संस्थापकांबद्दल कृतज्ञता व्यक्त करणें उचित आहे. या आद्य संस्थापकांनीं आपल्यापुढें ठेवलेलें ध्येय व त्याचे कार्यक्रम आजच्या कॉंग्रेसच्या भक्तांना पसंत पडणार नाहींत किंवा आजचीं ध्येयें किंवा कार्यक्रम या पूर्वीच्या पुढाऱ्यांनाही पसंत पडली नसती, तथापि आज जें काय आपण मिळविलें आहे व ज्या ध्येयाची आकांक्षा मनांत बाळगणें आज आपल्याला शक्य झालें आहे तें सर्व त्यांच्या श्रमाचें व स्वार्थत्यागाचेंच फल आहे हें आपण विसरतां कामा नये.

### दादाभाई नौरोजी

या आद्य संस्थापकात दादाभाई नौरोजी यांच्या नांवाचा प्रथम उल्लेख केला पाहिजे. कॉंग्रेसशीं अगदीं आरंभी संबंध आल्यापासून त्यांनीं आमरण तिची सेवा केली. राज्यकारभारांतील दोषांमुळें उत्पन्न झालेलीं गाऱ्हाणीं लोकांतर्फे सरकार-पुढें मांडण्याचें काम कॉंग्रेस प्रथम करीत असे. पण पुढें या संस्थेची प्रगति होऊन, व स्वराज्याचे निश्चित ध्येय पुढें ठेवून त्याकरितां झटणारी अशी ती एक राष्ट्रीय सभा बनली. कॉंग्रेसच्या या सर्व प्रगतीला दादाभाई नौरोजी यांचे श्रमच

कारणीभूत झाले आहेत. १८८६, १८९३, व १९०६ या तीन अधिवेशनांचे प्रसंगीं ते कॉंग्रेसचे अध्यक्ष झाले. सेंट्रल फिन्सबरीतर्फे ते पार्लमेंटचे सभासद निवडून आले, म्हणून त्यांच्या अभिनंदनार्थ दुसऱ्या खेपेस त्यांना अध्यक्षपदाचा मान देण्यांत आला. हिंदुस्थानाची गाऱ्हाणीं लंडनच्या जनतेपुढें मांडावीं अशी एक कल्पना त्या वेळीं निघाली होती, व तिच्या संबंधानें कॉंग्रेसच्या मंडळींत गंभीरपणें चर्चा चालू होती. लंडनमधील कॉंग्रेसचें अधिवेशन होईपर्यंत हिंदुस्थानांतील अधिवेशन तहकुब ठेवण्यांत यावें अशीही एक सूचना १८९१ सालीं पुढें आली होती; पण ती नापसंत करण्यांत आली. मि. ए. ओ. ह्यूम हे इंग्लंडला निघण्याच्या तयारींत होते व कॉमन्स सभेंत हिंदुस्थानचा प्रतिनिधी असावा अशीही मागणी त्या वेळीं करण्यात आली होती. अशा या योग्य प्रसंगीं दादाभाई याना दुसऱ्या खेपेस कॉंग्रेसचे अध्यक्ष निवडण्यांत आले. या राष्ट्रशक्तीला (सुशिक्षित हिंदी लोकांना) तुम्ही विरोधी बनऊं नका. तुम्हीं त्यांना आपलेसे करून टाका. हिंदुस्थानांतील बुद्धिमान वर्गाची कॉंग्रेस ही प्रतिनिधिक संस्था आहे, असें दादाभाईनीं या कॉंग्रेसच्या वेळीं ब्रिटिशाना बजावून सागितलें. 'ब्रिटिशांच्या न्यायबुद्धीवर आमचा असलेला विश्वास चुकीचा ठरूं नये' असें ते म्हणत. 'हिंदी लोक ब्रिटिश नागरिक असून ब्रि. नागरिकांना जे हक्क आहेत ते हिंदी लोकांनाही असले पाहिजेत' असें १९०६ सालीं त्यांनीं बोलून दाखविलें. ब्रिटिशांवरील त्यांचा विश्वास अखेरपर्यंत अढळ राहिला. "१८८४-८५ पासून लोकसख्या शें. १८ नें वाढली आहे तर सरकारी राज्यकारभाराचा खर्च शें. ७० नीं वाढला आहे. केवळ लष्करी खर्चातच १७ कोटीपासून ३२ कोटीपर्यंत वाढ झाली आहे. यांपैकीं ७ कोटी तर केवळ इंग्लंडमध्येंच खर्च करण्यात येतात" असें सांगून हिंदुस्थानवर राज्यकारभाराच्या खर्चाचा बोजा कसा सारखा वाढत चालला आहे हें दादाभाईनीं आपल्या भाषणांत दाखवून दिलें. दादाभाई अध्यक्ष असलेल्या या कलकत्ता कॉंग्रेसला श्रीमंत गायकवाड सरकार यांनीं भेट दिली. बहिष्काराच्या भावनेनें या कॉंग्रेसचें वातावरण भरून गेलें होतें. बाबू विपिनचंद्र पाल यांनीं बहिष्काराच्या व्याख्येला व्यापक स्वरूप दिलें होतें. सरकारशीं कोणत्याही प्रकारचा संबंध ठेवतां कामा नये असें ते प्रतिपादन करीत होते. स्वदेशी ही या चळवळीची दुसरी बाजू होती, आणि या 'स्वदेशी' चा अर्थ निरनिराळ्या लोकांनीं निरनिराळ्या प्रकारें केला होता. देशी

उद्योगधंद्यांचें संरक्षण हा पं. मालवीयांचा अर्थ होता. परदेशी माल वापरणाऱ्या मध्यम वर्गाची दुःस्थिति माहोंशी होईल व त्यामुळें सर्व राष्ट्र स्वावलंबी, निश्चयी व स्वार्थत्यागास प्रवृत्त होईल या दृष्टीनें लो. टिळक या स्वदेशीकडे पाहात होते. राष्ट्राच्या भांडवलाचा संचय करण्याचें सामर्थ्य स्वदेशींत आहे असें लालाजींचें म्हणणें होतें. आर्थिक व शैक्षणिक सुधारणा व शिक्षणप्रसार याबद्दलची तीव्र इच्छा या स्वदेशीच्या भावनेंत अंतर्भूत झाली आहे व या भावनेमुळें स्वराज्यप्राप्तीची आकांक्षाही बळावली आहे असा अर्थ दादाभाईंना प्रतीत झाला होता. ६००० मैलांवरून आलेल्या या ८० वर्षांच्या म्हाताऱ्यानें स्वदेशी, बहिष्कार व राष्ट्रीय शिक्षण यांच्या भरतीला स्वराज्याची घोषणा जोडून दिली हें पाहून इंग्रजांनीं दादाभाईवर हल्ल्यांवर हल्ले चढविले होते. १९०५ सालीं स्वराज्यप्राप्तीच्या चार साधनांचा उल्लेख ना. गोखले यांनीं केला होता. १९०६ च्या मुख्य ठरावांत या चार साधनांचाच अंतर्भाव करण्यांत आला होता. १९०६ सालीं दादाभाई यांच्या अध्यक्षतेखालीं झालेल्या कलकत्ता कॉंग्रेसमध्यें जे चार मुख्य ठराव झाले ते खालीं दिले आहेत.

## ( १ ) स्वराज्य

स्वयंसत्ताक ब्रिटिश वसाहतीमध्यें देशाचा कारभार चालविण्याची जी पद्धति आहे ती हिंदुस्थानास लागू करावी व त्या दृष्टीनें खालील गोष्टी ताबडतोब व्हाव्यात. (अ) सिव्हिल सर्व्हिसची परीक्षा इंग्लंड व हिंदुस्थान या दोन्हीं देशांत एकदम घ्यावी. (ब) वरिष्ठ व प्रांतिक कायदेकौंसिलांत हिंदी सभासदाचें मताधिक्य असावें. व अमलबजावणीच्या खात्यावर व तिजोरीवर लोकप्रतिनिधींचा ताबा असावा. (क) सेक्रेटरी ऑफ स्टेट यांच्या कौंसिलमध्यें व मुंबई व मद्रासचे गव्हर्नर व व्हाइसरॉय यांच्या कार्यकारी कौंसिलांत योग्य प्रमाणांत लोकांचे प्रतिनिधी घ्यावे. (ड) लोकल बोर्डें व म्युनिसिपालिट्या यांचे अधिकार वाढवावे व इंग्लंडमधील असल्या स्थानिक संस्थांवर सरकारी अधिकाऱ्यांचे जितकें नियंत्रण असतें तितकेंच नियंत्रण हिंदुस्थानांतील या संस्थावर ठेवण्यांत यावे.

## ( २ ) बहिष्कार

या देशाच्या राज्यव्यवस्थेंत लोकांच्या मताला मान किंवा किंमत अगदीं थोडी किंवा मुळींच नाहीं व लोकांनीं केलेल्या अर्जाकडे सरकार मुळींच लक्ष

देत नाहीं अशा स्थितींत फाळणीच्या विरुद्ध निषेध दर्शविण्याकरितां बंगालनें अंगिकारलेला बहिष्कारयोग राष्ट्रीय सभेच्या मतें न्याय्य होता व आहे.

## ( ३ ) स्वदेशी

स्वदेशी चळवळीस या सभेचा पूर्ण पाठिंबा असून स्वदेशीचा विजय ज्या योगानें होईल, असे एकसारखे व कसोशीचे प्रयत्न करण्यांत यावे. स्वदेशी धंद्यांना उत्तेजन देण्यासाठीं परदेशांहून येणाऱ्या मालाला बाजूला सारून स्वार्थ-त्यागपूर्वक स्वदेशी वस्तु घ्याव्या व जेणेंकरून स्वदेशी माल अधिकाधिक पैदा होईल असें स्वदेशीला प्रोत्साहन द्यावें, असें सर्व हिंदी लोकांजवळ राष्ट्रीय सभेचें आग्रहाचें मागणें आहे.

## ( ४ ) राष्ट्रीय शिक्षण

मुलामुलींना शिक्षण देण्याचा प्रश्न कळकळीनें हातांत घेण्याची व राष्ट्रीय दृष्टीनें व राष्ट्रीय हुकमतीखालीं देशाच्या सद्यःस्थितीला अनुसरून वाङ्मयात्मक, शास्त्रीय व औद्योगिक शिक्षण देणाऱ्या शिक्षणसंस्था स्थापन करण्याची वेळ आली आहे, असें या सभेचें मत आहे.

ज्या पुरुषानें आपलें सर्व आयुष्य भारतवर्षाच्या उद्धारार्थ खर्ची घातलें, ज्याच्या लेखणीला कधींही विश्रांति मिळाली नाही, त्याच्या कामगिरीचें सर्व वर्णन या लहानशा पुस्तकांत करणें शक्य नाहीं. परमेश्वरानें त्यांना ७० वर्षांवर उदंड आयुष्य दिलें होतें. दादाभाई हिंदुस्थानाकरितां रावले व हिंदु-स्थानाकरितां जिवंत राहिले. राष्ट्रकार्याला सर्व आयुष्य वाहिल्याचें उज्ज्वल उदाहरण त्यांनीं आपल्यामागें ठेवलें एवढेंच नव्हें तर आपलें रक्त ज्यांच्या अंगांत खेळत आहे अशा आपल्या दोन नातीही त्यानीं मागें ठेवल्या असून त्यांनीं घालून दिलेल्या वरील उच्च परंपरेचेंच त्या रक्षण करीत आहेत.

### आनंदाचार्लू

संपादक सुब्रह्मण्य अय्यर, तेलंग, दादाभाई नवरोजी, डब्ल्यू. सी. बानर्जी, नरेंद्रनाथ सेन, रंगय्या नायडू, फेरोजशहा मेथा, टी. एस. व्हाइट वगैरे कॉंग्रेसच्या मूळ संस्थापकांपैकीं आनंदा चार्लू हे एक होते. १८९१ च्या नागपूर कॉंग्रेसचे ते अध्यक्ष झाले. ते एक उत्तम वक्ते होते. स्वयंसैनिक दलांत हिंदी लोकांना घेत नव्हते याबद्दल लोकांचीं अंतःकरणें थराहून सोड-णाऱ्या आपल्या भाषणांत त्यांनीं निषेध व्यक्त केला. "आर्मीनियन, निग्रो, पश्चिम

आफ्रिकेंतील मोलॅटो वगैरे मानवी समाजांत कोठेंही मनाचें स्थान नसणाऱ्या व कलकत्त्यासारख्या शहरांतील गल्लयाकुच्यांतून भटकत फिरणाऱ्या लोकांना हिंदी स्वयंसेवक दलांत प्रवेश मिळतो आणि तें आमच्या घरादारांचे संरक्षक बनतात. सरकारनें अशा प्रकारचे हे चीड आणणारे वर्णभेद निर्माण केले आहेत. ब्रिटिश कायद्यांतील तत्त्वाला ते विरुद्ध आहेत" असे जळजळीत उद्गार त्यांनीं काढले होते. आनंदा चार्लू यांना कोणी अनुयायी नव्हते किंवा त्यांनीं आपला एखादा स्वतंत्र विचाराचा पंथही निर्माण केला नाही. वीस वर्षांवर त्यांनी देशाची सेवा केली. दक्षिण हिंदुस्थानांतील राजकीय पुढाऱ्यांत एक नांव घेण्यासारखें पुरुष या दृष्टीनें त्याची गणना करण्यास हरकत नाहीं. सुरवातीच्या पुढाऱ्यांत निरनिराळ्या वृत्तीचीं माणसें होती. जी. सुब्रह्मण्य अय्यर, वाच्छा व गोखले हे एका प्रकारचे लोक होते. त्याचा बालेकिल्ला आर्थिक होता, त्यांचें वक्तृत्व मुद्देसूद असें, ते कधींही जुन्या भारतीय संस्कृतीचे आधार दाखवून सामान्य लोकांची कल्पनाशक्ति जागृत करीत नसत. त्यांचे मुद्दे जोरदार व रोखठोक असत, त्यांच्या विचारमालिकेवर हल्ला चढविणें अशक्य असे, व त्यांचा अधिकार टीकेच्या कक्षेंत येत नसे.

## डी. ई. वाच्छा

अगदीं पहिल्या कॉंग्रेसच्या अधिवेशनांत लष्करी खर्चासंबंधीच्या ठरावावर मि. वाच्छा यांनीं अत्यंत माहितीपूर्ण असें भाषण केलें. दुसऱ्या अधिवेशनामध्यें हिंदुस्थानची लोकसंख्या व दारिद्र्य या प्रश्नावर ते बोलले. ग्रेटब्रिटनला दरसाल द्याव्या लागणाऱ्या पैशामुळें इंग्लंड सारखें गबर होत आहे व हिंदुस्थानची स्थिति १८४८ पासून सारखी हलाखीची होत चालली असून देशांतील ४ कोटी लोकांना फक्त एक वेळच जेवण मिळतें व तेंसुद्धां नेहमीं मिळतें असें नाहीं, असें त्यांनीं सप्रमाण दाखवून दिलें. याचें कारण इंग्लंडमध्यें जाणारा पण परत न येणारा पैसा होय असें ते म्हणाले. १८८९ च्या पांचव्या अधिवेशनात अबकारी धोरणासंबंधानें त्यांनीं आपले विचार प्रदर्शित केले. लोकमताला अनुसरून या धोरणात जरूर तो बदल करावा असा एक ठराव कॉमन्स सभेंत पास करण्यात आला होता. हा ठराव होऊन नऊ महिने होऊन गेले तरी सरकारनें त्या बाबतींत काहींही केलें नाहीं, असें त्यांनीं सांगितलें. १८९२ सालीं चलनी नाण्यासंबंधानें अलाहाबाद कॉंग्रेसमध्यें जोराची खळबळ उडाली. १८७३ सालीं

जर्मनीनें चांदीच्या चलनावर घातलेले निर्बंध, होमचार्जेसचा खर्च, १८९० चा शेरमन कायदा व सुवर्णपरिमाणाचा हिंदुस्थानवर होणारा परिणाम या गोष्टी लोकांच्या हिताला घातक होत आहेत असें त्यांनीं दाखवून दिलें.

सरकारनें नियंत्रित केलेल्या व मान्यता दिलेल्या व्यवसायासारख्या अनैतिक प्रश्नासंबंधानें या नवव्या अधिवेशनांत जोराची चर्चा झाली व सरकारचा तीव्र निषेध करण्यांत आला. जर लष्करी खर्चांत काटाकाट करावयाची नसली तर आयात मालावरील जकाती पुन्हां बसविण्यांत याव्या अशी त्यांनीं सूचना केली. या जकाती रद्द केल्यामुळें दरिद्री हिंदुस्थान अधिकच दरिद्री होत चालला असून उलट लॅंकेशायर हे अधिकाधिक गबर होत चाललें आहे असें ते म्हणाले. लष्करी खर्च व हिंदुस्थानचें दारिद्र्य हे त्यांचे आवडते विषय होते. अकराव्या अधिवेशनांत ( पुणें १८९५ ) संपत्तीचा प्रश्न प्रमुख होता. हुंडणावळीच्या दरांत फेरफार झाल्यामुळें राज्यकारभारावरलि खर्च व लष्करी खर्च वाढल्यासारखा दिसतो. वस्तुतः तशी स्थिति नाहीं असें सर जेम्स वेस्टलॅंड यांनीं एक विधान केलें होतें. सरकारी दप्तरांतील रिपोर्टांमधील आंकड्यांचे आधारें सर जेम्स वेस्टलॅंड यांचें हें विधान किती चुकीचें आहे हें त्यांनीं दाखवून दिलें. वाच्छा यांचें भाषण नेहमीं माहितीनें भरलेलें असावयाचें. ज्या विषयावर बोलावयाचें त्याचा पूर्ण अभ्यास ते करीत असत. त्यामुळें त्यांच्या भाषणांत एक-प्रकारचा जोम दिसून येत असे. यामुळेंच वाच्छा यांना मुंबईचें जळतें कोलीत ( Firebrand of Bombay ) अशी पदवी मिळाली होती. हिंदुस्थानच्या खर्चासंबंधानें विचाराकरिता बसविण्यांत आलेल्या रॉयल कमिशनपुढें ( वेल्बी कमिशन ) त्यांनी दिलेल्या सणसणीत व विद्वत्तापूर्ण साक्षीमुळें ते अधिकच प्रसिद्धीला आले. कॉंग्रेसमधील ना. गोखल्यांसारख्या विद्वान पुढाऱ्यांनीं त्यांचा गौरव केला. १८९७ सालीं सरहद्दीवरील धोरणा-संबंधानें कॉंग्रेसमध्यें चर्चा झाली. अमरावती येथील अधिवेशनामध्यें भाषण करतांना सरकारच्या या धोरणावर त्यांनीं कडक टीका केली. सरहद्दीपलीकडील प्रदेशावर स्वाऱ्या करण्याची साम्राज्य सरकारला हौस असेल तर या स्वाऱ्यांना लागणाऱ्या खर्चापैकीं बहुतेक सर्व खर्च ब्रिटिश तिजोरींतूनच भागविला पाहिजे, असें त्यांनीं निक्षून सांगितलें. १८९८ सालीं म्हणजे हर्शेल कमिशनचा रिपोर्ट प्रसिद्ध झाल्यानंतर व फाऊलर कमिटी नेमण्यापूर्वीं हिंदी चलनी नाण्याच्या

प्रश्नानें पुन्हां एकदां उचल खाल्ली. १८९३ मध्यें चांदीची नाणीं पाडणाऱ्या टांकसाळी बंद करण्यांत आल्या, त्यावद्दल त्यांनीं सरकारला दोष दिला. याच-सालीं " अमेंडमेंड कॉयनेज ॲक्ट " नांवाचा एक कायदा सिमल्याच्या कायदे-मंडळामध्यें अवघ्या अर्ध्या तासांत पास करण्यांत आला. हिंदी जनतेचा एकही प्रतिनिधी कायदेमंडळाच्या या बैठकीला बोलावण्यांत आलेला नव्हता. चलनी नाण्यासंबंधाचें धोरण नव्हे तर ' होम-चार्जेस ' हाच एक मुख्य रोग हिंदुस्थानास लागला आहे असें त्यांचें म्हणणें होतें. नंतर हुंडणावळीचा भाव ठराविक करण्याचा प्रयत्न झाला व तो सोन्याच्या हुंडणावळीच्या आधारानें स्थिर केला गेला. त्यांनी लखनौच्या १५ व्या अधिवेशनांत चलनी नाण्याच्या प्रश्नावर हल्ला करून सुवर्णपरिमाण सुरू करण्यावद्दल सरकारचा निषेध केला. सर्व जगांतील सोनें उत्पन्न करणाऱ्या देशांतून निघालेले सोन्याचे प्रवाह हिंदुस्थानकडे वाहून येतील या लॉर्ड कर्झन यांच्या कल्पनेचा त्यानीं निषेध केला. हिंदुस्थानच्या दारिद्र्याचें मूळ कारण हिंदुस्थानांतून सालोसाल होणारें द्रव्यशोषण हेंच आहे. फक्त देशांतील संपत्ती फलप्रद आहे. चांदी या दृष्टीनें रुपयाची किंमत कमी झालेली आहे. परंतु त्याची दिखाऊ किंमत वाढलेली आहे. १ रुपयास तोळा या भावानें पूर्वी चादी विकली जात असे. परंतु आतां त्याच चांदीच्या तोळ्याची किंमत १० ते ११ आणे झाली आहे. चांदीचे दागिने हा गरीबांचा कुणगा आहे. चांदीची किंमत कमी झाली आहे व चांदीची किंमत कमी झाल्यामुळें या कुणग्याचीही किंमत उतरली आहे. १७ व्या अधिवेशनामध्यें (कलकत्ता १९०१) मि. वाच्छा यांची अध्यक्षस्थानीं योजना झाली. त्यांचें त्या वेळचें भाषण थक्क करून टाकणारें झालें. त्यांतील उतारे देणें शक्य नाहीं; तें मुळांतच वाचलें पाहिजे. मि. वाच्छा हे १८९६ पासून १९१३ पर्यंत कॉंग्रेसचे जॉईंट जनरल सेक्रेटरी होते. कॉंग्रेसच्या चळवळींतील ते एक प्रमुख व उत्साही कार्यकर्ते होते. कांग्रेसचे ते अध्यक्ष झाले त्यावेळीं कॉंग्रेसच्या चळवळीवद्दल त्यांना वाटणारा उत्साह परमावधीला पोंचला असें दिसून आलें. यानंतर कॉंग्रेसच्या कार्यांत अगदीं प्रत्यक्षपणें ते भाग घेईनासे झाले. ते केव्हांतरी एकादा ठराव मांडीत अगर एकाद्या ठरावाला दुजोरा देत असत. १९१५ सालच्या मुंबई येथें भरलेल्या कॉंग्रेसच्या स्वागत मंडळाचे ते अध्यक्ष होते. कॉंग्रेसच्या प्लॅटफॉर्मवरील त्यांचें हें दर्शन शेवटचेंच होतें असें म्हणावयास हरकत नाहीं. मि.

वाच्छा यांनीं पाव शतकापेक्षांही जास्त वर्षें कॉंग्रेसची सेवा केली. कॉंग्रेसच्या नामांकित पुढाऱ्यांत त्यांची गणना होत असे. अष्टपैलू बुद्धिमत्ता, यथातथ्य गोष्टीवरील प्रभुत्व, आणि लष्करी प्रश्नासारख्या अपरिचित आणि दारिद्र्यासारख्या विशाल व स्पष्ट नसणाऱ्या प्रश्नासंबंधीं ते इतके पारंगत होते कीं त्यांचा हात धरणारा दुसरा कोणी त्या काळीं तरी नव्हता. १७ व्या कॉंग्रेसच्या त्यांच्या अध्यक्षीय भाषणांत ज्याप्रमाणें निराशा दिसून येते, तसाच प्रतिपक्षाचा उपहासही केलेला आढळून येतो. ' प्लँटॅजनेट लोकांनीं सरकारी खात्यांतील मोठमोठ्या जागा बळकावल्या त्यावेळीं इंग्लंड स्वस्थ बसून राहिलें काय ? पोपांचे वर्चस्व वाढत्या प्रमाणात होते त्या वेळीं धर्माच्या नांवाखालीं दरसाल लाखों रुपये बाहेर देशी गेल्यामुळें इंग्लंड कंगाल बनलें असें इतिहास सांगत नाही काय ? समजा, इंग्लंड आणि हिंदुस्थान यांची अदलाबदल केली तर इंग्लंड तक्रार न करतां स्वस्थ चित्तानें आलेली आपत्ती सोशीत राहील काय ? " 'कॉंग्रेसचें जळतें कोलीत ' असें जे त्यांना म्हणण्यांत येत होतें तें यथार्थ नव्हते काय ? एका काळांतील जहाल पुढील काळांत नेमस्त होतो. मि. वाच्छा याना ' सर ' ही पदवी देण्यांत आली व वरिष्ठ कायदे कौन्सिलांत सरकारनियुक्त सभासद म्हणून त्यांची नेमणूक झाली. ब्रिटिश सरकारच्या विश्वासांतले एक गृहस्थ अशा गौरवपूर्ण भावनेनें सरकारी अधिकारी त्यांच्याकडे पहात असत.

## गोपाळ कृष्ण गोखले

गोखले याचे विचार मि. वाच्छा यांच्या विचारापेक्षां स्पष्ट होते आणि त्याची भाषा अधिक तीक्ष्ण होती. लो. टिळक यांच्यावरोबर १८८९ साली ते कॉंग्रेसमध्यें पहिल्यानेंच प्रविष्ठ झाले. लॉर्ड कर्झन यांचे कारकीर्दींत, अदाजपत्रकांत कृत्रिम रीतीनें दाखविलीं जाणारी शिल्लक हा त्यांचा कौंसिलातील धिःकाराचा विषय होता. ही कृत्रिम शिल्लक हुंडणावळीतील हातचलाखीमुळें दिसे. तेव्हां एक चलनी नाण्याच्या बाबतींतील धोरण तरी निर्दोष करा किंवा कर तरी कमीं करा असें तें सरकारला या प्रसंगी बजावून सांगत असत. मिठाच्या करावर त्यांचीं झालेलीं भाषणें आंकड्यांनीं व माहितीनीं पूर्ण भरलेलीं असत. ३ पै किंमतीच्या टोपली मिठाला ५ आणे कसे पडूं लागले हें त्यांनी सप्रमाण दाखवून दिलें. पब्लिक सर्व्हिस कमिशन व स्टेट सेक्रेटरीचे हुकूम या

बाबतीत त्यांचीं भाषणें माहितीपूर्ण असत. अत्यंत कठोर गोष्टी सौम्य शब्दांत मांडण्याची हातोटी त्यांना चांगली साधली होती.

१८९४ सालीं सरकारनें उघडपणें असें सांगितलें कीं, सर्व वरिष्ठ जागा नेहमीच युरोपिअनाना मिळाल्या पाहिजेत; यावर गोखल्यांनीं कडक टीका केली, व सरकारवर वचनभंगाचा आरोप केला. गोखले हे टीका करीत असतांना गोड भाषा वापरीत असले तरी ते शिष्टाईचा आव आणून गुळमुळीतपणा करीत नसत. "१८५८ चा जाहीरनामा अगदीं खऱ्या अर्थानें घ्यावयाचा नाही असें सर जेम्स फिटझ् जेम्स स्टीफन याच्या सारख्या इंग्लिश जज्जाचें म्हणणें असेल तर आतांपर्यंत दिलेली सगळी अभिवचनें कागदाच्या चिटोऱ्याप्रमाणें कचऱ्याच्या पेटींत टाकण्याच्याच योग्यतेची आहेत असें म्हणावें लागेल" असे निराशेचे उद्गार ना. गोखले यांनी काढले होते. उपासमारीनें गांजलेल्या रयताबद्दल त्याचें अतःकरण तिळतिळ तुटत होतें. सकाळीं पहाटेपासून ते रात्रीं अंधार पडेपर्यंत अर्ध्या भाकरीच्या तुकड्याकरितां राबराब राबावे. ईश्वरानें असो वा मनुष्यानें असो, लादलेलें आपत्तीचें ओझें धीमेपणानें सोशीत असावें असाच त्यांचा स्वभाव बनला आहे. सरकारच्या पार्लमेंटात त्यांचे गाऱ्हाणें मांडणाराही कोणी नाही याबद्दल ना. गोखले याना अत्यंत कळवळा वाटत असे. आणि या रयताच्या बऱ्याकरितांच राज्यकारभारावरील खर्च वगैरे प्रश्नांचा ते कसोशीने विचार करीत असत. आदर्श व शिस्तीला धरून वागणारे नेमस्त म्हणून गोखले यांची ख्याति होती, पण त्यांच्या वृत्तीसुद्धां कधी कधीं अनावर होत. लॉर्ड कर्झन यांचें दडपशाहीचें धोरण, बंगालची फाळणी, कलकत्ता कॉर्पोरेशनच्या हक्कांवर गदा, युनिव्हर्सिटी कायद्यांत सुधारणा व महाग शिक्षण, हीं कृत्यें पाहून त्याचेंही मन प्रक्षुब्ध होत असे. 'जनतेच्या हिताच्या दृष्टीनें नोकरशाहीशीं सहकार्य करण्याच्या वृत्तीला रामराम ठोंकावा लागेल' असेच हे सर्व प्रकार पाहून म्हणावें लागेल असें गोखले म्हणाले; "अलीकडे बंगालमध्यें जे महापूर आले त्यामुळें काठावर इकडे तिकडे पाणी जाणें साहजिक आहे. ज्या वेळीं प्रचंड जनसमुदाय जागा होऊन गुलामगिरीच्या नाशाकरितां व स्वातंत्र्याच्या संपादनाकरितां स्वयंस्फूर्तीनें चळवळ करूं लागतो त्यावेळीं कांहीं किरकोळ अतिरेकाच्या गोष्टी होणें अपरिहार्य आहे." असें त्यांनीं एके प्रसंगीं बोलून दाखविलें. अगदी अखेरचा उपाय म्हणून व लोकांचे भक्कम पाठबळ असेल तर बहिष्कार-शस्त्राचा उपयोग

करण्यास हरकत नाहीं अशी मान्यता गोखले यांनीं आपल्या बनारसच्या भाष-णांत ( १९०५ ) दिली होती. प्रतिपक्षाबद्दलही ते आदर दाखवीत असले तरी भाषेचा स्पष्टपणा व हकपांतील अचुकपणा तें सोडीत नसत. " पांच खेड्यांपैकीं चार खेड्यांतून शाळा नाहीं व आठ मुलांपैकीं सात मुलें अज्ञानांतच लहानाची मोठी होत आहेत असें ते म्हणत. हिंदुस्थानांतील साक्षरतेचें प्रमाण शें. १२ आहे असें म्हणण्यापेक्षां वरील मांडणी परिणामकारक नाहीं असें कोण म्हणेल ? बनारस कॉंग्रेसच्या अध्यक्षीय भाषणाचे वेळींच त्यांनीं लॉर्ड लिटन यांचें एक गुप्त पत्र उघडकीला आणलें. या पत्रांत लॉर्ड लिटननें पुढील विचार प्रकट केले होते. ' ह्या मागण्या व आकांक्षा कधीं पुऱ्या होऊ शकणार नाहींत व होणारहि नाहींत हें आपण सर्वजण जाणतो; हिंदी लोकांना मनाई करणें किंवा त्याना फस-विणें अशा दोन पर्यायांत आपल्याला निवड करावयाची होती. व आपण अगदीं कमी सरळ मार्ग निवडला. मी ज्या अर्थी गुप्त रीतीनें लिहित आहे त्या अर्थी इंग्लंड सरकार व हिं. सरकार यानीं जीं वचनें कानाला सांगितलीं, तीं अंतः-करणावर आदळण्याकारितां आपल्या शक्तीची पराकाष्ठा केली नाहीं असा आक्षेप घेतला जातो. त्या आक्षेपाला त्यांनीं अद्यापपर्यंत समाधानकारक उत्तर दिलें नाहीं असें म्हणण्याला मला दिक्कत वाटत नाहीं.'

हिंदुस्थानचे प्रतिनिधी म्हणून गोखले यांना १९०५ व १९०६ सालीं इंग्लडला पाठविण्यात आलें होतें. १८९७ सालींही गोखले इंग्लंडला एकदा जाऊन आले होते. गोखले हे प्रजा व राजा यांच्या कात्रींत सांपडले होते व त्यांची स्थिति स्पृहणीय नव्हती. त्यांच्या नेमस्तपणामुळें लोक त्यांना शिव्या देत, तर त्यांच्या जहाल वृत्तीमुळें सरकारी अधिकारी नापसंती दाखवीत. या दोन्ही पक्षांतील मध्यस्थाची भूमिका त्यांनीं स्वीकारल्यामुळें त्यांची ही स्थिति झाली होती. सरकार व लोक यांच्यांत खऱ्या दुभाष्याचें काम करणारी कॉंग्रेस संस्था आहे असें चंदावरकरानीं लाहोर कॉंग्रेसच्या अध्यक्षपदावरून सांगितलें होतें. तीच भूमिका गोखल्यानीं घेतली होती. लोकांच्या आकांक्षा ते व्हाइसरॉय यांच्या कानावर घालीत व सरकारच्या मार्गांत कोणत्या अडचणी आहेत हें ते लोकांना समजावून सांगत. यामुळेंच ते लोकांमध्यें थोडेसे अप्रिय झाले होते. सुरत येथें कॉंग्रेसमध्यें फूट पडल्यानंतर गोखले यांच्या संबंधानें लॉर्ड मिंटो यानीं पुढील अभिप्राय व्यक्त केला होता. "पक्षाचे सूत्रधार या

दृष्टीनें गोखले हे पोर आहेत, डॅनियल ओकोनेल व पार्नेल यांच्यांमध्यें नित्य" उभे राहून केकाटणाऱ्या दुय्यम दर्जाच्या आयारिश माणसाप्रमाणें त्यांची स्थिति झाली आहे." गोखले यांच्यासंबंधानें व्हाइसरॉयांची कोणत्या प्रकारची भावना होती हे आणखी एका गोष्टीवरून व्यक्त झालें आहे. लेडी मिंटो यांनीं आपल्या पतीच्या चरित्रांत ही गोष्ट नमूद केली आहे. गोखले यांनीं इंग्लंडमधील आपल्या एका मित्राला पत्र पाठविलें होतें. हें पत्र मोर्ले यांना पाहावयास मिळालें व त्यांनीं त्यांतील एक उतारा लॉर्ड मिंटो यांच्याकडे लिहून पाठविला. या पत्रासंबंधानें लॉर्ड मिंटो यांनीं पुढील-प्रमाणें लिहिलें आहे. ' हें पत्र अगदीं खोडसाळपणानें व दुसऱ्याचा गैरसमज कर-ण्याच्या हेतूनें लिहिलें आहे असेंच मी म्हणेन. या अर्थानें गोखले माझ्याबरोबर कधींही बोलले नसते, आणि हेंच तर अतिशय वाईट आहे. गोखले हे माझ्या पूर्ण परिचयाचे आहेत, त्यांच्याबद्दल मला पुष्कळ कौतुक वाटतें व त्यांच्याबरो-बर मी मित्रत्वाच्या नात्यानें वागतों तरी त्यांच्या सद्भावनेवर अवलंबून रहाता येत नाहीं." गोखले हे जसजसे वृद्ध होऊं लागले तसतसे नोकरशाहीच्या धोरणा-बद्दल ते जास्तजास्तच तक्रार करूं लागले. ' नोकरशाही दिवसेंदिवस उघडउघड स्वार्थी बनत चालली असून राष्ट्राच्या आकांक्षांना ती उघडपणें विरोधही करीत आहे. पूर्वी असें नव्हतें ' असें ते म्हणू लागले. त्यांना भांडवलशाही जाचक होत नव्हती, तर येथें उपस्थित नसलेली भांडवलशाही आणि तिच्या जोडीला पाश्चात्य वर्णश्रेष्ठत्व, नैतिक व आर्थिक शोषण, वाढती मृत्युसंख्या हे सर्व त्यांना जाचक वाटे. देशाच्या राज्यकारभारावर लोकांचें नियंत्रण अधिकाधिक वाढावें व त्यांची स्थिति सुधारावी, या दृष्टीनें त्यांनीं एक योजनाही आंखली होती.

भारत-सेवक-समाजाची स्थापना ही गोखल्यांची महत्वाची विधायक कामगिरी होय. कडक शिस्तीनें वागणारा, साम्राज्याशी राजनिष्ठ असलेला व अल्पवेतना-वर राहणारा असा एक देशसेवकांचा पथ त्यांनीं निर्माण केला.

सुरतच्या फुटीनंतर कॉंग्रेसच्या चळवळींत गोखले यांनीं पुढाकार घेतला. द. आफ्रिकेला त्यांनीं भेट दिली व गांधीजींच्या सत्याग्रहाच्या चळवळीला त्यांनीं मोठी मदत केली. १९०९ च्या अधिवेशनांत सत्याग्रहाच्या पंथाबद्दल त्यांनीं आनंद व्यक्त केला व या पंथाच्या तत्वज्ञानाचें त्यांनीं स्पष्टीकरण केलें. वरिष्ठ कायदे कौन्सिलच्या क्षेत्रांतच त्यांनीं यापुढें बरेंच काम केलें. १९१४

रोगामुळें त्याची मुक्तता करण्यात आली. ते अत्यंत निधडे व दूर दृष्टीचे राजकीय पुरुष होते व त्याच्याबद्दल मागील पिढ्यानीं कृतज्ञ असलेच पाहिजे.

## बद्रुद्दिन तय्यबजी

बद्रुद्दिन तय्यबजी हे कट्टे कॉंग्रेस भक्त होते. तिसऱ्या कॉंग्रेसचें अध्यक्षस्थान त्यांना देण्यांत आलें. कॉंग्रेसच्या प्रातिनिधिक स्वरुपासंबंधानें त्यांनीं आपल्या भाषणांत चर्चा केली व कॉंग्रेस राजनिष्ठ आहे असेंही त्यांनीं प्रतिपादन केलें. कॉंग्रेसकडे ज्या अनेक सूचना चर्चेकरतां येतात त्याच्या विचाराकरतां व कॉंग्रेसच्या कार्यक्रम ठरविण्याकरतां एक कमिटी नेमावी अशी त्यांची सूचना होती व ती मान्य झाली. आजच्या विषयनियामक कमिटीचा उगम या सुचनेतूनच झाला. हायकोर्टाचे जज्ज झाल्यामुळें १९०४ मध्यें मुंबई येथें कांग्रेसचा अधिवेशनापर्यंत तय्यबजीचें नाव या चळवळीत कोठें आढळून येत नाहीं. त्या सालीं सरकारी नोकरींत असलेल्या हिंदी लोकांविषयींचा ठराव आला असतां त्यांत त्यांनीं भाग घेतला. १९०६ सालीं त्यांचें निधन झालें. याच वर्षीं डब्ल्यू. सी. बानर्जी, आनंदमोहन बोस हे कॉंग्रेसचे माजी अध्यक्षही दिवंगत झाले. कॉंग्रेसला या वर्षी या तीन अध्यक्षांच्या निधनाबद्दल दुखवटयाचा ठराव पास करावा लागला.

## न्यायमूर्ति काशिनाथ त्रिंबक तेलंग

कॉंग्रेसची प्रस्थापना करण्याच्या कामीं ज्या मंडळीनीं मेहनत घेतली त्यांपैकीं न्या. तेलंग हे एक प्रमुख गृहस्थ होते. कॉंग्रेसच्या सेक्रेटरीच्या जागीही त्यांची नेमणूक करण्यांत आली होती. हें काम त्यानीं अत्यंत परिश्रमपूर्वक केलें. वरिष्ठ व प्रांतिक कायदे कौन्सिलासंबंधाच्या ठरावावर त्यानीं पहिल्या अधिवेशनात भाषण केलें व मतदारसंघाचा आराखडा मांडला. सर ऑक्लं कॉल्व्हिन व लॉर्ड डफरिन यानीं कॉंग्रेसवर ज्या टीका केल्या त्यांना न्या. तेलंग यानीं चौथ्या अधिवेशनांत झणझणीत उत्तर दिलें. याच अधिवेशनांत कायमधारा पद्धतीसंबंधानें चर्चा होत असता जी कठीण वेळ आली, त्या वेळीं त्याना मध्यें पडणें अवश्य वाटलें. सरकारच्या अनेक विध कार्याकरितां सरकारपाशीं पैसा आहे, फक्त सरकारी उत्पन्नापैकीं शे. १ प्रमाणात शिक्षणावर खर्च होतो, असें याच प्रसंगीं त्यांनीं बोलून दाखविल होतें. १८९३ सालीं ते अकालीं कालवश झाले. दादाभाई नौरोजी यांनीं नवव्या अधिवेशनांत त्यांचा गौरवपूर्वक उल्लेख केला.

रमेशचंद्र दत्त.
१८९९ लखनौ कॉंग्रेसचे अध्यक्ष.

नारायणराव चंदावरकर.
१९०० लाहोर कॉंग्रेसचे अध्यक्ष.

दिनशा वाच्छा.
१९०१ कलकत्ता कॉंग्रेसचे अध्यक्ष.

लाल मोहन घोष
१९०३ मद्रास कॉंग्रेसचे अध्यक्ष.

हेन्री कॉटन.
१९०४ मुंबई कॉंग्रेसचे अध्यक्ष,

गोपाळ कृष्ण गोखले.
१९०५ काशी कॉंग्रेसचे अध्यक्ष

## उमेशचंद्र बानर्जी

उमेशचंद्र बानर्जी हे काँग्रेसचे पहिले अध्यक्ष होते. काँग्रेसचे हेतु काय आहेत हें समजून घ्यावयाचें असल्यास त्यांच्या अध्यक्षीय भाषणाकडेच पाहिलें पाहिजे. या भाषणांत त्यांनीं काँग्रेसचे हेतु स्पष्टपणें मांडले आहेत. आठव्या अधिवेशनाचें ( अलाहाबाद १८९२ ) अध्यक्षस्थान त्यांना पुन्हां देण्यांत आलें. संमतिवयाच्या बिलासंबंधानें १८९१ सालीं देशांत बरीच खळबळ उडाली. लो. टिळक या बिलाविरुद्ध होते व त्यामुळें ते प्रसिद्धीस आले. सामाजिक प्रश्नाच्या बाबतींत काँग्रेसनें मुळींच ढवळाढवळ करूं नये असे बानर्जी यांनीं आपल्या भाषणांत प्रतिपादन केलें. सर्वसामान्य राजकीय चळवळीसंबंधानें त्यानीं या आपल्या भाषणांत पुढील विचार प्रदर्शित केले आहेत.

" आमच्या ओरडीकडे लक्ष न देण्याचें कारण आमच्याप्रमाणें ब्रिटिश प्रजाजन असलेल्या आपल्या युरोपियन बंधूंचा आवाज त्या आवाजांत मिसळला जात नाहीं हें आहे काय ? आमचे युरोपियन बंधू आम्हाला या चळवळींत मिळाले तर आम्ही त्यांचें आनदानें स्वागत करूं. पण आमच्या म्हणण्याचा धिक्कार कां केला जातो ? आमचें पोट दुखतें आहे, आम्हांला त्याची कळ सहन करावी लागत आहे आणि अशा स्थितींत आम्ही ओरडूं लागलों तर तुमची चळवळ तिरस्करणीय आहे, ती निरुपयोगी व दुष्टपणाची आहे, आम्ही तुमचें म्हणणें ऐकणार नाहीं असें सांगण्यांत येतें. असा एक काळ होता कीं, ज्या वेळीं बिनसरकारी युरोपियन लोकांच्या मदतीनें देशांत कोणतीही चळवळ चालू होत असे. त्या वेळीं सरकारचे पुरस्कर्ते मोठ्या आढ्यतेनें म्हणत असत कीं, ही चळवळ एतद्देशीयांची नाहीं. कांहीं थोड्या असंतुष्ट युरोपियनानीं ही 'बावटळ उठविली आहे. त्याचे काही ऐकूं नका. हिंदी लोकांचें हें खरें मत नाहीं, हें युरोपियन लोकाचें मत आहे. आणि आता उलट असें सांगण्यांत येतें कीं, यांचें कांहीं ऐकू नका, कारण यांचे स्वतःचेंच हें मत आहे, युरोपियन लोकाचें नव्हे. यांचा या चळवळीशीं कांहीं संबंध नाही. "

१८९० सालीं इंग्लंडला जें प्रतिनिधीमंडळ पाठविलें त्याचे उमेशचंद्र बानर्जी हे एक सभासद होते. पार्लमेंटरी कमिटी, ( १८८८ ) पुरवठ्यापूर्वी तक्रारी, ( १७८९ ) ज्युरी पद्धती ( १८९५ ) या ठरावावर काँग्रेसच्या त्या त्या अधिवेशनांत झालेल्या चर्चेंत त्यांनीं भाग घेतला होता. ज्यूरी पद्धतीवर बोल-

तांना त्यांनीं पुढीलप्रमाणें एक उत्तम विचार प्रकट केला होता. "कोर्टापुढें आलेल्या अजाणी साक्षीदाराच्या भाषेचें मनांत भाषांतर करून घेण्यांतच जजाचें सर्व लक्ष गुंतलेलें असतें. त्यामुळें साक्षीदाराकडे त्याला लक्ष्य देतां येत नाहीं. ज्यूरीमधील हिंदी गृहस्थाना साक्षीदाराची भाषा कळत असते. साक्षीदाराच्या हावभावाकडे त्यांना लक्ष्य द्यावयाला सांपडते त्यामुळें त्याच्या साक्षींतील खरें कोणतें आणि खोटें कोणतें याची निवड त्याना करितां येते." ब्रिटिश कमिटी ( इंग्लंडमध्यें ) कायम ठेवण्याच्या प्रश्नाचा त्यानीं जोराचा पुरस्कार केला. ( १९०१ ) आणि अशा रीतीनें राष्ट्रसेवाव्रत अमूल्य रितीनें चालवीन असता १९०६ सालीं ते दिवगत झाले.

## लो. टिळक

टिळक आणि गोखले ह्याचा एकत्रच उल्लेख केला पाहिजे. या दोघामध्यें बरेच मतवैचित्र्य असलें तरी त्याच्यामध्यें काहींसें साधर्म्य होते असे सामान्यतः म्हणता येईल. टिळक बोलू लागले म्हणजे ते जितकें प्रत्यक्ष बोलत तितकेंच बोलण्याचे सोडून देत. त्याचे लेख व भाषणें याच दृष्टीनें समजलीं जात. त्यांतील तेजस्विता त्यांचीच स्वत ची होती. लो. टिळक आपल्या विधानांत नेहमीं सौम्य उपरोधाचा उपयोग करीत असत. " देशांतील उत्पन्न तुम्ही हिरावून परदेशी नेलें आणि तें इभ्रत व सल्ला यापेक्षां निराळ्या स्वरूपानें परत केले नाहींत तर देश दिवसानुदिवस अधिकाधिक दरिद्रीच होईल यांत शंका नाहीं." वरिष्ठ सरकारला प्रातिक सरकारने जी खडणी द्यावयाची असते त्यासबंधाने बोलतांना ते म्हणाले ( १८९६ कलकत्ता ) 'रागीट नवरा व त्याची बायको याच्याप्रमाणेच वारिष्ठ सरकार व प्रातिक सरकार याच्यामधील व्यवस्था आहे. आपल्या उधळेपणाच्या चैनीमध्ये आपले सगळे पैसे घालवून आपल्या बायकोनें जो काहीं थोडासा कुणगा राठविला असेल तोही तिनें नवऱ्याला अर्पण केला पाहिजे अशा सारखेच हे सबध ठरविण्यात आले आहेत.' या त्यांच्या वैशिष्ठ्याचें आणखी एक उदाहरण अमृतसर कॉंग्रेसमध्यें बोलतांना दृष्टीस पडतें. "सीझरचे सीझरला द्या आणि परमेश्वराचें परमेश्वराला अर्पण करा" असें ते म्हणाले होते. त्यांच्या या म्हणण्याचा भावार्थ हा कीं, कायद्याचें पालन करणें हें निःसंशय आपलें कर्तव्य आहे. परंतु आपल्या राष्ट्रासंबंधाचें आपलें कर्तव्य हेंहि तितकेंच जरूरीचें आहे.

लो. टिळक हे महाराष्ट्राचे व नंतर होमरूलच्या चळवळीच्या दिवसांत अखिल भारताचे अनभिषिक्त राजे होते. सेवा आणि क्लेश या साधनांनींच त्यांनीं हें पद संपादन केलें होतें. प्लेगला सुरवात झाली व १८९७ सालीं कांहीं सरकारी अधिकाऱ्यांनीं मुंबई व पुणें येथें अत्याचाराचीं कृत्यें केली यामुळें लोकांत भयंकर असंतोष माजला. जहाल पक्षाचा जन्म येथूनच झाला असें डॉ. बेझंट यांचें म्हणणें होतें. मि. रॅंड व लेफ्टनंट आयर्स्ट हे गाडींतून जात असतां मागून त्यांच्यावर गोळी झाडण्यांत आली. ह्या कृत्यांबद्दल दामोदर हरी चाफेकर व त्याचा भाऊ बाळकृष्ण यांना फाशीं देण्यांत आलें व सरदार नातू यांना विनाचौकशी अटक करून तुरुंगांत ठेवण्यांत आलें.

लोकमान्य टिळकांनीं शिवाजीच्या स्मारकाचा उपक्रम सुरू केला. सर्व महाराष्ट्रांत सभा भरवून हे उत्सव साजेरे करण्यांत येऊं लागले. या चळवळींतील पहिल्या सभेस महाराष्ट्रांतील प्रमुख संस्थानिक, जहागिरदार व इनामदारही हजर होते. लो. टिळकाना १८ महिन्यांची सक्त मजुरीची शिक्षा झाली हें मागें सांगितलेंच आहे. शिवाजीमहाराजांचा काल्पनिक संदेश म्हणून कांहीं कविता व शिवाजी उत्सवाचे वेळीं केलेल्या भाषणाचा वृत्तांत प्रसिद्ध केल्याबद्दल १४ सप्टेंबर १८९७ सालीं त्याना ही शिक्षा देण्यात आली होती प्रो. मॅक्समुल्लर, सर वुईल्यम हंटर, सर रिचर्ड गार्थ, मि. वुईल्यम केन, दादाभाई नवरोजी, रमेशचंद्र दत्त यानीं केलेल्या अर्जावरून त्याना ६ सप्टेंबर १८९८ साली मुक्त करण्यात आलें. राजद्रोहाच्या आरोपावरून त्याना पुन्हां शिक्षा झाल्यास हे राहिलेले सहा महिने त्याच्या त्या वेळच्या शिक्षेंत वाढविण्यांत येतील ही सरकारनें घातलेली अट त्यांनीं स्वत:च मान्य केलेली होती. टिळक जेलमध्यें असतांनाच ह्या गुन्ह्याना व्यापक स्वरूप देण्यासाठीं १२४ (अ) व १५३ (अ) या कलमांची 'पिनल कोड'मध्यें भर टाकण्यात आली.

१८९७ सालच्या अमरावती कॉंग्रेसपुढें टिळकांच्या मुक्ततेसंबंधानें जादा ठराव आणण्याचा प्रयत्न सफल झाला नाहीं. तथापि ही उणीव त्या कॉंग्रेसचे अध्यक्ष सर शंकर नायर व सुरेंद्रनाथ बानर्जी यांनीं आपल्या भाषणांत भरून काढली. तुरुंगांत खितपत पडलेल्या या थोर व विद्वान पुरुषाबद्दल त्यांनीं प्रशंसनीय उद्गार काढले. या प्रसंगामुळें टिळकांचा कीर्तिसूर्य मध्यान्हीला आला तर उलटपक्षीं त्याच वर्षी मि. गोखले ह्यांच्या डोक्यावर काळेकुट्ट ढग जमा झाले.

बिहारी घोष यांचें नाव अध्यक्षपदासाठीं सुचविण्यात आलें. कॉंग्रेसच्या त्या वेळच्या नियमाप्रमाणें स्वागत मंडळानें त्यांची नेमणूक केली होती. डॉ. रास बिहारी घोष यांचें नांव पुढें आल्याबरोबर सभेंत जिकडे तिकडे आरडाओरड सुरू झाली. सुरेंद्रनाथ बानर्जी या ठरावाला दुजोरा देण्याकरितां उभे राहिले. पण त्या वेळीं सभेंत इतकी गडबड व गोंधळ झाला कीं, दुसऱ्या दिवसापर्यंत ती सभा तहकूब करावी लागली. दोन्ही पक्षांत तडजोड घडवून आणण्याकरिता पुन्हां एकदा प्रयत्न करण्यांत आले पण ते फुकट गेले. ता. २८ रोजीं पुन्हा कॉंग्रेसची बैठक भरली. अध्यक्षांची मिरवणूक मंडपांतून चालली असतां लो. टिळक यांनी मि. माळवी यांना एक चिठ्ठी दिली. अध्यक्षाच्या निवडणुकीच्या ठरावाला दुजोरा मिळाल्यानंतर मला तहकुबीची सूचना मांडावयाची आहे म्हणून माझें नाव पुकारा असें त्यानी मि. माळवी यांना सागितलें. आदले दिवशीं जें भाषण चालू असतांना सभा तहकूब करण्यात आली तेथूनच सभेच्या कामास सुरुवात झाली. सुरेंद्रनाथ बानर्जी यानीं आपलें भाषण संपविलें व अध्यक्षाच्या निवडणुकीच्या ठरावाला दुजोरा दिला. मि. माळवी याना लो. टिळक यांनीं दिलेल्या चिठ्ठीची आठवण देण्यात आली, पण तिच्याकडे दुर्लक्ष करण्यात आलें. त्या वेळी प्रतिनिधीपुढें भाषण करण्याचा आपला हक्क बजावण्याकरिता लो. टिळक प्लॅटफॉर्मकडे जाऊं लागले. स्वागतमंडळाचे अध्यक्ष व डॉ. घोष या दोघांना अध्यक्षाची झालेली निवडणूक कायदेशीर आहे असें वाटलें व त्यानीं लो. टिळकाना भाषण करण्यास परवानगी दिली नाहीं. सभेमध्यें पुन्हां आरडाओरड व गोंधळ सुरू झाला. याच वेळीं प्रतिनिधी बसलेल्या दिशेकडून एक जोडा फेंकण्यांत आला. सुरेंद्रनाथ बानर्जी यांना चाटून जाऊन तो सर फिरोजशहा मेथा यांच्या अंगावर पडला. नंतर सभेंत सर्वत्र एकच गोंधळ झाला. एकमेकांवर खुर्च्या फेंकण्यांत आल्या. काठ्यांचाही सर्रास उपयोग करण्यात आला, व कॉंग्रेसची त्या दिवसाची बैठक संपली. नेमस्तांना आपले एक स्वतंत्र कन्व्हेन्शन भरविलें आणि कॉंग्रेसकरितां एक निश्चित स्वरूपाची घटना तयार करण्यात आली. नॅशनॅलिस्टांना जवळजवळ कॉंग्रेसमध्यें येताच येऊ नये अशा प्रकारची खबरदारी ही घटना तयार करताना घेतली होती. हा प्रसंग घडून आल्यानंतर इतक्या वर्षांनीं दोन्ही पक्षांच्या विचारसरणीसंबंधानें आपलें मत बनविणें अशक्य आहे. राजकीय प्रश्नाकडे पहाण्याची प्रत्येक

पक्षाची दृष्टि निरनिराळी होती व आपलें मत प्रत्येक पक्ष कॉंग्रेसवर लादूं पहात होता, ही गोष्ट खोटी नाहीं. लो. टिळक ज्यासाठी भांडत होते ती गोष्ट अगदी क्षुल्लक होती. कलकत्ता कॉंग्रेसमध्ये जी घटना मान्य करण्यांत आली तिचा विचार करतां स्वागत मंडळाला अध्यक्षांचें फक्त नाव तेवढें सुचवितां येते कॉंग्रेसमध्यें जमलेल्या प्रतिनिधींनींच शेवटीं अध्यक्ष निवडला पाहिजे असा लो. टिळकांचा आग्रह होता. म्हणून उपसूचना आणण्याची किंवा सभा तहकुबीची सूचना करण्याचा लो. टिळकांचा हक्कच होता. लो. टिळकाना तसें करूं दिले नाही. तात्विक दृष्ट्या लो. टिळकांचें करणें बरोबर नव्हते असें म्हणता येणार नाही. त्याबरोबरच कलकत्याचे ठराव स्वागत मंडळाच्या मसुद्यात समाविष्ट करण्यांत आले नाहीत असा गैरसमज सर्वत्र पसरला होता, म्हणून लोकमत प्रक्षुब्ध झालें होतें. पण असे असले तरी विषय नियामक कमिटीला हे ठराव विचारांत घेतां आले असते. राष्ट्रीय पक्षाच्या दृष्टीनें या ठरावाचें स्वरूप जशा प्रकारचे पाहिजे होतें तसें ते नसले तरी विषय नियामक कमिटीत त्यांचे बहुमत असते तर या ठरावात त्याना फेरफार करता आला असता व जरूर ती दुरुस्तीही करतां आली असती. समजा, हे ठराव गाळण्यात आले असते तरी हे प्रकरण इतके विकोपास जाण्याचें कांही कारण नव्हते. दोन्ही पक्षाच्या पुढाऱ्यात सन- मोकळेपणानें चर्चा झाली असती तर या प्रश्नाचा निकाल समाधानकारक रीतीनें लागला असता. परंतु नेमस्त पक्षातील पुढाऱ्यांच्या संतापामुळेंच ही गोष्ट शक्य झाली नाहीं. एकादा प्रसंग घडून आल्यानंतर त्या बाबतींत शहाणपणाच्या गोष्टी सांगूं लागणें सोपें आहे. चांगले मोठमोठे पुढारीही अशा प्रसंगी आपल्या मनाचा समतोलपणा राखूं शकत नाहीत. लो. टिळक व नामदार गोखले यापैकीं कोणा- वरहि या बाबतींत कोणत्याही प्रकारचा दोष देऊं पाहणे अदूरदर्शीपणाचे आहे. तेव्हां या दोन्ही पुढाऱ्यांबद्दल आम्हाला वाटणारा आदर यत्किंचितही कमी होऊं न देतां आम्ही हा अप्रस्तुत प्रसंग संपवितो.

लो. टिळक हे कट्टर राष्ट्रीय होते तथापि त्या काळांत आपल्याला काय करता येईल याची मर्यादा ते ओळखून होते. दर २० वर्षांनीं हिंदुस्थानच्या परिस्थितीसंबंधानें चौकशी करण्यांत यावी व या मागणीचें महत्व इंग्लंडमधील लोकांनीं तेथील निवड- णूकीचे प्रसंगीं समजून सांगण्याकरितां एक शिष्टमंडळ इंग्लंडला पाठवावें. या ठरावाला ( १९०४ ) दुजोरा देतांना लोकमान्य टिळक म्हणाले कीं, " इंग्लंड-

मध्यें चळवळ केलीच पाहिजे. हिंदुस्थानसरकारचें मन अभेद्य असल्यामुळें इंग्लंडमधील न्यायाधिशांपुढेंच आपलें हें गाऱ्हाणें मांडलें पाहिजे. तेच तिचा निकाल लावूं शकतील. तेथील सुशिक्षित लोकांनाच आम्हीं गांठलें पाहिजे आणि इंग्लडमध्यें एक कायमचें राजकीय कार्यकर्त्यांचें मंडळ नेहमीं ठेवण्यांत आलें पाहिजे." १९१८ सालीं सर व्हॅलेन्टाइन चिरोल यांच्यावर इंग्लंडमध्यें करण्यांत आलेल्या फिर्यादीच्या संबधांत ते इंग्लडांत गेले. आपल्याला राजद्रोही म्हणून आपली बेअब्रू केली असा लो. टिळकांचा सर व्हॅलेन्टाइन चिरोल यांज-वर आरोप होता. या खटल्याकरितां ते इंग्लंडमध्यें गेले असतां लेबर पक्षाच्या कर्तृत्वासंबधानें व वजनासंबंधानें त्यांना इतका विश्वास वाटला कीं, लेबर पार्टीनें हिंदुस्थानच्या उद्धाराकरितां झटावें म्हणून त्यांनीं या पक्षाला २००० पौंड दिले. या पूर्वीच्या राजकीय पुढाऱ्यांचा लिबरल पार्टीवर विश्वास होता पण त्यानंतर-च्या राष्ट्रीय पुढाऱ्यांना लेबरपार्टीबद्दल विश्वास वाटूं लागला. चिरोलवरील खटल्याचा निकाल निराशाजनक लागला. या प्रसंगानें तरी त्यांचे डोळे उघड-तील व हिंदुस्थानातील ब्रि. राज्यसत्तेचें खरें स्वरूप त्यांना कळून येईल व सर-कारविरुद्ध करण्यांत येणाऱ्या चळवळींचा ते मोर्चा बदलतील अशी अपेक्षा होती. परंतु १९१९ च्या सुधारणांचा कायदा पास झाल्याबरोबर आपण प्रति-योगी सहकारितेच्या बाजूचे आहोंत, असें त्यांनीं जाहीर केलें, आणि सहकारिते-संबंधानें चर्चा सुरू झाली त्या वेळीं त्यानीं तींत प्रामुख्यानें भाग घेतला नाहीं.
...कांना भा...लेल्या खिलाफतीच्या आपत्तीच्या प्रसंगीं आपण त्याला आनंदानें
ओरड व गोंधळ सुरु... म्हणत होते; पण ता. १ ऑगष्ट १९२० रोजीं ते कालवश
जोडा फेंकण्यांत आला... ी चळवळही अगदीं त्याच दिवशीं सुरू व्हावयाची होती.
शहा मेथा यांच्या अगा... ाऱ्या काळांतले असे एकच पुढारी होते कीं, त्यांना
मेकांवर खुर्च्या फेंकण्... ा छळल्यामुळें कष्ट सोसावे लागले. १९०८ सालीं त्यांना

गोखले हे त्या काळाला अनुरूप असलेल्या पातळीवरच चळवळ करीत होते, तर टिळक त्या काळाच्या पुढें गेलेले होते.

## सुरेंद्रनाथ बानर्जी

सुरेंद्रनाथ बानर्जी यांचा कॉंग्रेसशी २० वर्षापेक्षांही जास्त दिवस संबंध होता. कॉंग्रेसच्या प्लॅटफॉर्मवर त्यांनी फुंकलेल्या तुतारीच्या निनादाने सर्व हिंदुस्थान निनादून गेलें इतकेंच नव्हे तर सुधारलेल्या जगातील प्रत्येक कानाकोपरा तिनें निनादून सोडला. भाषेवरील प्रभुत्व, सुदर भाषाशैली, उच्च भावनानीं युक्त असलेलें कल्पनावैपुल्य व मर्दानी आवेश इ. बाबतीत सुरेंद्रनाथ बानर्जी याचा हात कोणीही धरूं शकणार नाही राजनिष्ठेचे प्रतिपादन हा सुरेंद्रनाथ बानर्जी याच्या भाषणांतील खसगणा होता सुरेंद्रनाथ बानर्जी हे (१८९५) पुणें व (१९०२) अलाहाबाद येथें झालेल्या अधिवेशनाचे अध्यक्ष होते. काग्रेसपुढे आलेल्या विषयापैकीं व ठरावापैकी असा कोणताही विषय किंवा ठराव नव्हता कीं ज्यांत सुरेंद्रनाथ हे नव्हते. १९ व्या शतकाच्या अखेरपर्यंत रशियाच्या बागुलबोवाची भीति दाखविण्यात येत होती. रशियाच्या स्वारीविरुद्ध खरी व शाश्वत तटबंदी उभी करावयाची असेल तर दूरवरच्या दुर्लंघ्य व न सापडलेल्या पर्वतात ती उभी करण्यात अर्थ नसून राजनिष्ठ व संतुष्ट प्रजेच्या खोल अंत.करणातच त्या तटबंदीचा पाया घातला पाहिजे असें सुरेंद्रनाथ बानर्जीनी बोलून दाखविले होतें. ब्रिटिश पार्लमेंटात हिंदी प्रश्न हा पक्षाचा कार्यक्रम करण्यात यावा अशी एक सूचना सुरेंद्रनाथ बानर्जी यानी केली होती. पण ही गोष्ट अद्यापीहि साध्य झालेली नाहीं. ब्रिटिश साम्राज्यातील स्वतंत्र घटकांच्या संयुक्त संघटनेत हिंदुस्थानाला मानाचें स्थान प्राप्त व्हावे हें बानर्जी यांचे ध्येय होते. १८ व्या अधिवेशनात ब्रिटिशाची सत्ता हिंदुस्थानांत चिरकाल टिकली पाहिजे असा त्यानीं पुरस्कार केला. ब्रिटिश राज्यघटना, ब्रिटिश संस्कृति, ब्रिटिशांची न्यायबुद्धि या सर्वावर सुरेंद्रनाथ बानर्जीचा पूर्ण विश्वास होता. ते पूर्ण राजनिष्ठ होते तरी लॉर्ड मिंटो यांच्या कारकीर्दांत बारिसाल येथील सभा उधळून लावतांना पोलिसाच्या लाठीचा प्रहार सुरेंद्रनाथ बानर्जीनाही मिळाला होता. तथापि बंगालची दिवाणगिरीही त्यांना आपल्या आयुष्यांत उपभोगावयास मिळाली होती.

रांवर चढून जाणें शक्य नाही अशा उत्तुंग शिखरें असलेल्या विशाल व भव्य हिमालयाप्रमाणें लो. टिळक गांधीजींना दिसले. व जिच्यात आत्मविश्वासपूर्वक बुडी मारतां येईल अशा पवित्र गंगेप्रमाणें त्यांना गोखले आढळून आले. टिळक आणि गोखले हे दोघेही महाराष्ट्रीय होते. ते दोघेही ब्राह्मण होते. ते दोघेही चित्पावन शाखेचे होते. ते दोघेही पहिल्या प्रतीचे देशभक्त होते. दोघांनींही आपआपल्या आयुष्यांत अत्यंत मोठा स्वार्थत्याग केला होता. पण त्याचे स्वभाव मात्र परस्पराच्या स्वभावाहून अत्यंत भिन्न होते. त्या वेळीं प्रचलित असलेल्या भाषेप्रमाणें बोलावयाचें असल्यास गोखले नेमस्त होते व टिळक जहाल होते. चालू स्थितीत सुधारणा करण्याचा गोखले यांचा विचार होता तर तिची पुनर्घटना केली पाहिजे असे टिळक म्हणत होते. याकरितां प्रतिपक्षाशीं अवश्य झगडत राहिलें पाहिजे असें टिळकाना वाटत होतें. आणि शक्य तेथें सहकार्य व जरूर तेथें विरोध असें गोखले याचें धोरण होतें. प्रतिपक्षाच्या मार्गात अडथळे उत्पन्न करीत राहावें याकडे टिळकांची प्रवृत्ति होती तर चालू राज्यकारभाराशीं संबंध ठेवून त्यातच सुधारणा करून घ्यावयाच्या याकडे गोखल्याचा कल होता. राष्ट्र व त्याचा पुनरुद्धार या उच्च विचारानें टिळक प्रेरित झाले होते तर प्रेम व सेवा हे गोखल्याचे ध्येय होतें. आपल्या ध्येयसिद्धीकरितां लोकसेवा करावी व आत्मकष्टही सहन करण्यास तयार असावें असा टिळकांचा दंडक होता परकीयांचीं मनें जिंकून त्यांना आपलेसें करावे हे गोखल्यांचे मार्ग होते तर परकीयाना बाजूस सारून त्या ठिकाणीं स्वकीयांची सत्ता प्रस्थापित करावी असा टिळकांचा विचार होता दुसऱ्यांच्या मदतीवर गोखले अवलंबून होते तर स्वावलंबनावर टिळकाचा विश्वास होता. श्रीमंत व बुद्धिमान वर्गाकडे गोखल्याची दृष्टि होती, तर बहुजनसमाजांतील लाखो लोकांकडे टिळक पहात होते. कायदेमंडळाचें सभागृह हें गोखल्याचे कार्यक्षेत्र होतें,तर खेडयातील माडवाखालची चावडी हें टिळकांचें कार्यक्षेत्र होतें. आपले विचार प्रकट करण्याचें इंग्रजी हे गोखल्याचें माध्यम होतें तर मराठी हे टिळकाचें माध्यम होतें. गोखल्यांचें ध्येय स्वत.चे सरकार हे होते. त्याकरतां लोक लायक झाले पाहिजेत आणि ही लायकी इंग्रजांनीं ठरविलेल्या परिक्षेनें सिद्ध केली पाहिजे असें गोखले म्हणत. परकीयांचा अडथळा व लुडबुड मध्यें न ठेवतां प्रत्येक हिंदी माणसाचा जन्मसिद्ध हक्क असलेलें स्वराज्य संपादन करावयाचें हें टिळकांचें ध्येय होतें.

गोखले हे त्या काळाला अनुरूप असलेल्या पातळीवरच चळवळ करीत होते, तर टिळक त्या काळाच्या पुढें गेलेले होते.

## सुरेंद्रनाथ बानर्जी

सुरेंद्रनाथ बानर्जी यांचा कॉंग्रेसशी २० वर्षापेक्षाही जास्त दिवस संबंध होता. कॉंग्रेसच्या प्लॅटफॉर्मवर त्यांनी फुंकलेल्या तुतारीच्या निनादानें सर्व हिंदुस्थान निनादून गेले इतकेंच नव्हे तर सुधारलेल्या जगांतील प्रत्येक कानाकोपरा तिनें निनादून सोडला. भाषेवरील प्रभुत्व, सुंदर भाषाशैली, उच्च भावनांनीं युक्त असलेले कल्पनावैपुल्य व मर्दानी आवेश इ. बाबतीत सुरेंद्रनाथ बानर्जी यांचा हात कोणीही धरूं शकणार नाहीं. राजनिष्ठेचे प्रतिपादन हा सुरेंद्रनाथ बानर्जी याच्या भाषणांतील खमगमणा होता सुरेंद्रनाथ बानर्जी हे (१८९५) पुणें व (१९०२) अलाहाबाद येथें झालेल्या अधिवेशनाचे अध्यक्ष होते. काग्रेसपुढे आलेल्या विषयापैकीं व ठरावापैकीं असा कोणताही विषय किंवा ठराव नव्हता कीं ज्यात सुरेंद्रनाथ हे नव्हते. १९ व्या शतकाच्या अखेरपर्यंत रशियाच्या बागुलबोवाची भीति दाखविण्यांत येत होती. रशियाच्या स्वारीविरुद्ध खरी व शास्त्रीय तटबंदी उभी करावयाची असेल तर दूरवरच्या दुर्लंघ्य व न सापडलेल्या पर्वतात ती उभी करण्यात अर्थ नसून राजनिष्ठ व संतुष्ट प्रजेच्या खोल अंत करणातच त्या तटबंदीचा पाया घातला पाहिजे असें सुरेंद्रनाथ बानर्जींनी बोलून दाखविले होते. ब्रिटिश पार्लमेंटात हिंदी प्रश्न हा पक्षाचा कार्यक्रम करण्यात यावा अशी एक सूचना सुरेंद्रनाथ बानर्जी यानी केली होती. पण ही गोष्ट अद्यापीहि साध्य झालेली नाहीं. ब्रिटिश साम्राज्यातील स्वतंत्र घटकाच्या संयुक्त संघटनेत हिंदुस्थानाला मानाचे स्थान प्राप्त व्हावे हे बानर्जी याचे ध्येय होतें. १८ व्या अधिवेशनात ब्रिटिशाची सत्ता हिंदुस्थानात चिरकाल टिकली पाहिजे असा त्यांनीं पुरस्कार केला. ब्रिटिश राज्यघटना, ब्रिटिश संस्कृति, ब्रिटिशाची न्यायबुद्धि या सर्वावर सुरेंद्रनाथ बानर्जींचा पूर्ण विश्वास होता. ते पूर्ण राजनिष्ठ होते तरी लॉर्ड मिंटो याच्या कारकीर्दीत बारि-साल येथील सभा उधळून लावतांना पोलिसांच्या लाठीचा प्रहार सुरेंद्रनाथ बानर्जींनाही मिळाला होता. तथापि बंगालची दिवाणगिरीही त्यांना आपल्या आयुष्यांत उपभोगावयास मिळाली होती.

१९०९ सालीं (लाहोर) ते कांग्रेसचे पहिल्यांदा अध्यक्ष झाले. २४ व्या अधिवेशनाच्या प्रसंगीं सर फेरोजशहा मेथा यांची अध्यक्ष म्हणून निवड करण्यांत आली होती. पण काय कारण झालें कोणास ठाऊक फेरोजशहांनीं हा मान नाकारला व अधिवेशनापूर्वी अवघे सहा दिवस त्यांनीं कॉंग्रेसला तसें कळविलें. यामुळें एकाएकी कॉंग्रेसचें अध्यस्थान स्वीकारण्याविषयीं त्याना विनति करण्यांत आली. यानंतर १० वर्षांनीं म्हणजे १९१८ सालीं ३३ व्या अधिवेशनाचे अध्यक्ष म्हणुन त्यांची निवड करण्यांत आली.

## लाला लजपतराय

जुन्या कांग्रेसच्या पुढाऱ्यांत लाला लजपतराय हे एक प्रमुख होते. अलाहाबाद कॉंग्रेसमध्ये ( १८८८ ) कौंसिलवाढीच्या ठरावावर लाला लजपतराय यांनीं पाहिलें भाषण केलें या वेळीं सर सय्यद अहमद याच्या या बाबतींतील मताचा त्यांनीं उल्लेख केला. सर सय्यद अहमद हे कांग्रेसचे कट्टे विरोधक असले तरी कायदेकौंसिलांतून लोकमताला पूर्ण वाव मिळाला पाहिजे असें त्यांचें मत होते. १८५८ सालीं सय्यद अहमद यानीं लिहिलेल्या "हिंदी लोकाच्या बंडाचीं कारणें ( Causes of the Indian Revolt )" या पुस्तकांत या कायदे-मंडळांतून लोकाचे प्रतिनिधी असल्यास राजसत्तेला स्थिरता प्राप्त करून देण्याच्या कामीं त्याचा उपयोग होतो. तसेंच एकाद्या संकटाचा एकाएकी स्फोट होण्या-पूर्वी त्याची सूचना देण्याच्या कामींही हे प्रतिनिधी उपयोगीं पडतात असें त्यानीं म्हटलें होतें. राजकीय व सामाजिक चळवळींत चिकाटीने काम करीत राहिल्या-मुळें केवळ पंजाबांतच नव्हे तर अखिल भारतात एक प्रमुख पुढारी म्हणून लजपत-राय यांना मान देण्यांत येऊं लागला एक असामान्य वक्ते व राष्ट्रीय मताचे पुरस्कर्ते म्हणून बनारस कॉंग्रेसमध्यें ते चिरस्मरणीय झाले. १९०७ सालीं लाला लजपत-राय व सरदार अजितसिंह याना हद्दपार करण्यांत आलें. १९०७ डिसेंबरांत सुरत कांग्रेसच्या अध्यक्षपदाकरितां [illegible] ल[illegible] नांव सुच-विण्यांत आलें. ना. गोखले यांनीं [illegible] ध[illegible] सरका-रच्या धिःकार कराल तर सरकार [illegible] नाहीं" असें गोख[illegible]
लालाजींनीं [illegible] आच [illegible]
नहजोडीच[illegible]

देऊन त्यांच्या कामगिरीचा गौरव करावा असें लो. टिळकांनी सुचविलें. सुरेंद्रनाथ बानर्जी यांनीं या सूचनेस तात्डतोब अनुमति दिली. पण तिचा कांहीं उपयोग झाला नाहीं. १९०६ साली गोखले यांच्याबरोबर हिंदी शिष्टमंडळाचे एक सभासद म्हणून लालाजींना इग्लंडला पाठविण्यांत आलें होतें. पण पुढच्या कांहीं वर्षांत सरकारच्या गुप्त पोलिस खात्यातील लोकांनीं त्यांना इतका त्रास दिला कीं, महायुद्धाचे वेळीं अमेरिकेत जाऊन राहण्याचे त्यांनी सक्तीमुळेच ठरविलें असा समज आहे. कॉंग्रेसचा अध्यक्ष होण्याची लालाजींची पाळी फार उशीरा आली. कलकत्त्याच्या जादा कॉंग्रेसचें (१९२० सप्टेंबर) अध्यक्षस्थान लालाजींना देण्यात आलें. पाण्यांतून बाहेर पडलेल्या माशाप्रमाणे त्यांची स्थिति झाली होती. असहकारितेच्या उत्पादकाशीं त्याचें पटलें नाहीं. आपल्या समारोपाच्या भाषणात या चळवळीला यश येणार नाहीं असे त्यांनीं भाकित केलें होते. लाला लजपतराय लढाऊ वृत्तीचे होते पण ते सत्याग्रही नव्हते. निःशस्त्रप्रतिकार व कायदेभंग यात फारसा फरक नाही, असें त्यांचें मत होतें. असहकारितेचा हा सर्व काळ त्याना फार कठिण गेला खुद्द त्याच्या प्रांतांतच त्यांच्या विरुद्ध तरुण मंडळीचा एक पक्ष निर्माण झाला. कौंसिलप्रवेशाचा कार्यक्रम सुरू झाल्यावर त्याना जोर चढला, पण पोलिस अधिकाऱ्याने त्यांना लाठीचा तडाखा दिल्यामुळे ते आजारी पडले व शेवटी त्यातच त्याचा अंत झाला. लालाजींना अचूक दृष्टी होती. १८८८ च्या कॉंग्रेसमध्ये त्यानीं उर्दूत भाषण केलें आणि अर्धा दिवस औद्योगिक व शैक्षणिक प्रश्नाना ठेवावा असें सुचविलें. तो ठराव मान्य झाला व तेव्हापासूनची प्रदर्शने त्या वेळीं नेमलेल्या कमिटीच्या शिफारसीचें फळ आहे.

## सर फेरोजशहा मेथा

अगदीं पहिल्यापासून कॉंग्रेसशी संबंध असलेल्या मंडळीपैकीं सर फेरोजशहा हे एक होते. कॉंग्रेसचें धोरण व कार्यक्रम ठरविण्याच्या कामींही फेरोजशहा मेथांनीं पुढाकार घेतला होता. १८९० सालच्या कलकत्ता कॉंग्रेसचे ते अध्यक्ष होते. 'प्रातिनिधिक राजसत्ता चालविण्याला पौर्वात्य लोक लायक नाहींत कारण त्याची ती परंपरा नाहीं, व तशी त्याच्या मनाची ठेवणहि नाहीं ' या लॉर्ड सॉल्सबरी याच्या उद्गारावर त्यांनीं जोराची टीका केली. पौर्वात्य राष्ट्रें ही स्थानिक स्वराज्याची जन्मभूमी असून ही संस्था पौर्वात्य राष्ट्रांत पौर्वात्य राष्ट्राइतकीच

प्राचीन आहे हा मि. ॲन्स्टे यांच्या पत्रकांतील उतारा त्यांनीं वाचून दाखविला. "कॉंग्रेस ही बहुजनसमाजाची प्रतिनिधी नाहीं, ही गोष्ट खरी आहे; पण या समाजाचीं गाऱ्हाणीं सरकारपुढें मांडणें व ती दूर करून घेण्याच्या कामीं सूचना करणें हें त्यांच्या सुशिक्षित देशबंधूचें कर्तव्य आहे," असें त्यांचें म्हणणें होतें. इतिहासाची शिकवण तशीच आहे हें सांगतांना ते म्हणतात "देशांतील सुशिक्षित व बुद्धिवान लोकांना जो शिक्षणाचा अमूल्य ठेवा मिळाला आहे,त्याची कृतज्ञतापूर्वक परतफेड ते आपलीं गाऱ्हाणीं मांडून व तींही नेमस्तपणें मांडून समयज्ञतेनें व दूरदृष्टीनें, मुत्सद्देगिरीचा उदय व्हावा या बुद्धीनें करीत अ[illegible] हा कॉंग्रेसचा खरोखर मोठेपणा आहे. आमच्या हाकेला इंग्रजी मुत्सद्देगिरी [illegible] ओ देईल याविषयीं मला शंका नाहीं".,

'इंग्लंड व हिंदुस्थान यांचा संबंध इंग्लंडला आणि साऱ्या जगाला [illegible]मीं पिढयापर्यंत भूषणभूत व्हावा अशीच इंग्लंडची परंपरा आहे. अ[illegible]चा प्रार्थना व्यर्थ जाऊं नये म्हणून मी शत्रूंना व मित्रांना विनंति [illegible]तरी पुष्कळ वर्षेपर्यंत फिरोजशहा ही एक कॉंग्रेसच्या मागें प्रबळ शक्ति होते. १८९२ च्या अधिवेशनांत पब्लिक सर्व्हिस कमिशनच्या बाबतीत पार्[illegible]चीं अर्ज सादर करण्याकरितां एक कमिटी नेमण्यांत आली. फिरोजशहा [illegible]पुढे-कमिटीचे सभासद होते. पब्लिक सर्व्हिस कमिशननें ज्या शिफारशी [illegible]लीं होत्या त्यांना वाटाण्याच्या अक्षता लावल्यामुळें कॉंग्रेसच्या पुढाऱ्यांची निरा[illegible] झाली. १८९४ च्या अधिवेशनांत ( मद्रास ) त्या वेळचे व्हॉइसरॉय लॉर्ड एल्जीन ह्यांच्यापुढें कॉंग्रेसमध्यें पास झालेले कांहीं ठराव मांडण्याकरितां एक डेप्युटेशन पाठवावयाचें ठरलें. ह्या शिष्टमंडळाचे सभासद म्हणून फिरोजशहा मेथा याची निवडणूक करण्यांत आली होती. १९००, साली ( लाहोर ) फिरोजशहा मेथांना पुन्हां असाच मान देण्यांत आला. लखनौच्या कॉंग्रेसमध्यें ( १८९९ ) त्यांना इंडियन कॉंग्रेस कमिटीचे सभासद नेमण्यांत आलें.

१९०७ सालीं सुरतेच्या कॉंग्रेसमध्यें नेमस्त पक्षाचा त्यांनीं पाठपुरावा केला. ह्यानंतर कॉंग्रेसच्या बाबतींत त्यांचें नांवही कोठें ऐकूं येईनासें झालें. पुढें १९०९ सालीं २४ व्या अधिवेशनाचें त्यांना अध्यक्ष निवडण्यात आलें. परंतु त्यांनीं आयत्या वेळीं हा मान नाकारला व अधिवेशनाच्या आधीं सहाच दिवस त्यांनीं कॉंग्रेसच्या स्वागत मंडळाला तसें कळविलें. यामुळें पंडित मदन मोहन मालवीय यांना त्यांच्या जागीं अध्यक्षपदाचा मान देण्यांत आला.

डॉ. राशबिहारी घोष
१९०८ मद्रास कॉंग्रेसचे अध्यक्ष

पं. मदन मोहन मालवीय
१९०९ लाहोर व १९१८ दिल्ली कॉंग्रेसचे अध्यक्ष

पं. बिशन नारायण धार
१९११ कलकत्ता कॉंग्रेसचे अध्यक्ष

रं. न मुधोळकर
१९१२ बांकीपूर कॉंग्रेसचे अध्यक्ष

नवाब सय्यद महंमद बहादुर
१९१३ कराची कोंग्रेसचे अध्यक्ष

भूपेंद्रनाथ वसू
१९१४ मद्रास कोंग्रेसचे

## आनंद मोहन घोष

बंगालमधील सामाजिक व धार्मिक चळवळींतील ब्राह्मोसमाजांतील प्रमुख पुढारी म्हणून यांची प्रसिद्धी होती. ' बंगालचा एक तेजस्वी तारा ' असें त्यांचें योग्य वर्णन करण्यांत आलें आहे. १८७६ सालीं कलकत्ता येथें स्थापन झालेल्या " इंडियन असोसिएशन " चे ते पहिले सेक्रेटरी होते. १८९६ सालापर्यंत कॉंग्रेसशीं ह्यांचा निकट संबंध आलेला नव्हता. शिक्षणखात्याची पुनर्घटना करण्याच्या योजनेसंबंधानें कॉंग्रेसमध्यें आलेल्या ठरावावर ह्यांनीं भाषण केलें. हिंदी लोकांना ह्या खात्यांतील मोठया नोकऱ्या देण्यांत येऊं नयेत, असा ह्या योजनेचा उद्देश आहे असें सांगून ह्या अन्यायाचा त्यांनीं निषेध केला. दिवसेंदिवस हिंदुस्थानची प्रगति होत नसून त्याची पिछेहाटच केली जात आहे, असें त्यांनीं दाखवून दिलें. १८९८ च्या अधिवेशनाचे ( मद्रास ) ते अध्यक्ष झाले. कॉंग्रेसवर प्रतिपक्षांनी केलेल्या टीकांना त्यांनीं आपल्या भाषणांत सडेतोड उत्तरें दिलीं व प्रेमाचा व सेवेचा संदेश त्यांनीं राष्ट्राला दिला; आणि ज्या वेळीं त्यांची देशाला अत्यंत जरूरी होती अशा वेळीं दैवानें त्यांना आमच्यांतून ओढून नेलें.

## मनमोहन घोष

१८८८ सालीं भरलेल्या ( अलाहाबाद ) कॉंग्रेसच्या अधिवेशनाशीं मनमोहनांचा प्रथम संबंध आला. पब्लिक सर्व्हिसेस संबंधाचा ठराव त्यांनीं कॉंग्रेसपुढें मांडला. न्याय व अंमल-बजावणी खातें या प्रश्नांचा खास अभ्यास मि. घोष यांनीं केला होता. १८९५ सालीं ( पुणें ) त्यांनीं ह्या विषयावरील ठराव कॉंग्रेसपुढें मांडले. ह्या खात्यांचें एकीकरणावरच हिंदुस्थानांतील ब्रिटिश सत्ता अधिष्ठित झाली आहे हें मि. जेम्स ह्यांचें गुप्त पत्रक त्यांनीं ह्या कॉंग्रेसमध्यें बाहेर फोडले. १८९६ च्या अधिवेशनांत ( कलकत्ता ) त्यांच्या मृत्यूबद्दल दुखवटयाचा ठराव पास करण्यांत आला.

## लालमोहन घोष

सहाव्या अधिवेशनांत ( कलकत्ता १८९० ) लालमोहन घोष कॉंग्रेसच्या प्लॅटफॉर्मवर पहिल्यानें प्रगट झाले. ब्रॅडला बिलासंबंधाचा ठराव त्यांनीं ह्या अधिवेशनांत मांडला. १९०३ च्या १९साव्या अधिवेशनाचे ( मद्रास ) हे अध्यक्ष झाले. त्यांचें हें भाषण अध्यक्षीय उत्तम भाषणांपैकीं एक समजण्यांत येतें.

## मि. सी. विजयराघवाचार्य

सालेमचे मि. सी. विजयराघवाचार्य हे कॉंग्रेसच्या जुन्या पुढाऱ्यांपैकीं एक आहेत. कॉंग्रेसची घटना ठरविण्याकरिता १८८७ सालीं जी कमिटी नेमण्यांत आली त्याचे हे एक सभासद होते. १९०५ सालीं ना. गोखले ह्यांना आपल्या मागण्याकरितां इंग्लंडला पाठविण्यांत यावें, यासंबंधींच्या ठरावाला त्यांनीं दुजोरा दिला. कायम धारापद्धतीचा ठराव १९०६ सालीं त्यांनीं कॉंग्रेसपुढें मांडला आणि जमिनीवरचा सारा हा खंड आहे ह्या विचारसरणीचा त्यांनीं निषेध केला; व ते म्हणाले कीं, " हिंदुस्थानांत जमीन राजाच्या मालकीची कधींच नव्हती. जगांत जे जन्माला आले त्याचें जग आहे, असें ऋषींनीं म्हटलें आहे. शेत कसल्यानें शेतावर मालकी उत्पन्न होते. राजाचें काम संरक्षण करण्याचें आहे आणि त्या नोकरीकरिता शेतांतील उत्पन्नाचा कांहीं अंश त्यास द्यावयाचा असतो. जमीन राजाच्या मालकीची आहे ही कल्पना पाश्चात्य आहे व सरंजामी आहे, भारतीय नाहीं. "

सुरतेच्या फाटाफुटीनंतर ते कॉंग्रेसपासून निराळे राहिले. नेमस्त कॉंग्रेसची कल्पना त्यांच्या बुद्धीला पटली नाही. १९१६ सालीं लखनौ कॉंग्रेसमध्यें राष्ट्रीय पक्षाच्या लोकाना घेण्यांत आले त्या वेळीं ते पुन्हां कॉंग्रेसमध्यें आले व १९१८ सालीं झालेल्या मुंबईच्या जादा अधिवेशनांत व १९१९ च्या अमृतसरच्या अधिवेशनां-त त्यांनीं मनापासून प्रत्यक्ष भाग घेतला. लोकांच्या मूलभूत हक्काच्या ठरावा-वर त्यांनीं अमृतसरच्या अधिवेशनांत भाषण केलें. नागपूर कॉंग्रेसचे ( १९२० ) ते अध्यक्ष झाले व त्यांनी आपलें काम फारच खुबीनें व नैपुण्यानें केलें.

## पंडित अयोध्यानाथ

। यांच्याबद्दल त्यांच्या सहकारी मंडळींत फारच पूज्य भाव
गालेल्या अलाहाबाद कॉंग्रेसच्या स्वागत-मंडळाचे ते अध्यक्ष
ह्या अधिवेशनाचे अध्यक्ष होते. १८९२ सालीं त्यांच
समध्यें ह्या दोन्ही पुढाऱ्यांच्या मृत्यूबद्दल दुखवटयाचा
ग कॉंग्रेसवर आला. पंडित अयोध्यानाथ ह्यांचें स्मारक
वेळीं पुढें आला त्या वेळीं मि. ह्यूम ह्यांनीं कॉंग्रेसला
उपदेश केला. " स्मारकें करणें किंवा अशाच तऱ्हेचीं
व्यर्थ पैसा घालवूं नका. जो कांय पै पैसा तुम्हांला

मंडळाचे अध्यक्ष होते. काँग्रेसची घटना ठरविण्याकरितां विसाव्या अधिवेशनांत (१९०४ मुंबई) एक कमिटी नेमण्यांत आली त्याचे हे सभासद होते. १९०६सालीं काँग्रेसच्या स्टँडिंग कमिटीवर ह्यांची नेमणूक झाली. १९०८ सालीं मद्रासची कन्व्हेन्शन काँग्रेस भरली त्या वेळीं रासबिहारी घोष यांची अध्यक्षस्थानीं योजना करण्याचा ठराव मांडण्याचा मान याना देण्यांत आला. १९१३ सालीं त्यांना कराची काँग्रेसचे अध्यक्ष निवडण्यांत आले. व त्याच वेळीं कॉंग्रेसची अत्यंत मोठी सेवा त्यांनीं बजावली. नबाबसाहेबांची देशभक्ति अत्यंत शुद्ध स्वरूपाची होती. जातीय भावनेचा विटाळ तिलों लागलेला नव्हता. हिंदुस्थानांतील निरनिराळ्या जातींनीं स्वतंत्रपणें प्रगति करण्याऐवजीं एकजुटीनें प्रगति करणें चांगलें असें ते म्हणत. ऑल इंडिया मॉस्लीम लीगच्या धोरणांत बदल झालेला पाहून त्याना बरें वाटलें. हिंदु आणि मुसलमान या दोन्ही जमातींच्या पुढाऱ्यांनीं एकत्र जमून दोन्ही पक्षांना मान्य होईल असा कार्यक्रम आंखावा अशीही सूचना त्यांनीं केली होती. यानंतर हिंदु व मुसलमान यांच्यात तडजोड होऊन लखनौ येथें काँग्रेस–लीगची योजना तयार करण्यात आली. नबाबसाहेबांनीं कराची येथें पेरलेल्या एकीच्या बीजाचेंच हें रोपटे होतें, असें कोणी म्हटल्यास ती अतिशयोक्ति होणार नाहीं.

## दाजी आबाजी खरे.

कायमधारापद्धति व कायमकुळपद्धति हा काँग्रेसचा दरसालचा आवडता विषय होता. श्री. खरे यांनीं १८९३ सालीं (लाहोर) यासंबंधाचा ठराव मांडला. 'इंग्लंडला पाठविण्यात आलेल्या काँग्रेसच्या शिष्टमंडळाचे यांना सभासद निवडण्यांत आले होते. १९०६ सालीं त्याच्याच ठरावानें पास झालेली कॉं. ची घटना तयार करण्याचे कामीं मि. खरे यानीं अत्यंत मेहनत घेतली होती. १९०९ ते १९१३ पर्यंत मि. डी. ई. वाच्छा यांच्याबरोबर ते काँग्रेसचे सेक्रेटरी होते. हिंदुस्थानांतील कापडाच्या धंद्याची वाढ खुंटविणारा हिंदी कापडावरील जकातीचा कर रद्द करण्यासंबंधाचा ठराव मि. खरे यांनीं मांडला. १९१३ सालीं मॉस्लीम लीगनें स्वराज्याचें ध्येय मान्य केलें, त्याबद्दल लीगच्या अधिवेशनाचा ठराव काँग्रेसपुढें आला असतांना श्री. खरे यांनीं त्यास दुजोरा दिला. हिंदु व मुसलमान याच्यांत बंधुभाव निर्माण झाल्यानेंच स्वराज्याचें ध्येय आपणांस साध्य करतां येईल, असें ते म्हणाले.

जनतेपुढें काँग्रेसचें म्हणणें मांडण्याचें काम ह्या मंडळाकडे सोंपविलें होतें. न्याय व अंमलबजावणी खात्यांची फारकत करावी हा ठराव १८९३ सालच्या अधिवेशनांत त्यांनीं मांडला. ह्या ठरावावर बोलतांना श्रोत्यांना थरारून सोडणारे पुढील उदाहरण त्यांनीं दिलें. "चार लोकांना फांशीची व तिघांना आजन्म हद्दपारीची शिक्षा एका खटल्यांत देण्यांत आली होती. या खटल्यांत कायद्याचे नियमदेखील पाळण्यांत आले नाहींत. प्रॉसिक्युटर व जज्ज हीं दोन्हींही कामें मॅजिस्ट्रेटनींच केलीं." समकालीन परीक्षा या विषयाचाही अभ्यास मि. बानर्जी ह्यांनीं केला होता. काँग्रेसच्या ११ व्या आधिवेशनात (पुणें १८९५) वरील विषयासंबंधींच्या ठरावावर व त्याच्या पुढील वर्षी झालेल्या कलकत्त्याच्या काँग्रेसमध्यें युनिव्हर्सिटीच्या सुधारणांबाबतच्या ठरावावर त्यांनीं भाषण केलें. निमसरकारी शिक्षणसंस्थांच्या चालकांनीं किंवा शिक्षकांनीं राजकीय सभांतून किंवा चळवळींतून भाग घेऊं नये, असें या युनिव्हर्सिटी बिलात म्हटलें होतें. कालीचरण बानर्जी ह्यांनीं आवेशयुक्त भाषण करून ह्या बिलाचा निषेध केला. १९०१ सालच्या आधिवेशनांत भाषण करतांना प्रिव्ही कौन्सिलच्या ज्युडिशिअल कमिटींत हिंदी अपीलें ऐकण्याकरितां हिंदी वकिलांनीं घेण्यात यावें असें त्यांनीं सांगितलें. बाबू कालीचरण बानर्जी हे आणखी कांहीं दिवस जगते तर ते खात्रीनें काँग्रेसचे अध्यक्ष झाले असते. काँग्रेसच्या पहिल्या आधिवेशनाचे अध्यक्ष हिंदु होते. दुसऱ्या आधिवेशनाचे अध्यक्ष पार्शी होते, आणि तिसऱ्या आधिवेशनाचे वेळी मुसलमानाला अध्यक्षाचा मान देण्यांत आला होता. हिंदी जनतेचे पुढारी या नात्यानें हिंदी ख्रिश्चनालाही असा मान मिळाला असता. पण १९०८ सालीं अशी वेळ येण्यापूर्वींच ते मरण पावले.

## नबाब सय्यद महंमद बहादुर

काँग्रेसचा एक सेक्रेटरी हिंदु तर दुसरा सेक्रेटरी मुसलमान अशी पद्धत १९१४ सालच्या मद्रासच्या अधिवेशनापासून सुरू झाली. त्या वेळीं नवाब सय्यद महंमद बहादुर व मि. एन्. सुब्बाराव पंतलू यांना काँग्रेसचे सेक्रेटरी निवडण्यांत आलें. परंतु या पूर्वींच नवाबसाहेब १९१३ च्या अधिवेशनाचे अध्यक्ष होऊन चुकले होते. आपण प्रथम काँग्रेसभक्त व नंतर मुसलमान असे ते मानीत असत. १९०१ सालच्या आरंभींच्या दिवसांत इंडियन काँग्रेस कमिटीवर त्यांची नेमणूक झाली होती. मद्रास काँग्रेसच्या (१९०३) वेळीं नवाब साहेब हे स्वागत

मंडळाचे अध्यक्ष होते. कॉंग्रेसची घटना ठरविण्याकरितां विसाव्या अधिवेशनांत (१९०४ मुंबई) एक कमिटी नेमण्यांत आली त्याचे हे सभासद होते. १९०६साली कॉंग्रेसच्या स्टँडिंग कमिटीवर ह्यांची नेमणूक झाली. १९०८ साली मद्रासची कन्व्हेन्शन कॉंग्रेस भरली त्या वेळीं रासबिहारी घोष यांची अध्यक्षस्थानीं योजना करण्याचा ठराव माडण्याचा मान यांना देण्यांत आला. १९१३ सालीं त्यांना कराची कॉंग्रेसचे अध्यक्ष निवडण्यांत आले. व त्याच वेळीं कॉंग्रेसची अत्यंत मोठी सेवा त्यांनीं बजावली. नबाबसाहेबांची देशभक्ति अत्यंत शुद्ध स्वरूपाची होती. जातीय भावनेचा विटाळ तिला लागलेला नव्हता. हिंदुस्थानांतील निरनिराळ्या जातींनीं स्वतंत्रपणें प्रगति करण्याऐवजीं एकजुटीनें प्रगति करणें चांगलें असें ते म्हणत. ऑल इंडिया मॉस्लीम लीगच्या धोरणात बदल झालेला पाहून त्यांना बरें वाटलें. हिंदु आणि मुसलमान या दोन्ही जमातींच्या पुढाऱ्यांनीं एकत्र जमून दोन्ही पक्षाना मान्य होईल असा कार्यक्रम आंखावा अशीही सूचना त्यांनीं केली होती. यानंतर हिंदु व मुसलमान याच्यात तडजोड होऊन लखनौ येथें कॉंग्रेस–लीगची योजना तयार करण्यांत आली. नबाबसाहेबांनीं कराची येथें पेरलेल्या एकीच्या बीजाचेंच हें रोपटें होतें, असें कोणी म्हटल्यास ती अतिशयोक्ति होणार नाहीं.

## दाजी आबाजी खरे.

कायमधारापद्धति व कायमकुळपद्धति हा कॉंग्रेसचा दरसालचा आवडता विषय होता. श्री. खरे यांनीं १८९३ सालीं (लाहोर) यासंबंधाचा ठराव मांडला. 'इंग्लंडला पाठविण्यात आलेल्या कॉंग्रेसच्या शिष्टमडळाचे यांना सभासद निवडण्यांत आले होते. १९०६ सालीं त्याच्याच ठरावानें पास झालेली कॉं. ची घटना तयार करण्याचे कामीं मि. खरे यांनी अत्यंत मेहनत घेतली होती. १९०९ ते १९१३ पर्यंत मि. डी. ई. वाच्छा यांच्याबरोबर ते कॉंग्रेसचे सेक्रेटरी होते. हिंदुस्थानांतील कापडाच्या धंद्याची वाढ खुंटविणारा हिंदी कापडावरील जकातीचा कर रद्द करण्यासबंधाचा ठराव मि. खरे यांनी मांडला. १९१३ सालीं मॉस्लीम लीगनें स्वराज्याचें ध्येय मान्य केलें, त्याबद्दल लीगच्या अधिवेशनाचा ठराव कॉंग्रेसपुढें आला असतांना श्री. खरे यांनीं त्यास दुजोरा दिला. हिंदु व मुसलमान याच्यांत बंधुभाव निर्माण झाल्यानेंच स्वराज्याचें ध्येय आपणांस साध्य करतां येईल, असें ते म्हणाले.

## मुनशी गंगाप्रसाद वर्मा

काँग्रेसच्या पहिल्या अधिवेशनाला जे तत्कालीन देशभक्त भूषणभूत झाले त्यांत लखनौचे गंगाप्रसाद वर्मा यांची गणना केली पाहिजे. पब्लिक सर्व्हिसच्या प्रश्नावर विचार करण्याकरितां दुसऱ्या आधिवेशनांत एक कमिटी नेमण्यांत आली. पं. गंगाप्रसाद वर्मा हे त्या कमिटीचे सभासद होते. पुढें बऱ्याच वर्षांनीं म्हणजे १९०६ सालीं काँग्रेसच्या स्टँडिंग कमिटीवर त्यांना घेण्यांत आलें.

## श्री. आर. एन. मुधोळकर

त्या काळच्या अत्यंत कष्टाळु काँग्रेसभक्तांत मुधोळकरांची बरोबरी कोणीच करूं शकणार नाहीं. चौथ्या अधिवेशनांत ( अलाहाबाद १८८८ ) पोलिस खात्याच्या सुधारणेसंबंधीं आलेल्या ठरावाला श्री. मुधोळकर यांनीं दुजोरा दिला. "पोलिस खरोखरी लोकप्रिय झाला पाहिजे पण त्याचा तिरस्कारच केला जातो" असें त्यानीं दाखवून दिलें. यानंतर २४ वर्षांनीं म्हणजे १९१२ सालीं बांकीपूर काँग्रेसच्या अध्यक्षस्थानीं त्याची योजना करण्यांत आली. एवढ्या दीर्घकालात निरनिराळ्या राजकीय विषयांचा त्यांनीं अभ्यास केला. शेतकऱ्याची कर्जमुक्तता, दारिद्र्य, आर्थिक सुधारणा व औद्योगिक शिक्षण या विषयांत त्यांचा हातखंडा होता. मि. सी. वाय. चिंतामणी हे श्री. मुधोळकरांचे सहकारी होते. आपल्या तेजस्वी बुद्धिमत्तेच्या जोरावर राजकारणाच्या क्षेत्रांत पाऊल टाकण्यापूर्वी आवश्यक असणारी उमेदवारी करण्याची संधि मि. सी. वाय. चिंतामणी यांना या वेळीं लाभली होती.

## सर सी. शंकर नायर

सर सी. नायर हें त्यांच्या काळांत एक प्रस्थ होतें. १८९७ सालीं अमरावती काँग्रेसचें अध्यक्षस्थान देऊन सर [illegible] एक काम-
गिरीचा गौरव करण्यांत आला. [illegible]
सर शंकर नायर याची मद्रास हा[illegible] करण्यात
आली. १९१[illegible] हिं. सरका[illegible] सभासद
झाले. १[illegible]
निषेध [illegible] त्यांनीं
ते एकद[illegible] ते का[illegible]

'गांधी आणि अराजकता' "Gandhi and Anarchy" या पुस्तकां त्यांनीं गांधीजींवर असेच हल्ले चढविले. पंजाबचे ले. गव्हर्नर सर मायकेल ओडवायर यांनीं सर शंकर नायर यांच्यावर या पुस्तकाच्या बाबतीतच फिर्याद केली व कोर्टखर्चादाखल व नुकसानी दाखल त्यांना ३ लाख रु. भरावे लागले.

## दि. ब. केशव पिले

अगदीं आरंभापासून दि. ब. केशव पिले यांचा काँग्रेसशी संबंध होता. १९१७ सालीं राजीनामा देऊन त्यांनीं कॉंग्रेसशी असलेला आपला संबंध तोडला. शेवटींशेवटी ते काँग्रेसचे सेक्रेटरी व मिसेस बेझंट यांचे सहकारी होते.

## बाबू बिपिनचंद्र पाल

बाबू बिपिनचंद्र पाल, अंबिकाचरण मुजुमदार, वैकुंठनाथ सेन, वगैरे बंगाली पुढारी काँग्रेसमधील लोकप्रिय वक्ते म्हणून प्रसिद्ध होते. बहिष्कार, स्वदेशी व राष्ट्रीय शिक्षण या नवीन चळवळीचा प्रसार करण्याकरितां त्यांनीं सर्व देशभर दौरा काढला होता. कलकत्ता कॉंग्रेसमध्यें (१९०६) बहिष्काराचा आपला अर्थ जेव्हा त्यांनीं प्रतिनिधींपुढें मांडला, त्या वेळी वक्त्यामागून वक्ते पुढे येऊन त्यांनीं तो अर्थ चूक ठरविला. मद्रासच्या दौऱ्यात त्यांनीं केलेलीं भाषणें प्रक्षोभकारक होतीं पण राजद्रोही नव्हतीं असें ॲडव्होकेट जनरल सर व्ही. भाष्यम् अय्यंगार यांनीं म्हटलें होतें व त्याना मद्रास सोडावयास भाग पाडलें होतें.

लॉर्ड मिंटो यांच्या कारकीर्दीत त्याना हद्दपार करण्यांत आलें होतें. 'वंदे मातरम्' पत्राचे संपादक या नात्यानें बाबू अरविंद घोष याच्यावर खटला भरण्यांत आला त्या वेळीं त्यांनीं साक्ष देण्याचे नाकारलें व त्याकरितां मिळालेली सहा महिन्याची सक्तमजुरीची शिक्षा त्यांनीं आनंदानें पतकरली.

आपली साक्ष अरविंदबाबूंना त्रासदायक होईल म्हणून त्यांनीं हा मार्ग पतकरला. इंग्लंडमध्यें असतांना 'हिंदू रिव्ह्यू' नांवाचें मासिक ते चालवीत असत. या मासिकात केलेल्या बॉंबच्या मीमांसेबद्दल इंग्लंडहून परत आल्यावर त्याच्यावर खटला भरण्यांत आला; पण बिपिनबाबूंनीं माफी मागितली. त्यांचा यापुढील इतिहास म्हणजे राष्ट्रीय चळवळीबद्दल त्यांना वाटूं लागलेल्या निरुत्साहाचाच इतिहास होय. ब्राह्मो समाजाच्या चळवळीकडे ते पुन्हां एकदां वळले पण शेवटीं शेवटीं ते अँग्लो-इंडियन पत्रांतून लेख लिहूं लागले. १९२८ सालीं लखनौ येथें झालेल्या सर्व-पक्षीय परिषदेला ते हजर होते. एक सार्वजनिक कार्यकर्ते या नात्यानें त्यांचें हें

शेवटचेंच दर्शन होतें. 'न्यू इंडिया' व 'वंदे मातरम्' यांतील लेखांनीं व वेळो-वेळीं केलेल्या भाषणांनीं बाबू विपिनचंद्र पाल यांनीं त्या वेळच्या तरुणांचीं मनें जादूगाराप्रमाणें भारून टाकली होती ही गोष्ट कबूल करावीच लागेल.

## बाबू अंबिकाचरण मुजुमदार

बाबू अंबिकाचरण मुजुमदार हे वकील होते. कॉंग्रेसच्या चळवळींत एकसारखे धिमेपणानें काम करीत असलेले ते एक पुढारी होते. १९१६ सालीं लखनौ कॉंग्रेसचे ते अध्यक्ष झाले. त्यांची वक्तृत्वाची भरारी असामान्य होती. "Indian National Evolution" हिंदुस्थानची राष्ट्रीय उत्क्रांति या सुंदर व सुप्रसिद्ध पुस्तकाचे ते कर्ते होत.

## भूपेंद्रनाथ बसू

बाबू भूपेंद्रनाथ बसू हेही एक उत्तम वक्ते होते. १९१४ सालीं मद्रास येथें भरलेल्या कॉंग्रेसचे ते अध्यक्ष झाले. स्वराज्याच्या मागणीसंबंधानें बोलतांना ते म्हणाले कीं, "सुखासीनांचे दिवस आतां गेले आहेत. जग झपाट्यानें पुढें चाललें आहे. पश्चिमेकडून पूर्वेकडे येणारा व्यापक व उदात्त विचारांचा ओघ आतां अडवून धरणें शक्य नाहीं. पदोपदीं अडथळा करणाऱ्या नियमांचें जंजीर पायांत अडकवून हिंदी विश्वविद्यालयांना तुम्ही आपल्या इच्छेप्रमाणें खालीं वांकावयास लावाल पण जगाचा विकास करणाऱ्या अचिंत्य शक्तींना तुम्हीं थांबवून धरूं शकणार नाहीं. हिंदुस्थानावरील इंग्रजाची सत्ता म्हणजे नोकर-शाहीचा संस्कारपूर्वक प्रवेश, हिंदुस्थानचें कायमचें पारतंत्र्य व हिंदुस्थानच्या आत्म्यावर धोंड असेल तर मानवी संस्कृतीला मिळालेला तो एक शाप व अखिल मानवतेला जडलेला तो एक कलंक आहे असें म्हणावें लागेल."

भूपेंद्रनाथ बाबू हे सॉलिसिटर होते. त्याचा धंदा यशस्वी रीतीनें चालला होता. कॉंग्रेसच्या कामाकरितां ते आनंदानें आपला वेळ खर्ची घालीत.

## पं. बिशन नारायण धार

१९०३ च्या कॉंग्रेसमध्यें "ऑफिशियल सीक्रेट" बिलावरील ठरावावर पं. बिशन नारायण धार यांचें भाषण झालें. १९११ सालीं ते कॉंग्रेसचे अध्यक्ष झाले. मि. रामसे मॅकडोनल्ड हे या कॉंग्रेसचे अध्यक्ष व्हावयाचे होते पण त्यांच्या पत्नीच्या मृत्यूमुळें त्यांना इंग्लंडला जावें लागलें. अगदीं अनपेक्षितपणें बिशन नारायण धार यांच्या गळ्यांत ही अध्यक्षत्वाची माळ पडली. बंगालची

फाळणी रद्द झाल्यामुळें नोकरशाहीच्या इभ्रतीला जबरदस्त धक्का बसला, अशा वेळीं बिशन नारायण धार हे काँग्रेसचे अध्यक्ष झाले होते. त्यांचें या वेळचें भाषण अत्यंत तेजस्वी व वक्तृत्वपूर्ण झालें.

## रमेशचंद्र दत्त

गेल्या शतकांत प्रसिद्धीस आलेल्या काँग्रेसच्या पुढाऱ्यांत रमेशचंद्र दत्त यांची गणना केली पाहिजे. रमेशचंद्र दत्त हे लंडन टाइम्सनें म्हटल्याप्रमाणें केवळ राजकीय चळवळये नव्हते. "कॉंग्रेसच्या चळवळ्यांना देशांत किंमत नसते. ते मानाला हपापलेले असतात "असें लंडन टाइम्सनें या काँग्रेसच्या पुढाऱ्यांसंबंधानें १८८६ सालीं लिहिलें होतें. पण रमेशचंद्र दत्त सरकारी नोकरींत चढतां चढतां कमिशनरच्या जागेपर्यंत चढले होते. सेवानिवृत्त होऊन काँग्रेसच्या कामांत ते लक्ष घालूं लागले. ते आय. सी. एस्. होते. सरकारी अधिकारी असतांना त्यांना जो भरपूर अनुभव मिळाला होता त्याचा उपयोग त्यांनीं या चळवळीच्या कामीं केला. ग्रामोद्योगांचा नाश व साऱ्याची बेसुमार वाढ हींच दुष्काळाचीं कारणें आहेत असें त्यांचें मत होतें. ३००० वर्षांपूर्वी ज्या राष्ट्रांत ग्रामस्वराज्यें संघटित रीतीनें चालूं होतीं त्या राष्ट्राचा कारभार आतां पोलीस पाहत आहेत याबद्दल त्यांनीं खेद प्रदर्शित केला होता. आज चालू असलेल्या राज्यकारभारांत ' पोलीस हाच जिल्हाधिकारी व जनता यांच्यामधील तिरस्कृत दुवा आहे. ' सारावसूल-पद्धति, आर्थिक प्रश्न व दुष्काळ या विषयांचे ते अधिकारी होते. लखनौ काँग्रेसचे (१८९०) ते अध्यक्ष होते. "देशांत राजद्रोहाचा प्रसार करावयाचा असेल तर वर्तमानपत्रांतून व सभांतून कोणालाही मोकळेपणानें आपले विचार प्रदर्शित करूं देऊं नये, त्यांच्यावर दडपण आणावें हाच सर्वांत उत्तम उपाय आहे" असेंही ते म्हणाले होते.

## एन्. सुब्बाराव पंतलू

काँग्रेसच्या सन्माननीय संस्थापकांपैकीं मि. एन्. सुब्बाराव पंतलू हे एक आहेत. वयाला ८० वर्षें होऊन गेलीं तरी सार्वजनिक कार्याकडील त्यांचें लक्ष कमी झालेलें नाहीं. कॉंग्रेसच्या हल्लींच्या कार्यक्रमांतून ते प्रत्यक्ष भाग घेत नसले तरी ते खरे खरे राष्ट्रीय वृत्तीचे काँग्रेसभक्त आहेत. अगदीं जन्मापासून काँग्रेस-शीं ह्याचा संबंध आलेला आहे. १८८८ च्या काँग्रेसमध्यें ते प्रथम बोलले. त्यानंतर मिठावरील कर, न्याय व अंमलबजावणी खात्याची फारकत,

एक्झीक्युटिव्ह कौन्सिलांत हिंदी लोकांना प्रवेश, ज्युरीपद्धती, वकील लोकांचा दर्जा, इत्यादि अनेक ठरावांवर त्यांचीं ह्यापुढील अधिवेशनांत भाषणें झालीं. वरिष्ठ कायदे कौन्सिलचे सभासद असतांना त्यांनीं पब्लिक सर्व्हिस कमिशनचा ठराव कौन्सिलपुढें मांडला, व तो पास झाला. १९१२सालीं (बांकीपूर) पब्लिक सर्व्हिस कमिशन नेमल्याबद्दल सरकारचे आभार मानण्यांत आले. सरकारकडून एखाद्या पदवीची किंवा नोकरीची त्यांनी कधींही अपेक्षा केली नाहीं. आपल्य सहकाऱ्यांना एकामागून एक अशा प्रकारच्या पदव्या मिळालेल्या ते पाहात होते. उलटपक्षीं १९१४ सालीं त्यांच्या प्रांतांतील मंडळींनीं त्यांना कॉंग्रेसच्या स्वागत मंडळाचें अध्यक्ष निवडलें. १९१४–१५–१६ साली त्यांना कॉंग्रेसचे जनरल सेक्रेटरी निवडण्यांत आलें. १९१७ साली कॉंग्रेसच्या तिसऱ्या सेक्रेटरीच्या जागीं मि. सी. पी. रामस्वामी अय्यर ह्यांची निवड करावी अशी मिसेस बेझंट ह्यांची इच्छा आहे असें पाहून त्यांनीं आपल्या जागेचा उदार मनानें राजीनामा दिला. कॉंग्रेसच्या चळवळीसंबंधानें जनतेंत जागृति करण्याकरितां स्वतःच्या खर्चानें त्यांनीं हिंदुस्थानात दौरा काढला व एक नवीन उदाहरण घालून दिलें.

## लाला मुरलीधर

लाला मुरलीधर हे जेलमधून बाहेर पडल्यानंतर थेट १८८६ च्या दुसऱ्या अधिवेशनामध्यें दाखल झाले, ही गोष्ट कोणीही विसरणार नाहीं. यांना या वेळीं जामिनावर मुक्त करण्यांत आलें होतें. ह्याच्या विरुद्ध कोणताही पुरावा मिळाला नसतांही ह्यांना शिक्षा देण्यांत आली होती. "मी एक राजकीय चळवळ्या आहे, माझीं मला स्वतःचीं मतें आहेत. निर्भयतेनें मला जें वाटतें तें बोलतों, म्हणूनच मला शिक्षा देण्यांत आली." असें ते म्हणाले.

डेराइस्माइलखानचे लाला मलीक भगवानदास हे या अधिवेशनांत उर्दूत बोलणारे पहिले गृहस्थ होत. कॉंग्रेसमध्यें भाषण करणाऱ्या मिसेस् कदंबिनी गांगुली या पहिल्या स्त्री-प्रतिनिधि होत. १६ व्या कॉंग्रेसमध्यें (१९००कलकत्ता) अध्यक्षांचे आभार मानण्याचें काम ह्यांनींच केलें.

## मि. सच्चिदानंद सिंह

कॉंग्रेसच्या १५ व्या अधिवेशनांत ( लखनौ १८९९ ) मि. सच्चिदानंद सिंह हे प्रथम आले. न्याय व अंमलबजावणी यांची फारकत यासंबंधाच्या ठरावावर ते बोलले. या विषयांचा यापूर्वी बरेच वेळां कीस काढण्यांत आला होता.

तथापि १५ व्या वेळीं पुन्हां तो विचारांत घेण्यांत आला. पुन्हां १९०० सालीं ह्याच ठराव घेण्यांत आला. "प्रजेच्या प्रेमावरच सरकार अधिष्ठित झालें पाहिजे. योग्य न्याय देण्यांत येईल तरच ही गोष्ट साध्य होईल. आजच्यासारखा अर्धे दूध व अर्धे पाणी असलेला भेसळ न्याय आम्हांला नको आहे. शुद्ध, निर्मळ व पवित्र ब्रिटिश न्याय आम्हांला पाहिजे आहे" असें बोलून त्यांनीं आपलें भाषण संपविलें. याच्याच जोडीचा दुसरा विषय म्हणजे पोलिस खात्यातील सुधारणा. या संबंधाच्या ठरावावर १७ व्या अधिवेशनांत त्यांनी भाषण केलें. ह्या पुढील अधिवेशनांत पुन्हां ह्या विषयावरच त्याचें भाषण झालें व पोलिस कमिशनमध्यें हिंदी प्रतिनिधि योग्य प्रमाणात घेण्यांत आले नाहीत असें ते म्हणाले. लॉर्ड कर्झन ह्यांनीं ह्या कमिशनची नेमणूक केली होती. जे दोन बिनसरकारी सभासद ह्या कमिशनवर घेण्यात आले होते त्यांनीं केलेलें पुढील विधान अत्यंत मार्मिक होते. "ह्यांपैकीं एक सभासद इंग्रजांस नेहमीं संतुष्ट ठेवण्याकरिता खुशामत करणारे सी. आय. इ. आहेत आणि दुसरे एक 'महाराजा' आहेत; ह्यांची अद्याप परीक्षा व्हावयाची आहे" ह्या त्यांच्या विधानांतील औचित्य पुढें प्रत्यक्ष प्रतीतीला आले. मि. सिंह हे बिहारच्या एक्झिक्युटिव्ह कौन्सिलचे सभासद झाले तरी त्यांनीं कोणत्याही पदवीचा स्वीकार केला नाहीं. १९०५ च्या जनरल इलेक्शनचे वेळीं इंग्लंड-मध्यें शिष्टमंडळ पाठविण्याच्या ठरावाला २०व्या अधिवेशनात त्यांनीं पाठिंबा दिला. दादाभाई नौरोजी, सर हेन्री कॉटन व मि. जॉन जॉर्डीन ह्यांना पार्लमेंट-मध्यें निवडून द्यावें हा ठराव त्यांनीं ह्याच अधिवेशनांत पुढें मांडला. काशी येथील २१ व्या अधिवेशनाच्या प्रसंगीं ह्या जुन्या पुढाऱ्यांकडे पोलिस सुधारणा संबंधाचा ठराव जेव्हां पुन्हा सुपूर्द करण्यात आला, तेव्हां पोलिस कमिशननें आपली किती तीव्र निराशा केली आहे व स्पेशल पोलिस सर्व्हिसमध्यें हिंदी लोकांना कसा मज्जाव करण्यांत आला आहे याचे त्यांनीं वर्णन केलें. १९०८ च्या पहिल्या नेमस्त कॉंग्रेसमध्यें एक कार्यकर्ते सभासद म्हणून ते हजर होते. व्हॉईसरॉयच्या एक्झी-क्युटिव्ह कौन्सिलमध्यें लॉ–मेंबरच्या जागीं हिंदी इसमाची नेमणूक होण्याचें ठरलें. परंतु इंग्लिश बारच्या सभासदांनाच ही जागा देण्याचें सरकारनें ठरविलें होतें. हा निर्बंध शहाणपणाचा नाहीं ही गोष्ट श्री. सच्चिदानंद सिंह यांनीं १९१० च्या कॉंग्रेसमध्यें दाखवून दिली व अॅडव्होकेट व वकील ह्यांनाही लायक समजून ही जागा त्यांना दिली पाहिजे, असें त्यांनीं सांगितलें. संयुक्त प्रांताकरतां गव्हर्नर

व कार्यकारी मंडळ नेमण्यांत यावें असें कलकत्ता कॉंग्रेसमध्यें ( १९११ ) त्यांनीं प्रतिपादन केलें. १९१४ सालच्या कॉंग्रेसच्या आधिवेशनाला ते हजर होते. इंग्लंडला पाठविलेल्या डेप्युटेशनचे सभासद ह्या नात्यानें त्यांनीं केलेल्या कामगिरीबद्दल ह्या आधिवेशनांत त्यांचे आभार मानण्यांत आले. भूपेंद्रनाथ बसू, जीना, समर्थ, मझरूल हक्क, नामदार शर्मा, व लाला लजपतराय हेही ह्या डेप्युटेशनचे सभासद होते.

कॉंग्रेसच्या राष्ट्रीय चळवळींत कळकळीनें व स्वार्थत्यागपूर्वक काम करणारे आणखी किती तरी कार्यकर्ते आहेत. ह्यांपैकीं कांहीं निधन पावले आहेत व कांहीं अद्यापि जिवंत आहेत. भावी हिंदुस्थान त्यांचें सदैव ऋणीच राहील. त्यांचा नामनिर्देश करूं लागल्यास मनांत कांहीं हेतू नसतांही उगीच अनिष्ट भेदाभेद केल्यासारखें होईल. म्हणून कृतज्ञतापूर्वक त्या सर्वांचें स्मरण करून आपण आपल्या मनाचें समाधान करून घेणें हेंच उचित आहे.

# भाग २ रा

## प्रकरण पहिलें

## १९१५ ते १९१९

" १९१५ " ही हिंदुस्थानच्या राजकीय इतिहासांतील सीमांत रेषा आहे. " How India wrought for Freedom " 'स्वातंत्र्याकरितां हिंदुस्थाननें कसें प्रयत्न केले' ह्या आपल्या पुस्तकांत मिसेस बेझंट यांनीं १८८५-पासून म्हणजे कॉंग्रेसच्या जन्मापासून ते १९१४ पर्यंत म्हणजे महायुद्धाच्या सुरवातीच्या सालापर्यंत कॉंग्रेसचा इतिहास दिला आहे. रूसो-जपानी युद्धांत जपान विजयी झाल्यामुळें आशियाटिक राष्ट्रांत नवजीवन संचारलें होतें. आपली योग्यता व आपल्या शक्ति ह्यांच्याबद्दल (Renewed) नवा आत्मविश्वास या राष्ट्रांत उत्पन्न झाला होता. १९१४ च्या हिंवाळ्यांत फ्रान्स व फ्लँडर्स येथील रणमैदानांत हिंदी लष्करानें जी सहनशक्ति, व जें शौर्य दाखविलें व जर्मन स्वारीला तोंड देऊन जो विजय संपादन केला त्यामुळें युरोप व आशिया यांत एक नवीनच वातावरण निर्माण झालें. हिंदुस्थानासंबंधानें पाश्चात्य राष्ट्रांना पूर्वीपेक्षांही अधिक आदर वाटूं लागला आणि हिंदुस्थानचें महत्त्व वाढलें. हिंदी लष्करानें महायुद्धांत केलेल्या कामगिरीचें अभिनंदन करण्यांत आलें. पार्लमेंटची मंजुरी मिळेल ह्या अंदाजानेंच हिंदुस्थानांतील लष्कर परदेशांत नेण्यांत आलें होतें. ह्या गोष्टीचाही हिंदी मनावर परिणाम झाल्याखेरीज राहिला नाहीं. या घटनेमुळें सुरेंद्रनाथ बानर्जी-सारख्या पुढाऱ्यांच्या मनांत पारितोषिक मिळविण्याची इच्छा निर्माण झाली तर मिसेस् बेझंटसारख्या दुसऱ्या पुढाऱ्यांच्या मनांत हक्कांची जाणीव उत्पन्न झाली. दीनोद्धाराचें कार्य मिसेस बेझंट यांनीं मि. ब्रॅडलॉ ह्यांच्या कालापासून आजन्म चालविलें होतें. परंतु १९१४ सालीं त्या कॉंग्रेसमध्यें सामील झाल्या. देवाणघेवाण संबंधीच्या प्रश्नासंबंधानें त्या म्हणाल्या की, " हिंदुस्थानच्या राजनिष्ठेबद्दल कांहींतरी बक्षिस देण्यात यावें अशी भाषा सुरू झाली आहे. कांहीं लहानसहान स्वातंत्र्याच्या

हक्कांकरिता किंवा सुधारणांच्या करितां मोबदलल्यादाखल आपल्या सुपुत्रांचें रक्त व सुकन्यांचे अश्रु अर्पण करण्यास हिंदुस्थान तयार नाहीं. राष्ट्र या नात्यानें आपल्या हक्काची प्रस्थापना करण्याची हिंदुस्थानची इच्छा आहे. साम्राज्यांतील इतर देशां-प्रमाणें आपल्यालाही न्याय मिळाला पाहिजे अशी हिंदुस्थानची मागणी आहे. युद्धापूर्वी हिंदुस्थान ही मागणी करीत होते, युद्धकालींही ही मागणी ते करीत आहे व युद्धानंतरही ही मागणी ते करीत राहील. मोबदला म्हणून हिंदुस्थान ही मागणी करीत नाहीं, हक्क म्हणून करीत आहे. ह्या बाबतींत कोणतीही चुकीची कल्पना असतां कामा नये,' मिसेस बेझंट यांनीं थिऑसॉफीच्या क्षेत्रांतून कॉंग्रेसच्या राजकीय क्षेत्रांत उडी मारली, त्या वेळीं त्यांनी आपल्याबरोबर नव्या कल्पना, नवें बुद्धिचातुर्य, नवी साधनें, संघटनेच्या नवीन पद्धति, व नवी दृष्टि आणली. या पूर्वीच त्या एक जगप्रसिद्ध व्यक्ति होत्या व पौर्वात्य व पाश्चात्य राष्ट्रांत, त्यांचे लाखो अनुयायी होते. अनुयायाचें एवढें जबरदस्त पाठबळ व त्यांची स्वतःची अदम्य उत्साहशक्ति याच्यामुळें कॉंग्रेसच्या राजकारणांत नवजीवनाचा संचार झाला असल्यास त्यांत नवल नव्हते.

१९१५ मध्यें कोणती परिस्थिति होती ? १९ फेब्रुवारी १९१५ रोजीं गोखले दिवंगत झाले. १९०९ सालीं कॉंग्रेसच्या अधिवेशनापूर्वी अवघे सहा दिवस फेरोजशहानीं अध्यक्षस्थान स्वीकारण्याचें नाकारल्यापासून ते मागें पडले होते. त्यांनींही १९१५ च्या नोव्हेंबरांत गोखल्यांच्या मागून स्वर्गाची वाट धरली. उत्तरत्या वयांत येणाऱ्या दुबळेपणानें मि. वाच्छा याच्यावर पगडा बसविला होता. वृद्धावस्थेमुळें प्राप्त झालेली शिक्षा मी भोगीत आहे, माझी दृष्टि झपाट्यानें कमी होत चालली आहे असें मि. वाच्छा यांनीं १९१५ च्या मुंबई कॉंग्रेसमध्यें बोलून दाखविलें. शिवाय प्रथमपासूनच ते एक बडे विद्वान गृहस्थ होते व चांगले सेक्रेटरी होते. विजयाचा एक मोर्चा काबीज करून दुसऱ्या मोर्चावर आक्रमण करण्याकरितां आपल्या सैनिकांना हुकूम करणारे ते सेनापति नव्हते. सर नारायण चंदावरकर हे सेवानिवृत्त जज्ज होते, राजकारणांतून क्षीणशक्ति होऊन ते मागें पडले होते. हेरंबचंद्र मित्र, मुधोळकर व सुब्बाराव पंतलू हे कॉंग्रेसच्या लष्करांतील कर्तबगार लेफ्टनंट, कॅप्टन व कर्नल होते; यापेक्षां त्यांची जास्त योग्यता नव्हती. सुरेंद्रनाथ बानर्जी हे थोर खरे परंतु नव्या विचाराशीं ते समरस झाले नव्हते. सैनिकांना मार्ग दाखविणारा कोणीही सेनानी त्या वेळीं हयात

नव्हता. आपली सर्व शिक्षा भोगून १९१४ जून मध्यें लो. टिळक मंडालेच्या कारागृहांतून बाहेर पडले होते. भारत सेवक समाजाचे पहिले सभासद होऊन ना. शास्त्री यांनीं गोखल्यांची जागा घेतली, परंतु मागें राहण्यांतच त्यांनी समाधान मानलें. त्यांचा मूळ स्वभावच तसा आहे. जहाल मनोवृत्ति व नेमस्तपणावरचा विश्वास, तत्व व समयज्ञता, अंतिम ध्येय व तात्कालिक लाभ याच्याबद्दल त्यांच्या मनांत सारखा झगडा चालू असतो. ना. शास्त्री यांनीं पुढली जागा केव्हांही काबीज केली नाहीं व कीर्तीची अपेक्षाही त्यांनीं कधीं केली नाहीं. नेमस्त वळणावर कॉंग्रेसला नेण्याइतका दर्जा प. मालवीय याना प्राप्त झाला नव्हता व तिला पुढेंहि खेचण्याची रग त्याच्यात नव्हती. गांधीजी नुकतेच हिंदुस्थानांत आले होते व निश्चित धोरणावर आपले सार्वजनिक कार्य त्यांनी सुरू केलें नव्हतें. त्यांचे राजकीय गुरु गोखले याच्या सल्ल्यानेच ते चालत होते व देशाच्या परिस्थितीचा ते शांत मनानें अभ्यास करीत होते. देशाची व विशेषतः आपल्या प्रांताची परिस्थिती पाहून लाला लजपतराय वैतागून गेले होते व महायुद्धाच्या कालांत अमेरिकेंत जवळजवळ हद्दपारींतच ते दिवस काढीत होते. सत्येंद्र प्रसन्न सिंह (पुढे लॉर्ड झाले) १९०५ च्या मुंबई कॉंग्रेसचे अध्यक्ष झाले, परंतु नव्या विचाराच्या लोकांशीं त्यांचे बिलकूल जमलें नाहीं व मुंबईच्या अधिवेनानंतर कॉंग्रेसच्या राजकारणाकडे ते लक्षही देईनासे झाले. लोकांचें नेतृत्व राष्ट्राच्या हातून नोकरशाहीच्या हातात जवळजवळ जात चाललें. नेमस्तांच्या हातीं कॉंग्रेसची सत्ता राहिली नव्हती व राष्ट्रीय पक्षाच्या लोकाना आपल्या सामर्थ्या-बद्दल अद्याप विश्वास वाटत नव्हता. १९१४-१५ सालीं दोन्ही पक्षांत तडजोड करण्याचा प्रयत्न मिसेस बेझंट यानी केला, पण तो सफल झाला नाहीं.

१९१५ सालीं लोकमान्य टिळक हे महाराष्ट्राचेच नव्हे तर अखिल हिंदु-स्थानचे अनभिषिक्त राजे झाले असते, पण दुर्दैवानें अशा काहीं गोष्टी जुळून आल्या कीं, न्यायतः त्याचे जें योग्य स्थान होतें तें त्यांना मिळालें नाहीं. तुरुंगां-तून बाहेर आल्यावर लोकमान्यांनीं होमरूलची मोठी चळवळ देशांत सुरू केली व नेमस्तांच्या मनोवृत्ति दुखविण्याचें शक्य तितके टाळून त्याच्याशीं तडजोड करण्याचेहि प्रयत्न केले. पण टिळकांच्या प्रयत्नाच्या बाबतींत नेमस्तांनीं आपली अनुकूलता दाखविली नाहीं. टिळकांचा त्या वेळचा कार्यक्रम त्रिविध स्वरूपाचा होता. (१) कॉंग्रेसमधील समेट, (२) राष्ट्रीय पक्षाची पुनर्घटना,

(२) व होमरूलची प्रचंड चळवळ. पहिला कार्यक्रम पार पाडावयाचा असल्यास कॉंग्रेसच्या प्रतिनिधींची निवडणूक व्यापक प्रमाणावर करण्यात यावी, असें लो० टिळकांचें व त्यांच्या राष्ट्रीय पक्षाच्या अनुयायांचें मत होतें. कॉंग्रेसच्या त्या वेळच्या नियमाप्रमाणें कॉंग्रेसचे प्रतिनिधी निवडण्याचा अधिकार कांहीं ठराविक संस्थापुरताच नियमित करण्यांत आला होता. आणि याशिवाय बाहेरच्या एकाद्या राजकीय संस्थेला हा अधिकार पाहिजे असल्यास त्या संस्थेनें आपल्या साधारण सभेंत कॉंग्रेसच्या पहिल्या कलमास मान्यता दिली पाहिजे असें ठरविण्यांत आलें होतें. "वसाहतीचें स्वराज्य हें कॉंग्रेसचें ध्येय आहे" असें या पहिल्या कलमांत नमूद करण्यांत आलें होतें. याप्रमाणें कॉंग्रेसप्रतिनिधींच्या निवडणुकीची सर्व सत्ता नेमस्तांनीं आपल्या संस्थांच्या हातीं ठेवली होती. त्यामुळें कॉंग्रेसचे प्रतिनिधी होण्याकरितां विरोधी पक्षाच्या लोकांची मनधरणी राष्ट्रीय पक्षाचे लोक करतील, अशी शक्यता नव्हती. याकरितां कॉंग्रेसच्या घटनेतील २० वा नियम विस्तृत करणें जरूर होतें. म्हणून मिसेस बेझंट व कॉंग्रेसचे जनरल सेक्रेटरी मि. एन. सुब्बाराव पंतलू हे १९१४च्या डिसेंबरांत पुण्यास आले व टिळक, गोखले वगैरे मंडळींच्या त्यांनीं भेटी घेतल्या. या नियमांत कशी दुरुस्ती करावयाची हें त्यांच्याबरोबर झालेल्या चर्चेंत ठरविण्यांत आलें. नंतर मि. सुब्बाराव मुंबईला गेले. सर फेरोजशहाशी त्यांनीं या बाबतींत बोलणें केलें व ते निराश होऊन परत आले. त्यांनीं पुन्हा टिळक व गोखले यांची भेट घेतली. 'लो. टिळक कॉंग्रेसमध्यें शिरले कीं, पुन्हा जुन्या तंट्याला सुरुवात होईल' असें गोखले यांना वाटलें. तेव्हां वरील नियमांतील उपसूचनेच्या बाबतींत मिसेस बेझंट यांच्याजवळ त्यांनीं जी तोंडी संमति दिली होती ती मागें घेतली. त्या वर्षाच्या (१९१४) कॉंग्रेसचे अध्यक्ष भूपेंद्रनाथ बसू यांच्या पत्राला म्हणून पाठविलेल्या खासगी उत्तरांत त्यांनीं या समेटाच्या बाबतींत आपलें मत का बदललें याचें स्पष्टीकरण केलें. हें पत्र थोडक्यांच दिवसांत सर्वतोमुखी झालें. "कॉंग्रेसमध्यें शिरतांच बहिष्काराच्या चळवळीस उघड सुरुवात करावयाची व आयरिश लोकांप्रमाणें अडवणुकीचा मार्ग स्वीकारावयाचा असें टिळकांनीं ठरविलें आहे" असें या पत्रांत म्हटलें होतें. मिसेस बेझंट यांनीं या बाबतींत चौकशी केल्यानंतर टिळकांनीं त्याचा इन्कार केला व त्यांची माफीही मागण्यांत आली; पण समेटाची चर्चा मात्र तहकूब झाली. व मुंबईच्या कन्व्हेन्शनपक्षाच्या पुढाऱ्यांचा मिसेस बेझंट यांच्या उपसूचनेला जोराचा

लो. बाळ गंगाधर टिळक
हिंदुस्थानचे ' अनभिषिक्त राजे. '

वि .य आहे असें मि. सुब्बाराव पंतलू यांनीं न्यू इंडियांत प्रसिद्ध केलें. आप्रमाणें मिसेस बेझंट यांचे समेटाचे प्रयत्न फुकट गेले. पुढें थोड्याच दिवसांत १९फेब्रु-वारी १९१५ रोजीं ना. गोखले वारले. आपल्या विरुद्ध असलेल्या या राजकीय पुढाऱ्याबद्दल लो. टिळकांना अतिशय आदर वाटत होता. गोखले दिवंगत झाल्यानंतर त्यांच्या दहनप्रसंगीं लो. टिळकांनीं खालील भावनापूर्ण उद्गार काढले.

"टाळ्या वाजविण्याचा हा प्रसंग नव्हे. अश्रू गाळण्याचा हा प्रसंग आहे. हिंदुस्थानचा हा हिरा, महाराष्ट्राचें हें रत्न, सार्वजनिक कार्यकर्त्यांचा हा राजा दहनभूमीवर कायमची विश्रांति घेण्याकरितां पडून राहिला आहे. त्याच्याकडे पहा व त्याच्यासारखे होण्याचा प्रयत्न करा. तुमच्यापैकी प्रत्येकानें गोखल्यांचें चरित्र नमुन्यादाखल आपल्यापुढें ठेवावें, त्यांचें अनुकरण करण्याचा प्रयत्न करावा व त्यांच्या मृत्यूमुळें रिकामी पडलेली जागा भरून काढण्यास झटावें. प्रमाणें त्यांचें अनुकरण करण्याचा तुम्ही कसून प्रयत्न कराल तर परलोकां त्यांना आनंद झाल्याशिवाय राहणार नाहीं."

णें येथें भरलेल्या प्रांतिक परिषदेंत (मे ४ १९१५) ना. गोखले मृत्यूबद्दल पुढें आलेल्या दुखवट्याच्या ठरावावर बोलतांना सार्वजनिक ळींत गोखल्यांचा प्रवेश करून देण्यास आपण कांहीं अंशीं कसे जबाबदार हें लो. टिळकांनीं सांगितलें.

१९१५ व १९१६ सालीं आपल्या पक्षाची संघटना करण्याचा टिळकांनीं जोराचा प्रयत्न केला. आकर्षक नेतृत्व, एकत्र आणणारें ध्येय व रणगर्जना या तीन्ही गोष्टींची कोणताही पक्ष प्रबल बनविण्यास आवश्यकता असते, असें लोकमान्यांचें म्हणणें होतें. मि. जोसेफ बॅप्टिस्टा हे टिळकांचे कर्तृत्ववान सहकारी होते. वरील परिषद त्यांच्याच अध्यक्षतेखालीं भरविण्यात आली होती. या परिषदेला चार हजारावर राष्ट्रीय पक्षाचे लोक हजर होते. यानंतर थोड्याच दिवसांनीं नेमस्तांची एक परिषद पुण्यास भरली. त्या वेळीं या दोन्ही परिषदां-मधील फरक स्पष्टपणें दिसून आला. नेमस्तांच्या या परिषदेला फारच थोडे प्रतिनिधी आले होते व लॉर्ड विलिंग्डन यांनीं हजर राहून तिला शोभा आणली होती. होमरूल ही राष्ट्रीयांच्या परिषदेंतील रणगर्जना झाली व त्या ध्येयसिद्धी-करतां कशी प्रगती करावी या प्रयत्नांत लो. टिळक गुंतले. इंग्लंडांतील लेबर पार्टीच्या सहाय्यानें पार्लमेंटमध्यें होमरूल बिल आणावयाचें असा टिळकांचा

उद्देश होता व त्याचप्रमाणें हिंदुस्थानांतही एक प्रचंड चळवळ करावयाची असें लो. टिळकांनीं ठरविलें होतें. [श्री. आठल्ये यांच्या ' लोकमान्य टिळक यांचें चरित्र ' या पुस्तकांतून वरील माहिती घेतली आहे.]

१९१५ चें अधिवेशन मुंबई येथें भरावयाचें होतें. समेटाचे सर्व प्रयत्न अयशस्वी झाल्यामुळें या अधिवेशनास मुख्यतः नेमस्तच हजर राहावयाचे होते. कॉंग्रेस भरण्यापूर्वी थोडेच दिवस नोव्हेंबरमध्यें सर फेरोजशहा मेथा मरण पावले. सर सत्येंद्रप्रसन्न सिंह यांना कॉंग्रेसचे अध्यक्ष म्हणून निवडण्यांत आले होते. त्यांचा सामाजिक दर्जा व त्यांची विद्वत्ता यांबद्दल प्रश्नच नव्हता. कॉंग्रेसशीं त्यांचा फारच थोडा संबंध आला होता. पण हिं. सरकाराचे माजी कायदेमंत्री या नात्यानें त्यांच्या वजनाचा कॉंग्रेसला फायदा झाला. पण जुन्या पुढाऱ्यांची पकड त्यांच्यावर होतीच.

राष्ट्रीय विचाराच्या दृष्टीनें सर एस. पी. सिंह यांचें भाषण अत्यंत प्रतिगामी स्वरूपाचें झालें; " अवयव मोडून तुकडे तुकडे झालेल्या रोग्याप्रमाणें हिंदुस्थानची स्थिति झाली आहे. उदयोन्मुख पिढीच्या आकांक्षा पूर्ण होतील व बुद्धीला पटेल असें हिंदुस्थानचें ध्येय ज्याप्रमाणें असलें पाहिजे त्याचप्रमाणें हिंदुस्थानचें दैव ज्यांच्या स्वाधीन करण्यात आलें आहे त्यानाही तें पसंत पडलें पाहिजे " असें त्यांनीं म्हटलें होतें. कॉंग्रेसनें यापुढें आपलें धोरण स्पष्ट शब्दांत जाहीर केलें पाहिजे असाही त्यांचा उद्देश होता. सर एस. पी. सिंह हे सनातनी होते.

१९१५ पासून कॉंग्रेसकडे लोकांचें लक्ष अधिक लागलें. २२५९ प्रतिनिधि या कॉंग्रेसला हजर होते. अनेक विषयावरील ठराव या अधिवेशनांत पास झाले. गोपाळ कृष्ण गोखले, फेरोजशहा मेथा, सर हेन्री कॉटन व कीर हार्डी यांच्या मृत्यूबद्दल पहिल्या चार ठरावांत दुःखप्रदर्शन करण्यांत आलें. पांचवा ठराव राजनिष्ठेसंबधाचा होता. सहाव्या ठरावांत महायुद्धाच्या प्रसंगीं ब्रिटिश राष्ट्रानें न्याय्य पक्ष स्वीकारल्याबद्दल अभिनंदन व ब्रिटिश आरमारानें मिळविलेल्या विजयाबद्दल समाधान व्यक्त करण्यांत आलें. लॉर्ड हार्डिंज यांच्या कारकीर्दीची मुदत वाढवावी अशी विनंति सातव्या ठरावांत करण्यांत आली होती. लष्कर व आरमार खात्यांतील कमिशनमध्यें हिंदी लोकांचा प्रवेश, लष्करी व आरमारी कॉलेजें, हिंदी स्वयंसैनिक दलाची पुनर्घटना, हत्याराचा कायदा, द. आफ्रिका व कानडा येथील हिंदी लोकांची गाऱ्हाणी, वगैरेचा विचार ८–९ व १० या ठरावांतून

करण्यांत आला होता. साम्राज्य परिषदेंत हिंदी प्रतिनिधी घेण्यांत यावेत, या वरिष्ठ कायदे कौंसिलच्या ठरावाला पाठिंबा दिल्याबद्दल व्हॉइसरायांचे आभार अकराव्या ठरावांत मानण्यांत आले व वरिष्ठ का. कौंसिलांतील लोकनियुक्त प्रतिनिधींनीं निवडलेले दोन प्रतिनिधी या परिषदेंत घेण्यांत यावे अशी विनंति याच ठरावांत करण्यांत आली. बाराव्यांत सं. प्रांताकरितां कार्यकारी कौंसिल, तेराव्यांत मुदतबंद मजूरपद्धति नाहींशी करणें, चौदाव्यांत न्याय व अंमलबजावणी खात्याची फारकत; पंधराव्यांत पंजाब, ब्रह्मदेश व मध्यप्रांत यांतून हायकोर्टें स्थापन करणें, सोळाव्यांत स्वदेशी, सतराव्यांत प्रेस ॲक्टचा निषेध, अठराव्यांत जकातींचें स्वातंत्र्य, असे ठराव पास करण्यांत आल्यानंतर स्वराज्यासंबंधाचा एकोणीसावा ठराव विचारांत घेण्यात आला. हा ठराव महत्त्वाचा होता. हिंदुस्थानास स्वराज्याचे दृष्टीनें पुढील महत्त्वाच्या सुधारणा करण्यांत याव्या. प्रांतिक स्वायत्तता यावी, कायदेकौंसिलांची सुधारणा व वाढ करावी, ज्या प्रांतांत कायदे कौन्सिलें नसतील त्यांत ती स्थापन करावी, कार्यकारी कौंसिलांची पुनर्घटना करावी, इंडिया कौंसिल रद्द करावें, किंवा त्यांत सुधारणा करावी, व स्थानिक स्वराज्याच्या बाबतींत उदार धोरण स्वीकारण्यांत यावें. या ठरावांत अशीही मागणी केली होती कीं, ऑ. इं. कॉंग्रेस कमिटीनें सुधारणांची एक योजना तयार करावी, सर्व वर्षभर शैक्षणिक व जागृति विषयक प्रचार करण्याचा कार्यक्रम आंखण्यांत यावा, तसेंच या कामाकरितां ऑ. इं. मुस्लिम लीगचें साह्य घेण्याकरिता जरूर ती तजवीज करावी.

विसाव्या ठरावांत सरकारी साऱ्याला नियंत्रण पडावें म्हणून देशांतील सर्व जमीनदारी व रयतवारी क्षेत्रामध्यें कायमधारा पद्धति स्वीकारण्यांत यावी, व खंडाची मुदतहि कायम करण्यांत यावी. कायमधाऱ्याच्या ऐवजीं निदान ती मुदत साठ वर्षांची ठरवावी, अशी मागणी करण्यांत आली होती. औद्योगिक व धंदेशिक्षणाची व्यवस्था करून त्याच्या वाढीकरितां प्रयत्न करण्यांत यावेत. आयात व निर्यात मालावर जकात बसविण्याचे हक्क देण्यांत यावे, एक्साइज ड्यूटीसारखे उद्योग, धंद्याच्या वाढीच्या आड येणारे अन्याय्य व कृत्रिम अडथळे नष्ट करावे. रेल्वेच्या वाहतुकीच्या दराच्या बाबतींत देशी व विलायती माल असा भेदभाव करूं नये, असे एकविसाव्या ठरावांत म्हटलें होतें. इंग्लंडमधील इंडियन स्टूडंटस् डिपार्टमेंटबद्दल बाविसाव्या ठरावांत नापसंती व्यक्त करण्यांत आली व ग्रेट ब्रिटनच्या

शिक्षण संस्थांतून हिंदी विद्यार्थी घेण्याच्या बाबतींत ज्या अटी घालण्यांत आल्या होत्या त्यांचा निषेध करण्यांत आला. जनरल सेक्रेटरीची नेमणूक, सर विल्यम वेडरबर्न यांच्या कामगिरीचें अभिनंदन, 'इंडिया' पत्राच्या खर्चाची तरतूद, कॉंग्रेसच्या घटनेंत दुरुस्ती व पुढील वर्षी लखनौ येथें कॉंग्रेसला आमंत्रण हे या अधिवेशनांत पास झालेले शेवटचे चार ठराव होते.

१८८५ पासून १९१५ पर्यंत दरसाल भरणाऱ्या कॉंग्रेसच्या अधिवेशनांतून कशा प्रकारचे ठराव पास होत असत याची थोडक्यांत कल्पना वरील ठरावावरून येण्यासारखी आहे.

या अधिवेशनांतील १९ व्या ठरावानें ऑ. इं. कॉंग्रेस कमिटी व मॉस्लेम लीग या दोन्ही संस्थांनीं मिळून स्वराज्याची योजना तयार करावी अशी आज्ञा करण्यांत आली होती हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. १९१३ च्या कराची अधिवेशनांत या दोन्ही जमातींत उत्पन्न झालेल्या सलोख्याच्या भावनेचा हा परिणाम होता.

या कॉंग्रेसमधील गमतीदार गोष्ट म्हणजे विषयनियामक मंडळांत गांधीजींना निवडतां आलें नाहीं ही होय. अध्यक्षांनीं घटनेप्रमाणें आपल्याला असलेल्या जादा अधिकारांत गांधीजींची नेमणूक केली.

राष्ट्रीय पक्षाच्या प्रतिनिधींना कॉंग्रेसमध्यें प्रवेश करतां येईल असा योग्य फेरफार कॉंग्रेसच्या घटनेंत करण्यांत आला ही या अधिवेशनांत एक महत्त्वाची गोष्ट घडून आली. साम्राज्यांतर्गत स्वराज्य व ते सनदशीर मार्गांनीं संपादन करावयाचें असें ज्या संस्थेचें ध्येय आहे व दोन वर्षांहून जी जास्त जुनी आहे, अशा संस्थांनीं भरविलेल्या सार्वजनिक सभेंत कॉंग्रेसचे प्रतिनिधी निवडण्यांत यावे, अशी दुरुस्ती कॉंग्रेसच्या घटनेंत करण्यांत आली. लो. टिळकांनीं या दुरुस्तीला अंतःकरणपूर्वक पसंती दर्शविली व या अर्धवट उघडलेल्या दरवाजातून कॉंग्रेसमध्यें येण्यास आपल्या पक्षाचे लोक खुषीनें तयार होतील असें त्यांनीं जाहीर रीतीनें सांगितलें.

---

## प्रकरण दुसरें

# संयुक्त कॉंग्रेस (१९१६)

१९१६ साल उजाडलें. आदल्या वर्षापेक्षां हें साल कॉंग्रेसच्या वाढीच्या दृष्टीनें अनुकूल परिस्थितींत उगवलें. १९१५सालीं गोखले आणि मेहता हे दोघेही वारले. हे दोन मोठे पुढारी वारल्यामुळें कॉंग्रेसच्या चळवळींत नेत्यांची उणीव भासूं लागली. टिळकांना अद्यापि कॉंग्रेसमध्यें स्थान मिळालें नव्हतें. कॉंग्रेसवर आपली छाप पाडावयास टिळकांना तडजोडीप्रमाणें एक वर्ष थांबावें लागत होतें. कॉंग्रेसनें इंग्लंडला एक डेप्युटेशन पाठवावें असा एक जोराचा प्रयत्न टिळकांनीं केला. पण ही गोष्ट घडून यावयाची नव्हती. नंतर लो. टिळकांनीं २३ एप्रिल १९१६ रोजीं होमरूल लीगची स्थापना केली. मिसेस बेझंट यांनीं आपली लीग यानंतर ६ महिन्यांनीं स्थापन केली.

नोकरशाही तर टिळकांची कट्टी वैरी बनली होती. डिफेन्स फोर्समध्यें सामील व्हावें, अशी विनति लो. टिळक विद्यार्थ्यांना करीत असतांना, दिल्ली व पंजाब प्रांतांत त्यांनीं जाऊं नये अशी नोटीस त्यांच्यावर पंजाब सरकारनें बजावली.

टिळकांच्या होमरूल लीगनें कॉंग्रेसचें क्रीड मान्य केलें. नामदार शास्त्री यांना त्यामुळें फारच बरें वाटलें. १९१६ सालीं टिळकांच्या षष्ठ्यब्दपूर्तीचा समारंभ झाला. त्या वेळीं त्यांना एक लाख रु. ची थैली अर्पण करण्यांत आली व हे पैसे राष्ट्रकार्याकरितां टिळकांनीं अर्पण केले. सरकार टिळकांवर जितकें जितकें दडपण घालूं पहात होतें, तितके तितके ते जोरानें उसळत होते. शेवटीं टिळकांना तुरुंगांत टाकण्यापेक्षां त्यांची मुस्कटदाबी करावी म्हणून त्यांच्याकडून एक वर्षपर्यंत चांगली वर्तणूक ठेवण्याबद्दल २० हजारांचा जात-मुचलका व १० हजारांचे दोन जामीन मागण्यांत आले. टिळकांनीं या बाबतींत हायकोर्टाकडे अपील केलें आणि हायकोर्टानें मॅजिस्ट्रेटची ही ऑर्डर फिरवून टिळकांना अनुकूल असा निकाल दिला (९ नोव्हेंबर १९१६). ह्या घटनेमुळें टिळकांच्या लोकप्रियतेंत जास्तीच भर पडली. हिंदुस्थानांत ठिकठिकाणीं त्यांचें जाहीर स्वागत करण्यांत आलें व त्यांना थैल्या अर्पण करण्यांत आल्या; पण त्यांची प्रकृति अशक्त होती. त्यामुळें सर्व हिंदुस्थानांत दौरा काढून स्वराज्या-करितां लोकांचीं मनें भारून टाकण्याऱ्या त्यांच्या ह्या कार्यांत अडथळा उत्पन्न

झाला. हें कार्य त्यांच्यापेक्षां वयानें मोठ्या, स्त्री असलेल्या, जगप्रसिद्ध व ज्यांना विश्रांतीची अपेक्षा नाहीं व श्रम करण्याचें ज्यांना कांहीं वाटत नाहीं अशा अदम्य उत्साही ॲनी बेझंट यानीं पुढें चालविलें.

१९१६ सालीं हिंदुस्थानची ही परिस्थिति होती. त्याच्या उद्धाराचें कार्य तसेंच पडून राहिलें होतें व अद्यापही त्याला कोणी नेता मिळाला नव्हता. अशा वेळीं मिसेस बेझंट यांनीं स्वातंत्र्ययुद्धांतील खंदकांत पाय टाकला. त्यांनीं "होमरूल"ची चळवळ हातीं घेतली. 'न्यू इंडिया' नांवाचें दैनिक त्यांनीं काढलें व त्यानंतर थोड्याच दिवसांत 'कॉमन विल्' नांवाचें साप्ताहिक सुरू केलें. होमरूलची मागणी लोकप्रिय करण्याचें काम त्यांनींच प्रथम केलें. या कल्पनेचा त्यांनीं झंझावाताप्रमाणें प्रचार केला. "होमरूल फॉर इंडिया लीग" संबंधानें १९१५ मध्यें चर्चा झाली. परंतु पुढील वर्षात कॉंग्रेस स्वराज्याचा प्रश्न हातीं घेते कीं काय हें पहाण्याकरितां तो प्रश्न पुढें ढकलण्यांत आला.

कॉंग्रेस व मॉस्लेम लीग ह्यांच्या प्रतिनिधींची सभा मुंबई कॉंग्रेसनें ठरविल्याप्रमाणें भरविण्यांत आली. तेव्हां ह्या दोन्ही मोठ्या जमातींच्या पुढाऱ्यांत संपूर्ण एकमत दिसून आलें. साम्राज्यांतर्गत स्वराज्याची योजना तयार करण्याकरिता व ह्या ध्येयाचा पुरस्कार करण्याकरितां एक संयुक्त कमिटी नेमण्यांत आली. या संयुक्त कमिटीनें तयार केलेला मसुदा लखनौ येथें कॉंग्रेस व मॉस्लेम लीग ह्यांच्या संमतीकरितां ठेवण्याचें ठरलें. अलाहाबाद येथें २२, २३, २४ एप्रिल १९१६ रोजीं पंडित मोतीलाल नेहरू यांच्या आनंदभुवनांत ऑ. इं. कॉं. क. ची सभा झाली। व त्या वेळीं ह्या योजनेवर चर्चा झाली. पं. मोतीलाल नेहरू हे कमिटीचे सभासद होते. सुरत येथें डॉ. रास बिहारी घोष यांनीं कॉंग्रेसचें अध्यक्षस्थान स्वीकारावें ह्या ठरावाला त्यांनीं दुजोरा दिला होता; पण तेव्हांपासून कॉंग्रेसच्या राजकारणांत त्यांचें नांव ऐकूं आलें नाहीं. ऑ. इं. कॉं. क. च्या बैठकींत कांहीं प्रायोगिक सूचना करण्यांत आल्या. त्यांचा विचार कॉंग्रेस कमिटी व मॉस्लेम लीग यांच्या कलकत्ता येथें भरलेल्या संयुक्त सभेनें केला. व हिंदु-मुसलमान-ऐक्याची योजना जवळ जवळ पूर्णपणें निश्चित करण्यांत आली. पंजाब व बंगाल यांना किती जागा देण्यांत याव्या याचा अखेर निर्णय, लखनौ कॉंग्रेसच्या बैठकीच्या वेळीं करण्याचें ठरलें. कलकत्ता येथें संयुक्त कमिटीनें ठरविलेल्या योजनेला कॉंग्रेसनें संमती दिली. १९१६ नोव्हेंबरमध्यें व्हाइसरॉयकडे

असेंब्लीच्या १९ सभासदांनीं आपल्या सहीनें एक अर्ज पाठविला हें कॉंग्रेसच्या सूत्रचालकांना ठाऊक झालें. हा अर्ज "नाइंटिन् मेमोरॅन्डस" या नांवानें प्रसिद्ध आहे. या अर्जांत स्वराज्याच्या योजनेचीं तत्त्वें समाविष्ट करण्यांत आलीं होतीं. हे १९ जण असेंब्लीचे सभासद होते. हिंदुस्थान सरकारनें स्वराज्याच्या योजने-बाबत कांहीं प्रतिगामी सूचना स्टेट सेक्रेटरीकडे पाठविल्या आहेत अशी बातमी या सही करणाऱ्या सभासदांना लागल्यामुळेंच हा 'मेमोरॅन्डम' पाठविण्यांत आला असें म्हणतात.

कॉंग्रेसच्या चळवळीची ही मंद गति पाहून मिसेस बेझन्ट यांना बरें वाटलें नाहीं. कॉंग्रेसची ब्रिटिश कमिटी इंग्लंडमध्यें कॉंग्रेसचें काम करीत होती हें खरें होतें. परंतु, ती कमिटीही निरिक्षकाचें काम करीत होती. मिसेस बेझन्ट यांना तडफदार संस्था पाहिजे होती. म्हणून त्यानीं लंडनमध्यें १२ जून १९१६ रोजीं "ऑक्झिलिअरी होमरूल लीग" नावाची संस्था मद्रास कॉंग्रेसच्या ठरावान्वयें स्थापन केली. हिंदुस्थानांतही होमरूल लीगची संस्था मद्रास येथें १ सप्टेंबर १९१६ रोजीं स्थापन झाली व मिसेस बेझन्ट यांनीं ठरविलेल्या धोरणाप्रमाण १९१७ सालभर या लीगतर्फे विनाविरोध चळवळ करण्यांत आली. मिसेस बेझन्ट यांना या लीगचे तीन वर्षेपर्यंत अध्यक्ष नेमण्यांत आलें होतें. हिंदुस्थानांत पहिली होमरूल लीग लो. टिळकांनीं महाराष्ट्रात पुणें येथें २३ एप्रिल १९१६ रोजीं स्थापन केली होती. ह्या होमरूल लीगपासून आपली लीग निराळी दिसावी म्हणून मिसेस बेझन्ट यांनीं १९१७ सालीं "ऑ. इं. होमरूल लीग" असें तिचें नामकरण केलें.

जानेवारींत जाहीर केल्याप्रमाणें लो. टिळक लखनौ येथें १९१६ सालीं कॉंग्रेसला येऊन मिळाले. लखनौ कॉंग्रेसला मुंबई इलाख्यांतून बरेच राष्ट्रीय पक्षाचे प्रतिनिधी गेल्यामुळें लो. टिळकांच्या पक्षाचें त्या ठिकाणीं चांगलेंच बहु-मत झालें. कॉंग्रेसच्या त्या वेळच्या घटनेप्रमाणें विषयनियामक कमिटींत ऑ. इं. कॉंग्रेस क. चे सर्व सभासद, त्याचप्रमाणें प्रांतांतर्फे ऑ. इं. कॉं. क. वर जितके सभासद निवडून दिले असतील तितकेच सभासद, पुन्हां त्या त्या प्रांतांतील त्या बैठकीला हजर असलेल्या प्रतिनिधींना निवडून देतां येत असत. लखनौ कॉंग्रेसच्या विषयनियामक कमिटींत गांधीजींना घेण्यांत आलें, त्या संबंधीची एक मजेदार आख्यायिका प्रचलित आहे. विषय नियामक कमिटी-

करितां कोणते सभासद निवडून द्यावेत यासंबंधाची एक योजना ले. टिळकांनीं नेमस्त मंडळींना सुचविली होती; पण ती नाकारण्यांत आली. त्या वेळीं टिळकांनीं मुंबईतर्फे सर्व सभासद आपल्या पक्षाचे निवडून द्यावे असें ठरविलें. मुंबईचे सर्वजण राष्ट्रीय होते. नेमस्त व राष्ट्रीय अशीं दोन नांवें जोडीनें प्रतिनिधीं-पुढें निवडणुकीकरितां मांडण्यांत येत. आणि प्रत्येक वेळीं पहिला म्हणजे राष्ट्रीय पक्षाचा प्रतिनिधी निवडला जाई. याप्रमाणें राष्ट्रीय पक्षाचा एक सभासद व गांधी यांचीं नांवें जोडीनें पुढें आलीं. अर्थात् गांधींना बहुमत मिळालें नाहीं. परंतु, टिळकांनीं गांधींना निवडण्यांत आलें आहे असें जाहीर केलें. बाबू अंबिकाचरण मुजुमदार यांची लखनौ कॉंग्रेसच्या अध्यक्षस्थानीं योजना करण्यांत आली होती. त्यांचें अध्यक्षीय भाषण वक्तृत्वपूर्ण होतें. कॉंग्रेसच्या अध्यक्षांचीं भाषणें, कॉंग्रेसचे प्रतिनिधी अत्यंत सहृदयतेनें ऐकत असत. कॉंग्रेस लीगची योजना व हिंदु-मुसलमानांचें ऐक्य ह्या दोन मोठ्या गोष्टी लखनौ कॉंग्रेसमध्यें साध्य करतां आल्या. लखनौ कॉंग्रेसची हीच सर्वांत मोठी कामगिरी होय. पंजाब व बंगाल या प्रांतांतील मुसलमानांना कायदे कौन्सिलांत किती जागा मिळाव्या हें पूर्वी ठरल्याप्रमाणें लखनौ येथें निश्चित करण्यांत आलें. कार्यकारी मंडळ कायदे मंडळाला जबाबदार असावें हें कॉंग्रेस-लीगच्या योजनेंतील मुख्य तत्व होतें. तथापि खुद्द कायदेमंडळांत एकपंचमांश सरकारनियुक्त सभासद असावेत, ही गोष्ट या योजनेंत मान्य करण्यांत आली होती, हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. स्टेट सेक्रेटरींचें कौन्सिल रद्द करण्यांत यावें असेंही या योजनेंत सुचविलें होतें.

१९०७ सालीं कॉं. मध्यें फूट पडून तिचे दोन तुकडे झाले. हे दोन्ही तुकडे एकत्र सांधण्याचें महत्त्वाचें कार्यही लखनौ येथेंच झालें. टिळक व खापर्डे यांच्याच जवळ रासबिहारी घोष व सुरेन्द्रनाथ बानर्जी हे बसले होते. हा देखावा खरोखरच उत्साहवर्धक होता. मिसेस बेझंट आपले दोन अनुयायी, अरुंडेल व वाडिया, यांच्यासह ह्या कॉं.ला हजर होत्या. त्यांच्या हातांत होमरूलचीं निशाणें होतीं. महमुदाबादचे राजेसाहेब, मझरूल हक्क, ए. रासो व जिना हे मुसलमान पुढारी, गांधी व पोलकसुद्धां ह्या कॉं. ला उपस्थित होते. कॉं. लीगची योजना कॉं. मध्यें पास करण्यांत आल्यानंतर लगेच असेंब्लीनें त्याला आपली संमती दिली.

मुंबई कॉंग्रेसप्रमाणें लखनौ कॉंग्रेसलाही बरेच प्रतिनिधी हजर होते. २३०१ प्रतिनिधींशिवाय इतर बरेच लोक कॉंग्रेसला आल्यामुळें कॉंग्रेसचा भव्य मंडप

अगदीं गच्च भरून गेला होता. कॉंग्रेसचें काम चार दिवस चाललें. राजनिष्ठा, हत्याराचा कायदा, स्वयंसैनिक दल, लष्करांतील कमिशनच्या मोठ्या जागा, प्रेस ॲक्ट, मुदतबंद मजूर, वसाहतींतील हिंदी लोक, संयुक्त प्रांताकरितां एक्सिक्युटिव्ह कौन्सिल, हिंदुस्थान व साम्राज्य परिषद, पंजाब व इतर प्रांतांकरितां हायकोर्टें, स्वदेशी चळवळ, ज्युरीपद्धति वगैरे अनेक विषयांवरील ठराव ह्या कॉंग्रेसमध्यें पास करण्यांत आले. पं. बिशन् नारायण धार, मि. जी. सुब्रम्हण्य अय्यर, व श्री. दाजी अबाजी खरे यांच्या मृत्यूबद्दल दुखवट्याचे ठरावही पास करण्यांत आले. उत्तर बिहारमधील हिंदी रयत व युरोपियन मळेवाले यांच्यांतील परस्पर संबंध व त्या भागांतील शेतकरी लोकांच्या अशांततेसंबंधीं चौकशी करण्याकरितां सरकारी सभासदांची एक मिश्र कमिटी नेमणें, हेही ठराव या कॉंग्रेसनें पास केले. पाटणा युनिव्हर्सिटीचा ठरावही चर्चेला घेतला. उत्तर बिहारमधील मळेवाले व रयत यांच्यासंबंधींचा ठराव फार महत्त्वाचा होता. महात्मा गांधी १९१७ सालीं रयतांमधील असंतोषाच्या कारणांची चौकशी करण्याकरितां उत्तर बिहारमध्यें गेले होते, त्यांची हकीकत पुढें ओघानें येणारच आहे.

या कॉंग्रेसमध्यें पास झालेला स्वराज्याचा ठराव पुढीलप्रमाणें होता. (ए) हिंदुस्थानची प्राचीन सुधारणा, व ब्रिटिशांच्या राज्यात शिक्षणाच्या बाबतींत झालेली हिंदुस्थानची प्रगति व हिंदी लोकांत उत्पन्न झालेली सार्वजनिक कार्याविषयीं कळकळ लक्षांत घेऊन हिंदुस्थानला लवकरच स्वराज्य देण्यांत येईल असा जाहीरनामा बादशहांनीं काढावा, (बी) स्वराज्याच्या मार्गावरील निश्चित पाऊल या दृष्टीनें कॉंग्रेस लीग स्कीममध्यें अंतर्भूत असलेले स्वराज्याचे हक्क देण्यांत यावेत. (सी) साम्राज्याची पुनर्घटना करतांना हिंदुस्थानला परतंत्र देश न मानतां साम्राज्यांतील स्वयंसत्ताक वसाहतींप्रमाणें समान हक्क भोगीत असलेला एक घटक असा दर्जा हिंदुस्थानला प्राप्त करून द्यावा.

डिफेन्स ऑफ इंडिया ॲक्ट व १८१८ सालचा बंगालचा तिसरा रेग्युलेशन, ह्यांचा फार मोठ्या प्रमाणावर उपयोग करण्यात येत आहे याबद्दल एका ठरावानें भीति व्यक्त करण्यांत आली. ग्रेट ब्रिटनमधील ‘ डिफेन्स ऑफ रेल्म्स ॲक्ट ’ ची अंमलबजावणी ज्या तत्त्वावर करण्यात येते, त्याच तत्त्वावर वरील कायद्यांची अंमलबजावणी हिंदुस्थानांत करण्यांत यावी. या कायद्याखालीं ज्या इसमांना पकडलें

असेल त्यांच्यावरील आरोप त्यांना लेखी कळविण्यांत यावेत व आरोपींनीं त्यांवर दिलेल्या स्पष्टीकरणाची, हायकोर्टचे एक जज्ज, बिनसरकारी वकील, आय. सी. एस्. मधील एक जज्ज यांच्यापुढें, चौकशी करण्यांत यावी: अटक झालेल्या लोकांना सर्व प्रकारची कायदेशीर मदत मिळेल, अशी त्याला स्थान-बद्ध करण्यापूर्वी व्यवस्था करण्यांत यावी. १८१८ चा तिसरा रेग्युलेशन व इतर प्रांतांतील अशाच प्रकारचे रेग्युलेशन्स यांच्या बाबतींतही वरील पद्धत अमलांत आणावी, असा एक ठराव पास करण्यांत आला. डिफेन्स ऑफ इंडिया ॲक्टा-खालीं बंगालमध्यें ४७९ वर इसमांना स्थानबद्ध करण्यांत आलें होतें. व १८१८ च्या तिसऱ्या रेग्युलेशनअन्वयें ६० लोकांना अटक करून त्यांना तुरुंगांत डांबून ठेवण्यांत आलें होतें, अशीही माहिती ह्या ठरावावर बोलतांना सांगण्यांत आली.

काँग्रेस व लीग ह्या दोन्ही संस्थांचीं अधिवेशनें एकाच शहरांत भरविण्याचा रिवाज मुंबईच्या काँग्रेसच्या वेळीं सुरू झाला व तो लखनौ येथेंही कायम ठेव-ण्यांत आला. देशातल्या प्रांतोप्रांतीच्या काँग्रेस कमिट्यांनीं व इतर राजकीय संस्थांनीं राष्ट्रीय जागृतीचें काम करावें व स्वराज्याच्या ठरावाची माहिती लोकांना द्यावी असाही एक ठराव ह्या कॉंग्रेसमध्यें मंजूर झाला. काँग्रेसनें केलेल्या ह्या आज्ञा सर्वत्र आश्चर्यकारक रीतीनें पाळण्यात आल्या. ह्या बाबतींत हिंदुस्थानांतील निरनिराळ्या प्रांतांत जणूं काय स्पर्धाच लागली होती. मद्रासमध्यें तर मिसेस बेझंट ह्यांच्या नेतृत्वाखालीं ह्या बाबतींत कमालच करण्यांत आली. लखनौचें हें अधिवेशन सुखानें पार पडलें नाहीं. १८९९ सालीं झालेल्या १५ व्या अधि-वेशनाच्या वेळीं अकल्पित अडचणी पुढें उभ्या राहिल्या होत्या. परंतु संयुक्त प्रांताचे ले. गव्हर्नर सर ॲन्थनी मॅकडोनल्ड ह्यांच्या शहाणपणानें ह्या सर्व अडचणी दूर झाल्या होत्या. १९१६ सालीं असाच प्रसंग पुन्हां उद्‌भवला. संयुक्त प्रांत सरकारच्या सेक्रेटरीएटमधून एक इषाऱ्याची नोटीस स्वागत मंडळाला देण्यांत आली. काँग्रेसच्या भाषणातून राजद्रोहात्मक विचार प्रगट करण्यांत येऊं नयेत असें ह्या नोटिशींत म्हटलें होतें. ही नोटीस अध्यक्षावरही बजावण्यांत आली. अशा प्रकारची आणखी एक नोटिस बंगाल सरकार-मार्फतही काढण्यांत आली होती. ह्या विनाकारण केलेल्या अपमानाला, स्वागत मंडळानें योग्य तें उत्तर दिलें व अध्यक्षांनीं योग्य शब्दांनीं त्या नोटिसीबद्दल

आपला तिरस्कार व्यक्त केला. वऱ्हाड व मुंबई या प्रांतात बेझंटबाईंनीं जाऊं नये अशा प्रकारचे हुकूम सुटलेले होते. लखनौ काँग्रेसच्या प्रसंगीं असले आणखी कांहीं प्रकार होतील अशी भीति वाटत होती. पण लेफ्टनंट गव्हर्नर सर जेम्स मेस्टन ह्यांच्या दूरदर्शीपणानें असल्या कोणत्याही भानगडी उपस्थित झाल्या नाहींत. सर जेम्स व लेडी मेस्टन ह्यांनीं आपल्या परिवारासह ह्या अधिवेशनाला भेट दिली. अध्यक्षांनीं त्याचें स्वागत केलें व सर जेम्स ह्यांनीं उचित शब्दांत या स्वागताला उत्तर दिलें.

---

## प्रकरण तिसरें

# जबाबदारीच्या स्वराज्याच्या मार्गांत ( १९१७ )

हिंदुस्थानांतील जातीय भांडणांनीं हिंदुस्थानच्या प्रगतीच्या मार्गांत अनेक वेळां अडथळे आणले आहेत. लॉर्ड मिंटो ह्यांच्या कारकीर्दीत ह्याच भेदभावाला प्रत्यक्ष तोंड फुटलें पण १९१७ सालीं स्वराज्याची योजना तयार होत असतांना सुदैवानें हिंदु व मुसलमान ह्यांच्यांत तडजोड घडून आली. वरून कोणी हुकूम केला ह्मणून नव्हे तर दोन्ही पक्षांनीं आपखुषीनें आपसांत ही तडजोड घडवून आणली. पुढील राजकीय लढयाच्या व चळवळीच्या दृष्टीनें हा एक शुभ शकूनच झाला. १९१७ सालीं निर्मळ मनानें व शुद्ध अंतःकरणानें ह्या चळवळीला सुरवात झाली. व सर्व देशभर झपाट्यानें राष्ट्रीय जागृती झालेली दिसून आली. आणि होमरूलच्या लोकप्रिय चळवळीनें सर्व देश व्यापून टाकला. अर्थात ह्या चळवळीला मारून टाकण्यासाठीं पोलिसांची दडपशाही तितक्याच कडक रीतीनें सुरूं झाली.

होमरूलचा संदेश देशाच्या कानाकोपऱ्यांतून पसरला व सर्वत्र होमरूल लीगच्या शाखा स्थापन करण्यांत आल्या. प्रेस ॲक्टाची दडपशाही चालूं असतांही मिसेस बेझंट यांच्या पुढारीपणाखालीं वर्तमानपत्रांचें सामर्थ्य अधिकच वाढलें. लॉर्ड पेंटलंड ह्यांनीं राष्ट्रीय चळवळींत विद्यार्थ्यांनीं भाग घेऊं नये असा एक सरकारी हुकूम काढला. ' हिन्दू 'चे संपादक मि. कस्तुरीरंग अय्यंगार ह्यांना गव्हर्नरांनीं मुलाखतीकरतां बोलाविलें. ही मुलाखत अर्धा तास चालली होती. ह्या वेळीं प्रचलित राजकीय परिस्थितीसबंधानें मि. अय्यंगार यांनीं आपलें स्पष्ट मत गव्हर्नरापुढें मांडलें. मिसेस बेझंट यांच्याकडून त्यांनीं चालविलेल्या ' न्यू इंडिया ' व ' कॉमन विल ' ह्या पत्रांबद्दल जामिनकी घेण्यांत आली. मिसेस बेझंट यांनीं जमानतीदाखल २०००० रुपये सरकारांत भरले व ही रक्कम पुढें जप्तही करण्यांत आली. होमरूलची कल्पना वणव्याप्रमाणें सर्व देशभर पसरत होती. कलकत्ता येथील अधिवेशनांत अध्यक्ष या नात्यानें बोलतांना मिसेस बेझंट ह्मणाल्या कीं, " होमरूलच्या चळवळीचें सामर्थ्य दसपटीनें वाढलें आहे. ह्याच चळवळींत पुष्कळ स्त्रियांनीं भाग घेतला असल्यामुळें त्यांचें अतुल शौर्य, सहनशक्ति, व स्वार्थत्याग ह्यांच्यामुळें ह्या चळवळीच्या

सामर्थ्यांत आणखी भरच पडली आहे. आमच्या लीगमध्यें भरती केले गेलेले सैनिक व त्यांची भरती करणारे नेते ह्या स्त्रियाच आहेत. पुरुषांना बंदी करण्यांत आली त्यावेळीं मद्रासच्या रस्त्यांतून स्त्रियांनीं मिरवणुका काढल्या, व मंदिरांतून झालेल्या प्रार्थनांमुळें स्थानबद्ध बंदी मुक्त झाला. दाक्षिण हिंदुस्थानांतील देवळांतून, पवित्र क्षेत्रांतून, झालेल्या प्रार्थनांनीं होमरूलची चळवळ धर्माशीं एकरूप झालेली आहे. साधू व संन्यासी देखील ह्या चळवळीचा उपदेश करीत आहेत."

होमरूलच्या चळवळीला इतकें यश प्राप्त होण्यास आणखी एक महत्त्वाची गोष्ट कारणीभूत झाली; ती ही कीं, ह्या चळवळीचा प्रचार करण्याकरितां प्रांतांची भाषावार निवड करण्यांत आली ही होय. या बाबतींत होमरूल लीगनें कॉंग्रेसच्या पुढें पाऊल टाकिलें. १५ जून १९१७ रोजीं मिसेस बेझंट, मि. जी. बी. अरुंडेल व मि. बी. पी. वाडिया, ह्यांच्यावर नोटीस बजावण्यांत आली व ६ जागांपैकीं, एके जागीं अडकून रहा असें सांगण्यांत आलें. त्यांनीं कोइमतूर व उटकमंड या जागा पसंत केल्या. ह्या तीन पुढाऱ्यांना स्थानबद्ध केल्यामुळें होमरूलची चळवळ अधिकच लोकप्रिय झाली व मि. जिना ह्यानंतर लगेच ह्या लीगला येऊन मिळाले. ह्या स्थानबद्ध कैद्यांवर पोलिसांची कडक नजर होती. तथापि मिसेस बेझंट 'न्यू इंडिया'करितां निर्भयपणें लेख लिहून पाठवीत असत. 'कॉमन वील' ह्या नांवाचें साप्ताहिक देखील ह्या वेळीं सुरू करण्यांत आलें. मि. पी. के. तेलंग हे न्यू इंडियाचें संपादकत्व हातीं घेण्याकरतां मद्रासला गेले. पुढें 'हिंदू' पत्राचें संपादक झालेले मि. ए. रंगास्वामी अय्यंगार हे दैनिक चालविण्याच्या कामीं मदत करीत होते. मि. सी. पी. रामस्वामी अय्यर ह्यांनींही आपली बुद्धी व वेळ होमरूलच्या चळवळीकरतां व लेखनाकरतां खर्ची घालण्याचें ठरविलें होतें. ह्या स्थानबद्ध कैद्यांची मुदत जसजशी वाढूं लागली तसतशी देशांतील होमरूलची चळवळही भूमितीश्रेणीनें दिवसेंदिवस वाढू लागली. हिंदुस्थानची परिस्थिति विकट होत चालली पण इंग्लंडांतील अधिकारी वर्गाला पाझर फुटला नाहीं. मि. मॉंटेग्यू यांनीं आपल्या डायरींत ह्या परिस्थितीला समर्पक अशा एका पौराणिक गोष्टीचा उल्लेख केला आहे. "भगवान् शिव मला विशेष आवडला, त्यानीं आपल्या बायकोचें ५२ तुकडे केले आणि त्या तुकड्यांकडे तो पाहूं लागला; त्या वेळीं आपल्याला ५२ बायका असल्याचें त्याला आढळून आलें. मिसेस बेझंट यांना

स्थानबद्ध केल्यामुळें हिंदुस्थान सरकारची स्थिति खरोखर अशीच झाली होती."
हिंदुस्थानांत ह्याप्रमाणें राजकीय चळवळीचें वादळ उठलें असतांना लंडनमध्यें साम्राज्ययुद्ध परिषद भरविण्यांत आली. वसाहतींचे प्रतिनिधी या परिषदेस हजर होते व हिंदुस्थानचे प्रतिनिधी म्हणून बिकानेरचे महाराज व सर एस्. पी. सिंह याना ह्या परिषदेस हजर राहण्याकरितां पाठविण्यांत आलें होतें. आपल्या रुबाबानें व आपल्या शुद्ध इंग्रजी उच्चारानें ह्या प्रतिनिधींनीं ब्रिटिश जनतेचीं मनें आपल्याकडे ओढून घेतलीं. सार्वजनिक रीत्या त्यांचे स्वागत करण्यांत आलें. हिंदुस्थानांतून इंग्लंडकडे एक डेप्युटेशन तेथील जनतेबरोबर वाक्युद्ध करण्याकरतां पाठवावें अशी सूचना ब्रिटिश कमिटीनें कॉंग्रेसकडे केली होती. पण ह्या प्रतिनिधींनीं बसाविलेल्या दराऱ्यामुळें त्यांनीं शिष्टमंडळ नको असें कळविलें. ४ एप्रील १९१७ रोजीं ब्रिटिश कमिटीची सूचना लक्षांत घेऊन ऑल इंडिया कमिटीची एक बैठक भरविण्यांत आली व इंग्लंडला डेप्युटेशन पाठविण्यासंबंधानें व लंडनमध्यें कॉंग्रेसची बैठक भरविण्यासंबंधानें ह्या सभेंत चर्चा करण्यांत आली. सुरेंद्रनाथ बानर्जी, डॉ. रासबिहारी घोष, भूपेंद्रनाथ बसू, मदनमोहन मालवीय, सर के. जी. गुप्ता, महमुदाबादचे राजेसाहेब, तेज बहाद्दुर सप्रू, व्ही. एस्. शास्त्री व सी. पी. रामस्वामी अय्यर ह्याना ह्या डेप्युटेशनचे सभासद नेमण्यांत आले. स्टेट सेक्रेटरी मि. ऑस्टीन चेंबरलेन यांनीं हिंदी लोकांना लष्करांत जागा देण्यासंबंधीं धोरण जाहीर करावें असा जोराचा प्रयत्न ब्रिटिश कमिटीनें केला, पण ते काहीं बोलेनात. ८ मे १९१७ रोजीं लंडन येथें एक लहानशी सभा झाली. सर एस. पी. सिंह ह्या सभेला हजर होते. ह्या सभेंत झालेल्या चर्चेमुळेंच हिंदुस्थानांतून जें शिष्टमंडळ इंग्लंडात बोलवावयाचें होतें तें बोलवूं नये असें ठरलें.

होमरूल चळवळींतील स्थानबद्धांना मुक्त करण्याबद्दल निःशस्त्र प्रतिकाराची चळवळ करण्याचे बेत हिंदुस्थानांत ह्या वेळीं सुरू होते. ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटी व मॉस्लीम लीग ह्यांची एक संयुक्त सभा २८ जुलै १९१७ रोजीं भरली व पहिलाच ठराव पितामह दादाभाई नौरोजी ह्यांच्या मृत्यूबद्दल पास करण्यांत आला. मि. जिना, शास्त्री, (शास्त्री जाऊं न शकल्यास सी. पी. रामस्वामी अय्यर) सप्रू व वजीर हासन ह्यांचें एक लहानसें शिष्टमंडळ इंग्लंडला पाठविण्याचें ठरलें. निःशस्त्र प्रतिकाराच्या चळवळीचाही विचार या सभेंत झाला. ठिकठिकाणच्या

प्रांतिक कॉंग्रेस कमिटयांनी व मॉस्लीम–लीगच्या कौन्सिलनें या प्रश्नाचा विचार करावा व आपली मतें ६ आठवडयाच्या आंत कॉंग्रेसच्या सेक्रेटरीकडे पाठवावी, असें ठरलें. डॉ. रासबिहारी घोष यांच्या अध्यक्षतेखाली डॉ. बिझांटप्रभृतींच्या अटकेचा निषेध करण्याकरतां भरणाऱ्या सभेला बंदी करण्यांत आली ह्याबद्दल सरकारचा तीव्र निषेध करण्यांत आला. एकोणीस सभासदांच्या अर्जा-मधील मुद्यासंबंधानें लॉर्ड चेम्सफर्ड यांनीं जे विचार प्रदर्शित केले होते त्याच्या-वर एका पत्रकानें टीका करण्यांत आली. लॉर्ड सिडनहॅम ह्यांनीं तर ह्या अर्जातील सूचना संकट ओढवणाऱ्या आहेत, आणि हिंदुस्थानातील जर्मन लोकांचीं गुप्त कारस्थानें चालू असल्यामुळें दडपशाही उपाय योजावे असेंही त्यांनीं सुचविलें होतें. स्वराज्याच्या चळवळीच्या संबंधानें कोणतें धोरण स्वीकारावें याबद्दल एक पत्रक सरकारतर्फे पाठविलें गेलें. मद्रास प्रांतांच्या गव्हर्नरांनीं तसेंच पत्रक काढलें. कॉंग्रेसमधील सुधारणावादी पक्षानें ज्या हक्कांची मागणी केली आहे, त्या गदरपार्टींच्या लोकांनीं केलेल्या मागणीप्रमाणेंच क्रांतिकारक आहेत, असें सर मायकेल ओडवायर यांनीं आपलें मत दिलें. दिल्ली आणि सिमला येथें वावरणारें हिंदुस्थान सरकार सुधारणासंबंधाचे गुप्त खलितें इंग्लंडला पाठवीत असतांना कॉंग्रेस–लीग व वरिष्ठ कायदे–कौन्सिलचे कांहीं सभासद ह्यांनीं त्यापुढें मजल मारावी व जो अर्ज ब्रिटिश सरकारला पाठवावयाचा तोही जाहीर रीतीनें पाठवावा या गोष्टीबद्दलच मुख्यतः सरकारी अधिकाऱ्यांना राग आला होता. आगामी सुधारणा किरकोळ स्वरूपाच्या आहेत असे प्रांतांच्या गव्हर्नरांनीं गैरमुत्सद्देगिरीनें जाहीर केलें पण ते गैरमुत्सद्दी असले तरी प्रामा-णिक होते. राजकीय पुढाऱ्यांना स्थानबद्ध करण्याच्या सरकारच्या धोरणाचा या पत्रकांत निषेध केला होता व हिंदुस्थानांतील परिस्थिती निवळण्याकरितां पुढील उपाय करण्यांत यावे असें त्यांत सुचविलें होतें. ( १ ) हिंदुस्थानाला ब्रि. साम्राज्यांतील एक स्वतन्त्र घटक बनविण्यांत येईल असा अधिकृत जाहीरनामा प्रसिद्ध करण्यांत यावा. ( २ ) कॉंग्रेस–लीगनें केलेली सुधारणांची योजना मंजूर करण्याची ताबडतोब व्यवस्था करण्यात यावी. ( ३ ) सरकारी अधिका-ऱ्यांनीं ज्या सूचना केल्या आहेत त्या जाहीर करण्यांत याव्या. ( ४ ) दडपशा-हीचें धोरण रद्द करण्यांत यावें.

या पत्रकांतील मुख्य भाग स्टेट सेक्रेटरी, मुख्य प्रधान, व सर विल्यम वेडर-

बर्न यांना केबलनें कळविण्यांत आला. सर वेडरबर्न यांचें उलट तारेनें उत्तर आलें " स्टेट सेक्रेटरीची मुलाखत घेतली, आपण सबूरीनें घ्यावें असें मी तुम्हाला कळकळीनें सांगतों."

आतां पुन्हा हिंदुस्थानांतील चळवळीसंबंधानें आपण विचार करूं. ऑ. इ. कॉं. कमिटीच्या सूचनेप्रमाणें सप्टेंबर महिन्यांत (१९१७) निरनिराळ्या प्रांतिक कॉंग्रेस कमिटयांनीं निःशस्त्र प्रतिकाराचा उपाय अंमलांत आणावयाचा कीं नाहीं याबद्दल गंभीरपणें विचार केला. वऱ्हाड प्रां. कॉं. कमिटीनें या बाबतींत अनुकूल मत दिलें. मुंबई, ब्रह्मदेश व पंजाब या प्रांतांनीं मि. मॉंटेग्यू हिंदुस्थानांत येणार असल्यामुळें हा विचार सध्या तहकूब ठेवावा असें सुचविलें. सं. प्रांतानें आजच्या परिस्थितींत या उपायाचा अवलंब करणें अयोग्य आहे असें मत दिलें. " होमरूलच्या चळवळीमुळें झालेले स्थानबद्ध राजबंदी अलीबंधू, अबुल कलाम अझाद यांना अमुक एका तारखेस मुक्त करावें अशी मागणी करावी; ही मागणी मान्य न झाल्यास प्रांतांतील सार्वजनिक कार्यकर्त्यांनीं निःशस्त्र प्रतिकाराचा प्रत्यक्ष प्रचार करण्यास सुरुवात करावी व त्याकरितां करावा लागणारा सर्व प्रकारचा त्याग व भोगावे लागणारे सर्व कष्ट सहन करण्यास तयार असावें" असें बिहारचें मत होतें. मद्रास प्रां. कॉं. कमिटीला ही कल्पना पसंत पडली. " सनदशीर चळवळीविरुद्ध सरकारनें अन्याय्य व बेसनदशीर हुकूम काढले आहेत, सभाबंदी करण्यांत आली आहे, होमरूलच्या पुढाऱ्यांना स्थानबद्ध करण्यांत आले आहे, तेव्हां या दडपशाहीला तोंड देण्याकरितां निःशस्त्र प्रतिकारचें धोरण स्वीकारणें जरूर आहे;" अशा आशयाचा ठराव मद्रास प्रांतिक कॉंग्रेस कमिटीनें पास केला. या ठरावाची अंमलबजावणी करण्याकरितां प्रत्यक्ष कोणते उपाय योजावे याचा विचार करण्यासाठीं एक सब्-कमिटी नेमण्यांत आली. या कमिटीनें १५ दिवसांत रिपोर्ट करावा असें ठरलें. मद्रास शहरांतील पुढारी मंडळींनीं या बाबतींत एक प्रतिज्ञापत्रक तयार केलें. मद्रासचे माजी हायकोर्ट जज्ज व ऑ. इं. होमरूल लीगचे अध्यक्ष सर एस्. सुब्रह्मण्य अय्यर यांनीं या पत्रकावर पहिल्यानें सही केली. मिसेस् बेझंट व त्यांचे सहकारी यांच्या स्थानबद्धतेच्या हुकुमाविरुद्ध निषेध म्हणून त्यांनीं आपल्या 'सर' पदवीचाही त्याग केला. मिस्टर व मिसेस् हॉचनेर यांच्याबरोबर प्रेसिडेंट विल्सन् यांच्याकडे पोंचविण्याकरितां त्यांनीं एक पत्रक दिलें. या प्रतिज्ञा-पत्रकावर सही करणारे दुसरे गृहस्थ

म्हणजे ' हिंदू'चे संपादक मि. एस्. कस्तुरीरंगा अय्यंगार हे होत. काही तरुण मंडळींनींही या पत्रकावर सह्या केल्या होत्या. मद्रास येथें असेपर्यंत या पत्रकावर सही करण्यासंबंधीचा निश्चय मि. सी. पी. रामस्वामी अय्यर यांनी केला नाहीं. पण मुंबईला गेल्यावर त्यांनीही या पत्रकावर सही केली. हिंदुस्थानात याप्रमाणें चळवळीला तोंड लागलें असतां मि. मॉन्टेग्यू यांच्या ता. २० आगष्टच्या जाहीर आश्वासनामुळें ही परिस्थिती एकदम बदलली व ता. २८ सप्टेंबर १९१७ रोजीं मद्रास प्रा. कॉ. क. ची एक सभा भरून पुढील आशयाचा ठराव पास करण्यांत आला. " आजच्या बदललेल्या राजकीय परिस्थितीत नि:शस्त्र प्रतिकाराचा प्रश्न तहकूब करण्यांत यावा आणि या बाबतींत ऑ. इं. कॉ. कमिटीशीं पत्रव्यवहार करावा व सब् कमिटीचा रिपोर्ट दप्तरीं दाखल करावा. "

ही बदललेली परिस्थिती म्हणजे काय तें आता आपण पाहूं. महायुद्ध चालूं असतां मेसापोटेमियातील स्वारीसंबंधानें कॉमन्स सभेंत जोराचा वादविवाद झाला. मेसापोटेमियाच्या स्वारीच्या वेळीं हिंदुस्थानांतून पुरेसे द्रव्यबळ व युद्धसामुग्री पुरविण्यांत आली नाहीं याबद्दल मि. मॉंटेग्यु यांनीं त्या वेळचे स्टेट सेक्रेटरी मि. ऑस्टिन् चेंबरलेन यांच्यावर सडकून पार्लमेंटांत टीका केली. 'हिंदुस्थानांतील राज्यपद्धति लाकडाच्या ठोकळ्यासारखी आतिशय बोजड व मंद बनली आहे. ५००० वर्षांपूर्वीच्या प्राचीन काळाला शोभेशी ती आहे. अर्वाचीन युगांतील स्थित्यंतरांना तोंड देण्याचे सामर्थ्य तिच्यात नाहीं' असें मि. मॉंटेग्यू हे या वादविवादाच्या प्रसंगी म्हणाले. या सर्व गोष्टींचा परिणाम असा झाला कीं, मि. चेंबरलेन यांनीं आपल्या जागेचा राजिनामा दिला व मि. मॉंटेग्यू हे स्टेट सेक्रेटरी झाले. मि. मॉंटेग्यू हे अगदीं तरुण गृहस्थ होते. ३६ वर्षांच्या आंतच त्यांचें वय होतें. त्यानीं यापूर्वी चार वर्षें सतत अंडर सेक्रेटरीचें काम केलें होतें व १९१२ सालीं हिंदुस्थानांतील सर्व भागात ते फिरून आले होते. " इभ्रत " या विषयावर केंब्रिज येथील गिल्ड हॉलमध्यें ता. २८ फेब्रुवारी रोजीं त्यांचें एक प्रसिद्ध व महत्त्वाचें भाषण झालें होतें. त्यांतील एक लहानसा उतारा खालीं दिला आहे. " इभ्रतीसंबंधानें विचार करावयाचा तर बा हिंदुस्थाना, इंग्रजी शब्दकोशांतून हा शब्द काढून टाकला असता तर तुझा इतिहास कितीतरी सुखमय झाला असता. कट्टर सनातनी साम्राज्यवाद्यांच्या हातांत तूं सांपडला आहेस. संकटांपासून रक्षण करण्याकरितां, अन्यायमूलक चुकांची दुरुस्ती करण्याकरितां, अनुभवाचा फायदा घेण्याकरितां

आम्ही आमच्या चुकीच्या धोरणालाच चिकटून राहिलों आहों व लोकमताला पायाखालीं तुडवीत आहों. आणि हें सर्व कशाकरितां तर " बस् , मी जें बोललों तें बोललों," हे शब्द खरे करून दाखविण्याकरितां. वरवर गोड दिसणाऱ्या या शब्दाचा पुरस्कार करणारें धोरण आपण ठेविल्यास हिंदुस्थान आपण आपल्या हातांत टिकवूं शकणार नाहीं; न्याय्य तत्त्वावर अधिष्ठित असलेल्या राजकीय संस्थांच्या द्वारांच आम्ही तें टिकवूं शकूं. जसजसे दिवस जातील तसतसे शासित जनतेच्या संमतीनें आपल्याला हिंदुस्थानात राज्य करावें लागेल." मि. बोनर लॉ यांच्या टीकेला उत्तर म्हणूनच मि. मॉंटेग्यू यांनीं वरील भाषण केलें होतें. मि. मॉंटेग्यू यांनीं हिंदुस्थानचा याप्रमाणे कैवार घेतल्यामुळें हिंदुस्थानचा प्रचंड विजयच झाला, असें त्या वेळीं मानण्यांत आलें. मि. मॉंटेग्यू हे स्टेट सेक्रेटरी झाल्यानंतर त्यानीं लोकांच्या अपेक्षेप्रमाणें कॅबिनेटच्या तर्फे अधिकृत रीत्या हिंदुस्थानच्या लोकांना पुढील जाहीर आश्वासन दिलें. " हिंदुस्थान सरकारचा मान्य असलेले ब्रिटिश सरकारचें धोरण खालील प्रकारचें आहे. 'राज्यकारभाराच्या प्रत्येक शाखेंत हिंदी लोकांचा जास्त जास्त संबंध येत जावा, आणि स्वयशासित संस्थांची क्रमश· वाढ अशा उद्देशानें करावी कीं, हिंदुस्थानला साम्राज्याचा एक घटक म्हणून जबाबदारीच्या स्वराज्याची चढत्या श्रेणीनें प्राप्ती व्हावी, या दिशेनें शक्य तितक्या लवकर भरीव योजना आखावी असेंहि त्यानीं ठरविले आहे. हिंदुस्थानांतील राज्यकारभारांत टप्याटप्यानेंच या धोरणानुसार प्रगति होईल. हे टप्पे ब्रिटिश व हिंदुस्थान सरकारच ठरवतील, त्याकरता हिंदी लोकांचें सहकार्य लागेल व त्यांच्या जबाबदारीच्या जाणीवेवरच हा विश्वास ठेवणें अवलंबून राहील. " हिंदी लोकांवर सरकारचा विश्वास आहे याचें प्रत्यक्ष प्रमाण म्हणून त्यांनीं लष्करांतील किंग्ज कमिशनमध्यें हिंदी लोकाना जो मज्जाव करण्यांत आला होता तो रद्द केला. हिंदुस्थानास सुधारणांचे हक्क देण्याचे दृष्टीनें व्हॉइसरायशीं व हिंदुस्थानांतील सर्व वर्गांच्या पुढाऱ्यांशीं विचारविनिमय करण्याकरितां आपण हिंदुस्थानांत येणार आहों असेंही त्यानीं या वेळीं जाहीर केलें.

हिंदुस्थानांतील चळवळ इकडे झपाट्यानें पुढें पाऊल टाकीत होती. ठिकठिकाणीं प्रांतिक परिषदांचीं जादा अधिवेशनें भरत होतीं व त्यांतून सरकारच्या धोरणाबद्दल लोकमत प्रदर्शित करण्यांत येत होतें. मुंबई येथें २९ जुलै रोजीं

भरलेल्या ऑ. इं. कॉ. क. च्या सभेंत व ऑ. इं. मॉ लीगच्या सभेंत देशांतील ठिकठिकाणच्या कॉंग्रेस कमिट्यांनीं व लीगच्या कौन्सिलनें निःशस्त्रप्रतिकारासंबंधाचें आपलें मत निश्चित् करून सहा आठवड्याच्या आंत तें कॉंग्रेसच्या जनरल सेक्रेटरींना कळवावें अशा सूचना दिल्या होत्या. या सहा आठवड्यांत पुष्कळच गोष्टी घडल्या. २० ऑगष्टचा जाहीरनामा प्रसिद्ध झाला व मिसेस् बेझंट व त्यांचे सहकारी यांना नव्या धोरणानुसार १६ सप्टेंबर रोजीं मुक्त करण्यांत आलें.

ऑ. इं. कॉ. क. व मॉस्लेम लीग यांची संयुक्त सभा अलाहाबाद येथें ता. ६ ऑक्टोबर रोजीं पुन्हां भरली. निःशस्त्र प्रतिकाराचा प्रश्न गाळून टाकावा असेंच बहुतेक सर्वांचें मत दिसून आलें. खुद्द मिसेस् बेझंटच या चळवळीच्या विरुद्ध होत्या. या परिणामकारक कार्यक्रमाला अनपेक्षित रितीनें कलाटणी मिळाल्यामुळें तरुण मंडळींची अत्यंत निराशा झाली. संयुक्त सभेंत निःशस्त्र प्रतिकाराचा विचार करण्याऐवजीं व्हाइसरॉय व स्टेट सेक्रेटरी यांच्याकडे एक अखिल भारतीय शिष्टमंडळ पाठविण्याचें ठरलें. कॉंग्रेस-लीग योजनेला पाठिंबा मिळविण्याचें काम या शिष्टमंडळाकडे सोंपविलें होतें. व्हाइसरॉयपुढें ठेवण्यांत येणाऱ्या अर्जाचा मसुदा तयार करण्याकरितां १२ जणांची एक कमिटी नेमण्यांत आली. मि. सी. वाय् चिंतामणी हे या कमिटीचे सेक्रेटरी होते. १९१७ च्या नोव्हेंबरमध्यें या शिष्टमंडळानें लॉर्ड चेम्सफर्ड व मि. मॉंटेग्यू यांची मुलाखत घेतली व आपला अर्ज त्यांच्यापुढें सादर केला. या अर्जांतील महत्त्वाचा उतारा खालीं दिला आहे.

"बादशहाच्या सरकारच्या नांवानें व हिंदुस्थान सरकारच्या संमतीनें हिंदुस्थानास जें अधिकृत आश्वासन देण्यात आलें त्याबद्दल हिंदी लोक अत्यंत कृतज्ञ आहेत. या जाहीर आश्वासनाची अंमलबजावणी होण्यापूर्वी खालील सूचनांचा विचार करण्यात आल्यास हिंदी लोकांना अधिक समाधान वाटेल. हिंदुस्थान हें एक परतंत्र राष्ट्र आहे ही भावना हिंदी लोकाच्या स्वाभिमानाला जाचत आहे. हिंदुस्थानची संस्कृति प्राचीन आहे. राज्यकारभार चालविण्याची लायकी हिंदुस्थाननें सिद्ध केली आहे. गेल्या दोन वर्षात ज्या घडामोडी झाल्या त्यावरून ब्रिटिश साम्राज्यांतील वसाहतींप्रमाणें हिंदुस्थानला समानतेचा दर्जा प्राप्त झाला पाहिजे. साम्राज्यविषयक अनेक प्रश्नासंबंधानें हिंदुस्थानच्या निर्णयांत शब्दाला

महत्व प्राप्त होणार आहे हें उघड आहे. कांहीं लेखकांनीं सुचविल्याप्रमाणें साम्राज्याचें पार्लमेंट किंवा कौन्सिल स्थापन करण्यांत आलें व त्यात फक्त ग्रेट ब्रिटनचे व वसाहतींचे प्रतिनिधी घेण्यांत आले तर ग्रेट ब्रिटनप्रमाणें वसाहतींचीही सत्ता हिंदुस्थानावर प्रस्थापित होईल. अशी परिस्थिती निर्माण झाल्यास हिंदी लोक साम्राज्यसरकारच्या या धोरणाचा जोरानें प्रतिकार केल्याशिवाय रहाणार नाहींत. साम्राज्यांतील निरनिराळ्या घटकांचा परस्पर संबध कसा असावा, याचा पुनर्विचार करतांना इंपिरियल कौन्सिलमध्ये हिंदुस्थानचे लोकनियुक्त प्रतिनिधी असणें जरूर आहे.

विकानेरचे महाराज, सर जेम्स मेस्टन् व सत्येंद्र प्रसन्न सिंह यांना हिंदुस्थानचे प्रतिनिधी म्हणून इंपिरियल वॉर कॉन्फरन्समध्ये व इंपिरियल वॉर कॅबिनेटमध्यें पाठविण्यांत आलें याबद्दल हिंदुस्थानला आनंद वाटत आहे. हिंदुस्थान सरकार जोंपर्यंत लोकमताला जबाबदार नाही तोंपर्यंत हिंदुस्थानच्या शब्दाला मुळींच किंमत नाहीं सरकारनें पाठविलेले हे प्रतिनिधी आपलें कर्तव्य प्रामाणिकपणें बजावतील, पण आपण लोकमताला जबाबदार नाहीं अशी जाणीव त्यांना असल्यामुळें त्यांच्या हातून हिंदी जनतेचें हित पूर्णपणें साध्य होईलच असें नाही. विकानेरचे महाराज, सर जेम्स मेस्टन् व सर एस्. पी. सिंह यांनीं गेल्या साम्राज्ययुद्धपरिषदेंत चांगलें काम केले. पण एमिग्रेशनच्या प्रश्नाबाबत त्यांनीं जो खलिता परिषदेपुढें सादर केला त्यात हिंदी लोकाची बाजू चांगल्या रितीनें मांडण्यांत आलेली नाहीं. हिंदी लोकाच्या हिताच्या दृष्टीनें ह्या बाबतींत थोडासा अन्यायच झाला आहे. या परिषदेला गेलेले प्रतिनिधी लोकनियुक्त असते तर त्याना आपल्या कृत्याचें समर्थन करणें कठीण गेलें असतें. या प्रतिनिधींची निवडणूक प्रत्यक्ष निवडणुकीच्या तत्त्वावर व्हावी अशीही आमची मागणी नाहीं. वरिष्ठ व प्रांतिक कायदे कौन्सिलांतील लोकनियुक्त सभासदाना हे प्रतिनिधी निवडण्याचा हक्क द्यावा अशीच आमची मागणी आहे व ही आमची मागणी मान्य होईल अशी आशा आहे."

याप्रमाणें कॉंग्रेसचें शिष्टमंडळ व्हाइसरॉय व स्टेट सेक्रेटरी यांची मुलाखत घेऊन व त्यांच्यापुढें आपला अर्ज सादर करून त्याच्या संबंधानें चर्चा करीत होतें. तर इकडे कॉंग्रेसमधील तरुण कार्यकर्ते कॉंग्रेस लीग योजनेवर लोकांच्या सह्या घेत होते. आपल्या मुक्ततेनंतर व्हाइसरॉयनीं आपल्याला मुलाखत द्यावी

म्हणून मिसेस बेझंट यांनीं बरेच वेळां खटपट केली. पण त्यांना धुडकावून लावण्यांत आलें. मिसेस बेझंट यांची वाणी तिखट आहे अशी लॉर्ड चेम्सफर्ड यांची तक्रार होती म्हणून त्यांची येथून रवानगी करावी असा त्यांचा विचार होता, असे मि. मॉंटेग्यू यांनीं आपल्या डायरींत लिहून ठेविलें आहे. आपल्या मुक्ततेनंतर मिसेस बेझंट यांनीं निःशस्त्र प्रतिकाराच्या कल्पनेला विरोध केला होता. व्हाइसरायनीं मिसेस बेझंट यांच्या बाबतींत जें धोरण स्वीकारलें होतें त्याचा ह्याच्याशीं कांही संबध होता काय ? मि. मॉंटेग्यू यानीं आपल्या डायरीच्या १३७ व्या पानांत या बाबींसबंधानें खालील प्रमाणे उल्लेख केला आहे.

"मिसेस बेझंट यांच्या भाषणाबाबत आपण कांहीतरी कायदेशीर इलाज करणार आहोत असे चेम्सफर्ड मजजवळ बोलत होते, व आपण काय करण्याचे ठरविलें आहे हेंही ते मजपाशीं सांगणार होते ही गोष्ट मला समजूं नये हे ठीक. मिसेस बेझंट याच्या भाषणांतील जहालपणासबधाने आपल्याला खेद होतो असें लिहिण्याचें माझे मनांत होतें पण त्याचा उपयोग होणार नाहीं म्हणून मी लिहिलें नाही. त्याच्या मुक्ततेनंतर लोकात खळबळ उठाली असती. व माझ्या भेटीमुळें हिंदुस्थानात शात वातावरण निर्माण झाले नाही म्हणून उपहास व्यक्त केला गेला असता, व मिसेस बेझंट यांनी आपलीं अभिवचने मोडलीं असें झालें असते." हीं अभिवचने कोणती ? तीं केव्हा व कोणा दिलीं होतीं ? हे आम्हांला माहीत नाहीं. १९१७ सालच्या अखेरच्या महिन्यात हिंदुस्थानांतील राजकीय वातावरण मॉंटफर्ड सुधारणाच्या चर्चेनें भारून गेले होतें. मि. मॉंटेग्यू व लॉर्ड चेम्सफर्ड हे निरनिराळ्या संस्थाकडून आलेल्या शिष्टमडळाचें स्वागत करीत होते व मुलाखती देत होते. मि. मॉंटेग्यू याना आपण पाठिंबा दिला पाहिजे असें मिसेस बेझंट यांनीं आपल्या मित्रांजवळ बोलून दाखविलें होतें. हिंदुस्थानांतील जहालानी व इंग्लंडातील कट्टर कॉन्झर्वेटिव्हानीं मॉंटेग्यूशीं आपल्याला काहीं कर्तव्य नाही असें जाहीर केलें तर मि. मॉंटेग्यू कांहींही करू शकणार नाहींत असे नेमस्त पुढारी सर्वत्र बोलून दाखवीत होते. हिंदुस्थानांतील परस्पर विरोधी वर्गांतील लोकाशीं चर्चा करून पार्लमेंटपुढे सादर करण्याकरितां एक योजना तयार करावयाचें येवढेंच काम मि. मॉंटेग्यू यांचेकडे सोंपविलें होतें असें म्हणतात. पण लखनौ कॉंग्रेसमध्यें हिंदुमुसलमानाचें ऐक्य होऊन जो एक तडजोडीचा मसुदा तयार करण्यात आला होता, तो सर्व मसुदा मि. मॉंटेग्यू यानीं जशाचा तसा

आपल्या योजनेंत सामील करून घेतला होता. सुधारणांच्या योजनेसंबंधानें बोलावयाचें असल्यास ती १९१६ च्या मार्चमध्येंच तयार करण्यांत आली होती. ही गोष्ट आपल्याला अगदीं नव्यानेंच कळली असें कित्येकांना वाटल्याशिवाय राहणार नाही. हिंदुस्थानांतील टेरिटोरिअल फोर्समध्यें लॉर्ड चेम्सफर्ड हे मेजर होते. व्हाइसरॉयांच्या जागेवर त्यांची नेमणूक करण्यांत आली आहे असें त्यांना कळविण्यांत आल्यावर १९१६ च्या मार्चमध्यें ते इंग्लंडला गेले. त्या वेळीं ही संपूर्ण योजना त्यांना दाखविण्यांत आली. लॉर्ड चेम्सफर्ड यांच्या नांवावर जी योजना विकली जाते तिच्या संबंधाची वरील हकीकत १९३४ सालीं बाहेर पडली. मि. मॉटेग्यू यानी मिसेस बेझंट, टिळक व गांधी यांच्या मुलाखती घेऊन त्यांचीं सुधारणेच्या हक्काविषयींचीं मतें त्यांनी ऐकून घेतलीं होतीं. "ब्रिटननें द्यावी व हिंदुस्थाननें स्वीकारावी इतक्या किंमतीची ही सुधारणा नाहीं" असें आपलें मत देणाऱ्या मिसेस बेझंट यांची सुप्रसिद्ध व उत्कृष्ट इंग्रजी भाषेंतील जबानीही त्यांनीं ऐकून घेतली होती. पण या सर्व मुलाखतीचा प्रत्यक्ष योजनेवर कांहीं परिणाम झालेला दिसत नाहीं. मग मि. मॉंटेग्यू यानी हिंदुस्थानांत येऊन काय केले? आपली योजना खात्रीनें अमलांत आणून दाखवितील असे कोणकोण लोक आहेत हें त्याना पहावयाचें होतें. सुधारणा अंमलांत आल्यांनतर कोणकोण लोक भावी दिवाण, एक्झिक्युटिव्ह कौन्सिलचे सभासद व ॲडव्होकेट जनरल होण्यास लायक आहेत हें त्याना ठरवावयाचें होतें. मि. मॉटेग्यू यांनीं हिंदुस्थानला जी भेट दिली तिच्यामागें वरील उद्देश होता ही गोष्ट १९१८ च्या आरंभीं हिंदी पुढाऱ्यांच्या तोंडून जे उद्गार बाहेर पडले त्यावरून सिद्ध झाली आहे. "मि. मॉटेग्यू याना आपण पाठिंबा दिला पाहिजे" हा त्या उद्गारांपैकींच एक उद्गार होता. आपल्या मुक्ततेनंतर सरकारशीं सहकार करण्याची तत्परता मिसेस बेझंट यांनीं दाखविली असतांही मि. मॉंटेग्यू यांनीं मिसेस बेझंट याना शिष्टाचारानें वागविलें नाहीं. मि. मॉंटेग्यू हिंदुस्थानांत आले असतांना ही एक मोठी अनिष्ट गोष्ट घडली यांत शंका नाहीं.

१९१७ सालीं मिसेस बेझंट यांची होमरूलची चळवळ परमावधीला पोंचली होती. याच वेळीं गांधीजी हे आपल्या कांहीं निवडक सहकाऱ्यांसह चंपारण्यांतील शेतकऱ्यांच्या गाऱ्हाण्यांची चौकशी करण्यांत गुंतले होते. बिहारचे राजेन्द्रबाबू, ब्रजकिशोरबाबू, गोरखबाबू, अनुग्रहबाबू व भारत सेवक समाजाचे प्रो. कृपलानी

व डॉ. एच्. एस्. देव हे गांधीजींच्या बरोबर चंपारण्यामध्यें काम करण्यास गेले होते. चंपारणातलि चौकशीचें काम संपेपर्यंत गांधीजींनीं व त्यांच्या सहकाऱ्यांनी होमरूलच्या चळवळींत ६ महिने मुळींच भाग घेतला नाहीं. व हिंदुस्थानच्या इतिहासांत एका नवीनच युगाल¹ सुरुवात करणाऱ्या सत्याग्रहांतील सुप्तशक्ती त्यांनीं राष्ट्राच्या निदर्शनास आणून दिली.

बिहारच्या वायव्य कोपऱ्यांत चंपारण्य जिल्हा आहे. एकोणिसाव्या शतकाच्या आरंभीं युरोपियन मळेवाले या भागांत निळींची लागवड करूं लागले. त्या जिल्ह्यांतील जमीनदारांकडून विशेषतः कर्जात बुडलेल्या बेटियाच्या महाराजांकडून या मळेवाल्यांनी हंगामी व कायमच्या भाडेपट्टयानें जमीनी घेतल्या होत्या. जमीन खंडानें घेतल्यामुळें प्राप्त झालेल्या हक्कामुळें व देशातील राज्यकर्त्या वर्गातील लोकांचे ते भाईबंद असल्यामुळें कुळांच्या जमिनीपैकी काही ठिकाणीं तीन विसांश तर काहीं ठिकाणीं पाचविसांश भागात ते निळीचीं पिकें काढून घेऊं लागले. कांहीं दिवसानीं हा आपला हक्कच आहे असें ते समजूं लागले व बेंगाल टेनन्सी ॲक्टसुळे त्याच्या ह्या हक्कास मान्यता मिळाली. कुळानें खंडानें घेतलेल्या जमीनींतील तीनविसांश भागांत नीळ पिकविली पाहिजे अशी पद्धत रूढ झाल्यामुळें तिला ''तिनकिठिया'' असें नांव पडलें. अशा प्रकारने निळीची पैदास करणें हें आपणांस मुळींच फायदेशीर होत नाहीं, इतर पिकाचेंही ह्यामुळें नुकसान होते व ह्या निळीच्या लागवडीकरिता जी मजुरी मिळते तीही केवळ नाममात्र असते अशी ह्या भागांतील कुळांची तक्रार होती. ह्या अन्यायाला बऱ्याच वेळा तोंड फुटलें होतें व ह्या भागात शेतकऱ्याचे बरेच दंगेही झाले होते. पण सरकारच्या दडपशाहीपुढें त्याचें कांही चाललें नाहीं. ह्या दंग्यामुळें एक परिणाम मात्र झाला. शेतकऱ्याला निळीच्या पिकांबद्दल मळेवाल्याकडून मिळणाऱ्या किंमतींत थोडी फार वाढ झाली. २० साव्या शतकाच्या आरंभीं सिंथिटिक रंग हिंदुस्थानांत येऊं लागल्यानें चंपारण्यमध्यें ज्या पद्धतीनें निळींची पिके काढण्यांत येत होती, ती पद्धत देखील मळेवाल्यांना नुकसानकारक होऊं लागली व ते आपले कारखाने बंद करूं लागले. हें नुकसान मळेवाल्यांनींच वास्तविक सोसायला पाहिजे, परंतु या नुकसानीचा बोजा गरीब कुळांवर टाकण्याची एक युक्ती त्यांनीं योजली. जीं गावें कायमच्या भाडेपट्यांनी या मळेवाल्यांनीं घेतलीं होतीं व खंडाच्या प्रमाणांत वाढ झाल्याबरोबर मूळ जमिनदारापेक्षां जास्त नफा ज्या मळे-

वाल्यांनाच मिळत होता अशा ठिकाणीं हे मळेवाले कुळांकडून करारनामा करून घेत असत. कुळांनीं पूर्वीपेक्षां अधिक खंड द्यावा व निळीचें पिक काढू नये, असें या करारनाम्यांत लिहून घेतलें जात असे. असें हजारों करार कुळांकडून सक्तीनें करून घेण्यांत आले. खंडाची ही वाढ करणें सामान्यतः बेकायदेशीरच होतें. परंतु मळेवाल्यांच्या खटपटीनें टेनन्सी ॲक्टमध्यें असें कलम घालण्यांत आलें. कायदेमंडळांतून व कायदेमंडळाबाहेरही ह्या कायद्याबद्दल जोराचा निषेध करण्यांत येत होता. तथापि सरकारनें हे करारनामे करून घेण्याच्या कामीं खास रजिस्ट्रार नेमले व कुळांकडून असले करारनामे लिहून घेण्यास जमीनदारांना मदत केली. ज्या गांवांतून ह्या मळेवाल्यांनीं हंगामी भाडेपट्ट्यांनीं जमिनी घेतल्या होत्या त्या ठिकाणीं खंडाचें प्रमाण वाढल्यामुळें भाडेपट्ट्यांची मुदत संपल्यावर मूळ जमिनदाराचाच फायदा होणें स्वाभाविक होतें आणि तेव्हा कुळांनीं आपल्या जमिनींत निळीचें पिक काढूं नये व त्याच्याबद्दल खंड म्हणून रोख पैसे द्यावे अशी पद्धत सुरूं केली. अशा रितीनें हे मळेवाले कुळांकडून जवळ जवळ १२ लाख रुपये वसूल करीत होते. सबंध जिल्हा जवळ जवळ मळेवाल्यांच्या मालकीचाच झाल्यामुळें खंडाचा वसूल करण्यास सोयीचे असे त्या जिल्ह्याचे त्यांनीं भाग पाडले. ह्या जमिनदारांचे सरकारवर व त्याच्या अधिकाऱ्यावर इतकें वजन होतें कीं, त्याच्याविरुद्ध जाण्यास कुळांची छाती नव्हती. खंड वसूल करण्याकरिता उच्च वर्गाच्या हिंदूंनाही मळेवाले जमीनदार गुरांच्या कोंडवाड्यांत कोंडून ठेवीत असत व त्याना बदडूनही काढीत असत. प्रसगीं त्यांची घरेंही लुटित असत. न्हावी, धोबी, चांभार, ह्यांनीं त्याचीं कामें करूं नयेत असे हुकूम देत असत. काहींना त्याच्या घराबाहेर पडू देत नसत तर कांहींना घरांतही राहूं देत नसत. व काहींच्या घराच्या उंबऱ्यावर महाराना आणून बसवीत असत. अशा रीतीनें अनेक प्रकारचे जुलूम व जबरदस्ती करून ते खंड वसुली करीत असत. हे मळेवाले लोकांकडून निरनिराळ्या निमित्तानें दुसरे करही वसूल करीत. चौकशीनंतर अशा रीतीनें कर उकळण्याचे जवळ जवळ ५५ प्रकार होते असें बाहेर आलें. लग्नावर कर, प्रत्येक चुलीवर कर, तेलाच्या घाण्यावर कर, साहेब आजारी पडला व त्याला चांगल्या हवेच्या ठिकाणीं जावें लागलें तर कुळांनीं पायहीं नावाचा कर द्यावा, साहेबाला घोडा हत्ती किंवा मोटार लागली तर कुळांनीं

घोराई, हतीआई किंवा हवाई कर द्यावे असे हे करवसुलीचे कांहीं विचित्र प्रकार होते. ह्या करांशिवाय मळेवाल्यांचा अपमान होईल असें कृत्य एखादें कूळ करील तर त्याच्याकडून जबरदस्त दंडही वसूल करण्यांत येत असे. ह्या मळेवाल्यांनीं दिवाणी, फौजदारी, न्यायनिवाड्याचे सर्व हक्क आपल्याच हातीं घेतले होते. बिहारमधील सार्वजनिक कार्यकर्त्यांनीं ह्या अन्यायाचें परिमार्जन करण्याकरितां पुष्कळ प्रयत्न केले पण ते निष्फळ ठरले होते. स्थानिक सरकारी अधिकाऱ्यांना ह्या गाऱ्हाण्यांची जाणीव होती. कुळांवर अशा नाना प्रकारचे अन्याय होत आहेत हे ते कबूल करीत असत व त्यांच्याबद्दल सहानुभूतीही दाखवीत असत. पण ह्या मळेवाल्यापुढें त्यांचाही नाइलाज झाला होता व त्यांच्याविरुद्ध कडक उपाय योजण्यास ते खुषी नव्हते.

अशा परिस्थितींत कुळांचे काहीं प्रतिनिधी व बिहारचे कॉंग्रेसचे प्रतिनिधी यांनी लखनौ कॉंग्रेसच्या वेळी गांधीजींची भेट घेतली. व त्यांनीं चंपारण्यामध्यें येऊन तेथील परिस्थिती समजून घेण्याचे आश्वासन दिलें. १९१७ च्या एप्रिल-मध्यें मोतीहारी नांवाच्या जिल्ह्याचे गावीं ते गेले व तेथून ते जवळच असलेल्या एका खेडेगांवात जाणार होते. इतक्यांत १४४ कलमान्वयें त्यांनीं हा जिल्हा सोडून जावे अशी नोटीस त्यांच्यावर बजावण्यात आली. गांधीजींनीं हा हुकूम मानला नाहीं. सरकारनें दिलेलें "केसर हिंद"चे सुवर्णपदक त्यांनीं परत केलें. व आपल्या खटल्याची चवकशी करण्यांत यावी म्हणून ते मॅजिस्ट्रेटपुढें जाऊन उभे राहिले. गांधीजींनीं मॅजिस्ट्रेटपुढे लेखी जबानी सादर करून आपण गुन्हा केला असल्याचें कबूल केलें. ही गोष्ट आतां सर्वांच्याच परिचयाची झाली आहे. पण त्या वेळच्या लोकांना ती अगदींच नवीन व अपरिचित होती. सरकारनें शेवटीं गांधीजींवरील हा खटला काढून घेतला व त्यांना जी चौकशी करावयाची होती ती करण्यास परवानगी दिली. गांधीजींनीं आपल्या मित्रांच्या सहाय्यानें २० हजार कुळांच्या साक्षी घेतल्या, आणि त्यांच्या आधारावर त्यांनीं त्यांची एक मागणी तयार केली. सरकारनेंही ह्या प्रश्नाची चौकशी करण्याकरितां शेवटीं एक कमिशन नेमलें. जमिनदार मळेवाले व सरकार ह्यांचे प्रतिनिधी व कुळांच्यातर्फे स्वतः महात्मा गांधी यांना ह्या कमिशनमध्ये घेण्यांत आलें. चौकशी-अंतीं ह्या कमिशनने जवळजवळ एक मतानें आपला रिपोर्ट तयार केला. कुळांच्या सर्व तक्रारी खऱ्या आहेत अशी मान्यता कमिशननें दिली. तडजोड म्हणून

खंडाचें वाढलेलें प्रमाण कमी करण्यांत आलें व ही वाढ करून कुळांकडून मळेवाल्यांनीं जे पैसे वसूल केले ते त्यास परत द्यावयास लाविले. कमिशननें ज्या शिफारशी केल्या होत्या, त्यांच्या अनुरोधाने एक कायदा करण्यात आला व निळीचें पिक काढणें अथवा तिनकीठिया पद्धति रद्द करण्यांत आली. यानतर थोडया वर्षांनी मळेवाल्यांनीं आपले कारखाने व जमिनी विकल्या व ते जिल्हा सोडून निघून गेले. विहारमधील त्या वेळच्या पुढाऱ्यांकडून व सरकारकडून जीं गाऱ्हाणीं दूर करणें शंभर वर्षे शक्य झालें नाहीं ती काहीं थोडया महिन्यात दूर करण्यांत आलीं. म्हणून गाधी जे जे सांगतात किंवा करतात त्यावर चंपारण्याचा पूर्ण विश्वास बसला आहे.

१९१८ मधील खेडा जिल्ह्यांतील सत्याग्रह परिणामाच्या दृष्टीनें यशस्वी झाला नसला तरी तात्विकदृष्ट्या चंपारण्य सत्यागृहाइतकाच महत्वाचा आहे. कितीही दुष्काळ पडो, सरकारच्या सारावसूलीच्या हक्कासंबंधानें जाब विचारणें ही गोष्ट गांधीजी हिंदुस्थानच्या राजकारणात पडण्यापूर्वी शेतकऱ्यांना माहीत नव्हती. कायदेकौन्सिलातील त्याचे प्रतिनिधी शेतकऱ्याच्या बाजूनें अर्ज करीत असत किंवा ठरावही आणीत असत. पण हा विरोध येथेच संपत असे. १९१८ मध्यें गांधीजींनीं नव्या युगाला सुरवात केली. पिकें बुडाल्यामुळें खेडा जिल्ह्यांत दुष्काळ पडण्याचीं चिन्हें दिसू लागलीं व सरकारने साऱ्याची तहकुबी करावी असें शेतकऱ्यांना वाटू लगलें. नेहमींचे उपाय करण्यात आले पण ते सर्व निष्फळ ठरले. सरकारतर्फे पिकांची जी आणेवारी करण्यात आली त्यांत खेडा जिल्ह्यातील पीक ४ आण्यावर आहे असें सरकारी अधिकाऱ्याचें मत होतें व त्यामुळें लॅंड रेव्हिन्यू कोडप्रमाणें शेतकऱ्याना सारातहकुबीची मागणी करतां येत नाहीं असें अधिकाऱ्यांचें मत पडलें. जिल्ह्यातील पीक ४ आण्यापेक्षाही कमी आहे असे शेतकऱ्याचें म्हणणें होतें. अर्ज व विनत्या निष्फळ झाल्यानंतर सत्याग्रहाचा अवलंब करण्याबद्दल शेतकऱ्यांना सल्ला देण्याशिवाय महात्माजींना गत्यंतरच उरलें नाहीं. शेतकऱ्यांना सत्याग्रहाचें शिक्षण देण्याकरितां महात्मा गांधींनीं स्वयंसेवकांची मागणी केली. पुष्कळ मंडळींनीं तावडतोब महात्माजींना ह्या कामीं मदत करण्याचें कबूल केलें. सरदार वल्लभभाई हे या स्वयंसेवकापैकींच एक होते. आपला भरभराटीचा व वाढता वकिलीचा धंदा त्यांनीं तहकूब ठेवला व ते गांधींना येऊन मिळाले.

खेडा सत्याग्रहाच्या ह्या प्रसंगानेच हे दोन थोर पुरुष एकत्र आले. सरदार वल्लभभाई यांच्या सार्वजनिक जीवनास येथूनच प्रारंभ झाला. "आपल्या जमिनी जप्त झाल्या तरी हरकत नाहीं, पण आपलें म्हणणें आपण खोटें पाडूं देणार नाहीं, व गरीब कुळाना सारातहकुबी देण्यांत आली तर श्रीमंत जमिनदार त्यांचा सारा देण्यास तयार होतील " ह्या प्रतिज्ञा पत्रकावर शेतकऱ्यांच्या सह्या घेण्यांत आल्या. सत्याग्रहाच्या ह्या चळवळीमुळें शेतकरी समाजाला एक नवीनच शिक्षण मिळाले. सारा वसूल करण्याचा सरकारचा हक्क असला तरी त्याच्या उलट जाब विचारण्याचा आपलाही हक्क आहे. सरकारी अधिकारी हे आपले मालक नसून आपले नौकर आहेत, त्यांच्यासंबंधानें कोणत्याही प्रकारें भय बाळगण्याचें कारण नाही. कितीही जुलूम करण्यात आले, किंवा धमकावण्या देण्यात आल्या तरी त्याला भीक घालण्यात येऊं नये, कितीही धैर्य असलें तरी त्याबरोबरच आगीं नम्रता नसेल तर ते फुकट जाते. अशा प्रकारचे अनेक धडे ह्या शेतकऱ्यांना सत्याग्रहापासून शिकतां आले. गाधीजी, वल्लभभाई व त्यांचे इतर सहकारी खेडयापाडयांतून हिंडून सत्याग्रहाच्या तत्त्वाचा प्रचार करीत असत. शेतीचीं जनावरे किंवा इतर माल जप्त करण्यांत येईल व तसेच जमिनी जप्त करण्यांत येतील अशाही धमक्या देण्यांत आल्या. तरी शेतकऱ्यानीं डगमगून जाऊं नये असा उपदेश ते त्यांना करीत असत. ह्या चळवळी करतां पैशाची जरूरी नव्हती परंतु, मुंबईच्या व्यापाऱ्यानीं सत्याग्रही पुढाऱ्यांवर देणग्यांचा वर्षाव केला. शेतकऱ्याचीं अंतःकरणें खंबीर करण्यासाठीं ज्या जमिनी अन्यायानें जप्त केल्या आहेत त्याच्यातील पिकें काढून न्यावीं असा गाधीजींनीं सल्ला दिला. कै. मोहनलाल पंड्या यानीं ह्या कामीं पुढाकार घेतला होता. मोहनलाल पंड्या यानीं एका शेतांतील कांद्यांचें पिक काढून नेले. व ह्या कामी कांहीं शेतकऱ्यांनींही त्याना मदत केली. ह्या सर्वांना अटक करण्यांत आली व थोडया दिवसांच्या तुरुंगवासाची शिक्षा देण्यांत आली. पण पुढे अगदीं अनपेक्षितपणें ही चळवळ थांबली. गरीब शेतकऱ्यांच्या बाबतींत सारातहकुबीची मागणी सरकारनें मान्य केली. सरकारनें ही गोष्ट जाहीर केली नाहीं; तडजोड म्हणून आपण ही तहकुबी करीत आहों असें लोकांना भासूं दिलें नाहीं. इतक्या उशिरां व थबकत थबकत सरकारनें या प्रकरणाचा निर्णय लावल्यानें फारच थोडया लोकांना त्यांचा फायदा झाला. तात्विक दृष्टया ह्या सत्याग्रहाचा विजय झाला एवढेंच. ह्या सत्याग्रहाला

पूर्ण विजय प्राप्त झाला नाहीं तरी त्याच्यापासून बरेच चांगले अप्रत्यक्ष परिणाम झाले. ह्याच चळवळीमुळें गुजराथमधील शेतकऱ्यांत अपूर्व जागृती झाली व त्यांना खरें राजकीय शिक्षण मिळालें. "आपला उद्धार आपणच केला पाहिजे हा धडा जनतेच्या हृदयावर ह्या सत्याग्रहामुळें कायमचा खोदला गेला आहे. कष्ट सहन करण्याच्या व स्वार्थत्याग करण्याच्या सामर्थ्यावरच आपला उद्धार अवलंबून आहे. खेडा चळवळीमुळें गुजराथच्या जमिनींत सत्याग्रहाचें मूळ पक्कें रुजलें आहे" असे महात्माजींनीं आपल्या आत्मचरित्रांत म्हटलें आहे.

अमदाबादेंतील मजूरसंघटना करण्याचे कामीं तेथील कॉंग्रेसवाल्यानी जी कामगिरी केली तिचाही विचार या ठिकाणीं करणें जरूर आहे. अहमदाबादेंतील गिरण्यांतील मजुराची संघटना खुद्द महात्माजींनीं केली. कॉंग्रेसचें नेतृत्व महात्माजींकडे या वेळीं आलेलें नव्हतें. मजुराच्या संघटनेचा हा इतिहास अद्भुतरम्य असून राष्ट्राच्या स्वातंत्र्याच्या इतिहासाला तो भूपणास्पद होईल असाच आहे. औद्योगिक कलह मिटविण्याचे कामी सत्य व अहिंसा ह्या तत्वांचा उपयोग करण्यांत आला ही गोष्ट इतिहासात अगदीं पहिलीच आहे. सत्य व अहिंसा ह्या तत्वाच्या आधारें केलेल्या ह्या मजूरसंघटनेच्या चळवळीचे फार दूरवर परिणाम झाले असून अहमदाबादची मजूरमहाजन औद्योगिक क्षेत्रांत कितीही वादळ उत्पन्न झाले तरी त्याना यशस्वी रीतीनें तोंड देण्यास ही समर्थ झाली आहे. पाश्चात्य प्रवाशांनीं ही यूनिअन पाहून तिच्याबद्दल आश्चर्य व कौतुक प्रगट केलें आहे.

श्रीमती अनसूया बेन साराभाई या १९१६ पासून मजूरभागात शिक्षणप्रसाराचें काम करीत होत्या, यामुळें गिरण्यातील मजूराच्या अडचणी काय आहेत याची त्यांना कल्पना आली होती. त्यांच्या खटपटीमुळें ताणा बनविणाऱ्या कामगाराचा थोडा फायदा झाला. तेव्हा सर्वच कामगारांची संघटना करून त्याना मदत करण्याच्या कामीं कोणाचा तरी सल्ला घेण्याची त्यांना जरूरी वाटली. १९१८ सालीं गिरणीवाले व विणकर खात्यांतील कामगार यांच्यात कांहीं तक्रार उपस्थित झाली. त्या वेळीं श्री. अनसूया बेन यांनीं महात्माजींचा त्या बाबतींत सल्ला घेतला. मजुरांच्या तक्रारी ऐकण्यास गिरणीवाल्यांना भाग पाडण्याऐवजीं महात्माजींनीं त्यांना पंचायतीचें तत्त्व मान्य करावयास लावलें. कामगार चळवळींतील ही एक अत्यंत महत्वाची गोष्ट होती. म. गांधी व सरदार वल्लभभाई हे कामगारांतर्फे प्रतिनिधी

होण्यास तयार झाले, परंतु कांहीं गिरण्यांतील कामगारांनीं संप केल्यामुळें पंचायतीचा हा प्रयत्न यशस्वी झाला नाहीं. महात्माजींनी याबद्दल खेद प्रदर्शित केला व आपल्या चुकीची दुरुस्ती करण्यास त्यांनीं कामगाराना तयार केलें. दोन्ही पक्षांनीं आपआपसांत केलेले करार मोडले होते पण गिरणीवाले कोणाचेंच ऐकायला तयार नव्हते. कामगारांनी या बाबतींत एकादा निश्चित उपाय अमलांत आणावा असा त्यांना सल्ला देण्यापूर्वी महात्माजींनीं या प्रश्नाची पूर्ण चौकशी केली. धंद्याची परिस्थिति, गिरणीवाल्यांना मिळणारा नफा, जीवनास आवश्यक वस्तूंच्या किंमतींतलि वाढ व तसेंच मालाच्या पैदाशीकरितां लागणाऱ्या खर्चाची वाढ या सर्व गोष्टींचें महात्माजींनीं काळजीपूर्वक परीक्षण केलें व आपल्या मजूरींत शे. ३५ प्रमाणात वाढ मागण्याचा कामगाराना हक्क आहे, असे त्यांना आढळून आले. कामगार यापेक्षांही जास्त मजूरी मागत होते, पण त्याचे मन वळविण्यांत आलें, व आपल्या मागण्या अगदीं कमीतकमी स्वरूपाच्या व न्यायतः मागता येतील इतक्या प्रमाणांत असाव्या अशी हितावह परंपरा या बाबतींत सुरू करण्यांत आली.

गाधीजींनी निश्चित केलेली ही मागणी गिरणीमालकांना कळविण्यांत आली. शें. २० पेक्षां जास्त वाढ करण्यास ते तयार नव्हते. त्यानी २२ फेब्रुवारी १९१८ रोजीं गिरण्यांना कुलुपें ठोकून त्या बंद ठेवल्या. यानंतर गाधीजींनीं सर्व कामगारांची सभा बोलावली. आपली मागणी पुरी होईपर्यंत कामावर जावयाचें नाहीं व बंदी ऑर्डर चालू असेपर्यंत शांतताभंगाचे कोणतेहि कृत्य करावयाचें नाहीं, असें एक प्रतिज्ञापत्रक या सभेंत तयार करण्यात आलें व तेथें असलेल्या एका वृक्षाखालीं या प्रतिज्ञापत्रकावर कामगाराच्या सह्या घेण्यात आल्या. हा वृक्ष अद्यापही पवित्र मानला जातो. कामगारांनीं स्वत केलेल्या निश्चयापासून ढळू नये ह्मणून त्यांच्यांत योग्य त्या शिक्षणाचा प्रचार करण्याचा प्रयत्न करण्यात आला. श्रीमती अनसूया बेन, श्री. शंकरलाल बँकर व छगनलाल गाधी यांनीं कामगारांच्या घरोघरीं जाऊन हें काम केलें. संपवाल्या कामगारात हस्तपत्रकेंही वाटण्यांत आलीं. हीं पत्रकें स्वतः म. गाधीं कामगाराना समजेल अशा साध्या व सोप्या भाषेंत लिहीत असत. हा लढा केवळ औद्योगिक स्वरूपाचा नसून तो नैतिक व आध्यात्मिकही आहे. हा लढा यशस्वी झाल्यास वेतनांत वाढ होइलच, पण त्याबरोबरच कामगाराची मानसिक उन्नतीही होईल, असें या पत्रकातून

प्रतिपादन करण्यांत येत होतें. हा संप पधरा दिवस चालला. संपवाल्यांना पुढें दम निघेना. आमच्या प्रतिज्ञेचें पालन करण्याचा गांधीं उपदेश करीत आहेत. गांधींनीं तसें सांगायला काहीं हरकत नाहीं, पण पोराबाळांची उपासमार होत आहे हें डोळ्यानें पहात असतांना प्रतिज्ञापालन करणें सोपें नाहीं, असें त्यापैकीं कित्येक कामगार म्हणूं लागले. कामगारांचे हे उद्गार म्हणजे परमेश्वराकडून मिळालेली सावधगिरीची सूचनाच आहे असें गांधीजींना वाटलें व कामगारांना आपली प्रतिज्ञा पाळून करण्याचें सामर्थ्य प्राप्त होईपर्यंत आपण अन्न स्वीकारणार नाहीं किंवा कोणत्याही वाहनाचा उपयोग करणार नाहीं असें गांधींजींनीं त्या दिवशींच्या संध्याकाळच्या सभेंत जाहीर केलें. ही बातमी सर्व हिंदुस्थानभर वणव्यासारखी पसरली. उपवास सुरू करतांना गांधीजींनीं वापरलेली भाषा जरी थोडी निराळी असली तरी हा मरणान्त उपवास होता व प्रतिज्ञापालनाच्या कामीं कामगाराना मदत करण्याच्या नैतिक हेतूनें प्रेरित होऊन त्यांनीं आपलें प्राण पणास लावले होते. असें करणें म्हणजे गिरणीच्या मालकांवर एक प्रकारचा जुलूमच करण्यासारखे आहे असें टीकाकार व निंदक म्हणूं लागले. गिरणीवाल्याना त्याच्या इच्छेविरुद्ध वागावें लागेल व कामगाराची मागणी मान्य करावी लागेल असा दोष उपवासाच्या बाबतींत देता येईल, हें खरें असलें तरी उपवासाचा तो अप्रत्यक्ष परिणाम आहे. प्रत्यक्ष परिणाम नव्हे. कामगारानीं प्रतिज्ञापालनाचे व्रत घेतलें आहे, तें पूर्ण करण्याच्या कामीं त्याना मदत करणें हा या उपवासाचा प्रत्यक्ष परिणाम आहे, असें गांधीजींचें म्हणणें होतें व्रतपालनाचें पावित्र्य भ्रष्ट व्हावे ही गोष्ट गांधीजींना खपत नाहीं, त्यामुळें त्यांचें अंत:करण दु:खित होतें. कामगारांनीं त्याचें मन वळविण्याचा प्रयत्न केला पण त्याचा निश्चय बदलणें अशक्य होतें. मजूरानीं यापुढें आपला वेळ फुकट घालवू नये, मिळेल ते काम करून प्रामाणिकपणें पोटास मिळवावें असें त्यांनीं कामगाराना सांगितले. संपवाल्यांना धान्य वाटण्याकरिता फंडाची मागणी महात्माजी सहज करू शकले असते पण त्याना ही कल्पना सहन झाली नाहीं. कामगाराना धान्य वाटण्यांत आल्यास त्यांच्या मागें असलेलें आत्मक्लेशाचें सामर्थ्य नष्ट होईल असें त्याना वाटलें. सत्याग्रहआश्रमात शेंकडो कामगारांना काम मिळेल अशी व्यवस्था करण्यात आली. आश्रमातील इमारती बांधण्याचें काम या वेळीं चालू होतें. आश्रमांतील मंडळींबरोबर संपवालेही कामें करू लागले. अनसूया बेनहि या

कामगारांना येऊन मिळाल्या, व त्यांच्या बरोबर माती, विटा, चुना वाहण्याचें काम करूं लागल्या. या गोष्टींचा नैतिक दृष्ट्या फार जबर परिणाम झाला. कामगारांच्या निश्चयाला यामुळें बळकटी मिळाली व गिरणी-मालकाचीं अंतःकरणेंहि द्रवून गेलीं. निरनिराळ्या प्रांतातील पुढाऱ्यानीं गिरणीवाल्याना हा लढा मिटवून घेण्याबद्दल पत्रें पाठविलीं. "हिंदुस्थानच्या हिताकरिता मार्ग घ्या व गांधीजीचे प्राण वांचवा" असे मिसेस बेझंट यानीं गिरणीमालकांना तारेनें विनंति केली. कामगारांना सोसाव्या लागत असलेल्या यातना व गांधीजींवर आलेलें प्राणसंकट पाहून अंबालाल साराभाई यांच्या पत्नी श्री. सरलादेवी यांचें अंतःकरण कळवळून गेलें व या लढ्यांतून काहींतरी तडजोडीचा मार्ग काढण्यासाठीं गिरणी-मालकाचें मन वळविण्याचें कामीं त्यांनीं अतिशय मेहनत घेतली. उपवासाच्या चौथ्या दिवशीं कामगारांच्या व्रताचें पालन होईल व त्याची न्याय्य मागणी गिरणीमालकांना सन्मानपूर्वक मान्य करता येईल असा एक तडजोडीचा मार्ग निघाला. पगारवाढीच्या प्रश्नाचा अखेरचा निर्णय ठरविण्याचें काम पंच मंडळाकडे सोंपविण्याचे ठरलें. या मंडळाने पूर्वी करण्यात आलेल्या शे. ३५ वाढीला मान्यता दिली.

वरीलप्रमाणे या लढ्याचा शांततापूर्वक निर्णय करण्यात आला. कॉंग्रेसचे पुढारी व कामगार याच्यांत अभेद्य एकी झाली. या लढ्यानंतर "टेक्स्टाईल लेबर असोसिएशन" नांवाची संस्था अहमदाबादेत स्थापन झाली. अमदावादचे प्रमुख पुढारी श्री. शंकरलाल बँकर व श्रीमती अनसूया बेन याच्या देखरेखी-खालीं गेलीं १५ वर्षे या संस्थेचें कार्य यशस्वी रीतीनें चाललें आहे. कामगारां-वर आलेल्या अनेक संकटातून पार पडण्याचे कामीं या संस्थेनें कामगाराना मदत केली आहे व औद्योगिक कलहामुळें उत्पन्न झालेल्या भयंकर अरिष्टातून अहमदावाद शहराचें रक्षण केले आहे. श्री. गुलजारीलाल नंदा याचें नेतृत्वाखालीं अहमदावादमधील गिरण्यातील मजुरांची प्रबल संघटना निर्माण झाली आहे. कामगारवर्गात या यूनियनतर्फे शिक्षण–प्रचाराचें कामहि झाले आहे. या शिक्षणामुळें मजूरवर्गात राष्ट्रीय जागृतीहि झाली असून, अनेक महत्वाचीं सार्वजनिक कामेंही या संघानें केलीं आहेत. १९२७ सालीं गुजराथमध्ये आलेल्या महापुराच्या प्रसंगीं संकटग्रस्त लोकांना मदत करण्याचें काम महात्मा गांधींच्या सल्ल्यावरून या मजूर–महाजननें केलें

आहे. १९३० च्या कायदेभंगाच्या चळवळीच्या वेळीं कॉंग्रेसच्या आज्ञेला मान देऊन दोनशें स्वयंसेवकांनीं दारूच्या गुत्त्यावर पिकेटिंग केलें व त्यांपैकीं १६२ लोकांना लहान मोठ्या मुदतीच्या शिक्षा मिळाल्या. अलीकडे गिरणीमालक व कामगार यांच्यामध्यें गंभीर स्वरूपाच्या तक्रारी उत्पन्न झाल्या. हा तंटा नेहमींप्रमाणें पंचमंडळाकडे सोपविण्यांत आला. कायमचें पंच या नात्यानें गांधीजींनीं या प्रश्नाचा विचार केला. १६ महिने गिरणीमालक व कामगार यांच्यातील तडजोडीच्या वाटाघाटी चालू होत्या, पण एवढ्या मोठ्या मुदतींत असोसिएशननें घालून दिलेल्या शिस्तीमुळें अहमदाबादेंतील कामगारवर्ग शांत राहिला. सत्य आणि अहिंसा यांच्या अधिष्ठानावर कामगारसंघटनेचें कार्य करणारी अहमदाबाद लेबर असोसिएशन ही सर्व जगांत एकच एक संस्था आहे. हिंदुस्थानातील गिरण्याच्या धंद्याचें राष्ट्रीकरण हें या संस्थेचे अंतिम ध्येय आहे. वर्गणी देणारे सुमारें ३०००० कामगार या संस्थेचे सभासद आहेत. १९३४ सालीं ४००० तक्रारींचा या असोसिएशनतर्फे विचार करण्यांत आल्या. त्यांपैकीं शेंकडा ८० तक्रारींचा यशस्वी रीतीनें निकाल लागला. या सालीं ३९ संप या युनियनतर्फे चालविण्यात आले, व त्यांपैकीं २३ संपाचा निकाल कामगारवर्गाला अनुकूल असा लागला. ११८५ स्त्रीकामगारांना २९००९ रुपये मॅटरनिटी बेनिफिट् (प्रसूति–कालातील सोय) कायद्याप्रमाणें या असोसिएशननें मिळवून दिले. अपघातांत सापडलेल्या कामगारांना कॉंपेन्सेशन् (नुकसानभरपाई) कायद्याप्रमाणें १८०७४ रुपये या संघानें मिळवून दिले. मालकांनीं छळ केल्यामुळें ज्या कामगाराचें नुकसान झालें त्या १६४ कामगारांना या मंडळाच्या खटपटीमुळें ९८५६ रुपये (व्हिक्टिमायझेशन् बेनिफिट्) मिळाले. कामगाराना दवापाण्याची मदत, शिक्षणप्रसार, व्यायामाची आवड, करमणुकी, म्युनिसिपालिटीमार्फत करता येणाऱ्या सुखसोयी, मद्यपाननिषेध, वगैरे सामाजिक व लोकोपयोगी कामेंही ह्या संस्थेमार्फत करण्यात येतात.

कॉंग्रेस–लीग स्कीमचें हिंदुस्थानातील प्रमुख भाषांतून भाषांतर करावें, स्वराज्याची ही योजना जनतेला समजावून द्यावी, आणि या योजनेला अनुकूल असलेल्या लोकांच्या सह्या घ्याव्या, असा एक परिणामकारक कार्यक्रम महात्मा गांधींनीं चंपारण्याच्या लढ्यानंतर सुचविला आणि सर्व राष्ट्राला तो आवडला. १९१७ अखेर १०००००० लोकांनीं या योजनेवर आपल्या सह्या केल्या.

काँग्रेसच्या प्रयत्नानें झालेली अशी ही पहिलीच राष्ट्रव्यापी चळवळ होय. स्वराज्याकरितां सर्व देश संघटित करावा व हिंदुस्थान आणि इंग्लंडमध्यें चळवळीचें काम सतत चालू ठेवावें याकरितां फंड जमविण्याचा प्रयत्नही यापूर्वी करण्यांत आला होता. सर एस्. पी. सिंह यांच्या अध्यक्षतेखालीं भरलेल्या मुंबई अधिवेशनाचे वेळीं ऑ. इं. कॉं. कमिटीनें काँग्रेसच्या चळवळीकरितां कायम फंड उभारण्याचा ठराव पास केला होता व या कामाकरिता सुरेंद्रनाथ बानर्जी, भूपेंद्रनाथ बसू, ए. श्रीनिवास अय्यंगार, समर्थ, वाच्छा व मालवीय यांची एक सब्कमिटी नेमण्यांतही आली होती. सर एस. पी. सिंह यांनीं स्वतःच या फंडाला १ लाख रुपये देण्याचें कबूल केलें होते अशीही चर्चा सर्वत्र चालू होती. १७ नोव्हेंबर १९१६ रोजी कलकत्ता येथें या कमिटीची बैठक झाली. हिंदुस्थानांतील काँग्रेसचे काम व ब्रिटिश कॉं. कमिटी व तिचें 'इंडिया' पत्र यांच्याकरितां साडे तीन लाख रुपये जमवावयाचे असें या बैठकींत ठरविण्यात आलें. या फंडाची सर्व प्रकारची व्यवस्था करण्याकरितां ट्रस्टींचें एक बोर्डही नेमण्यांत आले (३० डिसेंबर १९१६). रास बिहारी घोष यांना या मंडळाचे अध्यक्ष नेमण्यांत आलें. १९१७च्या एप्रिलमध्यें कलकत्ता येथें या बोर्डाची सभा भरली. या बैठकींत मि. श्रीनिवास शास्त्री यांना या बोर्डाचे सेक्रेटरी नेमण्यात आलें. पण यानंतर या बाबतींत पुढें कांहींही करण्यात आलेलें नाहीं.

कॉंग्रेसच्या आरंभीच्या कालांत म्हणजे १८८९ सालीं या बाबतीत असाच एक प्रयत्न करण्यात आला होता. ५९००० रु. जमा करून या फंडाला प्रारंभ करण्यात यावा असें त्या वेळीं ठरविण्यांत आलें होतें. यापैकीं फक्त ५००० रु. जमा झाले व ते ओरिएंटल बँकमध्यें ठेवण्यात आले. हिंदुस्थानांतील अत्यंत पतीची एक्सचेंज बँक अशी या बँकेची प्रसिद्धि होती. १८९० सालच्या मुंबई येथील आर्थिक अरिष्टांच्या वेळीं बॅंकेचें दिवाळे निघाले व तिच्यांत ठेव म्हणून ठेवलेली ही लहानशी रक्कम कोंग्रेस गमावून बसली.

१९१७ च्या कलकत्ता काँग्रेससंबंधीं विचार करण्यापूर्वी एका महत्त्वाच्या गोष्टीचा उल्लेख करणें जरूर आहे. कलकत्ता येथे त्या वेळीं जुने नेमस्त व 'होमरूलर व नॅशनॅलिस्ट' असे दोन जबरदस्त पक्ष होते. राय वैकुंठनाथ सेन, अंबिकाचरण मुजुमदार, सुरेंद्रनाथ बानर्जी, व भूपेंद्रनाथ बसू हे जुन्या नेमस्त पक्षाचे अध्वर्यू होते मि. सी आर. दास हे नुकतेच राजकारणांत लक्ष घालू

लागले होते व वी. के. लहिरी, आय. वी. सेन, जितेंद्रलाल बानर्जी यांच्या नव्या तरुण पक्षाला ते येऊन मिळाले होते.

मिसेस बेझंटच्या निवडणुकीसबंधीं जुन्या व नव्या पक्षांत थोडे खटके उडाले पण ते मिटले व बिझाट अध्यक्ष झाल्या. मिसेस बेझंट यांचें अध्यक्षीय भाषण म्हणजे स्वराज्य या विषयावरील एक विस्तृत निबधच होता. हिंदुस्थानांतील लष्करी व व्यापारी प्रश्नांचाही या भाषणांत व्यापक व अभ्यासनीय विचार केला होता. 'कॉमनवेल्थच्या धर्तीवर हिंदुस्थानांत स्वराज्य स्थापन करण्यासंबंधाचें बिल तयार करण्यांत यावें. हें स्वराज्य १९२३ किंवा उशीरांत उशीर म्हणजे १९२८ मध्यें स्थापन करण्यांत येईल, अशी कालमर्यादा निश्चित करण्यांत यावी. ब्रिटिश राज्याचे वसाहतींशीं जसे संबंध आहेत तशाच प्रकारचे संबध हिंदुस्थानशींही असावे.' मिसेस बेझंट यांनीं आपल्या भाषणात मांडलेल्या स्वराज्याच्या मागणीचें स्वरूप वरील प्रकारचें होतें. बर्नार्ड हॉटन याच्या 'ब्यूरोक्रॅटिक गव्हर्नमेंट' या पुस्तकांतील पुष्कळ उतारे त्यानीं आपल्या भाषणांत दिले होते व 'ग्रामस्वराज्या'संबंधानेंही एका विस्तृत बिलाचा उहापोह त्यांनीं या भाषणांत केला होता. कॉंग्रेसचे अध्यक्षस्थान म्हणजे मिसेस बेझंट यांच्या मतानें तीन दिवसांचा जलसा नव्हता कॉंग्रेसचें अध्यक्षस्थान म्हणजे पुढील वर्षभर कॉंग्रेसचें काम करीत राहण्याची दैनंदिन जबाबदारी आहे असें मिसेस बेझंट यांचें मत होतें व त्याप्रमाणे हा आपला अध्यक्षत्वाचा हक्क वर्षभर बजावणाऱ्या मिसेस बेझंट या पहिल्याच अध्यक्ष होत असें म्हणण्यास हरकत नाही. हा हक्क नवीन नव्हता, पण कॉंग्रेसच्या पूर्वीच्या इतिहासात त्याची कोणीही अंमलबजावणी केलेली नव्हती. कलकत्ता कॉंग्रेसला ४९६७ प्रतिनिधी व सुमारे ५००० प्रेक्षक हजर होते.

कलकत्ता कॉंग्रेसमध्यें मजूर झालेले ठराव नेहमींप्रमाणें कायम ठशाचे होते. पितामह दादाभाई नौरोजी व मि. ए. रसेल याच्या मृत्यूसबधाचे दुखावटयाचे ठराव, राजनिष्ठा, मि. मॉंटेग्यू यांचें स्वागत, मि. महमदअली व शौकतअली यांची मुक्तता, लष्करी शिक्षणाची व्यवस्था, लष्करी कमिशनमध्यें नऊ हिंदी लोकाना जागा दिल्याबद्दल समाधान, या जागावर आणखी अधिक हिंदी लोक नेमण्यात येतील व त्यांच्या पगारांतही वाढ करण्यांत येईल याबद्दल आशा, वगैरे ठराव पास करण्यात आल्यानतर १९१० च्या प्रेस ॲक्टचा निषेध, हत्याराचा कायदा, वसाहतींनील हिंदी लोकांची दु:स्थिति, करारबंद मजूरपद्धति

पूर्णपणें बंद करणें, भाषण, लेखन, सभा यांच्या स्वातंत्र्यावर गदा आणणारे कायदे, व डिफेन्स ऑफ इंडिया ॲक्टचा निषेध वगैरे पूर्वीच्या कॉंग्रेसमध्यें पास झालेल्या ठरावांना पुष्टि देण्यांत आली. रौलेट कमिटीची नेमणूक सरकारनें १० डिसेंबर रोजी जाहीर केली. हिंदुस्थानच्या दुःखपरिहारार्थ ही कमिटी नेमण्यात आलेली नसून नवीन कायदे करून सरकारी अधिकाऱ्यांच्या हातांत बंगालच्या क्रांती-कारक कटाच्या खटल्याकरता जादा अधिकार देण्याच्या उद्देशानेंच ही कमिटी नेमण्यांत आली आहे, हें आपलें मत व्यक्त करून कॉंग्रेसने सरकारच्या या कृत्याचा निषेध केला व याच ठरावांत राजबंद्यांना मुक्त करण्यात यावे अशी विनंति केली. आपल्या धार्मिक व्रतांचे पालन करण्याकरिता वेलोर जेलमध्ये लाला अर्जुनलाल शेठी यांनीं अन्नत्याग केला असून त्यांचे प्राण वाचविण्याबद्दल एका ठरावानें सरकारला विनंति करण्यांत आली होती. हिंदी लोकांच्या नियंत्रणा-खालीं प्रत्येक प्रांतांत बॉयस्काउटचीं पथकें स्थापण्यासंबंधानेंही एक ठराव या कॉंग्रेसने मंजूर केला. या कॉंग्रेसमध्यें पास झालेला स्वराज्याचा मुख्य ठराव पुढीलप्रमाणें होता·--" हिंदुस्थानात जबाबदारीचे स्वराज्य प्रस्थापित करण्या-बद्दल जी घोषणा साम्राज्यसरकारमार्फत स्टेट सेक्रेटरींनी केली त्याबद्दल कॉंग्रेस कृतज्ञतापूर्वक समाधान व्यक्त करीत आहे. हा उद्देश साध्य करण्याकरिता तावडतोब एक कायदा पार्लमेंटमध्यें मंजूर करण्याची आवश्यकता आहे, असें या कॉंग्रेसचें आग्रहाचें सांगणें आहे, आणि त्याबरोबर हें स्वराज्य पूर्णांशानें स्थापित होण्याची कालमर्यादाही निश्चित करावी अशीही या कॉंग्रेसची आग्रहाची विनंति आहे. या स्वराज्याचा पहिला हप्ता म्हणून कॉंग्रेस-लीगच्या स्वराज्याच्या योजनेला कायद्याचें स्वरूप द्यावें असे या कॉंग्रेसचें ठाम मत आहे."

आंध्र प्रांताला स्वतंत्र कॉंग्रेसप्रांत म्हणून गणण्यात यावें असाही एक नवीन ठराव या कॉंग्रेसमध्ये पास करण्यात आला. भाषावर प्रांतरचना करण्यांत यावी अशी चळवळ आंध्रप्रांताने १९१२ पासून चालविली होती त्याचाच हा परिणाम होता. १८९४ सालीं बिहारचे महेश नारायण यांनीं या चळवळीला सुरुवात केली. बंगालपासून बिहार वेगळा करावा, असे त्याचें म्हणणें होतें. १९०८ सालीं कॉंग्रेसनें बिहारला बंगालपासून वेगळें केलें. २५ आगष्ट १९११ रोजीं प्रसिद्ध झालेल्या सरकारी खलित्यांतील प्रांतिक स्वायत्ततेच्या योजनेबाबत हेंच तत्व मान्य करण्यात आले. या खलित्याला अनुसरून सरकारनें बिहारला बंगाल-

पासून विभक्त करून त्याचें स्वतंत्र आस्तित्व मान्य केलें. प्रांतिक स्वायत्तता यशस्वी व्हावयाची असेल तर शिक्षणाचें माध्यम प्रांतिक भाषा असली पाहिजे, त्याचप्रमाणें प्रांताचा राज्यकारभार त्याच भाषेच्या द्वारा चालविण्यांत यावा ही गोष्ट सर्वमान्य झाली आहे, हिंदुस्थानांतील ब्रिटिश राज्यकारभार अयशस्वी होण्यास ब्रिटिश प्रांतांची विभागणी तर्कशुद्ध व वर्णशास्त्रदृष्ट्या झालेली नसून केवळ कालदृष्ट्या झालेली आहे. ब्रिटिश प्रांतांमध्यें अनेक भाषा बोलणाऱ्या व अनेक संस्कृतीच्या लोकांची सरमिसळ झाल्या मुळें स्थानिक स्वराज्याच्या कारभारांत तर फारच गोंधळ उडालेला आहे. १९१५ सालीं या प्रश्नाचा विचार करण्यासही कॉंग्रेस तयार नव्हती. परंतु आंध्र प्रांतिक परिषदेनें १९१६ सालीं हा प्रश्न पुढें आणला, आणि १९१७ मध्यें भरलेल्या ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटीच्या सभेंत मद्रास व मुंबई प्रांतिक कॉंग्रेस कमिट्यांचे विचार घेऊन भाषावार प्रांतरचना करण्याचें तत्व मान्य करण्यात आलें आणि मद्रास इलाख्यांतील तेलगू बोलणाऱ्या जिल्ह्यांचा एक स्वतंत्र प्रांत बनविण्यात यावा असा ठराव पास झाला. यानंतर सिंधचा प्रश्न व नंतर कर्नाटकचा प्रश्न पुढें आला. कलकत्ता कॉंग्रेसच्या विषयनियामक कमिटीच्या बैठकींत या प्रश्नावर कडाक्याचा वादविवाद झाला सुधारणा–कायदा अंमलात येईपर्यंत या प्रश्नाचा विचार तहकूब ठेवावा असें गांधींचें देखील मत होतें. परंतु प्रांतिक स्वायत्ततेच्या दृष्टीनें भाषावार प्रांतरचना करणे आवश्यक आहे ही गोष्ट लोकमान्यांना पूर्णपणें पटली होती. कॉंग्रेसच्या अध्यक्ष मिसेस बेझंट व त्यांचे काहीं दाक्षिणेंतून आलेले तामिळी मित्र यांनीं या सूचनेला जोराचा विरोध केला. ह्या प्रश्नावर २ तास चर्चा होऊन रात्रीं १०। वाजतां हा ठराव मान्य करण्यात आला. ता. ६ ऑक्टोबर १९१७ रोजीं भरलेल्या ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटीच्या सभेंत सिंध प्रांतांचेंही अस्तित्व मान्य करण्यांत आलें. भाषावार प्रांतरचनेचें हें तत्त्व याप्रमाणें एकदा मान्य झाल्यानंतर त्याच्याच अनुरोधानें नागपूर कॉंग्रेसनंतर लगेच कॉंग्रेसच्या प्रांताची पुनर्रचना करण्यात आली. यामुळें पूर्वी कॉंग्रेसचे ९ ब्रिटिश प्रांत होते ते आतां २१ प्रांत झाले आहेत.

मि. सी. पी. रामस्वामी अय्यर यांना कॉंग्रेसचे सेक्रेटरी नेमण्यांत यावें ह्याबद्दल मिसेस बेझंट यांचा विशेष आग्रह दिसला. मि. मुजफ्फरल पतलू यांचें

सेक्रेटरीच्या जागी पुन्हां निवडणूक झाली होती; परंतु मि. सी. पी. रामस्वामी अय्यर यांच्याकरितां त्यांनीं आपल्या जागेचा राजिनामा दिला. मिसेस बेझंट ह्या कॉंग्रेस अध्यक्ष झाल्यामुळें कॉंग्रेस व होमरूल लीग ह्या संस्थांचा अधिक संबंध आला आणि कलकत्ता येथें ह्या लीगची घटना इतकी कडक करण्यांत आली कीं, लीगचा जवळजवळ निःपात झाला. राष्ट्रीय ध्वजाचा प्रश्न ह्या काँग्रेसमध्यें औपचारिक रीत्या मांडण्यात आला. होमरूल लीगनें ह्यापूर्वीच तिरंगी झेंडा लोकप्रिय केला होता. ह्या राष्ट्रीय निशाणावर कोणत्याही प्रकारचें चिन्ह नसावें ह्याचा विचार करण्याकरितां एक कमिटी नेमण्यांत आली. ह्या कमिटीची बैठक कधींच भरली नाहीं, आणि जुन्या होमरूल लीगचें निशाण त्याच्यावर चरख्याचें चिन्ह समाविष्ट करून नंतर कॉंग्रेसचें निशाण झालें. ह्या नंतर १९३१ मध्यें नेमलेल्या निशाण कमिटीनें निशाणांतील लाल रंगाच्या ठिकाणीं केशरी रंगाचा समावेश केला.

---

## प्रकरण चवथें

# बेझंटचें चिकाटीचें कार्य

मिसेस बेझंट यांनीं कलकत्ता कॉंग्रेसनंतर लगेच ३० डिसेंबर १९१७ रोजीं ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटीची पहिली सभा बोलावली. कॉंग्रेसकरितां कायमनिधि उभारावा या प्रश्नाचा विचार ह्या सभेंत करण्यात आला. आणि प्रांतातील कॉंग्रेस कमिटयांनी हिंदुस्थान व इंग्लंडमध्यें कॉंग्रेसचें शैक्षणिक व जागृतिविषयक कार्य करण्याकरितां कार्यकारी मंडळें निवडावी असाही एक ठराव या सभेंत पास झाला. यानंतरच्या महिन्यांत देशामध्यें सर्वत्र जोराची चळवळ झाली. विशेषत मद्रास प्रांतांत तर कॉंग्रेस–लीग योजनेचीं लाखों हस्तपत्रकें वाटण्यांत आलीं. व या योजनेच्या अर्जावर ९ लाख लोकांच्या सह्या घेऊन मि. मॉंटेग्यू मद्रास येथें आले असतां तो अर्ज त्याना पुन्हां सादर करण्यांत आला. २३ फेब्रुवारी १९१८ रोजीं ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटीची पुन्हां एक बैठक झाली. या सभेंत प्रथम सर वुईल्यम वेडरबर्न याच्या मृत्यूबद्दल दु:ख प्रदर्शित करण्यात आल्यावर लो टिळक व बाबू विपिनचद्र पाल याना पंजाब व दिल्ली प्रांतांत जाण्याची मनाई रद्द करण्यांत यावी अशी व्हॉईसरॉयांना विनंति करण्यासाठी एक डेप्युटेशन नेमण्यांत आलें. ह्या डेप्युटेशननें व्हॉईसरॉयाची मुलाखत घेतली, पण त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. मॉंटेग्यू-चेम्सफर्ड रिपोर्ट प्रसिद्ध झाल्यानंतर लौकरच अलाहाबाद किंवा लखनौ येथें एक जादा अधिवेशन भरविण्यांत यावें व हें अधिवेशन झाल्यावर इंग्लंडला एक डेप्युटेशन पाठवावें असें ठरविण्यात आलें. ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटीच्या ३ ऱ्या सभेंत ( २ मे १९१८ ) दोन्हीही होमरूल लीगचीं डेप्युटेशनें इंग्लंडकडे जात असता जिब्रॉल्टर व सिलोन येथून त्यांना परत लावण्यांत आलें याबद्दल सरकारचा निषेध करण्यात आला. हिंदुस्थानाला जबाबदारीचें स्वराज्य देण्यात येईल असें स्पष्ट आश्वासन देण्यांत आल्यासच देशांतील तरुण महायुद्धाच्या कामीं मदत करण्याकरितां ब्रिटिश निशाणाखालीं एकत्र जमतील असें मत व्यक्त करण्यांत आलें.

१९१८ च्या पहिल्या पांच महिन्यात मिसेस बेझंट यांनी अविश्रांत चळवळ केली. त्यांनीं स्त्रियांना मतदानाचा हक्क द्यावा ही गोष्ट कॉंग्रेस–लीगच्या योजनेंत

समाविष्ट करून घ्यावी असा अर्ज मिसेस कझिन्स व मिसेस जिनराजदास यांनी मिसेस बेझंट याच्याकडे पाठविला. १९१८ च्या अधिवेशनाच्या वेळीं लेबर कॉन्फरन्सनें आपले प्रतिनिधि हिंदुस्थानाला पाठवावे अशी विनंति त्यांना करण्यात यावी असें मि. जॉनस्कर यांनीं मिसेस बेझंट यांच्याकडे लिहून कळविलें; व ती सूचना ऑल इंडिया काँ. कमिटीने मान्य केली. इंग्लंड आणि हिंदुस्थान ह्यांचे संबध अधिक सलोख्याचे घडून यावेत असें मिसेस बेझंट याना फार फार वाटत होतें. मिसेस बेझंट यांची दृष्टि होमरूल लीगच्या कल्पनेपुढें जाऊ शकली नाहीं. त्या वेळच्या वसाहती १९२६ सालच्या वसाहतीहून किती तरी मागसलेल्या होत्या. आणि वेस्ट मिनिस्टर ॲक्ट आपल्या पाठीशी घेऊन उभ्या असलेल्या आजच्या वसाहतींशीं तर त्यांची खात्रीनें तुलना करता येत नाही. ह्यामुळे कोणत्याही दृष्टीनें सरकार व जनता ह्यांच्याशीं आपलें जमावयाचे नाहीं असें लवकरच त्यांना वाटू लागलें. त्याच्या प्रगतिपर धोरणाबद्दल सरकार नाराज होते व लोकांना त्यांची मागासलेली वृत्ति आवडत नव्हती. मुबई येथील जादा अधिवेशनाच्या वेळीं त्यांचें पुष्कळ वजन होतें. त्यांचेमागे पुष्कळ अनुयायीही कॉंग्रेसला होते. (सप्टें. १९१८). परतु दिल्ली कॉंग्रेसमध्यें (डिसेंबर १९१८) त्या मागें पडल्या. याप्रमाणे सरकार व लोक याच्या कचाट्यात सापडल्यामुळे त्यांची झपाट्यानें पिच्छेहाट होऊं लागली.

या वेळीं डिफेन्स ऑफ इंडिया ॲक्टची अंमलबजावणी जोरात चालू होती. लो. टिळक व बिपिनचंद्र पाल यांना पंजाबांत व दिल्लींत जाण्याची बंदी करण्यांत आली होती. पण ह्या दडपशाहीमुळें लोक भिऊन गेलेले नव्हते. मुंबईच्या गव्हर्नरानीं युद्धाला मदत करण्याबद्दल विचार करण्यासाठीं बोलाविलेल्या सभेला लोकांच्या पुढाऱ्यांना आमंत्रण दिलें त्या वेळी लो. टिळकानीं स्वराज्याचा प्रश्न सभेपुढें मांडला. पण त्याना २ मिनिटांपेक्षा जास्त वेळ बोलू दिले नाहीं.

व्हॉईसरॉयांनीं ज्या वेळी दिल्ली येथें अशा प्रकारची परिषद बोलाविली त्यावेळीं महात्मा गांधी तेथें उपस्थित होते. प्रथम त्यांनी टिळक आणि मिसेस बेझंट यांना ह्या परिषदेकरितां आमंत्रण देण्यांत आलें नाहीं म्हणूनच केवळ हें आमंत्रण नाकारलें असें नाहीं; पण कॉन्स्टँटिनोपल रशियाला द्यावा वगैरे ब्रिटननें रशियाशीं जे गुप्त तह केले त्याकरितांही त्यांनीं हें आमंत्रण नाकारलें होतें. लॉर्ड चेम्सफर्ड यांनीं गांधींची मुलाखत घेतली त्यावेळीं ब्रि. प्रधानमंडळ असला एखादा गुप्त

जाहिर करणें या गोष्टीवर आपला विश्वास बसत नाहीं, ही बातमी ( रशियाच्या ) कांहीं स्वार्थी लोकांनीं उठविलेली आहे आणि असले प्रश्न युद्ध चालूं असतांना उपस्थित करणें किंवा त्यावर चर्चा करणें शक्य नाहीं, असें व्हॉईसरॉयांनीं महात्मा गांधींना सांगितलें. ह्या मुलाखतीनंतर युद्धपरिषदेस हजर राहण्याची गांधींनीं संमति दर्शविली. लो. टिळकांना आमंत्रण नव्हतें तरी त्यांनीं दिल्लीला यावें अशी गांधीजींनीं लो. टिळकांना तार केली. दिल्ली प्रांतांत येण्यास आपणाला बंदी करण्यांत आल्यामुळें हा हुकूम जोंपर्यंत रद्द करण्यांत आला नाहीं तोंपर्यंत आपण दिल्लीला येणार नाहीं असें त्यांनीं उलट कळविलें. सरकारच्या अति गर्विष्ठ-पणामुळें ही गोष्ट घडली नाहीं.

१९१८ च्या ऑगस्टमध्यें डिस्ट्रिक्ट मॅजेस्ट्रेटची आगाऊ परवानगी घेतल्या-शिवाय कोठेंही व्याख्यान देता कामा नये अशी नोटीस लो. टिळकांवर बजाव-ण्यांत आली होती. फक्त एका आठवड्यापूर्वीच लष्करभरतीच्या चळवळींत लो. टिळक गुंतले होते. त्यांनीं महात्मा गांधींकडे ५० हजार रुपयांचा चेकही पाठविला होता व आपण कबूल केलेल्या अटी पाळल्या नाहींत तर ही रक्कम जप्त करण्यांत यावी असें महात्मा गांधींना त्यांनीं कळविलें होतें. ही एक प्रकार-ची पैजच होती. लष्करांतील कमिशनमध्यें हिंदी लोकांना जागा मिळतील, असें वचन सरकारकडून महात्मा गांधी मिळवतील तर महाराष्ट्रांत ५ हजार लोकांची आपण लष्करभरती करूं, असें लो. टिळकांनीं महात्मा गांधींना कळविलें होतें. जी मदत करावयाची ती देवघेवीच्या अटीवर नसावी अशी गांधींजींची वृत्ति असल्यामुळें त्यांनीं तो चेक लो. टिळकांकडे परत पाठविला. १९१७-१८ मध्यें लो. टिळकांबद्दल कॉंग्रेस साशंक होती. सरकारी अधिकारी त्यांच्यावर खटला भरण्याकरितां टपून राहिले होते. मिसेस बेझंटच काय त्या टिळकांच्या बाजूला होत्या.

१९१८ च्या जूनमध्यें मॉंटेग्यू-चेल्मसफर्ड रिपोर्ट प्रसिद्ध झाला. वाङ्मयाच्या दृष्टीनें हा रिपोर्ट उत्कृष्टच होता व राजकीय हक्कपत्र ह्या दृष्टीनेंही हिंदुस्थानच्या स्वराज्याच्या प्रश्नाचा विचार ह्या रिपोर्टांत निर्विकार बुद्धीनें केला होता. व शेवटीं सुधारणांना अडचणी काय आहेत हेंही सांगितलें होतें. ह्या बाबतींत विचार करण्या-सारखी आणखी एक महत्त्वाची गोष्ट होती. कॉंग्रेस व मॉस्लेम लीग ह्या देशांतील दोन मोठ्या प्रातिनिधिक राजकीय संस्थांनीं जी योजना तयार केली होती, त्यांत

विशिष्ट संख्यांचें कार्यकारी मंडळ कायदेमंडळाला जबाबदार असावें असे म्हटलें होतें. या रिपोर्टमध्यें ह्यापेक्षांही अधिक मोहक गोष्टींचा उल्लेख करण्यांत आला होता. प्रधानमंडळ जरूर तेव्हां बदलतां येईल, हें मंडळ राज्यकारभाराची संयुक्त जबाबदारी अंगावर घेईल व कायदेमंडळाला तें जबाबदार असेल; अशा रीतीनें ब्रिटिश राज्यघटनेच्या तत्त्वावर ही स्वराज्याची योजना तयार करण्यांत आली होती. हिंदुस्थानच्या लोकांना ह्यापेक्षां जास्त काय पाहिजे होतें? ही योजना पाहून हिंदुस्थानातील कांहीं लोक तर हुरळून गेले होते व ती तयार करणाऱ्या लोकांवर स्तुतीच्या वर्षाव करीत होते. कॉंग्रेस-लीग स्कीम मागें पडून मॉटफर्ड स्कीमकडेच आता लोकांचें लक्ष लागलें होतें. "सर शंकर नायर यांनी मान्यता दिल्यावर आपण कोणत्याही योजनेचा स्वीकार करूं," असें वचन मिसेस बेझंट यांनीं दिलें होतें असें मि. मॉटेग्यू याच्या डायरींत लिहिलेलें आढळतें. सर शंकर नायर यांनीं तर या योजनेचाच स्वीकार केला होता. "सरकारला पाण्यांत पाहणाऱ्या जहालांना इतरापासून वेगळे काढण्यांत आलें पाहिजे" असें या डायरींत म्हटलें आहे. मि. सी. पी. रामस्वामी अय्यर यांच्यासंबंधानें मि. मॉटेग्यू लिहितात, "ते कशाचा स्वीकार करतील हें मी त्यांना तोंडावर उघड विचारलें. शास्त्री यांच्या चार कसोट्या त्यांना मान्य आहेत, कांहीं ठराविक कालानंतर चौकशी करण्याच्या कल्पनेला ते कधींही मान्यता देणार नाहींत. त्यांना कालमर्यादा पाहिजे आहे." "लॉर्ड पेंटलंड यांची मुलाखत संपल्यानंतर मि. एस्. श्रीनिवास अय्यंगार मला भेटण्याकरितां आले. कॉंग्रेस-लीग स्कीम सर्वच्या सर्व मान्य होईल अशी कोणाचीही अपेक्षा नव्हती अशी त्यांनीं माझी खात्री करून दिली. स्वराज्याच्या हक्कांत वाढ होत जाईल, अशी खात्री पटल्यावर मग कांहीं हरकत नाहीं, असेंही ते म्हणाले. कर्टिसची योजना सर्वांत उत्तम आहे, असें त्याचें मत आहे. सरकारविरुद्ध बराच असंतोष पसरला आहे पण त्या बाबतींत आपल्याला कांहीं जास्त बोलावयाचे नाहीं असें ते म्हणतात." मि. एस्. श्रीनिवास अय्यंगार हे त्या वेळीं कॉंग्रेसवाले नव्हते हें सांगितलें पाहिजे. या सर्व कबूली जबाबानंतर मि. सेटलवाड, चंदावरकर व रहिमतुल्ला यांनाही ही योजना पसंत पडलेली होती हें निराळें सांगावयास नकोच. मि. मॉंटेग्यू याच्या डावपेंचासंबंधानें 'मागेंच सांगितलें आहे. नेमस्तांना संघटित होतां येईल असें एखादें खातें सरकारला

निर्माण करावयाचें होतें. " आमच्या योजनांचा प्रचार करण्याकरिता सरकारच्या मदतीनें एक नवीन संस्था निर्माण करावी, व इंग्लंडांत आम्हाला मदत करण्याकरितां तिच्यामार्फत एक शिष्टमंडळ पाठवावें, अशी एक सूचना (२७ वी सूचना) पुढें आली होती," असें मि. मॉंटेग्यू म्हणतात. मि. मॉंटेग्यू याच्यामागून सर एस्. पी. सिंह यांची स्टेट सेक्रेटरीच्या जागी नेमणूक करावी व मि. मॉंटेग्यू यांनी अंडर सेक्रेटरी व्हावें अशाही सूचना ( ३० व ३१ ) करण्यांत आल्या होत्या. या बाबतींतील मि. मॉंटेग्यू याचे विचार लक्षांत ठेवण्यासारखे आहेत. "एखादा ब्रिटिश मुत्सद्दी, मग तो कितीही नालायक असो, प्रधानमंडळापर्यंत चढला असला तरी हिंदुस्थानावर सत्ता गाजविण्यापेक्षा त्याच्या राज्यकारभारात मदत करण्यांत कांहीं कमीपणा आहे असें तो मानीत नाहीं हा धडा आय. सी. एस्. मधील अधिकाऱ्यांना वरील गोष्ट घडून आल्यास शिकता येईल व हिंदी लोकाच्या मनांत एका नवीनच कल्पनेचा संचार होईल," असें मि. मॉंटेग्यू यांनीं म्हटलें आहे. उलटपक्षीं राष्ट्रीय पक्षाच्या लोकांना काय पाहिजे हें मि. मॉंटेग्यूंना पूर्णपणें कळून चुकलें होतें. " २० वर्षांत जबाबदारीचें स्वराज्य मिळाल्यास पं मोतीलाल नेहरूंना समाधान वाटेल.. ..." " द्विदल राज्यपद्धति अयशस्वी होणार याचा अंदाज मि. सी. आर. दास यानीं बांधला होता आणि ५ वर्षांत खरेंखुरें जबाबदारीचें स्वराज्य त्याना पाहिजे व तसें वचनही आता देण्यात यावें असें त्यांचें म्हणणें होतें." मि. मॉंटेग्यू यानीं सुरेंद्रनाथ बानर्जी यांचा पाठिंबा मिळविला होता. " कॉंग्रेस या सुधारणांना मान्यता देईल व आम्ही हुज्जतखोर आहों, असें आपल्या शत्रूंना म्हणता येऊ नये म्हणून आपल्या सर्व उपसूचना पुढील वाटाघाटीकरिता तहकूब ठेवील," असें बसू ( भूपेंद्रनाथ बसू ) म्हणाले होते."

सुधारणाची योजना सर जेम्स मेस्टन व सर विल्यम मॅरिस यांनीं तयार केली होती, व मि. लायोनेल कर्टिस यांनीं त्यांना बरीच मदत केली होती असा सर्वसामान्य समज होता. मि. कर्टिस हे राऊंडटेबलरांच्या गटापैकी एक होते. ही विद्वान मंडळी " साम्राज्याची सेवा " करण्याच्या उद्देशानें निरनिराळ्या राष्ट्रांतून प्रवास करून तेथील परिस्थितीचें सूक्ष्म निरीक्षण करीत होती. हिंदी सुधारणासंबंधानें मि. कर्टिस यांनीं लिहिलेलें एक पत्र चुकून हिंदी पत्रकाराच्या हातीं सापडलें व 'बॉंबे क्रॉनिकल' व 'लीडर' या पत्रांत तें प्रसिद्ध करण्यात आलें. या धाष्ट्या-

मुळें नोकरशाहीची कारस्थानें बाहेर पडली व राष्ट्रीय पक्षाच्या मंडळीवरील अधिकाऱ्यांचा सताप अधिकच वाढला.

मि. कर्टिस यानी हे पत्र ' राउंड टेवल'चे सेक्रेटरी मि. फिलिप यांच्याकडे पाठविलें होतें. " हिंदुस्थानचा अंतर्गत व परराष्ट्रीय कारभार इंपीरियल कौंसिलच्या देखरेखीखाली चालेल. या कौंसिलमध्ये फक्त वसाहतींचे प्रतिनिधी घेण्यात येतील. हिंदुस्थानचा प्रतिनिधि त्यांत घेण्यात येणार नाहीं, ही गोष्ट घडून आल्यास रक्तपाताचाही प्रसग येईल, पण साम्राज्याच्या हिताच्या दृष्टीनें एक रास्त गोष्टच आपण करीत आहो असे असल्यास या परिस्थितीलाही तोंड द्यावें लागेल, असे या पत्रात म्हटले होते. आपण प्रदर्शित केलेले हे विचार मेस्टन, मॉरीस व चिरोल यानाही पसंत आहेत असाही मि. कर्टिस यानीं या पत्रांत उल्लेख केला होता. राउंड टेवलच्या सभासदांत या पत्राच्या प्रति वाटण्याकरितां अलाहाबाद येथील खुद्द सरकारी छापखान्यातच हें पत्र छापले होते, आणि हें पत्र हिंदी लोकांच्या हातात सापडल्यावरोवर तें तत्परतेने लखनौ-कॉंग्रेसचे ऐन दिवशीं प्रसिद्ध करण्यात आलें. यानंतर हिंदी लोकांना उद्देशून त्यांनी एक पत्र प्रसिद्ध केले, व आपली बाजू त्याना समजावून देण्याचा प्रयत्न केला. मि. कर्टिस हे द. आफ्रिकेत एका अधिकाऱ्याच्या जागेवर होते. बोअर युद्धानंतर सर जेम्स मेस्टन व सर विल्यम मॉरिस हे द. आफ्रिकेंत गेले असतां मि. कर्टिस यांचा या मंडळीशी प्रथम परिचय झाला. ब्रिटिश साम्राज्यातील द. आफ्रिका, कानडा, हिंदुस्थान वगैरे देशातील अनेक प्रश्नांचा अभ्यास करून आपले विचार ही मंडळी आपण स्वत च चालविलेल्या राउंड टेवल नावाच्या त्रैमासिकात प्रसिद्ध करीत असत. वरील पत्र " राउड टेवल " करिता मि. कर्टिस यानीं लिहिलें होतें, पण दुर्दैवाने तें दुसऱ्याच्या हातीं लागलें. महायुद्धानंतर साम्राज्याची पुनर्घटना करतांना हिंदुस्थानावर केवळ इंग्लंडचे नव्हे तर वसाहतींचेंही नियंत्रण प्रस्थापित करावयाचे, या उद्देशाने हिंदुस्थानच्या अधिकाऱ्यानीं रचलेल्या कटात मि. कर्टिस सामील होते असाही आरोप त्याच्यावर करण्यांत आला होता. खरे बोलावयाचे म्हणजे आपल्यावरोवर आणलेल्या सहा मित्राखेरीज सर मालकम हेले, सर जेम्स मेस्टन, मि. मॉरिस, वगैरे हिंदुस्तानांतील आय. सी. एस मधील अधिकारीही मि. मॉंटेग्यू यांनीं आपल्याभोंवतीं गोळा केले होते. यामुळें हा रिपोर्ट प्रसिद्ध झाल्यावरोवर त्यासंबंधानें निरनिराळे

मतें प्रसिद्ध होऊं लागलीं यांत कांहींच आश्चर्य नव्हतें. अशा परिस्थितींत कॉंग्रेसचें जादा अधिवेशन भरविण्याची जरुरी अधिकाधिक भासूं लागली. या जादा अधिवेशनाच्या दृष्टीनें अलाहाबाद व लखनौ या जागा सोइस्कर नसल्यानें मुंबई येथें ही बैठक भरविण्याचें ठरलें व त्याप्रमाणें जोराची तयारी करण्यांत आली. कांग्रेसवाल्यांमधील मतभेदांना या वेळीं तीव्र स्वरूप प्राप्त झालें होतें. सुधारणांच्या योजनेवर कोणताही पक्ष सतुष्ट नव्हता. तरी या टीकांमधील शब्द-योजनेंत मात्र स्वाभाविकच फरक असलेला दिसून आला. सुधारणांचा अजीबात त्याग करावा असेंच यापैकीं एका पक्षाचें मत होतें. जादा अधिवेशनांत अर्थातच हा पक्ष सुधारणांचा त्याग करावा असा ठराव आणील व त्यावर इतर पक्ष उप-सूचना आणतील, हें उघड होते. या सर्व पक्षांत समेट घडवून आणण्याचा प्रयत्न करण्यांत आला पण तो फुकट गेला.

१९ आगष्ट १९१८ रोजीं कॉंग्रेसच्या जादा अधिवेशनास मुंबई येथें सुरु-वात झाली. मि. हसन इमाम हे या अधिवेशनाचे अध्यक्ष होते. ३८४५ प्रति-निधी या अधिवेशनास उपस्थित होते व प्रेक्षकाचीही खूप गर्दी लोटली होती. श्री. विठ्ठलभाई यांनीं कांग्रेसच्या प्रतिनिधींचें स्वागत केलें. चार दिवस सारखी चर्चा होऊन कॉंग्रेस-लीग योजनेंतील तत्वाना मान्यता देण्यांत आली. स्वराज्या-पेक्षां कोणत्याही दृष्टीनें कमी असलेल्या योजनेंमुळें हिंदुस्थानच्या लोकांचें समाधान होणार नाहीं असें या अधिवेशनांत जाहीर करण्यांत आलें. मॉंटेग्यूंच्याही योजनेवर कसून चर्चा करण्यांत आली. स्वराज्याचे हक्क उपभोगण्यास हिंदुस्थान लायक असल्याचें जाहीर करून हिंदुस्थानच्या या लायकीविरुद्ध या योजनेंत जे आक्षेप घेण्यांत आले होते त्यांचा निषेध करण्यांत आला. प्रांतिक व वरिष्ठ या दोन्ही राज्यकारभारांत एकदम प्रगति करण्यांत यावी. .वरिष्ठ सरकारच्या हातांतील सत्ता बहुतेक सर्व महत्वाच्या बाबतींत कायम ठेवून प्रांतिक राज्य-कारभारांत प्रगतिपर सुधारणा करावयाच्या व प्रांतांत जो अनुभव येईल त्यावर वरिष्ठ राज्यकारभारांतील सुधारणा अवलंबून ठेवावयाच्या या धोरणाबद्दल नापसंति व्यक्त करण्यात आली. जीवित मालमत्ता [illegible], भाषण, लेखन, मुद्रण स्वातंत्र्य, हत्यारें वा[illegible] [illegible] दृष्टीनें सर्व लोकांना समानतेनें वागवि[illegible] होईल, [illegible] खबरदारी घेऊन देशांत शांत[illegible]

पासून त्याचें रक्षण करण्याकरितां लागणारे निष्प्रतिबंध जादा अधिकार हिंदुस्थान सरकारनें आपल्या हातीं घ्यावे या तत्वालाही या कॉंग्रेसमध्यें संमति देण्यात आली. स्वायत्त वसाहतींना जकातीचे जे हक्क देण्यांत आले आहेत तेच हक्क हिंदुस्थानालाही देण्यात यावेत असें मत एका ठरावानें व्यक्त करण्यात आलें. सुधारणांच्या योजनेबाबतचा ठरावही या कॉंग्रेसमध्यें मंजूर करण्यांत आला. जबाबदार राज्यकारभाराची पद्धति देशांत सुरू करण्याच्या बाबतींत व्हाइसरॉय व स्टेट सेक्रेटरी यांनीं जे परिश्रम घेतले त्याबद्दल त्याचें या ठरावात प्रथम अभिनंदन करण्यांत आलें व या योजनेतील कांहीं सूचना प्रागतिक स्वरूपाच्या असल्या तरी ही योजना निराशाजनक व असमाधानकारक आहे, असें आपलें मत या ठरावांत व्यक्त करण्यात आलें. राखीव व सोपीव खात्याची जी पद्धति प्रांतिक कारभारात अमलांत आणण्याचे ठरविण्यात आले आहे तेंच तत्व वरिष्ठ सरकारच्या राज्यकारभारातही मान्य करण्यात यावे. सुधारणाच्या योजनेप्रमाणें असेंब्लीची बैठक भरल्यानंतर राखीव खात्यांच्या बाबतींत व्हाइसरॉयाना देण्यांत येणारे अधिकार वसाहतींत या बाबतींत प्रचलित असलेल्या अधिकारा-नुरुपच असावे. सर्व कायदे बिलांच्या स्वरूपात असेंब्लीपुढे मांडण्यांत यावेत. राखीव खात्याच्या बाबतींत असेब्लीनें एकादा कायदा करण्याचें नाकारल्यास गव्हर्नर जनरलनें आपल्या अधिकारात तशा प्रकारचा नियम मंजूर करावा. पण या नियमाची मुदत एक वर्षापुरतीच असावी. असेब्लीतील निदान शे. ४० मतें अनुकूल असल्याशिवाय या नियमाची मुदत वाढविण्यात येऊं नये. कौन्सिल ऑफ स्टेट स्थापन करण्यांत येऊं नये. पण ते स्थापण्यात आल्यास त्यांतलें अर्धे सभासद लोकनियुक्त असावे. सर्टिफिकेशनचा हक्क फक्त राखीव खात्यापुरताच असावा. राखीव खात्याच्या दिवाणापैकीं निम्मे दिवाण हिंदी असावे. लेजिस्ले-टिव्ह असेंब्लींत १५० सभासद असावे. यापैकीं चार पंचमांश लोकनियुक्त असावे. अध्यक्ष व उपाध्यक्ष निवडण्याचा व त्याचप्रमाणें असेब्लीच्या कामा-संबधाचे नियम करण्याचा अधिकार असेंब्लीला असावा. यापुढें ठराविक मुदतींत–ही मुदत १५ वर्षापेक्षां जास्त असूं नये–ब्रि. हिंदुस्थानाला पूर्ण जबाब-दारीच्या स्वराज्याचे हक्क देण्यांत येतील अशी कायदेशीर हमी देण्यात यावी.

प्रांतिक कारभाराच्या बाबतींत कॉंग्रेसने पुढील ठराव मंजूर केले. (अ) एक्झी-क्यूटिव्ह कौंसिलांत खातें (पोर्ट फोलियो) नसलेले सभासद असू नयेत. (ब)

सुधारलेल्या कौन्सिलांतील पहिल्या निवडणुकीमध्यें गव्हर्नर व दिवाण यांच्या मधील संबंध स्वायत्त वसाहतींत असलेल्या संबंधाप्रमाणेंच असावे. (क) दिवाणाचा पगार व दर्जा एक्झिक्युटिव्ह कौन्सिलरांच्या इतकाच असावा. (ड) एक्झिक्युटिव्ह कमिटींतील अर्धे सभासद हिंदी असावे. (ई) राखीव खात्याकरितां लागणारी निश्चित रक्कम बाजूस काढल्यानंतर बाकीच्या अंदाजपत्रकावर कायदेमंडळाचें नियंत्रण असावें. पूर्ण प्रांतिक स्वायत्त स्वराज्य स्थापण्याच्या दृष्टीनें देश तयार असला तरी प्रगतिपर तत्त्वावर सुधारणांचे हक्क देण्यास सोयीस्कर व्हावें या दृष्टीनें कायदा, पोलिस व न्याय (तुरुंगखेरीज करून) ही खातीं प्रांताच्या कार्यकारी मंडळाच्या हातीं ६ वर्षांच्या मुदतीनें द्यावी. न्याय व अमलबजावणी यांची ताबडतोब फारकत करावी. वरिष्ठ कायदे कौन्सिलाप्रमाणें प्रांतिक कायदे कौन्सिलांतील अध्यक्ष व उपाध्यक्ष कौन्सिलांतील सभासदांनीं निवडावें. ग्रँटकमिटी स्थापण्यासबंधाची सूचना विचारांत घेऊ नये जर ही ग्रँटकमिटी स्थापावयाचीच असेल तर तिचे अर्धे सभासद लोकनियुक्त असावे. प्रांतिक कायदे कौन्सिलांतील सभासदांपैकीं चार पंचमांश सभासद लोकनियुक्त असावे. कायदा, न्याय, पोलिस आदिकरून सर्व बाबतींत प्रांतिक कायदे कौन्सिलांना कायदे करण्याचा हक्क असावा. कायदा, न्याय व पोलिस या खात्याच्या बाबतींत कौन्सिलनें केलेले निर्णय समाधानकारक नसले, तर वरिष्ठ सरकारकडे त्या बाबतींत विचारणा करावी व वरिष्ठ कायदेकौन्सिलांत नेहमींच्या रिवाजाप्रमाणें या कायद्यांचाही विचार करण्यात यावा.

पार्लमेंट व स्टेट सेक्रेटरी यांचें हिंदुस्थानावरील नियंत्रण नियमित करावें व वरिष्ठ व प्रांतिक सरकाराचा कारभार लोकनियुक्त सभासदांना जबाबदार असावा इंडिया कौंसिल रद्द करण्यांत यावें. स्टेट सेक्रेटरीच्या मदतीकरिता दोन अंडर सेक्रेटरी नेमावे व त्यापैकीं एक हिंदी असावा.

जातीय प्रतिनिधित्वाच्या बाबतींत कॉंग्रेस-लीग योजनेंत ठरविलेल्या प्रमाणांत मुसलमानांना वरिष्ठ व प्रांतिक कायदे कौंसिलांतून जागा देण्यांत याव्या. स्त्रीयांना निर्बंध नसावेत. हिंदुस्थान सरकारला जकातीचे पूर्ण स्वातंत्र्य असावें. आर्मी कमिशनमध्यें हिंदी लोकांना जागा देण्यात याव्या. या कॉंग्रेसच्या मागणीकडे योग्य तें लक्ष दिलें जात नाहीं याबद्दल तीव्र निराशा व्यक्त करण्यात आली व यापुढें ताबडतोब सरकारनें या कमिशनमधील २५ जागा हिंदी लोकांना याव्या

च हें प्रमाण शें. ५० नीं १५ वर्षात वाढवावें अशी विनंति करण्यात आली. इंग्लंडला डेप्युटेशन पाठविण्याचें ठरून त्याचे सभासद निवडण्याकरितां एक कमिटी नेमण्यांत आली.

कॉंग्रेसच्या या जादा अधिवेशनात सुधारणाच्या प्रश्नावर रणे माजतील व कॉंग्रेसमध्यें फाटाफूट होईल, अशी भीति वाटली होती. पण कॉंग्रेसने केलेल्या या निर्णयामुळे परस्परविरुद्ध मतें बाळगणाऱ्या सर्व पक्षाच्या पुढाऱ्याचें समाधान झालें व देशांतील कॉंग्रेसवाल्यानीं बहुमताने कॉंग्रेसच्या या निर्णयालाच मान्यता दिली. मॉस्लेम लीगचें अधिवेशन याच वेळीं महमुदाबादचे राजेसाहेब याच्या अध्यक्षतेखालीं भरलें व कॉंग्रेसच्या धोरणानुसारच सुधारणासंबंधाचा ठराव लीगने मंजूर केला.

प्रांतिक व वरिष्ठ सरकारच्या कामाची वाटणी करणे आणि मतदाराचा हक्क व मतदार संघ निश्चित करणे, या गोष्टी अद्याप ठरवावयाच्या होत्या. या कामा-करितां दोन कमिशनें हिंदुस्थानांत आलीं. मतदारीचा हक्क ठरविण्याचे काम साउथबरो कमिशनकडे सोंपविण्यात आलें होते व कामाची वाटणी निश्चित करण्याचे काम फ्रीथाम कमिशनला करावयाचे होते. ना शास्त्री साउथबरो कमिटीवर होते. ब्राह्मणेतरांना स्वतंत्र मतदार संघ देण्यात येऊं नयेत म्हणून लॉर्ड साउथबरो याच्यापाशीं ना. शास्त्री आपलें वजन खर्चीं घालणार आहेत, अशी शंका मद्रासकडील ब्राह्मणेतर पुढाऱ्यांना आल्यामुळें त्यांनीं या कमिशनवर बहिष्कार घातला व आपलें गाऱ्हाणें इंग्लंडच्या वेशीवर टांगण्याचे ठरविलें. हा आपला बेत त्यांनीं तडीस नेला व त्यात यशही मिळविलें.

हिंदुस्थानचें नष्टचर्य अद्याप संपले नव्हते. डिफेन्स ऑफ इंडिया ॲक्टची अमलबजावणी जोरात चालू होती अलीबंधू व मौ. अबदुल कलाम अझाद याच्या स्थानबद्धतेसंबंधाची हकीकत मागेच सांगितली आहे. १९१५ सालीं मुक्त होऊन अमृतसर कॉंग्रेसमध्यें उपस्थित होईपर्यंत अलीबंधू हे कॉंग्रेसवाले झालेले नव्हते. ‘कॉमरेड’ नावाचे जोरदार व झणझणीत साप्ताहिक महंमदअली चालवीत होते व शौकतअली ‘हमदर्द’ नावाचे दैनिक चालवीत होते. महायुद्ध सुरू झाले व दुबळ्या राष्ट्रांचे रक्षण करण्याचा आपला उद्देश दोस्त राष्ट्रांनीं जाहीर केला, त्या वेळीं ‘ईजिप्त सोडा’ या मथळ्याचा एक लेख महंमदअली यांनीं ‘कॉमरेड’मध्ये प्रसिद्ध केला. यानंतर लवकरच अलीबंधूंना स्थानबद्ध करण्यांत

आले. राजबंदी–मुक्तीचा बादशाही जाहीरनामा निघेपर्यंत हे अटकेंत होते. २५ डिसेंबर १९१९ रोजीं त्यांची मुक्तता करण्यात आली.

लष्करभरति करणें व मन वळविणें व युद्ध कर्ज उभारणें या बाबतींत ‘ वजन आणणें व मन वळविणें ’ असले साधे उपाय योजण्यांत येतात, असें लॉर्ड विलिंग्डन व त्यांचे अधिकारी म्हणत होते; पण या बाबतींत ठिकठिकाणीं अतिरेक होऊं लागले व विशेषतः पंजाबमध्यें यां अतिरेकाला ऊत आला. एके ठिकाणीं ( आकोला ) तर तेथील लोकांनीं मामलेदाराच्या बगल्याला वेढा घातला. त्याचीं बायकामुलें बाहेर जाऊं दिलीं व त्या मामलेदाराला बगल्यात कोंडून बंगल्याला आग लावून दिली व त्याला बंगल्यासकट जाळून टाकलें.

केवळ राजकीय क्षेत्राचा विचार केला तर लॉर्ड चेम्सफर्ड याच्या कारकीर्दींत प्रेस ॲक्टचा उपयोग कडक रीतीनें करण्यांत आला. डिफेन्स ऑफ इंडिया ॲक्टान्वयें लॉर्ड विलिंग्डन यानीं मिसेस बेझंट यांना मुंबई इलाख्यांत येण्यास बंदी केली. बंगालमध्यें जवळजवळ ३ हजार तरुण या कायद्यान्वयें स्थानबद्ध करण्यांत आले. यानतर मिसेस बेझंट यांनाही स्थानबद्ध करण्यांत आलें.

“ क्रांतिकारक चळवळीशीं संबंध असलेल्या कटाचें स्वरूप काय, त्यांचा बदोबस्त करण्याच्या कामीं कोणत्या अडचणी येतात व त्या दूर करण्याकरिता कोणते उपाय योजावे ” यासंबंधीं चौकशी करण्यासाठीं सर सिडने रौलेट यांच्या अध्यक्षतेखालीं एक कमिटी आदल्या सालीं नेमण्यांत आली. मि. कुमार-स्वामी शास्त्री व प्रवासचद्र मित्र हे या कमिटीचे सभासद होते. या कमिटीनें आपलें चौकशीचें काम सपवून सरकारकडे रिपोर्ट सादर केला व कमिटीनें सुचविल्याप्रमाणें एक बिल वरिष्ठ कायदेकौंसिलापुढें माडण्यात आलें. देशभर त्याच्याविरुद्ध चळवळ सुरूं झाली. कॉंग्रेसच्या जादा अधिवेशनाच्या प्रसंगीं हा रिपोर्ट प्रसिद्ध झाला होता. रौलेट कमिटीनें केलेल्या शिफारशींचा कॉंग्रेसनें निषेध केला व कमिटीनें केलेल्या शिफारशी अंमलांत आल्यास हिंदी लोकांच्या जन्मसिद्ध हक्कांवर गदा येईल व लोकमताच्या हितकर वाढीला अडथळा होईल अशी भीति कॉंग्रेसनें व्यक्त केली.

कॉंग्रेसचें जादा अधिवेशन आगष्टच्या अखेरीस समाप्त झालें. कॉंग्रेसची नेहमींची बैठक डिसेंबरमध्यें दिल्ली येथे भरावयाची होती. प्रां. कॉ. कमिट्यानीं व स्वागत मंडळाने लो. टिळकांची या अधिवेशनाच्या अध्यक्षाचे जागी निवड केली. सर

सर सत्येंद्रप्रसन्न सिंह
१९१५ मुंबई कोंग्रेसचे अध्यक्ष

अंबिकाचरण मुजुमदार
१९१६ लखनौ कोंग्रेसचे अध्यक्ष

ॲनी बेझंट
१९१७ कलकत्ता कॉंग्रेसच्या अध्यक्ष

सय्यद हसन इमाम
१९१८ मुंबई खास कॉंग्रेसचे अध्यक्ष

पं. मोतीलाल नेहरू
१९१९ अमृतसर व १९२८
कलकत्ता कोंग्रेसचे अध्यक्ष

लाला लजपतराय
१९२० कलकत्ता खास कोंग्रेसचे अध्यक्ष

व्हॅलेन्टाइन चिरोल यांच्यावर केलेल्या फिर्यादीच्या बाबतीत लो. टिळकानः विलायतेस जावयाचें असल्यामुळें त्यांनीं आपल्याला हा मान स्वीकारतां येत नाहीं असें स्वागतमंडळाला कळविलें व मालवीय यांची त्यांच्या जागीं निवड झाली.

कॉंग्रेसचे तेहतिसावें अधिवेशन दिल्ली येथें २६ डिसेंबर रोजीं सुरू झालें. हकीम अजमलखान हे स्वागत मंडळाचे अध्यक्ष होते. ११ नोव्हेंबर १९१८ रोजी महायुद्ध तहकूब झालें. दोस्त राष्ट्रांचा पूर्ण विजय झाला व प्रे. विल्सन, मि. लॉइड जॉर्ज व इतर दोस्त राष्ट्रांतील मुत्सद्यांनीं स्वयंनिर्णयाच्या तत्वाची घोषणा केली; तेव्हां या घोषणेनुसार सुधारणाकायद्याचा विचार या कॉंग्रेसमध्यें झाला.

दिल्ली कॉंग्रेसलाही प्रेक्षकांची खूप गर्दी जमली होती व ४८६५ वर प्रातिनिधि या अधिवेशनाच्या प्रसंगी उपस्थित झाले होते. राजनिष्ठा व्यक्त केल्यानंतर जगांतील राष्ट्रांच्या स्वातंत्र्याकरितां चालविलेल्या युद्धांत दोस्त राष्ट्रांना विजय प्राप्त झाल्याबद्दल कॉंग्रेसने त्याचें अभिनंदन केले. स्वातंत्र्य, न्याय व स्वयंनिर्णय या तत्त्वाच्या रक्षणाकरितां दोस्त राष्ट्रांच्या शिपायांनीं–विशेषतः हिंदी सैनिकांनीं–युद्धाच्या रणमैदानावर जें शौर्य गाजविलें त्याबद्दलही एका ठरावानें अभिनंदन करण्यांत आले. एक प्रागतिक राष्ट्र म्हणून हिंदुस्थानला स्वयंनिर्णयाचें तत्त्व लागू करावें, व त्याला ब्रिटिश पार्लमेंटने मान्यता द्यावी, व त्या दृष्टीनें पहिला हप्ता म्हणून राजकीय प्रश्नाच्या स्वतंत्रपणें करण्यांत येणाऱ्या चर्चेला अडथळा आणणारे असे कायदे ( रेग्युलेशन्स् व ऑर्डिनन्सेस ) रद्द करण्यांत यावेत. अटक करणें, स्थानबद्ध करणें, तुरुंगात टाकणें व हद्दपार करणे अशा प्रकारचे जे अधिकार सरकारी अधिकाऱ्याना दिले आहेत ते काढून घ्यावेत, व इंग्लंडमधील राजद्रोहाच्या कायद्याप्रमाणेच हिंदुस्थानातील राजद्रोहाच्या कायद्याला स्वरूप देण्यांत यावे. हिंदुस्थानात लौकरच पूर्ण जबाबदारीचें स्वराज्य प्रस्थापित करावें. साम्राज्याची पुनर्घटना करतांना स्वायत्त वसाहतींना जे हक्क देण्यांत येतील तेच समानतेचे हक्क हिंदुस्थानाला देण्यांत यावेत अशी विनंति करण्यात आली. शांतता परिषदेंत हिंदुस्थानातील लोकनियुक्त प्रतिनिधींनी भाग घ्यावा, असे कॉंग्रेसला वाटत होतें म्हणून लो. टिळक, म. गांधी व मि हसन इमाम यांची हिंदुस्थानचे प्रतिनिधी म्हणून कॉंग्रेसनें निवड केली. पूर्ण प्रांतिक स्वराज्याचे हक्क तावडतोब हिंदुस्थानाला द्यावेत हिंदुस्थानातील कोणताही प्रांत सुधारणांची अम्मलबजावणी करतांना वगळूं नये अशी शिफारस करून रौलेट

ऑक्टोबरमधील मुंबईच्या जादा अधिवेशनात पास झालेल्या ठरावालाच पुष्टि देण्यात आली. न हीं बिलें पास झाल्यास सुधारणांच्या यशस्वी अंमलबजावणीच्या बाबतींत अडथळा उत्पन्न होईल, असें मत व्यक्त करण्यांत आलें. डिफेन्स ऑफ इंडिया ॲक्ट, सिडिशस मिटींग्ज ॲक्ट, प्रेस ॲक्ट, क्रिमिनल लॉ अमेंडमेंन्ट ॲक्ट, जुने रेग्युलेशन व याच्या सारखेच दुसरे दडपशाहीचे कायदे रद्द करण्यांत यावेत व सर्व स्थानबद्दांना व राष्ट्रीय कैद्यांना तावडतोब मुक्त करण्यात यावें असेही ठराव करण्यात आले औद्योगिक कमिशनच्या रिपोर्टाचाही विचार या कॉंग्रेसमध्यें करण्यात आला. पं. मदन मोहन मालवीय हे या कमिशनचे सभासद होते. कमिशननें केलेल्या शिफारशींचें स्वागत करण्यात आलें. देशाच्या औद्योगिक प्रगतीच्या कामीं सरकारनें लक्ष घालावें, देशी भांडवलवाल्यांना उत्तेजन द्यावें, परकीय पिळणुकीपासून हिंदुस्थानचें संरक्षण करावें, व अल्लीबधूंना मुक्त करण्यात यावें अशा सूचना कॉंग्रेसनें केल्या. युद्धाकरितां ४५००००००रु. ची हिंदुस्थाननें द्यावयाची खंडणी देशाची आर्थिक हलाखीची स्थिति लक्षांत घेऊन सरकारनें मागूं नये अशीही एक मागणी कॉंग्रेसमध्यें करण्यात आली.

जादा आधिवेशनांत पास झालेल्या ठरावांनाच या कॉंग्रेसमध्ये पुष्टि देण्यांत आली. तरी मुंबईच्या जादा कॉंग्रेसमध्यें सर्व पक्षात जो सलोखा दिसून आला होता, तो मात्र या कॉंग्रेसमध्यें दिसून आला नाहीं. एका लहानशा प्रश्नावर शेवटीं मतभेद दिसून आला. प्रांतिक स्वायसत्ता पूर्णांशानें व तावडतोब स्थापण्यात यावी कां या बाबतींतील मुंबईच्या ठरावाना पुन्हा पुष्टि द्यावी हाच तो मतभेदाचा प्रश्न होता असें मिसेस बेझंट यांनीं म्हटलें आहे. मद्रासचे प्रतिनिधी व इतर नेमस्त पुढारी मुंबईच्या ठरावाच्या बाजूला होते, तर कॉंग्रेसमधील बहुमत मुंबईची तडजोड मानावयास तयार नव्हतें. आणि इंग्लंडमध्यें पाठविण्यांत येणाऱ्या शिष्टमंडळानें कोणत्या गोष्टींचा पुरस्कार करावा हा प्रश्न जेव्हां चर्चेला निघाला त्या वेळीं दिल्लीची मागणीच पुरस्कृत करण्यांत यावी, असें बहुमतानें ठरविण्यांत आलें. अर्थात मुंबईच्या तडजोडीच्या पक्षाचे लोक या शिष्टमंडळांतून वगळले गेले. "असमाधानकारक व निराशाजनक" या शब्दाबद्दल ना. शास्त्री यांनीं आक्षेप घेतला. १५ वर्षांची कालमर्यादा गाळण्यांत यावी असेही त्यांनीं सुचविलें पण मूळ ठरावच शेवटीं बहुमतानें पास झाला. प्रिन्स ऑफ वेल्स यांच्या स्वागताचा ठराव मात्र वगळण्यांत आला.

## प्रकरण पांचवें

# गांधीयुगाचा प्रारंभ

दिल्ली कॉंग्रेसनें देशाला शांति मिळूं दिली नाही. रौलेट बिलानीं १९१९ फेब्रुवारीमध्यें आपलें डोकें वर काढलें. हीं दोन वेगळी बिलें होती; यांपैकीं एक बिल उन्हाळ्याच्या बैठकींत पुढें यावयाचें होतें. हें बिल हंगामी स्वरूपाचें होतें. युद्ध बंद होऊन शांततेची प्रस्थापना झाल्यानंतर ६ महिन्यानीं डिफेन्स ऑफ इंडिया ॲक्टची मुदत संपत होती. तेव्हां या कायद्याची जागा घेण्याकरितां पहिलें बिल तयार करण्यांत आलें होतें. अराजक गुन्ह्यांची चौकशी हायकोर्टाच्या तीन जज्जांसमोर ताबडतोब करण्यांत यावी. या कोर्टाविरुद्ध अपील करण्याचा हक्क नसावा. बादशहाविरुद्ध गुन्हा करण्याचा संशय आलेल्या इसमाकडून जामीन घेणें, त्याना एखाद्या विशिष्ट जागी राहावयास लावणे, निर्दिष्ट केलेलीं कृत्ये करण्यास मनाई करणें, सार्वजनिक सुरक्षिततेला बाध येईल अशा कृत्याशीं संबंध असलेल्या इसमाला पकडण्याचा अधिकार स्थानिक स्वराज्य संस्थाना देणें, भयंकर कृत्यें करणाऱ्या इसमाला तुरुंगांत सारखे डाबून ठेवणें इत्यादि अधिकाराचा समावेश पहिल्या बिलांत केला होता. देशाच्या फौजदारी कायद्यांत कायमचा बदल घडवून आणणें हा दुसऱ्या बिलाचा उद्देश होता. राजद्रोहात्मक वाङ्मय प्रकाशित करण्याच्या किंवा प्रसार करण्याच्या उद्देशानें जवळ ठेवणें हा गुन्हा समजला जाऊन त्याकरितां तुरुंगवासाची शिक्षा देणे, बादशहाच्या माफीच्या साक्षीदाराला सरकारी संरक्षणाचें अभिवचन, सरकारविरुद्ध गुन्हा केल्यामुळें शिक्षा झालेला इसम सुटून आल्यावर त्याच्याकडून दोन वर्षांचा चागल्या वर्तणुकीबद्दल जामीन घेणें, अशा प्रकारचें या दुसऱ्या बिलाचे स्वरूप होतें.

रौलेट रिपोर्ट १९ जुलै १९१८ रोजीं प्रसिद्ध झाल्यानंतर हीं बिलें ६ फेब्रुवारी १९२० रोजीं वरिष्ठ कायदे कौंसिलापुढें मांडण्यात आलीं. यांपैकीं दुसरें बिल गाळून टाकण्यांत आलें व पहिलें बिल मार्चच्या तिसऱ्या आठवड्यांत पास करण्यांत आलें. रौलेट शिफारशींना कायद्यांचें स्वरूप देण्यांत आल्यामुळें उत्पन्न झालेल्या परिस्थितीला सत्याग्रहाची चळवळ सुरू करून तोंड देण्यांत येईल, असें गांधींजीनी जाहीर केलें व त्या दृष्टीनें लोकमताचा अंदाज घेण्या-

कारितां त्यांनीं देशभर मोठा दौरा काढला. सर्वत्र मोठया आदरानें त्यांचें स्वागत करण्यांत आलें. तुलनात्मक दृष्टीनें पाहतां परके असलेले हे गृहस्थ लोकांना का प्रिय झाले व त्यांनीं मांडलेला सत्याग्रहाचा विलक्षण कार्यक्रम लोकांना कां आवडला याचें उत्तर सरकारनें द्यावें. *

" गांधीजी टॉलस्टॉयचे शिष्य आहेत. त्यांचीं ध्येयें उदात्त आहेत व ते पूर्ण निरहंकार वृत्तीचे आहेत, अशी गांधीजींच्या संबंधानें समजूत आहे. द. आफ्रिकेंतील हिंदी लोकांच्या वतीनें ते लढावयास उभे राहिले तेव्हांपासून लोकांना त्यांच्याबद्दल आदर वाटू लागला. संन्यस्त व वैराग्यशील पुरुषाला पौर्वात्य लोक श्रद्धेनें मान देऊं लागतात. पौर्वात्याची ही परंपराच आहे. गांधीजींनाही लोक तशाच प्रकारचा मान देऊं लागले. गांधीजींना चहाणारे लोक व त्यांचे अनुयायी आपण एकाद्या विशिष्ट धर्माचे आहोंत असें प्रतिपादन करीत नाहींत त्यामुळें गांधीजींच्या चळवळीला आणखी अधिक सामर्थ्याची जोड मिळाली. अहमदाबाद येथें राहावयास आल्यापासून ते अनेक समाजोपयोगी कामें करीत आहेत. व्यक्ति असो किंवा एकादा समाजांतील वर्ग असो, त्याच्यावर अन्याय होतो असें दिसून आल्यावर, त्याच्या निवारणाकरिता ते धावून जातात. यामुळें ते अधिक लोकप्रिय झाले आहेत. मुंबई इलाख्यात बऱ्याच शहरातील व खेड्यातील जनतेवर त्यांचें अत्यंत वजन असून ते सर्वांना पूजनीय झाले आहेत. आधिभौतिक शक्तीपेक्षा आध्यात्मिक शक्ति श्रेष्ठ आहे, असा महात्माजींचा विश्वास असल्यामुळें गांधीजींनीं रौलेट ॲक्ट विरुद्ध सत्याग्रहाचें शस्त्र उचलण्याचे ठरविलें. ही बिलें पास झाल्यास सत्याग्रहाची चळवळ सुरूं करण्यात येईल असें ता. २४ फेब्रुवारी रोजीं त्यांनीं जाहीर केले होतें. अशी जाहीर घोषणा करणें हें अत्यंत गंभीर स्वरूपाचे कृत्य होय, असे सरकारला आणि राजकीय पुढाऱ्यांना सुद्धा वाटलें. अशा प्रकारची चळवळ सुरूं केल्यास त्याचे भयप्रद परिणाम होतील, असें कायदेकौन्सिलातील नेमस्त पुढाऱ्यांनीं जाहीर केलें हिंदी जनतेच्या अंत:करणांत वसत असलेल्या गुप्त शक्ती या चळवळीमुळें मोकळ्या सुटल्यास त्याचे काय परिणाम होतील हें सांगता येणार नाहीं, अशी हिंदी स्वभावाचें पूर्ण ज्ञान असलेल्या बेझंटबाईंनी सावधगिरीची सूचना दिली. या ठिकाणीं एक गोष्ट स्पष्टपणें सांगितली पाहिजे कीं, गांधीजींनीं अशी घोषणा केली असली तरी

* चंपारण्य, खेडा व अमदाबाद येथील हकीकतीशी याचें अनुसंधान आहे.

प्रत्यक्ष चळवळीला त्यांनीं सुरुवात करीपर्यंत त्यांच्या स्वातंत्र्याला आड येईल असें कृत्य सरकारनें करण्याचें कांहींच कारण नव्हतें. महात्माजींच्या वर्तनांत किंवा त्यांच्या या घोषणेंत असें कांहीं नव्हतें कीं, ज्यामुळें सरकारचें हें कृत्य समर्थनीय ठरलें असतें. सत्याग्रह ही अभावात्मक क्रिया आहे, त्यांत वास्तविकता नाही. म. गांधींनीं आधिभौतिक शक्तीचा केव्हांही निषेधच केला आहे. कायदेभंगाच्या उपायानें आपण सरकारला रौलेट बिलें रद्द करावयास लावूं, असा म. गांधींना पूर्ण विश्वास वाटत होता. या बिलाच्या बाबतींत ता. १८ मार्च रोजीं त्यांनीं एक प्रतिज्ञा जाहीर केली.

"इंडियन क्रिमिनल लॉ अमेंडमेंट बिल नं. १-१९१९ व क्रिमिनल इमर्जन्सी पॉवर्स बिल नं. २-१९१९ हीं दोन्हीं बिलें अन्यायमूलक आहेत. हिंदुस्थानची व सरकारची सुरक्षितता ज्यांच्यावर अवलंबून आहे, अशा व्यक्तिगत स्वातंत्र्याच्या स्वाभाविक हक्कावर या बिलांमुळे गदा येणार आहे, हे पाहून आम्ही असें गंभीरपणें जाहीर करतों कीं, या बिलांना कायद्याचें स्वरूप प्राप्त झाल्यास तीं रद्द होईपर्यंत आम्ही या कायद्याचा, व या कामाकरितां नेमलेली कमिटी यापुढें ठरवील त्या कायद्यांचा, विनयपूर्वक भंग करूं. आणि हा लढा चालू असेपर्यंत जीवित्व, व्यक्ति व मालमत्ता याच्या बाबतींत आम्ही अत्याचार करणार नाहीं व श्रद्धापूर्वक सत्याचें पालन करू, असे आम्ही प्रतिज्ञापूर्वक सांगत आहों."

स्वराज्याचा एवढा प्रचंड प्रश्न पुढें दत्त म्हणून उभा असतां रौलेट बिलासारख्या अगदीं किरकोळ व गौण प्रश्नाच्या बाबतींत सत्याग्रहाचें शस्त्र म. गांधींनीं कां उचललें ही गोष्ट पुष्कळांना समजत नाहीं. १९२० सालीं स्वराज्याचा प्रश्न बाजूस ठेवून पंजाब व खिलाफतकरितां असहकारितेची चळवळ म. गांधींनीं सुरू केली, त्या वेळीं अशीच शंका उपस्थित करण्यांत आली होती. पण या मुद्यांचा आम्हीं मागून विचार करूं. म. गांधींच्या या धोरणाबद्दल वरील प्रकारच्या शंका उपस्थित करण्यांत आल्या, तरी बंगालशिवाय हिंदुस्थानातील इतर सर्व प्रांतांतून गांधीजींना या बाबतींत पाठिंबाच मिळाला. बंगालमध्यें देखील अगदीं प्रारंभीं या गोष्टीला पाठिंबा मिळाला नाहीं इतकेंच. दक्षिण भागानें तर अगदीं अनपेक्षितपणे या हाकेला ओ दिली. सरकारला जप्त करतां येऊं नये किंवा विकतां येऊं नये म्हणून आपल्या मालमत्तेशीं असलेला आपला संबंध आपण सोडून द्यावा कीं काय अशी एक शंका उपस्थित करण्यांत आली

होती. पण या बाबतींत ज्याचा त्यानें विचार करावा, ज्याची त्यानें आपल्या स्वार्थत्यागाची मर्यादा ठरवावी. गांधीजींची त्या बाबतींत मुळींच हरकत नव्हती. उपवास करून गांधीजींनीं या चळवळीला आरंभ केला. देशांतील परंपरागत समजुतीला धरूनच ही गोष्ट होती. आत्मशुद्धीची ही कल्पनाच कित्येक पुढाऱ्यांच्या कानाला कर्कश वाटली. "राजकारणाचा व आत्मशुद्धीचा संबंध काय" असें ते तुच्छतापूर्वक विचारू लागले. ता. ३० मार्च १९१९ या दिवशीं हरताळ पाळण्यांत यावा, प्रार्थना करण्यांत याव्या व सर्वत्र सभा भरवाव्या असें प्रथम ठरविण्यात आलें होतें, पण ती तारीख बदलून "एप्रिल सहा" रोजीं हा कार्यक्रम ठरविण्यात आला. दिल्ली येथें ही गोष्ट वेळेवर जाहीर करण्यांत न आल्यामुळें तेथें हरताळ पाडण्यात आला. स्वामी श्रद्धानद यांनीं या मिरवणुकीचा पुढाकार घेतला होता. मिरवणुकीपुढून ते चालले असतां गोऱ्या सोजिरांनीं त्यांच्यावर गोळी झाडण्याची धमकी दिली. स्वामीजींनीं या गोळीचें स्वागत करण्याकरिता आपली छाती उघडी केली आणि ही धमकी पोकळ ठरविली. पण दिल्ली स्टेशनवर दंगा होऊन तेथेंही गोळीबार झाला. त्यात ५ इसम मरण पावले. २०१२५ लोक जखमी झाले. ६ एप्रिल रोजीं सर्व देशभर मोठ्या प्रमाणांत सभा व मिरवणुका झाल्या. "या लोकक्षोभाचें प्रसंगीं दिसून आलेली महत्त्वाची गोष्ट म्हणजे हिंदु-मुसलमानातील अपूर्व बंधुभाव या वेळीं प्रतीतीस आला ही होय. हिंदू-मुसलमान पुढाऱ्यातील ऐक्य हें राष्ट्रीय पुढाऱ्यांचें निश्चित धोरण सार्वजनिक सभांतून वगैरे दिसून येत होतें, पण या चळवळीच्या वेळीं अगदीं खालच्या वर्गातील लोकांतही हे ऐक्य झालेलें दिसून आलें. हिंदु-मुसलमानांतील बंधुभाव दर्शविणारी असामान्य दृश्यें या वेळीं दिसून आलीं. मुसलमान हिंदूंच्या हातचे पाणी प्याले व हिंदूनीं मुसलमानांच्या हातच्या पाण्याचा स्वीकार केला. हिंदू-मुसलमानांचें ऐक्य ही त्या वेळची घोषणा होती व निशाणावरही तशीं वचनें लिहिण्यांत आलीं होती. मशिदीमधील उपदेशपीठांवरून हिंदु पुढाऱ्यांनी व्याख्यानें दिली. (इंडिया १९१९). महायुद्धानंतर तुर्कस्थानची परिस्थिति अनिश्चित झाली व खिलाफतीवर संकट आलें हें या ऐक्याचें निकटवर्ती कारण झालें होतें. व हिंदूनीं मुसलमानांच्या या भावनेबद्दल सहानुभूति दाखविली होती.

सत्याग्रहाच्या या नवीन कल्पनेचा देशानें तत्परतेनें व अंतःकरणपूर्वक

स्वीकार केला. शांतता परिषदेंत पाठविण्यांत येणाऱ्या हिंदी पुढाऱ्यांत गांधींचें प्रथम नाव गाळण्यात आलें होतें. पण दिल्ली कॉंग्रेसमध्यें बी. चक्रवर्ती व सी.आर. दास यानीं ठराव आणून ही चूक तेथल्या तेथेंच सुधारली व महात्मा गांधींना या शिष्टमंडळांतील प्रतिनिधि म्हणून निवडून दिलें. "१९१९ च्या एप्रिल" नें हिंदुस्थानच्या इतिहासांतील एका नवीन प्रकरणालाच प्रारंभ केला.

हिंदुस्थानांतील चळवळीचा ओघ आतां पंजाबकडे वळला व तिच्याकरितां आत्मकष्ट सहन करण्याची पाळी त्यांच्यावर आली. हिंदुस्थानांतील सुशिक्षित वर्गानें व त्यांच्या कॉंग्रेस चळवळीनें पंजाबात पाय रोवावे, ही गोष्ट सरकारला आवडणें शक्य नव्हतें. सुशिक्षित लोक लष्करांत जाऊं पाहात होते व लष्करी कॉलेज काढण्यासंबंधानें चळवळ करीत होते. तेव्हां या सुशिक्षिताचे व पंजाबातील क्षत्रिय जातींचें संगनमत झालें, त्याना राजकीय जागृतीचें शिक्षण मिळालें व राजकीय आकांक्षा त्यांनीं मनात बाळगल्या तर ब्रिटिश राज्य संपुष्टांत येण्याचाच प्रसंग येणार! महायुद्धाच्या रणांगणावरून हिंदी सैन्य नुकतेंच परत आलें होतें. जर्मनी, ऑस्ट्रिया, रशिया, तुर्कस्थान या राष्ट्राच्या सैनिकांशीं ते शौर्यानें लढलें होतें व आपल्या सामर्थ्याची जाणीव त्याना झाली होती. रूसो जपानी युद्धानें युरोपियन लष्कराविषयींच्या शौर्याच्या कल्पना नष्ट झाल्या होत्या आणि महायुद्धानें तर युरोपियनाच्या लष्करी सामर्थ्यासंबधींच्या अवास्तव कल्पनाचा धुव्वा उडविला होता. तेव्हां कॉंग्रेसच्या चळवळीनें पंजाब भ्रष्ट होऊं द्यावयाचा नाहीं असें पंजाबचे सर मायकेल ओडवायर यानीं ठरविलें होतें. तेव्हां कॉंग्रेसची चळवळ पंजाबांत चालू ठेवावयाची कीं नाहीं किंवा अमृतसर येथें बोलावलेली कॉंग्रेस बैठक भरू द्यावयाची कीं नाहीं, यासंबंधानें पंजाबातील कॉंग्रेसचे पुढारी व सर मायकेल ओडवायर-प्रभृती सरकारी अधिकारी याच्यात जणूं काय झटापटच सुरू झाली होती. अमृतसरच्या डि. मॅजिस्ट्रेटनें ता. १० एप्रिल १९१९ रोजीं सकाळीं ४ वाजता डॉ. किश्लू व डॉ. सत्यपाल याना आपल्या बंगल्यावर बोलावून घेतलें व एका अज्ञात स्थळीं त्यांना ठेवून दिलें. ही बातमी तावडतोब सर्वत्र दूरवर पसरली. लोकांचे थवेच्या थवे एकत्र जमूं लागले. आपल्या पुढाऱ्यांना कोठें ठेवलें आहे हें मॅजिस्ट्रेटला विचारावें अशीच त्यांची इच्छा होती. शहर व लष्कर यांच्या हद्दीवर असलेल्या लष्करी पहारेवाल्यांनीं या गर्दीला सिव्हिल लाइन्सकडे जाऊं दिलें नाहीं.

असला कांहीं प्रसंग कोठेंही आला कीं, गर्दीतून विटांचे तुकडे फेंकण्यांत येतात, या गोष्टी ऐकूं यावयाच्याच; तीच गोष्ट या ठिकाणींही झाली. गर्दीवर गोळीबार करण्यांत आला. १।२माणसें ठार झालीं व बरेच लोक जखमी झाले. गर्दी मागें फिरली. गोळीबाराला बळी पडलेल्या आपल्या दोस्तांना घेऊन त्यांची त्यांनीं मिरवणूक काढली. या रस्त्यावर असलेल्या नॅशनल बँकेला त्यांनीं आग लावली व तिच्या युरोपियन मॅनेजरला त्यांनीं ठार मारलें. अमृतसर येथें ठिकठिकाणीं झालेल्या दग्यांत पांच इंग्रज ठार झाले. आग लावून बँकेच्या इमारतीचा नाश करण्यांत आला, रेलवेची गुडस् शेड व इतर इमारतीही जाळण्यांत आल्या. त्या ठिकाणचे युरोपियन साहजिकच चिडले व त्यांनीं सूड घेण्याचें ठरविलें. १० एप्रिल रोजीं स्थानिक अधिकाऱ्यांनीं वरिष्ठ अधिकाऱ्याची मंजूरी मिळेल या अंदाजानें सर्व शहर लष्करच्या स्वाधीन केलें.

गुजराणवाला व कासूर येथेंही असेंच भयंकर अत्याचार लोकांनीं केले. १२ एप्रिल रोजीं कासूर येथें जमलेल्या लोकांनीं तेथील रेलवे स्टेशनची नासधूस केली. तेलाच्या टाकीची शेड जाळून टाकली. सिग्नलच्या व तारायंत्राच्या तारा तोडून टाकल्या. गाडीवर हल्ला केला. तिच्या डब्यांतील कांहीं युरोपियनांना ठोकलें व दोन सोल्जरांना ठार केलें. एका ब्रँच पोस्ट ऑफिसची लूट केली; मुख्य पोष्ट ऑफिस व कोर्ट जाळून टाकलें; व इतरही बरेंच नुकसान केलें. सरकारी रिपोर्टावरूनच वरील हकीकती थोडक्यांत दिल्या आहेत. लोकांना प्रथम चिथावण्यांत आलें होतें, असें लोकांच्यातर्फे प्रसिद्ध झालेल्या हकीकतींतून म्हटलें आहे.

गुजराणवाला येथें एप्रिल ता. १४ रोजीं लोकांच्या गर्दीनें गाडीला वेढा दिला व तिच्यावर दगडफेंक केली. रेलवे रस्त्यावरील एका लहानशा पुलाला आग लावली व दुसऱ्या एका पुलावर पोलिसांनीं एका गाईचें वासरू मारून टांगून ठेवलें म्हणून तो लोकांनीं जाळून खाक केला. तार ऑफिस, पोस्ट ऑफिस, रेलवे स्टेशन, या सर्वांना त्यानंतर आगी लावण्यात आल्या. डांक बंगला, कलेक्टर कचेरी, चर्च, शाळा वगैरे इमारतींचाही असाच नाश करण्यांत आला.

याशिवाय देशांत ठिकठिकाणीं अशाच प्रकारचे अत्याचार झाले. लाहोरमध्येंही अत्याचार व गोळीबार झाले. कलकत्त्यातूनही दंगे झाल्याच्या बातम्या येऊं लागल्या. पंजाबमध्यें दंगे झाल्याची बातमी ऐकून डॉ. सत्यपाल व स्वामी श्रद्धानंद

यांच्या निमंत्रणावरून ता. ८ रोजीं म. गांधी दिल्लीकडे जाण्यास निघाले. पंजाब व दिल्ली भागांत त्यांनीं जाऊं नये अशी नोटीस त्यांच्यावर वाटेंतच बजावण्यांत आली. त्यांनीं हा हुकूम मानण्याचें नाकारल्यावरून त्यांना अटक करण्यांत आली व पलवाल स्टेशनहून स्पेशल गाडीनें त्यांना परत ता. १० एप्रिल रोजीं मुंबईस आणण्यांत आले.

गांधीजीच्या अटकेची बातमी ऐकतांच अहमदाबादमध्यें दंगे झाले व कांहीं इंग्रज व हिंदी अधिकारी या लोकक्षोभास बळी पडले. १२ एप्रिल रोजीं विरमगांव व नडियाद येथेंही दंगे झाले. कलकत्ता येथें झालेल्या दंग्यांमुळे गोळीबार करण्यांत आला. ५।६ लोक ठार झाले व बारा इसम जखमी झाले. मुंबईस आल्यानंतर गांधीजींनीं लोकांना शांत करण्याचा प्रयत्न केला व ते अहमदाबादला गेले. हे दंगे झालेले पाहून सत्याग्रह तहकूब केल्याबद्दलचें एक पत्रक त्यांनीं प्रसिद्ध केलें.

बाहेर याप्रमाणें परिस्थिति असतां अमृतसरमध्यें दुःखदायक प्रकार झपाट्यानें घडून येत होते. ता. १३ एप्रिलपर्यंत अमृतसरमध्यें लष्करी कायदा जाहीर केलेला नव्हता. पण सरकारी रिपोर्ट ता. १० एप्रिल पासूनच खरा लष्करी कायदा तेथें सुरू असल्याचें कबूल करतो. वास्तविकपणें १५ एप्रिल रोजी लाहोर व अमृतसर येथें व त्याचप्रमाणें पंजाबातील इतर भागांमध्यें लष्करी कायदा जाहीर करण्यांत आला. १३ एप्रिल रोजीं म्हणजे वर्ष प्रतिपदेस जालियनवाला बागेंत एक जंगी जाहीर सभा भरविण्याचें जाहीर झालें होतें. ही जागा शहराच्या मध्यावर आहे. इच्याभोंवतीं मोठमोठे वाडे आहेत. जागेला बाटलीसारखें तोंड आहे व ह्या मैदानातून बाहेर पडण्याला तेवढाच मार्ग आहे. या बागेंत वीस हजार स्त्री, पुरुष व मुलें एकत्र जमलीं असतां, जनरल 'डायर' आपल्याबरोबर १०० हिंदी व ५० ब्रिटिश सोल्जर घेऊन आला. हंसराज नावाचे एक गृहस्थ या लोकसमुदायापुढें व्याख्यान देत असतानाच डायरनें गोळी चालविण्याचा हुकुम दिला. गर्दी मोडण्याचा हुकूम प्रथम आपण लोकांना केला व नंतर गोळीबाराचा हुकूम केला, असें जनरल डायरनेंच हंटर कमिटीपुढें सांगितलें होतें. परंतु त्याच वेळीं पहिला हुकूम केल्यानंतर दोन तीन मिनिटांनीच दुसरा गोळीबाराचा हुकूम केला, हीं गोष्ट त्यानेंच कबूल केली आहे. काहीं असलें तरी एवढ्या अरुंद फाटकांतून वीस हजार लोक २।३ मिनिटांत

बाहेर पडणे शक्य नव्हतें. या समाजावर सोळाशें गोळ्या झाडण्यांत आल्या. जवळचा दारुगोळा संपला तेव्हांच या लष्करानें गोळीबार बंद केला. गव्हर्नमेंट-च्या म्हणण्याप्रमाणेंच ४०० इसम या ठिकाणीं मृत्युमुखीं पडले व हजार ते दोन हजार इसम जखमी झाले. या गोळ्या हिंदी शिपायानीं झाडल्या. त्यांच्या-मागें ब्रिटिश सोल्जर उभे केले होते. हें सर्व लष्कर बागेंतील उंचवटयाच्या जागीं उभे होतें. या प्रसंगांतील खरोखर अत्यंत करुणाजनक गोष्ट म्हणजे मृत्युमुखी पडलेल्या व मरणोन्मुख झालेल्या लोकाना रात्रभर तळमळत रहावें लागलें; त्यांना प्यायला पाणी मिळालें नाहीं, त्यांची कोणत्याही प्रकारची शुश्रुषा करण्यांत आली नाहीं किंवा त्यांना कोणतीही वैद्यकीय मदत मिळाली नाहीं. डायरचें म्हणणें असें होतें कीं,—ही गोष्ट पुढें बाहेर आली—"सर्व शहर लष्करच्या ताब्यात आलें असल्याकारणानें लोकांना एकत्र जमावयास परवानगी नाहीं, अशा प्रकारची दवंडी मी त्या दिवशीं सकाळीं पिटविली होती. लोकांनी माझा हा हुकूम उघडपणें झुगारून दिला म्हणून त्यांना एक धडा शिकवावा अशी माझी इच्छा होती. मी गोळीबार तर केलाच, पण माझ्यापाशीं पाहिजे तितका दारुगोळा असता तर यापेक्षां जास्त वेळ गोळी चालविण्याचा ही मी हुकूम दिला असता. मी फक्त १६०० शेंच गोळ्या झाडल्या, कारण माझ्याजवळचा दारुगोळा संपला होता. वास्तविकपणें एक चिलखती गाडी मी माझ्याबरोबर नेली होती, पण बागेच्या दारांतून ती जाणार नाहीं म्हणून मी ती मागें ठेवली."

जनरल डायरच्या कारकीर्दीत लोकाना कल्पनातीत शिक्षा भोगाव्या लागल्या. अमृतसरचा पाण्याचा व विजेचा पुरवठा बंद करण्यात आला. सार्वजनिक जागे-वर उभे करून लोकाना फटके मारणें ही गोष्ट तर त्या दिवसात सामान्यच झाली होती. या सर्व शिक्षांपेक्षां सरपटत जाणाऱ्या हुकुमानें तर या सर्वांवर ताण केली. मिस् शेरवुड नावाची एक युरोपियन मिशनरी डॉक्टरबाई शहरातील एका गल्लीतून सायकलवरून जात असता तिच्यावर लोकांनीं हल्ला केला. यामुळें वरील हुकूम देण्यांत आला होता. या गल्लींतून जातांना प्रत्येक इसमानें पोटावर पालथे पडून सरपटत गेलें पाहिजे असा हा हुकूम होता. त्या रस्त्यात राहणाऱ्या कांहीं सभ्य नागरिकांनीं मिस् शेरवुडचें रक्षण केलें होतें. तथापि सर्वांवर हाच हुकूम सरांस लावण्यात आला.

रेल्वेवर तिसऱ्या वर्गाची तिकिटें लोकांना देऊं नयेत असा मनाई हुकूम करण्यांत आला होता. त्यामुळें सामान्य लोकांचा प्रवासच बंद पडला. दोहोंपेक्षां अधिक माणसानी फूटपाथवरून व फरशीवरून एकत्र चालूं नये असाही एक सक्त हुकूम देण्यांत आला होता. युरोपियनाच्या सायकली सोडीज इतर सर्व सायकली सरकारने हुकूम काढून आपल्या ताब्यात घेतल्या होत्या. ज्या लोकांनी आपली दुकानें बंद केलीं होती, त्याच्यावर सक्ती करून त्यांना दुकानें उघडण्यास भाग पाडलें व हा हुकूम मोडल्यास जबर शिक्षा देण्यांत येतील, असें बजावण्यांत आलें. बाजारातील जिनसाचें भाव लष्करी अधिकाऱ्यानीं नक्की ठरवून टाकले. बैलगाडयावर लष्करी नियंत्रण सुरू झालें. किल्ल्याजवळ एक सार्वजनिक प्लॅटफॉर्म तयार करून त्यावर फटके मारण्याचा त्रिकोनी स्टॅंड उभा करण्यांत आला होता. शहरातील निरनिराळ्या चव्हाट्याच्या जागींही असेच तिकोनी स्टॅंड उभे करण्यांत आले होते. अमृतसर येथे या दिवसात एक ट्रायब्यूनल कोर्ट बसविण्यांत आलें होतें. यापुढें गंभीर स्वरूपाच्या आरोपाचें २००वर खटले चालविण्यांत आले. खटला चालविण्याचें किंवा पुराव्याचें सामान्य नियमाचें देखील या कोर्टानें पालन केलें नाही. या आरोपींपैकीं ५१ लोकाना फाशी, ४६ इसमांना जन्मभर हद्दपारी, दोघांना १० वर्षाची कैद, ७९ लोकाना ७ वर्षे, १० इसमाना ५ वर्षे, १३ इसमाना ३ वर्षे व ११ इसमांना त्यापेक्षा कमी मुदतीच्या शिक्षा देण्यांत आल्या. लष्करी अधिकाऱ्यानी आपल्या अखत्यारांत जे खटले चालविले त्याची गणना यात केलेली नाही. या अधिकाऱ्यानीं ६०इसमावरील आरोपाची चौकशी केली व त्यापैकीं ५० जणाना शिक्षा दिल्या. लष्करी कायद्यान्वयें खटले भरून सिव्हिल मॅजिस्ट्रेटानीं १०५ इसमांना निरनिराळ्या मुदतीच्या शिक्षा दिल्या. हंटर कमिटीतील एक सभासद जस्टिस् रॅंकिन् यानी "काय हो जनरल ! मी असं विचारतों याबद्दल क्षमा करा, पण काय हो ! हा एक भ्याडपणाचाच प्रकार नव्हता का ?" असें जनरल डायर याना विचारलें. जनरल डायर यानी उत्तर दिलें "नाहीं. तसें नाहीं ! तें एक भयानक कर्तव्य होतें ! मला तें करावें लागलें ! ती एक दयामय गोष्ट होती. त्या वेळी मी चांगला गोळीबार केला पाहिजे अगदीं जोराचा गोळीबार केला पाहिजे, म्हणजे दुसऱ्या कोणावरही पुन्हां असा गोळीबाराचा प्रसंग येणार नाहीं, असें मला वाटलें. गोळी चालवितानाही या लोकाना तेथून हाकून लावणें

व तेथील गर्दी मोडणें अगदीं शक्य होतें. परंतु ते लोक पुन्हां परत आले असते व मला हंसले असते. आणि मी मला स्वतःलाच मूर्खांत काढून घेतलें असतें."

जनरल डायरच्या या कृत्याला सर मायकेल ओडवायर यांनीं तार करून ताबडतोब संमति दिली. "तुमचे कृत्य योग्य आहे. लेफ्टनंट गव्हर्नरांना तें सम्मत आहे."

१९२० च्या प्रारभींच्या दिवसांत हंटर कमिशनपुढें झालेल्या चौकशींत जनरल डायर यांनीं वरील सर्व गोष्टी कबूल केल्या. हा प्रसंग घडून आल्यानंतर त्यांतील सगळ्या गोष्टी एक वर्षभर कोणालाच माहीत नव्हत्या. या प्रसगाची साधी बातमी या वेळीं तर नाहींच पण पुढें काहीं महिने लोटून गेले तरीसुद्धा कोणाला कळली नाहीं. पंजाबमध्यें यावेळीं वर्तमानपत्रावरील बंदी इतकी कडक होती व प्रांतांतून बाहेर जाणाऱ्या येणाऱ्यावर इतकीं कडक बंधनें होतीं कीं, खुद्द ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटीला अमृतसरच्या या दुःखकारक प्रसंगाची बातमी कलकत्ता येथें १९१९ च्या जुलैमध्यें कळली. ही बातमी या कमिटीच्या सभे-पुढें ज्या इसमानें फोडली तो इसम घाबरून गेला होता. दम कोंडून धरून गुणगुणत त्यांनीं ही हकीगत सांगितली, एवढेंच नव्हे तर ती गुप्त ठेवली पाहिजे, अशा विश्वासानें त्यानें ती सांगितली. पंजाबातील हे शोकपर्व केवळ अमृतसर येथेंच घडून आलें असें नाहीं. लाहोर, गुजराणवाला, कासूर व इतर अनेक ठिकाणी असेच प्रकार कर्नल जॉनसन, बॉस्वर्थ स्मीथ, कर्नल ओब्रायन व इतर मुलकी व लष्करी अधिकाऱ्यांनीं केले. या अत्याचाराच्या हकीकती खरोखरच माणसाचें रक्त गोठवून टाकणाऱ्या आहेत!

पार्लमेंटला सादर केलेल्या श्वेतपत्रिकेंतील सरकारी रिपोर्टात लष्करी कायद्याचा अंमल पंजाबमधील इतर भागांपेक्षां लाहोरमध्यें अधिक कडक स्वरूपाचा होता, असें म्हटलें आहे. लाहोरमध्यें या वेळीं ताबडतोब कर्फ्यू ऑर्डर * सोडण्यांत आली. रात्रीं ८ नंतर जे लोक घराबाहेर आढळतील त्याना गोळी घालून ठार मारण्यांत येईल, फटके मारण्यांत येतील, दंड करण्यात येईल, त्यांना तुरुंगांत टाकण्यांत येईल किंवा इतर अनेक शिक्षा देण्यांत येतील, असें बजावण्यांत आलें.

* ही व याच्यापुढील हकिकत मिस्टर बि. जी. हॉर्निमन् यांच्या "अमृत-सर" या पुस्तकांतून घेतली आहे.

ज्यांनीं आपलीं दुकाने बंद केलीं होतीं त्यांना ती उघडण्यास भाग पाडलें, दुकानें न उघडल्यास त्यांना गोळी घालून ठार मारण्यांत येईल किंवा त्यांचें दुकान जबरदस्तीनें उघडून आंतील सामान लोकांना फुकट वाटण्यांत येईल, असेंही जाहीर करण्यांत आले.

वाकिलांनीं, त्यांच्या एजंटांनीं, दलालांनीं, सरकारी कचेरींत आपलीं नांवें नोंदविली पाहिजेत व परवान्याशिवाय शहर सोडून बाहेर जातां कामा नये, असें हुकूम सोडण्यांत आले. ज्या लोकांच्या घराच्या भिंतीवर, लष्करी कायद्याचे जाहीरनामे चिकटविले होते त्याचें त्या लोकांनीं रक्षण केलें पाहिजे, ते फाटतां कामा नये किंवा विकृत करतां कामा नये, असें हुकूम देण्यांत आले. वस्तुस्थिति अशी होती कीं या लोकांना रात्रीं ८ नंतर बाहेर पडावयासहि परवानगी नव्हती. तेव्हा त्यांनीं तें जाहीरनामे सांभाळावयाचे कसे ? कॉलेजच्या विद्यार्थ्यांनीं दिवसांतून चार वेळां लष्करी अधिकाऱ्याच्या ऑफिसांत हजेरी द्यावी, असेंही हुकूम फर्माविण्यांत आले होते. ज्या लोकांना धान्य खरेदी करण्याची ताकद नव्हती अशा गरीब लोकाकरिता शहरातील उदार धनिकांनीं लंगर (अन्नछत्रें) उघडलें होतें, तेंही बंद केलें. हिंदी लोकांच्या मालकीच्या मोटार गाड्या व मोटार सायकली, लष्करी अधिकाऱ्याकडे त्याच्या उपयोगाकरितां स्वाधीन केल्या पाहिजेत. हिंदी लोकांच्या घरातील विजेचे पंखे व इतर विजेचे सामान काढून घेऊन सोल्जराच्या उपयोगाकरिता लष्करात नेण्यात आले. भाड्याचे टांगे ठेवणाऱ्या लोकानी शहरापासून दूर अंतरावर असलेल्या लष्करी ऑफिसात हजेरी दिली पाहिजे, अशी त्याच्यावर सक्ती करण्यात आली. सुशिक्षित व वकिलासारख्या धंदेवाल्या वर्गाच्या दृष्टीनेच आपले हुकूम काढण्यात आले होते, असें कर्नल जॉनसन यांनीं कबूल केले. या सुशिक्षित वर्गांतूनच राजकीय चळवळी निर्माण होतात असें त्याचें म्हणणे होतें. घराच्या भिंतीवर लावलेला जाहीरनामा (पोस्टर) कोणी तरी फाडून टाकील अशी लोकानीं तक्रार केली, त्या वेळी रात्रीं आठ नंतर बाहेर राहण्यास मालकाना पास मिळतील, नोकराना ते मिळणार नाहींत असें सांगण्यांत आलें. १६ ते २० वर्षांच्या विद्यार्थ्यांवर तर फारच कडक नजर होती. लाहोर हें एक मोठें विश्वविद्यालयीन नगर आहे शहरातील निरनिराळ्या कॉलेजांतील विद्यार्थ्यांनीं दिवसातून चार वेळा हजेरी दिली पाहिजे असा हुकूम

काटण्यांत आला होता. हजेरी नोंदविण्याचें एक ऑफिस तर कॉलेजपासून चार मैल अंतरावर होतें. एप्रिल महिन्याच्या कडकडीत उन्हाळ्यांत, घरांत देखील ज्या वेळीं १०८° उष्णतामान असतें, अशा वर्षातील कडक उन्हाळ्याच्या दिवसांत या मुलांना रोज १६ मैल चालून जावे लागत होतें. कांहीं मुलें तर या दिवसांत रस्त्यावरच मुर्छित होऊन पडत. हा हुकूम त्यांच्या बावतींत योग्यच आहे, या हुकूमामुळें ते उपद्व्याप करणार नाहींत असें कर्नल जॉनसन यांनीं उत्तर दिलें. एका कॉलेजच्या भिंतीवरील लष्करी कायद्याचा जाहीरनामा कोणी तरी फाडून टाकला. त्यामुळें प्रिन्सिपॉलसकट सगळे प्रोफेसर पकडण्यात आले व त्याना लष्करी पाहऱ्याखाली रस्त्यातून चालवीत किल्ल्याकडे नेण्यात आलें व तीन दिवस पर्यंत लष्करी पाहऱ्यात त्यांना ठेवलें. किल्ल्यावरील एक कोंपरा त्याना राहण्यास दिला होता आणि छपरावर निजण्यास सांगितले होतें. राजद्रोहाचा प्रसार करण्याकरितां लंगरांचा उपयोग केला जातो म्हणून ती बंद केली, असे कर्नल जॉनसन यानीं सागितल. याला कांहीं पुरावा नाही व ही गोष्ट त्यांना कोणी सांगितली हें माहीत नाहीं, असे ते उलट तपासणींत म्हणाले.

या बावतींत आपण जें धोरण स्वीकारलें त्यावर कर्नल जॉनसन स्वतः अगदीं खूष होते. लाहोरमधील युरोपियननीं त्यांना एक खाना दिला. त्या वेळीं "गरिबाचें त्राते" असें विशेषण त्याना देऊन त्याचा गौरव करण्यांत आला. हे गरीब लोक कोण? तर ६ आठवडे ज्यांनी अत्यंत हालअपेष्टा सोसल्या ते. गुजराणवाला येथे मार्शल लॉची अमलबजावणी करणारे कर्नल ओब्रायन, कासूरची जबाबदारी अंगावर घेतलेले कॅप्टन डोव्हेटन, शेखपुऱ्यावर अंमल गाजविणारे मुलकी अधिकारी मि. बॉसवर्थ स्मिथ, यानीं या दिवसांत आपल्या मतें विशेष कामगिरी करून नांव गाजविलें.

गुजराणवाला येथें स्वैरपणें बॉम्ब टाकण्यात आले व लोकांच्या गर्दीवर मशिनगनमधून दोनशे पंचावन्न गोळ्यांची फेर झाडण्यांत आली. या सगळ्या अत्याचाराचा परिणाम काय झाला? तर नऊ लोक मरण पावले व फक्त १६ लोकांना जखमा झाल्या, असें सांगण्यात येतें. आणि या गोष्टींवर लोकांनीं विश्वास ठेवावा, अशी अपेक्षा केली जाते.

ज्या ज्या ठिकाणीं गर्दी दिसली तेथें तेथें गोळीबार करण्यांत आला, असें कर्नल ओब्रायन यांनीं कमिटीपुढें साक्ष देतांना सांगितलें आहे. शहरांतून कांहीं

लोक बाहेर पडले, तेव्हां ते दंगेखोर आहेत असें समजून त्याच्यावर बॉंब टाकला. मेजर कार्बेरी याच्या साक्षीतलि खालील उताऱ्यावरून त्याची मनोरचना कशी होती, याची कल्पना येण्यासारखी आहे. "लोक पळून चालले होते म्हणून त्यांची गर्दी मोडण्याकरिता बॉम्ब टाकला. लोकांची पागापाग झाली व त्यांनीं खुद्द खेड्यावरच मशिनगनची फेरी झाडली. तेव्हा घराच्या भिंतींना कांहीं गोळ्या लागल्या असें त्यांना वाटलें. निरपराधी व अपराधी असा फरक त्यांना करितां आला नाहीं. ते दोनशें फूट उंचीवर होते व त्याना आपण काय करतों हें पूर्णपणे दिसत होतें. केवळ बॉम्ब टाकल्याने त्याचा उद्देश साध्य झाला नाहीं. केवळ नुकसान करणें एवढाच गोळीबार करण्याचा हेतु नव्हता. खेड्यातलि लोकांचें हित व्हावे या बुद्धीनेच असें करण्यात आले. कांही थोडे लोक ठार केले म्हणजे लोक पुन्हां एकत्र जमणार नाहींत, असें त्याना वाटलें. या कृत्याचा नैतिक परिणामही झाला. यानंतर ते शहरावर चाल करून गेले व लोक पळून जात असतांना त्यांच्यावर बॉम्ब टाकले."

अमृतसर व लाहोर याच्याप्रमाणेंच गुजराणवाला, कासूर व शेखपुरा या शहरांतून करफ्यू ऑर्डर काढण्यात आली होती. हिंदी लोकांना प्रवासाची बंदी करण्यात आली होती, जाहीर व खासगी रीत्या फटके मारण्यात येत होते व सर्रास अटक करण्यात आलेल्या लोकांची समरी कोर्टापुढे व स्पेशल ट्रायब्यूनल पुढें चौकशी करून त्याना शिक्षा देण्यात येत असत. ब्रिटिश अधिकारी पुढें आलेला दिसल्याबरोबर हिंदी इसमाने सलाम केला पाहिजे, गाडीतून खालीं उतरलें पाहिजे, घोड्यावरून बसून चालले असल्यास खालीं उतरलें पाहिजे, छत्री घेऊन जात असल्यास ती खाली केली पाहिजे, "आपल्यावर आता नवे धनी आले आहेत हे लोकांना पूर्णपणे समजलें पाहिजे" म्हणून हे हुकूम काढण्यात आले होते असें कर्नल ओब्रायन यानें सांगितलें. पुष्कळ लोकांना अटक करून त्याची चौकशी वगैरे न करतां त्यांना सहा आठवडेपर्यंत तुरुंगांत डांबून ठेवण्याच्या कामीं हेच जवाबदार होते. एके ठिकाणीं शहरांतील प्रमुख नागरिक एकाएकीं पकडून त्यांना मालाच्या उघड्या डब्यांत खेचून भरून बरेंच मैलपर्यंत भर उन्हांत नेण्यांत येऊन त्यांना लाहोर येथें पोंचविण्यांत आलें. त्यापैकीं काहीं लोक अर्धनग्नच होते. नैसर्गिक विधी करण्यासही त्यांस परवानगी देण्यात आली नाहीं. जवळजवळ ४४ तासपर्यंत त्याना या मालाच्या डब्यांतून

झाली, ही गोष्ट कबूल करण्यांत आली. “ मी कोणताही गुन्हा केलेला नाहीं, कोणताही पुन्हां करणार नाहीं मी चुकलों चुकलों चुकलों. I have committed no offence, I will not commit auy offence. I repent, I Repent, 1 repent.”

गुजराणवाला व गुजरात येथें मार्शल लॉची अंमलबजावणी करणारे मेजर स्मिथ यांना सर चिमणलाल सेटल्वाड ह्यांनीं प्रश्न विचारला असतां त्यांनीं असें उत्तर दिलें कीं, “ आपल्या भागांतील सर्व ठिकाणीं हा हुकूम लागू करण्यांत आला होता. इन्फंट क्लासांतील ५।६ वर्षें वयांच्या मुलांनाही परेड करणें भाग पडत होतें. फक्त संध्याकाळच्या परेडला लहान मुलांनीं येऊं नये, असें ठरविण्यांत आलें होतें.” कर्नल ओब्रायन आपल्या साक्षींत म्हणाले कीं, “ वजिराबादमध्यें एक मुलगा परेडींत चालत असतांना मुर्छित झाला. त्याबद्दल मी लष्करी अधिकाऱ्यांना लिहिलें. दोन वेळांच्या ऐवजीं ३ वेळां परेड काढण्यांत यावी असा हुकूम मिलिटरी अधिकाऱ्यांनीं दिला असल्याचें मला माहीत नाहीं, व तो तसा दिला असल्यास त्यांत कठोरपणा नाहीं. ”

पश्चाताप व्यक्त करण्याची कल्पना मि. बॉस्वर्थ स्मिथ यांचीच होती; सागला येथे पश्चाताप मंदीर ( House of repentance ) बांधण्याचें आपण सुचविलें. ही कल्पना चांगली होती असें त्यांनीं सांगितलें. परतु १०००० रुपये खर्चून ही इमारत बांधावी असा आपला उद्देश होता, ही गोष्ट त्यांनीं नाकारली. ह्या संबधाची विस्तृत माहिती काँग्रेस कमिटीच्या ह्या विषयावरील पुराव्याच्या रिपोर्टांत पुस्तकांत वाचावयास सांपडेल. ह्या प्रसंगांत सांपडलेल्या १५०० लोकाच्या कैफियती देण्यांत आल्या आहेत.

ह्या चळवळीला अनपेक्षितपणें एक निराळीच दिशा लागली हें पाहून गांधींच्या अंत.करणाला नि संशय मोठा धक्का बसला. आपण हिमालयाएवढी चूक केली, ही गोष्ट त्यांनीं कबूल केली. ह्या परिस्थितीचा फायदा दुष्ट लोकांनीं घेतला व सर्वत्र अव्यवस्था माजविली. खरे सत्याग्रही ह्या अनर्थाला मुळींच कारणीभूत झालेले नाहींत. पुन्हां पूर्वस्थिति निर्माण करण्याचें कामीं आपण शक्य ते प्रयत्न करूं, असें त्यांनीं जाहीर केलें. व सत्याग्रहाची चळवळ तहकूब केली. लॉर्ड चेम्सफर्ड यांनीं १४ एप्रिल रोजीं एक ठराव प्रसिद्ध करून व हातीं असलेल्या सगळ्या उपायाचा अवलंब करून हें संकट दूर करण्याचा प्रयत्न

केला पाहिजे असें जाहीर केलें. याच वेळीं तिसरें अफगाण युद्ध सुरू झाल्यामुळें पंजाबांतील परिस्थिति अधिकच विकट झाली. ४ मे रोजीं लष्कराची जमवाजमव करण्यांत आली, आणि मार्शल लॉची मुदत ११ जूनपर्यंत वाढविण्यांत आली. मार्शल लॉची मुदत वाढविल्याबद्दल निषेध म्हणून १९ जुलै रोजीं सर शंकर नायर यांनीं व्हाईसरॉयच्या एक्झीक्युटिव्ह कौन्सिलमधल्या आपल्या जागेचा राजिनामा दिला. ह्या सर्व काळांत पंजाबमध्यें वर्तमानपत्रावर कडक निर्बंध ठेवले होते व व्यापारव्यवहाराबद्दल नियंत्रण घालण्यात आलें होतें. मि. ॲंड्र्यूज यांना पंजाबांत पाऊल टाकण्यास मनाई करण्यात आली होती. त्याना एक दिवस पोलीस कस्टडींत ही ठेवण्यांत आलें. हद्दपारीचा हुकूम त्यांना देण्यात आला व अमृतसर येथें मेच्या आरंभी त्याना पकडण्यांत आलें. पंजाबांतील कैद्यांच्या वतीनें काम चालविण्याकरितां बॅ. ॲर्डले नॉर्टन हे पंजाबमध्यें जाणार होते, त्यांनाही मनाई करण्यांत आली. पजाबांत झालेल्या ह्या अन्यायांची चौकशी करावी व मार्शल लॉच्या दिवसांत वसविलेल्या ट्रिब्यूनलनें दिलेल्या शिक्षा कमी करण्यांत याव्या अशी सर्वत्र मागणी करण्यांत आली. पंजाबांतील एक प्रसिद्ध काँग्रेस पुढारी व धनिक गृहस्थ लाला हरकीसनलाल ह्यांना जन्मठेप काळेपाण्याची शिक्षा देण्यात आली व ४० लाखांची त्यांची मालमत्ता जप्त करण्यांत आली. १९१९ सप्टेंबरमध्यें व्हॉइसरॉयांनी पंजाब प्रकरणाची चौकशी करण्याकरितां हंटर कमिटीची नेमणूक जाहीर केली व १८ सप्टेंबर रोजीं इंडेमनिटी बिल (नुकसानभरपाईच्या माफीचें) पास केलें. पंडित मदन मोहन मालवीय ह्यांनीं ४॥ तास भाषण करून हें बिल तहकूब करण्याबद्दल जोराची विनंति केली. देशांत शांतता व व्यवस्था राखण्याकरितां अशा बिलाची जरूरी आहे, असें सांगण्यात आलें. " प्रामाणिक नागरिक आक्षेप घेईल अशी कोणतीही गोष्ट रौलेट बिलांत नाहीं." मिसेस बेझंट यांनीं आपलें मत जाहीर केलें. महात्मा गांधीच्याविरुद्ध त्यांचा झगडा चालूंच होता. लोकांचा जमाव ज्या वेळीं विटांचे तुकडे सोल्जर्सवर फेकूं लागतो त्या वेळीं त्याच्यावर 'बक् शॉट'च्या कांहीं फेरी झाडण्याचा हुकूम सोल्जर्सना देणें हें अधिक दयाळूपणाचें आहे, असें त्यांनीं १८ एप्रीलच्या 'न्यू इंडिया'त प्रसिद्ध केलें. विटांच्या तुकड्यासाठीं बंदुकीच्या गोळ्या (Bullets for brick-bats) ह्या म्हणीचा येथूनच उगम झाला. ह्या म्हणीशीं मिसेस बेझंट ह्यांचें नांव संलग्न असून त्यांच्या लोकप्रियतेला

इसम सरकारला पेचांत आणण्याचा कधींही विचार करणार नाही, म्हणूनच सत्याग्रहाची चळवळ सध्यापुरती बंद ठेवण्यानेंच देश, सरकार व अन्यायानें व निष्ठुरपणानें ज्यांना शिक्षा झाल्या आहेत ते पंजाबी पुढारी यांची अधिक सेवा होईल असें मला वाटतें. पेटलेली काडी गवताच्या गंजीवर मी फेकून दिली असा माझ्यावर आरोप ठेवण्यांत येत आहे. वेळप्रसंगीं मी जो प्रतिकार करतों हीच जर पेटलेली काडी असेल तर रौलेट कायदा व कायदेबुकांत त्याचा समावेश करण्याचा सरकारचा आग्रह हा सर्व हिंदुस्थानभर पेटवून फेकून दिलेल्या हजारों काडघासारखा आहे. कायदेभंग पूर्णपणें टाळावयाचा असल्यास हा कायदा मागे घेणें हाच त्यावर एकच एक उपाय आहे. ह्या बिलाबाबत सरकारनें जें समर्थन केलें त्यामुळें ह्या बाबतींत सरकारला विरोध करण्याची लोकांची वृत्ती बदललेली नाहीं." पत्रकाच्या शेवटीं शुद्ध स्वदेशीच्या प्रसाराबाबत सर्वांशीं सहकार्य करावें व हिंदु-मुसलमानांतील ऐक्य वृद्धिंगत करण्याची चळवळ करावी अशी आपल्या सत्याग्रही मित्राना त्यानीं विनंति केली आहे.

लॉर्ड सेलबोर्न यांच्या अध्यक्षतेखालीं जॉइंट पार्लमेंटरी कमीटीचें काम या वेळीं इंग्लंडमध्यें सुरू झालें होते. आपलें म्हणणें या कमिटीपुढे मांडण्याकरिता इतर अनेक शिष्टमंडळें इंग्लंडला गेलीं होतीं तरी मुख्यतः कॉंग्रेसच्या शिष्टमंडळाने इंग्लंडमध्यें काय कामागिरी केली हेंच आम्हाला पहावयाचें आहे. कॉंग्रेसच्या शिष्टमंडळांत श्री. विठ्ठलभाई पटेल व मि. व्ही. पी. माधवराव हे कर्तृत्ववान प्रतिनिधी होते. त्याचप्रमाणें लो. टिळक, विपिनचंद्र पाल, जी.एस.खापर्डे, डॉ. पी. जे. मेथा, रंगास्वामी अय्यंगार, न. चिं. केळकर, सय्यद हसन इमाम, डॉ. साठे, मि. बी. जी. हॉर्निमन व शेनशाई वगैरेनीं मिळून कॉंग्रेस प्रतिनिधी मंडळ बनलें होतें. ब्रिटिश जनतेपुढे हिंदुस्थानच्या हक्कांची मांडणी करून द्यावी हाच हेतु या शिष्टमंडळानें आपल्यापुढें ठेवला होता. म्हैसूरचे माजी दिवाण सर व्ही. पी. माधवराव यांनीं आपल्या रुबाबानें व स्वतंत्र बाण्यामुळें कॉंग्रेससंबंधीं ब्रि. जनतेच्या मनांत आदर उत्पन्न केला. व लेबर पक्षांतर्फे कॉंग्रेसच्या इंग्लंडमधील चळवळीकडे लक्ष पुरविणारें मि. बेनस्पूर यांनींही त्यांच्यासंबंधानें स्तुतिपर उद्गार काढले. नेमस्तांचें डेप्युटेशन, जस्टिस पार्टीचें डेप्युटेशन, व दोन होमरूल डेप्युटेशनें अशीं एकंदर चार डेप्युटेशनें या वेळीं इंग्लंडला गेलीं होतीं. दिल्लीचा ठराव मानणारे व मुंबईच्या जादा कॉंग्रेसचा ठराव मानणारे असें अल्प-

मतवाले व बहुमतवाले दोन पक्ष ऑल इंडिया होमरूल लीगमध्यें निर्माण झाले होतें. मि. सी. पी. रामस्वामी अय्यर हे अल्पमतवाल्या पक्षाचे प्रतिनिधी होते. मिसेस बेझंट या नॅशनल होमरूल लीगच्या प्रतिनिधी म्हणून इंग्लंडला गेल्या होत्या. महाराष्ट्र होमरूल लीगच्या डेप्युटेशनला कोलंबोहून परत लावण्यांत आलें होतें. पण नतर लो. टिळक यांना चिरोल खटल्याबाबत इंग्लंडला जाण्या-करितां पासपोर्ट देण्यांत आला. दिल्ली ठरावाच्या पुरस्कर्त्याशीं ब्रि. कॉंग्रेस कमिटीचें जमलें नाहीं. मुंबईच्या तडजोडीच्या ठरावाकडेच ब्रिटिश कॉंग्रेस कमिटीचा अधिक कल होता. श्री. विठ्ठलभाई पटेल व ब्रि. कॉं. कमिटी यांच्यांत या वेळीं खरोखरीच रस्सीखेंच चालूं होती. इंग्लंडमध्यें आलेल्या चारही डेप्युटेशनांनीं आपला एक प्रातिनिधि निवडावा व या प्रातिनिधींनीं ब्रिटिश कॉंग्रेस कमिटीच्या सभेंत प्रेक्षक म्हणून हजर राहून आपलें पुढचें धोरण ठरवावें, असें या कमि-टीचें म्हणणें होतें. कॉंग्रेसच्या शिष्टमंडळांशिवाय दुसऱ्या कोणत्याही शिष्ट-मंडळाला ब्रि. कॉंग्रेस कमिटीला मान्यता देता येत नाहीं, असें श्री. विठ्ठलभाई यांनीं या कमिटीला स्पष्टपणें कळविलें आणि कमिटीचें जे सभासद कॉंग्रेसचें मॅंडेट मानावयास तयार नाहींत त्यानीं या कमिटीशीं असलेला आपला संबंध तोडावा असें सुचविलें. या कमिटीनें आपली घटना तयार करावी आणि ती कॉंग्रेसकडे मंजुरीकरितां पाठवावी असेंही सुचविण्यात आलें. कमिटीनेंही ही सूचना मान्य केली. हिंदुस्थानचे प्रातिनिधि इंग्लंडमध्यें आल्याची संधी घेण्यांत येऊन इंग्लंडच्या निरानिराळ्या भागांत कॉंग्रेसच्या प्रचाराकरितां सभा भरविण्यांत आल्या व लेबर पार्टीतर्फे या शिष्टमंडळाला हौस ऑफ कॉमन्समध्यें खाना देण्यांत येऊन हिंदी राष्ट्रीय सभेला संदेश पाठविण्यांत आला. इंडिपेंडंट लेबर पार्टीनें आपल्या ग्लासगो येथील परिषदेंत एक ठराव करून आयर्लंड व ईजिप्त यांच्याबरोबरच हिंदुस्थानच्या स्वयंनिर्णयाच्या हक्काला पाठिंबा दिला.

श्री. विठ्ठलभाई पटेल व कॉंग्रेसच्या शिष्टमंडळांतील प्रातिनिधी याना एका बाजूला ब्रि. कॉं. कमिटी व दुसऱ्या बाजूला दुर्दमनीय मिसेस बेझंट यांच्याशीं असा दुहेरी लढा लढावयाचा होता. हीं डेप्युटेशनें इंग्लंडमध्यें असतां कॉंग्रेसचें डेप्युटेशन व मिसेस बेझंट यांच्यांत जोराचा वाद सुरू होता. परस्परावर दोषारोप, सत्यापलापाचे आरोप देखील करण्यापर्यंत या वादाची मजल गेली होती. लेबर पार्टीनें आपलें म्हणणें कॉमन्ससभेपुढें मांडावें, असें कॉंग्रेस डेप्युटेशन काय किंवा मिसेस बेझंट काय

दोघांनाही वाटत होतें. जरूर त्या दुरुस्त्या केल्यास मॉंटेग्यू सुधारणा मान्य करण्यास मिसेस बेझंट तयार होत्या. कॉंग्रेसचें शिष्टमंडळ दिल्ली ठरावाच्या बाजूचे होतें. स्वयंनिर्णय व पूर्ण जबाबदारीचें स्वराज्य ह्यांवर कॉंग्रेसच्या शिष्टमंडळाचा मुख्य भर होता. स्थानिक कायदे–कौन्सिलानें स्त्रियांच्या मतदारीच्या हक्कासंबंधानें निर्णय करावा, असें मि. मॉटेग्यू यांचें म्हणणें होतें. परंतु इंडिया ॲक्टमध्येंच स्त्रियांना मतदानाचा हक्क दिल्याचा उल्लेख करावा, असें कॉंग्रेस डेप्युटेशनचें म्हणणें होतें. नंतर २५ आक्टोबर १९१९ रोजीं अल्बर्ट हॉलमध्यें एक सभा झाली. ह्या सभेंत दोन्ही पक्षांतील मतभेद उघडकीस आल्यामुळें सभेचे अध्यक्ष मि. लॅन्सबरी ह्यांची मोठी पंचाईत झाली. ही सभा लंडनमध्यें मिसेस बेझंट ह्यांनीं प्रस्थापिलेल्या होमरूल लीगच्या विद्यमानें भरली होती. ह्या सभेंत शेवटीं जो ठराव पास झाला, तो फारसा आक्षेपार्ह होता असें नाहीं. हा ठराव पुढीलप्रमाणें होता "ब्रिटिश कॉमनवेल्थमधील लोकांची ही जाहीर सभा ब्रिटिश साम्राज्यांतील सर्व राष्ट्रांना स्वराज्याचे हक्क द्यावे, असें आग्रहानें सांगत आहे. आणि ती पुढें असेंहि जाहीर करते कीं, हिंदुस्थान हा पूर्ण स्वराज्याचे हक्कास पूर्णपणें लायक असून शक्य तितक्या लवकर त्याला तें बहाल करण्यांत यावें." मि. लॅन्सबरी हे ह्या सभेचे अध्यक्ष होते व त्यांच्या मध्यस्तीमुळेंच ह्या ठरावाला वरील स्वरूप प्राप्त झालें होतें. मुळचा ठराव असा नव्हता. २० ऑगस्ट १९१७ च्या जाहीरनाम्याची पूर्तता करण्याचे दृष्टीनें पहिलें पाऊल म्हणून मि. मॉंटेग्यू ह्यांच्या बिलाला पाठिंबा द्यावा असें ह्या मूळ ठरावात म्हटलें होतें. मिसेस बेझंट ह्यांनीं आपल्या भाषणात मॉंटेग्यूच्या बिलाला निसंदिग्ध शब्दांत पाठिंबा दिला. श्री. विठ्ठलभाई पटेल यांनीं अर्थातच त्यांना विरोध केला. शेवटीं याच बाबतींत एकमेकावर दोषारोप करताना श्री. जी. एस्. खापर्डे यांनीं आपल्या मर्मभेदक विनोदी भाषणांत मिसेस बेझंटबाईंना पूतनामावशीची उपमा दिली. बेझंटबाईंनीं ह्यावर जोराचा आक्षेप घेतला. परंतु श्री. विठ्ठलभाईंनी आपल्या भाषणात या उपमेचें पूर्णपणें समर्थनच केलें. इतक्या कालानंतर व मिसेस बेझंट यांची केलेली राष्ट्रसेवा लक्षात घेतां हें वर्णन अगदीं अनुचित होतें ह्यांत शंका नाहीं. मिसेस बेझंट यांनीं कॉंग्रेसला किंवा १९१९ सालीं कॉंग्रेसनें केलेल्या लंडनमधील चळवळीला कितीही उघड विरोध केला असला तरी त्यांच्या

बावतींत अशा प्रकारचें वर्णन करणें ही दुर्दैवाची गोष्ट होय. यामुळेंच वेझंट-बाईना आपल्या चळवळीविषयीं चिंता उत्पन्न होऊन त्यांनीं मि. मॉटेग्यू यांना तत्वत व शद्वशः पाठिंबा देण्याचें ठरविलें असावें, अशी शंका आल्याखेरीज राहणार नाहीं. गांधीजी मिसेस वेझंट यांना नेहमींच आदरानें वागवीत असत व त्या आल्या असतां ते उठून त्यांचा सत्कार करीत असत. महात्मा गाधी व कॉंग्रेस पुढारी त्यांनीं यांच्याबद्दल जरी इतका आदर दाखविला तरी मिसेस वेझंट ह्यानीं त्याना तुच्छतेनेंच वागविलें. कांहीं झालें तरी श्री. खापर्डे ह्यानीं केलेलें त्यांचें वर्णन सदाभिरुचीला धरून तर नव्हतेंच, पण त्यांत तथ्याशही नव्हता असें या ठिकाणीं नमूद करावेसें वाटतें.

## पंजाब चौकशी

हिंदुस्थानांतील घडामोडीकडे आतां आपण लक्ष देऊं. ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटीच्या ठरावाप्रमाणें स्वामी श्रद्धानंद, पंडित मोतिलाल नेहरू, पडित मालवीय हे जूनच्या शेवटल्या आठवड्यात पंजाब प्रकरणाची चौकशी करण्या-करिता तेथें गेले. रे. अँड्रयूज हेही थोडयाच दिवसानीं तेथें गेले. दोघेही पडित परत आले. नंतर मोतीलालजी पुन्हा पंजाबांत गेले. पं. जवाहरलाल व पुरुषोत्तमदास टंडन हे मि. अॅंड्रयूज ह्याना येऊन मिळाले. ऑक्टोबर १७ रोजीं महात्मा गांधीवरील बंदीचा हुकूम काढून घेतल्यावरोबर ह्या मंडळींत येऊन ते सामील झाले. पंजाबमधील लोक भयानें संत्रस्त होऊन गेले होते. परंतु महात्मा गांधीं तेथें गेल्यावर त्याना हायसें वाटूं लागलें. लाहोर व अमृतसर येथें गांधींचें आगमन ह्मणजे एक प्रकारचा विजयच होय असें लोकांना वाटलें. ह्याच वेळीं सरकारी चौकशी कमिटी नेमल्याचें जाहीर झालें. कॉंग्रेसनें ह्या बाबतींत जी मागणी केली होती, त्या दृष्टीनें सरकारी चौकशीचें धोरण अपुर होतें. असें असलें तरी सरकारी कमिटीशीं सहकार्य करणें हितावह आहे, असें ठरविण्यात आलें. कॉंग्रेसतर्फे हंटर कमिशनपुढें साक्ष देण्याकारितां मि. सी. आर. दास कलकत्त्याहून पंजाबमध्यें आले होते, परंतु अगदीं अनपेक्षित अडचणी उत्पन्न झाल्यामुळें कॉंग्रेस कमिटीला या कमिटीशीं सहकार्य करण्याचें नाखुषीनें नाकारावें लागलें. एका अर्जामध्यें पंजाबमधील परिस्थितीचा इतिहास नमूद करण्यांत आला होता. लष्करी कायद्यांखालीं शिक्षा झालेल्या कांहीं कैद्यांना पोलिस बंदोबस्ताखालीं कां होईना कमिटीच्या चौकशीच्या कामीं मदत करण्यास

परवानगी द्यावी, असे कॉंग्रेस कमिटीचें ह्मणणें होतें. पण ही परवानगी नाकारण्यांत आल्यामुळें कॉंग्रेस चौकशी कमिटीनें हिंदुस्थान सरकारकडे व स्टेट सेक्रेटरीकडे पंजाब सरकारविरुद्ध अपील केलें; पण ह्या दोघानींही या बाबतीत विचार करण्याचें नाकारलें. कॉंग्रेस कमेटीनें हा जो निर्णय केला, त्याला जेलमधील पुढाऱ्यानींही पुष्टी दिली. कॉंग्रेस कमेटीने स्वीकारलेलें हें धोरण शहाणपणाचें होतें ही गोष्टही पुढे अनुभवाने सिद्ध झाली. हटर कमिटीनें अमूक एक गोष्टींचाच विचार करावा, असें जे नियंत्रण घालण्यात आलें होतें त्यामुळें १९१९ एप्रीलमध्यें ज्या गोष्टी घडून आल्या त्याची चौकशी ही कमिटी करूं शकत नव्हती. म्हणून महात्मा गांधी, मोतिलाल नेहरु, दास, फझलूल हक, अब्बास तय्यबजी, आणि मि. के. सतानम् ( सेक्रेटरी ) ह्यांच्या कमिटीनें वेगळी चौकशी करावी असें कॉंग्रेसनें ठरविलें. परंतु पुढें लौकरच पं. मोतीलाल ह्यांना अमृतसर कॉंग्रेसचे अध्यक्ष निवडल्यामुळें त्यांनीं ह्या कमिटीवरील आपल्या जागेचा राजीनामा दिला व मि. जयकर ह्यांची त्या जागीं नेमणूक झाली. लंडनमधील सॉलिसिटर मि. नेव्हिल ह्याच्याकडे प्रिव्ही कौन्सिलकडे अपील करण्याचे काम असून तेही ह्या कमेटीबरोबर काम करीत होते. जालियनवाला बाग विकत घ्यावी व त्या ठिकाणीं एक स्मारक उभे करावें असाही एक ठराव करण्यात आला, आणि पं. मालवीय याच्या अध्यक्षतेखालीं एक कमिटी नेमण्यांत आली. ही बाग आतां राष्ट्रानें आपल्या ताब्यात घेतली आहे. ह्या बिनसरकारी कमिटीचा रिपोर्ट अमृतसर कॉंग्रेसपर्यंत तयार झाला नाही. हा रिपोर्ट तयार झाल्यावर त्याचा सर्वांगीण विचार करण्याकरिता जादा अधिवेशन भरवावें असाही विचार चालला होता. परंतु जनरल डायर ह्यानीं हटर कमिशनपुढें जी कबुली दिली आहे त्यावरुन अर्वाचीन कालात अशा प्रकारचें निष्ठुर व भ्याड कृत्य झाल्याचें उदाहरण दाखविता यावयाचें नाहीं असें कॉंग्रेस कमिटीनें जाहीर केलें. पंजाबमध्यें एप्रिल व मे महिन्यांत ज्या गोष्टी घडून आल्या त्यावरुन लोकांनीं १० एप्रिल रोजीं केलेल्या भयंकर कृत्याबद्दल योग्य शिक्षा म्हणून अमृतसर शहर जमिनदोस्त करण्याचा जनरल डायर यांचा उद्देश होता, अशी जी बातमी उठली होती तिचा अर्थ झटकन समजून येतो. सरकारनें हंटर कमिटी नेमली व त्यावर कॉंग्रेसचा प्रतिनिधी घेतला नाहीं. रिफॉर्म बिल पुढें आलें, पण बड्याबड्या अधिकाऱ्यांच्या दृष्टीनें त्यांत कांहींच नव्हतें. यामुळें

एकंदरींत १९१९ च्या उत्तरार्धातील हिंदुस्थानची स्थिति केवळ औदासिन्य-युक्तच नव्हे तर अरिष्टसूचकही होती. सरकारनें हंटर कमिशनची नेमणूक केली व सुधारणा कायदा पार्लमेंटपुढें चर्चेसाठीं मांडला, अशा वेळीं ब्रिटिश कॉंग्रेस कमिटीनें व इंग्लंडला गेलेल्या कॉंग्रेसच्या डेप्युटेशनमधील प्रतिनिधींनीं एकमतानें हिंदुस्थानच्या त्या वेळच्या परिस्थितीसंबंधानें काढलेला जाहीरनामा पुढें दिला आहे.

## हिंदुस्थानच्या परिस्थितीसंबंधाचा जाहिरनामा

### गंभीर परिस्थिति

ब्रिटिश जनतेला हिंदुस्थानसंबंधानें स्पष्ट कल्पना येणें जरूर आहे. तेथील सरकारच्या मूर्खपणामुळें हिंदुस्थानच्या वातावरणांत अनिवार्य ढग निर्माण झाले असून तेथें केव्हां वादळ उत्पन्न होईल व त्याचे किती भयंकर परिणाम होतील हें सांगतां यावयाचें नाही.

### अभिवचनें व त्यांची पूर्तता

महायुद्धामध्यें सामील झालेल्या दोस्त राष्ट्रांचे आभार मानण्याचा ठराव पार्लमेंटपुढें मांडताना मि. लॉइड जॉर्ज म्हणाले, " हिंदुस्थानासंबंधीं बोलतांना ही गोष्ट कबूल केली पाहिजे कीं, आम्हांला विजय मिळवून देण्याच्या कामीं हिंदुस्थाननें विशेषतः पूर्वेकडील रणमैदानावर बहुमोल मदत केली आहे. हिंदुस्थानासंबंधानें आम्ही विचार केला पाहिजे असें हक्कानें सांगता येईल अशी परिस्थिति निर्माण केली आहे."

" ह्या नवीन हक्कासंबंधानें"च विचार करूं लागलें म्हणजे हिंदुस्थाननें महायुद्धाच्या वेळीं जी वैभवशाली कामगिरी केली, तिचें बक्षीस म्हणून हिंदुस्थान-सरकारनें दडपशाहीचे कायदे केले. मुद्रण, भाषण व आचार स्वातंत्र्यावर गदा आणली. त्यामुळें जनक्षोभाचें रूपांतर दंग्यांत झालें व नंतर सरकारनें मार्शल लॉ जाहीर केला. लोकांच्या विश्वासातले पुढारी हद्दपार केले. मालमत्ता जप्त करून वर्तमानपत्रें बंद केलीं. प्रमुख देशभक्त पुढाऱ्याना काल्पनिक कारणावरून तुरुंगांत टाकलें. लष्करी कोर्टापुढें आरोपींना आपला वकील देण्याचीही संधि दिली नाहीं. ह्या सगळ्या कृत्यावर सफेती चढविण्याकरितां एक चौकशी कमिशन नेमण्यांत आलें. पण त्यावर कॉंग्रेस व मुस्लीम लीग ह्यांचे प्रतिनिधी घेतले नाहींत. हिंदुस्थान सरकारनें इंडेम्निटी बिल (नुकसानभरपाईचें बिल) पास केलें व

जे अधिकारी गुन्हेगार ठरतील त्यांना योग्य शिक्षा देण्याच्या बाबतींत अड-थळा आणला.

ब्रिटिश कॉंग्रेस कमेटीवर हिंदुस्थानच्या परिस्थितीचा इतका जबरदस्त परिणाम झाला कीं, तिला ह्या बाबतींत एक जाहीरनामा प्रसिद्ध करणें जरूर वाटलें. त्यावरून हिंदुस्थानांतील जनतेची मनस्थिति कशी झाली असेल, ह्याची कल्पनाच केलेली बरी. सुधारणा कायद्यांच्या अपुरेपणामुळें लोकांच्या या संतापांत अधिकच भर पडली होती. मॉंडफर्ड योजनेंत "ग्रँड कमिटया तेवढ्या नव्हत्या. परंतु द्विदल राज्यपद्धति, कायदे मंडळांत सरकारनियुक्त सभासद, कौंसिल ऑफ स्टेट, सर्टिफिकेशनाचा अधिकार, व्हेटो, ऑर्डिनन्सेस काढण्याचा अधिकार, वगैरे सर्व प्रतिगामी गोष्टी या बिलांत होत्या. या सर्व गोष्टींबद्दल लोकानीं जरी वारंवार निषेध केला होता तरी १९३५ च्या सुधारणा कायद्यातही याच गोष्टी अधिक तीव्र स्वरूपांत समाविष्ट केल्या आहेत. अमृतसर कॉंग्रेसला अशा घटनेस तोंड द्यावयाचें होतें. आपसांतील फुटीलाही या वेळीं ऊत आला होता. परकीय राज्यसत्तेखाली ही गोष्ट अपरिहार्यच असते. होमरूल लीगमध्येंही फुटीचीं लक्षणें अगोदरच दृग्गोचर झालीं होतीं. अमृतसर येथें ही फूट पूर्णत्त्वानें दिसून आली. लोकमान्य या वेळीं हिंदुस्थानास परत आले होते. चिरोल विरुद्ध केलेल्या खट-ल्यांत त्यांना अपयश आलें होतें. "जे हक्क देण्यात आले आहेत त्यांचा आम्ही स्वीकार करूं व बाकीच्या हक्कांकरिता झगडत राहू" अशीं आपली मतें लो. टिळकानीं इग्लंडमध्यें असतानांच प्रकट केलीं होती. हिंदुस्थानांत आल्यानंतरही लगेच त्यानीं जीं मतें प्रकट केलीं तींसुद्धा सुधारणा बिलाविरुद्ध आहेत, असें दिसलें नाहीं. सुधारणांची योजना अगदीं अपुरी आहे याबद्दल त्यांची खात्री झालेली होती; तथापि हें बिल पास झाल्याबरोबर हिंदी लोकाच्या वतीनें त्यानीं बादशहाना व प्रधानमंडळाला अभिनंदनपर तार पाठविली. या वेळीं अमृतसरला ते चालले होते. वाटेंतील गंगापूर स्टेशनावरून त्यांनीं हीं तार पाठविली व सुधारणांच्या अमलाबाबत प्रतियोगी सहकारितेचा हात पुढें केला. मि. बॅपटि-स्टानीं ही शब्दयोजना केली होती व श्री. केळकर यांनीं या तारेचा मसूदा तयार केला होता. कॉंग्रेसच्या मंडळींना ही अगदीं अनपेक्षित अशी गोष्ट वाटली. आणि अमृतसर कौंग्रेस म्हणजे या निरनिराळ्या परस्परविरोधी पक्षातील झगडयांची रणभूमीच बनली.

अमृतसर कॉंग्रेसमध्यें श्री. चित्तरंजन दास यांचीं मतें कसोटीला लागलीं. कलकत्ता कांग्रेसचें अध्यक्षस्थान मिसेस बेझंट यांना द्यावें, या गोष्टींचा पुरस्कार केल्यामुळें १९१७ सालीं कॉंग्रेसच्या राजकारणांत ते एकाएकी चमकू लागले होते. मुंबईच्या जादा कॉंग्रेसमधील तडजोडीच्या ठरावाच्या चिंधड्या उड-विण्याच्या कामीं दिल्ली कॉंग्रेसमध्यें त्यांनीं पुढाकार घेतला होता. मिसेस बेझंट येऊन मिळाल्यामुळें प्रबळ झालेला जुन्या वक्त्यांचा एक पक्ष व अनावर झालेला नव्या राष्ट्रीयांचा दुसरा पक्ष याप्रमाणे या दोन्ही पक्षांच्या बलाबलाची परीक्षा अमृतसर येथें लागावयाची होती. श्री चित्तरंजन दास हे आपले ठराव जय्यत तयार करून कॉंग्रेसला आले होते, आणि स्वागत मंडळातर्फे ठराव मांडले जाण्यापूर्वीच आपले ठराव मांडण्याचा डाव त्यांनीं लढविला होता. अमृतसर कॉंग्रेसपुढें सुधारणाविषयक आलेला ठराव चित्तरंजन दास यांनीं तयार केला होता व विषयनियामक कमिटीने त्याला संमति दिली होती. कॉंग्रेसच्या खुल्या अधिवेशनांत या ठरावांत महत्त्वाचा फरक करण्यांत आला व त्यांत पुढील प्यारा घालण्यांत आला—" पूर्ण जबाबदारीचें स्वराज्य देण्यांत येई-पर्यंत त्याची लवकर प्रस्थापना होईल अशा धोरणानें या सुधारणा राबवाव्या "

सुधारणांचा अमल करण्याच्या बाबतीत जें सहकार्य करावयाचें तें प्रतियोगी स्वरूपाचें असेल, म्हणजे सरकार ज्या प्रमाणात लोकांशीं सहकार्य करील तित-क्याच प्रमाणात तें असेल असाच अर्थ वरील दुरुस्तींत सुचविण्यांत आला होता. या दुधारीं सहकार्याचा उल्लेख २० आगष्टच्या जाहीरनाम्यांतही मि. मांटेग्यू यानी केला होता. श्री. दास यांनीं हा उल्लेख अजीबात वगळला होता. गांधींजीनीं या ठरावाला निराळाच प्यारा जोडून त्यात या तत्त्वाचा मोठ्या कुशलतेनें उल्लेख केला होता.

अमृतसर कॉंग्रेसमध्यें ( १९१९ ) राष्ट्रीय स्वाभिमानाचा विजय झाला. हिंदी राजकीय पुढाऱ्यांत या वेळीं तीव्र मतभेद दिसून आले. सरकार लोकांशीं ज्या प्रमाणात सहकार्य करील त्या प्रमाणातच सरकारशीं सहकार्य करावयाचें या तत्वानुसार सुधारणा राबविण्यांत याव्या असे पं. मालवीय व म. गांधी यांचें मत होतें. सुधारणांचा त्याग करावा असें श्री. दास यांचें म्हणणें होतें. श्री. दास यांनीं कॉंग्रेसपुढें मांडलेला ठराव पुढीलप्रमाणें होता.

१ पूर्ण जबाबदारीच्या स्वराज्यास हिंदुस्थान लायक आहे या साल गुदस्तच्या

जाहीरनाम्यास ही काँग्रेस पुष्टि देत आहे आणि याच्या उलट करण्यांत येणाऱ्या विधानांचा व मतांचा ती निषेध करीत आहे.

२ घटनात्मक सुधारणांच्या बाबतींत दिल्ली काँग्रेसनें जो ठराव केला त्याचाच पुरस्कार करीत असून सुधारणा कायदा अपुरा, असमाधानकारक व निराशाजनक आहे असें या काँग्रेसचें मत आहे.

३ स्वयंनिर्णयाच्या तत्वानुसार हिंदुस्थानांत पूर्ण जबाबदारीचें स्वराज्य स्थापण्याच्या बाबतीत पार्लमेंटने लवकर उपाययोजना करावी अशी आग्रहाची मागणी ही कॉंग्रेस पार्लमेंटला करीत आहे.

'निराशाजनक' हा शब्द गाळावा अशी म. गांधींनीं उपसूचना आणली व ठरावास पुढील चौथा प्यारा त्यानीं जोडला होता.

४ "माझ्या प्रजेने व अधिकाऱ्यांनीं सामान्य हेतूच्या सिद्ध्यर्थ आपसांत सहकार्य करण्याचें ठरवावें व या सामायिक निश्चयाने नव्या युगाला प्रारंभ होवो." ही बादशाही जाहीरनाम्यांतील भावना सफल होईल असा प्रयत्न सुधारणा कायदा लागू केल्यानतर राजनिष्ठायुक्त बुद्धीनें करण्यांत यावा अशी या काँग्रेसची विनंति आहे. आणि पूर्ण जबाबदारीचें स्वराज्य हिंदुस्थानात लौकर प्रस्थापित होईल या दृष्टीनें हिंदुस्थानांतील लोक व अधिकारी सहकार्य करतील असा या कॉंग्रेसला विश्वास वाटत आहे.

"या सुधारणाच्या बाबरींत मि. मॉटेग्यू यांनीं जे परिश्रम घेतले त्याबद्दल ही काँग्रेस त्यांचे मनापासून आभार मानीत आहे."

याप्रमाणें श्री. चित्तरंजन दास याच्या मूळ ठरावाला म. गांधीची उपसूचना जोडण्यात आली व श्री. चित्तरंजनदास यानी या गोष्टीला संमति दिली. बेझंटबाईचा वैकल्पिक ठराव नामंजूर झाला.

उभय पक्षाच्या तडजोडीनें झालेला हा ठराव निःसंदिग्ध स्वरूपाचा नव्हता. जरूर तर अडथळा व शक्य तेथें सहकार्य हा राष्ट्राचा हक्क राखून ठेवण्यात आला आहे, असें या ठरावावर बोलताना श्री. दास यानीं सागितलें. या ठरावामुळें गाधीजीचा विजय झाला नाहीं किंवा श्री. दास याचाही विजय झाला नाहीं. राष्ट्रीय सभेंतील पुढाऱ्यांचें एकमेकाशीं जमत नाहीं ही गोष्ट या वेळीं स्पष्ट झाली होती; आणि असें होणेंच अगदीं अपेक्षित होतें. पण गंमत अशी होती कीं, सुधारणांचा त्याग करावा किंवा त्याना अडथळा करावा असें

श्री. दास यांचें मत होतें तरी ते असहकारितेला तयार होते काय? ही परिस्थिती अशीच विपरीत होती. गांधीजी त्या वेळीं सहकार्याचे प्रणेते होते ही गोष्ट खरी आहे. अमृतसर येथें पास झालेल्या ठरावाचें पुढें काहींही झालें असलें तरी महात्मा गांधीं यांचा या कॉंग्रेसमध्यें पूर्ण विजय झाला यांत तिळ-मात्र शंका नाहीं. आपल्या व्यक्तिप्रभावानें म. गांधींनीं कॉंग्रेसवर वजन पाडलें होतें. त्यांची विचारसरणी, त्यांचीं तत्वें, त्यांचें तत्वज्ञान, त्यांचे नीतिसिद्धांत, सत्य व अहिंसा यांचा पुरस्कार करणारा त्यांचा संप्रदाय, या सर्वांनीं अमृतसर कॉंग्रेसवर पूर्ण पगडा बसविला होता. कॉंग्रेसचें प्रत्यक्ष काम चालू असतांना हेंच दिसून आलें. अमृतसर कॉंग्रेसमध्ये ५० ठराव पास झाले. लॉर्ड चेल्मसफर्ड यांना परत बोलवावें या विषयापासून तो सारावसूलीच्या पद्धतीची चौकशी करावी, कामगाराची राहणी व तिसऱ्या वर्गाच्या उतारूंचे हाल येथपर्यंत सर्व विषयाचा या ठरावांत विचार केला होता. या कॉंग्रेसला एकंदर ३६००० लोक हजर होते. त्यापैकीं ६००० कॉंग्रेसचे प्रतिनिधी व १२०० कुळांचे प्रतिनिधी होते. बाकीचे प्रेक्षक होते. कॉंग्रेसचें प्रेक्षक वातावरण जणू काय विद्युच्छक्तीनेंच भारलें गेलें होतें. पंजाब व त्यात झालेले अत्याचार यांकडेच सर्वांचें अतिशय लक्ष लागलें होतें. पंजाब व गुजराथ येथील जमावानें जे अत्याचार केले त्याचा निषेध करावा अशी महात्माजींची इच्छा होती. विषय नियामक मंडळानें हा ठराव फेटाळून लावला त्यामुळें गांधींची निराशा झाली होती. रात्र फार झाली होती. आपली विचारसरणी कॉंग्रेसला पटत नसेल तर कॉंग्रेसमध्यें राहणें आपल्याला अशक्य होईल असें त्यांनीं अत्यंत नम्रपणानें व आदरानें सांगितलें. दुसरे दिवशीं सकाळीं प्रतिनिधींपैकीं पुष्कळ लोक कुरकुर व धुसफुस करीत असतां पाचवा ठराव पास झाला. हा ठराव पुढील आशयाचा [illegible] प्रस्फोट

"भयकर रीतीनें चिडविण्यात [illegible] जन-
झाला याची कॉंग्रेस [illegible]
समुदायाकडून गे [illegible]
जीविताची व म [illegible]
वाटत असून ती [illegible]

या ठरावावरी [illegible]
योजना व [illegible]

दिग्दर्शन केलें. "या ठरावापेक्षां दुसरा कोणताही महत्त्वाचा ठराव या कॉंग्रेस-पुढें नाहीं. या ठरावाच्या बुडाशीं असलेल्या सत्याला अंतःकरणापासून मान्यता देणें व त्याप्रमाणें वर्तन करणें यांतच आपल्या भावी यशाची किल्ली आहे. यांच्या मुळाशीं असलेल्या शाश्वत सत्याची आपल्याला जाणीव होणार नाहीं, तर खात्रीनें आपल्याला अपयश आल्यावांचून राहणार नाही. आपल्या हातून अत्याचार झाला नसता तर बरें झालें असतें, पण या बाबतींत माझ्यापाशीं भरपूर पुरावा आहे. विरमगाव, अहमदाबाद, मुंबई या ठिकाणीं हेतुपूर्वक अत्याचार करण्यात आल्याचा भरभक्कम प्रत्यक्ष पुरावा मी आपल्यापुढें मांडू शकतों. डॉ. किश्लू व डॉ. सत्यपाल यांना सरकारनें पकडलें व या उभयतांच्या बोलावण्यावरून, शांतता रक्षणाकरितां मी पंजाबांत जात असतां मलाही पकडलें व लोकांना चिडविलें, ही गोष्ट मला कबूल आहे. सरकारनें असें केलें नसतें, तर ही परि-स्थिति निर्माणच झाली नसती. पण सरकार त्या वेळीं वेडेपिसे झालें व लोकही त्याबरोबर वेडेपिसे बनले. वेडेपणाला वेडेपणानें उत्तर देऊं नका तर वेडे-पणाला शहाणपणानें उत्तर द्या. सर्व परिस्थिति तुमच्या आटोक्यांत येईल."

अंतःकरणाला जागृत करणारा निनाद या शब्दांत होता. पण त्या वेळीं या शब्दांचें महत्व लोकांना कितपत कळलें होतें याबद्दल शंका वाटत होती. खरोखर या ठरावानें कॉंग्रेसचें धोरणच ठरवून टाकलें. सरकारशीं संबंध सोड-ण्यास गांधी अद्याप तयार झाले नव्हते, म्हणूनच प्रिन्स ऑफ वेल्स यांच्या स्वागताचा ठराव पास करण्यात आला व दिल्ली कॉंग्रेसनें केलेली चूक भरून काढण्यांत आली. तडजोडीमुळें सुधारणाविषयक ठराव मिळमिळित बनला होता, तरी सहकार्याची जोडण्यांत आलेली पुरवणी मंजूर झाली होती. सत्य व अहिंसा या व्रतांच्या दृष्टीनें किंवा त्या बरोबरीचे असे पुढील ठरावही पास झाले. (१) स्वदेशी–सूत कातण्याच्या व विणण्याच्या प्राचीन कलेला उत्तेजन द्यावें. (फारच थोड्या लोकांनीं 'सूत कांतणें' या शब्दाकडे लक्ष दिलें असेल.) (२) दुभत्या गाई व वळू परदेशाला पाठविण्यास मनाई करावी. (३) प्रांतातून अवलंब करण्यांत आलेलें मद्यविक्रीचें धोरण, (४) तिसऱ्या व इंटरमीजिएट वर्गाच्या उतारूंचे हाल कमी करणें वगैरे आणि बकरीदच्या वेळीं मुसलमानांनीं गोवध बंद करण्याचें ठरविल्याबद्दल कृतज्ञता, तुर्कस्थान व खिलाफत या प्रश्नांच्याबाबत विरोधी धोरण ठेवल्याबद्दल त्यांचा निषेध हे ठरावही

वरच्या वर्गांतच पडण्याजोगे होते. पुष्कळ वर्षांनंतर कॉंग्रेसचें लक्ष शेतकऱ्यांच्या परिस्थितीकडे गेलें. इतरांप्रमाणें कामगारांनीही अमृतसरचें लक्ष आपल्याकडे वेधलें. युनानी व आयुर्वेदिक पद्धतीकडे सरकारनें लक्ष द्यावें अशी शिफारस करण्यांत आली. ब्रि. कॉं. कमिटी व लेबर पार्टी यांच्या कामगिरीबद्दल आभार मानण्यांत आलें. त्याचप्रमाणें मि. बेनस्पूर यांचे विशेष आभार मानण्यांत आले. लेबर पार्टीशीं मैत्री जोडून लो. टिळक पहिल्यांदाच हिंदुस्थानास परत आले होते व त्यांनीं या पक्षाला ३००० पौंडांची देणगी दिली होती. इंग्लंड व इतर देशांतून कायमचें मिशन नेमण्यांत यावें या कॉंग्रेसमध्यें करण्यांत आलेल्या विधानाला लोकमान्यच बहुतांशीं जबाबदार होते. लाला लजपतराय यांच्या कामगिरीबद्दल व कॉंग्रेसच्या डेप्युटेशननें इंग्लंडमध्यें जी कामगिरी केली त्याबद्दलही आभारप्रदर्शन करण्यांत आलें. परदेशांतील हिंदी लोकांना-ही कोणी विसरलें नाहीं. मालमत्ता संपादन करण्याचे व व्यापार करण्याचे ट्रान्सवालमधील हिंदी वसाहतवाल्यांचे हक्क हिरावून घेण्यांत आले होते. पूर्व आफ्रिकेंतील हिंदी चळवळयांनीं आपलें डोकें वर काढलें होतें. अशा परिस्थितींत परदेशांतील हिंदी लोकांच्या बाबतींत मि. ॲन्ड्रयूज यांनीं केलेल्या सेवेबद्दल त्यांचे आभार मानण्यांत आले. हंटर कमिशनवर बहिष्कार घालणें कां भाग पडलें याचें कारण कॉंग्रेसनें प्रथमतः जाहीर केलें. तुरुंगांत शिक्षा भोगीत असलेल्या पंजाबी पुढाऱ्यांना पोलीस पाहाऱ्याखालीं कमिशनपुढें येण्यास व सरकारी वकिलाला जसा सल्ला मिळतो तशाच प्रकारच्या सूचना लोकांच्या तर्फेच्या वकिलास देण्यास परवानगी देण्यांत आली नाहीं. बहिष्कार हाच कॉंग्रेसच्या इभ्रतीस साजेसा उपाय होता. म्हणून कॉंग्रेसनें आपल्या चौकशीचा स्वतंत्र रिपोर्ट तयार करावा, अशी आज्ञा दिली. आपल्या सरकारी नोकरीचा राजीनामा दिल्याबद्दल सर शंकर नायर यांचें अभिनंदन करण्यांत आलें. लॉर्ड चेम्सफर्ड यांना परत बोलवावें, जनरल डायर याला कामावरून दूर करावें, सर मॉयकेल ओडवायर यांची आर्मिकमिटीवरील मेंबरशिप रद्द करावी, असेही ठराव करण्यांत आले. लॉर्ड चेम्सफर्ड यांच्या संबंधांच्या ठरावाची हकीगत या जागीं नमूद करणें रास्त होईल. ना. शास्त्री यांच्यासारखे नेमस्त पुढारी त्याला विरोध करतील अशी व्हॉइसरॉयांना आशा वाटत होती असें म्हणतात. दुसरे दिवशीं ज्या वेळीं हा ठराव कॉंग्रेसपुढें आला, त्या वेळीं ना. शास्त्री व मि. रामस्वामी आय्यर हे

कलकत्त्याकडे तेथें भरणाऱ्या लिबरल फेडरेशनच्या पहिल्या बैठकीला हजर राहण्याकरीतां निघून गेले होते. अर्थात् ना. शास्त्री हा ठराव पुढें आला त्या वेळीं कॉंग्रेसमध्यें उपस्थित नव्हते. व्यक्तिविषयक व मालमत्तेचें नुकसान केल्याबद्दल नुकसानभरपाईच्या बिलाअन्वयें लोकांवर जे कर लादण्यांत आले होते ते रद्द करण्याबद्दल या कॉंग्रेसनें मागणी केली. त्याचप्रमाणें कॉलेजांतील विद्यार्थ्यांना ज्या शिक्षा देण्यांत आल्या होत्या त्याही रद्द कराव्या अशी विनंति केली. कॉंग्रेसचे वृद्ध पुढारी मि. सी. विजयराघवाचारियर यांनीं जन्मसिद्ध हक्कांचा ठराव रात्रीं दहा वाजतां कॉंग्रेसपुढें मांडला व तो मंजूर करून सुधारणाच्या ठरावाला बळकटी आणण्यांत आली. प्रेस ॲक्ट व रौलेट ॲक्ट रद्द करावा व बादशाही जाहीरनामा निघाल्यानंतरही ज्या राजबंदींना मुक्त करण्यांत आलें नव्हते त्यांना मुक्त करावें असेंही ठराव या कॉंग्रेसनें केले.

मि. हॉर्निमन यांच्या हद्दपारीचा निषेध व त्यांना सोडून देण्याबद्दल जोराची मागणी करण्यात आली. सुधारणाचा कायदा ब्रह्मदेशाला लागू करावा व दिल्ली, अजमीर–मारवाड हे संपूर्ण अधिकारांनीं युक्त असलेले प्रांत बनवावे. कांहीं लोकांकडून हिशेब मागावयाचे व कांहीं लोकांकडून त्याच्याकडे बाकी असलेली फंडाची रक्कम मागावयाची याचा विचार दोन ठरावांत केल्यानंतर या कॉंग्रेसचें काम समाप्त झालें. कॉंग्रेसचे अध्यक्ष पं. मोतीलाल नेहरू यांना या कॉंग्रेसच्या दिवसांत अतिशय दगदग सोसावी लागली व त्यांचा घसा बसून गेला. विषयनियामक कमिटीचें काम पहाटे सुरु होई व रात्रींमागून रात्रीं या चर्चेत खर्ची पडत. शिवाय हे दिवस थंडीचे होते आणि पंजाबांतील थंडीमुळें कॉंग्रेसचे प्रतिनिधी बेजार होऊन गेले होते.

या अधिवेशनाचे वेळीं दोन महत्त्वाच्या गोष्टी घडून आल्या. राजबंदीच्या सार्वत्रिक मुक्ततेचा शर्करावगुंठित बादशाही जाहीरनामा या वेळीं प्रसिद्ध झाला; व कॉंग्रेसच्या आदल्या दिवशींच तो अमृतसरला पोंचला. जाहीरनाम्याबरोबरच अलीबंधूही अमृतसरला आले व शहरांतील प्रचंड जनसमुदायानें त्यांचें अत्यंत उत्साहानें स्वागत केलें. त्यांची थाटाची मिरवणूक काढण्यात आली. या स्वागताला उत्तरादाखल भाषण करतांना "आपण छिंदवाड जेलमधून 'रिटर्न तिकिट' काढून आलों आहों" असें त्यांनीं सांगितलें. रिटर्न तिकिटाची ही म्हण आता वाङ्मयांत रूढ झाली आहे. दुसरी गोष्ट मि. रेजिनाल्ड नेव्हिल

यांच्या संबंधाची होती. मि. नोव्हिल हे लंडनमधील सॉलिसिटर होते, ते कांहीं दिवसांकरितां हिंदुस्थानांत आले असतां कॉंग्रेसच्या दिवसांत ते अमृतसरला आले होते. हॉटेलमधील ज्या खोलींत ते राहात होते, त्या खोलीवर एके दिवशीं ( २५ डिसेंबर १९१९ ) मध्यरात्रीं २० सोल्जरांनीं त्याच्या खोलीचें दार फोडलें व ते आंत शिरले. जालदरच्या गॅरिजनमधले हे सोल्जर होते. त्यांनीं मि. नोव्हिल यांचा अपमान केला व " आपण गोरे गृहस्थ असून डायरविरुद्ध काम करण्यास कसें धजावता " असें त्यांनीं विचारलें. " घामट नेटिवांच्या घोळक्यावर आम्ही गोळ्या झाडल्या आहेत व डायरच्या पलटणींपैकींच मी एक आहे " असें त्यापैकीं एक सोल्जर म्हणाला. या सोल्जरांना पुढें मि. नोव्हिल यांची माफी मागावी लागली असें समजतें.

---

# भाग ३ रा

—:✲:—

## प्रकरण पहिलें

## असहकारितेचा उदय १९२०

१९२० च्या प्रारंभीं हिंदी राजकीय चळवळींत उघडपणें फूट पडलेली दिसून आली. लिबरल पक्षांतील लोक कॉंग्रेसपासून अलग झाले व कलकत्ता येथें १९१९ च्या डिसेंबरमध्यें त्यांनीं आपली स्वतंत्र परिषद भरविली. खुद्द कॉंग्रेस-मध्यें जे लोक आतां मागें राहिले होते त्यांच्यातही आतां आणखी फाटाफूट पडत चालली होती. अमृतसर कॉंग्रेसमध्ये सहकार्य कां प्रतिरोध हाच मुख्य प्रश्न होता. नवीन वर्षाचे काहीं महिने उलटून गेल्यावर अमृतसरमधील पक्षाची आतां उलटापालट झाली होती. गांधीजी असहकारितेचा पुरस्कार करीत होते आणि ज्या लोकांनीं त्यांच्या सहकार्याच्या ठरावाला अमृतसर येथे विरोध केला त्याच लोकांनी आतां त्याच्याविरुद्ध एक फंड उभा केला होता. पंजाब व खिलाफत या दोन्ही प्रकरणांनीं लोकांचीं मनें ग्रासून टाकलीं होतीं व त्यामुळेंच असें फेर-फार झालेले दिसत होते. १९२०सालच्या सगळ्या चळवळी खिलाफत प्रकरणा-भोंवतींच घुटमळत होत्या. तेव्हां हें प्रकरण कसें उपस्थित झालें याबद्दल थोडी माहिती देणें अवश्य आहे. महायुद्धाच्या वेळीं मुख्य प्रधान मि. लॉइड जॉर्ज यांनीं हिंदी मुसलमानाना गंभीर अभिवचनें दिली होतीं आणि त्याच्यावर विश्वास ठेवूनच हे मुसलमान इस्लामी बंधूंविरुद्ध लढले होते. महायुद्ध संपल्या-नंतर पूर्वीचीं अभिवचनें पाळण्याचें टाळण्याकरितां त्यांच्यावर निरनिराळीं भाष्यें रचण्यांत येऊ लागलीं. मुख्य प्रधानांनीं केलेल्या या विश्वासघातामुळें हिंदी मुसलमान अत्यंत चिडून गेले होते. मि. लॉइड जॉर्ज यांच्या अभिवचनात पुढील निस्संदिग्ध शब्द होते. " तुर्की वंशाचें मुख्यतः वसतिस्थान असलेली आशिया-मायनर व थ्रेसमधील संपन्न व प्रख्यात भूमि तुर्की राष्ट्रापासून हिरावून घ्यावी या हेतूनें आम्ही हें युद्ध चालविलेलें नाही." हीं अभिवचनें पूर्ण करण्यांत आलीं नाहींत व तीं निष्ठुरपणें मोडण्यात आलीं. जझरत उल अरब म्हणजे अरेबिया,

सीरिया, पॅलेस्टाइन व त्यांत असलेलीं पवित्र क्षेत्रें हा सर्व प्रदेश खलीफाच्या प्रत्यक्ष साम्राज्यछत्राखालीं नेहमीं राहिला पाहिजे अशी मुसलमानांची मागणी होती. पण युद्ध तहकुबीच्या प्रसंगीं ज्या अटी ठरविण्यांत आल्या त्यामुळें तुर्की राष्ट्र आपली ही सर्व मातृभूमि गमावून बसलें. थ्रेस ग्रीसला देणगी म्हणून देण्यांत आलें. मँडेटरी मुलुखाचें ढोंग करून तुर्की साम्राज्याचा आशियांतील सर्व भाग ब्रिटन व फ्रान्स यांनीं वांटून घेतला. दोस्त राष्ट्रांनीं हायकमिशनची नेमणूक केली. हें हायकमिशनच तुर्कस्थानचें खरें सत्ताधीश बनलें व तुर्की सुलतान जवळ जवळ कैदी बनला. ब्रिटिश प्रधानानें केलेल्या या विश्वासघातामुळें हिंदुस्थानांतील केवळ मुसलमानच नव्हे, तर इतर समाजही संतप्त झाले. अमृतसर येथें कॉंग्रेसचे पुढारी व खिलाफतवाले यांची एकत्र बैठक होऊन या प्रश्नाची चर्चा करण्यांत आली; व महात्मा गांधींच्या पुढारीपणाखालीं खिलाफतीची चळवळ संघटित करण्याचें ठरविण्यांत आलें.

१९२० च्या जानेवारींत अलीबंधूंनीं एक जाहीर पत्रक काढलें. हिंदी जनतेनें या प्रश्नाच्या बाबतींत सहानुभूति दाखविली व पाठिंबा देण्याचें कबूल केलें; याबद्दल आभार मानून भावी चळवळीचा आराखडा या पत्रकांत नमूद करण्यांत आला होता. डॉ. अनसारी यांच्या नेतृत्वाखाली एका शिष्टमंडळानें १९ जानेवारी १९२० रोजीं व्हाइसरॉयांची मुलाखत घेतली. "तुर्की साम्राज्याचें रक्षण करणें व खलीफा या नात्यानें त्याची सत्ता अबाधित राखणें कसें जरूरीचें आहे" हें त्यांनीं व्हाइसरॉयांना दाखवून दिलें. केवळ भौतिक दृष्टीनें नव्हे तर आध्यात्मिक दृष्टीनें खिलापतीची ही संस्था कायमची टिकविणें अगत्याचें आहे हें खिलाफतीचें तत्त्व थोडक्यांत त्यांनीं व्हाइसरॉयापुढें मांडलें.

या डेप्युटेशनला व्हाइसरॉयानीं दिलेलें उत्तर अत्यंत निराशाजनक होतें. मुसलमान पुढाऱ्यांनीं यानंतर आणखी एक जाहीरनामा प्रसिद्ध केला. मुसलमानांचीं पवित्र क्षेत्रें खलीफाच्याच ताब्यांत असलीं पाहिजेत व लॉइड जॉर्ज यांनीं दिलेलीं अभिवचनें पूर्ण करण्यात आलीं पाहिजेत असें या जाहीरनाम्यात म्हटलें होतें. १९२० फेब्रुवारीमध्यें खिलाफत परिषदेचें तिसरें अधिवेशन झालें. इंग्लंडला जाणाऱ्या शिष्टमंडळाबद्दल विश्वास व्यक्त करून या परिषदेमार्फत आणखी एक अत्यंत महत्त्वाचा जाहीरनामा काढण्यांत आला. या जाहीरपत्रकांत मुसलमानांनीं आपली मागणी स्पष्ट शब्दांत मांडली होती व सरकारनें या

बाबतींत चुकीचा निर्णय दिल्यास त्याच्या परिणामाबद्दल सावधागिरीची सूचना दिली होती. या प्रश्नाच्या बाबतींत केवळ मुसलमान विरुद्ध आहेत असें नव्हे तर हिंदूंनींही या चळवळीला पाठिंबा दिला आहे ही गोष्टही सरकारनें लक्षात घ्यावी, असें त्यास बजावलें होतें.

केवळ ग्रेट ब्रिटनच्या हातातच हा प्रश्न राहिलेला नाहीं या गोष्टीवरच लॉर्ड चेल्म्सफर्ड यानीं भर दिला. मुसलमानाच्या मागणीला व्हाइसरॉयांची पूर्ण सहानुभूति नाहीं, हें यावरून सिद्ध झालें. याच वेळीं इंग्लंड, फ्रान्स, अमेरिका वगैरे देशांतील वर्तमानपत्रांनीं पौर्वात्य प्रश्न कायमचा निकालांत काढावा, अशी निकड लावली होती. यामुळें मुसलमानांना वाटणाऱ्या भीतींत अधिकच भर पडली होती. " तुर्कांना कॉन्स्टॅन्टिनोपलमधून हाकून लावून त्याला चौथ्या दर्जाचें राष्ट्र बनवावें, असें अमेरिका व इंग्लंड या देशांमधील वजनदार पत्रें म्हणूं लागलीं होतीं. खिलाफतीचा प्रश्न फेब्रुवारी व मार्च या महिन्यात पुढें आला. मार्चच्या आरंभीं ( १९२० ) मुसलमानाचें डेप्युटेशन इंग्लंडला रवाना झालें. या डेप्युटेशनचें नेतृत्व मौ. महंमदअल्ली याच्याकडे होतें. स्टेट सेक्रेटरीचे मुखत्यार या नात्यानें त्यानीं मि. फिशर याची मुलाखत घेतली व मुख्य प्रधानांनाही ते भेटले. शांतता–परिषदेच्या सुप्रीम कौन्सिलपुढे आपले विचार मांडण्याची परवानगी या डेप्युटेशननें मागितली पण ती नाकारण्यात आली.

" इतर खिश्चन राष्ट्रांना ज्या तत्त्वानुसार वागविलें जातें त्याशिवाय निराळ्या तत्त्वावर तुर्कस्थानास वागविणें शक्य नाहीं. तुर्की भूमीवर भौतिक सत्ता गाजविण्यास परवानगी मिळाली तरी जे देश तुर्की नाहीत, दुसऱ्या धर्माचे लोक ज्या ठिकाणीं राहात आहेत त्या देशावर तुर्की सुलतानाला आपली सत्ता गाजवितां यावयाची नाहीं " असें मि. लाइड जॉर्ज यांनीं मुसलमानाच्या शिष्टमंडळाला उत्तर दिलें. मि. लॉइड यांनीं वरील प्रकारचें उत्तर देऊन खिलाफतीच्या मुळाशींच घाव घातला आहे, असें मुसलमानाना वाटलें. यानतर ता. १९ मार्च हा दिवस राष्ट्रीय शोकदिन मानून त्या दिवशीं उपवास, प्रार्थना व हरताळ पाडावा, असें ठरविण्यात आलें. मुसलमानांचीं मनें संतुष्ट होतील अशा रीतीनें तुर्की साम्राज्याचा प्रश्न जर विचारांत घेतला जाणार नाहीं तर असहकारितेची चळवळ मी माझ्या नेतृत्वाखालीं सुरू करीन, असें म. गांधींनीं जाहीर केलें. शांततारक्षणाच्या बाबतींत तयार केलेल्या अटी मुसलमानाना स्वीकारार्ह नसल्या तर ब्रिटिश-

गादीशीं असलेला आपला राजनिष्ठ संबंध ते तोडल्याशिवाय राहणार नाहींत, असा ठराव मौ. शौकतअली यांनीं १९ मार्चच्या सभेकरितां म्हणून तयार केला. यामुळेंहि सरकारनेंही एक ठराव जाहीर केला. सरकारी नोकरांना १९ मार्चच्या समारंभांत भाग घेणें शक्य नाही असें या ठरावांत म्हटलें होतें. १० मार्च रोजीं म. गांधींनीं जें जाहीरपत्रक काढलें त्यांत त्यांनीं आपल्या कल्पनांचा व असहकारितेच्या चळवळींतील आपल्या योजनेचा समावेश केला होता. हें जाहीरपत्रक पुढीलप्रमाणें होतें:—

"आपल्या मागण्या मान्य करण्यांत आल्या नाहींत तर आपल्याला काय करतां येईल याबद्दल दोन शब्द मी सांगणार आहें. युद्ध करणें, मग तें उघड असो वा गुप्त असो, हा एक रानटी प्रकार आहे, हा उपाय अव्यवहार्य आहे. म्हणून त्यासंबधानें विचारही करता कामा नये, शिवाय हा उपाय नेहमींच अहितकारक असतो. दुसऱ्या उपायांनींही आपण आपल्या न्याय्य मागण्या सपादन करूं शकतो, ही गोष्ट मी प्रत्येकाला पटवूं शकलों तर वरील उपाय योजण्याचें कारणच पडणार नाहीं. हिंसेचा आपण केव्हांही अवलंब करणार नाहीं असे व्रत जी व्यक्ति किंवा जें राष्ट्र घेईल ती व्यक्ति किंवा तें राष्ट्र एवढी मोठी शक्ति निर्माण करील की, तिच्यापुढें कोणीही टिकाव धरूं शकणार नाहीं. पण हिंसेच्या मार्गाबद्दल माझे आज असें म्हणणें आहे की, उपयुक्ततेच्या दृष्टीनें विचार केला तरी तो मार्ग अगदीं निष्फळ आहे. या परिस्थितींत असहकारिता हा एकच एक उपाय आपल्याला शिल्लक राहिला आहे. जेव्हां तो हिंसेच्या स्पर्शानें दूषित झालेला नसतो तेव्हां हा उपाय अत्यंत शुद्ध व परिणामकारक असतो. ज्या वेळीं सहकार्य करणें हें अधःपाताचें द्योतक ठरतें, सहकार्य केल्यानें आपण ज्या धार्मिक भावना मनांत बाळगल्या त्याच्यावर आघात होतो, व तसें करणें हें अपमानास्पदही आहे असे आढळून येतें त्या वेळीं असहकार करणें हेंच कर्तव्य ठरतें. आपले हक्क अन्यायानें लुबाडून घेतले जात आहेत असें दिसत असतांना आम्ही तें मुकाट्यानें सहन करावें अशी अपेक्षा इंग्लंडही करूं शकणार नाहीं. आणि हा हक्कांच्या अपहाराचा प्रश्न मुसलमानाना जगण्या-मरण्याइतका महत्त्वाचा वाटतो. म्हणून समाजाच्या वरच्या थरांतील लोकांनीं व खालच्या थरांतील लोकांनींही या उपायाचा अवलंब करावा. जे लोक आज मानाच्या जागांवर आहेत किंवा ज्यांना मोठमोठ्या पदव्या मिळाल्या आहेत

त्यांनीं त्यांचा त्याग करावा, तसेंच जे लोक किरकोळ नौकऱ्या करीत आहेत त्यांनींही आपल्या जागांचा राजीनामा द्यावा. खासगी नौकऱ्यांशीं असहकारितेचा संबंध नाहीं. जे लोक असहकारितेचा अवलंब करणार नाहींत त्यांच्यावर बहिष्कार टाकावा, या गोष्टीलाही मी संमति देऊं शकत नाहीं. असहकार ही स्वयंस्फूर्तीनें करण्याची गोष्ट आहे. लोकांच्या भावना किती उद्दीप्त झाल्या आहेत व त्यांच्यात किती असंतोष पसरला आहे हें दाखविण्याचा हा एक मार्ग आहे. लष्करातील शिपायांनीं आपली नौकरी करण्याचें नाकारावें, असा त्यांना सल्ला देणें हे अप्रासंगिक होईल. तो अगदीं शेवटचा उपाय आहे; पहिला उपाय नव्हे. ज्या वेळीं व्हाइसरॉय, स्टेट सेक्रेटरी व मुख्य प्रधान आमचें म्हणणें ऐकून घेणार नाहींत, त्या वेळीं या उपायाचा अवलंब करणें हें हक्कानेंच प्राप्त होईल. शिवाय असहकारितेचा प्रत्येक उपाय योजण्यापूर्वीं आपण पुष्कळ विचार करणें जरूर आहे. अत्यंत कठीण प्रसंगीं सुद्धां आपल्याला आत्मसंयमन करता येईल अशा दृष्टीनें आपण धीरे धीरे हा मार्ग आक्रमिला पाहिजे."

यावर '१९२० सालचें हिंदुस्थान' या पुस्तकातील सरकारी मत पाहूं. "गांधीजींची धर्मश्रद्धा, निरहंकार वृत्ति व वैराग्य यांच्यावर ज्या समाजाचा विश्वास आहे त्याना गांधीजींनीं केलेला आत्मशक्तीचा पुरस्कार निःसंशय पटला आहे. अपमानित झालेल्या राष्ट्राला मुक्तीचा मार्ग दाखविण्याकरितां एखाद्या अचल गिरिप्रमाणें महात्माजी जनतेपुढें उभे आहेत. त्यांच्या आज्ञांना दैवी संदेशाचें महत्व प्राप्त झाले आहे." लोकमान्य टिळकांना गांधींचे हें असहकारिते संबंधींचे विचार प्रथम पटले नाहींत. एका बाजूला टिळकांची कुशाग्र बुद्धिमत्ता व विश्वविजयी इच्छाशक्ति तर दुसऱ्या बाजूला गांधींची अध्यात्मप्रवण वृत्ति व स्वर्गगामी आत्मिक शक्ति या दोहोंचा लढा सुरू झाला. असंतोषानें भरलेल्या या वातावरणातच पंजाबातील अत्याचारासंबंधाचा बिनसरकारी रीपोर्ट प्रसिद्ध झाला. (२५ मार्च). कॉंग्रेसच्या सब कमिटीच्या पुराव्याचें परीक्षण हंटर कमिशनला न करता आल्यामुळेंच असा वेगळा रिपोर्ट प्रसिद्ध करणें अपरिहार्य झालें होतें. आणि या गोष्टीमुळेंच अद्यापि प्रसिद्ध व्हावयाच्या हंटर कमिशनच्या फैसल्याविरुद्ध लोकमत तयार झालें होतें. कॉंग्रेसच्या रिपोर्टात सर मायकेल ओडवायर यांच्या धोरणाविरुद्ध झोड उठविली होती. सुशिक्षितासंबंधानें सर मायकेल यांना तिरस्कार वाटत होता. लष्करभरती करण्याकरतां व युद्धाकरतां

द्रव्यसहाय्य मिळविण्यासाठीं त्यांनीं आपल्या वजनाचा दुरुपयोग केला होता. आपल्या अरेरावीच्या धोरणानें त्यांनीं लोकमत दडपून टाकलें होतें. या सर्व कारणामुळें सर मायकेल याच्यावर स्वाभाविकच लोक अनेक प्रकारचे आरोप करीत होते. १९१९ सालीं ज्या गोष्टी घडल्या त्याना ६ एप्रिल रोजीं सुरुवात झाली व त्यांचें पर्यवसान ता. १३ रोजीं जालियनवालाबागेच्या कत्तलींत झालें. याकरितां १९२० सालीं हा आठवडा राष्ट्रीय आठवडा म्हणून पाळण्यांत आला व आजपर्यंत तोच प्रघात चालूं आहे. मे महिन्यांत तुर्कस्थानशीं झालेल्या तहाचीं कलमें प्रसिद्ध झालीं. खिलाफतच्या चळवळीला त्यामुळें उत्तेजनच मिळालें. त्यानंतर लौकरच असहकारितेची चळवळ सुरूं करण्याचा आपला निश्चय गांधीजींनीं जाहीर केला. लोकमान्यांनीं अंतःकरणपूर्वक या चळवळीला सहानुभूति दाखविली नाहीं, तथापि त्यानीं तिला विरोधहि केला नाहीं.

या दोन्हीं पुढाऱ्याचें या वेळचें धोरण लक्षपूर्वक पहाण्यासारखें आहे. दोघांनींही एप्रिलच्या तिसऱ्या आठवड्यांत महत्त्वाचे खलिते प्रसिद्ध केलें. ऑल इंडिया होमरूल लीगशी मिसेस बेझंट यानीं आपला संबंध तोडल्यामुळें गांधीजींना या लीगचे अध्यक्ष निवडण्यांत आलें. त्या वेळीं त्यानीं एक पत्रक प्रसिद्ध केलें. नव्या सुधारणासंबंधीं आपलें धोरण व्यक्त करण्याकरिता लोकमान्यांनींही आपला जाहीरनामा या वेळी प्रसिद्ध केला होता.

### ऑ इं. होमरूललीगचे अध्यक्ष, महात्मा गांधी यांचें पत्रक

''निव्वळ राजकीय संस्थेशीं मी आपला संबंध जोडीत आहे हें माझ्या आजपर्यंतच्या जीवनाच्या साध्या धोरणाला अनुसरून नाहीं हें उघड आहे. परंतु माझ्या स्नेह्यांबरोबर या संबंधानें बरीच चर्चा करून ऑल इंडिया होमरूल लीगला मी येऊन मिळालों आहे व तिचें अध्यक्षपदही स्वीकारलें आहे. मी जर प्रत्यक्ष राजकारणात शिरलों तर राजकारणापासून अलिप्त असल्यामुळें माझें आजपर्यंतचें जें वजन होतें तें नष्ट होईल असें माझ्या काहीं मित्रांनीं मला सांगितलें. त्यांची ही सूचना बरीच महत्त्वाची आहे हेंही मी जाणतों. ज्या अर्थी लीगनें माझ्याशीं आत्मीयत्वाचें नातें जोडलें आहे त्या अर्थी मीही तितक्या आपलेपणानें तिच्याशीं एकरूप झालें पाहिजे. ज्या संघटनेचा उपयोग माझ्या उद्दिष्ट कार्याच्या प्रगतिकरिता करतां येईल तिचा मला उपयोग केला पाहिजे. शिवाय माझे जे उपाय फलदायी ठरले आहेत, ते ही योजणें आवश्यक आहे.

या इलाख्याबाहेरील माझ्या स्नेह्यांचेही मी या बाबतीत मत घेतलें आहे. स्वदेशी, हिंदु-मुसलमान ऐक्य, खिलाफतीच्या चळवळीचा पुरस्कार व राष्ट्र-भाषा या नात्यानें हिंदी भाषाप्रचार व प्रांतांचीं भाषावार विभागणी हा या लीगचा कार्यक्रम राहील.

## पक्षातीत संघटना

राष्ट्रीय पुनर्घटनेच्या कार्यात सुधारणाविषयक चळवळ हा एक गौण प्रश्न आहे असें माझें मत आहे. मी जो कार्यक्रम सुचविला आहे तो पार पाडण्याकरितां राष्ट्र आपली उत्साहशक्ति खर्चीं घालील. तर सर्व प्रकारच्या सुधारणा घडून येतील. पूर्ण जबाबदारीच्या स्वराज्याचें ध्येयही त्वरित गाठण्याचा मार्ग यामुळें अधिक सुलभ होईल. म्हणूनच सर्व इतर राष्ट्रीय कार्यक्रमापेक्षां मी या कार्यक्रमाला अधिक महत्त्व देतो. एका विशिष्ठ पक्षाची संघटना या दृष्टीनें ऑल इंडिया होमरूल लीगचा मी उपयोग करणार नाहीं. मी कोणत्याही पक्षाचा नाहीं किंवा यापुढें कोणत्याही पक्षाला मिळावें अशी माझी इच्छा नाहीं. कॉंग्रेसला मदत केली पाहिजे अशी या लीगची आजची घटना आहे. कॉंग्रेसही एका विशिष्ट पक्षाची संघटना आहे असें मी समजत नाही. ब्रिटिश पार्लमेंटप्रमाणें सर्व पक्षाचा समावेश तिच्यात झालेला आहे. ब्रिटिश पार्लमेंटप्रमाणें सर्व पक्ष असले तरी त्यातील एखादा पक्ष प्रबल असतो व त्याच्या धोरणानेंच पार्लमेंटचें काम चालू असतें; असें असलें तरी ती एखाद्या विशिष्ट पक्षाची संघटना आहे असें कोणी म्हणत नाहीं. कॉंग्रेसचेंही तसेंच आहे. देशांतील सर्व पक्षाना हीच गोष्ट मान्य होईल. एक राष्ट्रीयसंघटना या दृष्टीनें तिचा ते उपयोग करतील, अशी मला आशा आहे. कॉंग्रेसचें हे पक्षातीत स्वरूप कायम रहावें अशा दृष्टीनेंच या लीगचें धोरण राहील असा मी प्रयत्न करीन.

## उपाय योजना

देशाच्या राजकीय जीवनांत निर्भेळ सत्याचा व प्रामाणिकपणाचा समावेश करतां येईल असा मला विश्वास वाटतो. कायदेभंगाच्या उपायाला लीगनें पाठिंबा द्यावा अशी माझी अपेक्षा नाहीं, तथापि सर्व राष्ट्रीय चळवळींमध्यें सत्य आणि अहिंसा या तत्त्वांचा स्वीकार केला जाईल याकरतां मी माझ्या सर्व शक्ति खर्चीं घालीन. असें केल्यावर सरकारचें धोरण व त्यांनीं योजलेले उपाय याबद्दल

आम्हांला भीति वाटणार नाहीं किंवा त्यांच्याबद्दल अविश्वासही वाटणार नाहीं. या विषयासंबंधानें मी अधिक कांहीं सांगूं इच्छित नाहीं. मी जे विचार आज मांडले आहेत त्यांतून अनेक प्रश्न निर्माण होतील व त्याचा निर्णय भावी कालच ठरवील."

## लो. टिळक यांचा जाहिर नामा

" कॉंग्रेस डेमोक्रॅटिक पक्ष " हा आपल्या नांवाप्रमाणें कॉंग्रेसशीं एकनिष्ठ व लोकसत्ताक तत्त्वांवर विश्वास असलेला पक्ष आहे. लोकसत्ताक तत्त्वांचा अवलंब केल्यास हिंदुस्थानाला पुढील अनेक प्रश्न सोडवितां येतील असें या पक्षाचें मत आहे व शिक्षणप्रसार व मतदारीच्या हक्काची वाढ हेंच या बाबतींतील दोन उपाय आहेत, असें हा पक्ष मानीत आहे. जाती व रूढी यामुळें समाजाला भोगावे लागणारे व नागरिकत्वाचे हक्कावर गदा आणणारे अनेक धार्मिक सांप्रदायिक अन्याय दूर करण्यात आले पाहिजेत असा पुरस्कार हा पक्ष करीत आहे. धर्माच्या बाबतींत सर्वांनीं परस्पराशीं सहिष्णुतेनें वागावें, सर्वांनीं आपल्या धर्माचें पावित्र्य रक्षण करण्याचा प्रयत्न करावा, तसेंच दुसऱ्याच्या आक्रमणापासून आपल्या प्रजेच्या धर्माचें रक्षण करण्याचा आपला हक्क आहे व कर्तव्य आहे असें सरकारनेंही मानावें असें या पक्षाचें म्हणणें आहे. मुसलमानाच्या धर्ममताप्रमाणें व कुराणांतील आज्ञांप्रमाणें खिलाफती बाबतींत असलेल्या मुसलमानांच्या हक्कांना हा पक्ष मान्यता देत आहे. मानवी समाजांतील बंधुभाव वृद्धिंगत होण्यासाठीं ब्रिटिश कॉमनवेल्थमध्यें हिंदुस्थानचें संयुक्त स्वराज्य प्रस्थापित व्हावें, असें या पक्षाचें मत आहे. तरी हिंदुस्थानास पूर्ण स्वायत्ततेचें हक्क प्राप्त झाले पाहिजेत व ब्रिटिश कॉमनवेल्थमधील ग्रेट ब्रिटन व इतर राष्ट्राप्रमाणें हिंदुस्थानालाही समान दर्जा मिळाला पाहिजे असें या पक्षाचें म्हणणें आहे. कॉमनवेल्थमधील प्रत्येक राष्ट्रात हिंदी लोकांना नागरिकत्वाचें समान हक्क असावे व ज्या देशांत या हक्कांना बाध येईल, तेथें त्याच्या प्राप्तीकरितां व संरक्षणाकरितां जोराचा प्रतिकार करण्यात यावा, असें या पक्षाचें आग्रहाचें सांगणें आहे. एका राष्ट्रानें दुसऱ्या राष्ट्राची पिळणूक करतां कामा नये. जगांतील निरनिराळ्या राष्ट्रांची इभ्रत व त्यांचें स्वातंत्र्य सुरक्षित राहावें व जगात शांतता प्रस्थापित व्हावी या उद्देशानें प्रस्थापित झालेल्या राष्ट्र संघाचे हा पक्ष स्वागत करीत आहे.

" प्रातिनिधिक व जबाबदारीच्या स्वराज्याला हिंदुस्थान लायक आहे, व स्वयंनिर्णयाच्या तत्त्वानुसार आपली राज्यघटना ठरविण्याचाही हक्क हिंदुस्थानला

आहे. असें या पक्षाचें ठाम मत आहे, मॉंटेग्यू रिफॉर्म ॲक्ट हा अपुरा, असमाधानकारक व निराशाजनक आहे असें हा पक्ष मानीत असून, ब्रि. पार्लेमेंटांतील मजूर पक्ष व हिंदुस्थानाबद्दल सहानुभूति बाळगणारे इतर सभासद यांच्या मदतीनें लष्करी ताबा, पूर्ण आर्थिक स्वातंत्र्य व जन्मसिद्ध हक्क संरक्षित होतील अशी हमी, इत्यादि हक्क अंतर्भूत असलेले पूर्ण जबाबदारीच्या स्वराज्याचें नवें रिफॉर्म बिल ब्रि. पार्लमेंटमध्यें शक्य तितक्या लवकर आणण्याचा हा पक्ष प्रयत्न करील. हा उद्देश साध्य करण्याकरिता सर्व हिंदुस्थानभर, तसेंच राष्ट्रसंघामध्यें सामील असलेल्या राष्ट्रांतून एक मोठी जोराची चळवळ चालविण्याचा या पक्षाचा उद्देश आहे. या बाबतींत शिक्षण, चळवळ व संघटन हीं या पक्षाची घोषणा राहील. पूर्ण जबाबदारीचें स्वराज्य लवकर प्राप्त करून घेण्याच्या दृष्टीनें सुधारणा राबविण्याचा या पक्षाचा विचार आहे. आणि हा हेतू साध्य करण्याकरितां हा पक्ष सरकारशीं विनदिक्कत सहकार्य करील अथवा सनदशीर मार्गानें विरोधही करील, व लोकमताला मान्य असलेल्या अशा उपयुक्त मार्गाचा तो अवलंब करील. वर निर्दिष्ट केलेले उद्देश व तत्त्वें यांच्याशिवाय पुढील गोष्टी साध्य करून घेण्याचाही हा पक्ष प्रयत्न करील.

## वरिष्ठ सरकार

(१) रौलेट ॲक्ट, प्रेस ॲक्ट, हत्याराचा कायदा इत्यादि सर्व दडपशाहीचे कायदे रद्द करणें, आपल्या देशबंधूंपैकीं ज्यूरी नेमून त्याच्यापुढे खटल्यांची चौकशी, विशेषतः सरकाराविरुद्ध गुन्ह्याची चौकशी करणें, असल्या गुन्ह्यांच्या बाबतींत सक्तमजुरीची कैदेची शिक्षा रद्द करणें, ग्रेटब्रिटनप्रमाणें एकच गुन्हा करणाऱ्या सर्व वर्गाच्या लोकाना समानतेनें वागविण्यात येईल अशा तत्त्वावर जेलची सुधारणा करणें.

( २ ) कारखान्यांत व शेतावर काम करणाऱ्या कामागारांना त्याच्या श्रमाच्या फलापैकीं मोठा हिस्सा मिळेल, त्याना जीवनावश्यक वेतन मिळेल व भांडवलवाले व कामगार यांच्यातील संबंध समानतेचे राहतील असा प्रयत्न करणें आणि हा उद्देश साध्य करण्याकरितां योग्य अशा संघटणाही निर्माण करणें.

( ३ ) धान्य व इतर जीवनावश्यक जिन्नस यांच्या निर्यातीला जकात व इतर उपायांनीं नियंत्रण घालणें, व जिनसांचे भाव कमी करून मालाचा सांठा करण्यास मदत करणें.

( ४ ) सरकारी मदत व सरक्षक जकाती असल्या सर्वमान्य उपायांनीं देशांतील उद्योधंद्यांच्या वाढीला मदत करणें व स्वदेशी चळवळीलाही उत्तेजन देणें.

( ५ ) रेल्वेचें राष्ट्रीकरण करणें व उद्योगधंद्याला मदत करण्याच्या दृष्टीनें वाहतुकीच्या बाबतींत दाखविण्यांत येणारा पक्षपात बंद करून औद्योगिक वाढीच्या बाबतींत कायदेमंडळांतून योग्य ते कायदे मंजूर करून घेणें.

( ६ ) प्रत्येक सरकारीं खात्यांत विशेषत. लष्करी खात्यांत काटकसर करणें, जरूर व इष्ट असेल तरच कर बसविणें, हें करसुद्धां समाजांतील निरनिराळे वर्ग, संघ व व्यक्ती यांच्या सामर्थ्यानुसार बसविणें. उद्देश असा कीं, कर देणाऱ्या माणसाचें उपजीविकेचें साधन व त्याची मालमत्ता यांच्यावर कराचा योग्य त्या प्रमाणात बोजा पडावा.

( ७ ) हिंदी अधिकाऱ्यांच्या हुकमतीखालीं नागरिक लष्कर उभारणें, आरमारी, वैमानिक व लष्करी शिक्षण, जातीय भेदभाव न करतां कमिशन्समधील नौकऱ्या व इतर सर्व लष्करी नोकऱ्या यात हिंदी लोकांचा प्रवेश.

( ८ ) सर्व सरकारी नौकऱ्यात प्रवेश मिळण्याकरितां हिंदुस्थानात परीक्षा घेण्याची व्यवस्था करणें.

( ९ ) हिंदुस्थानात राष्ट्रीय ऐक्याची प्रस्थापना करण्याकरितां राष्ट्रभाषेचा प्रचार करणें, निरनिराळ्या धर्मातील लोकांत विशेषतः हिंदू-मुसलमानांत ऐक्य करण्याचा प्रयत्न करणें.

(१०) भाषावार विभागणीच्या तत्त्वावर प्रांतांचीं पुनर्रचना करणें.

## प्रांतिक

( १ ) प्रांतांकरितां तावडतोब पूर्ण स्वायत्ततेचें हक्क मिळविणें.

( २ ) सर्वांवर सारखाच बोजा बसेल अशा धोरणानें कायम रयतवारी धाऱ्याची पद्धत.

( ३ ) गुरचराई व सर्पण, इमारतीचें लांकूड व किरकोळ जिनसा यांचा उपयोग या दृष्टीनें जगलांवर खेडयांचा ताबा.

( ४ ) वेठ, बिगार व सरबराई या पद्धती पूर्ण बंद करणें.

( ५ ) मातृभाषेंत शक्य तितकें उच्च शिक्षण देणें.

( ६ ) लिंगभेद न ठेवतां मोफत व सक्तीचें शिक्षण व याकरिता लोकलबोर्ड व म्युनिसिपालिटया यांना खास देणग्या देणें.

(७) ग्रामपंचायतींना राज्यकारभाराविषयक व न्यायनिवाड्याबाबत अधिकार देणें.

(८) मद्यपानबंदी.

(९) लिंगभेद न ठेवतां मतदानाचा हक्क वाढविणें,

(१०) आरोग्य खात्याच्या दिवाणाच्या देखरेखीखालीं पद्धतशीरपणें आरोग्याचें रक्षण करणें.

(११) शेतीची वाढ, कालव्यांचा प्रसार, सहकारी चळवळ, औद्योगिक व यांत्रिक शिक्षण, औषधपाण्याची सोय, देशी वैद्यकास उत्तेजन, इत्यादि सुधारणा घडवून आणणें.

कॉंग्रेस डेमोक्रॅटिक पक्षाचा हा कार्यक्रम असून हा कार्यक्रम पार पाडण्याकरिता कौन्सिलमध्यें जाऊं इच्छिणाऱ्या उमेदवाराना मतें द्यावी अशी विनंति या पक्षातर्फे करण्यांत येत आहे."

मुसलमानांचें डेप्युटेशन अद्याप युरोपमध्येंच होतें त्या वेळीं तुर्कस्थानशीं करण्यात येणाऱ्या तहाची कलमें ४ मे १९२० रोजी प्रसिद्ध करण्यात आलीं. हिंदुस्थानांत तीं प्रसिद्ध करतांना त्यांच्याबरोबर व्हाइसरॉयांनी आपला संदेश जोडला होता, व त्यात या कलमासंबंधानें स्पष्टीकरण करण्यात आलें होतें. हिंदुस्थानांतील मुसलमानाना दुःख वाटेल अशाच प्रकारची हीं कलमें आहेत. व तुर्कस्थानांतील त्यांच्या धर्मबंधूंवर तर दुर्दैवानें हा कठिण प्रसंग ओढवला आहे, ही गोष्ट या संदेशांत कबूल करण्यांत आली होती. पण या प्रसंगाला धैर्यानें व त्यागवृत्तीनें तोंड द्यावें, असा त्यांत उपदेश केला होता. अगदीं बरोबर याच वेळीं हंटर कमिटीचाही रिपोर्ट प्रसिद्ध झाला त्यामुळें सर्व देशभर संतापाग्नीच्या ज्वाळा भडकल्या. मुंबई येथें खिलाफत कमिटीची सभा झाली व महात्मा गांधींच्या असहकारितेच्या योजनेला त्यांनीं मान्यता दिली. (२८ मे १९२०) मुसलमानांना करतां येईल असा हा एकच कार्यक्रम उरला होता. ३० मे रोजीं ऑ. इं. कॉं. कमिटीची बनारस येथें सभा झाली. या सभेंत हंटर कमिटीचा रिपोर्ट व तुर्कस्थानबरोबर झालेल्या तहाचीं कलमें यावर बराच वेळ चर्चा झाली व असहकारितेच्या कार्यक्रमासंबंधानें विचार करण्याकरिता कॉंग्रेसचें जादा अधिवेशन भरविण्याचें ठरलें.

असहकारितेच्या बाबतींत टिळकांचें धोरण कशा प्रकारचें होतें याबद्दल शुद्ध

म. गांधीनींच टिळकांसंबंधानें आपल्या आठवणी सांगतांना आपलें मत सांगितलें आहे ( पुस्तक १ लें पा. २५३ ). " असहकारितेसंबंधानें बोलतांना टिळक माझ्याजवळ पूर्वी जे बोलले होते तेंच पुन्हा म्हणाले:—" हा कार्यक्रम मला पसंत आहे परंतु, असहकारितेकरितां लागणारें त्यागाचें व्रत स्वीकारून देश आपल्यामागून येईल किंवा नाहीं याबद्दल शंका वाटते. या चळवळीच्या कार्यक्रमाला अडथळा उत्पन्न होईल असें कोणतेंही कृत्य मी करणार नाहीं. तुम्हाला या कार्यांत पूर्ण यश येवो आणि जर तुम्हाला आपल्याकडे लोकांना वळविता आलें तर मी या चळवळीला उत्साहानें पाठिंबा देईन."

आतांपर्यंत गांधीजींनीं बऱ्याच वेळां सत्याग्रहाचा हा मार्ग यशस्वी रीतीनें चोखाळला होता. प्रथम चंपारण्यानंतर खेडा जिल्ह्यांतील सारा तहकुबीच्या बाब-तींत व त्यानंतर अहमदाबादच्या गिरण्यांच्या संपाच्या वेळीं त्यांनीं या मार्गाचा अवलंब केला होता. १९१८ सालीं खेडा जिल्ह्यांतील रयताचे कार्य त्यांनीं अंगावर घेतलें व सारा तहकूब होऊन तडजोडीची चर्चा संपेपर्यंत त्यांनीं त्या ठिकाणीं काम केलें. गुजराथ सभेनें या बाबतींत एक शिष्टमंडळ निवडून अधिकाऱ्यांची मुलाखत घेण्याचें ठरविलें पण या विभागाचे कमिशनर क्रोधाविष्ट झाले व या मंडळींना त्यांनीं अनादरानें वागविलें. यामुळें रयतांनीं सारा देण्याचें तहकूब करावें, अशीं नोटीस गुजराथ सभेनें प्रसिद्ध केली. याबद्दलची सर्व जबाबदारी गांधीजींनीं आपल्या शिरावर घेतली. सत्याग्रह करणें अपरिहार्य झालें. खेडा जिल्ह्यांत या चळवळीच्या वेळीं काम केलेले श्री. मोहनलाल पंड्या हे पहिले सत्याग्रही कैदी होत. ( १८ मे १९२५ रोजीं ते मरण पावले. ) या चळवळीमुळें खेडा जिल्ह्यांतील रयताना थोडेंबहुत यश मिळालें. तिसरा प्रसंग म्हणजे अहमदाबाद येथील गिरणी कामगारांचा संप चालूं असताना म. गांधींनीं प्राणांत उपोषणाला प्रारंभ केला हा होय. संपवाल्यांनीं केलेली प्रतिज्ञा त्यांच्या हातून पुरी व्हावी या हेतूनें त्यांनीं सत्याग्रह केला होता. मजूर व मालक याच्यात समाधानकारक तडजोड होऊन हा संप मिटला.

हिंदी राजकीय चळवळींतील १९२० मधील पुढच्या हकीकती सांगण्यापूर्वी १ जानेवारी १९२० रोजीं फीजी बेटांतून वगैरे जे उत्सव करण्यांत आलें त्या-बद्दल थोडी माहिती देणें जरूर आहे. वसाहतींमधून रूढ असलेलीं करारबंद मजुरीची पद्धति रद्द करण्यांत आल्याचें या दिवशीं जाहीर करण्यांत आलें. ही

सी. विजयराघवाचारियर.
१९२० नागपूर कॉंग्रेसचे अध्यक्ष.

हकिम अजमलखान.
१९२१ अहमदाबाद कॉंग्रेसचे अध्यक्ष.

चित्तरंजन दास.
१९२२ गया कॉंग्रेसचे अध्यक्ष.

अबदुल कलम अझाद.
१९२३ दिल्ली खास कॉंग्रेसचे अध्यक्ष.

महमद अल्ली.
१९२३ कोकोनाडा कॉंग्रेसचे अध्यक्ष.

महात्मा गांधी.
१९२४ बेळगाव कॉंग्रेसचे अध्यक्ष.

पद्धति जवळ जवळ एक शतकभर या वसाहतींतून प्रचलित होती, व विशेषतः हिंदी लोकांनाच या पद्धतीमुळें होणारा जुलूम सहन करावा लागत होता. हिंदुस्थानांत मजूर–भरति करण्याची मनाई करून नाताळमधील ही पद्धति बंद करण्यांत आली. मॉरिशसमध्यें १९११ मध्यें ही पद्धति बंद झाली, कारण त्यांना यापुढें हिंदी मजूरांची गरज लागली नाहीं. पण जगाच्या निरनिराळ्या भागांतील वसाहतीमध्यें ही पद्धति अद्याप चालूं होती. १९१४-१५ सालीं हिंदुस्थान सरकारनें ज्या प्रांतांतून असे करारबंद मजूर नेण्यांत येत होते तेथें चौकशी केली, त्या वेळीं या पद्धतीविरुद्ध खुद्द खेड्यांतील लोकच उठलेले आहेत असें दिसून आलें. १९१५ सालीं रे. सी. एफ् अॅन्ड्र्यूज व मि. पियर्सन यांनीं फीजी बेटाना भेट दिली व तेथील भयंकर परिस्थितीसंबंधानें त्यांनीं एक रिपोर्ट प्रसिद्ध केला. पं. मदन मोहन मालवीय यांनी वरिष्ठ का. कौन्सिलांत या संबंधाचा एक ठराव आणला होता. वरील रिपोर्ट प्रसिद्ध झाल्यामुळें तिकडील खरी खरी हकीकत लॉर्ड हार्डिंज यांना समजली. त्यांनीं पं. मालवीय यांच्या ठरावाला संमति दिली. परंतु " दुसरी व्यवस्था होण्यापूर्वीं मध्यें कांहीं काल जावाच लागेल " अशा अशुभ शब्दांचीं त्या बिलात त्यांनीं भर घातली. ही मजूर भरती आणखी पाच वर्षें चालत राहावी असा करार त्यांनीं खासगी रीतीनें कलोनियल ऑफिसशीं केला असेंही पुढें बाहेर आलें. या भरतीमुळें घोर अनीतीला उत्तेजन मिळतें व मजूर आत्महत्येलाही प्रवृत्त होतात हीं गोष्ट सिद्ध झाली असतांना हिंदुस्थान सरकारनें असा खासगी करार केला कीं नाहीं असा सरकारला त्यांनीं सवाल केला, व व्हाइट हॉलमधील इंडियन व कलोनियल या दोन्हीं खात्यांत असा करारनामा झाला व त्यावर सह्याही झाल्या, असें जेव्हा जाहीर करण्यांत आलें त्या वेळीं सर्व देशांत संताप व्यक्त करण्यात आला.

अशा परिस्थितींत खुद्द गांधींनींच हिंदुस्थानांतील उत्तर व पश्चिम भागांत या पद्धतीविरुद्ध चळवळ करण्यास सुरुवात केली. मिसेस बेझंट यांनीं मद्रासच्या भागांत या चळवळीला हात घातला. १९१७ च्या मार्च व एप्रिल महिन्यांत ही चळवळ परमावधीला पोंहोचली होती. ज्या कारणानें मिसेस बेझंट यांना १५ जून १९१७ रोजीं अटक करण्यात आली त्यापैकीं ही चळवळसुद्धां एक प्रमुख कारण असणें शक्य आहे. लॉर्ड चेम्सफर्ड यांनीं म. गांधी यांची मुलाखत घेऊन परिस्थिति समजून घेतली. आपल्या मजूर भगिनीतर्फे त्यांचें गाऱ्हाणें मांडण्या-

करितां हिंदी स्त्रियांचें एक शिष्टमंडळ व्हाइसरॉयांकडे गेलें होतें. ३१ मे १९१७ च्या आत ही पद्धति बंद न करण्यांत आल्यास या पुढील मजूरभरति बंद करण्याकरितां सत्याग्रहाचा अवलंब करण्यांत येईल असें महात्मा गांधींनीं जाहीर केलें. १२ एप्रिल (१९१७) रोजीं डिफेन्स ऑफ इंडिया अॅक्टान्वयें युद्ध-कालांतील जादा तरतूद या सदराखालीं हिंदुस्थानांतील सर्व ठिकाणची मजूर-भरती बंद केली. युद्ध बंद झाल्यानंतर साम्राज्यांतील वसाहती या प्रश्नाला पुन्हा चालना देतील हें उघड होतें, कारण या संबंधांत बरेंच भांडवल गुतून पडलें होतें. म्हणून मि. अँड्रयूज हे कवि सम्राट रवींद्रनाथ टागोर व महात्मा गांधी यांचा सल्ला घेऊन या प्रश्नासंबंधानें माहिती गोळा करण्याकरिताच पुन्हां फीजी बेटाकडे गेले. या ठिकाणीं त्यांनीं एक वर्ष घालविलें व पूर्वीच्या भेटीं पेक्षांही अधिक भयंकर माहिती त्यांनीं मिळविली. आस्ट्रेलियातील स्त्रीवर्गाला या पद्धतींतील नैतिक दोष दाखवून देऊन या चळवळीस त्याचा त्यांनीं पाठिंबा मिळविला. १९१८ मार्चमध्यें त्यांनीं मि. मॉटेग्यू यांची दिल्ली येथें भेट घेतली आणि ही पद्धती अत्यंत अनीतिमूलक आहे अशी त्यांचीही खात्री पटवून दिली. १९१९ सालीं ही पद्धति अजीबात बंद केल्याचें हिंदुस्थान सरकारनें जाहीर केलें व ज्यांची पांच वर्षांची मुदत भरावयाची होती त्यांना मुक्त करण्यांत आलें. यामुळें १ जानेवारी १९२० रोजीं फिजी, ब्रिटिश ग्वायना, ट्रिनिदाद, सुरीनाम, जमेका या वसाहतींतील हिंदी लोकांनीं सर्वत्र उत्सव करून आपला आनंद व्यक्त केला. १८३५ च्या सुमारास वसाहतींतून उसाच्या लागवडी करण्यांत आल्या, त्या वेळीं तिकडे मजूराचा पुरवठा करण्याकरितां ही पद्धति सुरू झाली होती. यापूर्वी १८३३ सालीं गुलामगिरीची पद्धति बंद होईपर्यंत आफ्रिकेंतील गुलामांना या मळ्यांतून राबविण्यांत येत होतें. जवळ जवळ गुलामगिरीसारख्याच असलेल्या या पद्धतीचा उसाची लागवड करण्याकरितां अवलंब करण्यांत येत होता. इतिहासकार सर डब्ल्यू. विल्सन यांनीं ही पद्धति म्हणजे अर्ध गुलामगिरीच होय असें म्हटलें आहे व तें अगदीं खरें होतें.

हंटर रिपोर्ट २८ मे १९२० रोजीं प्रसिद्ध झाला. कमिटीनें दिलेले अभिप्राय वाचून लोकांचीं मनें निराशेनें व तिरस्कारानें भरून गेलीं होतीं. हा रिपोर्ट एक-मतानें तयार झालेला नव्हता. इंग्रज व हिंदी समासदांत मतभेद झाला. पंजा-बांत झालेली दंगल ही पूर्वी ठरवून झालेलें बंड होतें किंवा एकाएकीं झालेला हा

स्फोट होता, ह्या प्रश्नावर मतभेद झाला. इंग्लिश सभासदांनीं पहिली बाजू घेतली व हिंदी सभासदानी दुसऱ्या दृष्टीनें आपला अभिप्राय व्यक्त केला. अर्थात्, लष्करी कायदा जाहीर करण्याचें कारण नव्हतें असें हिंदी सभासदांना वाटलें. शिवाय, युद्धाकरता पैसे गोळा करण्याच्या व लष्कर भरती करण्याच्या ओडवायर यांच्या जुलमी पद्धतीमुळेंच हे दंगे झाले असा त्यांनीं अभिप्राय दिला. पंजाबांतील बातम्या बाहेर पडूं न दिल्यामुळेही लोकांचा गैरसमज झाला असें त्यांनीं आपलें मत दिलें. अधिकाराचा दुरुपयोग केल्यामुळें व बेजबाबदारीच्या व अनुचित गोष्टी केल्यामुळें लष्करी कायद्याच्या कारभाराला काळीमा लागला. कोणताही जबाबदार मनुष्य जें कृत्य करणार नाहीं, असें अनवश्यक कृत्य जनरल डायर ह्यांनीं केलें; आणि साधी भूतदयेची बुद्धिदेखील त्यांनीं दर्शविली नाहीं असें ह्या हिंदी सभासदाचें मत पडलें, व हें मत सरकारनेंही मान्य केलें. लष्करी कायद्याच्या मुदतींत अन्याय्य शिक्षा देण्यात आल्या व काहीं बाबतींत बेसुमार निष्ठुरपणाचीं कृत्यें करण्यात आलीं. बेकायदेशीर हुकूम देण्यात आले ह्याबद्दल सरकारनें देखील पूर्ण नापसंती व्यक्त केली, व या कृत्याना जबाबदार असलेल्या अधिकाऱ्यांची कानउघाडणी करावी, किंवा इतर रीतीनें त्यांना शासन करावें असेंही सुचविण्यात आलें. " जनरल डायर ह्यांनीं जें कृत्य केलें तें शुद्ध हेतूनें व त्यांच्या बुद्धिला योग्य वाटलें तेच केलें, परंतु त्यांना त्यात तारतम्य राखता आलें नाहीं" असें मि. मॉंटेग्यू ह्यांनीं आपलें मत दिलें. मार्शल लॉ च्या बाबतींत पुढें उपयोगीं पडावे म्हणून काहीं नियम करण्यात यावे अशा सूचना हिंदुस्थान सरकारला करण्यात आल्या त्यामुळे हिंदी लोकाचें समाधान झालें असें म्हणतां यावयाचें नाहीं. त्याचप्रमाणें हंटर कमिटीनें दोषारोप ठेवलेल्या कांहीं अधिकाऱ्याच्या कृत्याची चौकशी या वेळेपर्यंत करण्यात आली होती, किंवा ह्या अधिकाऱ्यांपैकीं काहीं लोक हिंदुस्थान सोडून गेले होते तर कांहीं लोक सरकारी नोकरी सोडून गेले होते—एवढ्यानेंही पंजाबातील किंवा हिंदुस्थानांतील लोकांचें समाधान झालें असें म्हणता यावयाचें नाहीं. हंटर कमिशनचा रिपोर्ट प्रसिद्ध झाल्यानंतर बनारस येथें ३० मे रोजीं ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटीची सभा झाली. पंजाब प्रकरणासंबंधानें अत्यंत तीव्र निषेध व्यक्त करून हा प्रश्न कॉंग्रेसच्या जादा अधिवेशनाकडे सोंपवावा असें ह्या बैठकींत ठरविण्यात आलें. लो. टिळक ह्या वेळीं बनारसवरून गेले तरी ते ह्या बैठकीला हजर राहिले नाहीत. कारण शिला-

फतीची चळवळ त्यांना पूर्णपणें मान्य नव्हती. तथापि ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटी जे ठरवील त्या हुकूमाप्रमाणें वागण्यास आपण तयार आहोंत असें त्यांनीं सांगितलें. कॉंग्रेसच्या चळवळीच्या सवयानें त्यांच्या ठिकाणीं इतकी एकनिष्ठा व अभिमान वसत होता. खिलापत चळवळीशीं सलग्न असलेल्या असहकारीतेचा प्रश्न सर्वपक्षीय पुढाऱ्याच्या परिषदेपुढें विचाराकरिता ठेवावा अशी सूचना महात्मा गांधींनीं या वेळीं केली. पुढाऱ्यांची ही परिषद अलाहाबाद येथें २ जून १९२० रोजीं भरली. ह्या बैठकींत असहकारितेच्या धोरणाला मान्यता देण्यात आली व गांधी आणि कांहीं मुसलमान सभासद ह्यांची कमिटी नेमून या चळवळीचा कार्यक्रम आंखण्याचें काम ह्या कमिटीकडे सोंपविण्यात आलें. शाळाकॉलेजांवर व कोर्टावर बहिष्कार घालावा, असें ह्या कमिटीच्या रिपोर्टांत म्हटलें होतें. खरें पाहिलें असतां १९१९ च्या नोव्हेंबरमध्येंच दिल्ली येथें भरलेल्या खिलापत परिषदेंत गांधींच्या सल्ल्यावरून सरकारशीं कोणत्याही प्रकारचें सहकार्य करूं नये असा ठराव करण्यात आला होता. कलकत्ता व इतर ठिकाणीं भरलेल्या मुसलमानाच्या सभांतूनही ह्या ठरावांना पाठिंबा देण्यात आला होता. १७ एप्रिल १९२० रोजीं मद्रास येथें भरलेल्या खिलापत परिषदेंत असहकारितेची चढाईची योजना आंखण्यांत आली होती. पदव्या, नोकऱ्या, कौन्सिलचें सभासदत्व, मानाच्या जागा, पोलिस व लष्कर खात्यांतील जागाचा त्याग व करबंदी ह्या सर्व गोष्टींचा समावेश ह्या योजनेंत केला होता. १९२० च्या उन्हाळ्यात हीं परिस्थिति अत्यंत नाजूक झाली. खिलापत, पंजाब व अपुऱ्या सुधारणाचा गुप्त प्रवाह ही त्रिवेणी राष्ट्रीय असंतोषरूपी महापुरानें दुथडी भरून चालली. असहकारितेला ही परिस्थिति सर्वप्रकारें अनुकूल झाली होती. खुद्द लोकमान्यांनीं देखील ऑल इंडिया निकालाप्रमाणें वागण्याचें वचन दिलें होतें. परंतु ३१ जुलैच्या मध्यरात्रीं ते कालवश झाले. लो. टिळक गांधींच्या बरोबर असते तर एक प्रचंड शक्ति राष्ट्रांत निर्माण झाली असती, पण ते कालवश झाल्यामुळें गांधींना ह्या शक्तीला मुकावें लागलें. याच वेळीं मुसलमानांनीं देशत्याग करून अफगाणिस्थानात जाण्याच्या चळवळीला आरंभ केला होता. तुर्कस्थानशीं जशा प्रकारचा तह ब्रिटिशांनीं केला तो लक्षात घेता हिंदुस्थानात आपण राहूं शकत नाहीं असें त्यांना वाटलें. सिंधमध्ये ह्या चळवळीला आरंभ झाला व वायव्य प्रांतांत ती पसरली. कच्च्यागढी येथें लष्कर व हिजरातवाले ह्यांच्यांत झटापट झाली. ह्या

प्रकरणामुळें इतर लोक अधिकच बेफाम झाले, व ऑगस्टमध्यें जवळजवळ १८ हजार लोक अफगाणिस्थानास जाण्यास निघाले. पण लवकरच या यात्रेकरूंना आपल्या देशात येण्याची अफगाण सरकारच्या अधिकाऱ्यांनी मनाई केली, व पुष्कळ जीवितहानी व कष्ट सोसल्यानंतर ही हिजरातची कल्पना मागें पडली.

ऑगस्टमध्यें वरिष्ठ कायदेकौन्सिलच्या बैठकीस सुरवात झाली. असहकारितेची चळवळ यापूर्वींच सुरू झाली होती आणि या कौन्सिलमधील कांहीं सभासदांनीं आपल्या जागांचे राजीनामे दिले. असहकारितेच्या या धोरणामुळें देशांत खात्रीनें अव्यवस्था माजेल असें व्हाइसरॉयनीं जाहीर केलें होतें. इतकी निष्फळ व बदसल्लघाची दुसरी कोणतीच गोष्ट नाहीं असें ते म्हणाले. "सर्व मूर्खपणाच्या योजनांतील अत्यंत मूर्खपणाची योजना" असा अखेर त्यांनी ह्या चळवळीला शेरा मारला. नवीन असेंब्लीचें अनावरण करण्याकरिता प्रिन्स ऑफ वेल्स ह्यांचें आगमन व्हावयाचें होतें. पण ऑगस्ट महिन्यात हा बेत रहीत करण्यात आला. मुंबई येथील लिबरलांच्या परिषदेत मि. शास्त्री ह्यांनीं देखील युवराजाच्या आगमनाच्या या योजनेला विरोध केला होता. युवराजांच्या ऐवजीं ड्यूक ऑफ कॅनॉट ह्यानीं हिंदुस्थानात यावे असें नंतर ठरविण्यांत आलें. ह्या ऑगस्टमध्येंच डॉ. सप्रू ह्यांना व्हाइसरॉयांच्या एक्झीक्युटिव्ह कौन्सिलमध्यें सभासद म्हणून घेण्यांत आलें.

असहकारितेच्या चळवळीला १ ऑगस्ट रोजींच सामान्यतः आरंभ झाला. या वेळीं अलीबंधूंसह महात्मा गांधींनीं हिंदुस्थानभर दौरा काढला. लोकाना शिस्तीचें वळण लावावें व त्याचा उत्साह आवाक्याबाहेर जाऊ देऊ नये असा हा दौरा काढण्यात महात्माजींचा उद्देश होता. महात्मा गांधी हे आपल्या अनुयायांना नेहमींच ठपका देत असतात. पण जनसमुदायाच्या अविचारी कृत्याचें हे द्योतक आहे याचा पुरावा म्हणून सरकार नेहमींच महात्मा गांधींच्या या वचनांचा उपयोग करीत असतें. परंपरागत सनदशीर मार्गाचा त्याग करून एका नवीनच मार्गाचा स्वीकार करण्याचें कॉंग्रेसनें आता ठरविलें होतें. तेव्हा या महत्त्वाच्या प्रश्नाचा विचार जादा अधिवेशनातच करण्याचें ठरविण्यात आलें. हे जादा अधिवेशन भरविण्याचा विचार यापूर्वी मे महिन्यांतच ठरला होता. व त्याप्रमाणें कलकत्ता येथें १९२० च्या सप्टेंबरांत हें अधिवेशन भरलें. या अधिवेशनाचें काम ४ ते ९ सप्टेंबर म्हणजे जवळ जवळ ६ दिवस चालले होतें. नॉर्दर्न देशांतील

निरनिराळ्या प्रांतिक कॉंग्रेस कमिट्यांनीं असहकारितेच्या ह्या जळजळीत प्रश्नासंबधानें आपलीं मतें व्यक्त केलीं.

आंध्र व पंजाब कॉंग्रेस कमिटयांनीं जादा कॉंग्रेसनें असहकारितेची ही योजना मान्य करावी असें सुचविलें व या कार्यक्रमाच्या अंमलबजावणीला जादा अधिवेशनानंतरच सुरुवात करावी, असें आपलें मत दिलें. प्रचालित परिस्थितींत, असहकारिता हें एकच एक परिणामकारक शस्त्र लोकांच्या हातीं राहिलें आहे असें बंगालनें आपलें मत दिलें. पण मध्य-प्रांतांतील प्रांतिक कॉंग्रेस कमिटीप्रमाणें बंगाल कॉंग्रेस कमिटीनेंही नवीन सुरूं होणाऱ्या कायदेमंडळावर बहिष्कार घालणें अनुचित आहे असें आपलें मत व्यक्त केलें. उलट, कौन्सिलातील पुष्कळ जागा काबीज करून त्या ठिकाणीं असहकारितेचा अवलंब करावा अशी सूचना केली. बिहार व ओरिसा प्रांतानीं असहकारितेचें तत्त्व मान्य करून त्या प्रांताला अनुरूप असा कार्यक्रम तयार करण्याकरितां एक कमिटी नेमली. वऱ्हाड व मुंबईनें अंतःकरणपूर्वक ह्या तत्त्वाला पाठिंबा दिला. आणि जादा कॉंग्रेसनें नेमलेल्या कमिटीकडे ह्या योजनेचा तपशील तयार करण्याचें सोंपविलें. ब्रह्मदेशाला हीं योजना पसंत होती, परंतु ही चळवळ त्या प्रांतात व्यवहार्य नाहीं असें तेथील प्रा. कमिटीला वाटलें. मद्रासनें हें धोरण मान्य केलें, परंतु गांधींच्या कार्यक्रमाला विरोध केला. सिंधनें ह्या चळवळीला मान्यता देऊन चार सदरांखालीं या कार्यक्रमाचीं आखणी केली. परंतु लष्करातील शिपायानीं आपल्या नोकऱ्या सोडाव्या ह्या गोष्टीला आक्षेप घेतला. संयुक्त प्रांतानें असहकारितेला पाठिंबा देऊन एक विस्तृत कार्यक्रम आंखला. आणि त्यात ड्यूक ऑफ कॅनॉट ह्यांच्या आगमनावरील बहिष्काराची भर घातली.

सर्व प्रांतातून ह्याप्रमाणें पाठींबा मिळाल्यानंतर कलकत्ता येथें जादा अधिवेशनाला सुरवात झाली. हें अधिवेशन अभूतपूर्व व महत्त्वाचें असें झालें. बंगालचें गांधीशीं जमलें नाही. श्रीयुत चित्तरंजन दास ह्यांनीं गांधींच्या कार्यक्रमाला जोराचा विरोध केला. कौंसिल बहिष्कार व कोर्टावरील बहिष्कार ह्या कार्यक्रमाला त्याची संमती मिळाली नाहीं. कॉंग्रेसमध्यें जमलेल्या सभासदांपैकीं बहुसंख्यांक मत याच बाजूचें होतें, तथापि अगदीं थोड्या परंतु निर्णयात्मक अशा सात मताच्या बहुमतानें विषयनियामक कमिटींत हा ठराव पास झाला. ह्या ठरावामध्यें चढत्या पायरीनें बहिष्काराचा कार्यक्रम ठरविण्यांत आला होता.

असहकारिता ही अपरिहार्य गोष्ट आहे अशाच विचारानें त्या वेळचें वातावरण भरून गेलें होतें. हिंदुस्थानसरकारनें हंटर कमिटींतील बहुमताचा रिपोर्ट अंधळेपणानें मान्य केला होता. व अधिकाऱ्यांच्या दुष्कृत्यांवर पांघरूण घालण्याचें ठरविलें होतें. "जनरल डायरच्या बुद्धीनें तारतम्याची चूक केली म्हणून त्याच्या हातून हें कृत्य घडलें. त्या वेळच्या परिस्थितीच्या दृष्टीनें त्याचें हें कृत्य अतिरेकाचें होतें. परंतु कर्तव्याच्या प्रामाणिक पण चुकीच्या कल्पनेनें त्यानें हें कृत्य केलें" असें जनरल डायर ह्याच्या वर्तनावर सरकारनें पांघरूण घातलें. मि. मॉंटेग्यू ह्यानीं वेंगळेपणानें ह्या शिफारशींना अनुमोदन दिलें. त्यांनीं पंजाबातील अधिकाऱ्याच्या दुष्कृत्यांबद्दल त्यांना दोष दिला, परंतु "जनरल डायर हा प्रामाणिक हेतूनें प्रेरित झाला होता व निष्ठावंत कर्तव्यबुद्धीने त्यानें हें कृत्य केलें" असा आपला अभिप्राय दिला. जनरल डायर ह्याच्या बाबतींत अन्याय्य करण्यांत येत आहे, अशा प्रकारची कॉमन्स सभेंत चर्चा झाली. लॉर्डांच्या सभेंत लॉर्ड फिन्ले यानीं आणलेला ठराव चुकीचा, एक पक्षीय, व असत्य माहितीनें भरलेला असा होता. एकदरींत ह्या चर्चेमुळे हिंदी लोकाचे हक्क, व त्याचे स्वातंत्र्य ह्यासंबंधानें अविश्वासच दर्शविण्यांत आला. ब्रिटिश सरकारचें हें धोरण, खिलापतीचा अन्याय, व सुधारणा-कायदा ह्या तीन गोष्टींनी कलकत्त्याच्या ठरावात जहाल शब्दाची योजना करण्यास कारणीभूत झाल्या.

कॉंग्रेसच्या जादा अधिवेशनाचें काम कलकत्ता येथें ४ ते ९ सप्टेंबर १९२० पर्यंत चाललें होतें. ह्या अधिवेशनाचें वेळीं अपूर्व उत्साह दिसून आला. मि. बी. चक्रवर्ती हे स्वागत मंडळाचे अध्यक्ष होते. लाला लजपतराय अमेरिकेहून नुकतेच परत आले होते. व त्याना ह्या अधिवेशनाचें अध्यक्ष निवडले होते. कॉंग्रेसनें पहिल्या ठरावानें लो. टिळक ह्यांच्या मृत्यूबद्दल दु:ख प्रदर्शित केलें. निष्कलंक जीवन, राष्ट्राकरिता त्यांनीं सोसलेले कष्ट, त्याची निष्ठावत लोकहितबुद्धि व राष्ट्रीय स्वातंत्र्यासाठी त्यानीं चालविलेला अविश्रांत लढा, या लोकमान्याच्या गुणांचा या ठरावांत उल्लेख केला होता व त्याचें कृतज्ञतापूर्ण स्मरण राष्ट्राच्या भावी पिढ्यांना स्फूर्तीदायक होईल असें त्यांत म्हटलें होतें. डॉ. महेंद्रनाथ हुदेदार यांच्या मृत्यूबद्दलही दुखवट्याचा ठराव पास करण्यात आला.

कॉंग्रेसनें नेमलेल्या पंजाब चौकशी कमिटीनें अत्यंत परिश्रमपूर्वक व न्यायबुद्धीनें पुरावा गोळा करून रिपोर्ट लिहिला, याबद्दल दुसऱ्या ठरावान कमिटीचे

आभार मानण्यांत आले. या रिपोर्टाला कमिटीनें मिळविलेल्या पुराव्यानें व शिवाय हंटर कमिशनपुढें आलेल्या पुराव्यानेंही पुष्टि मिळाली आहे, व कमिटीला जी प्रत्यक्ष माहिती मिळाली तिला अनुसरूनच कमिटीनें आपले निर्णय दिले आहेत, असा अभिप्राय या ठरावांत व्यक्त केला.

(अ) हंटर कमिटींतील बहुमतानें दिलेलें निर्णय, त्यांची वृत्ति, त्यांचें धोरण व त्यांच्या भावना याबद्दल तीव्र निराशा व्यक्त करून बहुमताच्या या निर्णयाबद्दल पूर्ण मतभेद व्यक्त करण्यांत आला.

(ब) ही कॉंग्रेस पुढील बाबतींत आपलें स्पष्ट मत व्यक्त करीत आहे,

(१) हंटर कमिटीचा रिपोर्ट जातीय मत्सर व पूर्वग्रह यानीं विटाळलेला आहे. पुढें आलेल्या पुराव्याचा पूर्ण विचार या कमिटीनें केलेला नाहीं. सरकारी अधिकाऱ्यांच्या उघड उघड विषमतामूलक वर्तनावर पांघरूण घालण्याचा व पंजाब सरकार व हिंदुस्थान सरकार यांच्या धोरणावर सफेती चढविण्याचा या कमिटीनें प्रयत्न केला आहे.

(२) अपूर्ण, एकपक्षीय व स्वार्थबुद्धीनें दूषित, अशा पुराव्यावर हा रिपोर्ट तयार झाला असल्यामुळें तो ग्राह्य व विश्वासार्ह नाहीं.

(३) प्रत्यक्ष जो पुरावा मिळाला त्या दृष्टीनें सुद्धां बहुमतानें केलेले निर्णय समर्थनीय ठरत नाहींत. आणि या प्रकरणाच्या बाबतींत ज्या कमींत कमी न्याय्य गोष्टींचा विचार करावयास पाहिजे तितका न झाल्यामुळें कमिटीनें केलेल्या शिफारशी दोषपूर्ण आहेत.

(क) हिंदुस्थान सरकारनें हंटर कमिटीच्या दोन्हीं रिपोर्टासंबंधानें जे विचार प्रदर्शित केले आहेत त्याबद्दल ही कॉंग्रेस पुढीलप्रमाणें आपलें स्पष्ट मत व्यक्त करीत आहे.

(१) बहुमतानें दिलेल्या निर्णयाची चाळणी न करतां व तारतम्य बुद्धि न वापरतां सरकारनें ते मान्य केले आहेत.

(२) अल्पमतवाल्यांनीं दिलेल्या निर्णयाचा व कार्यकारणांचा—प्रत्यक्ष पुढें आलेल्या पुराव्यावरून सिद्ध झालें असतांही—सरकारनें पुरेसा विचार केलेला दिसत नाहीं.

(३) सरकारनें या बाबतींत केलेल्या विचाराच्या मुळाशीं या प्रश्नाचा न्याय्य व निःपक्षपातीपणानें विचार व्हावा अशी बुद्धि दिसत नाहीं. तर हें सर्व प्रकरण

जेथल्या तेथें गुपचुप मिटवून टाकावें व अधिकाऱ्यांच्या दुष्कृत्यांवर पांघरुण घालावें असा सरकारचा कल दिसतो.

( ४ ) या प्रकरणांत ज्या गोष्टी उजेडात आल्या, त्याचें गांभीर्य लक्षांत घेतां गुन्हेगार अधिकाऱ्यांच्या बावतींत सरकारनें जें शासन करण्याचें सुचविलें आहे तें अत्यंत अपुरें आहे; व त्यामुळें ब्रिटिश न्यायावरील लोकांच्या विश्वासाला जबरदस्त धक्का बसला आहे.

तिसरा ठराव पंजाब प्रकरणासंबंधाचाच होता. ब्रिटिश प्रधानमंडळानें पंजाबांतील अत्याचाराच्या बाबतींत योग्य तें धोरण स्वीकारलें नाहीं, हिंदुस्थान सरकारच्या शिफारशींना संमति दिली, व सरकारी अधिकाऱ्यांच्या दुष्कृत्यांबद्दल जवळ जवळ त्यांना क्षमाच केली, याबद्दल पूर्ण निराशा या ठरावात व्यक्त करण्यात आली.

सरकारनें प्रसिद्ध केलेल्या खलित्यांत उदात्त व सुंदर भावना व्यक्त केल्या तरी, या बावतींत योग्य तीं अमलबजावणी न केल्यामुळें ब्रिटिश राज्यकारभारावरचा हिंदुस्थानचा विश्वास उडाला आहे.

परंतु या अधिवेशनातील मुख्य ठराव असहकारितेसंबधाचा होता. महात्मा गांधींनीं हा ठराव मांडला व तो १८८६ विरुद्ध ८३४ मतांनीं पास झाला. हा ठराव पुढीलप्रमाणें होता.

" खिलाफत प्रकरणामुळे उत्पन्न झालेल्या परिस्थितींत हिंदुस्थानांतील मुसलमानांच्या बावतींत हिंदुस्थानसरकारनें व साम्राज्यसरकारनें आपलें कर्तव्य योग्य रीतीनें बजावलें नाहीं. मुख्य प्रधानांनीं त्यांना दिलेलें अभिवचन उघड उघडपणें मोडलें आहे. अशा परिस्थितींत आपल्या मुसलमान बांधवांवर कोसळलेलें हें धार्मिक संकट निवारण्याच्या कामीं हिंदुस्थानातील प्रत्येक मुसलमानेतर हिंदी इसमानें त्यांना मदत करणें हें त्याचें कर्तव्य आहे.

शिवाय १९१९ च्या एप्रिलमध्यें पंजाबांतील निरपराधी लोकांवर झालेल्या जुलुमापासून व अत्याचारापासून रक्षण करण्याच्या बावतींत सरकारनें पूर्ण टाळाटाळ केली आहे. लष्करी बाण्याला न शोभेल अशा रीतीनें सरकारी अधिकाऱ्यांनीं पंजाबांतील लोकांशीं जें रानटी वर्तन केलें त्याबद्दल त्यांना शासन केलें नाहीं. सरकारी अधिकाऱ्यांनीं जे गुन्हे केले त्या बहुतेक गुन्ह्यांबद्दल सर मायकेल ओडवायर हेच प्रत्यक्षपणें जबाबदार होते हें सिद्ध झालें आहे. त्यांनीं

आपल्या ताब्यांतील प्रजाजनांच्या हालअपेष्टांकडे दुर्लक्ष केलें आहे; असें असतांना या दोन्हीं सरकारांनीं त्यांना दोषमुक्त ठरविलें आहे. आणि लॉर्डांच्या सभेंत जी चर्चा झाली तींत हिंदुस्थानांतील लोकांसंबंधानें यत्किंचितही सहानुभूति दिसून आली नाहीं. पंजाबमध्यें अगदीं पद्धतशीर रीतीनें लोकांवर जी दडपशाही करण्यांत आली व तेथील लोकांवर दहशत घालण्यात आली, त्याकडे दुर्लक्ष करण्यात आलें. आणि व्हाइसरॉयानीं नुकताच जो जाहीरनामा प्रसिद्ध केला आहे, त्यावरून पंजाब व खिलाफत प्रकरणाच्या बाबतींत सरकारला मुळींच पश्चाताप झालेला दिसत नाहीं.

वरील दोन्ही अन्यायांचें जोंपर्यंत परिमार्जन करण्यांत आलेलें नाहीं, तोंपर्यंत हिंदुस्थानांत शांतता राहणें शक्य नाहीं. या राष्ट्रीय अपमानाबद्दल भरपाई करण्याचा आणि भावी कालांत असले अन्याय पुन्हां होणार नाहींत याबद्दल प्रतिबंधक तजवीज करण्याचा एकच एक परिणामकारक उपाय म्हणजे हिंदुस्थानात स्वराज्याची प्रस्थापना करणें हा होय, असें या कॉंग्रेसचें मत आहे. अशा परिस्थितींत महात्माजींनीं सुचविलेल्या अहिंसामय असहकारितेच्या चढत्या कार्यक्रमाचा स्वीकार करणें व हे अन्याय दूर होऊन व स्वराज्याची प्रस्थापना होईपर्यंत त्यासबंधाची चळवळ चालविणें हा एकच एक मार्ग कॉंग्रेसला व लोकांना मोकळा राहिला आहे, असें ही कॉंग्रेस आपलें मत प्रकट करीत आहे. या चळवळीला वरच्या वर्गातील लोकांनीच आरभ करावा या दृष्टीनें तिची आंखणी केली आहे शाळा कॉलेजावरील नियत्रणाने, न्यायकोर्टें व कायदेमडळें यांच्या सहाय्यानें व लोकाना मानाच्या जागा व पदव्या देऊन, सरकार आपली सत्ता दृढमूल करते, हें लक्षांत घेऊन उद्दिष्ट हेतु साध्य करण्याकरिता कमींत कमी स्वार्थत्याग व धाडस करावें लागेल याच दृष्टीनें ही कॉंग्रेस लोकाना पुढील प्रमाणें कळकळीची विनति करीत आहे.

( अ ) पदव्या व मानाच्या जागा याचा त्याग करावा. स्थानिक संस्थेंतील सरकारनियुक्त जागांचा राजीनामा द्यावा.

( ब ) सरकारी दरबार, लेव्ही व सरकारी अधिकाऱ्यांनीं केलेले व त्यांच्या सन्मानार्थ भरविलेले सरकारी व निमसरकारी समारंभ यांना हजर राहण्याचें नाकारावें.

( क ) सरकारी किंवा सरकारच्या मदत घेणाऱ्या शाळा-कॉलेजांतून आपलीं

मुलें हळू हळू काढून घ्यावीं. व त्यांच्या जागी निरानिराळ्या प्रांतातून शाळा व कॉलेजें प्रस्थापित करावीं.

( ड ) ब्रिटिश कोर्टांवर वकिलांनीं व त्यांच्या पक्षकारांनीं हळू हळू बहिष्कार घालावा. व खासगी पंचायत-कोर्टें स्थापन करून त्याच्या साहाय्याने आपले भांडण-तंटे मिटवावे.

( इ ) मेसापोटेमियांतील लष्करी कामाकरितां कारकून व मजूर वर्गाच्या लोकांनीं भरती होण्याचें नाकारावें.

( एफ् ) सुधारणा कायद्यान्वयें सुरूं होणाऱ्या कौन्सिलाकरितां उभे राहिलेल्या उमेदवारांनीं आपलीं नांवें परत घ्यावीं, व कॉंग्रेसच्या विनतीला मान न देतां जे उमेदवार या कौन्सिलाकरिता उभे राहतील त्यांना मतदारांनीं मतें देऊ नयेत.

( जी ) परकीय मालावर बहिष्कार घालावा.

शिस्त व स्वार्थत्याग यांच्या पायावर असहकारितेच्या कार्यक्रमाची उभारणी करण्यात आली आहे. हे गुण अंगीं आल्याशिवाय कोणत्याही राष्ट्राला खरी प्रगति करतां यावयाची नाहीं, हें लक्षात घेऊन व या चळवळीत भाग घेण्याची संधि हिंदुस्थानातील प्रत्येक स्त्री-पुरुषाना व मुलांना मिळावी या हेतूने मोठ्या प्रमाणावर स्वदेशी चळवळीचा पुरस्कार करावा असें या कॉंग्रेसचे मत आहे. हिंदुस्थानांतील सध्याच्या गिरण्या पुरेसे सूत व कापड तयार करू शकत नाहींत असें अनुभवास आल्यामुळे सूत काढण्याच्या व कापड विणण्याच्या घरगुती धंद्याला उत्तेजन द्यावें, व लाखों बेकार विणकऱ्याना काम द्यावें, अशीही या कॉंग्रेसची विनति आहे.

या ठरावावर कडाक्याचा वादविवाद झाला. बाबू बिपीनचंद्र पाल यांनीं पुढील उपसूचना कॉंग्रेसपुढें मांडली व तिला देशबंधु दास यांनीं पाठिंबा दिला:—
" हिंदुस्थानची गाऱ्हाणी पुढें मांडण्याकरतां व हिंदुस्थानाला तावडतोब स्वायत्त-स्वराज्याचे हक्क द्यावे अशी मागणी करण्याकरता हिंदुस्थानातून येणाऱ्या शिष्ट-मंडळाचें स्वागत करावें अशी विनति मुख्य प्रधानाना करण्यात यावी. मुख्य प्रधानानीं या मंडळाचें स्वागत करण्याचें नाकारलें किंवा १९१९ च्या सुधारणा कायदा बाजूला ठेऊन त्याच्या ऐवजीं पूर्ण स्वराज्याचे हक्क हिंदुस्थानास देण्याचा इन्कार केला, तरच असहकारितेच्या उपायाचा अवलंब करावा. असें केल्यास हिंदुस्थान यापुढें परतंत्रच राष्ट्र या नात्यानें परकीय सत्तेखालीं राहण्यास तयार

नाहीं, या बद्दल ब्रिटिश लोकांच्या मनांत यत्किंचित्‌ही शंका राहणार नाहीं. या सर्व गोष्टी घडून येईपर्यंत महात्मा गांधींच्या कार्यक्रमाचा एक प्रातिनिधीक कमिटी नेमून विचार करावा व तिच्या मार्फत राष्ट्राची तयारी करण्याच्या दृष्टीनें चळवळ करावी."

बराच वेळ व आस्थापूर्वक विचार झाल्यानंतर महात्मा गांधींचा हा ठराव पास झाला.

या ठिकाणीं जातां जातां हें सांगितलें पाहिजे कीं, स्थानिक स्वराज्य संस्थांवर बहिष्कार घालावा ही गोष्टही वरील कार्यक्रमांत महात्मा गांधींनीं समाविष्ट केली होती, परंतु, कांहीं मित्रांच्या इच्छेला मान देऊन त्यानीं हें कलम काढून टाकलें. या कार्यक्रमाबाबत मतभेद झाला, तरी राष्ट्रीय पक्षाचे लोक कॉंग्रेसला एकनिष्ठ राहिले. अमृतसर कॉंग्रेसच्या ठरावानुसार पुष्कळ राष्ट्रीय पक्षाचे लोक आगामी सुधारलेल्या कौन्सिलाकरितां उमेदवार म्हणून उभे होते. पुष्कळ वेळ, श्रम व पैसा त्यांनीं या निवडणुकीच्या चळवळीकरतां खर्च केला होता; तथापि वरील ठराव झाल्याबरोबर ताबडतोब त्यांनीं आपल्या उमेदवाऱ्या परत घेतल्या. मतदारांपैकीं, शेंकडा ऐंशी मतदारांनीं कॉंग्रेसच्या निर्णयाला मान दिला व त्यांनीं निवडणुकीच्या वेळीं आपलीं मतें कोणालाच दिलीं नाहींत व पुष्कळ ठिकाणांहून मतदानाच्या रिकाम्या पेट्या परत पाठवाव्या लागल्या. खुद्द सरकारनेंही या बाबतींत पुढीलप्रमाणें आपली कबुली दिली आहे:—" मि. गांधींच्या असहकारितेच्या कार्यक्रमांतील नव्या कौन्सिलावरील बहिष्काराचा हिंदुस्थानच्या पुढील थोड्या वर्षांच्या इतिहासांवर प्रभावी परिणाम झाल्याशिवाय राहणार नाहीं. लोकांच्या दृष्टीनें प्रमुख मानल्या गेलेल्या व पुढारलेल्या मतांच्या लोकांना या नव्या कौन्सिलमध्यें येण्याचा प्रतिबंध झाल्यामुळें देशांतील नेमस्तांना आतां मोकळें रान मिळेल."

नोव्हेंबरच्या प्रारंभीं या चळवळीच्या बाबतींत आपलें नक्की धोरण कोणत्या प्रकारचें राहील हें स्पष्ट करणें सरकारला इष्ट वाटलें. " या चळवळीच्या पुरस्कर्त्यांनी मुळांत ज्या मर्यादा घालून दिल्या आहेत त्यांचे ज्यांनीं उल्लंघन केले आहे, भाषण व लेखन यांच्या द्वारा लोकांना अत्याचारास उघड उघड प्रवृत्त केले आहे व लष्करांतील व पोलिसातील लोकांत फितवाफितवी केली आहे अशा लोकावर खटले भरावे अशा सूचना स्थानिक सरकारांना हिंदुस्थान

सरकारनें दिल्या. वरच्या वर्गातील लोक व बहुजन समाजही शहाणपणानें हा असहकारितेचा कार्यक्रम वेडेपणाचा व भ्रामक आहे असें समजून त्यांचा त्याग करील, असा विश्वास सरकारनें प्रगट केला. हा कार्यक्रम यशस्वी झाला तर सर्वत्र अस्वस्थता माजेल व ज्यांना देशांत कांही मानाचें स्थान आहे अशा सर्व लोकांचा यामुळें सत्यानाश होईल असेंही आपले मत सरकारनें प्रसिद्ध केलें. असहकारितेच्या चळवळीमुळें पूर्वग्रह व अज्ञान यांच्याच प्रसाराचें कार्य होईल आणि त्यांत विधायक कार्यक्रमाचे मुळींसुद्धां बीज-जतु नाहींत असें सरकारचे म्हणणें होतें.

देशांत या वेळीं एक नवीन वातावरण पसरलें होतें. युगायुगें चालूं असलेल्या लोकाच्या सवयीच्या राजकीय चळवळीच्या पद्धतींत वदल घडून आला होता. पंजाब प्रकरणाच्या बाबतींत पार्लमेंटला पाठविण्याचा अर्ज तयार करण्याकरिता १९२० मे मध्यें एक कमिटी नेमली त्या कमिटीनें या बाबतींत कांहींच काम केलें नव्हतें. सुधारणाच्या बाबतींत मतभेद झाल्यामुळें १९१८ पासून कॉंग्रेसनें ब्रिटिश कॉं. कमिटीला खर्चाकरितां पैसे पाठविले नव्हतें. याच मतभेदामुळें कॉंग्रेस डेप्युटेशन व मिसेस बेझंट यांच्यात १९१९ सालीं इंग्लंडमध्यें जोराचा व द्वेषमूलक वाद चालूं होता. कॉंग्रेसच्या राजकारणात याप्रमाणें दोन पक्ष पडून त्याच्यात झगडे सुरूं झाल्यामुळें मजूर पक्षांमधील व इंग्लंडमधील आपल्या मित्राना कॉंग्रेस मुकली. शेवटीं ब्रि. कॉ. क. नें कॉंग्रेसनें घातलेल्या अटीं मान्य केल्या. व पहिल्या प्रमाणें ही कमिटी कॉंग्रेसच्या नियंत्रणाखालीं काम करू लागली. ब्रि. कॉ. कमिटीच्या स्टाफवर ऑ. इं. कॉं. क. नें निवडलेला इसम ठेवावा असा एक करार ब्रि. कमिटी व कॉंग्रेस याच्यात झाला होता. पण कमिटीनें हा करार पाळला नाहीं व स्वतःच एक हिंदी इसम ह्या जागीं निवडला. कॉंग्रेसनें. ह्या बाबतींत पुष्कळ तक्रार केली पण ब्रि. कॉं. कमिटीनें तिला दाद दिली नाहीं. यामुळें " इंडिया " पत्र बंद करण्यात यावें असें निश्चितपणें ठरविण्यात आलें.

२ ऑक्टोबर १९२० रोजीं ऑ. इं. कॉंग्रेस कमिटीची सभा भरली. (१) ऑ. इं. टिळक मेमोरियल फंड व (२) स्वराज्य फंड असे दोन फंड जमा करण्याचे या सभेंत ठरविण्यांत आलें. परंतु हा ठराव डिसेंबर १९२० पर्यंत कॉंग्रेसच्या दप्तरात तसाच पडून राहिला. असहकारितेच्यासंबंधानें नवे ठराव

बंगालला व महाराष्ट्राला पसत पडले नाहींत. लोकमान्य टिळक यांचे सहकारी मि. जी. एस्. खापर्डे यांनी या वेळीं एक पत्रक प्रसिद्ध केलें. कलकत्ता येथील जादा कॉंग्रेसमध्ये जे ठराव झाले त्यामुळें कॉंग्रेसची शक्ति, आत्मबल संपादन व नैतिक सामर्थ्यसंवर्धन याकडे लागली आहे, आणि राजकारणाकडील तिचें लक्ष कमी झालें आहे. सरकारशीं संबध ठेवण्याचें टाळल्यामुळें शांततेनें पण निश्चित बुद्धीनें व शिस्तीनें सरकारविरुद्ध भरीव झगडा चालू ठेवण्याकरितां अवश्य असलेला राजकारणी स्वभाव व मनोवृत्ती निर्माण होण्यास लागणारें शिक्षण त्यामुळें मिळत नाहीं. असहकारितेचा ज्या रितीनें आज उपदेश करण्यात येत आहे त्यामुळें कष्ट सहन करण्याची शक्ति वाढेल. परंतु राजकीय झगडा चालविण्याकरितां लागणारें व्यावहारिक शहाणपण व कुशाग्र बुद्धि याची प्राप्ती व्हावयाची नाहीं. ज्या तीन बहिष्कारासंबधीं आज शिफारस करण्यात आली आहे ते निष्फळ आहेत. राजकीय धोरणाशीं त्याचा दुरून देखील संबध येत नाहीं. ऑ. इं. होमरूल लीगच्या ध्येयाला आज जें स्वरूप दिलें आहे, त्यावरून ही गोष्ट आता सिद्ध झाली आहे या लीगला 'स्वराज्य सभा' असें नवीन नाव देण्यात आले आहे. या सभेपुढें जे ध्येय ठेवण्यात आलें आहे त्यावरून एकतंत्री व व्यक्तिविषयक सत्ता प्रस्थापित करण्याकडे या सभेच्या पुरस्कर्त्यांचा कल दिसत आहे या सभेच्या कार्यक्रमाचीं सर्व सूत्रें एका नैतिक दृष्ट्या अत्यंत थोर व महात्मा व्यक्तीकडे असलीं तरी आजच्या युगप्रवृत्तीला ही गोष्ट विरुद्ध आहे. या पत्रकावर १० डिसेंबर १९२० ही तारीख होती. पण नागपूर कॉंग्रेसच्या आदले दिवशीं हें पत्रक प्रसिद्ध झालें. या पत्रकात होमरूल लीगच्या ध्येयामध्यें बदल करण्यात आला व स्वराज्य सभेत तिचे गांधींनीं रूपांतर केले या गोष्टीकडे लक्ष वेधण्यात आलें होतें. वस्तुस्थिती अशी होती कीं, कलकत्ता येथें असहकारितेचें भविष्य अनिश्चित असताना गांधीजींनीं जुन्या होमरूलच्या पुरस्कर्त्यांना—मिसेस बेझंट यांनीं या लोकांशीं असलेला आपला संबंध आतां तोडला होता—एका सामान्य निशाणाखालीं आणलें व या लीगच्या ध्येयात बदल केला. हेंच ध्येय पुढें नागपूर कॉंग्रेसमध्यें मान्य करण्यांत आलें. गांधीजींनीं या लीगचें पूर्वीचें नांव बदलून तिला स्वराज्य सभा असें नवीन नांव दिलें. कलकत्ता येथें असहकारितेच्या तत्त्वाला मान्यता देण्यांत आली व नागपूरनें त्याला बळकटी आणली. यामुळें या सभेचें यापुढें कांहींच काम राहिलें नाहीं. दैवाची विचित्र गोष्ट ही

कीं, असहकारितेचा ठराव एकामागून एक दोन कॉंग्रेसच्या अधिवेशनांतून मान्य करण्यात आला. पण हे दोन्ही प्रांत या चळवळीला अगदी कट्टर विरोधी होते.

## नागपूर कॉंग्रेस १९२०

असहकारितेच्या कार्यक्रमावर अखेरची चर्चा होऊन त्याचा निर्णय नागपूर कॉंग्रेसमध्यें व्हावयाचा होता. या कॉंग्रेसला आलेल्या प्रतिनिधींची संख्या प्रचंड होती. या कॉंग्रेसच्या पूर्वी किंवा नंतर इतके प्रतिनिधी कोणत्याही कॉंग्रेसला हजर राहिले नव्हते. १४५८२ प्रतिनिधी या कॉंग्रेसला उपस्थित होते. त्यांपैकीं १०५० मुसलमान व १६९ स्त्रिया होत्या. सालेमचे मि. सी. विजयराघवाचार्य हे या अधिवेशनाचे अध्यक्ष होते. क. वेजवुड, मि. हॉलफर्ड नाईट आणि मि. वेनस्पूर हे इंग्लंडच्या लेबर पार्टीचे प्रतिनिधी म्हणून कॉंग्रेसला हजर होते. त्यांनीं लेबर पार्टीतर्फे कॉंग्रेसचें अभिनंदन केलें व कॉंग्रेसच्या चळवळीला आपली सहानुभूती आहे असें बोलून दाखविलें.

कलकत्त्याच्या जादा अधिवेशनाचें अध्यक्षस्थान असहकारितेचे कट्टे विरोधी असलेले लाला लजपतराय यांना दिले होतें. लजपतराय हे एक मोठे सामाजिक सुधारक होते. शैक्षणिक सुधारणा व त्याचा प्रसार या बाबतींतही त्यांनीं बरेंच कार्य केलें होतें. त्यांनीं दयानंद ॲंग्लो वैदिक कॉलेज स्थापन केलें गुरुकुल स्थापन केलें नाहीं. सर्व आयुष्यभर सरकारनें त्यांना आपल्यापासून तोडून दूर ठेविलें, त्यांच्यावर वहीम घेतले, त्यांच्यावर देखरेख ठेवली व महायुद्धाच्या वेळीं सरकारनें जवळजवळ त्यांना हद्दपारही केलें. तथापि सरकारशीं संबंध तोडावा या गोष्टीवर त्यांचा विश्वास बसला नाहीं. स्वामी श्रद्धानंदांनी मात्र या नवीन चळवळीला सर्वस्वी वाहून घेतलें. नागपूर कॉंग्रेसचे अध्यक्ष मि. सी. विजयराघवाचार्य यांचीही अशीच गोष्ट होती. केवळ पंजाब प्रकरण आणि खिलाफतचा अन्याय यांच्याच बाबतींत चळवळ करावयाची एवढाच असहकारितेच्या चळवळीचा हेतू असता कामा नये. या उद्दिष्टांत "स्वराज्य-चाही" समावेश करण्यांत आला पाहिजे असें मि. विजय राघवाचार्य यांचें म्हणणें होतें. म. गांधींनीं त्यांची ही सूचना तावडतोब मान्य केली. रौलेट ॲक्ट, खिलाफतचा अन्याय व पंजाबचे अत्याचार या बाबतींत सत्याग्रह, निःशस्त्र प्रतिकार किंवा असहकार या मार्गानें आपण आपलें ध्येय संपादन

केल्यावर राष्ट्रामध्यें सहजच आत्मविश्वास उत्पन्न होईल. ट्रान्सवॉल व चंपारण्य यांच्या बाबतींत हाच अनुभव आला आहे. याप्रमाणें एकदां आत्मविश्वास निर्माण झाल्यावर राष्ट्र एवढ्यावरच थांबून रहाणार नाहीं. अशी मि. विजयराघवाचार्य यांची तर्कशुद्ध विचारसरणी होती. नागपूर येथें गांधींना एका गोष्टीची अनुकूलता होती. मि. विजयराघवाचार्य हे असहकारितेच्या बाबतींत भिळमिळीत असले तरी त्यांनीं निष्प्रतिकार बुद्धीनें गांधींशीं सहकार्य केलें. आणि ज्या ज्या वेळीं त्यांना संमत नसलेला ठराव काँग्रेसच्या खुल्या अधिवेशनांत आला त्या त्या वेळीं आपल्या अध्यक्षपदाच्या ते त्याग करीत असत.

देशबंधू दास हे पूर्व बंगाल व आसाम मधून २५० प्रतिनिधींच्या तुकडीसह नागपूर कॉंग्रेसला आले होते. या सर्व प्रतिनिधींचा जातायेताचा खर्च त्यांनीं सोसला. कलकत्त्यांत जें सफल झालें तें नागपूरला निष्फळ ठरविण्याकरितां त्यांनीं आपल्या खिशांतले ३६००० रु. खर्च केले होते. देशबंधू दास याचे लोक व त्यांचे विरोधी बाबू जितेंद्रनाथ बानर्जी यांची मंडळी याच्यांत एक लहानशी झटापटही झाली. महाराष्ट्राचा विरोधही काहीं कमी तीव्र नव्हता किंवा कमी संघटित नव्हता. क. वेजवूड, मि. वेनस्पूर व मि. हॉलफर्ड नाईट हे विषय नियामक मंडळाच्या सभेला उपस्थित होते. क. वेजवूड यांनी असहकारितेविरुद्ध सर्व बुद्धिसामर्थ्य खर्ची घातलें पण त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. खादीचें कलम अधिक सक्तीचें करण्यांत आलें, असहकारितेच्या ठरावाला पुनः पाठिंबा देण्यांत आला, राजकीय चळवळ करताना सनदशीर मार्गाचें अवलंबन व ब्रिटिश साम्राज्याशी असलेला संबंध या बाबतींत काँग्रेसनें जाहीर केलेल्या निष्ठेचें उच्चाटण होईल अशा प्रकारचा फेरबदल कॉंग्रेसच्या ध्येयात करण्यांत आला. या फेरफाराचा सरकारनें असाच अर्थ लावला. ह्या अधिवेशनांत गांधींचा वैयक्तिक विजय झाला. काँग्रेसचे मूळ संस्थापक व पुढारी वगैरे जुने लोक मागे पडले. "इतक्या अधिकार वाणीनें बोलणारा पुरुष कोण व तो कोठून आला" असे ते आश्चर्यचकित होऊन स्वतःस व एकमेकांना विचारूं लागले. पाल व मालवीय, जिना व खापर्डे यांच्या सारखे मुरलेले पुढारीव दास व लालाजी यांच्यासारखे शूर पुढारी मागे पडले. अशा परिस्थितींत आमच्या राजकीय पुढाऱ्यांच्या उमद्या व थोर स्वभावामुळेंच मत्सराची भावना वृद्धिंगत होण्यास वाव मिळाला नाहीं. नागपूर काँग्रेसमध्यें काँग्रेसच्या घटनेंत व ध्येयांत

समूळ फेरफार करण्यात आले. असहकारितेच्या ठरावाला मान्यता देणें ही या कॉंग्रेसमधील स्वतन्त्र घटना होती. व विशेष हा कीं, हा ठराव देशबंधू दास यानीं मांडला व लाला लजपतराय यांनीं त्याला दुजोरा दिला.

नागपूरला कलकत्त्यापेक्षांहि महात्मा गांधींना अधिक पाठिंबा मिळाला. शाळा-कॉलेजें व कोर्टें यांच्यावर हळूं हळूं वहिष्कार घालण्यांत यावा ही उपसूचना गांधीजींनी मान्य केल्यानंतर कॉंग्रेसच्या वरच्या प्रभावळींतील पुढाऱ्यापैकीं पं. मोतीलाल नेहरु हे त्याना मदतीचा हात देण्यास पुढें सरसावले. कलकत्ता कॉंग्रेसमध्यें असहकारितेचें हें स्टूल एका पायावरच उभें होतें. नागपूर येथें तें चारी पायावर स्थिर उभें राहिलें. गांधी व नेहरु, दास व लालाजी हे सर्व या ठरावाच्या बाजूचे होते. असहकारितेच्या इतर ठरावांप्रमाणें गांधीजींचा हा ठरावही लावलचक व व्यापक स्वरूपाचा होता. आपल्या ठरावावरील उपसूचनेला गांधीजी सामान्यत· मान्यता देत नाहीत, पण एकादी योग्य व चटकदार उपसूचना कोणी सुचविली तर मोठ्या आनदानें ते तिचा स्वीकार करतात. पदव्यांचा त्याग करण्यापासून ते करवंदीपर्यत असहकारितेचें सर्व क्षेत्र व्यापून टाकणाऱ्या नागपूरच्या ठरावालाच जवळ जवळ कलकत्ता येथें पुन्हां पुष्टि देण्यांत आली. व्यापाऱ्यानीं परदेशी व्यापारी सबंधावर बहिष्कार घालावा, सूत कातण्याच्या व विणण्याच्या धंद्यास उत्तेजन द्यावें, राष्ट्रीय चळवळ चालविण्याकरिता लोकानीं पराकाष्टेचा स्वार्थत्याग करावा, कॉंग्रेसनें 'इंडियन नॅशनल सर्व्हिस'ची संघटना करावी, 'ऑ. इं. टिळक मेमोरियल फंड' जमविण्याचा प्रयत्न करावा. (गेल्या आक्टोबरात या फंडाची कल्पना निघाली होती व टिळक मेमोरियल फंड व स्वराज्य फंड हे दोन्ही फंड एकत्र करावे असें ठरलें होते.) नव्या कौन्सिलातून जे प्रतिनिधी निवडून आले होते त्यानीं आपल्या जागेचा राजीनामा द्यावा अशी त्यांना विनंति करावी. कोणत्याही प्रकारची राजकीय सेवा करण्याबद्दल या सभासदाना विनंति करूं नये. पोलिस व लष्करी शिपायी आणि जनता याच्यात वाढत चाललेल्या सलोख्याबद्दल कॉंग्रेसला समाधान वाटत आहे. सरकारी नोकरींतल्या लोकानीं राष्ट्रीय चळवळीला मदत करावी. देशातील इतर लोकाशीं त्यानीं प्रेमानें व प्रामाणिकपणानें वागावे, निर्भयपणें व उघडपणें राजकीय सभाना त्यानीं हजर रहावें, वगैरे गोष्टींचा या ठरावात अतर्भाव करण्यांत आला होता. हिंसावृत्ति खऱ्या लोकसत्ताक भावनाची वाढ होण्यास विरोधक आहे इतकेंच नाही तर असहकारितेच्या

पुढच्या इतर कार्यक्रमासही विरोधी आहे हें लक्षांत ठेवून या ठरावांत शब्दानें व कृतीनें अहिंसावृत्ति पाळण्यांत यावी, या तत्त्वावर विशेष भर देण्यांत आला असून देशांतील सर्व सार्वजनिक संस्थांनीं सरकारशीं अहिंसामय असहकार करण्याच्या व लोकांनीं परस्परांत पूर्ण सहकार करण्याच्या चळवळीस प्रोत्साहन द्यावें अशी या ठरावांत शेवटीं विनंति केली. या बदललेल्या वातावरणांत हिंदुस्थानासंबधीं खऱ्या माहितीचा इंग्लंडमध्यें व इतर देशांत प्रसार करण्याची आवश्यकता आहे ही गोष्ट मान्य करण्यांत आली, तरी इग्लंडांत प्रसिद्ध होणारें साप्ताहिक ' इंडिया ' पत्र बंद करण्याची व्यवस्था करण्यांत आली. आयर्लंडच्या उद्धाराकरितां ६५ दिवस उपवास करून प्राणार्पण केलेल्या आयर्लंडच्या मॅक्स्विनीबद्दल आदर व्यक्त करण्यांत आला.

हिंसामय धोरणानें कां होइना पण आयर्लंडनें चालविलेलें चिकाटीचें युद्ध व मिलनर कमिशनवर संपूर्ण बहिष्कार घालून इजिप्तनें चालविलेली चळवळ पाहून हिंदुस्थानही अशा प्रकारचा उग्र स्वरूपाचा स्वातंत्र्याचा लढा चालविण्यास तयार झालें, पण हा लढा अहिंसेच्या पायावर उभारण्यांत आला. क. वेजवुड हे नागपूर येथें विषयनियामक मंडळाच्या सभेस हजर होते व त्यांना भाषण करण्यासही परवानगी देण्यांत आली होती. असहकारितेच्या सांप्रदायाविरुद्ध त्यानीं सावधगिरीची गंभीर सूचनाहि केली होती. " तुमचा कैवार घेणाऱ्या इंग्लडातील तुमच्या मित्रांची परिस्थिती तुम्ही यामुळें विकट करून सोडाल " असे ते म्हणाले. " तुमच्या चळवळीच्या कार्यात तुम्हांला अडथळा येईल. पोलिस तुमच्या मागें लागेल. राजांशीं एकनिष्ठ राहू अशा प्रतिज्ञेवर वकील सनदा करीत असतात. ते असहकारितेच्या चळवळींत काम करूं शकणार नाहींत. तुम्ही अरण्यांत प्रवेश करीत आहां, विधायक कार्यक्रमाला तुम्ही हात घातला पाहिजे" अशा कळकळीच्या स्वरांत ते पंधरा मिनिटें बोलत होते. कळकळीनें भरलेलें त्यांचें पारदर्शक स्फटिकमय अंतःकरण व त्यांचें शुद्ध प्रेम हें त्याचे भाषणांतून प्रगट होत होतें. क. वेजवुड हे आपलें भाषण संपवून खालीं बसतात न बसतात तोंच त्यांच्या भाषणाला उत्तर देणारा एक स्वर ऐकूं आला व पाच मिनिटांत त्यानें या भाषणातील सर्व आक्षेपाना उत्तरें दिलीं.

" हिंदुस्थानाबाहेर आम्हांला कोणी मित्र नाहीं. या बाबतींत कोणीहि आपला गैरसमज करून घेऊं नये. आमचा उद्धार आमच्याच हातांत आहे. आमचा

भविष्य काल आम्हींच उज्वल केला पाहिजे. किंवा आम्हीच त्याला काळिमा फासला पाहिजे. आम्हांला या गोष्टीची प्रतिति आलेली आहे, आणि म्हणूनच या कार्यक्रमाला आम्ही हात घातला आहे. हिंदी राजकारणांत पोलीस हा कांहीं नवीन घटक नाहीं. आम्ही एकादी लहानशी शाळा उघडली, तिच्याकरितां आम्ही जो प्रत्येक रुपया जमा केला, तो आम्ही लाल पगडीच्या छायेखालीं जमा केला आहे. गेल्या १५ वर्षांचा आमचा असा अनुभव आहे. होय, वकीलांना राजनिष्ठ राहण्याबद्दल सही करावी लागतें हें खरें आहे, आणि हें असें आहे म्हणूनच त्यांनीं आपल्या सनदा फाडून टाकाव्या असें त्याना सांगण्यांत येत आहे. आम्ही अरण्यात प्रवेश करीत आहों हें आम्हांला माहीत आहे. "दुधाच्या व मधाच्या प्रवाहांनीं सुशोभित असलेली कॅनॉलची भूमि गांठावयाची असल्यास प्रथम अरण्यांतूनच जावें लागतें हें आम्हास माहीत आहे. स्वातंत्र्याची भूमी गांठावयाची असल्यास या गुलामगिरीच्या अरण्यांतूनच गेलें पाहिजे हें आम्हाला माहीत आहे. मोझेसच्या अथवा आरॉगच्या पुढारीपणावर आमचा विश्वास आहे. असत्यांतून सत्याला, काळोखातून प्रकाशाला, व मृत्यूंतून जीवनाला ते आम्हांला पोंचवितील अशी आम्हांला आशा आहे."

हुंडणावळीच्या दरांतील वाढ व गंगाजळी हा नागपूर कॉंग्रेसमधील एक महत्त्वाचा विषय होता व आजच्या हुंडणावळीच्या दरानें ब्रिटिश मालाचा व्यवहार करणाऱ्या लोकांनीं आपलीं कंत्राटें पुरीं करण्याचें नाकारलें तर ती गोष्ट पूर्णपणें समर्थनीय ठरेल, असें पाचव्या ठरावांत म्हटलें होतें. ड्यूक ऑफ कॅनॉटच्या आगमनप्रसंगीं होणाऱ्या उत्सवांत लोकांनीं भाग घेऊं नये अशीही विनंति एका ठरावांत करण्यात आली होती. ट्रेड युनियनच्या सहाय्यानीं आपला जीवनाचा झगडा लढविणें हा मजुरांचा हक्कच आहे म्हणून संघटणा करण्याच्या बाबतींत कामगारांना उत्तेजन देण्यांत आलें. धान्याच्या निर्यातीचा निषेध करण्यांत आला. ज्या राजकीय पुढाऱ्यांना पकडण्यांत आलें, व चौकशी करून वा विनाचौकशीनें त्यांना तुरुंगांत खेचण्यांत आलें त्यांच्याबद्दल सहानभूति व्यक्त करण्यांत आली. पंजाब, दिल्ली व इतर प्रांतांत सरकारनें चालविलेल्या दडपशाहीनें लोकांनीं घाबरून न जातां सरकारच्या ह्या कृत्याला धैर्यानें तोंड द्यावें व आत्मकष्ट सहन करण्यास तयार असावें अशी विनंति करण्यांत आली. आपल्या संस्थानांतून पूर्ण जबाबदारीचें स्वराज्य स्थापण्याकरितां सर्व संस्थानिकांनीं तावडतोब उपाय योजावे

अशीहि कॉंग्रेसनें विनंति केली. मि. बी. जी. हॉर्निमन ह्यांना अद्याप हिंदुस्थानांत येण्यास परवानगी देण्यांत आली नाहीं यावद्दल निषेध करून हॉर्निमन ह्यांच्या-बद्दल कृतज्ञता व्यक्त करण्यांत आली. ईशर कमिटी व तिच्या शिफारशी ह्यांचा निषेध करण्यांत आला. हिंदुस्थानची गुलामी व नामर्दायी वाढविण्याच्या कामींच ह्या शिफारशींचा उपयोग होईल आणि ह्या शिफारशींनीं असहकारितेचा कार्यक्रम स्वीकारण्यास आणखी एका कारणाची भर घातली आहे, असें मत प्रगट करण्यांत आलें. गोवधाविरुद्ध मुसलमानानीं केलेल्या ठरावाबद्दल त्यांचे आभार मानण्यांत आले. गुरांच्या व कांतड्याच्या निर्यातीला लोकानीं उत्तेजन देऊं नये अशी विनंति करण्यात आली. मोफत शिक्षण व देशी वैद्यक हे पुढल्या दोन ठरावांचे विषय होते. शेवटीं कॉंग्रेसच्या घटनेसंबंधानें विचार करण्यांत आला. कॉंग्रेसच्या ध्येयात बदल करून ‘ शांततेच्या व न्याय्य मार्गानें स्वराज्यसंपादन करणें’ हा कॉंग्रेसचा उद्देश असल्याचें जाहीर करण्यात आलें. भाषावार प्रांतरचना या तत्त्वावर कॉंग्रेसच्या प्रांताची पुनर्घटना करण्यांत आली. कॉंग्रेसच्या खुल्या अधिवेशनापूर्वी २।३ दिवस विषयनियामक कमिटीची-सभा भरवावी असा एक महत्त्वाचा फरक करण्यात आला. ऑ. इ. कॉं. कमेटीचे जेवढे सभासद असतील तितकेच विषयनियामक कमिटीचे असावेत असें ठरविण्यांत आलें. ऑ. इं. कॉ. कमिटीच्या सभासदांची संख्या ३५० पर्यंत वाढविण्यात आली. चिटणीस, खजीनदार, व अध्यक्ष ह्यांच्यासह ऑ. इं. कॉ. कमिटीमधून निवडलेल्या १५ सभासदांची एक वर्किंग कमिटी नेमण्याचें ठरले. नव्या घटनेंतील हा एक विशेष असून कॉंग्रेसच्या दैनंदिन कामाच्या दृष्टीनें कॉंग्रेसच्या घटनेंत ह्यामुळें क्रांती घडून आली, व कॉंग्रेस ही वर्षभर काम करणारी राष्ट्रीय संघटनात्मक संस्था बनली. पूर्व आफ्रिका व दक्षिण आफ्रिका येथील हिंदी वसाहतवाल्यानीं आपल्या हक्काच्या संरक्षणाबद्दल चालविलेल्या लढ्याला पाठिंबा देण्यांत आला. पूर्व आफ्रिकेंतील हिंदी लोकानीं सुरूं केलेल्या असहकारितेच्या चळवळीच्या धोरणाला संमति देण्यात आली, व फिजी बेटातून हिंदुस्थानला परत जाण्याकरिता हिंदी लोकांवर सक्ति करण्यांत येत असून या बाबतीत तथील हिंदी रहिवाशाना मदत करण्यास कॉंग्रेस असमर्थ आहे, याबद्दल दिलगिरी प्रदर्शित करण्यांत आली. परदेशातील हिंदी लोकांची सेवा केल्याबद्दल मि. सी. एफ्. ॲंड्रूज ह्याचे आभार मानण्यात आले.

# प्रकरण दुसरें

# नागपूर कॉंग्रेसनंतर

नागपूर कॉंग्रेसनें हिंदुस्थानच्या इतिहासांतील एका नवीन युगाला आरंभ केला. या कॉंग्रेसमध्यें पास करण्यात आलेल्या ठरावामुळें एक नवीनच कर्तव्याचा बोजा राष्ट्रावर निर्माण झाला व वर्किंग कमिटीच्या सल्ल्यानें ऑल इंडिया कॉं. कमिटीचे सभासद जोराने कामाला लागले. १९२० च्या अखेरीस नेमस्तानीं कोंग्रेसशी संबंध अजिबात तोडला होता. मि. सी. वाय्. चिंतामणी ह्यांनी लिबरल फेडरेशनच्या दुसऱ्या वार्षिक अधिवेशनांत या संबंधानें एक उत्कृष्ट भाषण केलें. सुरेंद्रनाथ बानर्जी हे सर झाले. लॉर्ड सिंह हे बिहार व ओरिसाचे पहिले हिंदी गव्हर्नर झाले. १९२१ च्या प्रारंभीं झालेल्या नव्या दिवाणात लाला हरकिसन ह्यांचा समावेश झालेला दिसला. थोड्याच महिन्यांपूर्वी ह्यांना जन्मठेप काळ्या पाण्याची शिक्षा देण्यात येऊन त्यांची ४० लाखांची मालमत्ता जप्त करण्यांत आली होती. किंग जॉर्जसाहेबांचे चुलते ड्यूक ऑफ कॅनॉट याना हिंदी लोकाची समजूत घालण्याकरितां व नव्या युगाला प्रारंभ करण्याकरितां हिंदुस्थानांत पाठविण्यात आले.

येथें आल्यानंतर त्यानीं एक उत्कृष्ट भाषण केलें व त्यांत ते म्हणाले, "आयुष्यातील अशा एका अवस्थेला मी पोचलों आहे कीं, या वेळीं लोकाच्या अंतःकरणांतील जखमा मी भरून काढाव्या व जे एकमेकापासून फुटले त्यांची एकी करावी, असें मला वाटूं लागलें आहे. मी हिंदुस्थानचा जुना मित्र आहे. सर्वांना—ब्रिटिशाना व हिंदी लोकांना माझी—अशी विनंति आहे कीं, त्यानीं मागें जें होऊन गेलें, ज्या चुका व जे गैरसमज झाले, ते सर्व विसरून जावे. क्षमेस पात्र असलेल्यांना क्षमा करावी. एकमेकाच्या हातांत हात घालावे आणि आज निर्माण झालेल्या आशांच्या परिपूर्ततेकरता एकजुटीनें काम करावें." यानंतर वरिष्ठ कायदे कौन्सिलांत पंजाब प्रकरणासंबंधाचा प्रश्न चर्चेकरतां आला त्या वेळीं सर विल्यम व्हिन्सेन्ट ह्यानीं पुढील निःसंदिग्ध शब्दांत आपले विचार प्रदर्शित केले. "पंजाबांत जीं अनुचित कृत्यें झालीं त्याबद्दल सरकारला अत्यंत दिलगिरी वाटत आहे. आणि मानवी दृष्टी जितकी

दूरवर पोहोंचेल तेथपर्यंतच्या काळांत असलीं कृत्यें घडून येणें अशक्य होईल, असा सरकारनें दृढनिश्चय केलेला आहे." इतकें सांगून सरकारनें मोठ्या हुशारीनें या प्रकरणांतील गुन्हेगारांना जबरदस्त शिक्षा देण्याबद्दलचें तिसरें कलम हा ठराव आणणारानें परत घ्यावें अशी व्यवस्था केली. जनरल डायर ह्यांना कामावरून दूर केलें व त्यामुळें ते आपल्या पेन्शनीला आंचवले. तथापि हिंदुस्थानांतील इंग्लिश स्त्रियांनीं हा आपला त्राता आहे, अशा भावनेनें २००० पौंड त्याला देणगीदाखल दिले. आणि ह्या पैशापेक्षाही अधिक महत्त्वाची गोष्ट म्हणजे हिंदुस्थान व इंग्लंड येथें जाहीर रीतीनें त्याला एक तरवार अर्पण करण्यांत आली. इतर दृष्टीनें त्याचें जें नुकसान झालें असेल तें याप्रमाणें भरून निघाले. ह्यांतील दुसरा मुख्य गुन्हेगार कर्नल जॉन्सन, ह्याला हिंदुस्थानांतील व्यापारी कंपनीत एक जागा मिळाली व त्याचेंही झालेलें नुकसान पूर्णपणें भरून निघालें. ड्यूकसाहेबांची दिलगिरी किंवा होम मेंबर सर वुइल्यम व्हिन्सेंट ह्यांनीं प्रदर्शित केलेली दिलगिरी ह्यामुळें हिंदी लोकांचीं मनें संतुष्ट होण्यास मदत झाली नाहीं. असहकारिता हिंदुस्थानात कायम राहण्याकरिता आली होती. १९२१ च्या प्रारंभी वरिष्ठ कायदे कौन्सिलनें एक कमिटी नेमिली. दडपशाही कायद्यांचें परीक्षण करण्याचें काम ह्या कमिटीकडे सोंपविलें होतें. कमिटीच्या शिफारशीमुळे क्रिमिनल लॉ अमेंडमेंट ॲक्टाखेरीज करून बाकीचे सर्व कायदे प्रत्यक्ष रद्द करण्यांत आले. परतु या सर्व मलमपट्यांनीं जखम भरून निघाली नाहीं; ती चिघळतच चालली होती. व ती बरी करण्याचें काम वादशाही जाहीरनामें किंवा दपडशाही रद्द करणें, ह्या नेहमींच्या उपायावर न सोंपवितां कॉंग्रेसनें ही जखम बरी करण्याचें काम आपल्या हातीं घेतलें.

नागपूर कॉंग्रेसच्या ठरावाला जोराचा पाठिंबा मिळाला. "मतें देऊं नका." या चळवळीला अपूर्व यश आलें. कोर्ट व कॉलेजवरील बहिष्काराला किंचित् कमी यश आलें. तथापि त्यांच्या इभ्रतीला भयंकर धक्का बसला. पुष्कळ वकीलांनीं आपल्या धंद्यावर पाणी सोडलें. राष्ट्रीय चळवळीला त्यांनी वाहून घेतलें. या चळवळींत राष्ट्रीय शिक्षण या दृष्टीनें एक विशेष गोष्ट घडून आली. असहकार केलेल्या विद्यार्थ्यांची संख्या फार मोठी नव्हती तथापि राष्ट्रीय शिक्षणसंस्था प्रस्थापित करण्याबाबत लोकाची तीव्र इच्छा दिसून आली. "देशांतील तरुणांनीं मातृभूमीच्या सेवेला वाहून घ्यावे, तरुणांतील तेज व

मर्दानीपणा नष्ट करण्याच्या हेतूनेंच सध्याच्या शिक्षणसंस्था चालविण्यांत येत असल्यामुळें त्यांचा त्याग करावा," अशी विनंति करून महात्मा गांधींनीं तरुणांच्या नाजुक भावनांना जागृत केलें होतें आणि त्यांच्या ह्या विनंतीचा मोठ्या उत्साहानें स्वीकारही करण्यांत आला होता. शाळाकॉलेज बहिष्कारावरच केवळ ही चळवळ थांबली नाहीं. राष्ट्रीय विद्यापीठें, सर्व प्रकारचे शिक्षण देणाऱ्या राष्ट्रीय शाळा, देशातील निरनिराळ्या भागांत स्थापन करण्यात आल्या. संयुक्त प्रांत, पंजाब, व मुंबई इलाखा ह्यांतील विद्यार्थ्यांची चळवळ जोरात होती. बंगालही ह्या बाबतीत मागें नव्हता. असहकारितेच्या त्या संस्मरणीय दीड वर्षांत जीं अनेक मनाला थरारून सोडणारीं दृश्यें दिसून आलीं त्यापैकीं एक दृश्य कलकत्त्यातील जनतेलाही पहावयास सांपडलें. जानेवारीच्या दुसऱ्या आठवड्यांत देशबंधु दास ह्यांनी विनंति केल्यावरून हजारों विद्यार्थ्यांनीं कॉलेजें सोडलीं व परीक्षांवर बहिष्कार घातला. गांधींनीं ह्या वेळीं कलकत्त्याला भेट दिली व ४ फेब्रुवारी रोजीं तेथें एक राष्ट्रीय विद्यापीठ उघडलें. पाटणा शहरासही त्यांनीं पुन्हां दुसरी भेट दिली व बिहार विद्यापीठाची स्थापना करून तेथेही एक राष्ट्रीय कॉलेज अनावृत्त केलें. ह्या चार महिन्यांच्या अवधींत अलीगडची नॅशनल मुस्लीम युनिव्हर्सिटी, गुजराथ विद्यापीठ, बिहार विद्यापीठ, काशी विद्यापीठ, बंगाल नॅशनल युनिव्हर्सिटी, टिळक महाराष्ट्र विद्यापीठ, या व ह्या शिवाय कितीतरी सर्व प्रकारचे शिक्षण देणाऱ्या राष्ट्रीय शाळा उघडण्यात आल्या. देशाच्या सर्व भागांतील हजारों विद्यार्थी या शिक्षणसंस्थांत सामील झाले. राष्ट्रीय शिक्षणाला मिळालेल्या जोराच्या कलाटणीचा हा परिणाम होता. आंध्र देशांत व महाराष्ट्रात १९०७ सालीं लावलेली राष्ट्रीय शिक्षणाची ज्योत कधीं मंद तर कधीं तेजस्वी अशी होत होती, ती आतां संपूर्ण व शुद्ध प्रकाशानें चमकूं लागली. पुष्कळ विद्यार्थी सरकारी शिक्षण संस्थांतून बाहेर पडले. आज जे बरेचसे प्रांतिक व जिल्ह्यातील कॉंग्रेस पुढारी दिसतात, ते बहुतेक सर्व १९२०-२१ सालीं असहकार केलेल्या वकीलांपैकीं व विद्यार्थ्यांपैकींच होत. नागपूर कॉंग्रेसच्या ठरावाप्रमाणें वर्किंग कमिटीच्या सभा १९१९ सालीं देशातील निरनिराळ्या भागात दर महिन्यास भरूं लागल्या. ऑल इंडिया कॉं. कमेटीची पहिली सभा नागपूर येथें झाली. ह्या सभेंत वर्किंग कमिटीची निवडणूक होऊन ऑ. इं. कॉं. कमिटीवर २१ प्रांताचे किती किती प्रतिनिधी घ्यावे हें नक्की ठरविण्यात आलें. गांधीजींनीं जुन्या होमरूलराकडून 'यंग इंडिया' पत्र घेऊन

होतें; या लोकांनीही हें उत्तम इंग्रजी साप्ताहिक मोठ्या आनंदानें गांधीजींच्या स्वाधीन केलें. ह्या होमरूलच्या चळवळीचें मुंबईत प्रसिद्ध होणारें हें एक मुखपत्र होतें. नागपूर कॉंग्रेस स्वागत मंडळाचे अध्यक्ष शेट जम्नालाल बजाज यांनीं आपल्या रावबहादुर पदवीचा त्याग केला, व १९२१ च्या जानेवारींत असहकार केलेल्या वकीलांना मदत करण्याकरितां म्हणून, टिळक स्वराज्य फंडाला एक लाख रुपयांची देणगी दिली. वर्किंग कमिटीची सभा कलकत्ता येथें ३१ जानेवारी १९२१ रोजीं भरली. टिळक स्वराज्य फंडाच्या प्रांतिक रकमांपैकीं शेंकडा २५ इतका भाग वर्किंग कमिटीला पाठवावा असें ठरलें. असहकार केलेल्या वकीलाना दरमहा १०० रुपयापेक्षां जास्त पगार देऊं नयेत व नॅशनल सभेमधील सभासदाना ५० रुपया पेक्षां जास्त पगार देऊं नयेत असें ठरविण्यात आलें.

या " सर्व्हिस"मध्यें काम करणाऱ्या माणसाला कर्ज असता कामा नये असा नियम करण्यांत आला. राष्ट्रीय शिक्षणाचा विस्तृत अभ्यासक्रम तयार होईपर्यंत हिंदुस्थानी भाषा व सूत कातणें यांचें शिक्षण द्यावें व खेडेगांवातून काम करण्याच्या दृष्टीनेंही लागणारें शिक्षण, शाळा कॉलेजांतून बाहेर पडलेल्या विद्यार्थ्यांना द्यावें असें ठरलें. देशबंधु दास यानीं कामगारसंघटनेकडे लक्ष द्यावें, अशी त्यांना विनंति करण्यात आली. आर्थिक बहिष्कार कमिटी बोलावण्याचें काम मि. एल्. आर. तेरसी यांच्याकडे सोंपविण्यांत आलें. या नंतरची वर्किंग कमिटीची सभा ३१ मार्च व १ एप्रिल १९२१ रोजी भरली. त्याच वेळीं ऑ. इं. कॉं. कमिटीची सभा झाली. करबंदीचा कार्यक्रम हातीं घेण्याची वेळ अद्याप आली नाही, असें वर्किंग कमिटीला एकमतानें वाटलें. एक कोटी रुपये स्वराज्यफंड जमा करावा, कॉंग्रेसला एक कोटी सभासद मिळवावे व देशांत २० लाख चरखे चालतील अशी व्यवस्था करावी असे ठराव बेझवाडा येथें झालेल्या ऑ. इं. कॉ. च्या सभेंत मंजूर करण्यांत आले. ग्रामपंचायतीची स्थापना करणें व मद्यपानबंदीची चळवळ करणें या विषयांचाहि या सभेंत विचार झाला. याप्रमाणें अगदीं निरुपद्रवी सुधारणा संबंधींचे ठराव कॉंग्रेस करीत असताही, सरकारनें कांहीं पुढाऱ्यांवर १४४ अ व १०८ या कलमान्वयें नोटिसा बजावल्या. तावडतोब कायदेभंग सुरूं करण्याइतकी शिस्त राष्ट्रांत निर्माण झाली नाहीं व या चळवळीकरतां लागणारी तयारीही राष्ट्रात नाहीं, ही गोष्ट जाणून ज्याच्यावर अशा नोटिसा बजावण्यांत आल्या होत्या त्यानीं तें हुकूम मानावे,

असें कळविण्यांत आलें. नानकाना येथें झालेल्या कत्तलीबद्दल दुःख प्रदर्शित करण्यात आलें. व या कत्तलींत शीख-समाजाचें जें भयंकर नुकसान झालें त्याबद्दल सहानुभूति व्यक्त करण्यात आली. खरी स्थिती अशी होती कीं, मार्च महिन्याच्या दुसऱ्या आठवड्यापर्यंत या सर्व प्रकरणामुळें देशांत खळबळ उडून गेली होती. मैमनसिंगमध्यें जाण्यास देशबंधु दास यांना मनाई करण्यांत आली. आसाममध्यें बाबू राजेंद्रप्रसाद व मौलाना मझरूल हक् यांनीं जाऊं नये असा हुकूम देण्यांत आला. याकूब हुसेन यांनीं कलकत्त्यात व लाला लजपतराय यांनीं पेशावरात पाऊल टाकता कामा नये असें त्यांच्यावर बंधन घालण्यात आलें. याशिवाय अशाच प्रकारच्या किती तरी नोटिसा ठिकठिकाणच्या पुढाऱ्यांवर बजावण्यात आल्या. सिडिशस मिटिंग्ज् ॲक्ट ( राजद्रोही सभांचा कायदा ) लाहोरमध्यें जाहीर करण्यांत आ∙ग. पण नानकाना कत्तलीपुढे हे सर्व छळ मागें पडले. मार्चच्या पहिल्या आठवड्यांत गुरुद्वारमध्ये यात्रा भरली असतां तिच्यावर झडप घालून गोळीबार करण्यांत आला. या गोळीबारात १९५ लोक मरण पावले, असा लोकांचा अंदाज होता व ७० मृत्युमुखीं पडले असें सरकारचें म्हणणें होतें. सरकारच्या मर्जीतल्या तेथील महंतानें ४००० काडतुसें व ६५ रिव्हॉल्व्हर याचा संग्रह केला होता. एक मोठें यज्ञकुंड तयार करून त्यात अग्नि प्रज्वलित करण्यांत आला होता. ५ मार्च रोजीं कांहीं सार्वजनिक प्रश्नासंबंधीं विचार करण्याकरितां एक सभा त्या ठिकाणीं भरावयाची होती, पण या ठिकाणीं एकाएकीं काहीं बदमाषांनीं दंग्यास सुरवात केली. या दंग्याचा बंदोबस्त करण्याकरिता मेजर करी व मिस्टर किंग हे तेथें आले होते. दिल्ली येथें दोन वर्षांपूर्वी क्लॉक टॉवरजवळ झालेल्या गोळीबाराच्या प्रसंगीं मेजर करी हे हजर होते. आणि मिस्टर किंग हे पंजाबांतून बदली होऊन आ∙ होते. या गुरुद्वारच्या महंताचा राग कोणावर होता, हें बाहेर आलें नाहीं. कौन्सिल ऑफ स्टेटमध्यें या प्रश्नासंबंधानें ठराव आला, त्या वेळीं शीख समाजाच्या दोन पक्षांतील ही मारामारी होती असें सांगण्यात आलें. बक्षी मोहनलाल यांच्या उपसूचनेवर भाषण करतांना मि. मानसिंग म्हणाले कीं, "अशा प्रकारचा कांहींतरी अत्याचार होणार ही गोष्ट तेथील स्थानिक अधिकाऱ्यांना माहीत होती." मि. मानसिंग यांचें भाषण चालूं असता गृहमंत्री सर विल्यम व्हिन्सेंट हे मि. हेले यांच्याकडे जाऊन त्यांच्या कानाशीं काहीं कुजबुजले. मि. हेले

ताडकन् उभे राहिले व रागारागानें त्यांनीं मि. मानसिंग यांच्या विधानाचा निषेध केला. नानकाना येथील अत्याचार अभूतपूर्व होता. गोळ्या लागून आसन्नमरण स्थितींत असलेल्या लोकांना त्या प्रज्वलित यज्ञकुंडांत फेंकून देण्यांत आलें.

परदेशांतील हिंदी चळवळ चालविण्याचें काम ब्रिटिश कॉंग्रेस कमिटीतर्फें होत असे व हें काम किती खर्चाचें होतें ही गोष्ट कॉंग्रेसच्या आरंभींच्या इतिहासावरून कळून आली आहे. दरसाल ६० हजार रुपये याप्रमाणें कित्येक वर्षेंपर्यंत या कामाकरितां मंजूर करण्यात येत असत. आतां कॉंग्रेसच्या चळवळीचें आकर्षक केंद्र हिंदुस्थानांतच निर्माण झालें होतें. त्यामुळें ब्रिटिश कॉंग्रेस कमिटीच्या चालू सालच्या खर्चाकरितां अवघे १७ हजार रुपये मजूर करण्यात आले व लाला लजपतराय व श्री. केळकर यांच्या शिफारशीवरून अमेरिकेंतील 'इंडियन होमरूल लीग' ची व्यवस्था पाहणारे मि. डी. व्ही. एस्. राव यांना १ हजार डॉलर केबलनें पाठाविण्यांत आले. ऑ. इं. कॉं. कमिटीच्या या सभेंत कमिटीच्या सभासदांची ३५० ही संख्या–माजी अध्यक्ष खेरीजकरून–मुकर करण्यांत आली. १० मे रोजीं अलाहाबाद येथें वर्किंग कमिटीची दुसरी सभा झाली. तंजावर व सोलापूर येथून या सभेला पूर्वीच निमंत्रणें आलीं होती. या सभेंत महत्त्वाचें असें कांहीं घडून आलें नाहीं. नंतर १५ जूनला मुंबई येथें या कमिटीची सभा झाली. त्या वेळीं गांधीजींनीं व्हॉइसरॉयशीं झालेल्या आपल्या मुलाखतीची हकिकत सांगितली.

पं. मदन मोहन मालवीय यांनी ही मुलाखत जुळवून आणली होती. १९२१ च्या एप्रिलमध्यें लॉर्ड रीडिंग हिंदुस्थानात आले. गाधीजींचा स्वभाव लॉर्ड रीडिंग यांना माहीत होता. गांधीजींच्या सात्विक वृत्तीचा त्यांना अनुभव होता. त्यामुळें असहकारितेविरुद्ध एखादा उपाय योजणें शहाणपणाचें होणार नाही, असें त्यांना वाटले. परतु गांधीजींनीं ज्या तत्त्वावर असहकारितेची चळवळ सुरु केली त्या दृष्टीने अलीबंधूंचीं भाषणें किती विघातक आहेत, हें त्यांनीं सहज दाखवून दिलें. हिंसेला प्रवृत्त करतील असा या भाषणांचा अर्थ होऊं शकेल, असें गाधीजींना दाखवून देण्यात आल्यावर, महात्माजी हे अत्यंत सूक्ष्म विचार करणारे असल्यामुळें या भाषणाचा तसा अर्थ होणें शक्य आहे, ही गोष्ट त्यांनीं कबूल केली व तसें अलीबंधूंना त्यांनीं कळविलें. अलीबंधूंनींही हीं भाषणें करण्यात आपला तसा हेतू नव्हता ही गोष्ट जाहीर केलीं.

ही माफी म्हणजे या चळवळीच्या इतिहासांतील एक अत्यंत महत्त्वाची गोष्ट होय. सरकारच्या या विजयाबद्दल अँग्लो इंडियन हर्षित झाले. या 'माफी'मुळें लॉर्ड रीडिंग यांचेही समाधान झालें व त्यांनीं अलीबंधूवर खटला भरण्याचा विचार सोडून दिला.

वर्किंग कमिटीच्या मुंबईच्या सभेत राजकीय खटल्यांतील बचावाचें धोरण स्पष्ट करण्यांत आलें. असहयोग्यावर खटला किंवा दिवाणी फिर्याद करण्यांत आली तर त्यानें आपला निरपराधीपणा जनतेपुढें मांडण्याकरितां आपली पूर्ण जबानी सादर करावी. याशिवाय कोर्टाच्या कामात दुसरा कोणताही भाग त्यानें घेऊं नये. क्रिमिनल प्रोसिजर कोडप्रमाणें त्याच्याकडून जामीन मागण्यात येईल त्या वेळीं अशा प्रकारचा जामीन देऊं नये व त्याच्याबद्दल शिक्षा भोगण्यास तयार असावें अशा सूचना देण्यात आल्या. अंगोरा येथील तुर्की सरकारबरोबर पुन्हा कटकटी सुरू होण्याचें भय उत्पन्न झालें होतें. तेव्हां असें युद्ध सुरू झाल्यास ब्रिटिश सरकारला मदत करावयाची नाहीं हें आपलें कर्तव्य आहे असें प्रत्येक हिंदी इसमाने समजलें पाहिजे. अशी मदत करणें म्हणजे मुसलमानांच्या मताना लाथाडण्यासारखे आहे हें लक्षात ठेवावें. या युद्धाच्या बाबतीत हिंदी शिपायांनींही काम करण्याचें नाकारावें असें सुचविण्यांत आलें.

मुंबई येथें २८, २९ व ३० जुलै १९२१ रोजी ऑ. इं. कॉं. कमिटीची एक महत्त्वाची सभा झाली. बेझवाड्याचा कार्यक्रम यशस्वी झाल्याबद्दल सर्वत्र आनंद प्रदर्शित करण्यात आला. टिळक स्वराज्य फंडाकरिता पूर्वी ठरल्यापेक्षा १५ लाख रुपये अधिक मिळाले. या कार्यक्रमात ठरल्याप्रमाणें कॉंग्रेस सभासदांची संख्या भरली नाहीं. पण चरख्यांची संख्या मात्र जवळ जवळ २० लाख झाली. यानंतर विणाई पिंजाई वगैरे या धंद्याला जोडून असलेल्या उद्योगाकडे लक्ष देणें भाग पडलें. याकरितां परदेशी कापडावरील पूर्ण बहिष्काराच्या चळवळीवर व खादीच्या पैदाशीवर कॉंग्रेसची सर्व शक्ति खर्ची घालण्याचें ठरलें. आगस्ट ता. १ पासून कॉंग्रेसच्या सर्व सभासदांनीं परदेशी कापड वापरण्याचें बंद करावें असा ऑ. इं. कॉंग्रेस कमिटीनें सल्ला दिला. कामगाराना योग्य मजुरी मिळावी, गरिबाना विकत घेतां येईल अशा प्रमाणात गिरण्यातील कापडावरील किंमत माफक करावी अशी मुंबई व अहमदाबाद येथील गिरण्याच्या मालकाना विनंति करण्यांत आली. परदेशी कापड मागविणाऱ्या व्यापाऱ्यानीं यापुढें आर्डरी देऊं नयेत व

शिल्लक असलेला माल परदेशांत विकण्याचा प्रयत्न करावा असेंही सुचविण्यांत आलें.

ज्या सरकारवर लोकांचा विश्वास नाहीं त्याच्या नौकरींत असलेल्या लोकानीं मग ते लष्करी खात्यांतील नौकर असोत, वा मुलकी खात्यांतील नौकर असोत, आपल्या जागांचे राजीनामे द्यावे असें सांगण्याचा प्रत्येक नागरिकाचा जन्मसिद्ध हक्क आहे असा एक ठराव ऑ. इं. कॉंग्रेस कमिटीच्या सभेंत करण्यांत आला. वर्किंग कमिटीनें परराष्ट्रीय धोरणासबंधाचा जो ठराव सादर केला होता त्याला ऑ. इं. कॉंग्रेस कमिटीनें मान्यता दिली.

मद्यपानबंदीच्या चळवळीच्या बाबतींत धारवाड, मातिया वगैरे ठिकाणीं बरीच दंगल उडाली. तेथील सरकारी अधिकाऱ्यांनीं या चळवळीच्या वेळीं उगीच लुडबुड केली व दुर्बल मनाच्या लोकाना गुत्त्यांत जाण्यापासून परावृत्त करण्याच्या प्रयत्नात अडथळा आणला. सरकारी अधिकाऱ्यांनीं अशा प्रकारचे अडथळे आणले तरी त्याला न जुमानता पिकेटिंग करण्याची शिफारस करण्यात येईल अशी सूचना ऑ. इं. कॉंग्रेस कमिटीतर्फे देण्यांत आली. ठाणा डि. लोकल बोर्डानें पिकेटिंगच्या बाबतींत अनुकूल ठराव केला व तें चालूं ठेवण्यासंबंधानें आपला निश्चय व्यक्त केला याबद्दल अभिनंदन करण्यांत आलें. आणि देशांतील इतर स्थानिक स्वराज्य संस्थांनींही ठाण्याचें हें उत्कृष्ट उदाहरण तावडतोब गिरवावें असें सुचविलें. कॉंग्रेसनें अद्याप पिकेटिंगसंबंधानें काहीं ठराव केला नव्हता. देशांतील सार्वजनिक संस्थानींच हा प्रश्न हातीं घेतला होता. फक्त मादक पदार्थांचा व्यवहार न करण्यासंबंधानें व्यापाऱ्याना कॉंग्रेसनें विनंति केली होती. राष्ट्रामध्यें पूर्ण अहिंसामय वातावरण प्रस्थापित झालें पाहिजे व अधिकाऱ्यां कितीही चिडवलें तरी, कॉंग्रेसमधील लोकांनीं, अहिंसा व्रताचा त्याग करूं न अशा सूचना जाहीर केल्या होत्या. या सूचनांप्रमाणें धारवाड, मातिया, गुंतूर चिरल, परल, केरल, वायव्य प्रांतांतील कुंजहर व इतर ठिकाणच्या लोकां आत्मसंयमनपूर्वक अहिंसाव्रत पाळलें, म्हणून त्याचें अभिनंदन करण्यांत आलें कांहीं ठिकाणीं जनसमुदायावर गोळीबार करण्यांत आला. विशेषतः संयुक्त प्रांता या दडपशाहीला ऊत आला होता. पुष्कळ लोकांना या चळवळीच्या वेळ पकडण्यांत आलें. बचाव करण्याचा प्रयत्न न करता या लोकांनीं तुरुंगवा पत्करला याबद्दल ऑ. इं. कॉंग्रेस कमिटीतर्फे त्यांचें अभिनंदन करण्यांत आलें कोणत्याही प्रकारचा बचाव न करतां लोकानीं स्वयंस्फूर्तीनें कारागृहवास पत्कर

आतां कष्ट सोसण्यास तयार असणें हाच स्वातंत्र्याचा मार्ग आहे, या तत्त्वाचा सर्वत्र पुरस्कार करण्यात आला. देशांतील सर्व भागांतील परिस्थिति झपाट्यानें बदलत चालली होती. सरकारच्या दडपशाहीला उत्तर म्हणून कायदेभंग करण्याची परवानगी द्यावी अशी मागणी कॉँग्रेसकडे करण्यांत येत होती. वन्नू येथील स्थानिक अधिकाऱ्यांनीं जे अत्याचार केले होते त्यावद्दल नेमण्यात आलेल्या सरहद्द चौकशी कमिटीच्या सभासदांना सरहद्द प्रांताच्या सरकारनें आपल्या हद्दींत येण्याची मनाई केली. अशा रितीनें लोकक्षोभकारक कृत्यें सरकारकडून होत होती. तथापि देशांतील अहिंसामय वातावरण अधिक स्थिर व्हावें, आणि कॉँग्रेसचें वजन लोकावर किती आहे याची कसोटी घ्यावी या उद्देशाने कायदेभंगाच्या चळवळीचा पुरस्कार न करता स्वदेशीचाच कार्यक्रम जोरानें अमलात आणावा असा एक ठराव ऑ. इं. कॉँग्रेस कमिटीच्या सभेंत करण्यात आला. प्रिन्स् ऑफ वेल्स् यांच्या आगमनासंबंधानें होणाऱ्या समारंभांत लोकानी भाग घेऊं नये अशीही एका ठरावानें लोकांना विनंति करण्यांत आली. या बावतींतही कायदेभंग करण्याचे अनेक प्रसंग येण्याचा संभव असल्यामुळें लोकांनीं त्याचा अवलंब करण्यास प्रवृत्त होऊं नये म्हणून, ऑ. इं. कॉँग्रेस कमिटीनें कायदेभंगास मान्यता न देता धैर्यानेंच या प्रसंगाला तोंड द्यावें असा निर्णय दिला. धारवाड येथें ता. १ जुलै १९२१ रोजीं झालेल्या गोळीवारासंबंधानें चौकशी करण्याकरिता श्री. भवानीशंकर नियोगी (हे हल्लीं मध्यप्रांतातील हायकोर्टाचे जज्ज आहेत), मि. अब्बास तय्यबजी, (बडोद्याचे सेवानिवृत्त जज्ज) आणि मि. सेट्लूर, (म्हैसूरमध्यें कांहीं दिवस जज्ज असलेले), यांची एक कमिटी वर्किंग कमिटीनें नेमली.

भाषावार प्रांतरचना या तत्त्वावर कॉँग्रेसच्या प्रांताची विभागणी झाल्यामुळें ज्या ठिकाणीं दोन भाषा चालू आहेत अशा जिल्ह्यांना कोणत्या प्रांतांत सामील करावे असा साहजीकच एक प्रश्न उपस्थित झाला. कर्नाटक व आंध्र यांच्या सरहद्दीवरील बेल्लारी व आंध्र व उत्कल् सरहद्दीवरील गंजम याचा प्रश्न पंचकमिटी नेमून तिच्याकडे सोपविण्यात आला. कॉँग्रेस फंडाच्या बाबतींत करण्यात येणाऱ्या अर्जाचा विचार करण्यासाठीं म. गांधी व शेठ जमनालाल बजाज यांची कमिटी नेमण्यांत आली. पाटणा येथें १६ आगस्ट रोजीं वर्किंग कमिटीची सभा झाली. हर्दोई जिल्ह्यांत (सं. प्रांत) १४४ कलमाला विरोध करण्याकरितां त्या ठिकाणीं कायदेभंगाची परवानगी देण्यात यावी असा एक विनंतिअर्ज कमिटीकडे आ-

ण्यांत आला होता, पण त्याचा विचार कमिटीच्या पुढल्या सभेपर्यंत तहकूब ठेवण्यांत आला. ३० सप्टेंबरपूर्वी परदेशी कापडावरील बहिष्कार परिणामकारक झाला पाहिजे या दृष्टीनें घरोघर जाऊन, असेल तें कापड गोळा करण्याकरिता स्वयंसेवक नेमण्यात यावे असेंही वर्किंग कमिटीनें या सभेंत ठरविलें. ऑ इं. टिळक स्मारक फंडापैकी एक चतुर्थांश रकम सूत कांतणें, कांतलेलें सूत जमा करणें, तें विणणें आणि खादीचा प्रसार करणें या कामाकरितां खर्चीं घालण्यांत यावी असें ठरविण्यांत आलें. कांहीं प्रांतांकडून वरील ठराविक प्रमाणांत पैसे न आल्यामुळें त्यांच्याकडे पाठविण्यांत येणाऱ्या देणग्या तहकूब कराव्या, असेंही ठरविण्यात आलें. लौकरच कमिटीची या पुढील सभा ६, ७, ८ व ११ सप्टेंबर रोजीं कलकत्ता येथें भरली. धारवाड येथें झालेला गोळीबार व मोपल्यांचें बंड याच्या-संबंधाच्या रिपोर्टावर कमिटींत विचार करण्यांत आला व यापैकीं दुसऱ्या रिपोर्टासंबंधानें पुढील ठराव मंजूर करण्यांत आले.

"मलबारच्या कांहीं भागांत मोपल्यानीं केलेल्या अत्याचाराबद्दल या कमिटीला अत्यंत दिलगिरी वाटत आहे. कॉंग्रेस व सेंट्रल खिलाफत कमिटी यांच्या अहिंसाव्रताचा संदेश हिंदुस्थानांतील कांहीं लोकांना अद्याप समजलेला नाहीं हीच गोष्ट यावरून सिद्ध होत आहे. या करितां कितीही प्रक्षोभकारक प्रसग आला, तरी अहिंसाव्रताचा त्याग करूं नये या तत्त्वाचा प्रचार सर्व हिंदुस्थानभर कॉंग्रेस व खिलाफतच्या कार्यकर्त्यांनीं करावा. मोपल्यांनीं केलेल्या अत्याचाराचा निषेध करीत असताही वर्किंग कमिटी पुढील गोष्टींकडे लोकांचें लक्ष वेधीत आहे. कमिटीपुढें आज जो पुरावा आला आहे, त्यावरून मोपल्याचीं मनें प्रक्षुब्ध होतील, असें असह्य जुलूम करण्यात आले आहेत. सरकारतर्फे ज्या हकीकती प्रसिद्ध झाल्या आहेत त्या एकपक्षीय आहेत. मोपल्यांच्या हातून जीं कृत्यें घडलीं त्यांचें अतिशयोक्तिपूर्वक वर्णन त्यांत केलें आहे, व शांतता व सुव्यवस्था यांच्या नांवाखालीं जी अनवश्यक जीवितहानी करण्यात आली त्यासंबंधानें सरकारतर्फे खोटे रिपोर्ट करण्यांत आले आहेत.

मोपल्यांमधील कांहीं धर्मवेड्या लोकांनीं हिंदू लोकांना सक्तीनें बाटविलें अशीं कांहीं उदाहरणें आढळलीं याबद्दल या कमिटीला दिलगिरी वाटत आहे. परंतु सरकारतर्फे यासंबंधाच्या ज्या हकीकती प्रसिद्ध होत आहेत त्यावर विश्वास ठेवूं नये. कमिटीपुढें जे रिपोर्ट आहेत त्यावरून असें दिसतें कीं, ज्या

हिंदू कुटुंबांचें सक्तीनें धर्मान्तर करण्यांत आलें तीं मांजेरीच्या आसपास राहाणारीं होतीं. आणि ज्या धर्मवेडया टोळीनें हें कृत्य केलें ती खिलाफत व असहकारिता या चळवळींविरुद्ध होती. आणि आतांपर्यंत जी माहिती मिळाली आहे त्यावरून अवघ्या तीनच कुटुंबांवर अशी सक्ती करण्यांत आली असें दिसून आलें आहे.

मोपल्याचा दंगा ज्या ठिकाणीं कॉंग्रेस व खिलाफत यांच्या चळवळींना बंदी करण्यांत आली होती त्या ठिकाणींच झाला. आणि कॉंग्रेस खिलाफत कार्यकर्त्यांनीं अत्यंत साहस करून लोकक्षोभाला आवाक्याबाहेर जाऊं न देण्याचा व अत्याचार थांबविण्याचा प्रयत्न केला.

अलीबंधू, डॉ. किश्लू, शारदापीठाचे श्रीजगद्‌गुरु श्रीशंकराचार्य, मौ. निसार अहमंद, पीर गुलाम मुजादीत आणि मौलवी हुसेन अहमद यांच्यावरील खटल्यासंबंधानेंही विचार करण्यांत आला. मुसलमानाच्या मागणीचा पुरस्कार करून यापुढें कोणत्याही धर्मनिष्ठ मुसलमानानें लष्करांत काम करणें किंवा लष्कर भरतीच्या बाबतींत मदत करणें हा अधर्म आहे, असें जाहीर करण्यांत आलें. अंगोरा सरकारविरुद्ध ब्रिटिश सरकार लढूं लागलें तर हिंदुस्थानांतील मुसलमानानीं कायदेभंगाच्या चळवळीस आरंभ करावा व अहमदाबादच्या कॉंग्रेस अधिवेशनाचें वेळीं हिंदी प्रजासत्ताक राज्याचें पूर्ण स्वातंत्र्याचें निशाण उभारावें, असें जाहीर करण्यांत आलें.

१९२१ सालीं कराची येथें ता. ८ जुलै रोजीं अ. भा. खिलाफत परिषद भरली. परिषदेचे अध्यक्ष मौ. महंमदअली यानी या परिषदेंत एक धाडसाचें भाषण केलें. "कराची स्पीच" या नांवानें हें भाषण प्रसिद्ध आहे. या भाषणाबद्दल मौ. महंमदअली यांच्यावर खटला भरण्यांत यावा असा हुकूम सरकारतर्फे देण्यांत आला होता. कॉंग्रेसनें हें आव्हान स्वीकारलें व १६ ऑक्टोबर रोजीं कॉंग्रेसच्या आज्ञेप्रमाणें हजारों व्यासपीठांवरून हें भाषण लोकांनीं वाचून दाखविलें. हें भाषण ज्या ठरावावर करण्यांत आलें त्या ठरावांत कलकत्ता व नागपूर येथें लष्करी नौकरीच्या बाबतींत ज्या तत्त्वाचा पुरस्कार केला होता त्यालाच पुष्टी दिली होती. ६ आक्टोबर रोजीं मुंबई येथें झालेल्या वर्किंग कमिटीच्या सभेंत अशाच आशयाचा ठराव करण्यांत आला. "रौलेट ॲक्टच्या चळवळीच्या वेळीं व त्याचप्रमाणें इजिप्शियन, तुर्क, अरब वगैरे राष्ट्रांतील लोकांच्या राष्ट्रीय भावना चिरडून टाकण्यासाठीं ज्या सरकारनें पोलि-

सचा व लष्कराचा उपयोग केला आहे, त्या सरकारची कोणत्याही प्रकारचीं नौकरी करणें हें राष्ट्राभिमानाच्या व राष्ट्रहिताच्या दृष्टीनें विरुद्ध आहे." असा हा ठराव होता. अलीबंधू व त्यांचे दोस्त यांच्यावर खटला भरण्यांत आला. वर्किंग कमिटीनें त्यांचें अभिनंदन करून पुढील पुरवणी वरील ठरावाला जोडण्यांत आली. "सरकारच्या लष्करी व मुलकी खात्यातील सर्व नौकरांनीं आपल्या जागांचे राजीनामे द्यावे असें कॉंग्रेस सांगूं शकत नाहीं, कारण या सर्व लोकांच्या उपजीविकेची व्यवस्था कॉंग्रेस करूं शकणार नाहीं. परंतु जे लोक स्वतःचा उदरनिर्वाह चालविण्यास समर्थ असतील त्यानीं कॉंग्रेसच्या ठरावातील उच्च उद्देश लक्षांत घेऊन त्याचा त्याग करावा असें वर्किंग कमिटीनें सुचविलें. स्वतन्त्रपणें व अब्रूनें उदरनिर्वाह करण्याच्या दृष्टीनें पिंजणें, विणणें व सूत कातणें हें धंदे करावे, असें वर्किं कमिटीतर्फे सुचविण्यांत आलें. देशातील सर्व कॉंग्रेस कमिटयानीं देशभर सभ भरवून वरील ठराव पास करण्याबद्दल सूचना देण्यात आली, व त्याप्रमाणें १ ऑक्टोबर रोजीं या सूचनेची अंमलबजावणी सर्वत्र करण्यात आली.

परदेशी कापडावरील बहिष्कार अद्यापि पूर्णत्वाला पोंचलेला नसल्यामुळें कोणत्याही जिल्ह्यांत किंवा प्रांतात सामुदायिक कायदेभंग करणें शक्य नाहीं असें वर्किंग कमिटीनें सुचविलें. व या प्रांतातील किंवा जिल्ह्यांतील लोकांची कापडाची गरज पुरेल इतकी पुरेशी खादी निर्माण होईल इतक्या प्रमाणावर सूत कातण्याच्या व विणण्याच्या धंद्याची प्रगति होईपर्यंत त्या ठिकाणीं कायदेभंग सुरु करण्याची परवानगी देतां येणार नाहीं, असेंही वर्किंग कमिटीनें आपलें मत दिलें. अहिंसामय वातावरण राहील अशी खात्री दिल्यानंतर प्रांतिक कॉंग्रेस कमिटीच्या अनुमतीनें एकाद्या व्यक्तीला कायदेभंग करतां येईल अशी वर्किंग कमिटीनें अनुज्ञा दिली. प्रिन्स ऑफ वेल्स यांच्या स्वागतावर बहिष्कार घालण्याचा विस्तृत कार्यक्रम आंखण्यात आला. प्रिन्स ऑफ वेल्स यांचें ज्या दिवशीं आगमन होईल त्या दिवशीं सर्व देशभर स्वयंस्फूर्तीनें हरताळ पाळण्यांत यावा व देशातील निरनिराळ्या शहरीं हा हरताळ यशस्वी करण्याच्या दृष्टीनें त्या त्या ठिकाणच्या प्रांतिक कॉंग्रेस कमिट्यानीं आपआपले कार्यक्रम आखावे असें ठरविण्यांत आलें. या बैठकींत सर्व परराष्ट्रांना उद्देशून एक अत्यंत महत्त्वाची गोष्ट जाहीर करण्यांत आली. "हिंदुस्थान सरकार कोणत्याही रितीनें

हिंदुस्थानचे प्रतिनिधी या नात्यानें मत देऊं शकत नाहीं. हिंदुस्थान हें स्वयं-सत्ताक राष्ट्र असल्याकारणानें कोणत्याही राष्ट्रापासून भिती बाळगण्याचें त्याला कारण उरलेलें नाही. कारण दुसऱ्या कोणत्याही राष्ट्रांच्या हिताला विरोध होईल असे व्यापारी संबंध निर्माण करण्याची किंवा इतर कोणतेंही कृत्य करण्याची हिंदुस्थानची इच्छा नाहीं." त्याचप्रमाणें दुसऱ्या कोणत्याही राष्ट्राचें हिंदु-स्थानाबरोबर वांकडें असण्याचें कारण नसल्यामुळें त्यांनीही ब्रिटिश साम्राज्या-बरोबर हिंदुस्थानच्या बाबतींत कोणत्याही प्रकारचा तह करूं नये. तसेंच हिंदु-स्थान स्वराज्याचे हक्क संपादन करील त्या वेळीं इस्लामी धर्माच्या आज्ञानुसारच आपलें धोरण ठेवील अशी मुसलमानी राष्ट्रांना हिंदुस्थान हमी देत आहे." वर्किंग कमिटींतील सभासदांचें हें मत होतें. जोपर्यंत हिंदी लोकांनीं या प्रश्नाचा विचार केला नाहीं, व ऑ. इं. काँग्रेस कमिटीनें तशा प्रकारचा ठराव केलेला नाहीं तोपर्यंत ऑ. इं. काँग्रेस कमिटीच्या नांवानें हा ठराव बाहेर जाऊ नये अशी वर्किंग कमिटीची इच्छा होती.

या वेळीं अलीबंधूंना पकडण्यांत आलें. आसामहून मद्रासकडे येताना वॉलटेर येथें मौ. महमदअली यांना पकडण्यांत आलें. कांहीं दिवस सबजेलमध्यें त्यांना ठेवण्यात आलें. या ठिकाणी त्यांना मुक्त करण्यांत आल्याचा हुकूम वाचून दाखविण्यात आला व पुन्हा त्यांना अटक करून कराची येथें आणण्यात आलें. मौ. महमदअली याना पकडण्यांत आल्यानंतर मौ. शौकतअली याना मुंबई येथें पकडण्यांत आलें. कराची येथील भाषणाकरिता त्यांना पकडण्यांत आलें आहे असें जेव्हां बाहेर आले त्या वेळीं महात्मा गांधी त्रिचनापल्ली येथे होते व त्यांनीं हें भाषण स्वतः जाहीर रीतीनें म्हणून दाखविलें. सरकारच्या या कृत्याचा म. गांधींवर इतका परिणाम झाला कीं, सर्व राष्ट्रानें हा ठराव मंजूर करावा असें त्यानीं सुचविलें. वर्किंग कमिटीनें या बाबतींत काय केलें हें मागें सांगि-तलेच आहे.

याप्रमाणें सर्व वर्ष भरकन् निघून गेलें. स्वराज्याची प्रस्थापना करण्यास आता एकच महिना राहिला होता. अलीबंधू व इतर पुढाऱ्याना पकडण्यात आलें. त्या वेळीं सर्व राष्ट्रानें अपूर्व आत्मसंयम दाखविल्यामुळें ऑ. इं. काँग्रेस कमिटीच्या पुढाऱ्यांनीं दिल्ली येथें ५ नोव्हेंबर १९२१ रोजीं भरलेल्या सभेंत देशातील सर्व प्रांतांनी आपल्या जबाबदारीवर कायदेभंगाच्या चळवळीस सुरवात करण्यास

अधिकार दिला. प्रां. काँग्रेस कमिटीला योग्य वाटेल त्या पद्धतीनें करबंदीचा कार्यक्रम हाती घेण्यांत यावा असें त्यांनीं सुचविलें. मात्र असें करतांना खालील अटी पाळण्यांत याव्या अशीही सूचना केली. प्रत्येक कायदेभंग करू इच्छिणाऱ्या इसमानें त्याला लागू असलेला असहकारितेचा कार्यक्रम अमलांत आणलेला असला पाहिजे, सूत कांतण्याची कला त्याला अवगत असावी, परदेशी कापडाचा त्यानें त्याग केलेला असला पाहिजे, तो खादी वापरणारा असला पाहिजे, हिंदु-मुसलमान ऐक्यावर त्याचा विश्वास असला पाहिजे, पंजाब व खिलाफत संबधाचा अन्याय दूर होण्यास व स्वराज्याची प्रस्थापना होण्यास अहिंसा व्रत पाळणें हें अत्यंत अवश्य आहे, या गोष्टीवर त्याचा विश्वास असला पाहिजे. आणि जर तो हिंदु असेल तर अस्पृश्यता हा राष्ट्रीयत्वावरील एक कलंक आहे, असें त्याला वाटतें हें त्यानें स्वतःच्या आचरणावरून दाखवून दिलें पाहिजे. सामुदायिक कायदेभंगाच्या दृष्टीनें जिल्हा किंवा तहशील हा एक घटक मानण्यांत यावा. त्या ठिकाणच्या बहुसंख्यांक लोकांनीं पूर्ण स्वदेशीचा अंगीकार केलेला असला पाहिजे. हातकताईचें व हातविणीचें कापड ते वापरीत असले पाहिजेत. असहकारितेच्या सर्व कार्यक्रमावर प्रत्यक्ष अंमलबजावणीच्या दृष्टीनें त्यांचा विश्वास असला पाहिजे. सार्वजनिक फंडांतून आपल्याला मदत मिळेल अशी कोणीही अपेक्षा करूं नये. प्रॉं. काँग्रेस कमिटीनें अर्ज केल्यावर यांपैकीं कोणत्याही अटींत बदल करण्याचा अधिकार वर्किंग कमिटीला आहे.

मलबारमधील सक्तीचें धर्मांतर व हिंदुमंदिराचा नाश ह्या संबंधाचा एक ठरावही या सभेंत पास करण्यात आला. १९२१ सालीं सार्वजनिक चळवळींतून सरकारी अधिकाऱ्यांना प्रतिकार करावयाचा हें प्रमुख धोरण दिसून आलें. लोकांना भोगाव्या लागणाऱ्या अडचणी दूर करण्याच्या बाबतींत व इतर स्थानिक प्रश्न सोडविण्याच्या बाबतींत लोकांनीं ही गोष्ट अमलांतही आणली होती. बेझवाडा येथें ३१ मार्च रोजीं ऑल इंडिया कमिटीची सभा झाली. ह्या सभेमध्यें आंध्र प्रांतांतील वातावरण स्फूर्तिमय झालें होतें. याच सुमारास चिरल येथील लोकांना एका परिस्थितीला तोंड द्यावें लागलें. ह्या खेड्यास म्युनिसिपालिटी स्थापन करावी असा सरकारचा विचार होता. स्थानिक-स्वराज्यखात्याचे दिवाण, पानागलचे राजेसाहेब हे काँग्रेसचे विरोधी होते. चिरलच्या लोकास म्युनिसि-पालिटी नको होती. काँग्रेसपार्टीच्या लोकांनीं अर्थातच जनतेला पार्टीचा दिला.

ह्या बाबतींत म. गांधीं यांचा सल्ला घेण्यांत आला. " लोकांना जर म्युनिसिपालिटी नको असेल तर त्यांनीं गांवची हद्द सोडून बाहेर राहण्यास जावें " असा गांधीजींनीं ह्या वेळीं सल्ला दिला व कॉंग्रेसच्या नेतृत्वाखालीं ही चळवळ चालवूं नये अशीही सूचना दिली. जर ह्या चळवळींत यश आलें तर त्याचें श्रेय कांहीं अंशीं कॉंग्रेसला मिळेलच. परंतु जर कां यात अपयश आलें तर त्याच्या अपेशाचा डाग कॉंग्रेसला लागावयाचा नाहीं. एकदरींत कल्पना तर बहारीची होती व ह्या चळवळीला आंध्ररत्न डी गोपाळकृष्णय्या यांच्यासारखा पुढारी मिळाला होता. त्यानें ह्या चळवळीत आपलें सर्वस्व ओतलें, आणि ठरल्याप्रमाणें लोकांनीं गांवाचा त्याग केला. लोक गांव सोडून जाऊं लागले त्या वेळीं या लोकांनीं कांहीं दिवसापूर्वीं मुसलमानांनीं केलेल्या हिजरातची आठवण करून दिली. चिरलच्या लोकाना पुष्कळ दिवस पर्यंत बरेंच कष्ट सोसावे लागले. म्युनिसिपल हद्दीच्या बाहेर झोंपड्यांतून ते दोन महिने राहिले. एक ना एक निमित्त करून पुढाऱ्यांना पकडण्यांत आलें. त्यापैकीं जे कोणी असहयोगी नव्हते त्यांना फूस लावून व थापा देऊन नमावयास लाविले. याप्रमाणें एक वर्षभर ह्या गांवांतील लोक बाहेर जाऊन राहिले व शेवटीं गांवांत परत आले व त्यांनीं म्युनिसिपालिटीच्या जुंवाखालीं मान दिली.

चितागांगचा संप हा एक फार महत्त्वाचा प्रश्न कॉंग्रेसनें या वेळीं हातीं घेतला होता. चितागाग हें पूर्व बंगालमध्ये एक महत्त्वाचें बंदर आहे. सेनगुप्त ह्यांनीं येथील कामगारांचा सप चालविला. ह्या संपाच्या पायीं एक लाखावर रुपये खर्चीं पडले. असल्या प्रश्नामध्यें अडचणीची गोष्ट ही असते कीं, अधिकारी वर्गाचे लोक संपवाल्यांना दमवून सोडतात. असल्या प्रकारच्या सर्व चळवळींना नेहमींच कॉंग्रेस पाठिंबा देऊं शकत नाहीं. तिचें द्रव्यबल मर्यादित आहे. कॉंग्रेसचें मनुष्यबळ प्रचंड आहे. परंतु कॉंग्रेसच्या चळवळीं चालविणाऱ्या लोकावर ते पूर्णपणें ताबा चालवूं शकतात. एखाद्या ठिकाणचे वजनदार लोक कांहींतरी निमित्त काढून तुरुंगांत डाबण्यांत आले म्हणजे मागच्या लोकात फूट पडूं लागते, लांचलुचपतीला सुरुवात होते व चळवळीला अपयश येतें.

जातां जातां मलबारातील दंग्याला मूळ कारण काय झालें हें सांगितलें पाहिजे. मोपला हे मुसलमान असून, ते मलबारात आलेल्या अरबाचे वंशज आहेत. त्या सुंदर भूमींत त्यांनीं वसाहत केली व तेथील निरनिराळ्या राज-

सत्तांशीं संगनमत करून ते तेथें राहिले. सामान्यतः यापैकीं कांहीं लोक मोठ्या प्रमाणावर व्यापार करतात व कांहीं शेती करतात. परंतु त्यांच्या धर्मभावना प्रक्षुब्ध होतील अशा गोष्टी घडून आल्या, म्हणजे ते धर्मवेडे बनतात व धर्मासाठी ते आपल्या प्राणाचीही पर्वा करीत नाहीत. ह्या मोपला लोकांत नेहमीं दंगेधोपे होत असल्यामुळें 'मोपला ऑटरेजेस ॲक्ट' ह्या नांवाचा स्पेशल कायदाही करण्यांत आला आहे. असहकारितेच्या ठिणगीनें मोपल्यांचीं अंतःकरणें पेटून जाऊं नयेत, ह्याबद्दल सरकारनें प्रथमपासूनच काळजी घेतली होती. तथापि ही चळवळ इतर ठिकाणांप्रमाणें केरळ प्रांतामध्येंही पसरली. कॉंग्रेसच्या नियमांप्रमाणें केरळ हा नुकताच स्वतंत्र प्रांत बनला होता, व त्यामध्यें अर्थातच कॉंग्रेसच्या चळवळीला भरती आली होती. फेब्रुवारी महिन्यांत राजगोपालाचारी व मि. याकूब हुसेन ह्यांनीं ह्या प्रांतातील लोकांना अहिंसेच्या सांप्रदायाचा उपदेश देण्याकरितां म्हणून मुद्दाम भेट दिली. याकूब हुसेन ह्यांनीं असहकारितेसंबंधानें आपण कांहीं बोलणार नाहीं असें उघडपणें सांगितलें होतें. असें असूनही त्यांच्याविरुद्ध मनाई हुकूम काढण्यात आले. याकूब हुसेन, माधव नायर, गोपाळ मेनन व मोईद्दिन कोया यांना १६ फेब्रुवारी १९२१ रोजीं पकडण्यांत आलें. ह्या गोष्टीमुळें मलबारमधील असहकारितेच्या चळवळीला उत्तेजनच मिळालें. उट्टापलम् नांवाच्या लहानशा शहरांत केरळ प्रा. परिषद भरविण्यांत आली व तिच्याबरोबर इतर अनेक परिषदाही भरल्या. मुख्य परिषद संपली, विद्यार्थ्यांची परिषद चालू होती, त्या वेळीं रिझर्व्ह पोलिसांनीं कॉंग्रेसच्या कांहीं पुढाऱ्यांवर, खिलाफतमधील कार्यकर्त्यांवर व बाजारांतल्या कांहीं लोकांवर हात टाकला. परंतु आश्चर्य हें कीं, लोकांनीं अहिंसाव्रत पूर्णाशानें पाळलें. यानंतर बेझवाड्याच्या ठरावाबरहुकूम सर्व मलबारप्रांताची संघटणा करण्यात आली.

वळवानड व अर्नाड या तालुक्यांतच मोपला लोकांची मुख्यतः वस्ती आहे. परंतु ऑगस्ट महिन्यांत सरकारनें ज्या वेळीं ह्या भागाला १४४ कलम लागूं केलें त्या वेळीं सर्व परिस्थिति बदलून गेली. मशिदीमधील धर्मगुरूंचा अपमान करण्यात आल्यामुळें मोपल्यांचा संताप अनावर झाला, आणि ते अत्याचारास प्रवृत्त झाले. या भागांतील कांहीं मोपल्यांनीं लष्करी डावपेंच लढवूनही सरकारला तोंड दिले. मोपल्यापाशीं कांहीं बंदुका व तरवारीही होत्या. त्यांनीं गनिमी काव्याचा आश्रय केला आणि आजूबाजूच्या लोकांनीं त्यांना साह्य केलें.

ऑक्टोबरच्या दुसऱ्या आठवड्यांत या भागांत कडक स्वरूपाचा लष्करी कायदा लागू करण्यांत आला. मोपल्यांनींही ह्या वेळीं हिंदूंना सक्तीनें मुसलमान बनविणे, त्यांना लुटणें, त्यांच्या घरादारांना आगी लावणें अशीं कृत्यें केलीं. सरकारी अधिकाऱ्यांचा खून करण्यास किंवा त्यांच्या घरादारांची लूट करण्यासही त्यानीं कमी केलें नाहीं. या वेळीं तेथील इंग्रज लोकांवरही प्राण-संकट ओढवलें होतें. सर्व मलबारभर कॉंग्रेस कमिट्या स्थापन करणारे कॉंग्रेस कार्यकर्ते मि. एन्. पी. नारायण मेनन ह्यांनीं मोपल्यापाशी आपलें वजन खर्चा घालून पुष्कळ इंग्रजांचें प्राण वांचविले. याच पुढाऱ्याला १९२१ च्या नोव्हेंबर-मध्यें पकडण्यांत आलें राजबंदी म्हणून त्यांना प्रथम अडकाविण्यात आलें. नंतर १९२२ सालीं राजद्रोहाच्या आरोपावरून त्याच्यावर खटला करण्यांत येऊन त्यांना जन्मठेप काळेपाण्याची शिक्षा देण्यात आली. हे गृहस्थ आपली सर्व शिक्षा भोगून परवा १९३४ सालीं मुक्त झाले. व लोनाड तालुक्यांत तीन वर्षे जाणार नाहीं अशी अट पाळण्याचे त्यांनीं अभिवचन दिलें असते तर ते यापेक्षांही अगोदर सुटले असते. पण त्यानीं तसें करण्याचें नाकारलें व त्यांनीं धैर्यानें व स्वखुषीने ती शिक्षा भोगली. ऑगस्टनंतर या मोपल्याच्या बंडाला जें हिंसामय वळण लागलें त्याच्याशीं कॉंग्रेसचा काही संबंध नाहीं. ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटीनें मोपल्याच्या ह्या अत्याचाराबद्दल नोव्हेंबरच्या सभेंत ठराव केला. एवढाच कॉंग्रेसशीं याचा संबंध होता. कॉंग्रेसने ह्यापेक्षा अधिक या बाबतींत लक्ष घातले नाही.

ता. १७ नोव्हेंबर रोजीं युवराजांचें हिंदुस्थानांत आगमन झालें. नवीन असेंब्लीचें अनावरण करण्याकरितां युवराज हिंदुस्थानांत यावयाचे होते, पण १९२० च्या ऑगस्टमधील हिंदुस्थानांतील वातावरण या गोष्टीला अनुकूल नाहीं असें पाहून सरकारनें त्यांच्या जागीं ड्यूक ऑफ कॅनॉट ह्याची योजना केली. म्हणून त्यांना ब्रिटिश सरकारची अब्रू वाचविण्याकरितां नोव्हेंबरांत हिंदुस्थानांत पाठविण्यांत आलें. युवराजांच्या आगमनासंबधात झालेल्या समारंभावर बहिष्कार घालण्याची आज्ञा कॉंग्रेसनें केली होती. कॉंग्रेसची ही आज्ञा पूर्णपणें पाळली गेली इतकेंच नाहीं, तर परदेशी कापडाच्या होळ्या करून बहिष्काराच्या कार्यांत भर टाकण्यांत आली. मुंबईत ज्या वेळीं त्याचें आगमन झालें त्या वेळीं पोलिस व लोक ह्यांच्यांत केवळ थोडपागा चकमक झाल्या

असें नाहीं तर ठिकठिकाणीं दंगेधोपे व रक्तपातही झाला. मुंबईतील हा दंगा ४ दिवस चालू होता. ह्या दंग्यांत ५३ लोक मरण पावले व अंदाजें ४०० लोकांना जखमा झाल्या. श्रीमति सरोजिनी देवी, महात्मा गांधी, व इतर पुढारी ह्या वेळीं भरगर्दींत घुसले व त्यांनीं लोकांना गर्दी मोडण्याबद्दल विनति केली. या वेळीं बरेच लोक जखमी झाले. म. गांधींनीं हा दंगा थांबवून शातता प्रस्थापित होईपर्यंत उपोषण करण्याचें जाहीर केलें व त्याप्रमाणें त्याना ४ दिवस उपोषण करावें लागलें. "स्वराज्याच्या दुर्गंधीनें आपलें नासारंध्र भरून गेलें आहे" अशा आशयाचें पत्रक गांधींनीं ह्याच प्रसंगाला अनुसरून प्रसिद्ध केलें. युवराजाच्या आगमनानें सर्व हिंदुस्थानांतील स्वयसेवकाच्या चळवळीला स्थैर्य प्राप्त झालें. आतापर्यंत कॉंग्रेसचे स्वयंसेवक हे फक्त समाजाच्या सेवेचें कार्य करीत होते. यात्रेच्या व समारंभाच्या प्रसंगीं यात्रेकरूंना मदत करावी, सांथीच्या वेळीं किंवा स्थानिक संकट प्राप्त झाल्यास त्यांत सांपडलेल्या लोकाना मदत करावी, अशी कामें ते करीत असत आणि परिषदेच्या वेळीं आणि इतर सार्वजनिक कार्याच्या प्रसंगी पडेल तीं कामेंही ते करीत असत. परंतु खिलाफतीचे स्वयंसेवक यापेक्षा अधिक लढाऊ वृत्तीचे होते. हे स्वयंसेवक युनिफॉर्म वापरतात, व रस्त्यातून शिस्तीनें परेड करतात, असें सरकारनें म्हटलें आहे. कॉंग्रेस व खिलाफत या दोन्ही संस्थाच्या स्वयंसेवकानीं हरताळ पाडणें व परदेशी कापडावर बहिष्कार घालणें ह्या चळवळी संघटित केल्या. स्वयंसेवकांच्या ह्या दोन्ही संस्था एक झाल्या व ऑल इंडिया कॉ. कमिटीनें घातलेल्या अटीनुसार कायदेभंगाचें काम करण्यासही ते तयार झाले. हजारों स्वयंसेवकांना ह्या वेळी पकडण्यांत आलें. डिसेंबरच्या २५ तारखेस कलकत्ता येथें युवराजांचें आगमन व्हावयाचें होतें. बंगाल सरकारनें क्रि. लॉ. अमेंडमेंट ॲक्टान्वयें स्वयंसेवक नोंदविणें हें बेकायदेशीर आहे असें जाहीर केलें. आणि दास पतिपत्नि व त्यांचें चिरंजीव व इतर पुष्कळ लोक पकडण्यांत आले. लौकरच संयुक्तप्रांत व पंजाब ह्या चळवळींत सामिल झाले. अहमदावाद कॉंग्रेसचे सुमारास क्रि. लॉ. अमेंडमेंट ॲक्टान्वयें, १४४ कलमान्वयें किंवा १०८ कलमान्वयें लालाजी, पं. मोतिलाल नेहरू, जवाहरलाल नेहरू, दास व त्यांचें कुटुंब, या सर्वांना तुरुंगांत टाकण्यांत आले होते. हीं सर्व कलमें नवीन शोधून काढण्यांत आली होती व राजकीय चळवळीच्या बाबतींत ह्या कलमांचा उपयोग

करण्यांत यावा असा सल्ला वरिष्ठ सरकारने प्रा. सरकारला दिला होता. सर तेज बहादूर सप्रू १९२० च्या ऑगस्टमध्यें व्हॉइसरॉयांच्या एक्झीक्युटिव्ह कौन्सिलामध्यें लॉ. मेंबर झाले. मुंबईत नेहमींच्या सामान्य कायद्यावरच भागविण्यांत आलें. परंतु बंगाल, संयुक्तप्रांत व पंजाब ह्यांच्यावर दडपशाहीचे कायदे लागू करण्यात आले.

कॉंग्रेस व सरकार ह्यांच्यामध्यें ह्याच सुमारास तडजोडीच्या बोलण्यास सुरुवात झाली. व्हॉईसरॉय दरसाल ख्रिस्मस्च्या दिवसात कलकत्त्यास ३।४ आठवडे राहाण्यास येतात. यासाठीं याच वेळीं प्रिन्स ऑफ वेल्स हे आपला ख्रिस्तमसचा सण साजरा करणार होते. लॉर्ड रीडिंग कलकत्त्यांत असताना ती संधि पं. मालवीय ह्याच्या सारख्या मध्यस्थांनीं घेतली, व सरकार व लोक ह्यांच्यांत तडजोड घडवून आणण्याचा प्रयत्न केला. युवराजांच्या आगमनावरील बहिष्कार मागें घेण्यात आला तर व्हॉइसरॉय हे बोलणे करण्यास तयार होते. दास हे ह्या वेळीं कलकत्त्यातील अलिपूर जेलमध्यें होते. टेलिफोनद्वारा त्याचे व मध्यस्थ्यार्चे बोलणें झालें. गांधींचेंही मत या वेळीं समजावून घेणें जरूर होतें. ते या वेळीं अहमदाबादला होते. टेलिफोनद्वारा त्याच्याशींही चर्चा करण्यात आली. कायदेभंगांतील सर्व कैद्याची मुक्तता करण्यांत यावी, स्वराज्याच्या योजनेसंबधाने विचार करण्याकरितां राऊंड टेबल कॉन्फरन्स भरवावी व कॉंग्रेसचे २२ प्रतिनिधी या परिषदेत घेण्यात यावें अशा मागण्या यावेळीं पुढे आल्या होत्या.

सर्वच कैद्यांना विशेषत: क्रि. लॉ. अमेंडमेंटच्या नव्या कायद्यान्वयें पकडलेल्या कैद्यांना सोडून देण्यांत यावें अशी देशबंधु दासांची मागणी होती. दासाची ही मागणी मान्य झाल्यास लालाजीसारखी मंडळी व शिवाय "फतवा कैदी" म्हणजे मौलाना महंमदअली, मौ. शौकतअली, डॉ. किचलू ह्याना तसेंच तुरुंगांत डांबून राहावें लागले असतें. १९२१ च्या नोव्हेंबरमध्यें कराची येथें झालेल्या खिलाफत परिषदेला हजर राहिल्यामुळें ज्या लोकांना शिक्षा झाल्या, त्यांना कराची कैदी असें म्हणत असत. लष्करी नौकऱ्या संबंधांचा ठरावही या परिषदेंत पास करण्यांत आला. कांहीं उलेमानींही या ठरावाला पुष्टी दिली व एक फतवा जाहीर केला. कांहीं विशिष्ट परिस्थितींमध्यें मुसलमानांनीं कसें वागावें हें सांगण्याकरितां मुसलमानी धर्मातील धर्मगुरु अशा आज्ञा काढीत असतात.

१९२१ डिसेंबरांत झालेल्या ह्या तडजोडीची हकीकत वाचकांना कृष्णदास ह्यांनीं लिहिलेल्या " Seven months with Mahatma Gandhi " या पुस्तकांत सविस्तर वाचावयास मिळेल.

कराची कैद्यांना सोडण्यांत यावें असें महात्माजींचें म्हणणें होतें. फतवा कद्यांना सोडावे व पिकेटिंगचा हक्क मान्य करावा, ही गांधींजींची मागणी नाकारण्यांत आली. या बाबतींत गांधींनीं तारेनें पाठविलेलें उत्तर लॉर्ड रीडिंग ह्यांना कलकत्त्यास वेळेवर मिळालें नाहीं. दुर्दैवानें ही तार पोहोंचविण्याचे कामीं खोळंबा झाला. २३ डिसेंबर रोजीं गांधींचे दोस्त कलकत्ता सोडून निघून गेले. नंतर ही तडजोड फसली. मि. जिना व पं. मालवीय हे दोघे या वाटाघाटींच्या बाबतींत मध्यस्थ होते. ही तडजोड फसल्यामुळें युवराजांच्या स्वागतावरील बहिष्काराचा कार्यक्रम सर्व हिंदुस्थानभर पाळण्यांत आला. कलकत्त्यांत झालेला हा हरताळ अगदीं पूरेपूर होता. कसावांनींही आपलीं दुकानें बंद केली होती. युरोपियनांना या गोष्टीचा फार संताप आला. कायदेभंग करणाऱ्या लोकांना आपली शिक्षा भोगून परत यावें लागलें. १९२१ डिसेंबरच्या शेवटच्या आठवड्यांत अहमदाबाद येथें कॉंग्रेसचें अधिवेशन भरलें. असहकारितेचा कार्यक्रम ह्या वेळीं कळसाला पोंहोचला होता. नागपूरच्या अधिवेशनापासून देशांतल्या राजकीय परिस्थितींत कोणत्याही प्रकारचा फरक पडला नाहीं. नव्या सुधारणांच्या अंमलबजावणीला ड्यूक ऑफ कॅनॉट ह्यांनीं आरंभ केला, आणि ही संधि साधून पुढील बादशाही संदेश जाहीर करण्यांत आला. " गेली कांहीं वर्षेंच नव्हे तर कांहीं पिढ्याही लोटून गेल्या, राष्ट्राभिमानी, राजनिष्ठ हिंदी लोकांना आपल्या मातृभूमीला स्वराज्य मिळावें अशीं स्वप्नें पडत होतीं. माझ्या साम्राज्यातील स्वराज्याच्या प्रारंभीचे हक्क आज तुम्हांला देण्यांत येत आहेत. माझ्या इतर वसाहती ज्या स्वातंत्र्याचा उपभोग घेत आहेत त्याची प्राप्ती होण्याच्या दृष्टीनें प्रयत्न करण्याकरितां पुष्कळ मोठी व चांगली संधि तुम्हांला देण्यांत येत आहे."

थबकत थबकत केलेला हा ' स्वराज्याचा उल्लेख, मागें झालें तें विसरून जा, व क्षमा करा, ही ड्यूकसाहेबांनीं केलेली विनंति, सरकारनें सर विल्यम व्हिन्सेंट यांच्या तोंडून असेंब्लीमध्यें प्रदर्शित केलेली दिलगिरी, आणि असें कृत्य पुन्हां होणार नाहीं, या बद्दल प्रगट केलेला निश्चय या सर्वांचा लोकांचें समाधान करण्याचें कामीं कांहीं उपयोग झाला नाहीं, किंवा लोकांच्या मनांत सरकारसंबंधीं

विश्वासहि उत्पन्न झाला नाहीं. असहकारितेचा कार्यक्रम पूर्वी प्रसिद्ध करण्यांत आलाच होता त्याचा तपशील पूर्णपणें अहमदाबाद अधिवेशनांत ठरविण्यात आला. नियोजित अध्यक्ष देशबंधु दास हे तुरुंगांत होते, त्यामुळें हकीम अजमलखान यांना त्यांच्या जागीं निवडण्यांत आलें. सर्व वातावरण प्रक्षुब्ध झालें होतें. "एका वर्षांत स्वराज्य" या कल्पनेनें प्रत्येकाचें मन व्यापून टाकलें होतें. वर्ष भरत आलें होतें व कांहीं तरी चमत्कार घडेल व स्वराज्य आपल्या पायाशीं लोळण घेईल, या कल्पनेनें प्रत्येकजण राजकीय नभोमंडळाकडे टक लावून पहात असून आपल्या हातून होतील तेवढे प्रयत्न करण्यास तयार होता, इतकेंच नव्हें तर लवकरच घडून येणारी ही दैवी घटना अधिक लवकर घडून यावी या इच्छेनें कसलेही प्रसंग आले तरी सहन करण्यास प्रत्येकजण तयार होता. या बाबतींत जेवढा आत्मयज्ञ करावा लागेल तेवढा थोडाच होता. वैयक्तिक कायदेभंग करणारे २० हजारावर लोक आतांच तुरुंगांत होते. ही सख्या ३० हजारापर्यंत वाढावयाची होती परंतु सामुदायिक कायदेभंगाच्या कल्पनेनें लोकांचीं मनें मोहून गेलीं होतीं. हा कायदेभंग कोणत्या प्रकारचा होता व कोणतें स्वरूप त्याला प्राप्त होणार होतें बरें? खुद्द गांधीजींनींहि त्याची व्याख्या केली नव्हती. त्याचा कार्यक्रम आंखलेला नव्हता व त्याची कल्पनाहि त्याना आलेली नव्हती. जंगलातून जाणाऱ्या व निराश झालेल्या माणसाच्या पावलाला काळोख्या रात्रीं आपोआप पुढची वाट सांपडावी, त्याप्रमाणें हा कायदेभंगाचा कार्यक्रम आपोआप प्रगट व्हावयाचा होता. योग्य कार्यक्षेत्रांत घालून दिलेल्या शिस्तीचें पालन करून एकाद्या कर्तृत्ववान् माणसाच्या नेतृत्वाखालीं धिमेपणानें पण अविश्रांतपणें हा कार्यक्रम सुरूं व्हावयाचा होता. म्हणून महात्मा गांधींना गुजराथमध्यें करबंदीची ही चळवळ संघटित करावयाची होती. परंतु गुंटूर येथील कांहीं मित्रांनीं आपल्या जिल्ह्यांत तितक्याच उत्साहानें, स्वार्थत्याग बुद्धीनें व कष्ट सोसण्याच्या धडाडीनें करबंदीच्या चळवळीची तयारी केली होती.

'डर तो पिछे रहो' अशी लोकांची वृत्ति बनली होती. स्वाभिमानाची भावना राष्ट्रांत विकसित झाली होती. जनतेचा विश्वास संपादन करावयाचा असेल तर, सेवा व स्वार्थत्याग करण्यास तयारी असली पाहिजे, ही गोष्ट कॉंग्रेसच्या लोकांना पटली होती. सरकारच्या इभ्रतीचा डोलाराहि हादरून गेला होता. स्वराज्याचें ध्येय निश्चित होण्याच्या दृष्टीनें लोकांना अनेक चांगले धडे शिकावयास मिळाले

होते. अहमदाबादचें अधिवेशन आणखी दुसऱ्या बहुविध सुधारणामुळें प्रसिद्धीला आलें. खुर्च्या व बाकें यांची व्यवस्था करण्याकरिता नागपूर येथें जवळ जवळ ७० हजार रुपये खर्च झाले होते. अहमदाबादनें या खुर्च्या-बाकांना रजा दिली. स्वागतमंडळाचे अध्यक्ष श्री. वल्लभभाई पटेल यांचें भाषण फारच छोटें झालें. त्याचप्रमाणें ठरावांची संख्या पण फारच लहान—एकंदर ९ होती कॉंग्रेसमधील सर्व भाषणें मुख्यतः हिंदीत झालीं. दोन लाखाहून ज्यास्त किंमतीची खादी तंबू वगैरेकरतां उपयोगात आणली. महात्मा गांधींनीं धार्मिक संदेश देण्यासाठीं रे. अँड्र्यूज यांना अहमदाबादच्या अधिवेशनाचें मुद्दाम आमंत्रण दिलें होतें. त्यांनीं या आमंत्रणाचा स्वीकारही केला होता. परंतु परदेशी कापडाच्या होळीच्या बाबतींत आपण विरुद्ध आहों, असें त्यांनीं महात्माजींना कळविलें होतें, कारण असल्या प्रकारामुळें हिंसेची प्रवृत्ति वाढेल असें त्याना वाटत होतें. होळीच्या धोरणाविरुद्ध आपण आहों हें स्पष्टपणें दर्शविण्याकरितां ते त्या दिवशीं आपला नेहमींचा पोशाख न करता युरोपियन पोषाखांत उपस्थित झाले होते. या प्रसंगीं आपण खादी का वापरली नाहीं, याचें त्यानीं स्पष्टीकरण केलें. लोकांना त्यांचें मत पटलें नाहीं, तरी त्यांच्याबद्दल त्यानीं अत्यंत आदर व प्रेमभाव प्रकट केला ही लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट आहे. शांतिदूत म्हणून आपण गांधींच्या विनंती-वरून मोपल्याच्या देशांत, अहमदावाद सोडून आजच रात्रीं जाणार असल्याचें रे. अँड्र्यूज यांनी आपल्या भाषणाच्या शेवटी जाहीर केलें.

कॉंग्रेसमध्यें जमलेल्या लोकाचीं अंत करणें या वेळीं कोणत्या गोष्टीने वेधलीं होतीं हें आपण पाहूं. देशबंधु दास यांच्या गैरहजेरींत हकीमजी याची अध्यक्ष-स्थानीं योजना करण्यात आली होती. हिंदु-मुसलमान ऐक्याचें ते प्रत्यक्ष पुतळें होते. दिल्ली येथें झालेल्या हिंदु महासभेचेही ते एकदा अध्यक्ष झाले होते. त्यांचा सर्व रुवाब बादशाही थाटाचा होता. त्याची संस्कृति उच्च दर्जाची होती. त्यांचें चारित्र्य शुद्ध होतें. त्याची बुद्धिमत्ताही सामान्य प्रतीची नव्हती. त्यांचें भाषण साधें पण परिणामकारक झालें. देशबंधूंचें भाषण देवी सरोजिनी यांनीं वाचून दाखविलें. दासांचें भाषण अत्युत्कट भावना व उच्च भाषाशैली यांनीं युक्त होतें. देवी सरोजिनींनी आपल्या वक्तृत्वपूर्ण वाणीनें त्यांतील भाव व्यक्त केला. हिंदी राष्ट्रीयत्वाच्या चळवळीचा बिनचूक व व्यापक विचार देशबंधु दास यांनीं आपल्या भाषणांत केला होता. "एकराष्ट्रीयत्व ही गोष्ट हिंदी संस्कृतींत

मुरलेली आहे व तिच्या पुनरुज्जीवनाकारितां अतिथीचा सत्कार करण्यापूर्वी, आपलें घर आपण प्रथम मिळविलें पाहिजे आणि दुसरी गोष्ट म्हणजे आपली संस्कृति काय आहे याचें प्रथम संशोधन करून पाश्चात्य संस्कृतीचें ग्रहण करण्यास आपण तयार झालें पाहिजे" असें सांगून देशबंधू दास यांनीं आपल्या भाषणांत 'गव्हर्मेंट ऑफ इंडिया ॲक्ट'चे परीक्षण केलें होतें. "हिंदुस्थान हा ब्रिटिश साम्राज्यांतील एक स्वतंत्र व समान दर्जाचा घटक आहे या तत्त्वाला ब्रिटिश पार्लमेंटनें मान्यता दिली पाहिजे" असा उल्लेख या कायद्याच्या प्रस्तावनेमध्यें कोठें केला आहे काय? असें त्यानीं विचारलें होतें. "असें मला वाटत नाहीं." असे साधें उत्तर या प्रश्नाचें त्यानीं दिलें होतें. "इंग्लंडशी सहकार्य करण्यास मी अगदी राजीखुषीनें तयार आहे, पण तें फक्त एकाच अटीवर आणि ती म्हणजे स्वातंत्र्याच्या या जन्मसिद्ध हक्काला इंग्लंडनें मान्यता दिली पाहिजे. सरकारशी करावयाच्या सहकारितेचा पाया या दृष्टीनें या कायद्याचा स्वीकार करावा, अशी शिफारस मी करूं शकत नाहीं. अपमानाच्या मोलानें मी शांतीचा स्वीकार करणार नाहीं. ही प्रस्तावना जोंपर्यंत अशीच कायम राहील, आमचा हक्क, आमचा राज्यकारभार चालविण्याचा आमचा जन्मसिद्ध हक्क, वैयक्तिक विकास करण्याचा व आमचा भविष्यकाळ उज्वल करण्याचा आमचा हक्क जोंपर्यंत मान्य करण्यांत आला नाहीं तोंपर्यंत शांततेच्या कोणत्याही अटीचा विचार करण्यास मी तयार नाहीं." आपलें धोरण याप्रमाणें जाहीर केल्यानंतर "असहयोग्यांनीं स्वीकारलेल्या धोरणामुळे आपण पंचायतीत पडलों आहों व गोंधळून गेलों आहों," या लॉर्ड रीडिंग यानीं वेळोवेळी काढलेल्या उद्गाराचें त्यानीं परीक्षण केलें, व सामान्य कायद्याच्या आधाराने असहकारितेला प्रतिकार करण्यात येत असल्यामुळें, ती दडपशाही असें म्हणता यावयाचें नाहीं, हें लॉर्ड रीडिंग यांचें म्हणणें कसें चुकीचें आहे हें त्यांनीं दाखविलें.

अहमदाबाद अधिवेशनांत जे ठराव झाले त्यांचें धोरण देशबंधु दास यांच्या भाषणांतच दिग्दर्शित करण्यांत आलें होतें. या अधिवेशनांतील मुख्य ठराव म्हणजे, असहकारितेवरील एक प्रबंधच होता. असहकारितेचें तत्त्वज्ञान व कार्यक्रम यांचा त्यात विचार केला होता. हा ठराव हिंदींत व इंग्रजींत वाचण्यास आपल्याला ३५ मिनिटें लागलीं असें महात्माजींनीं सांगितलें. या ठरावाचें स्पष्टीकरण स्वतः ठरावानेंच केलें आहे, असें ते म्हणाले. "लेखा

पंधरा महिन्यांत ज्या राष्ट्रीय चळवळी झाल्या, त्यांचा हा स्वाभाविक परिणाम आहे, असेंही त्यांनीं सांगितलें. तडजोडीचा दरवाजा या ठरावानें बंद केलेला नाहीं. व्हॉइसरॉयांची सदिच्छा असेल तर तो केव्हांहि सताड उघडाच आहे. तसें नसेल तर मात्र तो बंद आहे. कितीहि लोक या झगड्यांत बळी पडले, कसल्याहि प्रकारची पाशवी दडपशाही करण्यांत आली, तरी त्याची पर्वा करण्यांत येणार नाहीं. त्याची इच्छा असेल तर राउंड टेबल कॉन्फरन्स भरविण्याची संधि आता आली आहे. परंतु ही परिषद नांवाप्रमाणें खरीखुरी पाहिजे. जर त्यांना अशी परिषद पाहिजे असेल, तर तींत फक्त समान योग्यतेचे व दर्जाचे लोकच हजर राहूं शकतील, एकहि भिकारी तेथें हजर राहणार नाहीं. असें असेल तरच दरवाजा खुला आहे व तो नेहमींच खुला राहील. विनयशील व लीन माणसाला शरम वाटेल असें या ठरावांत कांहीं नाहीं. कोणालाहि अरेरावीपणानें या ठरावांत आव्हान दिलेलें नाहीं. पण उद्दामपणावर आधारलेल्या अधिकारालाच हें उघड उघड आव्हान आहे. स्वातंत्र्याच्या प्राणवायूचें श्वसन करण्यास अत्यंत अवश्यक असलेलीं दोन फुप्फुसें म्हणजे, मत स्वातंत्र्य व सभास्वातंत्र्य हीं होत. आपल्या अधिकाराचें रक्षण करण्याकरतां हें स्वातंत्र्याचें हक्क चिरडून टाकण्यास तयार झालेल्या अधिकाऱ्यांना हें नम्र आव्हान आहे, व तें कधींही मागें घेतलें जाणार नाहीं." असहकारितेचा मुख्य ठराव आम्हीं खालीं देत आहोंः—

## ठराव १ ला

नागपूरच्या काँग्रेसनें अनत्याचारी असहकारितेचें तत्त्व स्वीकारल्यामुळें जनतेंत स्वाभिमान, स्वार्थत्याग, आणि निर्भयपणा, या गुणांचीं वाढ होत आहे, आणि स्वराज्याच्या मार्गात राष्ट्राचें पाऊल झपाट्यानें पुढें पडत आहे, हें लक्षात घेऊन, ही सभा कलकत्त्याचा व नागपूरचा असहकारितेचा ठराव कायम करीत आहे. या पुढेंही पंजाब व खिलाफत प्रकरणांतील अन्याय दूर होईपर्यंत आणि बेजबाबदार नोकरशाहीच्या हातांतील सत्ता हिंदी जनतेच्या हातीं येईपर्यंत प्रत्येक प्रांतानें आपल्या कार्यक्रमाप्रमाणें ही असहकारितेची चळवळ जास्त नेटानें चालवावी.

व्हाइसरॉयांनीं अलीकडील कांहीं भाषणांत धमकी दिल्याप्रमाणें हिंदुस्थान-सरकार व प्रांतिक सरकारें यांनीं स्वयंसेवक मंडळें मोडणें, जाहीर रितीनें भरलेल्या कमिटींच्याही सभा बंद करणें, चळवळ्या लोकांस अटक करणें व

सर्व काँग्रेसच्या व खिलाफतीच्या चळवळी मारून टाकण्याचा प्रयत्न करणें व लोकांना यांची मदत मिळूं न देणें वगैरे दडपशाहीचें प्रकार सुरू केलें आहेत; यास्तव तूर्त जरूर पडेल त्याप्रमाणें इतर कार्यें बाजूस ठेवून, सर्वांनी मुंबई येथें ता. २३ नोव्हेंबर रोजीं भरलेल्या वर्किंग कमिटीच्या ठरावास अनुसरून सर्व देशभर स्थापन करण्यांत येणाऱ्या स्वयंसेवक मंडळांत दाखल होऊन शांतपणें व कोणताही देखावा न करतां अटक करून घेण्यास तयार व्हावें. पुढील अटी शपथपूर्वक मान्य केल्याशिवाय कोणालाही स्वयसेवक मंडळांत दाखल करण्यांत येणार नाही.

परमेश्वराला साक्षी ठेवून मी गंभीरपणें जाहीर करतों कीं,

( १ ) स्वयंसेवक मंडळांत दाखल होण्याची माझी इच्छा आहे.

( २ ) हिंदुस्थानच्या हल्लींच्या परिस्थितींत पंजाब व खिलाफत या बाबतींतील अन्याय दूर करण्याचा, स्वराज्य मिळविण्याचा आणि हिंदु, मुसलमान, पार्शी, खिश्चन, ज्यू या सर्व वर्गांची एकी राखण्याचा ह्याच एक मार्ग असल्यामुळें मी शब्दात व कृतींत अनत्याचारी राहण्याचा प्रयत्न करीन.

( ३ ) जनतेंत एकी राखणें इष्ट असल्यानें मी त्या दिशेने नेहमीं प्रयत्न करीन.

( ४ ) आर्थिक, राजकीय व नैतिक उन्नतीला अवश्य म्हणून मी स्वदेशी व्रत स्वीकारून हातसुतानें हातमागावर विणलेल्या खादीखेरीज इतर कपडा वापरणार नाहीं.

(५) हिंदू या दृष्टीनें अस्पृश्यता दूर करणें न्यायाचें व इष्ट असल्यामुळें शक्य त्या सर्व प्रसगीं मी अस्पृश्य वर्गांत मिसळून त्याच्या उन्नतीविषयीं झटेन.

(६) माझे वरिष्ठ अधिकारी आणि काँग्रेसनें स्थापलेलें बोर्ड, किंवा कार्यकारी कमिटी याचे जे जे हुकूम या शपथपत्रकातील अटींना अनुसरून असतील ते ते मी पाळीन.

(७) आपल्या देशाकरिता व धर्माकरिता मी शारिरीक छळ, तुरुंगवास किंवा मरणहि शांतपणें सोसण्यास तयार आहे.

(८) मला तुरुंगवास प्राप्त झाल्यास माझ्या कुटुंबाच्या व माझ्यावर अवलंबून असलेल्या लोकांच्या पोषणाकरिता मी काँग्रेसकडे कसलीही मागणी करणार नाहीं.

वरील अटी मान्य करून अठरा वर्षांवरील प्रत्येक [illegible] [illegible] मंडळात दाखल व्हावें.

वाटल्याशिवाय राहणार नाहीं. परंतु त्या वेळीं म. गांधीजींना स्पष्ट बोलणेंच भाग पडलें.

" तुमच्यांपैकीं कांहीं लोक या प्रश्नाचा इतका छचोरपणानें विचार करतात हें पाहून मला फार दुःख वाटतें. मला दुःख वाटतें याचें कारण तुम्हाला या बाबतींतील जबाबदारीची जाणीव असलेली दिसत नाहीं. जबाबदार स्त्रीपुरुष या दृष्टीनें तुम्ही परत नागपूर व कलकत्ता कॉंग्रेसच्या वेळच्या परिस्थितीचा विचार केला पाहिजे." गांधीजींनीं या वेळीं वापरलेली भाषा कडक होती असें ही हकीकत वाचतांना आपल्याला वाटल्यावांचून राहणार नाहीं. पण अशी कडक भाषा मुद्दामच योजण्यांत आली होती; पण ती वाजवीपेक्षां अधिक कडक होती कीं काय हाच प्रश्न आहे. गांधीजींनीं एका नवीनच चळवळीला प्रारंभ केला होता. नवीन ध्येयाची उभारणी केली होती व नव्या हल्ल्याची योजना केली होती. सर्वांगपरिपूर्ण अशी ही नवीन स्वारी होती. तिचे उद्देश ठरले होते व तिचे डावपेंचही ठरले होते. लहानसहान चकमकी झडत होत्या व कॉंग्रेसचें लष्कर त्यांत गुंतून राहिलें होतें. एक प्रचंड युद्ध लवकरच झडावयाचें होतें. अशा वेळीं एकाद्या सैनिकानें सेनापतीकडे व लष्कराकडे जाऊन युद्धाच्या उद्दिष्टाची पुन्हा व्याख्या करण्यास सांगणें म्हणजे युद्धाकरितां सज्ज केलेल्या सेनेची शिस्त बिघडवून टाकण्यासारखें आहे. ही सूचना ज्या वेळीं पुढें आली तो काल अगदीं अप्रासंगिक होता यात शंका नाहीं. आणि ज्या आवेशानें ही सूचना पुढें आली, तोही तिला सहाय्यक झाला नाहीं. अशा वेळीं सेनापतीचें मन व्यग्र झालें किंवा तो थोडा संतप्त झाला तर त्यांत कांहीं आश्चर्य नव्हतें. नागपूर येथें विरोधी पक्षानें जीं कारणें पुढें आणलीं होतीं तीच कारणें म. गांधींनींही यावेळीं पुढें मांडलीं.

" आम्ही कोणत्या परिस्थितींत आहों हें आमचें आम्हाला खरेखुरें माहीत नाहीं, असा जगांतील विचारी लोक आमच्यावर आरोप ठेवल्याशिवाय राहणार नाहींत. आम्हीसुद्धां आमच्या मर्यादा ओळखल्या पाहिजेत. हिंदू व मुसलमान यांच्यांत अभेद्य एकी होऊं दे. होय, हिंदु-मुसलमान ऐक्य हा हिंदी राष्ट्रियत्वाचा एक अभेद्य घटक आहे असें कोणाला सागतां येईल ? इतका आत्मविश्वास वाटणारा येथें कोणी आहे काय ? पार्शी व शीख, खिश्चन व ज्यू आणि अस्पृश्य–ज्याच्याबद्दल तुम्ही आज सध्याकाळींच अनेक गोष्टी ऐकल्या ते–अस्पृश्य

लोक असल्या कल्पनेविरुद्ध उठणार नाहींत हें कोणीं सांगावें ? या कारणपरं-परेचा अर्थ हाच होतो कीं, " प्रथम आपण आपलें सामर्थ्य एकत्रित करूं. आपण ज्या परिस्थितींत आहों त्याची खोली किती आहे तें प्रथम आपण पाहूं. ज्या पाण्याची खोली आपल्याला माहीत नाहीं त्यांत पाऊल टाकण्यांत अर्थ नाहीं. मि. हजरत मोहानी यांची सूचना अशीच आहे. अगाध पाण्यांत ती आपल्याला नेऊन सोडीत आहे. " हा मुद्दा अगदीं हृदयाला भेदून जाणारा होता. ज्या पाण्याची खोली आपणाला माहीत नाही अशा पाण्यांत कोणताही सेनापति आपलें लष्कर घेऊन जाणार नाहीं. हा ठराव फेंटाळला गेला पण तो यापुढें दरसाल काँग्रेसपुढें मांडण्यांत येऊं लागला. अखेर मद्रास येथें १९२७ सालीं तो मान्य करण्यात आला व लाहोर येथें १९२९ सालीं काँग्रेसच्या ध्येयांतही त्याचा समावेश करण्यात आला.

बाकीच्या ठरावापैकीं एक ठराव घटनेसंबंधाचा होता आणि काँग्रेसचें कामगार मंडळ नेमण्याचें दुसरे दोन ठराव होते. मोपल्यांच्या दंग्यासंबंधानेंही एक ठराव झाला. असहकारिता किंवा खिलाफत चळवळ ह्याच्याशीं ह्या दंग्याचा काहीं संबंध नव्हता. अहिंसेचा उपदेश करणाऱ्या लोकाना आपला संदेश त्या भागांत पोंचविण्याची ह्या दंग्यापूर्वीं ६ महिने मनाई करण्यात आली होती. याकूब हुसेन व महात्मा गांधीप्रभृति असहकारवादी पुढाऱ्यांना त्या भागात जाण्याची परवानगी असती तर हा दंगा इतका लावला नसता. ह्या मोपल्यापैकीं जवळ जवळ १०० मोपले कैद्यांना मालाच्या वॅगनमध्यें भरून त्याना बल्लारी येथें नेण्यात आले व त्यांपैकीं ७० कैदी १९ नोव्हेंबर १९२१ रोजीं रात्रीं गुदमरून मरण पावले. या अमानुष प्रकाराबद्दल एका ठरावानें संताप व्यक्त करण्यांत आला. १७ नोव्हेंबर रोजीं मुंबई येथें घडलेल्या प्रकाराबद्दल काँग्रेसनें दिलगिरी व्यक्त केली. आणि सर्व जाती व सर्व पक्ष ह्यांच्या हक्कांचें पूर्ण संरक्षण करण्याचा काँग्रेसचा निश्चय व इच्छा आहे, असें जाहीर करण्यात आलें. ग्रीक लोकांविरुद्ध केमालपाशानें विजय संपादन केला व त्यामुळें सेव्हर्सच्या तहाची फेरतपासणी करण्यांत आली. त्याचप्रमाणें ७ वर्षें फरारी राहिल्यानंतर बाबा गुरुदत्तसिंग हे आपण होऊन पोलिसच्या स्वाधीन झाले. व या प्रसंगीं व इतर प्रसंगीं शीखलोकांचीं मनें प्रक्षुब्ध होतील अशीं कृत्यें पोलिस व लष्करांतील शिपाई ह्यांनीं केलीं, तरी शिखांनीं आत्मसंयमन केला त्याबद्दल त्यांचें अभिनंदन केलें.

कॉँग्रेसपुढें आलेल्या राजकीय प्रश्नावर मुसलमानांतील धर्मगुरूंनीं आपले विचार प्रगट केले व कॉँग्रेसमध्यें प्रामुख्यानें भाग घेतला ही अहमदाबाद अधिवेशनांतील एक महत्त्वाची गोष्ट होती. वैयक्तिक किंवा सामुदायिक कायदेभंगाच्या बाबतींत ज्या अटी घालण्यांत आलेल्या आहेत त्यांपैकीं शब्दानें, कृतीनें व मनानें कायदेभंगांत भाग घेणाऱ्या लोकांनीं अहिंसाव्रत पाळाव ह्यावर खूप कडाक्याचा वादविवाद झाला. कलकत्त्याच्या ठरावांत फक्त शब्द आणि कृति एवढयांचाच समावेश करण्यांत आला होता. विचार ( Thought ) ह्या शब्दाला मुसलमानांनी आक्षेप घेतला. शरीयतच्या ते विरुद्ध आहे असें त्यांचें म्हणणें होतें म्हणून विचार ( Thought ) ह्या ऐवजीं हेतू ( Intent ) हे शब्द घालण्यांत आले. ह्या सर्व वादविवादांत उलेमांनीं महत्त्वाचा भाग घेतला. व कुराण, शरीयत व हादीस ह्या ग्रंथांच्या आधारें राजकीय ध्येयांचा त्यांनीं अर्थ लावून दाखविला. कौन्सिल प्रवेशाच्या बाबतींत व त्यानंतर इतर प्रसंगींही ह्या उलेमांचें साहाय्य घेण्यांत आलें होतें हें येथें सांगावयास हरकत नाहीं. ह्यानंतर कायदेभगाच्या मुख्य ठरावांतील महात्मा गांधींना डिक्टेटर नेमण्याबाबतच्या कलमावर चर्चा करण्यांत आली. आणि महात्माजींनीं किंवा त्यांच्या मागून येणाऱ्या सर्वाधिकाऱ्यांनीं प्रतिपक्षाशीं तह करावयाचा असल्यास किंवा कॉंग्रेसच्या ध्येयांत बदल करावयाचा असल्यास कॉंग्रेसच्या परवानगीशिवाय कांहीं करतां येणार नाहीं त्याकरितां कॉंग्रेसचीच परवानगी घेतली पाहिजे, ह्या मुद्यावर विशेष भर देण्यांत आला. अहमदाबाद अधिवेशनामध्यें आणखी एक विशेष गोष्ट दिसून आली. कॉँग्रेसचे अधिवेशनाचें काम संपल्यानंतर कॉंग्रेसचे प्रतिनिधि तावडतोब गावोगाव जाण्यास खुषी नव्हते. हें पाहून म. गांधी प्रत्येक प्रांताच्या कॅम्पमध्यें गेले व त्यानीं कायदेभगाचें विधान तेथल्या प्रतिनिधींना समजावून दिलें. आंध्र कॅंपमध्यें गेल्यानंतर ह्यासंबंधानें ते तेथें बराच वेळ बोलले. ज्या क्षेत्रांत करबंदीची चळवळ करावयाची असेल त्या ठिकाणीं स्वयंसेवकांनीं खेड्यापाडयांतून फिरलें पाहिजे व ह्या चळवळीला अनुमती असल्याबद्दल त्यांच्या सह्या घेतल्या पाहिजेत असें त्यांनीं सांगितलें. सामुदायिक व वैयक्तिक कायदेभंगाच्या बाबतींत ज्या अटी घालण्यांत आल्या त्यांत या अटीची एक भर पडली.

# प्रकरण तिसरें

# गांधींची अटक १९२२

१९२१ साल संपतें न संपतें इतक्यांत या नव्या कार्यक्रमामध्यें ज्या कॉंग्रेसच्या मित्रांनी भाग घेतला नव्हता त्यांनीं सरकार व कॉंग्रेस ह्यांच्यामध्यें सलोखा घडून यावा याबद्दल सद्हेतूपूर्वक प्रयत्न केला. अहमदाबादच्या ठरावांची शाई अद्याप वाळली नव्हती तोंच ता. १४।१५।१६ जानेवारी रोजीं मुंबई येथें सर्वपक्षीय परिषद भरविण्यांत आली. ह्या परिषदेला ३०० प्रतिनिधि हजर होते. कॉंग्रेस व सरकार ह्याच्यांत कोणत्या अटींवर तह होईल त्यासंबंधाचा एक मसुदा तयार करावा असा चालकाचा विचार होता. असहकारवादी लोकांची परिस्थिति समजावून देतांना महात्मा गांधी म्हणाले कीं 'कायदेशीररीतीनें आपल्याला ह्या परिषदेंत भाग घेतां येत नसला तरी शिष्टाचार म्हणून आपण तिला मदत करण्यास तयार आहों' असें त्यांनीं सांगितलें. सरकारची दडपशाही अद्याप चालू असल्यामुळें आपण ह्या परिषदेंत भाग घेऊं शकत नाहीं असें ते म्हणाले, आणि जोंपर्यंत सरकारला पश्चात्ताप वाटत नाहीं तोंपर्यंत कोणत्याही गोलमेज परिषदेचा उपयोग होणार नाहीं, असें त्यांनीं आपलें मत दिलें. ह्या परिषदेनें २० लोकांची विषयनियामक कमिटी नेमली होती. असहकारवाद्यांच्या वतीनें महात्मा गांधी हे एकटेच सभासद ह्या कमिटींत हजर होते. विषय नियामक कमिटींत तयार झालेला मसुदा या परिषदेपुढें ठेवण्यात आला. व गांधीजींनीं पुन्हा असहकारवाद्यांची परिस्थिति काय आहे, हें समजावून सांगितलें. कमिटीनें तयार केलेला मसुदा परिषदेचे अध्यक्ष सर शंकर नायर ह्यांना पसंत पडला नाहीं म्हणून ते कॉन्फरन्समधून निघून गेले आणि त्याचे जागीं सर एम्. विश्वेश्वर अय्या यांची निवडणूक करण्यात आली. सरकारच्या दडपशाहीच्या धोरणाचा एकमतानें निषेध करण्यात आला व या तडजोडीच्या वाटाघाटी चालू असेपर्यंत अहमदाबादच्या ठरावाप्रमाणें कायदेभंग करण्याचें तहकूब करावें, अशी सूचना करण्यांत आली. खिलाफत, पंजाब व स्वराज्य ह्या प्रश्नाच्या बाबतींत तडजोड घडवून आणण्याचा अधिकार असलेली 'गोलमेज परिषद' लौकरच भरविण्यात यावी, असें ठर-

विण्यांत आलें. क्रि. लॉ अमेंडमेंटच्या कायद्यान्वयें दिलेल्या नोटीसा परत घ्याव्या, सिडिशस मीटिंगच्या कायद्यान्वयें निरनिराळ्या राजकीय संस्थांवर लादलेले मनाई-हुकूम रद्द करावे व या कायद्यान्वयें शिक्षा झालेल्या कैद्यांना व अंडर ट्रायल कैद्यांना सोडून देण्यांत यावें, तसेंच 'फतवा' च्या बाबतींत शिक्षा झालेल्यांनाही सोडावें व असें करून तडजोडीला अनुकूल वातावरण निर्माण करावें, असाही एक ठराव करण्यांत आला. सामान्य कायद्यान्वयें या चळवळींतील ज्या लोकांना शिक्षा झाल्या त्यांच्या खटल्यासंबंधानें चौकशी करण्याकरितां कमिटी नेमण्यात यावी, अशी विनंति करण्यांत आली. ही परिषद संपल्यानंतर सर शंकर नायर ह्यांनीं एक पत्रक प्रसिद्ध केलें. त्यांत कांहीं चुकीचीं विधानें करून त्यांनीं गांधीजीवर जोराचा हल्ला चढविला होता. मि. जिना, जयकर व नटराजन् ह्यांनीं सेक्रेटरी या नात्यानें व इतर काहीं पुढाऱ्यांनींही पत्रकें काढून या विधानांचा समाचार घेतला. या परिषदेंत असहकारवाद्यासंबंधानें जे ठराव पास झाले ते वर्किंग कमिटीच्या १७ जानेवारी रोजीं भरलेल्या सभेंत मान्य करण्यात आले. तसेंच, ह्या महिन्याच्या अखेरपर्यंत कायदेभंगाच्या चळवळीला आरंभ करूं नये असेंही ठरविण्यांत आलें. लॉर्ड रीडिंग ह्याच्याशीं झालेल्या पत्रव्यवहारावरून असें दिसून आलें कीं, त्यांनी ह्या परिषदेबद्दल बेपर्वाई दाखविली. शेवटीं ह्यांतून कांहीं निष्पन्न झालें नाहीं. यावरून कलकत्ता येथें सरकारनें तडजोडीसंबंधानें जी तत्परता दाखविली व जे गोड शब्द लॉर्ड रीडिंग ह्यांनीं उच्चारले त्याच्यामागें कळकळ नव्हती असें ह्या मध्यस्थांना कळून आले. असहकारवाद्यांनीं युवराज आले असतांना त्यांचे विरुद्ध मिरवणुकी वगैरे काढूं नयेत अशा इच्छेनेंच केवळ वरील तडजोडीच्या भाषेला सरकारनें आरंभ केला होता. ह्याप्रमाणें मध्यस्थांचे सद्हेतूपूर्वक केलेले सर्व प्रयत्न फसले. परिषदेनें सादर केलेल्या अटींचा व्हाइसरॉयनीं विचार केला नाहीं. यानंतरच गांधीजींनीं १ फेब्रुवारी १९२२ रोजीं बार्डोली येथें आपण कायदेभंगाची चळवळ सुरुं करणार आहों, असें एक पत्र व्हाइसरॉयांना पाठविलें. या परिषदेला अपयश आलेलें पाहून कॉंग्रेसला कोणत्याही प्रकारचें वाईट वाटलें नाहीं. कारण लोकांनींही ह्या बाबतींत जितकें कष्ट सहन करावयास पाहिजेत तितकें सहन केलेलें नाहींत असें गांधीजींच्याप्रमाणें कॉंग्रेसचेंही मत होतें. तसेंच तडजोडीच्या भाषेला आरंभ करणें हेंहि अप्रासंगिक आहे, असें कॉंग्रेसला वाटत होतें.

तडजोडीच्या वाटाघाटी याप्रमाणें चालू असतां देशाचें सर्व लक्ष करबंदीच्या चळवळीकडे लागलें होतें. बार्डोली तालुक्यांत या चळवळीला सुरवात करावयाची, असें गांधीजींनीं ठरविलें होते. स्वतःच्या प्रत्यक्ष देखरेखीखालीं सामुदायिक कायदेभंगाचा हा पहिला प्रयोग करण्याचा महात्माजींचा विचार होता. त्या-तालुक्यामध्यें द० आफ्रिकेंतून आलेले पुष्कळ हिंदी लोक होते. गांधीजींचें धोरण त्यांना परिचित होतें. हा प्रयोग हिंदुस्थानांतील इतर प्रांतांनीं पहावा व त्यापासून सामर्थ्य व स्फूर्ती घ्यावी अशी महात्माजींची इच्छा होती. या चळवळी-कडील लक्ष दुसरीकडे वेधलें जाईल, असें कोणतेंही कृत्य करण्यांत येऊं नये, असेंही महात्माजींचें म्हणणें होते.

अहमदाबादच्या अधिवेशनानंतर लौकरच आंध्र प्रां. कॉंग्रेस कमिटीची सभा बेझवाडा येथें ता. ७ रोजीं झाली. डिस्ट्रिक्ट कॉंग्रेस कमिटयांनीं आपल्या जिल्ह्यात फिरून करबंदीच्या चळवळीची माहिती द्यावी, असें ह्या प्रां. कॉंग्रेस कमिटीच्या सभेंत ठरलें. ४ जिल्ह्यांनीं परवानगी मागितली व ती त्यांना देण्यात आली. कृष्णा, गोदावरी, गुंतूर व कडप्पा हे ते ४ जिल्हे होत. आंध्र प्रा कॉंग्रेस क.च्या कार्यकारी कमिटीनें ता. १५ डिसेंबर रोजीं सभा भरवून करबदींची चळवळ सुरू करावी, अशी आंध्र देशीयांना विनन्ति केली. कॉंग्रेसचा या बाबतींत निर्णय होण्यापूर्वीच आंध्र प्रां. कॉंग्रेस कमिटीनें वरील विनंति केली होती. कॉंग्रेस आपल्याला अनुकूल असाच अभिप्राय देईल असा कमिटीचा अंदाज होता. या भागातील दुसरे जिल्हे स्थानिक परिस्थितीची चौकशी करण्यात व गांधीजींच्या सूचनेंप्रमाणें रयतांच्या सह्या घेण्यांत गुतले होते. इतक्यात गुंतूरनें एकटयानें १२ जून १९२२ रोजीं करबंदीची चळवळ जाहीर केली. आंध्र प्रांतातील दोन प्रतिनिधींबरोबर झालेल्या भाषणात गांधीजींना तेथील परिस्थिति समजलेली असल्यामुळें, ता. १७ जून रोजीं गांधीजींनीं आंध्र प्रा. कॉंग्रेस कमिटीच्या अध्यक्षांना एक पत्र पाठविलें व वर्तमानपत्रात प्रसिद्ध करण्याकरितांही एक पत्र पाठविलें. "ता. २५ च्या आत सर्व कर भरण्यांत आले तर मला फार आनंद होईल," असें या पत्रांत म्हटलें होतें. गांधीजींनीं वर्तमानपत्राकरितां दिलेलें पत्र काहीं कारणामुळें प्रसिद्ध झालें नाहीं. आंध्र प्रां. कॉंग्रेस कमिटीच्या अध्य-क्षांना पाठविलेल्या पत्रामुळें गांधीजी व गुंतूरमधील काहीं मित्र यांच्यात पत्र-व्यवहार सुरू झाला. गांधीजींचें या बाबतींतील धोरण ज्या वेळीं इतर जिल्ह्यांना

शाही" म्हणतां येत नाहीं असा आक्षेप आपण घेतला हें मला ठाऊक आहे. परिस्थिति आटोक्यांत आणण्याकरितां आवश्यकतेपेक्षां अतिरेकाचे उपाय अमलांत आणल्यास त्या कृत्यांना निःसंशय दडपशाहीचें कृत्य असें म्हणण्यास हरकत नाही. मालमत्तेची लूट, निरपराधी लोकांवर हल्ले, तुरुंगांतील कैद्यांना फटके मारणें व त्यांचा अमानुष छळ करणें हीं सर्व कृत्यें कायदेशीर व शिष्टसंमत आहेत व तीं करणें आवश्यकच आहे असें कोणी म्हणणार नाहीं. अधिकारी वर्गाच्या ह्या बेकायदेशीरपणाच्या वर्तनाला बेकायदा दडपशाही याशिवाय दुसरें नांव देतां यावयाचें नाहीं.

पिकेटिंग व हरताळ यांच्या संबंधांत असहकारवाद्यांनीं किंवा त्यांच्याबद्दल सहानुभूति बाळगणाऱ्या लोकांनीं धमक्या दिल्या, ही गोष्ट कबूल आहे. पण तेवढ्यावरून शांततायुक्त स्वयंसेवकदलाची संघटणा करणें, तसेंच सार्वजनिक सभा भरविणें या गोष्टींना बंदी करून सरास दडपशाही करण्याचें कृत्य समर्थनीय ठरत नाहीं. अधिकारी वर्गानें अशा प्रसंगीं जादा कायद्याचा दुरुपयोग केला आहे. खरें पाहिलें असतां सहेतुक व उघड उघड अत्याचारांच्या कृत्यांना आळा घालण्याकरितां हा जादा कायदा पास करण्यांत आला होता. तसेंच निरपराधी लोकांना छळण्याकरितां सामान्य कायद्याचा बेकायदेशीर उपयोग करण्यांत आला असेंही दिसून आलें आहे. जो कायदा रद्द करण्यांत येणार आहे असे अभिवचन देण्यात आलें त्याच कायद्याच्या आधारानें मुद्रणस्वातंत्र्याला अडथळा येईल अशीं कृत्यें करण्यांत आली. या सर्व गोष्टींना "दडपशाही" या नावाशिवाय दुसरें नांव देतां यावयाचें नाहीं. मुद्रणस्वातंत्र्य, सभास्वातंत्र्य व भाषणस्वातंत्र्य यांचा नाश होण्याचा प्रसंग आला असून, त्यापासून त्यांना वाचविणें हें राष्ट्रापुढील तावडतोबीचें काम आहे. आपण राउंड टेबल कॉन्फरन्स भरवावी, हा मालवीय परिषदेचा उद्देश होता. परंतु सरकारची आजची मनःस्थिती लक्षांत घेऊन व अत्याचारी चळवळीवर पूर्ण नियन्त्रण करण्यांत येईल अशी ही देशाची तयारी नाहीं हें लक्षांत घेऊन असहकारितावादी वरील परिषदेंत भाग घेण्यास नाखुष होते. पण कष्ट टाळता येण्यासारखे असल्यास टाळावे या हेतूनें त्या परिषदेच्या शिफारशींना वर्किंग कमिटीनें मान्यता द्यावी असा मी विनदिक्कत सल्ला दिला.

आपल्या कलकत्त्याच्या भाषणावरून आपल्याला कोणत्या अटी पाहिजेत हें

मला समजलें होतें. त्या सर्व अटी परिषदेच्या शिफारशींत नमूद केल्या होत्या. असें असतांनाही आपण त्या तडकाफडकीनें नाकारल्या.

मुद्रणस्वातंत्र्य, सभास्वातंत्र्य, व भाषणस्वातंत्र्य या जन्मसिद्ध हक्कांची मागणी पूर्ण करण्याकरितां एखाद्या अहिंसामय मार्गाचा अवलंब केल्याशिवाय देशाला आजच्या परिस्थितींत गत्यंतरच राहिलेलें नाहीं. असहकारवादी शब्दानें व कृतीनें अहिंसा व्रत पाळतील तोंपर्यंत त्यांच्या हालचालींना कोणत्याही प्रकारचा अडथळा करण्यांत येणार नाहीं असें अलीबंधूंनीं माफी मागितली त्या वेळीं आपण आपलें धोरण जाहीर केलें होते. पण अलीकडे ज्या गोष्टी घडून आल्या त्यावरून या धोरणांचा अजीबात त्याग करण्यांत आला असें मला वाटूं लागलें आहे. सरकार जर तटस्थ राहिलें असतें व लोकमत परिपक्क होण्यास सरकारनें अवकाश दिला असता तर आपल्या लाखों अनुयायांत यापेक्षाही कडक शिस्त कॉंग्रेसला निर्माण करतां आली असती, देशांतील अत्याचारी शक्तीवर नियंत्रण ठेवतां आलें असतें व तोंपर्यंत कायदेभंगाची चळवळ तहकूब ठेवण्याचा सल्लाही देणें कॉंग्रेसला शक्य झालें असतें. पण या दुर्दैवी देशाच्या इतिहासांत कधींही घडून आलें नाहीं अशा बेकायदा दडपशाहीमुळें सामुदायिक कायदेभंगाचा अवलंब करणे हें एक आवश्यक कर्तव्य होऊन बसलें आहे. मी जीं कार्यक्षेत्रें वेळोवेळीं ठरवीन त्याच्यापुरतीच ही चळवळ मर्यादित ठेवावी असें वर्किंग कमिटीनें ठरविलें आहे. आणि हल्लीं बारडोली हें कार्यक्षेत्र याकरितां निश्चित करण्यांत आलें आहे. अस्पृश्यता, हातसुताच्या खादीची पैदास, निरनिराळ्या वर्गातील ऐक्य व अहिंसा व्रताचें पालन या दिल्ली–ठरावांतील अटी पूर्ण झाल्यास मद्रास इलाख्यांतील गुंतूरमधील १०० खेड्यांच्या गटानें अशी चळवळ सुरू करावी, असे मला दिलेल्या अधिकारानुसार मी परवानगी देऊं शकतों.

परंतु बारडोलीमध्यें प्रत्यक्ष कायदेभंगाला सुरवात करण्यापूर्वी आपणाला माझी अशी नम्र विनंति आहे कीं, हिंदुस्थान सरकारचे वरिष्ठ अधिकारी या नात्यानें आपण आपलें धोरण बदलावें, अहिंसामय चळवळी केल्यामुळें शिक्षा झालेल्या व अंडर ट्रायल असलेल्या सर्व कैद्यांना मुक्त करावें, व अहिंसेची वाट संभाळून देशांत ज्या चळवळी चालू आहेत, मग त्या खिलाफत, पंजाब व स्वराज्य यांच्याकरितां असोत किंवा दुसऱ्या कोणत्याही हेतूनें चाललेल्या असोत, पीनल कोडाच्या व क्रि. प्रो. कोडाच्या किंवा इतर दडपशाही कायद्याच्या कलमांखालीं

त्या सांपडणाऱ्या असोत, त्यांच्या बाबतींत मुळींसुद्धां अडथळा आणावयाचा नाहीं, असें आपलें धोरण सरकारनें स्पष्ट शब्दांत जाहीर करावें. सरकारी अधिकाऱ्यांच्या नियत्रणापासून वर्तमानपत्रांना मुक्त करावें व अलीकडे त्यांना झालेल्या दंडाच्या व त्यानीं भरलेल्या जामिनकीच्या रकमा त्यांना परत देण्यांत याव्यात. सर्व सुधारलेल्या देशांतून ज्या हक्कांना मान्यता देण्यात आली आहे तसल्याच गोष्टी करण्यास मी आपणाला आज आग्रह करीत आहे. हें जाहीर-पत्रक प्रसिद्ध झाल्यानंतर सात दिवसात आपण जरूर तो जाहीरनामा काढल्यास मुक्त झालेल्या राजबंदींनीं सर्व परिस्थिति नव्यानें पाहून तिच्यासंबधानें विचार करीपर्यंत चढाईच्या धोरणाचा हा कायदेभग मी तहकूब ठेवीन. माझ्या विनंती-प्रमाणें सरकार जर जाहीरनामा प्रसिद्ध करील तर लोकमताला मान देण्याची सरकारची प्रामाणिक इच्छा आहे असें मला वाटेल व दोन्ही पक्षांतर्फे हिंसा-युक्त दडपण न आणतां लोकमताला इष्ट तें वळण देण्याचा प्रयत्न राष्ट्रानें करावा असा सल्ला देण्यास मला सकोच वाटणार नाही. आणि असें करण्यानेंच आपल्या निश्चित मागण्या आपल्याला पूर्ण करून घेता येतील, असा मला विश्वास वाटेल. अशा परिस्थितींत चढाईच्या कायदेभंगाला तेव्हांच हात घालावा लागेल कीं, ज्या वेळीं सरकार आपलें तटस्थपणाचें धोरण सोडून देईल व स्पष्ट स्वरूपात प्रकट झालेल्या प्रचंड बहुमताला सरकार मान देणार नाहीं.

आपला विश्वासू सेवक व मित्र
**एम्. के. गांधी**

सरकारनें महात्मा गांधींच्या पत्रकावरचें आपलें उत्तर तावडतोब प्रसिद्ध केलें. " स्वयसेवक संघातर्फे पद्धतशीर रीतीनें अत्याचाराची धमकीची व अडवणुकीची चळवळ चालू आहे, मुंबईच्या दग्याप्रमाणें देशांतील इतर ठिकाणींही भय-कर बेकायदेशीर अत्याचार करण्यांत येत आहेत असें दाखवून आपल्या दडपशाहीच्या धोरणाचें त्यानें समर्थनच केलें. अलीबधूंच्या माफीच्या प्रसगीं स्वीकारण्यांत आलेलें धोरण सरकारच्या पूर्वी प्रसिद्ध केलेल्या धोरणालाच अनु-सरून होतें. कारण " सरकारविरुद्ध गुन्हे करण्यांत येतील त्या वेळीं व सरकारला योग्य वाटेल त्यावेळीं त्या कायद्याचा अंमलबजावणी करण्यांत येईल." असें त्या वेळीं स्पष्टपणें बजावण्यांत आलें होतें. त्याचप्रमाणें मालवीय-परिषदेच्या सूचना सरकारनें तडकाफडकीनें नाकारल्या असेंही नाहीं. "कारण असहकारिता पक्षातर्फे-

चाललेल्या सर्व बेकायदेशीर चळवळी थांबविण्यांत देतील" या मुख्य अटीचा त्या सूचनांत समावेश करण्यांत आला. गांधीजींनीं घेतलेले आक्षेप सरकारनें वरीलप्रमाणें खोडून काढण्याचा प्रयत्न या पत्रकांत केला होता.

याच सुमारास कॉंग्रेसच्या चळवळीवर दुर्दैवाने एक मोठें संकट आलें. ५ फेब्रुवारी रोजीं गोरखपूर (स. प्रांत) जवळील चौरीचोरा गावीं कॉंग्रेसची मिरवणूक निघाली असतां लोकांनीं पोलिसचौकीवर हल्ला केला व तिला आग लावून दिली. या पोलिसचौकींत १ सब-इन्स्पेक्टर व २० शिपाई होते, ते सर्व या आगीला बळी पडले. १७ नोव्हेंबर रोजीं युवराजाच्या आगमनप्रसंगीं मुंबई येथें दंगा होऊन त्यांत ४३ इसम मरण पावले व ४०० जखमी झाले. तशाच प्रकारचा दंगा युवराज मद्रास येथें २३ जानेवारी रोजीं गेले असता झाला. या दोन दंग्यानंतर १२ फेब्रुवारी १९२२ रोजीं बारडोली येथें वर्किंग कमिटीची सभा भरली व या दोन दंग्याचें कारण दाखवून कायदेभंगाची चळवळ तहकूब ठेवली असल्याचें या कमिटीनें जाहीर केलें. तुरुंगवासाचें कष्ट आपल्यावर ओढून घेण्याकरिता करण्यांत येणाऱ्या चळवळी, तसेंच केवळ सरकारी हुकूम मोडण्याच्या उद्देशानें सभा भरविणें, हे सर्व कार्यक्रम बंद करण्यांत यावे, अशा सूचना वर्किंग कमिटीनें सर्व कॉंग्रेसवाल्याना केल्या. कॉंग्रेसचे एक कोटि सभासद नोंदणें, चरखा लोकप्रिय करणें, राष्ट्रीय शाळा स्थापणें, मद्यपानबंदी, व पंचायती स्थापणें हा विधायक कार्यक्रम आखण्यांत आला. गुंतुर जिल्ह्यात फिरून तेथील परिस्थितीची चौकशी करण्याकरितां नेमलेल्या कमिटीनें रयतांनीं ताबडतोब सारा भरावा, अशी शिफारस केली. १० फेब्रुवारीच्या आत तो भरण्यांतही आला. गुंतुर जिल्ह्यातील करबंदीची चळवळ एका दृष्टीनें यशस्वीच झाली. कारण कॉंग्रेसनें जोंपर्यंत मनाई केलेली होती तोंपर्यंत शें. ५ प्रमाणांत देखील तेथील रयतांनीं सारा भरला नव्हता.

बार्डोलीच्या ठरावामुळें राष्ट्राच्या विचारक्षेत्रात बरीच गडबड उडाली. महात्मा गांधीवर व त्यांनीं दिलेल्या निर्णयावर पूर्ण विश्वास ठेवणारे लोक कांहीं होते, तर गांधीजींच्या विचारसरणीसंबंधानें शंका कुशंका घेणारेही कांहीं लोक होते. ता. २४।२५ फेब्रुवारी रोजीं ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटीची सभा दिल्ली येथें झाली. बार्डोली येथें झालेल्या वर्किंग कमिटीच्या जवळ जवळ सर्व ठरावांना पुष्टी देण्यांत आली. बार्डोली ठरावांत दारूच्या दुकानावरील पिकेटिंगसंबधानें जे

नियम ठरविण्यांत आले होते त्याच नियमावरहुकूम परदेशी कापडाच्या दुकानावरही पिकेटिंग करण्यासंबंधानें परवानगी देण्यांत आली. ऑ. इं. काँग्रेस कमिटीनें कायदेभंगावरील आपला विश्वास प्रकट केला, आणि विधायक कार्यक्रमावर कॉंग्रेसच्या कार्यकर्त्यांनीं आपली शक्ति खर्च केल्यास अवश्य तितकें अहिंसेचें वातावरण निर्माण करणें शक्य आहे, असें आपलें मत दिलें.

व्यक्तीनें किंवा व्यक्तींच्या गटानें एकादा विशिष्ट कायदा किंवा हुकूम मोडणें म्हणजे वैयक्तिक कायदेभग होय अशी व्याख्या ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटीच्या या सभेंत निश्चित करण्यात आली. तिकीट दाखविल्याशिवाय जींत हजर राहाता येत नाहीं अशी मनाई केलेली सभा भरविणें हे वैयक्तिक कायदेभंगाचें उदाहरण होय. आणि तिकिटाशिवाय कोणताही मनुष्य ज्या जाहीर सभेंत हजर राहूं शकतो अशी मनाई केलेली जाहीर सभा हें सामुदायिक कायदेभंगाचें उदाहरण होय, अशी कायदेभंगासंबंधाची स्पष्ट व्याख्या ह्या सभेंत करण्यांत आली. सर्व सामान्य कारणा करता मनाई केलेली जाहीर सभा भरविली तर तो कायदेभंगाचा चढाईचा कार्यक्रम आहे असें म्हणता यावयाचें नाहीं. मुद्दाम अटक करून घेण्याकरतां केलेली सभा भरविली तरच त्याला चढाईचा कार्यक्रम असें म्हणता येईल, असेंही मत या सभेंत प्रदर्शित करण्यांत आलें.

ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटीची ही सभा भरली त्या वेळीं गांधीजींना अटक होणार अशी वातमी सर्वत्र पसरली होती. ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटीनें शेवटच्या उपाय म्हणून कायदेभगावर जोर दिला नसता व तावडतोबीचा कार्यक्रम म्हणून वैयक्तिक कायदेभंगाच्या पुरस्कार केला नसता तर कदाचित् सरकारनें गांधीजीवर खटला भरलाही नसता. उलटपक्षीं गांधीजींनीं एकाएकीं बटन दाबून चळवळ थांबविल्यामुळें चळवळींतील विद्युच्चेतना नष्ट झाली, अशी गांधींजीबद्दल तक्रार करण्यात आली. पंडित मोतिलाल नेहरू आणि लाला लजपतराय यानीं कारागृहातून लांबलचक पत्रें बाहेर पाठविलीं. कांहीं थोड्या लोकांच्या अपराधाकरितां सर्व राष्ट्राला शिक्षा दिल्याबद्दल त्यांनीं गांधींना फैलावर घेतलें. कन्याकुमारी जवळील एखादें खेडें अहिंसा व्रत पाळूं शकलें नाहीं म्हणून हिमालयाच्या पायथ्याजवळील शहराला काय म्हणून शिक्षा द्यावयाची असें पंडितजींनीं विचारलें. चौरीचौरावर किंवा गोरखपूरवर बहिष्कार टाका, परंतु वैयक्तिक किंवा सामुदायिक कायदेभंग सुरू ठेवा, असें

पंडितजी व लालाजी ह्यांचें म्हणणें होतें. चळवळीला ह्याप्रमाणें एकाएकीं कलाटणी देण्यांत आल्यामुळें कांहीं तरुण कॉंग्रेस पुढाऱ्यांचीही निराशा झाली. त्यांनीं आपला तिरस्कारही व्यक्त केला. तुरुंगांतून आलेलीं हीं पत्रें डॉ. अनसारी ह्यांच्या घरीं ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटीतील कांहीं मित्रांच्या खाजगी बैठकींत वाचण्यांत आली (२४ फेब्रुवारी १९२२). आणि आश्चर्याची गोष्ट ही कीं, ह्या मंडळींत कांहीं गुप्त पोलिस खात्यातील हेरही येऊन बसले होते. गांधीजींनी एका शब्दांत या पत्रांना उत्तर दिलें. " जेलमध्यें गेलेले लोक नागरिक ह्या दृष्टीनें मृत झाले असून बाहेर असलेल्या लोकांना ते उपदेश करूं शकत नाहींत किंवा ते उपदेश करतील, अशी अपेक्षाही कोणी करूं शकत नाहीं. " परंतु, ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटीची सभा भरली त्या वेळीं, गांधीजींवर सर्व बाजूंनी हल्ले चढविण्यात आले. चळवळ मागें घेतल्याबद्दल त्यांच्याणर टीकेची झोड उठविण्यात आली, व बार्डोलीच्या ठरावाबद्दल त्याना दोष देण्यांत आला. बंगालनें व महाराष्ट्रानें त्यांच्या चिंधडया उडविल्या. वैयक्तिक कायदेभग चालूं कां ठेवूं देऊं नये असें त्यांना विचारण्यांत आलें. गांधीजींनीं कांहीं म्हटलें तरी चौकीदारीचा कर बंगाल देणार नाहीं असें बजावण्यात आलें. बाबू हरदयाळ नाग ह्यांच्यासारख्या एकनिष्ठ मित्रांनीही बंडाचें निशाण उभारलें. कायदेभंग करणारांनीं खादीच कां वापरावी असाही प्रश्न करण्यांत आला. अस्पृश्यता व स्वदेशी ह्याच्या बाबतींत कांहीं राखीव सवलती देण्यासंबधाचा नागपूर जिल्हा कॉंग्रेस कमिटीचा ठराव डॉ. मुंजे ह्यानीं वर्किंग कमिटी पुढें (११ जानेवारी) माडला. ह्या बाबतींत गांधीजींनाही प्रश्न विचारण्यात आले. बार्डोली ठरावातील प्रत्येक शब्दाची छाननी करण्यांत आली. ह्या सभेंत महाराष्ट्र व बंगाल यानींच सर्वात जास्त हल्ले गांधींजीवर चढाविले डॉ. मुंजे ह्यानीं गांधीजीविरुद्ध निंदाव्यंजक ठराव आणला. कांहीं सभासदानीं ह्या ठरावाला पाठिंबाही दिला. पण तो मतास टाकला त्या वेळीं ठराव माडणारे व त्याला पुष्टी देणारे ह्याच्याशिवाय दुसऱ्या कोणीही ह्या ठरावाला अनुकूल मत दिलें नाहीं. ह्या निंदाव्यंजक ठरावावर विरोधी भाषण करण्यास गांधीजींनीं परवानगी दिली नाहीं. या सर्व हल्ल्यांना गांधीजीवर कांहीं परिणाम झाला नाहीं. महापूर वाहून गेला पण लव्हाळा वांचला!

## गांधीजींना अटक

जाळे तर टाकलाच होता. सरकारनें गांधीजींवर आतां खटला भरल्यानें

ठरविलें. पुढारी ज्या वेळीं लोकप्रियतेच्या शिखरावर असतो त्या वेळीं त्याच्या-
वर हल्ला करण्याचा विचार कोणतेंही सरकार करीत नाहीं. ते धीमेपणानें वाट
पहात असतें. आणि ज्या वेळीं सैन्याची पिछेहाट होऊं लागतें त्या वेळीं शत्रू
आपल्या सर्व सामर्थ्यासह लांडग्यानें मेंढरांच्या कळपावर झडप घालावी
त्याप्रमाणें हल्ला चढवितो. १५ मार्च रोजीं गांधींना पकडण्यांत आलें.
त्यांच्यावर राजद्रोहाचा आरोप ठेवण्यांत येऊन खटला सेशन कोर्टाकडे
देण्यांत आला.

हा प्रसिद्ध खटला अहमदाबाद येथें सुनावणीस निघाला. " कायद्याच्या
दृष्टीनें गुन्हेगार खरे, परंतु महात्मा गांधी कोर्टात शिरल्याबरोबर एकाएकीं सर्व
लोक उठून उभे राहिले व त्यांनीं त्यांचा आदरसत्कार केला. किरकोळ,
शांत, कंबरेभोंवतीं जाडेभरडें वस्त्र गुंडाळलेली, लोकावर विलक्षण छाप पाड-
णारी ही मूर्ती आपल्याबरोबर आपले एकनिष्ठ शिष्य व कैदी बंधु शंकरलाल
बॅंकर ह्यांना घेऊन कोर्टात दाखल झाली. ' श्रीमती सरोजिनी देवी नायडू
यांनीं " दी ग्रेट ट्रायल " नावाच्या पुस्तकाला प्रस्तावना लिहितांना महात्मा
गांधींचें वरीलप्रमाणे वर्णन केलें आहे

एखाद्या मोठ्या कापडाच्या दुकानात किंवा सराफी बाजारांत गेल असतां
कोणतें कापड घ्यावयाचें किंवा कोणतें हिरेमाणिक खरेदी करावयाचें याबद्दल
कोणीही गोंधळून जाईल. कोर्टातील अधिकाऱ्यांची हीच अवस्था झाली. दर
७ दिवसानीं प्रसिद्ध होणाऱ्या त्याच्या लेखापैकीं त्यांच्यावर आरोप ठेवण्या-
करितां कोणत्या लेखाची निवड करावयाची ह्याची त्यांना पंचाईत पडली. कारण
असा कोणताही लेख नव्हता कीं, ज्यात राजद्रोह नाहीं, असें म्हणता येणार
नाहीं. राजद्रोहाचा प्रसार करणें हें आपलें कर्तव्य आहे असें गांधीजी म्हणत
असत. आपले लेख पुरेसे राजद्रोही नसले तर आपली लेखणी दुर्बल झाली
आहे असेंच म्हणावें लागेल असें गांधी सांगत असत. शेवटीं सरकारी वकीलानें
पुढील तीन लेख निवडले. " Tampering with Loyalty " ( राज-
निष्ठेचा लाच ) "The Pazzle and its Solution " ( कूट प्रश्न व
त्याचा उलगडा ) "Shaking the manes" ( आयाळ झटकणें ). गांधीजी-
वर आरोप ठेवल्यानंतर आपण गुन्हेगार आहों हें सांगण्याकरितां ते आपल्या
राहिले. "मला असें दिसून आलें कीं, या आरोपांत राजाचें

जांव वगळलें आहे आणि ते बरोबर आहे" असें ते म्हणाले. श्री. बँकर यांनींही गुन्हा कबूल केला. शिक्षा जाहीर करण्यांत येऊन हा खटला तावडतोब निकालांतही निघाला असता परंतु, ॲडव्होकेट जनरलनें ह्या खटल्याची पूर्ण चौकशी झाली पाहिजे असा आग्रह धरला. जज्जांचा ह्या बाबतींत मतभेद झाला. शिक्षा सांगून खटला निकालांत काढावा, असें त्यांचें मत पडलें. गांधीजींनीं आपली जबानी सादर केली. "यंग इंडिया"शीं संबंध येण्यापूर्वीपासूनच सरकारविरुद्ध अप्रीतीचा प्रसार करण्याचें काम आपण करीत आलों आहों, असें त्यांनीं या जबानीच्या आरंभीं सांगितलें. मुंबई, मद्रास व चौरीचौरा येथील दंगयांची पूर्ण जबाबदारी त्यांनीं आपल्या अंगावर घेतली. "मी विस्तवाशीं खेळत आहे हे मला माहित होतें, मी हें धाडस केलें आणि जर मी उद्यां सुटलों तर मी पुन्हां तेंच करीन. असें जर मी करणार नाहीं तर मी माझें कर्तव्य करण्यास चुकलों असें होईल. माझ्या धर्मातील हें मुख्य तत्व आहे. माझ्या देशाचें कधीही भरून न निघणारें नुकसान ज्या सत्तेमुळें झालें, तिच्याखालीं मी मान वांकविली पाहिजे किंवा माझ्या तोंडून ज्या खऱ्या खऱ्या गोष्टी बाहेर पडतात त्यांचें ज्ञान झाल्यामुळें वेड्या झालेल्या लोकांच्या संतापाला तोंड देण्याचें मी धाडस केलें पाहिजे. ह्या दोन्हींपैकीं एक गोष्ट मी पत्करली पाहिजे. माझे देशबंधु कधीं कधी संतापानें वेडे होतात हें मला माहीत आहे. त्याबद्दल मला अत्यंत वाईट वाटतें. म्हणून आपण मला साधी शिक्षा करू नये. शक्य तितकी जास्तींत जास्त शिक्षा द्यावी. मीं दयेची याचना करीत नाहीं. मी कोणतीही सबब सांगण्यास तयार नाहीं. उघड उघड गुन्हा केला असतांना कायदा जी जास्तींत जास्त शिक्षा सांगतो त्या शिक्षेचा स्वीकार करण्याकरितां मी येथें उभा आहे. म्हणून जज्जसाहेब, आपल्याला एकच एक मार्ग मोकळा आहे आणि तो म्हणजे आपण आपल्या जागेचा राजीनामा द्यावा, किंवा ज्या पद्धतीला व कायद्याला आपण मदत करितां तो लोकांच्या हिताकरितां आहे, असा आपला विश्वास असेल तर आपण मला जास्तींत जास्त शिक्षा द्यावी. आपण राजीनामा द्याल, इतकें आपलें मतांतर होईल अशी मला अपेक्षा नाहीं. एखादा शहाणा मनुष्य प्रसंगीं करील असें अत्यंत वेडेपणाचें धाडस करतांना माझ्या हृदयांत कोणत्या प्रकारची खळबळ चालली असेल ही गोष्ट मी माझी जबानी वाचून संपविल्यानंतर तुम्हांला आढळून येईल.

## लेखी जबानी

हिंदुस्थानांतील व इंग्लंडांतील ज्या जनतेला खुष करण्याकरितां माझ्यावर खटला भरण्यांत आला, त्या जनतेचा मी पूर्वी कट्टा, राजनिष्ठ, सहयोगी असतांना आतां कोणत्याही तडजोडीस तयार नसणारा, व अप्रीतीचा फैलाव करणारा असहयोगी कां झालों, हें मला सांगावयाचें आहे. हिंदुस्थानांत कायद्यानें प्रस्थापित झालेल्या सरकारविरुद्ध अप्रीति पसरण्याचा जो आरोप माझ्यावर ठेवण्यांत आला आहे त्या आरोपान्वयें, मी गुन्हेगार आहे असें कां म्हणतों हेंही मला कोर्टाला सांगावयाचें आहे. माझें सार्वजनिक जीवन १८९३ मध्यें दक्षिण आफ्रिकेंत सुरू झालें. दक्षिण आफ्रिकेंतील हा काळ गडबडीचा होता. त्या देशांतील ब्रिटिश अधिकाऱ्याशीं जो पहिला संबंध आला त्याचा माझ्या मनावर इष्ट तो परिणाम झाला नाहीं. मनुष्य व हिंदी या नात्यानें मला कोणतेही हक्क नाहींत, असें मला त्या वेळीं दिसून आलें. शिवाय मला असेंही आढळून आलें कीं, माणुसकीचे हक्क मला नाहींत याचें कारण मी हिंदी आहे.

पण त्यामुळें माझें धैर्य खचलें नाहीं. हिंदी लोकांना आज ज्या प्रकारें वागविण्यांत येतें तें धोरण स्वभावत व मूळातच चांगल्या असलेल्या राज्यपद्धतीवरील एक गळूं आहे, असें मला वाटलें. सरकारशीं स्वयंस्फूर्तीनें व अंतःकरणपूर्वक मी सहकार्य केलें. ज्या ज्या वेळीं मला वाटलें, त्या त्या वेळीं त्याच्यावर मी खूप टीका केली, परंतु या पद्धतीचा नाश व्हावा अशी इच्छा मी कधीं केली नाहीं. यापुढें १८९० सालीं बोअर लोकांनीं युद्धाचें आव्हान दिल्यामुळें साम्राज्याच्या अस्तित्वावर गदा आली. त्या वेळीं मी माझी सेवा शाम्राज्याच्या पायीं रुजूं केली. मी एक स्वयंसेवकांचे अम्ब्युलन्स कोअर काढलें व लेडी स्मिथ गांवच्या रक्षणाकरिता ज्या अनेक ठिकाणीं चकमकी झाल्या त्या ठिकाणीं मी काम केलें. तसेंच १९०६ सालीं झुलू बंडाचें वेळीं मी स्ट्रेचर वाहणाऱ्या लोकाचें एक पथक काढलें आणि हें बंड समाप्त होईपर्यंत मी त्या ठिकाणीं जखमी लोकाची सेवा केली. या दोन्ही प्रसंगीं सेवा बजावल्याबद्दल मला पदकें मिळालीं व सरकारी खालित्यातून माझ्या नांवाचा गौरवपूर्वक उल्लेखही झाला. दक्षिण आफ्रिकेंतील माझ्या कामाकरतां लॉर्ड हार्डिंज यानीं केसर हिंदचें सुवर्ण पदक मला दिलें. इंग्लंड व जर्मनी यांच्यांत युद्धाला सुरवात झाली त्या वेळीं मी लंडनमध्यें तेथील हिंदी लोकाचें विशेषतः तेथील विद्यार्थ्यांचें एक ॲम्ब्युलन्स कोअर काढलें होतें.

तेथल्या अधिकाऱ्यांनीं माझें हें कार्य प्रशंसनीय आहे अशी मान्यता दिली. शेवटीं १९१७ सालीं दिल्ली येथें लॉर्ड चेम्सफर्ड यांनीं लष्करभरतीसंबंधानें विचार करण्याकरतां एक युद्ध–परिषद बोलाविली होती. तेव्हां खेडा जिल्ह्यांत माझ्या प्रकृतीची पर्वा न करतां मी लष्कर भरतीचें काम केलें. परंतु युद्ध थांबल्यामुळें व रिक्रूटांची जरूरी नाहीं, असें हुकूम करण्यांत आल्यामुळें हें काम थांबलें. अशा रीतीनें अनेक प्रकारची सेवा केल्यानंतर माझ्या मनांत असा विश्वास उत्पन्न झाला कीं, या सेवेच्या जोरावर माझ्या देशबांधवांना साम्राज्यांत पूर्ण समानतेचा दर्जा प्राप्त करून देतां येईल परंतु, रौलेट ॲक्टनें माझ्या अंतःकरणाला पहिला धक्का बसला. लोकांचें सर्व स्वातंत्र्य हिरावून घेण्याचा या कायद्याचा उद्देश आहे, म्हणून या कायद्याविरुद्ध जोराची चळवळ करावी असें मला वाटलें. नंतर जालियनवाला बागेच्या कत्तलींपासून पंजाबांतील भयंकर अत्याचारांना सुरुवात झाली. नंतर सरपटत चालण्याचे हुकूम, सार्वजनिक जागीं फटके मारणें व इतर अवर्णनीय अपमानास्पद कृत्यें घडून आलीं. तुर्की साम्राज्याचे तुकडे पडूं न देण्यासंबंधानें मुख्य प्रधानांनीं हिंदी मुसलमानांना दिलेलें वचन पाळण्यांत येणार नाहीं, असेंही मला आढळून आलें.

१९१९ सालीं अमृतसरच्या कॉंग्रेसमध्यें माझ्या मित्रांनीं मला गंभीर सूचना दिल्या होत्या व भाकितेंही केलीं होतीं. तथापि सरकारशीं सहकार्य करावें, मॉंटेग्यु चेम्सफर्ड सुधारणांचा अंमल करण्याचें कामीं मदत करावी याकरतां मी त्याच्याशीं झगडलों. मला आशा होती कीं, मुख्य प्रधान हिंदी मुसलमानांना दिलेलें आपलें अभिवचन पुरें करतील, पंजाबची जखम भरून काढण्याकरता मदत करतील व सुधारणा अपुऱ्या व असमाधानकारक असल्या तरी हिंदुस्थानच्या जीवनांत नव्या युगाला आरंभ होईल.

पण या सर्व आशा नष्ट झाल्या. खिलाफतचें वचन पुरें करण्यांत आलें नाहीं. पंजाबच्या गुन्ह्यावर सफेती चढविण्यांत आली. हिंदुस्थानांतील 'अर्धपोटी' जनता तर सारखी मृतवत् होत चालली आहे. परक्या पिळणूक करणाऱ्या माणसाकरतां केलेल्या कामासाठीं मिळालेल्या तुटपुंज्या मजुरीचें हें फळ आहे, हें त्या बिचाऱ्याला समजत नाहीं. सर्व नफा व दलाली जनतेला शोषून मिळविण्यांत येते. जनतेची अशा तऱ्हेनें पिळणूक करण्याकरतां हिंदुस्थानांत कायद्यानें ब्रिटिश सरकार प्रस्थापित झालें आहे, ही गोष्ट त्याला समजत नाहीं. सर्व [illegible]

उघड्या डोळ्यांना दिसणारे हाडांचे सांपळे पुरावा म्हणून पुढें उभे असतां कोणी कितीही आंकड्यांची जादुगिरी किंवा फसवणूक केली, तरी तिचा कांहीं उपयोग नाहीं. इतिहासांत बिनतोड अशा ह्या मानव जातीवरील अन्यायाबद्दल परमेश्वराला, इंग्लंडला व हिंदुस्थानांतील नगरवासीयांना निःसंशय जाब द्यावा लागेल. परकीय व पिळणूक करणाऱ्या माणसाची सेवा करण्याकरितांच या देशांतील कायद्यांचा उपयोग करण्यांत येत आहे. पंजाबमधील लष्करी कायद्याखालील खटल्यांची मी पूर्वग्रहरहित बुद्धीनें चौकशी केली. त्यावरून शेंकडा ९५ शिक्षा पूर्ण अयोग्य होत्या असें मला आढळून आलें. हिंदुस्थानात जे राजकीय खटले करण्यांत येतात त्यापैकीं, शिक्षा झालेले शेंकडा ९० इसम पूर्ण निरपराधी असतात असा माझा अनुभव आहे. हिंदुस्थानांतील कोर्टांत युरोपियनांविरुद्ध हिंदी लोकांवर झालेल्या खटल्यात शेंकडा ९९ हिंदी लोकांना न्याय मिळत नाही. मी केलेलें हें वर्णन अतिशयोक्तीचें नाहीं. अशा खटल्याशीं संबंध आले-ल्या बहुतेक सर्व हिंदी माणसांचा असाच अनुभव आहे. पिळणूक करणाऱ्या माणसाच्या फायद्याकरतां जाणुनबुजून किंवा अजाणता कायद्याच्या अमलबजा-वणींत व्यभिचार करण्यांत येत आहे.

ज्या गुन्ह्याचें यथार्थ स्वरूप मी आपल्यापुढें मांडलें आहे, तो गुन्हा आपण करीत आहों, असें सरकारी खात्यातून काम करणाऱ्या इंग्रजांना व त्यांच्या हिंदी दोस्तांना समजत नाहीं, ही अत्यंत दुर्दैवाची गोष्ट आहे. जगातील अत्यंत उत्तम राज्यपद्धति आपण चालवीत आहों व हिंदुस्थानची हळू हळू कां होईना पण सारखी प्रगती होत आहे, असें इंग्रज व हिंदी अधिकाऱ्यांना प्रामाणिकपणें वाटत आहे, हें पाहून मला समाधान वाटतें. परंतु, एका बाजूला दहशतीची सर्व साधनसामुग्री असलेला संघटित सामर्थ्यवान पक्ष व दुसऱ्या बाजूला प्रतिकाराची व आत्मसंरक्षणाचीं सर्व साधनें हिरावून घेतलेला पक्ष, अशी परिस्थिति हिंदुस्थानांत निर्माण झाल्यामुळें हिंदी लोक नामर्द झाले आहेत हें त्यांना कळत नाहीं. त्यामुळें हे अधिकारी वस्तुस्थितीचें ज्ञान न झाल्यामुळें आपली फसवणूक करून घेत आहेत. सुदैवानें जें कलम मला लागूं करण्यात आलें आहे, तें १२४ अ कलम म्हणजे टीकास्वातंत्र्य दडपून टाकण्याकरतां तयार केलेला इंडियन पीनल कोडमधील राजकीय कायद्याचा राजा आहे. कायद्यानें प्रेमाची पैदास करतां येणार नाहीं किंवा त्याला सुव्यवस्थित स्वरूप देतां येणार

नाहीं. जर कोणाला एखाद्या व्यक्तीविषयीं किंवा वस्तुविषयीं प्रेम वाटत नसेल, तर त्याच्या या अप्रीतीच्या भावनेला प्रकट होण्यास पूर्ण वाव देण्यांत आला पाहिजे. मात्र असा इसम हिंसा करण्यास किंवा हिंसेची प्रवृत्ति उत्पन्न करण्यास उद्युक्त झालेला आहे काय हें पाहिलें पाहिजे. पण जें कलम मि. बँकर यांच्यावर व माझ्यावर लावण्यांत आलें आहे, त्यावरुन केवळ अप्रीति निर्माण करणें, हाच गुन्हा ठरतो. या कलमाखालीं झालेल्या अनेक खटल्यांचा मी अभ्यास केला आहे. हिंदुस्थानातील अत्यंत लोकप्रिय व देशाभिमानी पुरुषांनाही या कलमान्वयें शिक्षा झाल्या आहेत, हें मला माहीत आहे. म्हणून या कलमान्वयें माझ्यावर आरोप ठेवण्यात आला आहे हा माझा मानच करण्यांत आला असें मी समजतों. माझ्या मनांत जी अप्रीति निर्माण झाली, त्याचीं कारणें थोडक्यात सागण्याचा मी प्रयत्न केला आहे. कोणत्याही अधिकाऱ्यांबद्दल मला वैयक्तिक द्वेष वाटत नाहीं, मग खुद्द राजाविषयीं मला तसें वाटणें शक्यच नाहीं. ब्रिटिश सत्तेखालीं हिंदुस्थान नामर्द बनलें आहे. अशी स्थिति पूर्वी कधीं नव्हती. ही जाणीव एकदां झाल्या-वर या राज्यपद्धतीविषयीं प्रेम वाटणें, हें पाप आहे, असें मी समजतों. माझ्याविरुद्ध पुरावा म्हणून जे अनेक लेख पुढें माडण्यात आले आहेत, त्यांत मला जें वाटलें तें मी लिहूं शकलों हा मी माझा मोठा मान समजतों. ज्या अस्वाभाविक परिस्थितींत इंग्लंड व हिंदुस्थान आज राहात आहे, त्यांतून बाहेर पडण्यास असहकारितेचा मार्ग मी दाखवून दिला, ही एक सेवाच केली आहे, असें मला वाटतें. न्यायाशीं सहकार्य करणें हें जसें कर्तव्य आहे, तसेंच अन्यायाशीं असहकार्य करणें हेंही तितक्याच योग्यतेचें कर्तव्य आहे. परंतु, पूर्वी दुष्ट कृत्यें करणारावर दडपण आणण्याकरतां प्रत्यक्ष अत्याचाराच्या रुपानें असहकारिता करण्यांत येत असे. हिंसामय असहकारिता अन्यायाचेंच वर्धन करते हें मी माझ्या देशबांधवाना दाखविण्याचा प्रयत्न करीत आहे. परंतु. अन्यायाची उभारणी केवळ अत्याचारावरच झालेली असते, तेव्हा अन्यायाचा हा आधार काढून घ्याव-याचा असल्यास अहिंसेपासून पूर्ण परावृत्त होणेंच जरुर असतें. अन्यायाशीं अस-हकारिता केल्यामुळें झालेल्या शिक्षेपुढें आपखुषीनें मान वाकविणें हाच अहिंसेचा अर्थ आहे. म्हणून कायद्याच्या दृष्टीनें जो गुन्हा ठरतो नसला, गुन्हा करणें हें मी माझें उच्च कर्तव्य समजतों. अशा परिस्थितीत मी [illegible]

व श्री. विठ्ठलभाई पटेल हे नाखुषीनें या चळवळींत आले होते. असहकारितेच्या चळवळीला त्याचा पाठिंबा होता तरी या चळवळीत आतां बदल केला पाहिजे, नोकरशाहीच्या बालेकिल्ल्यांत जाऊन, तेथें असहकारितेचा लढा चालविला पाहिजे असें ते म्हणू लागले होते. ऑ. इं. कॉंग्रेस कमिटीच्या या सभेंत प्रथम शांति व सत्य यांचा संदेश देऊन मानव जातीच्या कल्याणार्थ गांधीजींनीं केलेल्या सेवेबद्दल कृतज्ञता व्यक्त करण्यांत आली. अहिंसामय असहकारितेच्या तत्वावर विश्वास प्रकट करण्यांत आला. सरकारच्या अखंड चालूं असलेल्या दडपशाहीचा निषेध करण्यांत आला. दडपशाहीला तोंड देण्याकरितां कोणत्या तरी स्वरूपांत कायदेभंग सुरुं करणें हाच त्यावर उपाय असल्याचें जाहीर करण्यात आलें. सामुदायिक कायदेभंगाच्या तयारीच्या दृष्टीनें देखील विधायक कार्यक्रमाचा अवलंब करणें जरूर आहे, असें ठरविण्यात आलें व ऑगष्टपर्यंत कमिटीची सभा तहकूब करण्यांत आली. मध्यंतरीच्या काळात सर्व देशात दौरा काढून कायदेभंग कोणत्या स्वरूपांत व कोठें करता येईल याची चौकशी करण्याकरिता पं. मोतीलाल नेहरू, डॉ. अनसारी, श्री. विठ्ठलभाई पटेल, जमनालाल बजाज, सी. राजगोपालाचारियर व शेठ छोटाणी व हकीम अजमलखान ( अध्यक्ष ) यांची कमिटी नेमण्यात आली. शेठ जमनालाल बजाज याना ही जागा स्वीकारणें शक्य नसल्यामुळें मि. कस्तुरीरंग अयंगार याची नेमणूक करण्यांत आली. शेठ छोटाणी या कमिटीबरोबर कधींच काम करूं शकले नाहींत.

कायदेभंग कमिटीच्या हालचाली व तिचा रिपोर्ट याच्या संबधानें विचार करण्यापूर्वी १९२२ च्या मार्चमध्यें कोणत्या गोष्टी घडल्या याचा आतां विचार करूं. २३ मार्च रोजीं मॉंटेग्यूना त्यांच्या जागेचा राजीनामा देण्यास भाग पाडण्यांत आलें. ग्रीसविरुद्ध तुर्कस्थाननें विजय संपादन केल्यामुळें सेव्हर्सच्या तहांत फेरफार करण्यांत आले. या बाबतच्या कागदपत्रांतील कांही कागदपत्र मि. मॉटेग्यू यांनीं फोडले, असा त्याच्यावर आरोप होता. खटले भरणें व शिक्षा देणें हे प्रकार तर हिंदुस्थानभर सर्वत्र चालूच होते. पंजाबमध्यें लॉरेन्स पुतळ्याच्या प्रकरणाबद्दल जोराचा वाद चालूं होता. आंध्र प्रांतांत गोदावरी येथें राष्ट्रीय निशाण चढविण्याच्या चळवळीनें नोकरशाहीला घाबरून सोडलें होतें. मि. लॉईड जॉर्ज-
१०८ व १४४ या कलमाचेंच सर्वत्र साम्राज्य माजलें होतें.

यानीं याच सुमारास लंडनमध्ये एक भाषण केलें. हिंदुस्थानांतील सिव्हिल सर्व्हिस म्हणजे ब्रिटिश राज्यकारभारांतील "पोलादी चौकट" होय असें ते या वेळीं म्हणाले. या सनदी नोकराच्याच कर्तृत्वामुळे ब्रिटनकडे असलेला हिंदुस्थानचा ट्रस्ट सुरक्षित राहिला आहे. हा ट्रस्ट सोडून देण्याकरितां नव्हे तर त्याच्या कारभाराच्या बाबतींत सर्वांना भाग घेता यावा, या हेतूनेंच सुधारणा कायदा हिंदुस्थानास लागू करण्यांत आला आहे." अशीही मखलाशी मि. लॉइड जॉर्ज यानीं आपल्या भाषणांत केली होती. याप्रमाणें तापलेल्या तव्याचा ताव कायम ठेवण्याकरिता एकामागून एक अनेक प्रक्षोभकारक गोष्टी घडून येत होत्या.

बोरसदच्या नावाशीं संलग्न असलेल्या सत्याग्रहासंबंधानें आतां थोडी हकीगत सांगूं. बोरसदचा सत्याग्रह १९२२ सालीं झाला. हा सत्याग्रह इतक्या अकल्पित-पणें जुळून आला कीं, त्या हकीकतीवर कोणाचा विश्वासही बसावयाचा नाहीं. या तालुक्यात बाबरदेव नांवाच्या एका दरवडेखोराने उच्छाद मांडला होता. थोडक्याच दिवसात एक मुसलमान दरवडेखोर बाबरदेवाला प्रतिस्पर्धी निर्माण झाला. एका वकीलाचा खून करुन हा मुसलमान फरारी झाला होता. त्यानें कांहीं लोक आपल्या भोंवतीं गोळा केले, व ह्या तहशीलींत त्यानें दरवड्यामागून दरवडे घालण्यास सुरवात केली. पोलिसानीं हात टेकले. आपले निवडक अधिकारी सरकारनें ह्या भागात आणले. पण त्यांच्याही प्रयत्नाला यश आलें नाहीं. बडोदा संस्थानच्या हद्दींतही ह्या दरोडेखोरांनीं धुमाकूळ मांडला होता. बडोदा पोलिसही ब्रिटिश पोलिसाच्या साहाय्यार्थ धावून आले. पण त्याचाही काही उपयोग झाला नाहीं. बाबरदेवाला पकडण्याकरिता पोलिस अधिकाऱ्यांनीं एक नवीनच युक्ति काढली. त्यानीं ह्या मुसलमान दरोडेखोराशीं संगनमत केलें. ह्या मुसलमानानेंही आपल्याबरोबर ५ हत्यारबंद पोलीस शिपाई दिल्यास आपण बाबरदेवाला पकडून देतो अशी पोलिस अधिकाऱ्याना थाप दिली. हत्या-रबंद पोलिस बरोबर घेऊन त्यानें बाबरदेवाला पकडलें तर नाहींच उलट, आपलाच दरोडेखोरीचा धंदा त्याच्या सहाय्यानें जोरांत चालविला. बोरसद तालुक्यातील गुन्हे एकंदरींत वाढतच चालले. तेव्हां ह्या गुन्ह्यांच्या पाठीमागें लोकही आहेत, असें सरकारला वाटलें. सरकारने या तहशिलीवर जादा पोलीस बंदोबस्ताकरिता ठेवले व प्युनिटिव्ह करही ह्या तालुक्यातील रयतावर लादण्यांत आला. पोलिसांनी मुसलमान दरोडेखोराशीं संगनमत केलें होतें ही गोष्ट

पुढें बाहेर आली, व ती खोटी असल्याचें सिद्ध करून यावें, असें श्री. वल्लभभाई पटेल ह्यांनीं सरकारला आव्हान दिलें. ते बोरसदला गेले व प्युनिटिव्ह कर भरू नये असा त्यांनीं लोकांना सल्ला दिला. दरोड्याच्या वेळीं जखमी झालेल्या लोकांच्या शरीरांतून काढण्यांत आलेल्या गोळ्या पोलिसांच्या होत्या असें सिद्ध झालें. त्यामुळें पोलिसांच्या बंदुका व त्यांचा दारूगोळा दरवड्याच्या बाबतींत उपयोगांत आणला गेला ह्याबद्दल संशय राहिला नाहीं. श्री. वल्लभभाई पटेल ह्यांनीं २०० स्वयंसेवकांचें दल उभें केलें व सर्व तालुक्यांतील खेडेगांवावर रात्रंदिवस पहारा करण्याकरतां त्यांची नेमणूक केली. ह्या दिवसांत संध्याकाळच्या वेळीं लोक आपल्या घरांची दारें बंद करून घरांत लपून बसत असत. वल्लभभाईंनीं संध्याकाळीं आपल्या घरांचीं दारें न लावण्याबद्दल त्यांचीं मनें वळविलीं. खेड्यांत ठेवलेले प्युनिटिव्ह पोलिसच दारांना कुलुपें घालीत असत. थोडा कोठें आवाज झाला कीं, हे पोलीस कॉटखालीं दडून बसत. खेड्यांतील लोकांनीं अशा कांहीं प्रसंगांचे फोटो दाखवून या गोष्टी सिद्ध केल्या. ज्या लोकांनीं हा पुरावा गोळा केला त्यांना पकडावें किंवा आपण गुन्हेगार आहोंत असें समजून स्वस्थ रहावें, असे दोनच मार्ग पोलिसांना शिल्लक राहिले होते. ह्या गोष्टी ज्या वेळी बाहेर आल्या, त्या वेळीं बडोदा संस्थाननें आणलेले पोलीस परत नेले. ब्रिटिश पोलीस तालुक्यांतच चैनींत राहिले व प्युनिटिव्ह टॅक्स गोळा करूं लागले.

ह्याच वेळीं मुंबइचे गव्हर्नर लॉर्ड लॉइड हे विलायतेला गेले. त्यांच्या मागून आलेले गव्हर्नर सर लेस्ली वुइल्सन ह्यांनीं बोरसदची ही हकीकत ऐकल्यावर गृहमंत्र्याला तिकडे पाठवून दिलें. गृहमंत्र्यानें पोलिसांवर केलेले आरोप कितपत खरे आहेत ह्याची चौकशी केली आणि ह्या बाबतींत खात्री झाल्यावर हे जादा पोलिस परत बोलावण्यांत आले. वल्लभभाई व त्याचे स्वयंसेवक तालुक्यांत हजर झाल्याबरोबर बाबरदेवाला अदृश्य झाला.

या वर्षांत आणखी दोन महत्त्वाच्या गोष्टी घडून आल्या. त्यांपैकीं पहिली गोष्ट म्हणजे कायदेभंग कमिटीचा देशभर झालेला दौरा होय व दुसरी गोष्ट म्हणजे ऑगस्टमध्यें सुरूं झालेले गुरुकाबाग प्रकरण होय. प्रथम आपण दुसऱ्या गोष्टीसंबंधानें विचार करूं:—

शीख समाजांत अकाली व उदासी असे दोन पंथ पडले होते. त्यांपैकीं

उदासी हे सनातनी असून, शीख मंदिरावरील महंतांची त्यांच्यावर मर्जी होती. अकाली हे सुधारक होते. गुरुद्वार प्रबंधक कमिटी नांवाची एक संस्था या सुधारकानीं काढली होती. सत्याग्रह करून मंदिरें ताब्यांत घेण्याचा ह्या सुधारकांचा विचार होता. मंदिरात सेवेस असलेल्या कांहीं अकालीनीं ऑगस्टमध्यें गुरुका बाग मंदिरांतील एक झाड तोडल्याचें निमित्त झालें. महंतांनीं पोलिसाकडे तक्रार केली. अर्थात त्यांच्या संरक्षणाकरितां पोलिसांची एक तुकडी मंदिरावर पहाऱ्याकरितां ठेवण्यात आली. अकालींना ही गोष्ट पसंत पडली नाहीं. ते पोलिस पहारेवाल्यांना न जुमानतां त्यांना ओलांडून जाऊं लागले. त्या वेळीं त्यांना 'बेकायदा जमाव' ठरवून बेदम मारण्यांत आलें. अकालीनीं अहिंसा व्रताचें पालन करण्याची प्रतिज्ञा केली होती. त्यामुळें ह्या पोलिसच्या हल्ल्यांचा त्यांनीं प्रतिकार केला नाहीं. आणि ह्या प्रसंगाच्या हकीकती ऐकून सर्व देश प्रक्षुब्ध झाला. ज्या लोकांनीं युद्धांत जर्मन शिपायांना तोंड दिलें व ब्रिटिशाना जय मिळवून दिले, अशा क्षात्रवंशाच्या लोकांनीं वरीलप्रमाणें अहिंसेचा एक धडाच जगाला घालून दिला. अकालीनीं दाखविलेल्या आत्मसंयमाची सरकारनेंही खुल्या दिलानें स्तुति केली. परंतु, देशांतील लोक व वर्तमानपत्रें अकालींची स्तुतिस्तोत्रें गात होते. पण पोलिसांबद्दल कोणीही एक चागला शब्द काढीत नव्हते. व ह्या एवढ्याच गोष्टीमुळें सरकारला वाईट वाटत होतें ! पोलिसानीं ह्या प्रसंगीं अत्यंत शिस्तीचें वर्तन केलें असें सरकारचें म्हणणें होतें, पण वस्तुस्थिती अशी होती कीं, लाठीचार्ज करण्याचें शास्त्र पोलिसनें ह्याच वेळीं पूर्णतेला पोंचाविलें. ज्याच्याबद्दल दोन चागले शब्द देखील कोणी बोलत नाहीं असल्या कामाचा पोलिसांनाही तिटकारा आला होता. सरकारनें ह्यापुढें अकाली जथांना उधळून लावण्याचें काम बंद केलें व त्याच्याऐवजी जथ्यांतील लोकांपैकीं एकेकाला पकडण्यात येऊं लागलें. १९२२ नोव्हेंबरमध्यें ज्या जमिनीसंबधानें वाद होता ती जमीन महंतापासून भाडेपट्ट्यानें सर गंगाराम नांवाच्या एका गृहस्थानें घेतली, आणि तेथील झाडें तोडण्यास अकालींना परवानगी दिली.

कायदेभंग कमिटीनें सर्व देशभर दौरा काढला. लोकांतील उत्साह कमी झालेला नव्हता. ज्या ज्या ठिकाणीं ते गेले तेथें तेथें त्यांचें मन:पूर्वक स्वागत झालें. गुंतूर म्युनिसिपालिटीनें कमिटीला मानपत्र अर्पण केलें व कमिटीच्या कामाला यश चिंतिलें. गुंतूर रेल्वे स्टेशनवर या कमिटीचें स्वागत करण्या-

करितां आलेल्या २०० स्वयंसेवकांना पोलिसांनीं अटक केली होती. कमिटीनें आपलें काम संपविलें व रिपोर्ट सादर केला. १५ ऑगस्ट रोजीं भरणाऱ्या सभेंत ह्या रिपोर्टावर चर्चा करावयाची असें ठरलें होतें. परतु, सभाच भरू शकली नाही व देशबधु दास ह्यांच्या दुसऱ्या मुलीच्या लग्नाच्या वेळीं कलकत्ता येथें जमलेल्या पुढारी मंडळींत या संबंधानें चर्चा झाली. याच वेळी पंडित मोतिलाल ह्यांचें मतातर झालें व कायदेभंग सोडून कौन्सिल-प्रवेशाचा ते पुरस्कार करूं लागले. जेव्हा रिपोर्ट प्रसिद्ध झाला, त्या वेळीं या कमिटीच्या सभासदांनीं कौन्सिल निवडणुकी लढवाव्या किंवा नाही हा प्रश्न उपस्थित झाला. यानंतर थोड्या दिवसांनीं खिलाफत कमिटीतर्फे ह्याच कामाकरिता नेमलेल्या कमिटीचा रिपोर्ट बाहेर आला. या कमिटीनें कौन्सिल बहिष्काराची चळवळ तशीच चालू ठेवावी अशी जोराची शिफारस केली होती. कायदेभग कमिटीनें पुढीलप्रमाणें शिफारशी केल्या होत्या.

## कायदेभंग कमिटीच्या शिफारशी

### १ कायदेभंग

(अ) एकादा विशिष्ट कायदा मोडून किंवा एकादा विशिष्ट कर देण्याचें नाकारून मर्यादित स्वरूपाचा सामान्य सामुदायिक कायदेभंग सुरूं करण्यास देश आज तयार नाहीं. तथापि आम्ही अशी शिफारस करतों कीं, प्रातिक कॉंग्रेस कमिट्यानीं आपल्या जबाबदारीवर असला एखादा मर्यादित स्वरूपाचा सामुदायिक कायदेभंग सुरु करण्यास परवानगी दिल्यास त्याला हरकत नसावी. मात्र ह्या बाबतींत ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटीनें निश्चित केलेल्या अटी पूर्ण पाळल्या गेल्या आहेत किंवा नाहीं हें पहावें.

(ब) कोणत्याही स्वरूपाचा कायदेभग सुरूं करण्याचें निश्चित करण्यास लागणारे सर्व अधिकार प्रातिक कॉंग्रेस कमिट्याना द्यावे या दिल्ली येथील ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटीच्या सभेंत पास झालेल्या २ ऱ्या ठरावाच्या अंमलबजावणीस मान्यता द्यावी.

### २ कौन्सिल प्रवेश

(अ) कायदेमंडळाच्या पहिल्या बैठकींत खिलाफत व पजाब ह्यांच्या बाबतींत झालेल्या अन्यायांचें परिमार्जन करण्याच्या कामीं अडथळा उत्पन्न झाला,

असें दिसून आलें आहे. लोकांची दुःखें व कष्ट वाढतील अशाच प्रकारचें काम या बैठकींत झालें आहे. अशा परिस्थितीत पुन्हा ही अनिष्ट गोष्ट घडून येऊं नये म्हणून अहिंसामय सत्याग्रहाच्या तत्त्वावर खालील उपाय योजण्यात यावे.

(१) असहकारतावाद्यांनीं पंजाब व खिलाफतचे अन्याय व स्वराज्याची तात्रडतोबीची मागणी ह्या कार्यक्रमावर निवडणुकी लढवाव्या. आणि कौन्सिलात आपल्या पक्षाचेच बहुमत होईल असा जोराचा प्रयत्न करावा.

(२) जर सभेचा कोरम भरण्याला अडथळा उत्पन्न होईल इतके असहकारवाद्याचें बहुमत झाल्यास त्यानी आपल्या जागा सोडून कौन्सिलातून बाहेर पडावें आणि सर्व दिवस संपेपर्यंत कौन्सिलच्या कामांत भाग घेऊं नये. जागा रिकाम्या पडूं द्यावयाच्या नाहींत एवढ्याच हेतूनें मधून मधून कौन्सिलच्या बैठकीला त्यानीं हजर रहावें.

(३) कोरम भरण्यास अडथळा न होईल इतकें असहकारवाद्याचें बहुमत झाल्यास अंदाजपत्रकासुद्धा प्रत्येक ठरावाला विरोध करावा व वरील अन्याय निवारण्यासंबधाचें किंवा तावडतोबीच्या स्वराज्यप्राप्तीसंबंधाचें ठरावच तेवढे कौन्सिलपुढें माडावे.

(४) असहकारितावादी अल्पमतानें निवडून आल्यास नंबर २ च्या ठरावात दर्शविल्याप्रमाणें वागावें व कौन्सिलमधील सभासदाची संख्या कमी करावी.

नवीं कौन्सिलें जानेवारी १९२४ पर्यंत भरणार नसल्यामुळें आम्ही अशी सूचना करतों कीं, १९२२ चे कॉंग्रेसचें अधिवेशन डिसेंबरच्या शेवटच्या आठवड्याऐवजीं पहिल्या आठवड्यात भरवावें, आणि निवडणुकीच्या दृष्टीनें कॉंग्रेसनें अखेरचें मॅंडेट देण्यासंबंधाच्या प्रश्नाचा पुन्हा विचार करावा.

(शिफारस करणार—हकीम अजमलखान, पंडित मोतीलाल नेहरु आणि व्ही. जी. पटेल).

(ब) कौन्सिल बहिष्काराच्या बाबतीत कॉंग्रेसच्या कार्यक्रमात बदल करूं नये (शिफारस करणार डॉ. एम्. ए. अन्सारी, सी. राजगोपालाचारी व श्री. एस्. कस्तुरीरंग अय्यंगार).

## ३ स्थानिक संस्था

असहकारतावाद्यानी म्युनिसिपालिट्या व डिस्ट्रिक्ट लोकल बोर्ड यांच्या निवडणुकी लढवाव्या आणि विधायक कार्यक्रम अमलांत आणण्याचें काम सुरु करावें.

या असहकारवादी सभासदांच्या हालचालीसंबंधानें कोणतेही निश्चित नियम करण्यांत आलेले नाहींत. स्थानिक व प्रांतिक कॉंग्रेस कमिटयांशीं संगनमत करून त्यांनीं आपलें काम करावें. —( एकमतानें )

## ४ सरकारी शिक्षण संस्थांवर बहिष्कार

शाळा कॉलेजांवरील बहिष्काराचा प्रचार करण्याची आजची चळवळ बार्डोली ठरावाप्रमाणें तहकूब करावी. त्या ठरावाप्रमाणें राष्ट्रीय शिक्षण संस्थांचें महत्त्व पटवून देऊन सरकारी शिक्षण संस्थांतून विद्यार्थ्यांना बाहेर येण्यास सागावें. पिकेटिंग किंवा इतर चढाईच्या कार्यक्रमाचा अवलब करूं नये. —(एकमतानें)

## ५ कोर्टांवरील बहिष्कार.

ग्रामपंचायत कोर्टें स्थापन करण्याचे प्रयत्न करावे आणि या उपक्रमाला अनुकूल असें लोकमत तयार करावें. —( एकमतानें )

## ६ मजूर संघटना.

नागपूर कॉंग्रेसचा ८ वा ठराव विलंब न लावतां अमलांत आणावा.
—( एकमतानें )

## ७ आत्मसंरक्षणाचा हक्क

( अ ) कायद्याच्या मर्यादेंत आत्मसंरक्षण करण्याचा पूर्ण हक्क व्यक्तिमात्राला द्यावा, फक्त कॉंग्रेसचें काम किंवा कॉंग्रेसच्या कामाशीं प्रत्यक्ष संबंध असलेलें काम करीत असतांना, सामान्यतः दंग्याला सुरवात होईल, असा संभव असेल तर हा आपला हक्क बजावू नये. धार्मिक बाबतींत अपमान, स्त्रियांचा विनयभंग, मुलें व पुरुष यांजवर बेदरकारपणें केलेला हल्ला, अशा प्रसंगीं आत्मसंरक्षण करण्याकरितां बलाचा अवलंब करण्यास मनाई नाहीं.
—( श्री. व्ही. जे. पटेलखेरीज सर्व सभासद. )

( बी ) कायद्याच्या मर्यादेंत आत्मसंरक्षणाचा हक्क बजावण्याचें पूर्ण स्वातंत्र्य असहकारितावाद्यांना असावें. दंगा होईल किंवा याहीपुढें दुसरी कांहीं परिस्थिती निर्माण होईल असा संभव असेल तर मात्र या हक्काची अंमलबजावणी करूं नये. —( व्ही. जे. पटेल. )

## ८ ब्रिटिश मालावर बहिष्कार

( अ ) आम्हांला हें तत्त्व मान्य आहे. हा प्रश्न तज्ञांच्या कमिटीकडे सोंपवावा आणि पुढील कॉंग्रेसची बैठक होण्यापूर्वी सदरहू रिपोर्ट सादर करावा.

—( श्री. सी. राजगोपालाचारियरखेरीज सर्व सभासद. )

( बी ) तज्ञांनीं या बाबतींतील आंकडे व माहिती गोळा करण्यास कांहींच हरकत नाहीं, परंतु ऑ. इं. कॉंग्रेस कमिटीनें हें तत्त्व मान्य केल्यास राष्ट्राला चुकीची दिशा दाखवून दिल्यासारखें होईल व चळवळीचें नुकसान होईल.

—( श्री. सी. राजगोपालाचारियर. )

याप्रमाणें कॉंग्रेसमध्यें सनातनी नाफेरवाले व फेरवाले असे दोन पक्ष पडले, परंतु, दोन्हीही पक्ष असहकारितेचेच पुरस्कर्ते होते. शत्रूच्या बालेकिल्ल्यात शिरून या शस्त्राचा प्रभाव दाखवावा एवढेंच दुसऱ्या पक्षाचें म्हणणें होतें. कॉंग्रेसवाले व असहकारितावादी यांनीं म्युनिसिपालिट्या व लोकलबोर्डें याच्या निवडणुकी लढविण्यास सुरवात केली होती. या स्थानिक संस्थांतून असलेल्या कॉंग्रेसवाल्या प्रतिनिधींनी म्युनिसिपल दवाखान्यांतून खादीचा उपयोग करणें, स्थानिक स्वराज्य संस्थांच्या नोकराना खादीचे युनिफॉर्म देणें, आपल्या कचेरीवर राष्ट्रीय निशाण लावणें, म्युनिसिपालीटीच्या व लोकलबोर्डाच्या शाळांतून चरखा व हिंदी भाषेचें शिक्षण सुरू करणें, आणि वेळप्रसगीं गव्हर्नर व दिवाण याच्या स्वागतावर बहिष्कार घालणें असलीं कामें करून सरकारला चिमटे घेण्यास सुरवात केली होती. यावरून कॉंग्रेसवाल्यांचें धोरण तेवढें व्यक्त होत असे. परंतु, प्रत्यक्ष हक्क संपादण्याच्या दृष्टीनें याचा फारसा उपयोग नव्हता. कायदेभंग व बहिष्कार यासारख्या तीव्र व परिणामकारक चळवळी तहकूब करून स्थानिक स्वराज्य संस्था व कायदेमंडळें यांतून काम करण्याचें सौम्य धोरण स्वीकारणें म्हणजे रणांगणाचा त्याग करून दिवाणखान्यात बुद्धिबळाचा डाव लावण्यासारखेच आहे. परंतु, १९२२ च्या हिवाळ्यात कॉंग्रेसवाल्यांमध्यें अशा प्रकारचा मतभेद झाला होता व तो यापुढें दडून राहणें शक्य नव्हतें. गया कॉंग्रेसमध्यें कॉंग्रेसवाल्यांत प्रत्यक्ष फूट पडून या मतभेदाचें तीव्र स्वरूप प्रकट झालें. ऑगस्ट १५ रोजी ऑ. इं. कॉं. कमिटीची सभा भरणार होती, पण ती नोव्हेंबर महिन्यापर्यंत तहकूब ठेवण्यांत आली. ता. २० ते २४ नोव्हेंबरमध्ये कलकत्ता येथे ऑ. इं. कॉ. कमिटीची बैठक

झाली. ही बैठक कॉंग्रेसच्या इतिहासांत संस्मरणीय अशी झाली यांत शंका नाही. पहिल्या दिवसाची बैठक इंडियन असोसिएशनच्या जागेंत झाली. पण मतभेदामुळें प्रक्षुब्ध झालेल्या कॉंग्रेसवाल्यांना या कुंद जागेंत गुदमरल्याप्रमाणें झालें. यामुळें जागा बदलण्यांत आली व पुढील चार दिवसांचें काम मुद्दाम उभारलेल्या शामियान्यांत झालें. या जागेजवळच असलेल्या देशबंधु दास यांच्या भव्य राजवाड्याला, दहा महिने त्याच्याकडे दुर्लक्ष झाल्यामुळें अवकळा आलेली दिसत होती. कलकत्त्याच्या बैठकींत केवळ बुद्धिमत्तेचेच फवारे उडाले असें म्हणतां यावयाचें नाहीं. दास व पं. मोतिलाल नेहरू यांच्यासारखे कर्तबगार व वजनदार पुढारी कौन्सिल प्रवेशाच्या बाजूचें होते व त्याचा जुना दोस्त 'महाराष्ट्र' यानें त्यांना जोराची मदतही केली. तथापि महात्मा गांधीजींवर नुकताच आलेला प्रसंग, महात्माजींच्या अनुयायाची त्याच्या वरील एकनिष्ठा व आदर, वडाच्या कार्यक्रमांतील चमक, नितक्याच योग्यतेच्या कार्यक्रमाचा अभाव, ध्येयप्राप्तीची आशा, रणक्षेत्रांत पाऊल टाकून बहुतेक असहकारवाद्यांनी केलेली आत्मयज्ञाची तयारी, यामुळें विरोधाची जी प्रचंड शक्ति निर्माण झाली, तिच्यापुढें मोतिलालजींचें बुद्धिमत्तेचें तेज व दासांचे लोकांवर छाप पाडणारें व्यक्तिमत्व फिकें पडलें. पृथक्करण, टीका, दोषारोप, आवेश इत्यादींनीं गजबजलेला जोराचा वादविवाद पांच दिवस झाला, व शेवटीं सामुदायिक कायदेभंग करण्यास देश तयार नाहीं, परंतु प्रांतिक कॉंग्रेस कमिट्यांनीं आपल्या जबाबदारीवर या बाबतींत घातलेल्या सर्व अटी पाळल्या गेल्या आहेत असें पाहून कायदेभंगाची मंजुरी दिल्यास हरकत नसावी, असा ठराव पास झाला. कौन्सिल प्रवेश व ब्रिटिश मालावरील बहिष्कार हे दोन्ही कठीण प्रश्न गया कॉंग्रेसवर सोंपविण्यांत आले. विधायक कार्यक्रमाचा अंमल करण्याच्या दृष्टीनें स्थानिक स्वराज्य संस्थांत प्रवेश, शाळा-कॉलेजें व कोर्टें याच्यावर बहिष्कार, कॉंग्रेसच्या कामाखेरीज इतर वेळीं कायद्याच्या मर्यादेंत आत्मसंरक्षणाचा हक्क, वगैरे ठराव या बैठकींत पास झाले. याप्रमाणें कायदेभंग कमिटीच्या कामाची समाप्ति झाली. याकरितां कॉंग्रेसचें १६००० रुपये खर्च झाले.

१९२२ मध्यें जानेवारी-२, फेब्रुवारी-२, मार्च-१, एप्रिल-१, मे-१, जून-२, जुलै-१, सप्टेंबर-१ व डिसेंबर-१ या प्रमाणें वर्किंग कमिटीच्या सभा ... 'गुरुका बाग' प्रकरणासंबंधानें चौकशी करण्याकरितां एक वजनदार कमिटी

नेमण्यांत आली. जुने सन्माननीय देशभक्त पुढारी बाबू मोतिलाल घोष यांच्या मृत्यूबद्दल दुःख प्रदर्शित करण्यांत आलें. हिंदु-मुसलमानांत सलोखा घडवून आणण्याकरितां मुलतानकडे जाण्यासाठीं एक कमिटी नेमण्यात आली. २०–२१ सालीं हिंदु-मुसलमान ऐक्य झाल्याचे अनेक ऐतिहासिक प्रसंग घडून आले. परंतु दुर्दैवानें १९२२ च्या मोहरममध्यें मुलतानात हिंदु–मुसलमानांचे दंगे होऊन बऱ्याच मालमत्तेचा व जीविताचा नाश झाला. एकीचे सर्व प्रयत्न फुकट गेले. 'महात्मा गांधींनीं परिश्रमपूर्वक उभारलेली इमारत पूर्ण ढासळून पडली' (इंडिया १९२२–२३) १९१७ मध्यें बेझंटबाईंना अटक झाली, तो ता. १५ हा दिवस त्यांची सुटका होईपर्यंत पाळण्यात येत होता. त्याचप्रमाणें 'ता १८' हा गांधी-दिन म्हणून दर महिन्यास सर्व देशभर पाळण्यांत येऊं लागला. १९२२ च्या मे महिन्यांत पं. जवाहिरलाल यांना अटक होऊन शिक्षा करण्यात आली. त्यांच्या अटकेच्या वारंटावर नेहमींचें परिचित असलेले १२४ अ कलम होतें. परंतु, या कलमान्वयें ठेवण्यात आलेल्या आरोपाची चौकशी झाली नाहीं तर, धमकी देणें, व जबरदस्तीनें लुबाडणें या आरोपान्वयें त्यांची चौकशी झाली. जाहीर सभेंत भाषण करताना, परदेशी कापडाच्या दुकानावर पिकेटिंग करण्याचा आपला उद्देश आहे, असें त्यांनीं जाहीर केले होते. व्यापारी संघाशीं झालेला करार मोडल्यामुळें, कांहीं व्यापाऱ्याकडून दंड वसूल करण्यासंबधानें विचार करण्याकरतां भरलेल्या कमिटीच्या सभेचे ते अध्यक्ष होते. इं. पि. कोड ३८५ प्रमाणें त्यांना शिक्षा देण्यात आली. वस्तुस्थिति अशी होती कीं, परदेशी कापडाच्या दुकानावर पिकेटिंग करण्याबद्दलच त्यांच्यावर खटला चालविण्यांत आला होता. पं. जवाहरलाल यांनीं कोर्टापुढें पुढील आशयाची उत्कृष्ट लेखी जबानी सादर केली. (१७ मे १९२२) "दहा वर्षांपूर्वी मी अगदीं ततोतंत '[illegible]' होतो. हॅरो व केंब्रिज येथील शिक्षण संस्थांतून मीं शिक्षण घेतलें, व इतर सर्व विद्यार्थ्यांप्रमाणें माझेंही मन अनेक पूर्वग्रहांनीं दूषित झालें होतें. [illegible] मा[illegible] क्रान्ति झाली आहे. हिंदुस्थान सरकारच्या [illegible] राज्यपद्धतीविरुद्ध मीं बंडखोर बनलों आहे. माझ्यांत हा [illegible] आला [illegible] मला आश्चर्य वाटतें. [illegible]

[illegible]

[illegible]

करावयास मिळणें ह्यासारखी दुसरी सुदैवाची गोष्ट कोणती? माझ्या प्रिय देशाकरितां कष्ट सोसण्याची संधी मिळाली, हिंद पुत्राला त्याच्या प्रिय मातेकरितां आत्मत्याग करण्याचा प्रसंग आला, किंवा, आपलीं दिव्य स्वप्नें प्रत्यक्ष अस्तित्वांत आलेलीं पहावयास मिळालीं यापेक्षां दुसरी सुदैवाची गोष्ट कोणती असणार?"

गया कॉंग्रेसचें अधिवेशन (१९२२) हें अनेक दृष्टींनीं महत्वाचें झालें. या कॉंग्रेसला जे पुढारी हजर राहिले होते त्यांच्याचमुळें केवळ ह्या कॉंग्रेसला महत्व प्राप्त झालें असें नाहीं, तर या अधिवेशनांत ज्या प्रश्नांचा विचार करण्यांत आला त्यामुळेंही ह्या कॉंग्रेसला विशेष महत्व आलें आहे. गया कॉंग्रेसचा लढा तिरंगी होता. राजकारणाकडे अध्यात्मिक दृष्टीनें पहावें व त्याच भावनेनें हा लढा चालवावा असें म्हणणारा एक पक्ष होता. केवळ बुद्धिवादाच्या जोरावर राजकारण जिंकावें असें म्हणणारा दुसरा एक पक्ष होता. आणि प्रत्यक्ष धकाधकीचें धोरण पत्करून, शत्रूला प्रत्यक्ष नमविलें पाहिजे असें प्रतिपादन करणारा तिसरा एक पक्ष होता. पहिल्या पक्षाचा नेता या अधिवेशनात प्रत्यक्ष हजर नव्हता. सत्य व अहिंसा हें त्याचें ध्येय, आत्मकष्ट व आत्मयज्ञ हें त्याचें तत्वज्ञान, टेकडीवरील उपदेशाच्या आधारावर अधिष्ठित झालेलें राजकारण हा त्याचा धर्म, ह्या सर्व गोष्टी, त्याचें अनुयायी आपल्या बोबड्या बोलानीं व अर्धवटपणें व्यक्त करीत होते. तरी पण या थोर नेत्याचें सर्व तत्वज्ञान तेथेंच असलेल्या त्याच्या प्रतिमेभोंवतालच्या तेजोमय किरणातून प्रकाशत होतें.

गया कॉंग्रेसपुढें असलेला मतभेदाचा व लोकांचें अन्तःकरण प्रक्षुब्ध करून सोडणारा प्रश्न म्हणजे कौन्सिल प्रवेश हा होय. कलकत्ता येथील ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटीच्या सभेनें हा प्रश्न गया कॉंग्रेसवर सोंपविला होता. या प्रश्नाचा निर्णय लावण्यासाठीं पाच दिवस कॉंग्रेसला खर्चावे लागले. कौन्सिल प्रवेशाला मान्यता दिल्यास असहकारितेची योजना उलथून पडेल, असें म्हणणारे कांहीं लोक होते. कौन्सिल प्रवेशाबद्दल असलेली मनाई रद्द करू नये, असें ते लोक आग्रहानें सांगत होते. या अधिवेशनाच्या वेळीं जे बुद्धिमान पुढारी हजर होते, त्यांचें म्हणणें असें कीं, कौन्सिलमध्यें दुसावें पण जागाचा स्वीकार करूं नये किंवा राजनिष्ठेची शपथही घेऊं नये व हें धोरण पत्करून शत्रूचा समूळ उच्छेद करावा. बाकी राहिले मदनादस पुढारी. त्याचें म्हणणें असें कीं, कौन्सिल

मध्यें जाऊन तेथें धुमाकूळ मांडावा. दिवाणांना व प्रधानमंडळाला काम करूं देऊं नये व शत्रूच्या बालेकिल्ल्यांत शिरून त्याची दाणादाण उडवावी. सरकारी खात्यांना लागणारा खर्च मंजूर करूं नये. निंदाव्यंजक ठराव आणावे. डेड-लॉक उत्पन्न करावा, व राज्यकारभाराचें यंत्र अजीबात बंद पाडावें.

देशबंधू दास यांचें भाषण अत्यंत तर्कशुद्ध, विद्वत्ताप्रचुर व व्यवहार्य ध्येय-वादानें युक्त असें होतें. परंतु, असहकारितेच्या कार्यक्रमांत फेरफार घडवून आणण्याच्या त्यांच्या धोरणाला एवढा प्रचंड विरोध झाला कीं, त्यापुढें श्रीनिवास आय्यंगार व पंडित मोतिलाल नेहरु, यांच्या बुद्धिमत्तेचें कांहीं चाललें नाहीं. कॉंग्रेसवाल्यांनीं कौन्सिल निवडणुकी लढवाव्या, पण जागांचा स्वीकार करूं नये अशी उपसूचना आणली गेली. पंडित मोतिलाल नेहरु यांनीं तिला अनुमती दिली. श्री. श्रीनिवास आय्यंगार यांनीं मद्रास कौन्सिलांतील आपल्या सभासद-त्वाचा राजीनामा दिला होता. ते ॲडव्होकेट जनरल होते व सी. आय. ई. ही पदवीही त्यांना मिळाली होती. असें असूनही ते कॉंग्रेसच्या चळवळीला येऊन मिळाल्यामुळें त्यांचें सर्वत्र अभिनंदन करण्यांत आलें. गया कॉंग्रेसच्या वेळीं जे खिलाफतवाले हजर होते, ते सर्वत्र जमायत उलेमाच्या नेतृत्वाखालीं चालणारे होते, व या उलेमांनीं कौन्सिलांत शिरणें हें अधर्माचें व अपवित्र कृत्य आहे, असें आपला फतवा काढून जाहीर केलें होतें. फेरवाद्यनीं तर जंग जंग पछाडले पण गया कॉंग्रेसमध्यें त्यांचें कांहीं चाललें नाहीं. गांधींच्या आत्म्यानें सर्व वाता-वरण व्यापून टाकलें होतें. आपला नेता कॉंग्रेसला हजर नाहीं असें पाहून त्याच्या-कडे पाठ फिरविणें हें अप्रामाणिकपणाचें लक्षण आहे असें तेथें जमलेल्या गांधींच्या प्रत्येक अनुयायाला वाटत होतें.

बाबू मोतिलाल घोष व अंबिकाचरण मुजुमदार यांच्या निधनाबद्दल दुःख प्रदर्शित करुन, महात्मा गांधी व त्यांचीं तत्त्वें यांच्याबद्दल कृतज्ञता प्रगट करण्यांत आली. अकालीं हुतात्म्यांनीं अलौकिक शौर्य दाखविलें व अहिंसेचें उदाहरण घालून दिलें याबद्दल त्यांचें अभिनंदन करण्यात आलें. तुर्कीच्या केमाल पाशाच्या विजयाबद्दलही अभिनंदन करण्यांत आलें. कौन्सिलावर बहिष्कार टाकावा असा ठराव करण्यात आला. सरकारनें यापुढें रा[illegible] कर्ज काढू नये, व नोकरशाहीनें कायदेमंडळाच्या नांवाखालीं उभारलेल्या या कर्जांना कोणी हातभार लावूं नये, अशी गंभीर सूचनाही देण्यांत आली. ऑल इंडिया

म्हणावयाचें तर कौन्सिलें मोडून प्रधानमंडळें निर्माण करण्यास अडथळा करणाऱ्या, कलकत्ता व नागपूर येथील कार्यक्रमामुळें तसाच परिणाम व्हावयास कोणती हरकत? देशबंधु दास यांचा आपल्या प्रांतांवर पूर्ण विश्वास होता. लहानशा कार्यक्षेत्रांत आपली सर्व शक्ती एकवटून कार्य करावें अशी त्यांची वृत्ति होती. विस्तृत क्षेत्रांत आपली उत्साहशक्ति उपयोगांत आणून तिचा दुरुपयोग करूं नये असें त्यांना वाटत होतें. असहकारितेच्या चळवळीची गाडी याप्रमाणें मुख्य रुळावरून काढून कायदेमंडळाच्या बाजूच्या रुळावर नेऊन सोडण्यांत आली.

१९२२ ची हकिकत संपविण्यापूर्वी दोन गोष्टींचा निर्देश, या विषयाशीं प्रत्यक्ष संबंध नसला तरी, करणें जरूर आहे. स्वयंसेवक दलाची संघटणा करण्याकडे तरुण लोकांचीं मनें झपाट्यानें वळत आहेत ही गोष्ट सरकारच्या लक्षात आली होती. स्वयंसेवकांची ही संघटणा वाढत्या सरूपामुळें दिवसें-दिवस प्रबळ होत चालली होती. कॉंग्रेसपक्षानें हिंदुस्थानांत दौरा काढला त्या वेळीं जबलपूर व इतर ठिकाणीं त्याना प्रतिबंध करण्याकरितां तेथील अधिकाऱ्यांनीं हुकूम काढले होते. खिलापत स्वयंसेवक व त्यांचे हुबेहूब लष्करी युनिफॉर्म पाहून तरुणांचीं मने आकर्षिलीं जात, तेव्हा या राष्ट्रीय चळवळींतील प्राणच काढून घ्यावा या उद्देशानें सरकारनें हिंदुस्थान व ब्रह्मदेश यांतील निरनिराळ्या भागात टेरिटोरिअल फोर्सची संघटणा करण्याचें ठरविलें. हिंदी मिलिटरी कॉलेजमध्यें सॅन्डर्स्टकरितां हिंदी तरुणांना शिक्षण देण्याची एक योजना आखण्यात आली. दुसरी गोष्ट म्हणजे राजबंदींच्या वागणुकीतील जेलच्या नियमांत सुधारणा करणें ही होय. राजबंद्यांना इतर कैद्यांपेक्षां निराळ्या तऱ्हेनें म्हणजे जास्त सवलती देऊन वागविण्यात यावें, यासंबंधाचा विचार या वेळीं चालूं होता. ज्यामध्यें हिंसेचा उपयोग करण्यात आला आहे किंवा मालमत्तेचा नाश करण्यात आला आहे, असल्या आरोपाबद्दल शिक्षा झालेले कैदी, लष्कर व पोलिस यांमधील लोकांना फितविल्याबद्दल शिक्षा झालेले लोक व प्रत्यक्ष धमकी दिल्याबद्दल शिक्षा झालेले इसम, यांची राजबंदी म्हणून गणना करण्यात आली नाही. राजबंद्यांचा दर्जा, त्यांचें वर्तन, शिक्षण व [illegible] वगैरेंचा विचार करून त्यांना निरनिराळ्या प्रकारच्या सवलती द्याव्यात, असें ठरविण्यात आलें. या कैद्यांना इतर सामान्य कैद्यांपासून निराळें ठेवावें. [illegible]

अन्न, स्वतःचा बिछाना व कपडे त्यांना वापरूं द्यावेत, पुस्तकें व नियतकालिकें जवळ ठेवण्यास त्यांना परवानगी असावी, मित्रमंडळींना भेटण्यास मोकळीक द्यावी, ठरलेल्या दिवसांनीं त्यांना पत्रें पाठवितां यावीं व सक्त मजुरीचीं हलकीं कामें त्यांच्याकडून करवून घेऊं नयेत अशा सवलती त्यांना देण्यांत याव्या, अशा सूचना हिंदुस्थान सरकारनें प्रांतिक सरकारांना कळविल्या खऱ्या, परंतु जेलच्या अधिकाऱ्यांनीं पुष्कळ राजबंदींच्या बाबतींत या नियमांची अंमलबजावणी केली नाहीं. कैद्यांची वर्गवारी करण्याच्या बाबतींत 'राजकीय' या शब्दाला देखील अलीकडे मान्यता देण्यास सरकार तयार नाहीं.

---

## प्रकरण चौथें

# कायदेमंडळांतील असहकारिता

जातीय भेदामुळें १९२३ मध्यें देशाचें राजकीय वातावरण पुन्हां विघडू लागलें होतें. १९२२ मध्यें मुलतान येथें दंगे झाले. १९२३ च्या मोहरममध्यें बंगाल व पंजाबमध्येंही भयंकर दंगे झाले. १९२२ सालीं खिलाफतचा अगदीं अनपेक्षित शेवट झाला. मदनाईया येथें युद्ध तहकुबी झाल्यानंतर (आक्टोबर १९२२) दोस्त राष्ट्रांची एक परिषद २० नोव्हेंबर रोजीं लॅासेन येथें भरली. या परिषदेचें काम दोन महिने चालू होतें. यानंतर अंगोरा सरकारच्या प्रतिनिधींनीं शहरचा मुलकी कारभार आपल्या ताब्यांत घेतला, आणि तुर्की सुलतानाला ब्रिटिश लढाऊ बोटींतून आपला जीव बचावण्याकरितां गुप्त रीतीनें पळून जावें लागलें. या बोटीनें तो माल्टा येथें जाऊन पोहोंचला. तो पळून गेल्यानंतर अर्थातच सुलतानच्या व खलिफाच्या गादीवरून त्याला पदच्युत करण्यांत आलें. त्याच्या जागीं त्याचा पुतण्या अब्दुल मज्जीद इफेन्दी यास नवा खलिफा म्हणून निवडण्यांत आलें. सुलतानची गादी नष्ट झाली. तुर्कस्थान लोकसत्ताक राष्ट्र बनलें. याप्रमाणें खिलापतीला धर्मगुरुच्या गादीचें स्वरूप देण्यात आलें.

गया येथें नाफेरवाल्यांचा विजय झाला खरा, पण तो फार दिवस टिकणें शक्य नव्हतें. ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटीची सभा १ जानेवारी १९२३ रोजीं भरली व ३० एप्रिल १९२३ पर्यंत २५ लाख रुपये जमा करून ५० हजार स्वयंसेवकांचें दल उभें करावयाचें असा ठराव करण्यांत आला. तुर्कस्थानच्या परिःस्थितीमुळें एकादा गंभीर प्रसंग प्राप्त झाला तर त्याला तोंड देण्याकरितां कायदेभंगाच्या अटी ढिल्या करण्याचा अधिकार वर्किंग कमिटीला देण्यांत यावा, व पुढल्या सभेपर्यंत एक राष्ट्रीय करारनामा करण्याची योजना तयार करण्यांत यावी अशी डॉ. अन्सारी यांनीं विनंति केली. परंतु कमिटीपुढें अध्यक्षाचा राजीनामा हाच मुख्य व महत्त्वाचा विषय होता. नवीन स्वराज्य पार्टी काढण्याचा आपला विचार देशबंधु दास यांनीं विषय नियामक कमिटीला पूर्वीच कळविला होता व अलाहाबाद येथील ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटीच्या सभेपर्यंत हा प्रश्न तहकूब ठेवण्यांत आला होता (२७ फेब्रुवारी १९२३). ह्या सभेमध्यें दोन्ही

पक्षांतर्फे तडजोड घडवून आणण्यांत आली व दोन्ही पक्षांनीं ३० एप्रिलपर्यंत कौन्सिलच्या बाबतींत कोणच्याही प्रकारचें प्रचारकार्य करूं नये, असें ठरविण्यांत आलें. दोन्ही पक्षांनीं याशिवाय असलेले सगळे कार्यक्रम आपआपल्या परीनें अंमलांत आणण्याचा प्रयत्न करावा, कोणी कोणाच्या आड येऊं नये.

याच सुमाराम मौलाना अबुल कलाम अजाद व पंडित जवाहरलाल नेहरू हे कारागृहांतून मुक्त झाले. ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटीनें त्यांच्या सेवेबद्दल कृतज्ञता व्यक्त केली.

कायदेभंगाचा कार्यक्रम पुन्हां अंमलांत येणें संभवनीय नव्हतें. कॉंग्रेसमधील फूटही ह्या गोष्टीला मुख्यतः कारणीभूत झाली होती. नव्या वर्षाच्या अंदाजपत्रकांत राष्ट्रामध्यें खळबळ होण्यास एक नवी संधि प्राप्त झाली. १९२३ च्या बजेटच्या अधिवेशनांत मिठाचा कर वाढविण्याची सूचना पुढें आली होती; परंतु असेंब्लीनें ही सूचना फेटाळून लाविली. अर्थातच व्हॉईसरॉयांनीं आपल्या अधिकाराखालीं ही सूचना मंजूर केली. असहकारपक्षाचा पूर्वीचा जोर कायम असता तर व्हॉईसरॉयच्या ह्या सर्टिफिकेशनचा फायदा घेऊन देशांत नवजीवन निर्माण करण्याचा प्रयत्न झाला असता; परंतु ह्या प्रसंगाचा कॉंग्रेसवाल्यांवर कांहींच परिणाम झाला नाहीं. व्हॉईसरॉयच्या सर्टिफिकेटाचा फायदा कॉंग्रेसनें घेतला नाहीं असें 'इंडिया'च्या संपादकांनीं देखील म्हटलें आहे. एकंदरींत, लॉर्ड रीडिंग ह्यांच्या ह्या अरेरावीच्या कृत्याचा प्रतिकार कोणत्याही प्रकारें झाला नाहीं.

सर्व सनदशीर चळवळीच्या पुरस्कर्त्यांना एकत्र आणून एक राष्ट्रीय परिषद बोलवावी, असा प्रयत्न मिसेस बेझंट या सुमारास करीत होत्या. डॉ. सप्रू ह्यांनीं हिंदुस्थान सरकारच्या कायदेमंत्र्याच्या जागेचा नुकताच राजीनामा दिला होता. ह्यामुळें त्यांच्याच अध्यक्षतेखालीं ही परिषद बोलावण्यांत आली. ह्या परिषदेंत साम्राज्यांतर्गत स्वायत्ततेचा दर्जा हिंदुस्थानाला प्राप्त करून देण्यासंबंधानें व्यावहारिक कार्यक्रमाची चर्चा करण्यांत आली व अनेक प्रश्नासंबंधानें विचार करण्याकरितां निरनिराळ्या कमिटयाही नेमण्यांत आल्या. इकडे कॉंग्रेसनें नेमलेल्या शिष्टमंडळानें देशांत मोठ्या प्रमाणावर दौरा काढला व विधायक कार्यक्रमाचा विचार करून तो लोकप्रिय करण्याचा प्रयत्न केला. बाबू राजेंद्रप्रसाद, सी. राजगोपाळाचारी, शेट जम्नालाल बजाज व देवीदास गांधी हे ह्या शिष्टमंडळांत होते. १९२३ च्या मे महिन्यात मुंबई येथें भरलेल्या

वर्किंग कमिटीपुढें ह्या शिष्टमंडळानें आपला रीपोर्ट सादर केला. १९२३ मे च्या २५-२६-२७ रोजीं झालेल्या सभेंत कौन्सिलवरील बहिष्काराससंबंधानें गया कॉंग्रेसनें पास केलेल्या ठरावाचा प्रचार मतदारांमध्यें करूं नये, असें ठरविण्यांत आलें. कॉंग्रेसच्या कार्यक्रमाचे निरनिराळे विभाग करावे व त्यावर त्या त्या कार्यक्रमांत रस घेणाऱ्या पुढाऱ्यांची नेमणूक करण्यांत यावी, आणि ह्या कामाकरिता ५-६ कोटी रुपये जमवावे अशी देशबंधु दास ह्यांनीं एक सूचना माडली. बाबू राजेंद्रप्रसाद व श्री. राजगोपाळाचारी ह्यानीं वर्कींग कमिटीपुढें ही सूचना विशद करून सांगितली, पण ती अव्यवहार्य आहे व कौन्सिलच्या दृष्टीनें विचार करतां गया कॉंग्रेसच्या ठरावाला विरुद्ध आहे, असें ठरविण्यात आलें. परतु वरील ठराव ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटीच्या या सभेंत पास झाल्यामुळें श्री. राजगोपालाचारी, वल्लभभाई पटेल, राजेंद्रप्रसाद, ब्रिजकिशोर प्रसाद गंगाधरराव देशपांडे, व जन्मालाल बजाज ह्या वर्किंग कमिटीच्या ६ सभासदांनीं आपल्या जागांचे राजीनामे दिले. हे राजीनामे परत घेण्यासंबंधानें प. जवाहरलाल नेहरू यानीं प्रयत्न करून पाहिला. पण शेवटीं हे राजीनामे मंजूर करण्यांत आले व त्याचप्रमाणें अध्यक्षांचाही राजीनामा मंजूर करण्यात आला. नंतर कमिटीची पुनर्घटना करण्यांत आली. व डॉ. अन्सारी ह्यांच्या अध्यक्षतेखालीं या कमिटीचें काम पुन्हां चालूं करण्यात आलें. मध्यप्रांतातील स्वयंसेवकांनीं झेंडा सत्याग्रह चालूं ठेवल्याबद्दल कमिटीनें त्यांचें अभिनंदन केलें, आणि सर्व देशांतील स्वयंसेवकांनीं या लढ्यांत सामील व्हावें, अशी विनंतिही केली. मुंबईच्या सभेंत झालेल्या तडजोडीबद्दल निषेध प्रगट करण्यांत आला. त्या वेळीं या ठरावाला मान्यता देणें अगत्याचें आहे, असें ठरवून नागपूर येथील सभेनें तसें जाहीर केलें. वरील ठरावा विरुद्ध वागण्याचा प्रयत्न प्रांतिक कॉंग्रेस कमिट्यानीं केला, याबद्दल दिलगिरी प्रदर्शित करण्यात आली, व अशा प्रकारचा प्रयत्न पुन्हां करण्यात येऊं नये, अशी आशा व्यक्त करण्यात आली. तामील नाडू कॉंग्रेस कमिटीच्या बेशिस्त वर्तनाबद्दल निषेध करण्यात यावा अशी सूचना पुढें आली, परंतु ऑल इंडिया कमिटींतील काहीं लोकानीं या बाबतींत पुरेसा पुरावा पुढें आला नसल्यानें असा निषेध करतां येत नाहीं असें सुचविलें. ही दुसरी सूचना सभेमध्यें मंजूर झाली. त्यामुळें ही सूचना मांडणारे पंडित जवाहरलाल ह्यांनीं व त्यांच्याच मताचे डॉ. अन्सारी ह्यांनीं वर्किंग कमिटींतील आपल्या

जागांचे राजीनामे दिले. ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटीनें हे राजीनामे मंजूर केले व त्याच वेळीं नवीन वर्किंग कमिटी निवडण्यांत आली.

नागपूरच्या सभेंत एकाएकीं एक नवीनच ठराव पुढें आला. ह्या ठरावाची पूर्वी नोटीसही देण्यांत आली नव्हती. कौन्सिल बहिष्काराच्या प्रश्नाचा विचार करण्याकरतां कॉंग्रेसचें एक जादा अधिवेशन भरवावें, असें ह्या ठरावानें मंजूर करण्यांत आलें. हें जादा अधिवेशन मुंबई येथें मौलाना अबुल कलाम अजाद ह्यांच्या अध्यक्षतेखालीं भरविण्यांत यावें व या बाबतींत जरूर ती तरतूद करण्याचा वर्किंग कमिटीला अधिकार द्यावा असेंही ठरविण्यांत आलें. ह्या अनपेक्षित ठरावाला सहजच विरोध करण्यांत आला, आणि हा ठराव फारच थोड्या बहुमतानें पास झाल्यामुळें ह्या विरोधाला अधिकच पाठबळ मिळालें. विजगापट्टण येथें ऑगस्ट महिन्यांत ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटीची जादा सभा भरवावी, असा एक विनंति अर्ज ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटीकडे करण्यांत आला होता. ही जादा सभा ३ ऑगस्ट रोजीं सुरू झाली. विनंति अर्जाला अनुसरून कोणी ठराव आणणार आहे काय, असें अध्यक्षांनीं विचारलें असतां कोणीही पुढें आला नाहीं. श्री. राजगोपालाचारी यांनीं कॉंग्रेसचें जादा अधिवेशन ऑगस्टमध्यें न भरवितां सप्टेंबरमध्यें भरविण्यांत यावें, जागा ठरविण्यासंबंधानें अडचण उत्पन्न झाल्यास त्या बाबतींत निर्णय देण्याचा अधिकार अध्यक्षांना देण्यांत यावा, असा ठराव सभेपुढें मांडला व तो पास झाला. राजगोपालाचारींनीं हा ठराव मांडला, ही गोष्ट थोडी आश्चर्यकारक होती. या सभेचे अध्यक्ष प्रसिद्ध नाफेरवादी देशभक्त के. व्यंकटप्पय्या हे होते, हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. असें करण्यांत ह्या प्रश्नाचा जादा सभेंत पुन्हां एकदां कीस काढण्यांत यावा हा हेतु होता कीं, नवीन दिशेनें जाऊं पहाणाऱ्या कॉंग्रेसच्या गाडीचा मार्ग सुलभ करावा असा होता, हें सांगतां येत नाहीं.

या जादा अधिवेशनासंबंधानें विचार करण्यापूर्वी नागपूरच्या सत्याग्रहासंबंधानें हकीगत सांगणें अगत्याचें आहे. शहराच्या सिव्हिल लाईन्समध्यें राष्ट्रीय झेंडा नेण्यास १४४ कलमान्वयें तेथील पोलिस अधिकाऱ्यानें मनाई केली. १ मे १९२३ रोजीं आम्हाला वाटेल त्या ठिकाणीं आम्ही हा झेंडा घेऊन जाऊं असा तेथील स्वयंसेवकांनीं आग्रह धरला व त्या प्रमाणें ते आपला हक्क बजावूं लागले. या स्वयंसेवकांना पकडण्यांत येऊन शिक्षाही देण्यांत आली. ही चळवळ लोक-

रच वाढत चालली व वर्किंग कमिटीचा तिला आशीर्वाद मिळाला व पुढें नागपूर येथें जुलै महिन्यांत झालेल्या ऑल इंडिया काँग्रेस कमिटीच्या सभेनेंही नागपूर सत्याग्रह कमिटीला साहाय्य करण्याचा ठराव पास केला. आणि गांधीदिन (ता. १८) झेंडा दिन म्हणून पाळण्यात यावा. झेंडयाच्या मिरवणुकी काढाव्या, व लोकांनींही सार्वजनिक रीतीनें या झेंडयाचें वंदन करावें असेंही ठरलें. याच सुमारास या सत्याग्रहाबाबत शेठ जम्नालाल बजाज यांना अटक करण्यांत आली. नागपूर येथें भरलेल्या ऑल इंडिया काँग्रेस कमिटीच्या सभेनें शेठ जम्नालाल बजाज ह्यांचें अभिनंदन केलें व ह्या चळवळीला अंतःकरणपूर्वक पाठिंबा देण्याचें आश्वासन दिलें. शेटजींना झालेल्या ३००० रुपये दंडाची रक्कम वसूल करण्याकरितां त्यांची मोटार जप्त करण्यांत आली असतां नागपूर येथें ही गाडी कोणीही विकत घेतली नाहीं, त्यामुळे ती काठेवाडात न्यावी लागली. नागपूर सत्याग्रहांत अटक झालेल्या कांहीं सत्याग्रही कैद्यांना अनेक प्रकारचें कष्ट सोसावे लागले. देशांतील सर्व प्रांतांतून ह्या सत्याग्रहासाठीं स्वयंसेवक आले होते.

नागपूरच्या झेंडा सत्याग्रहाला लौकरच अखिल भारतीय स्वरूप प्राप्त झालें. श्री. वल्लभभाई पटेल ह्यांच्याकडे ता. १० जुलै रोजीं ह्या सत्याग्रहाचीं सूत्रें देण्यात आलीं. ठिकठिकाणच्या काँग्रेस कमिटयातर्फे स्वयंसेवक नागपूरला येऊं लागले व या कमिटयांनीं द्रव्यसाहाय्यार्थ जनतेकडे मागणी केली विजगापट्टण येथें भरलेल्या वर्किंग कमिटीच्या सभेनें श्री. वल्लभभाई पटेल ह्यांचें कृतज्ञतापूर्वक अभिनंदन केलें व नागपूर येथें प्रत्यक्ष हजर राहून ह्या चळवळीचीं सूत्रें चालवावीं, अशी विनन्ति केली. विठ्ठलभाई व वल्लभभाई ह्या दोन्ही पटेल बंधुद्वयांनीं आपल्या देखरेखीखालीं ही चळवळ चालविली व तिला यश प्राप्त करून दिल्याचें श्रेय संपादन केलें. मिरवणूक काढणारांनीं आगाऊ परवाना घ्यावा असें सरकारचें म्हणणें होतें. पण परवान्याशिवाय कोणत्याही रस्त्यावरून मिरवणुकी काढण्याचा नागरिकांचा हक्क आहे असें काँग्रेस कमिटीतर्फे जाहीर करण्यात आलें. ह्या बाबतींत प्रचंड चळवळ करण्याचें ठरवून वल्लभभाईनीं नागपूरच्या जनतेला आपल्या विश्वासात घेतलें, त्यांचे गैरसमज दूर केले व गांधीदिनादिवशीं (ता. १८) मिरवणूक काढण्याचें ठरवून तिची वेळ व रस्ताही जाहीर केला. मनाई हुकूम कायमच होता, नव्हे तो नुकताच पुन्हां जाहीर करण्यांत आला होता. तथापि १८ तारखेच्या झेंडयाच्या मिरवणुकीला कोणताही अडथळा सरकारनें केला

नाहीं. ह्या बाबतींत अर्थातच वर्तमानपत्री वादळास सुरवात झाली. कॉंग्रेसनें सरकारकडे अर्ज करून मिरवणुकीकरितां परवानगी मागितली होती असें प्रसिद्ध झालें होतें. पण कॉंग्रेसनें ही बातमी खोटी असल्याचें जाहीर करून अँग्लो इंडियन पत्रांचा तीव्र निषेध केला. एकादी तडजोड घडून आल्याबरोबर राष्ट्रीय चळवळीच्या विरोधकांनीं तिच्यासंबंधानें नाना तऱ्हेच्या टीका कराव्या हा नेहमीचाच रिवाज आहे. तथापि दिल्ली कॉंग्रेसनें नागपूरच्या सत्याग्रह चळवळीच्या कार्यकर्त्यांचें अंतःकरणपूर्वक अभिनंदन केलें व हा लढा यशस्वी करून नागपूरनें राष्ट्राच्या मानांत भर घातली असें जाहीर केले.

ह्या वर्षाच्या जुलै, ऑगस्ट व सप्टेंबर महिन्यांत परदेशांतील हिंदी लोकांच्या प्रश्नाकडे कॉंग्रेसचें लक्ष वेधलें. केनियांतील हिंदी लोकाची परिस्थिति दिवसेंदिवस बिघडत चालली होती. ब्रिटिश साम्राज्याच्या इतर वसाहतींतील हिंदी वसाहतवाल्यांना अनेक प्रकारचे अपमान सहन करावे लागत होते. १९२१ मध्यें झालेल्या साम्राज्य परिषदेंत, ब्रिटिश साम्राज्याच्या स्थिरतेच्या व हितरक्षणाच्या दृष्टीनें साम्राज्यांतील इतर भागांत रहाणाऱ्या हिंदी लोकांच्या नागरिकत्वाच्या हकाला मान्यत देण्यात यावी, असा ठराव पास करण्यांत आला. फक्त दक्षिण आफ्रिकेनें ह्या ठरावाला विरोध केला.

हिंदी राष्ट्रांतील नागरिकत्वाच्या हक्कासंबधानें एखादा प्रश्न उपस्थित झाल्यास त्याबद्दल दक्षिण आफ्रिकेशीं हिंदुस्थाननें प्रत्यक्ष वाटाघाट करावी, असेंही या परिषदेंत ठरविण्यांत आलें होतें. १९१४ सालीं 'स्मट–गांधी करारा'न्वयें दक्षिण आफ्रिकेंतलि हिंदी लोकांना जे हक मिळाले होते, त्याविरुद्ध ट्रॅन्सव्हॉल प्रांतिक कोर्टानें १९२० सालीं जाहीर निकाल देऊन गदा आणली होती. ट्रॅन्सव्हालमधील हिंदी लोक राजकीय दृष्ट्या असहाय होते. नाताळमधील हिंदी लोकांना म्युनिसिपल मतदारीचा हक होता, पण त्या वरही अलिकडे गदा आली होती. ऑरेंज रिव्हर फ्री स्टेटमध्यें हिंदी लोकांना जाण्याचीच मनाई करण्यात आली होती. आशियातील लोकांचें व्यापार व जमिनीची मालकी ह्यासंबंधानें चौकशी करण्याकरतां नाताळ सरकारनें १९२० सालीं एक कमिशन नेमलें होतें. ह्या कमिशननें आशियांतील लोकांच्या जमिनीच्या मालकीला विरोध करणाऱ्या कायद्याला मान्यता दिली, परंतु हिंदी लोकांना सक्तीनें गांवाबाहेर ठेवण्यात यावें ही शिफारस करण्याचें नाकारलें; हिंदी लोकांनीं फक्त किनाऱ्यावरील

जमिनीवर हक्क सांगावा. परंतु हिंदुस्थान सरकारनें ह्या बाबतींत निषेध व्यक्त केल्यामुळें युनियन सरकारनें वरील सूचनेचा त्याग केला. नाताळ सरकारनें ऑर्डिनन्सें प्रसिद्ध केलीं त्यामुळें हिंदी लोकांची परिस्थिति अधिकच विकट झाली. हे दोन व आणखी एक तिसरा आर्डिनन्स १९२२–२३ मध्यें पुन्हां कौन्सिलांत मांडण्यांत आला. पण युनियन सरकारनें पहिलें दोन आर्डिनन्स फेटाळून लाविले व तिसऱ्यांत कांहीं फरक करण्याबद्दल आग्रह धरला. नाताळांतील किरकोळ व्यापार करणाऱ्या लोकांना लायसेन्स देण्यासाठीं हा तिसरा आर्डिनन्स काढण्यांत आला होता. लॉर्ड रीडिंग ह्यांनी आपल्या कारकीर्दींत ह्या प्रश्नाचा निःपक्षपातीपणानें विचार केला आणि वरिष्ठ कायदेमंडळाच्या डेप्युटेशनपुढें वरील आर्डिनन्ससंबंधानें स्पष्टीकरण केले. हिंदी लोकांच्या हक्कांना मान्यता देण्यासंबंधानें साम्राज्य परिषदेनें केलेल्या ठरावाची अमलबजावणी करण्याबाबत कानडा, न्यूझीलंड व आस्ट्रेलिया येथील सरकारांना मदत करण्याकरितां हिंदुस्थानचें एक शिष्टमंडळ वरील देशांत जावें असा ठराव १९२१ च्या साम्राज्य परिषदेंत मंजूर करण्यांत आला होता. साम्राज्य परिषदेच्या या ठरावाला वसाहत सरकारांनीं पाठिंबा दिला होता व त्याप्रमाणें १९२२ च्या मेमध्यें ना. शास्त्री व मि. वाजपेयी हे या वसाहतींना भेट देण्याकरितां गेले होते.

या प्रसंगीं कांहीं किरकोळ गाऱ्हाणीं दूर झालीं आणि ना. शास्त्री यांना यश मिळालें. पण केनियांतील हिंदी लोकांची स्थिति मात्र असमाधानकारक होती. या वसाहतींत हिंदी लोकांचें बरेच भांडवल गुंतलें आहे व ती वसविण्याच्या बाबतींत हिंदी लोकांचेच श्रम खर्ची पडले आहेत. अनेक दिशांनीं वसाहतीला उच्च दर्जा प्राप्त करून देण्यासाठीं हिंदी लोकांनीं पुढाकार घेतला आहे व लोकसंख्येच्या बाबतींतही युरोपियन रहिवाशांना त्यांनीं मागें टाकलें आहे. शीख शिपायांनीं, हिंदी व्यापाऱ्यांनीं व पेढीवाल्यांनीं तेथल्या गोऱ्या वसाहतवाल्यांना आगाऊ भांडवल देऊन मदत केली ही गोष्ट विन्स्टन चर्चिल यांनींही कबूल केली आहे आणि हिंदी रहिवाशांना, ते ज्या प्रदेशांत राहिले व स्थायिक झाले तेथून हाकून लावण्याचा प्रयत्न होत आहे याचा निषेधही विन्स्टन चर्चिल यांनीं केला आहे. तसेंच ज्या ठिकाणीं कपाशीची मोठ्या प्रमाणांत पैदास होते आणि जेथें हिंदी लोकांचें पुष्कळ भांडवल गुंतलेलें आहे त्या शेतीच्या प्रदेशांत राहण्यास मनाई करण्यांत आल्याबद्दल हिंदी लोकांनीं

चे ठोकळीं आरला संताप व्यक्त केला आहे. हिंदी लोकांना सक्तीनें गांवाबाहेर राहण्यास लावणें, त्यांना मतदानाचा हक्क देण्यास नाकारणें, हिंदी लोकांना सुपीक प्रदेशांत राहण्यास मनाई करणें, हे सर्व जुलूम युरोपियन समाजाच्या असहनशील वृत्तीमुळें हिंदी लोकांच्या बाबतींत केनीयांत करण्यांत येतील असा संभव आहे, असें प्रतिपादन करणारे मि. चर्चिल हेच १९२१ सालीं वसाहत सेक्रेटरी होते. १९२३ सालीं हिंदी व युरोपियन यांच्यामध्यें परस्पर संबंध कसा असावा याचा विचार करण्याकरितां वसाहत ऑफिसतर्फे केनियाच्या गव्हर्नरला लंडनला बोलाविण्यांत आलें होतें. या गव्हर्नरनें आपल्या बरोबर युरोपियन व हिंदी लोकांचीं शिष्टमंडळेंही नेलीं होतीं. त्याचप्रमाणें हिंदुस्थानांतील वरिष्ठ कायदे कौन्सिलातर्फे नामदार शास्त्री यांच्या नेतृत्वाखालीं एक शिष्टमंडळ लंड-नला गेलें होतें. आपले सल्लागार म्हणून मि. अँड्र्यूज यांनीं आपल्यावरोबर यावें, अशी विनंति हिंदी शिष्ट मंडळानें त्याना केली होती. मि. अँड्र्यूज यांनींही या शिष्टमंडळाला केनियाच्या प्रश्नाबाबत चांगलीच मदत केली व त्याबद्दल वर्किंग कमिटीनें त्यांचे आभार मानले.

ऱ्होडेशिया, टांगानिका, न्यासालँड, युगांडा, व केनिया याचा एक प्रचंड संघ बनवावा, अशी सूचना पुढें आल्यामुळें तिकडील हिंदी लोकांच्या प्रश्नाला जास्तच महत्त्व प्राप्त झालें. केनिया प्रश्नाच्या निर्णयावर युगांडांतील हिंदी लोकांचा दर्जा कोणता राहावयाचा, हें अवलंबून होतें. या वसाहतीमध्येंहि हिंदी लोकांचा छळ चालू होता. त्यानीं गावाबाहेर जाऊन राहिलें पाहिजे अशी सक्तीहि त्यांच्यावर करण्यांत येत होती. युरोपियन वसतीपासून दूरवर असलेल्या कंपाला-गांवीं आशियांतील लोकांनीं जाऊन रहावें असा नियम युगांडा सरकारनें केला होता. हिंदुस्थान सरकारनें पाठविलेल्या खलित्यांचा या बाबतींत कांहीं उपयोग झाला नाहीं. टांगानिकामध्यें लॉर्ड मिल्नर यांच्या आश्वासनावर विश्वास ठेवून ( १९२१ ) तेथील शत्रूंची मालमत्ता हिंदी लोकांनीं खरेदी केली. परंतु या वेळीं दिलेलें समानतेच्या हक्काचें वचन, सरकारनें तीन जादा हुकूम काढून मोडलें. या वेळीं मोठ्या प्रमाणावर हरताळ सुरू करण्यांत आला. १९२२ च्या एप्रिलपर्यंत हा हरताळ जोरानें चालू होता. हिंदी लोकांनीं पहिल्या वर्गानें प्रवास करूं नये, असाहि निर्बंध घालण्यांत आला होता; पण तो परत घेण्यात आला. १९२३ ऑगस्टच्या आरंभी कॉंग्रेसनें या बाबतींत निश्चित उपाय योज-

त्यानें ठरविलें म्हणून या प्रश्नासंबंधानें इतकी विस्तृत हकिगत दिली आहे. ऑ. इं. कॉं. कमिटीच्या सभेंत या बाबतींत पुढील ठराव मंजूर करण्यांत आला.

ब्रिटिश साम्राज्यांत हिंदी लोकांना समानतेचा व मानाचा दर्जा प्राप्त होणें अशक्य आहे, ही गोष्ट केनियाच्या बाबतींत ब्रिटिश सरकारनें केलेल्या निर्णयानें स्पष्ट झाली आहे. सरकारच्या या धोरणाचा निषेध करण्याकरितां सर्व देशभर सभा, मिरवणुकी वगैरे काढून मोठ्या प्रमाणावर मतप्रदर्शन करण्यांत यावें. २६ ऑगस्ट रोजीं हिंदुस्थानात सर्वत्र शांततायुक्त हरताळ पाळण्यांत यावा व सभा भरवाव्या, अशा सूचना कमिटीनें जाहीर केल्या. आणि ब्रिटिश एंपायर प्रदर्शन, साम्राज्य परिषद, साम्राज्य-दिन समारंभ वगैरे साम्राज्यविषयक उत्सवांत भाग घेऊं नये अशीहि विनंति कमिटीतर्फे करण्यांत आली.

## दिल्लीचें जादा अधिवेशन १९२३

दिल्ली येथें १९२३ सप्टेंबरच्या तिसऱ्या आठवड्यांत मौलाना अबुल कलाम अझाद यांच्या अध्यक्षतेखालीं कॉंग्रेसचें जादा अधिवेशन भरविण्यात आलें. अबुल कलाम अझाद याना धर्मगुरू या नात्यानें मुसलमान समाजांत मोठा मान देण्यात येतो. बंगालमध्यें हे अत्यंत लोकप्रिय आहेत व दिल्ली प्रांतातील दोन्ही पक्षाच्या पुढाऱ्याचा त्याच्यावर मोठा विश्वास आहे. शुद्ध विचारसरणी व नि:पक्षपातीपणा हे त्याचे विशेष गुण आहेत व म्हणूनच ते सर्वत्र लोकप्रिय झाले आहेत. या अधिवेशनात कौन्सिलवादी पक्षाला आपल्या मताप्रमाणें ठराव मंजूर करून घेण्याला फारशी अडचण पडली नाहीं. कौन्सिल प्रवेश करणें हें धर्मविरुद्ध कृत्य आहे व आपल्या सदसद्विवेक बुद्धीला ही गोष्ट पटत नाहीं, असें ज्यांना वाटत असेल त्यांच्या-खेरीज इतर कॉंग्रेसवाल्याना येत्या निवडणुकीच्या वेळीं उमेदवार म्हणून उभे राहण्यास परवानगी असावी, कौन्सिल प्रवेशाविरुद्ध सर्व प्रचार तहकूब करण्यांत यावा व विधायक कार्यक्रम अमलात आणण्याकरिता दुप्पट जोरानें प्रयत्न करावा, असा ठराव वरील अधिवेशनात करण्यांत आला. पंडित रामभुज दत्त चौधरी यांचें निधन, जपानमधील धरणीकंप, नाभाच्या महाराजांनी सर्कारनें केलेली पदच्युति, बिहार, कानडा व बर्मा येथील महापूर वगैरे दुःख प्रदर्शनपर व सहानुभूतिपर ठराव पास करण्यात आले. कायदेभंगाची परिणाम

कारक चळवळ संघटित करण्याकरितां व प्रांताना या बाबतींत सल्ला देण्याकरितां एक कमिटी नेमण्यात आली. घटनेची दुरुस्ती व राष्ट्रीय कराराचा मसुदा तयार करण्याकरितां दोन कमिट्या नेमण्यांत आल्या. जातिविषयक प्रश्नाच्या बाबतींत वर्तमानपत्रांनीं फार जपून लिहावें व जिल्हा निहाय शांतताकमिटया ठिकठिकाणीं स्थापन करण्यांत याव्या अशीहि शिफारस या काँग्रेसतर्फे करण्यांत आली. शिरोमणि गुरुद्वार प्रबंधक कमिटीनें पाठविलेल्या चौकशी कमिटीच्या सभासदांना अटक झाली व अकाली समाजावर नाना प्रकारची दडपशाही करण्यांत आली. अशा परिस्थितींतहि अकालींनीं धैर्यानें व अहिंसावृत्तीनें त्याचा प्रतिकार केला याबद्दल त्यांचें अभिनंदन करण्यात आलें. खादीचा खप वाढवून परदेशी मालावरील बहिष्कार यशस्वी करावा असें आग्रहपूर्वक सुचविण्यांत आलें. आणि ब्रिटिश मालावरील बहिष्कार व हिंदी मालाची पैदास यांना उत्तेजन देण्याकरितां योजना निश्चित करण्यासाठीहि एक कमिटी नेमण्यांत आली. झेंडा सत्याग्रह यशस्वी झाल्याबद्दल अभिनंदन करण्यांत आले व लालाजी व मौलांना महंमदअल्ली याच्यासारखे पुढारी बंधमुक्त झाले याबद्दलहि अभिनंदन व्यक्त करण्यात आलें.

केनियाच्या प्रश्नावर संताप व्यक्त करण्यात आला व तुर्कस्थानाच्या विजयाबद्दल आनंद व्यक्त करण्यांत आला. शुद्धि-चळवळ व शुद्धिविरोधी चळवळ यामुळें व इतर अनेक प्रश्नामुळें हिंदु-मुसलमानांतील दुही वाढत चाललेली पाहून तिला आळा कसा घालतां येईल याबद्दल विचार करण्याकरिता आणखीही दोन कमिटया नेमण्यात आल्या. सिव्हिक गार्ड स्थापणें व व्यायामविषयक चळवळी सुरू करणे याबद्दलही विचार करण्यांत आला व शांतता व सुव्यवस्था राखण्याबद्दल राष्ट्राला विनंति करण्यात आली.

दिल्ली कॉंग्रेसनतर काँग्रेसच्या चळवळीला एक निराळीच दिशा लागली. गया येथें झालेलें बंड जवळ जवळ यशस्वी झालें. काँग्रेसचीं सूत्रें ज्यांच्या हातात होतीं त्यांची राजकीय धोरणाबाबतची दृष्टीहि बदलली आहे असें दिल्ली ठरावावरून दिसून आलें. या काँग्रेसमध्यें एकंदर पाच कमिट्या नेमण्यांत आल्या, यावरूनही काँग्रेसच्या राजकारणाला स्वस्थता प्राप्त झाली आहे व निरनिराळ्या प्रश्नांनबधानें पुनर्विचार करण्यात राष्ट्रीय कार्यकर्त्यांचीं मनें गुंतून राहिलीं आहेत हें व्यक्त झालें. कौन्सिल प्रवेशानें दिल्लीच्या अधिवेशनाला आरंभ झाला व

सिव्हिक गार्डस् स्थापावें आणि व्यायामाला उत्तेजन द्यावें. या ठरावानें सदरहू अधिवेशनाची समाप्ति केली!

कोकोनाडा येथें कॉंग्रेसचें नेहमीचें अधिवेशन भरावयाचें होतें. कोकोनाडा कॉंग्रेसपर्यंत निवडणुकी होऊन जाणार असल्यामुळें दिल्ली येथें जें घडून आलें तें कोकोनाडा येथें मोडून काढणें शक्य नव्हतें, तथापि आपला सनातनी असहकारितेचा झेंडा या वार्षिक अधिवेशनांत उभारण्यांत येईल, अशी सुत आशा असहकारवाद्यांना वाटत होती. मौलाना महंमदअली हे या परिषदेचे अध्यक्ष होते. 'खुद्द महात्मा गांधीदेखील कौन्सिल प्रवेशाला हरकत घेणार नाहींत असा दिव्य संदेश एक विहंगम माझ्या कानाशीं गुणगुणत आहे,' अशी कोटी मौलाना महंमदअली यांनीं या वेळीं केली होती. मौ. महंमदअली यांनीं केलेली कोटी निराधार नव्हती. तुरुंगांतल्या गांधींनीं मुक्त झालेल्या मौलानांना पाठविलेल्या संदेशावर ती आधारलेली होती असें म्हणतात. हा संदेश देवीदास गांधी यांनीं आणला होता. तो पुढीलप्रमाणें होता. "मी तुम्हाला संदेश पाठवूं शकत नाहीं कारण मी तुरुंगांत आहे. तुरुंगातून संदेश पाठविण्याच्या कल्पनेबद्दल मी नेहमींच नापसंति व्यक्त केली आहे. माझ्यावरील तुमच्या एकनिष्ठेनें माझ्या अंतःकरणावर खोलवर परिणाम केला आहे. देशाबद्दल तुम्हाला वाटणाऱ्या निष्ठेपेक्षा माझ्यावरील तुमच्या निष्ठेला तुमच्यावर वजन पाडण्यास अधिक वाव देऊं नका. माझीं मतें तर सर्वांनाच माहीत आहेत. जेलमध्यें येण्यापूर्वी मी तीं प्रदर्शित केलीं होतीं आणि तेव्हापासून त्यांत कांहींही फरक पडलेला नाहीं. माझीं मतें तुम्हाला पटत नाहींत असें तुम्हाला वाटलें तरी तुमच्या माझ्यामध्यें आज जें प्रेमाचें नातें आहे त्यांत यत्किंचितही [illegible] येणार नाहीं असें मी तुम्हाला आश्वासन देतो". या संदेशांत कौन्सिलप्रवेशाला अनुकूल असें काय आहे? पण कोणाकडून शांतता व्हावी असें मौ. महंमदअलींना वाटत होतें व खिलाफत परिषदेचे अध्यक्ष मौ. [illegible] यांनाही तसेंच वाटत होतें. "[illegible] रहो" एकीनें रहा. या त्यांच्या [illegible] संदेशाकडे कोणीही दुर्लक्ष करणें शक्य नव्हतें. असें असलें तरी [illegible] झाला. कांहीं थोडे नाफेरवादी पुढारी [illegible]. [illegible] राजेंद्रबाबू हजर [illegible]. [illegible] यांनीं [illegible] ठरावावर आपलें [illegible]

भाई पटेल अधिवेशनाला हजर होते. दिल्लीच्या तडजोडीला त्यांनीं संमति दिली होती. पण शामसुंदर चक्रवर्ती यांनीं ती त्यांच्या अंतःकरणांतून बाहेर ओढून काढली होती. श्यामसुंदर हे एक दुर्दैवानें पीडित असें बंगाली पुढारी होते. हद्दपारी, कारागृहवास, दारिद्र्य, दुःख इत्यादि अनेक आपत्तींनीं ते गांजले होते. कोकोनाडा येथें त्यांनीं कौन्सिल प्रवेशाला विरोध केला व त्यांनीं आपलें भाषण इतकें करुणरसपूर्ण केलें कीं, त्यांनीं आपल्या पुढील श्रोतृसमुदायाला धायधाय रडावयास लावलें. पण कौन्सिल बहिष्काराचे दिवस भरले होते. या अधिवेशनांत पुढील मुख्य ठराव मंजूर करण्यांत आलाः—

कलकत्ता, नागपूर, अहमदाबाद, गया व दिल्ली येथें पास झालेल्या असहकारितेच्या ठरावाला ही काँग्रेस पाठिंबा देत आहे. दिल्ली येथें झालेल्या कौंसिल प्रवेशाच्या ठरावामुळें काँग्रेसच्या धोरणाबद्दल शंका प्रदर्शित करण्यांत येत आहे, तरी या ठरावानें ही काँग्रेस कौंसिल बहिष्काराच्या बाबतींतील आपलें धोरण बदललेलें नाहीं असें जाहीर करीत आहे.

कौंसिल बहिष्काराच्या बाबतींतील तत्त्वामुळें व धोरणामुळेंच विधायक कार्यक्रमाचा पाया घातला असून बारडोली येथें मंजूर झालेला हा कार्यक्रम अंमलांत आणून कायदेभंगाची तयारी करण्याबद्दल विनंति करीत आहे. स्वराज्याचें ध्येय जलदीनें संपादन करण्याचे दृष्टीनें प्रांतिक काँग्रेस कमिटयांनीं या बाबतींतील तावडतोबीचे उपाय योजावे अशी ही काँग्रेस विनंति करीत आहे.

कोकोनाडा काँग्रेस ही सर्वांत भव्य अशी काँग्रेस झाली. रस्त्यांची आखणी, काँग्रेसच्या बैठकीकरितां तयार केलेला प्रशस्त, प्रचंड व भव्य तंबू–हा तंबू काँग्रेसच्या आतां कायमच्या मालकीच्या झाला आहे. अगदीं किरकोळ गोष्टींत देखील करण्यांत आलेली बारकाईची व्यवस्था, प्रतिनिधी, अध्यक्ष व पुढारी यांच्या राहण्याच्या उत्कृष्ट सोयी, या काँग्रेसच्या वेळीं करण्यांत आल्या होत्या. कौंसिलांतून व कौंसिलाबाहेरूनही असहकारितेची चळवळ परिणामकारक रीतीनें करतां येते असें भाष्य या काँग्रेसमध्येंच करण्यात आलें.

मि. कस्तुरीरंग अयंगार व बाबू अश्विनीकुमार दत्त यांच्या निधनाबद्दल दुःख प्रदर्शित करण्यांत येऊन विनायक दामोदर सावरकर यांच्या कारागृहांतील छळाबद्दल निषेध प्रदर्शित करण्यांत आला. दे. दास यांनीं तयार केलेला बंगाल करार राष्ट्रीय करारावरोबर प्रसिद्ध करण्यांत यावा असें ठरविण्यांत आलें. अखिल

भारतीय स्वयंसेवक दल निर्माण करण्याच्या चळवळीला या कॉंग्रेसमध्यें मान्यता देण्यांत आली व सिव्हिक गार्डस् स्थापन करण्याची चळवळ तींत सामील करण्यांत आली.

कॉंग्रेसचीं निरनिराळीं खातीं उघडून, त्या खात्यांतून कामें करण्याकरितां राष्ट्रीय सेवा मंडळ निर्माण करावयाचें व त्यांत पगारी कार्यकर्ते नेमावयाचे अशीही एक योजना आंखण्यांत आली.

दिल्ली येथें नेमलेली कायदेभंग–कमिटी व सत्याग्रह–कमिटी या दोन्ही कमिट्या वर्किंग कमिटीत सामील करण्यात आल्या. अखिल भारतीय खादी-मंडळ निर्माण करून खादीचें कार्य त्याच्याकडे सोंपविण्यात आलें. मजुरांनी हिंदुस्थान सोडून बाहेर देशीं जाऊं नये असा सल्ला देण्यांत आला. केनियाच्या प्रश्नाबावत अंतःकरणपूर्वक सहानुभूति व्यक्त करण्यांत आली, पण ही सहानुभूति दुर्बल होती. केनियाच्या हिंदी कॉंग्रेसला श्रीमती सरोजिनी नायडू व मि. जॉर्ज जोसेफ यांना प्रतिनिधी म्हणून पाठविण्यांत आलें. कॉंग्रेसच्या घटनेंत अनेक दुरुस्त्या सुचविण्यांत आल्या. अहिंसात्मक चळवळींतील आचरण-स्वातंत्र्याबावत सरकारनें दिलेलें आव्हान स्वीकारण्यांत आलें. शिरोमणी गुरुद्वार प्रबंधक कमिटीच्या अकाली दलाच्या चळवळीवर सरकारनें टीकास्त्र उपसलें होतें. कॉंग्रेसनें शिखांच्या या लढ्यांत त्यांना शक्य तितकें साहाय्य करण्याचा निश्चय केला. मनुष्यबल व द्रव्यबल शिखांना पुरविण्याच्या बाबतींतही मागेंपुढें पाहावयाचें नाहीं असें कॉंग्रेसनें ठरविलें.

थोडेसें विषयांतर करून ह्या शीख समाजातील सुधारणा–चळवळीचा जन्म कसा झाला, हें आतां सांगावयाचें आहे. अकालींची काळी पगडी "सत् श्री अकाल" हा जयघोष व लंगरखाना यांचें कॉंग्रेसशीं कायमचें नातें जोडल्यासारखें झालें आहे. इंग्लिशांनीं १८४९ मध्यें पंजाब खालसा केल्यानंतर अमृतसर येथील सुवर्णमंदिराचा कारभार या संक्रमणाच्या काळांत पोटाळ्याचा झाला होता बाटविलेल्या शीखांची एक कमिटी, ट्रस्टी म्हणून या देवळाच्या कारभारास नेमण्यात आली होती. या ट्रस्टीबरोबर सरकारनें नेमलेल्या 'सरबराह'–[illegible] त्यानें काम करावें असें ठरविण्यांत आलें. लाखों रुपयांचा व्यवहार या ट्रस्टींच्या मॅनेजरला करावा लागत असे. या कमिटीचा १८८१ त [illegible]. [illegible] नेहमीप्रमाणें हा मॅनेजरच आपला अधिकार [illegible] लागला. [illegible]

असल्यामुळें अर्थातच तो बेजावदार झाला. व त्या कारभारांत लांचलुचपतीला सुरवात झाली. लवकरच एका बाजूला मॅनेजर व मंदिरांतील पुजारी व दुसऱ्या बाजूला शीख समाज यांच्यांत वारंवार खटके उडूं लागले. अशा परिस्थितींत सरकारही गोंधळून गेलें. पुढें १९२० सालच्या अखेरीस एक कमिटी नेमण्यांत आली. व हींच कमिटी 'शिरोमणी गुरुद्वार प्रबंधक कमिटी' या नावानें प्रसिद्ध झाली. सरदार सुंदरसिंग मजीठिया हे या कमिटीचे पहिले अध्यक्ष झाले. व नंतर थोडया दिवसांनीं पजाब सरकारच्या एक्झिक्युटिव्ह कौन्सिलचे सभासद झाले. हे सुधारक, 'अकाली' या नांवानें प्रसिद्ध होते व त्यांनी बरीच इतिहास प्रसिद्ध गुरुद्वारें आपल्या ताब्यांत घेतलीं. तारातरण येथें अकाली व मदिराचे व्यवस्थापक यांच्यात कटकट उत्पन्न झाली व या दग्यांत बरेचसें लोक जखमी झाले व त्यांतील दोन मरणही पावले. नानकानासाहेब येथें झालेल्या ( १९२१ ) शोचनीय प्रकाराचें वर्णन मागें आम्ही केलेंच आहे. निरपराधी यात्रेकरूंचे खून तेथें पाडण्यांत आले होते. गुरुद्वाराची मालकी, त्यांची मालमत्ता व त्यांचे अधिकार काबीज करण्याचा या सुधारक लोकाचा हेतु आहे असें पोलिसला वाटलें. कांहीं महंतानीं अकाली लोकाशीं तडजोड करून हा तटा मिटविण्याचा प्रयत्न केला होता. पण वरील कल्पनेनें त्याचें डोकें भडकून गेलें. त्यानीं आपले करार मोडले व सरकारनेंही या सुधारक शीखाच्या विरुद्ध दडपशाहीचें शस्त्र उगारलें. १९२१ च्या मेमध्यें शेंकडों शीखाना तुरुगात टाकण्यात आलें व नापत झालेल्या महंतांच्या हातांत पुन्हां सर्व सत्ता देण्यात आली. शिरोमणी-गुरुद्वार-प्रबंधक कमिटीनें या सुधारणाबाबत सरकारशीं असहकारिता पुकारली.

सरकारनें योजलेलें गुरुद्वार-बिल मागें पडलें. नेमस्त व सरकारशीं सहकार्य करणारे शीखही या बिलाविरुद्ध होते. एका विशिष्ट प्रमाणापेक्षा जास्त लांब असलेलीं कृपाणें वापरण्याबद्दल शीखावर खटले भरण्यात आले. १० जुलै १९२१ रोजीं पंजाब प्रांतिक कॉंग्रेस कमिटीनें सरकारच्या या कृत्याचा तीव्र निषेध केला. सरकारनेंही या महिन्याअखेर शिक्षा झालेल्या शिखाना मुक्त केलें. सरकारनें कांहीं बाबतींत थोडेसें अनुकूल धोरण स्वीकारलें तरी सुधारक शीखां-वरील सरकारचा राग कमी झाला नव्हता. या सुधारकातील पुढारी बाबा भाई कर्तारसिंग व भूचरचे भाई राजासिंग याना अनुक्रमें १८ व ७ वर्षांची सक्त-मजुरीची शिक्षा देण्यांत आली. १८ ऑगस्ट १९२१ रोजीं पंजाब कायदेकौन्सिला-

न्तील शीख सभासदांना सरकारनें राजीनामा देण्यास भाग पाडलें. बॅरिस्टर सरदार बहाद्दुर सरदार मेहताबसिंग यांनीं सरकारच्या या कृत्याचा निषेध करण्याकरितां पंजाब कायदेमंडळांतील आपली लॉ मेंबरची जागा व डेप्युटी अध्यक्षाची जागा यांचा राजीनामा दिला. पण या लांब मुदतीच्या कैद्यांना व इतर बऱ्याच शीखांना १९२१ डिसेंबरच्या आरंभीं मुक्त करण्यांत आलें. पण पंजाब प्रांतिक कॉंग्रेस कमिटीचे जनरल सेक्रेटरी सरदार शार्दुल-सिंग–याना १२४ अ कलमाखालीं ५ वर्षें सक्तमजुरीची शिक्षा झाली होती–व इतर गुरुद्वार कार्यकर्ते यांना मुक्त करण्यांत आलें नाहीं. सुवर्ण-मंदिरांतील तोशाखानाच्या किल्ल्या सरकारनें ७ नोव्हेंबर १९२१ रोजीं एका-एकी आपल्या ताब्यांत घेतल्या. यामुळें श्री. गुरु नानकदेव यांच्या जयंतीच्या उत्सवाला अडथळा आला. सरकारनें मंदिराच्या व्यवस्थेकरिता एक हंगामी मॅनेजर नेमला; परंतु शिरोमणी–गुरुद्वार–प्रवंधक कमिटीनें त्याला या कामाचा चार्ज घेऊं दिला नाहीं. शेवटीं त्यानेंही आपल्या जागेचा राजीनामा दिला. तेव्हां-पासून तोशाखान्याच्या 'किल्ल्या' हाच झगड्याचा विषय होऊन बसला व सरकारच्या या धोरणाचा सार्वजनिक सभांतून सर्वत्र निषेध करण्यांत आला. परंतु सरकारनें सिडिशस्‌मीटिंग्ज्–ॲक्ट (सभाबंदीचा कायदा) २६ नोव्हेंबर १९२१ रोजीं लागू करून सरदार खरकसिंग व मेहताबसिंग यांना अशा सभा भरविण्याबद्दल शिक्षा देण्यांत आल्या. ५ जानेवारी १९२२ रोजी श्री. गुरु गोविंद-सिंग याच्या जयंतीचा उत्सव व्हावयाचा होता. सरकारनें या वेळीं तोशा-खानाच्या किल्ल्या शि. गु. प्र. कमिटीच्या स्वाधीन करण्याचें ठरविलें. परंतु कमिटीनें या किल्ल्या घेण्याचें नाकारलें. दोनशें शीख कार्यकर्त्यांना या जयंतीच्या उत्सवाच्या वेळीं अटक करण्यांत आली. पुढें सर्व शीख कैद्यांना बिनशर्त मुक्त करून ११ जानेवारी १९२२ रोजीं सरकारनें शि. गु. प्र. कमिटीला तोशा-खानाच्या किल्ल्या देऊन टाकल्या. पंडित दिनानाथ यांना तुरुंगांत मार [illegible] ठेवल्यामुळें पुन्हां तंटयास सुरवात झाली. शीखांनीं सभाबंदीचा कायदा मोड-ण्याची चळवळ सुरू केली. शि. गु. प्र. कमिटीच्या सभासदांना [illegible] करण्याची बंदी करण्यांत आली. पुढें पंडित दिनानाथ व [illegible] प्रकरणा-मुळें [illegible] पकडलेले बाबा गुरुदत्तसिंग यांनाही [illegible].

शि. गु. प्र. कमिटी [illegible]. [illegible]

कीय, सामाजिक, धार्मिक सुधारणा करूं पाहणारे लोक साहजिकच एकत्र येतात. सरकारही या बाबतींत भेदभाव करीत नाहीं. सरकार या सगळ्यांना एकाच पंक्तींत बसवितें. पंजाब प्रकरणानंतर सुवर्ण मंदिराच्या सरकारी मॅनेजरनें जनरल डायर यास प्रसाद दिला व त्याच्या गुन्ह्यावर सफेती चढविण्यासाठीं दरबारसाहेबांची धार्मिक इज्जत खर्ची घातली. लॉर्डांच्या सभेंत जनरल डायर संबंधीं भाषण करतांना लॉर्ड फिन्ले यांनीं वरील प्रसंगाचें उदाहरण देऊन जनरल डायरचें कृत्य, शीखांनाही सम्मत होतें व शीख गुरुनें त्याला शीख बनवून टाकलें असें सांगितलें. बजबजच्या गोळीबारांतील हुतात्मे शीख नव्हते असें सुवर्ण मंदिराच्या सरकारी मॅनेजरनें जाहीर केलें. महायुद्धाच्या वेळीं मंदिराच्या फंडांतून ५० हजार रुपये सरकारनें युद्धकर्ज म्हणून घेतलें.

अकाली लोक काळी पगडी वापरतात व शिस्तीनें वागतात तेव्हां अकाली लोकांची ही संघटना मोडून काढण्याकरितां सरकारनें दडपशाहीचे सर्व उपाय योजले. १९२२ मार्चच्या दुसऱ्या आठवड्यात पंजाबांतील तेरा निवडक जिल्ह्यातील व पतियाळा व कपूरथळा या शीख संस्थानांतील जवळ जवळ १७०० शें काळ्यां पगडीवाल्या शीखांना अटक करण्यांत आली. शी. गु. प्र. कमिटीचे व पंजाब प्रांतिक कॉंग्रेस कमिटीचे अध्यक्ष सरदार खरकसिंग यांना चार वर्षांची सक्त मजुरीची शिक्षा देण्यांत आली. कृपाणें म्हणजे तरवारी असून, त्या तयार करण्याकरितां लायसेन्स घेतले पाहिजे असें सरकार म्हणूं लागलें. कृपाण शीखांनीं अमुक एका विशिष्ट पद्धतीनेंच वापरलें पाहिजे असा सरकारनें हुकूम केला. लष्करांतील कांहीं शीखांना, त्यांनीं कृपाणें वापरलीं, येवढ्यावरूनच चारपासून अठरा वर्षापर्यंत सक्त मजुरीच्या शिक्षा देण्यात आल्या. बाबा गुरुदत्तसिंग यांना पुन्हां अटक करण्यात आली व १९२२ जुलैमध्ये त्यांना ५ वर्षांची हद्दपारीची शिक्षा देण्यांत आली. रौलेट ॲक्टविरोधी चळवळींत प्रसिद्ध पावलेले मास्टर मोटासिंग यांना ८ वर्षांची सक्त मजुरीची शिक्षा देण्यात आली. क्रिमिनल लॉ अमेंडमेंट ॲक्ट हा त्या वेळचा सर्व सत्ताधीश होता व जप्तीची कलमें ही त्याच्या हाताखालील सरदार होते. पंडित मदन मोहन मालवीय यांनीं पंजाबला भेट दिली व शीख जमावांवर चाललेल्या या रानटी जुलमांची चौकशी करण्याकरितां दिवाण बहादुर राजा नरेंद्रनाथ यांच्या अध्यक्षतेखालीं एक कमिटी नेमली. शीख धर्मांतील सुधारणेशीं या गुन्हेगार व बेशिस्त लोकांचा कांहीं संबंध

नाहीं, असें एक जाहीर पत्रक पंजाब सरकारनें प्रसिद्ध केलें. शीख जमातींतील कॉंग्रेसवाल्यांना उद्देशूनच हे शब्द योजण्यांत आले होते. १५ जून १९२२ पर्यंत १९०० ते २००० शीख कार्यकर्त्यांना पकडण्यांत आलें.

यानंतर गुरुद्वारप्रकरण उपस्थित झालें. त्यांची हकिकत मागें सांगितलीच आहे. गोळीबारास प्रत्यक्ष तोंड देणें हें, अहिंसावृत्तीनें लाठीमार सहन करण्यांपेक्षा जास्त सुलभ आहे असें जें महात्मा गांधींनीं म्हटलें होतें तें या वेळीं शीखांनीं प्रत्यक्ष प्रत्ययास आणून दिले. पंजाब सरकारच्या एका युरोपियन अधिकाऱ्यानें या प्रकरणाची चौकशी केली. "इतकी करुणाजनक दृश्यें मी कधींही पाहिलीं नाहींत." अहिंसेचा या प्रसंगीं संपूर्ण विजय झालेला प्रत्ययास आला. या लोकांनीं तत्त्वासाठीं खरोखरी आत्माहुति दिली." असें या युरोपियन गृहस्थानीं म्हटलें.

"या भागाला चोहोंकडून नाकेबंदी केली होती व कांटेरी कुंपणांतच्या आंतील भागात धान्याचा एक कणही जाऊं द्यावयाचा नाहीं, अशी व्यवस्था करण्यात आली होती. जे लोक अन्नसामुग्री घेऊन गेले त्याना बेदम मारण्यांत आलें. गुरुद्वारच्या दरवाजापाशीं माझी मोटार आल्याबरोबर तिची झडति घेण्यांत आली व तिला कुंपणाच्या छोट्या फाटकातून आत सोडण्यात आलें." असें पं. मोतिलाल नेहरूनीं या प्रसंगाबद्दल बोलताना सागितलें.

जखमी लोकांची शुश्रुषा करण्याकरितां एक स्त्री गेली असतां तीही जखमी झाली. एका इसमाच्या अंगावर घोड्याच्या टापा उमटलेल्या दिसल्या. दोन इसम मरण पावले. या बाबतींत काहीं लोकावर सरकारनें फिर्यादी केल्या पण या गुन्हेगारांना दोषमुक्त ठरवून सोडून देण्यात आलें. लूटमार, चोऱ्या इत्यादि आरोप पोलिसांवरही करण्यात आले. "लाठीचे खेळ" (Lathi exercises) ह्या पुस्तकाचे कर्ते पोलिस सुपरिंटेंडेंट मि. मॅक्फरसन ह्यानीं ह्या प्रकाराबाबत पुढील साक्ष दिली आहे.

"ह्या लाठीमारात हाडें मोडून काहीं लोक जखमी झाले असल्यास तें अगदीं शक्य आहे. अहिंसाव्रत पत्करल्यामुळें शीख जथ्यांनीं केव्हांही पोलिसला प्रतिकार केला नाहीं. जखमी झालेले कांहीं लोक बेशुद्ध झाले असल्यास तेंही शक्य आहे. जखमी झालेल्या ९५३ इसमापैकीं २६९ इसमांना कमरेखालच्या भागावर जखमा झाल्या होत्या. २०० लोकांना शरीराच्या पुढील

भागावर जखमा झाल्या होत्या. ६९ लोक मेंदूवर तडाखे बसून जखमी झाले. जननेंद्रियावर ६० जणांना जखमा झाल्या. ७ जणांना दातांवर जखमा झाल्या. १५८ लोकांना मुका मार बसला. ४० लोकांना मूत्रस्थानावर जखमा झाल्या. ९ लोकांचीं हाडें मोडलीं व २ इसमांचे खांदे खिळखिळे झाले".

ह्या बाबतीत २१० लोकांना पकडण्यांत आलें. एका ऑनररी मॅजिस्ट्रेटानें आपल्या ४ बैठकींत अनेक खटल्यांचा निकाल करून १ लाख २७ हजार रूपये दंड केला. स्वामी श्रद्धानंद याना १८ महिने सक्त मजुरीची शिक्षा देण्यांत आली. २२ आक्टोबर रोजीं १०१ लष्करी पेन्शनर व ५५ नॉनकमिशन्ड ऑफिसर ह्यांचा एक जथा अमृतसरहून गुरुकाबागकडे निघाला. या जथ्याच्या मागोमाग ५० हजार लोक चालले होते. शिक्षा झालेल्या लष्करी कैद्यांना घेऊन जाणारी गाडी पंजा साहेबाकडे चालली असतां कांहीं लोक अन्न सामुग्री घेऊन तिची वाट पहात उभे होते. परंतु ही गाडी स्टेशनवर थांबणार नाहीं म्हणून काहीं लोक रूळावर आडवे पडून राहिले. गाडी थांबली नाहींच ती तशीच निघून गेली. ह्या गाडीखालीं २ माणसें ठार झाली व ६ जखमी झाली. काहीं दिवसांनीं मारणें बंद करण्यात येऊन पकडापकडी सुरू झाली. पुढाऱ्यांना कडक शिक्षा देण्यांत आल्या. परंतु यांतील अनिष्ट प्रकार अद्यापि घडून यावयाचेच होते. लोकांचें दडपण पडल्यामुळें व पंजाब कौन्सिलनेंही ८ मार्च १९२३ रोजीं एक ठराव केल्यामुळें अकाली कैदी टोळ्याटोळ्यांनीं मुक्त करण्यांत आलें. १७० अकालींची एक टोळी रावळपिंडी येथें सोडण्यांत आली. पण ही टोळी ठरलेल्या रस्त्यानें न गेल्यामुळें त्यांचीं गर्दी मोडावी म्हणून त्यांना बेदम मारण्यांत आलें. यांतही कांहीं जखमी झाले. मिलिटरी पोलिसांनीं व स्वारांनींही ही गर्दी मोडण्याकरितां जोराचा हल्ला चढविला. १२८ लोकांना गंभीर स्वरूपाच्या जखमा झाल्या. ह्या लोकांच्याविषयीं सहानुभूति दाखविण्याकरिता रावळपिंडी येथें पूर्ण हरताळ पाळण्यांत आला. ह्या सर्व प्रकरणाची चौकशी करण्याकरितां एक कमिटी नेमावी असा ठराव पंजाब कौन्सिलपुढें आला. परंतु पंजाब सरकारच्या चीफ सेक्रेटरींनीं "झालें तें होऊन गेलें, गुरुकाबाग प्रकरणांतील दुःखद गोष्टींची आठवण जितकी लवकर नष्ट होईल तितकी चांगली. हंटर कमिटीप्रमाणें जुन्या जखमा पुन्हां ताज्या करण्यांत अर्थ नाहीं" असें सांगून सारवासारव केली. एखाद्या इसमाला लाथा मारून त्याला खालीं पाडावयाचें आणि त्याला ही गोष्ट शक्य

तितकी लौकर विसर्जन जा म्हणून सांगावयाचें ही मुत्सद्दीगिरी नव्हे किंवा खेळाडूवृत्तिही नव्हे. परंतु पंजाब कायदे कौन्सिलांतील बहुसंख्याक सभासद चीफ सेक्रेटरीच्या वरील बोलण्यानें समाधान पावले व त्यांनीं मि. के. रलिया-राम ह्यांच्या कमिटी नेमण्याचा ठरावाची चर्चा पुढें चालू ठेवण्याचा आग्रह केला नाही. अकालीवरील सकटें अद्यापी संपली नव्हतीं. नाभाचे महाराज १९२३ च्या पहिल्या सहामाहींत पदच्युत झाले. शी. गु. प्र. कमिटीनें नाभाच्या महाराजांची ही पदच्युति म्हणजे त्याना राज्यावरून काढून टाकण्यासारखेंच आहे, असें ठरवून त्याना पुन्हा गादीवर बसविण्याकरिता चळवळ सुरू केली. नाभा सस्थानातील जैतो गांवीं ह्या सबधात सभा भरविण्यात आल्या. ह्या सभेंतील वक्त्यानीं राजद्रोहात्मक भाषणें केली, आणि हे वक्ते आपलीं भाषणें संपवून " अखड पाठ " पठण करीत असताना त्याना पकडण्यात आलें.

ह्याप्रमाणें जैतो गांवीं अखंड पाठ पठणाची चळवळ सुरूं झाली. २५-२५ चें जथे रोजच्यारोज हा पाठ करण्याकरितां जाऊं लागले. फेब्रुवारीमध्यें शहीदी जथा नांवाचा ५०० शीखांचा जथा जैतोला गेला. डॉ. किश्चलू व आचार्य गिडवानी हे या जथ्यावरोवर प्रेक्षक म्हणून गेले होते. हा जथा जैतोजवळ गेल्यावर त्यांच्यावर गोळीबार करण्यात आला आणि काहीं लोकही त्याला बळी पडले. डॉ. किश्चलू व आचार्य गिडवानी ह्या दोघानाही अटक करण्यांत आली. जखमी लोकांना मदत करण्याचें काम हे पुढारी करीत असतांना त्यांना पकडण्यांत आलें. ह्यापैकीं डॉ. किश्चलू ह्यांना ह्यानंतर लौकरच सोडण्यांत आलें. आणि दुसऱ्या गृहस्थांना मात्र नाभाच्या तुरुंगांत वर्ष अखेरपर्यंत राहावें लागलें. शहीदी जथ्यानें आपली चाल पूर्ववत चालूं ठेवली. हजारों लोकाना जेलमध्यें कोंबण्यात येऊन त्यांचा अनेक प्रकारें छळ करण्यात आला. आचार्य गिडवानीं तुरुगांत गेल्यामुळें अकाली साहाय्यक मंडळावरील त्यांची जागा मि. के. एम्. पाणीकर ह्यांना देण्यांत आली. अकाली कैद्याच्या छळासंबंधानें चौकशी करण्याकरितां कॉंग्रेसच्या वर्किंग कमिटीनें एक पोट कमिटी रवाना केली व अकाली कैद्यांच्या कुटुंबांना वर्किंग कमिटीनें बरीचशी आर्थिक मदतही केली. गुरुद्वाराच्या नियंत्रणाचा कायदा पास झाल्याबरोबर ह्या सगळ्या प्रश्नाचा निर्णय लागला.

---

## प्रकरण पांचवें

# काँग्रेस आडमार्गावर १९२४

१९२४ सालचें वातावरण औदासिन्यानें व्यापून गेलें होतें. गांधीजी जेल-मध्यें एकाएकीं आजारी झाल्यामुळें सर्वच लोकांचीं मनें चिंताग्रस्त झालीं होतीं. महात्माजींचा आजार, त्यांच्यावर करण्यांत आलेलें ऑपरेशन, ४ वर्षांची शिक्षा संपण्यापूर्वीच झालेली त्यांची मुक्तता, स्वराज्य पार्टीचा कायदेमंडळांतील विजय, अकालीवरील संकट, अर्नेस्ट डेचा कलकत्त्यांतील भररस्त्यावर खून, गोपिनाथ शहा ह्याच्याबाबत दिनाजपूर येथील परिषदेनें केलेला ठराव, जुहू येथील निष्फळ चर्चा, ऑल इंडिया काँग्रेस कमिटीची अहमदाबाद येथील सभा, बंगालमधील दडपशाही, सुभाषचंद्र बोस व इतर प्रमुख कॉंग्रेस पुढारी यांना अटक, जातीय तंटे, गांधींचा २१ दिवसांचा उपवास, दिल्ली येथील ऐक्य परिषद, सी. आर. दास यांना अटक होण्याची भीति, मुंबई येथील सर्वपक्षीय परिषद, अलीबंधूंची वृद्ध मातोश्री बी आम्मा यांचा मृत्यु, गांधींच्या अध्यक्षतेखालीं झालेली बेळगांव-ची काँग्रेस, विधायक कार्यक्रम व कौन्सिलप्रवेश व त्याच काँग्रेसच्या चळवळीं-तील दोन विभाग वगैरे अनेक महत्त्वाच्या गोष्टी या सालीं घडून आल्या.

१२ जानेवारी १९२४ रोजीं गांधी ॲपेंडिसायटिसनें एकाएकीं आजारी पडले. कर्नल मॅडॉक यानीं मध्यान्ह रात्रीं त्यांच्यावर ऑपरेशन केलें. गांधींच्या प्रकृतीबद्दल सर्व देश चिंतातूर झाला होता. परंतु लौकरच गांधींच्या प्रकृतीस आराम पडला व त्यांना ५ फेब्रुवारी रोजीं विनशर्त मुक्त करण्यांत आलें.

गांधीजी मुक्त झाले, पण त्यांना विश्रांति मिळाली नाहीं. कोकोनाडा येथें काँग्रेसमध्यें पडलेली फूट अधिकाधिकच वाढत चालली होती. गांधीजी परत आल्यामुळें काँग्रेसचें एंजिनही पुन्हां परत कायदेभंगाच्या रूळावर जाईल, अशी नाफेरवाद्यांना आशा वाटत होती. दिल्ली व कोकोनाडा येथें मिळविलेले विजय पुन्हां दृढ करावे याकरितां आपलें बल संघटित करण्याचा प्रयत्न फेरवादी करीत होते. गांधीजी जुहू येथें असतां पं. नेहरू व दास याच्याशीं दोन्ही पक्षांत ऐक्यासंबंधानें चर्चा झाली. १९२४ च्या मे मध्यें गांधीजींनीं जुहू येथें झालेल्या चर्चेसंबंधानें एक पत्रक प्रसिद्ध केलें व त्यानंतर दे. दास व पं. नेहरू यांनींही

एक पत्रक प्रसिद्ध करून जुहू येथें झालेल्या चर्चेसंबंधीं आपले विचार प्रगट केले. हीं दोन्हीं ऐतिहासिक महत्त्वाचीं पत्रकें आम्ही पुढें जशीच्यातशी देणार आहों, पण त्यापूर्वी कायदेमंडळांवर स्वराजिस्टांनीं जें वर्चस्व गाजविलें त्याची थोडी हकीगत आम्ही प्रथम देणार आहों.

स्वराज्य पार्टीनें संघटित होऊन देशांतील निरनिराळ्या कायदेकौन्सिलांच्या निवडणुकी लढविल्या व असेंब्लींत तर ४५ स्वराजिस्टांचा एक संघटित शिस्तीचा पक्ष निवडून आला. नॅशनॅलिस्ट पार्टीची सहानुभूति व पाठिंबा यांच्या जोरावर असेंब्लींत त्यांना आपलें बहुमत करणें शक्य होतें. नॅशनॅलिस्ट पक्षानें असहकारितेचा संप्रदाय मान्य केला नव्हता. तरी या पक्षाचे सर्व सभासद राष्ट्राभिमानाच्या दृष्टीनें स्वराज्य पार्टीच्या सभासदांहून कोणत्याही प्रकारें कमी नव्हते. असेंब्लींतील या बळाच्या जोरावर स्वराज्य पक्षानें एकामागून एक असे अनेक विजय संपादन केले. हिंदुस्थानची पूर्ण जबाबदारीच्या स्वराज्याच्या योजनेची शिफारस करण्याकरितां गोलमेज परिषद बोलवावी, ही पं. मोतीलाल नेहरू याची उपसूचना हा स्वराज्य पक्षाच्या विजयापैकीं पहिला विजय होय. हिंदुस्थानच्या राज्यघटनेंत तावडतोबीचे फरक घडवून आणावे या मि. जे. रंगाचारी यांनीं आणलेल्या ठरावावर पं. मोतिलालजींनीं वरील उपसूचना आणली होती. गव्हर्नमेंट ऑफ इंडिया ॲक्टांतील प्रास्ताविक भागावर त्यांनीं सडकून टीका केली. कौन्सिलें मोडणारे म्हणून आमच्या पार्टीकडे दुर्लक्ष करून भागणार नाहीं. जबाबदारीच्या स्वराज्याचें आयतें बांधलेलें बोचकें आमच्या हवालीं करावें, असें आमचें म्हणणें नाहीं. आमचें सहकार्य स्वीकारण्यास सरकार तयार असेल तर आम्हींही सरकारशीं सहकार्य करण्यास तयार आहों. सरकार जर हें सहकार्य स्वीकारील तर स्वराज्य पक्षाचे लोक हे त्याचेच लोक आहेत, असें सरकारला आढळून येईल. जर सरकार असें करणार नाहीं तर आम्ही आमच्या हक्काकरिता झगडत राहूं व आमचें असहकारितेचें धोरण तसेंच पुढें चालविल्याशिवाय राहणार नाहीं.

"वसाहतींच्या स्वराज्याची मागणी अगदीं नवी आहे. गव्हर्नमेंट ऑफ इंडिया ॲक्टमध्यें ज्या विशेष तरतुदी केल्या आहेत त्यांच्यांशीं ही मागणी विसंगत आहे. प्रगतीपर सुधारणा हाच स्वराज्याचा मार्ग आहे," असें सर माल्कम हेले यांनीं या प्रसंगीं उत्तर दिलें. कांहीं राजकीय कैद्यांना बंधमुक्त

करावें, १८१८ चा तिसरा रेग्युलेशन रद्द करावा, हिंदुस्थानांत आयात होणाऱ्या दक्षिण आफ्रिकेच्या कोळशावर जकात बसवावी व शिखांच्या परिस्थितीचा विचार करण्याकरितां चौकशी कमिटी नेमावी, हे ठराव मंजूर होऊन असेंब्लीत सरकारचे जे अनेक पराभव झाले त्यांपैकीं, वरील ठरावांची प्रमुखत्वानें गणना करण्यास हरकत नाहीं. सरकारचा पराजय म्हणजे खरोखरी स्वराज्य पक्षाचा विजयच होय. आणि असेंब्लीतील स्वतंत्र पक्ष, राष्ट्रीयपक्ष व कधीं कधीं नेमस्तही यांच्या साहाय्यानें स्वराज्यपक्षानें हे विजय संपादन केले होते. बजेटांतील पहिल्या चार मुख्य सदरांतील मागण्या फेटाळून लावण्यात आल्या, हा स्वराज्यपक्षाचा दुसरा मोठा विजय होय. वरील मागण्या नाकारणें म्हणजे सरकारी खात्याच्या खर्चाला लागणारे पैसे नामंजूर करण्यासारखेंच आहे. "या ठरावाचा असहकारितेच्या विघातक धोरणाशीं कांहीं संबंध नाहीं. राष्ट्राच्या गाऱ्हाण्यांकडे सरकारचें लक्ष वेधण्याचा हा पूर्ण सनदशीर मार्ग आहे" असें पं. मोतिलाल यांनीं या ठरावावर भाषण करतांना सांगितलें.

जुहूच्या चर्चेनंतर म. गांधी व दास, नेहरू यांनीं पत्रकें प्रसिद्ध केलीं. १९२४ च्या उन्हाळ्यांत देशाच्या राजकारणांत कोणत्या घडामोडी झाल्या याची कल्पना देण्यासाठीं हीं पत्रकें पुढें दिलीं आहेत.

## महात्मा गांधींचें पत्रक

### मूलभूत मतभेदः—

असेंब्ली व कायदेमंडळें यांत प्रवेश करण्यासंबंधानें स्वराज्य पक्षांतील मित्रांशीं झालेल्या चर्चेत त्यांच्या मताशीं माझीं मतें जुळलीं नाहींत हें सांगण्यास मला वाईट वाटतें. स्वराज्यपक्षीयांची विचारसरणी मान्य करण्याची माझी इच्छा नव्हती असें नाहीं, किंवा मी तसा प्रयत्न केला नाही, असेंही नाहीं. जनतेला हें मी आश्वासनपूर्वक सांगतों कीं, या विचारसरणीशीं मी एकरूप झालों असतों तर माझें काम फार सुलभ झालें असतें. देशांतील अत्यंत वजनदार व आदरणीय पुढाऱ्यांना विरोध करण्याची कल्पना मनांत येणें देखील बरें नाहीं, हें मी जाणतों. देशकार्याकरितां या पुढाऱ्यांनीं अत्यंत स्वार्थत्याग केला आहे. मातृभूमीच्या स्वातंत्र्यप्रेमाच्या बाबतींत ते कोणालाही हार जावयाचे नाहींत. परंतु माझी इच्छा व प्रयत्न असतांही त्यांच्या विचारसरणीबद्दल माझी खात्री पटली नाहीं. त्यांच्या माझ्यांत जो मतभेद आहे तो केवळ तपशीलासंबंधाचाच आहे

असेंही नाहीं. असहकारितेची माझी जी कल्पना आहे त्या दृष्टीनें कौन्सिल-प्रवेश असहकारितेशीं विसंगत आहे हें माझें मन कायम आहे. असहकारिता या शब्दावरील भाष्याच्या बाबतींत त्याचा व माझा मतभेद आहे असेंही नाहीं. मुख्य मुख्य प्रश्नाकडे कोणत्या मानसिक वृत्तीनें पाहावयाचें हाच काय तो मुख्यतः मतभेदाचा प्रश्न आहे. त्रिधारी बहिष्काराचें यश किंवा अपयश या मानसिक वृत्तीवरच अवलंबून आहे, याचा निर्णय प्रत्यक्ष परिणामावर अवलंबून नाहीं. हें माझें मत मी स्वराज्यपक्षीय मित्राना पटवून देऊं शकलों नाहीं. परंतु कौन्सिलें हींच त्यांचीं निःसशय कार्यक्षेत्रें आहेत, ही गोष्ट मला मान्य आहे. या चर्चेच्या वेळीं जे मुद्दे मी पुढें मांडले त्याच्या योगानें स्वराज्यपक्षीयाची खात्री होईल अशी अपेक्षाही कोणी केली नव्हती. पुष्कळ अनुभवी, कर्तृत्ववान, व प्रामाणिक देशभक्त या मंडळींत आहेत. पूर्ण विचार केल्याशिवाय ही मंडळी कायदेमंडळात प्रवेश करून काम करूं लागली आहेत असें म्हणता यावयाचें नाही. पुन्हां अनुभवानेंच या मार्गाची निष्फळता कळून आल्याशिवाय ते आपलें धोरण परत घेतील अशी अपेक्षा करण्यांत अर्थ नाहीं.

स्वराज्यपक्षीयांचे विचार व माझे विचार यांचें परीक्षण करून त्याचे गुणावगुण ठरविणें हा देशापुढें आज प्रश्न नाहीं. कौंसिलप्रवेश ही निश्चित गोष्ट आहे, असे समजून पुढें काय करावयाचें हा आज राष्ट्रापुढे प्रश्न आहे. असहकारितावाद्यानीं स्वराज्यपक्षीयांविरुद्ध झगडा चालवीत राहावयाचें, कां आपल्या तत्त्वांना विसगत न होईल अशा रीतीनें त्याना मदत करावयाची याचा विचार त्यांनीं केला पाहिजे.

## स्वराज्यपक्षीयांविरुद्ध प्रचार नाहीं

कौन्सिलप्रवेशाच्या बाबतींत ज्यांना विवेकबुद्धीची काचणी वाटत नाहीं त्यांनीं वाटल्यास असेंब्लींत व कायदेकौन्सिलात जावें अशी परवानगी दिल्ली व कोकोनाडा ठरावांनीं दिली आहे म्हणून स्वराज्यपक्षीयानीं कौन्सिलप्रवेश केला व नाफेरवाद्यांनीं या बाबतींत पूर्ण तटस्थ धोरण स्वीकारावें अशी त्यानीं अपेक्षा केली तर तें माझ्यामतें पूर्ण समर्थनीय आहे. तसेंच कौन्सिलात शिरल्यावर त्यांनीं अडवणुकीचें धोरण स्वीकारलें. त्याचें हें धोरण ठरलें होतें—तर तें त्याचें कृत्यही समर्थनीयच ठरेल. कारण काँग्रेसनें कौंसिलप्रवेशाच्या बाबतींत कोणत्याही अटी घातल्या नव्हत्या. स्वराज्यपक्षीयाना त्याच्या कार्यांत यश आलें व देशाचा

फायदा झाला तर माझ्यासारख्या प्रामाणिक शंकेखोरांना आपल्या पुढील धोरणाबद्दल खात्री झाल्यावांचून राहणार नाहीं. आणि स्वराज्यपक्षाचे लोक अनुभवानें त्यांचा मोह दूर झाल्यास आपलें पाऊल मागें घेण्याइतके देशाभिमानी आहेत, असें मला वाटतें. ज्या कामावर माझा विश्वास नाहीं, त्या बाबतींत मी स्वराज्यपक्षीयांना प्रत्यक्ष मदत करूं शकलो नाहीं तरी त्यांच्या मार्गांत अडथळा आणूं इच्छीत नाहीं, किंवा त्यांच्या विरुद्ध मी प्रचारही करु इच्छीत नाहीं. स्वराज्यपक्षीयांना कौन्सिलप्रवेशाचा प्रयोग करून पाहाण्याची संधी द्यावी हाच दिल्ली व कोकोनाडा येथील ठरावांचा उद्देश होता. आणि हा हेतु सफल व्हावयाचा असल्यास स्वराज्यपक्षीयांच्या मार्गांत कोणताही अडथळा आणावयाचा नाहीं व त्याचा कार्यक्रम पार पाडण्यास त्यांना पूर्ण स्वातंत्र्य द्यावयाचें असें नाफेरवाद्यांनीं शुद्ध प्रामाणिक बुद्धीनें ठरविलें पाहिजे.

## कौन्सिलांतील धोरण

कौन्सिलांतील कामाच्या पद्धती संबंधानें बोलावयाचें झाल्यास या कौन्सिलांचा काहीं फायदा करून घेतां येत असेल तरच मी त्यांत शिरेन. म्हणून कौन्सिलांत जर मी प्रवेश करीन तर अडवणुकीचें सर्वसामान्य धोरण न ठेवतां कॉंग्रेसच्या विधायक कार्यक्रमाला बळकटी आणण्याच्या कामीं मी त्यांचा उपयोग करीन व वरिष्ठ व प्रांतिक का. कौन्सिलांतून पुढील ठराव मांडण्याचा प्रयत्न करीन.

( १ ) त्यांच्यातर्फे जी कापडाची खरेदी करावयाची असेल ती सर्व हातसुताची व हातविणीची खादी असेल अशी खबरदारी घ्यावी.

( २ ) परदेशी कापडावर प्रतिबंधक कर लादावा.

( ३ ) मद्य व मादक पदार्थांवरील कर रद्द करावा व त्याच प्रमाणात लष्करी खर्च कमी करावा.

कायदेमंडळांत मंजूर झालेले ठराव अमलांत आणण्याचें सरकार नाकारील तर हीं कौन्सिलें रद्द करावीं असें त्यांना मी सांगेन व विशिष्ट मुद्यावर मतदारांचें मत मी घेईन. सरकार जर हीं कौन्सिलें रद्द करणार नाहीं तर मी माझ्या जागेचा राजीनामा देईन व कायदेभंगाकरितां देशाची तयारी करीन. जेव्हां ही परिस्थिति निर्माण होईल त्या वेळीं स्वराज्यपक्षीयांबरोबर किंवा त्याच्या देखरेखीखालींही मी काम करण्यास तयार होईन. कायदेभंगाच्या लायकीच्या कसोटी संबंधानें माझें पूर्वीचेंच मत कायम आहे.

## नाफेरवाद्यांना सल्ला

अनुभवाच्या या मध्यंतरींच्या कालांत स्वराज्यपक्षीय काय म्हणतात किंवा काय करतात याकडे नाफेरवाद्यांनीं लक्ष देऊं नये व एकनिष्ठेनें व उत्साहानें विधायक कार्यक्रम अमलांत आणून त्यावरील आपला विश्वास सिद्ध करून दाखवावा. शांत, प्रामाणिक व विनदेखाव्याच्या कामावर विश्वास असलेल्या प्रत्येक कार्यकर्त्याला खादीप्रसार व राष्ट्रीय शाळा हें पुरेसें काम आहे. हिंदु-मुसलमान प्रश्नाच्या बाबतींतही कार्यकर्त्यांचा उत्साह व विश्वास कसोटीला लागेल. विधायक कार्यक्रमातील कार्य करून दाखवून नाफेरवाद्यांनीं आपला कौन्सिलप्रवेशविरोध समर्थनीय ठरवावा. त्याचप्रमाणें फेरवाद्यानींही परिणामा-वरूनच आपलें कौंसिलप्रवेशाचें धोरण समर्थनीय ठराविलें पाहिजे. नाफेरवाद्याची स्थिति एका दृष्टीनें सोयीस्कर आहे. कारण फेरवाद्याचें सहकार्य त्याना मिळूं शकेल. स्वराज्यपक्षीयांनींही विधायक कार्यक्रमावरील आपला विश्वास प्रकट केला आहे. केवळ विधायक कार्यक्रमच राष्ट्राला ध्येय संपादनक्षम करूं शकणार नाहीं, अशी त्यांची तक्रार आहे. विधायक कार्यक्रमाच्या बाबतींत नाफेरवादी, फेरवादी व इतर पक्षांचे लोकही आपआपल्या संस्थातर्फे त्यांची इच्छा असेल तर एकजुटीनें काम करूं शकतील.

## स्वराज्यपक्षीयांचें पत्रक

श्री चित्तरजनदास व पं. मोतिलाल नेहरू यांनीं पुढील पत्रक प्रसिद्ध केलें.--

कौन्सिलप्रवेशावरील अनेक मुद्द्यासंबंधानें आमच्याशीं चर्चा करण्याची म. गांधींनीं तसदी घेतली याबद्दल आम्ही त्याचे आभारी आहों, व वर्तमानपत्रा-करिता तयार केलेल्या पत्रकाची आगाऊ प्रत पाहाण्याचीही त्यांनीं आम्हांला संधी दिली या बद्दल आम्ही त्यांचे ऋणी आहों. प्रत्यक्ष चर्चेच्या वेळीं व पत्रकांत प्रदर्शित केलेल्या मुद्द्यांचा आम्ही काळजीनें व लक्षपूर्वक विचार केला पण त्यांची विचारसरणी आम्हांला पटली नाहीं.

## कौंसिलप्रवेश व असहकारिता

कौन्सिलप्रवेशाबाबत स्वराज्यपक्षीयांच्या धोरणाची समर्पकता म. गांधींना आम्ही पटवूं शकलों नाहीं याबद्दल आम्हांला दिलगिरी वाटते. नागपूर काँग्रेस-च्या असहकारितेच्या ठरावाला कौन्सिलप्रवेशाचें धोरण कसें विसंगत आहे, हें आम्हाला समजत नाहीं. असहकारिता हा अधिकाशानें मनोवृत्तीचा विषय असेल

व नोकरशाहीच्या अनेकविध धोरणामुळें घडून येणाऱ्या राष्ट्रीय जीवनांतील घडामोडींना लागू पडणाऱ्या जिवंत तत्त्वाशी तिचा कांहीं संबंध नसेल तर राष्ट्राचें खरें हित साधण्याकरिता असहकारितेचाही यज्ञ करणें हें आमचें कर्तव्य आहे असें आम्ही समजतों. आमच्या मतें राष्ट्राची वाढ होण्याच्या व स्वराज्याच्या प्रगतीला आड येणाऱ्या नोकरशाहीचा प्रतिकार करण्याच्या कामीं लागणाऱ्या स्वावलंबनाचा वरील तत्त्वांत समावेश होतो. असहकारितेच्या तत्त्वासंबंधानें आमची जी समजूत आहे त्या दृष्टीनें कौन्सिलप्रवेश असहकारितेशीं मुळीच विसंगत नाहीं हे स्पष्ट करून ही निष्फळ चर्चा बंद करावी अशी आमची इच्छा आहे.

## अडवणुकीचें धोरण

इंग्लिश पार्लमेंटच्या इतिहासांत 'अडवणूक' हा शब्द ज्या विशिष्ट अर्थानें वापरला जातो त्या अर्थानें आमच्या कार्यक्रमात हा शब्द वापरलेला नाहीं, हें स्पष्ट करून सागण्याची आमची इच्छा आहे ताबेदार व मर्यादित अधिकार असलेल्या व सुधारणा कायद्याप्रमाणें अस्तित्वात येणाऱ्या कायदेमंडळातून त्या अर्थानें अडवणूक करणें अशक्य आहे. आमचा अर्थ प्रतिपादित होईल असा दुसरा शब्द आम्हांला शोधून काढावा लागेल आमची परिस्थिति पार्लमेंटरी अर्थानें अडवणूक करण्यासारखी नसून स्वराज्याच्या मार्गात अडथळा उत्पन्न करणाऱ्या नोकरशाहीच्या धोरणाचा प्रतिबंध करणें, हा आमच्या अडवणुकीचा अर्थ आहे. स्वराज्य पक्षाच्या घटनेच्या प्रास्ताविक भागात अडवणूक या शब्दाची व्याख्या आम्हीं अशीच केली आहे, व असहकारितेसंबधानेंही आम्ही हेंच विचार प्रकट केले आहेत. नोकरशाहीच्या या अडथळ्याला दूर करणें ह्याच गोष्टींवर आम्हाला भर द्यावयाचा आहे कायदेमंडळांत याच धोरणाचा आम्ही आतांपर्यंत अवलंब केला आहे आणि पुढेंही राष्ट्रीय जीवनांतील अनेक प्रश्न सोडविण्याच्या कामींही याच धोरणाचा परिणामकारक रीतीनें अमल करण्याचें आम्ही ठरविलें आहे.

ह्या आमच्या धोरणाला सततचें अडवणुकीचें धोरण असें म्हणतां येईल काय, यासंबंधानेंही चाललेली शाब्दिक चर्चा आम्हाला बंद करावयाची आहे. आमचें धोरण आम्ही विस्तृत रीतानें मांडीत आहों. तेवढ्यावरच आमचें समाधान आहे. व आमच्या मित्रानीं वाटेल तर त्याच्याकरता योग्य तें नांव शोधून काढावें.

## १ आमचा भावी कार्यक्रम

ह्या तत्वाच्या व धोरणाच्या अनुषगानें कायदेमंडळाच्या आंतील व बाहेरील आमचा भावी कार्यक्रम आम्ही मांडणार आहों. कायदेमंडळांतील कामांत आमचें पुढील धोरण राहील. आमच्या हक्काला मान्यता मिळेल ह्या दृष्टीनें सरकारच्या राज्यपद्धतींत फरक होईपर्यंत व हिंदी राष्ट्र व पार्लमेंट ह्यांच्यांत तडजोड होईपर्यंत आम्ही अंदाजपत्रकें फेंटाळून लावूं. या आमच्या धोरणाच्या समर्थनार्थ वरील प्रकारच्या अंदाजपत्रकातील कांहीं विशेष गोष्टींकडे आम्ही लोकांचें लक्ष वेधीत आहों. प्रांतिक बजेटाच्या बाबतींतही कमी अधिक प्रमाणात याच गोष्टी खऱ्या आहेत. रेल्वेखेरीजकरून १३१ कोटींच्या महसुलापैकीं फक्त १६ कोटींच्या बाबतींतच आम्हाला मतें देण्याचा अधिकार आहे. ज्याच्या बाबतींत मतें देतां येत नाहींत असें ६७ कोटी रुपये म्हणजे महसुलापैकीं निम्यावर अधिक रक्कम लष्कराच्या पायीं खर्ची पडते. ह्यावरून हें स्पष्ट आहे कीं, महसुलापैकीं शें. १०७ एवढ्या रकमेसंबंधानेंच आम्हाला मतें देतां येतात. आणि हा मर्यादित हक्कसुद्धां गव्हर्नर जनरलला फेंटाळून लावता येतो. यावरून एक गोष्ट स्पष्ट आहे कीं, लोकाना अंदाजपत्रक तयार करण्याच्या कामीं मत नाही व जे लोक हें अंदाजपत्रक तयार करतात त्याच्यावर लोकाचे नियंत्रण नाहीं. याप्रमाणें महसूल वाढविण्याच्या बाबतीत किंवा त्याचा खर्च करण्याच्या बाबतींतही लोकाना अधिकार नाहीं. मग कोणत्या तत्वावर आम्हीं असलें अंदाजपत्रक मंजूर करण्याची व या मंजुरीच्या बाबतींत भागिदारी होण्याची जबाबदारी घ्यावी ? जोंपर्यंत ही दुष्ट पद्धती नष्ट झालेली नाहीं, तोंपर्यंत सगळ्या कायदेमंडळातून असलीं अदाजपत्रके फेंटाळून लावणें हेंच आमचें कर्तव्य आहे. देशातील पुष्कळ स्वाभिमानी लोक आमच्या ह्या धोरणाला पाठिंबा देतील, ह्याबद्दल आम्हाला शंका वाटत नाहीं.

## २ सरकारी ठराव फेंटाळून लावणें

आपली सत्ता दृढतर करण्यासाठीं सरकार जीं कायद्याचीं बिलें कौन्सिलापुढें मांडील तीं आम्हीं फेंटाळून लावूं. यांपैकीं कांहीं कायदे सहजगत्या लोकहिताचें असण्याचा संभव आहे. परंतु, देशाच्या हिताचा विचार करतां पूर्वींच अनिरुद्ध अधिकार हातीं असलेल्या नोकरशाहीच्या सत्तेंत भर पडेल असल्या लहान सहान तात्पुरत्या फायद्यांवर आपण पाणी सोडलें पाहिजे.

## ३ विधायक कार्यक्रम

नोकरशाहीची सत्ता नष्ट होईल व आमच्या राष्ट्रीय जीवनाची वाढ होईल असले कायदे व बिलें आम्ही कौन्सिलपुढें मांडूं. महात्मा गांधींनीं ज्या सूचना केल्या आहेत, त्यांचा आम्हीं अंतःकरणपूर्वक स्वीकार करतों, व विधायक कार्यक्रमाला साहाय्यक अशा ज्या कॉंग्रेसच्या ठरावांचा महात्माजींनीं निर्देश केला आहे ते सर्व ठराव स्वराज्य पक्षाला निःसंशय मान्य आहेत. नोकर-शाहीच्या अडथळ्याला स्वावलंबनपूर्वक प्रतिकार करणें ह्या धोरणानेंच आम्हीं आतांपर्यंतचें वर्तन ठेवलें आहे. लोकांनींही त्याला मंजूरी द्यावी, असें आमचें त्यांना सांगणें आहे. विधायक कार्यक्रम हा असहकारतेच्या कक्षेंत येतो, तर कायदेमंडळांतील विधायक हालचालींसंबंधानें करण्यांत आलेले हे ठराव देखील असहकारितेच्या कक्षेंत येण्यास हरकत नसावी.

पिळणुकीला कारणीभूत होणाऱ्या सर्व हालचालींना प्रतिबंध करणें व देशांतील राष्ट्रीय संपत्ती बाहेर जाऊं न देणें ह्याच तत्त्वावर आम्हीं आमचें आर्थिक धोरण निश्चित करूं.

हें धोरण परिणामकारक करण्यासाठीं वरिष्ठ व प्रांतिक कायदेमंडळांतील सभासदांना जी प्रत्येक अधिकाराची जागा स्वीकारतां येईल ती आम्ही स्वीकारूं. आमच्या मतें सर्व लोकनियुक्त अधिकाराच्या जागा भरून काढण्याचा आम्ही प्रयत्न करूं. आणि त्याचप्रमाणें प्रत्येक कमिटीवर काम करूं. लोकांनीं शक्य तितक्या लवकर या प्रश्नाचा निर्णय द्यावा, अशी आमची विनान्ति आहे.

## कौन्सिलाबाहेरील धोरण

कायदेमंडळाच्या बाहेर आमचें धोरण पुढील प्रमाणें राहील. महात्मा गांधीं-च्या विधायक कार्यक्रमास आम्ही अंतःकरणपूर्वक पाठिंबा देऊं आणि कॉंग्रे-सच्या विद्यमानें एक जुटीनें आम्ही हा कार्यक्रम अमलांत आणूं. आमचें असें स्पष्ट मत आहे कीं, बाहेरील विधायक कार्यक्रमाचा पाठिंबा नसेल तर आमची पुष्कळशी शक्ति फुकट जाईल. त्या दृष्टीनें कौन्सिलांतून नव्हे, तर कौन्सिलाच्या बाहेरूनही लोकांचा पाठिंबा मिळाला तरच कौन्सिलांतील आमचें धोरण परिणामकारक होईल. खरोखरच विधायक कार्यक्रमाच्या दृष्टीनें कौन्सिलांतील व 'कौन्सिलाबाहेरील चळवळ उपयुक्त ठरेल. त्या बाबतींत महात्मा गांधींची कायदेभंगविषयक सूचना आम्ही हयगय न करतां मान्य

करीत आहोंत. कायदेभंगाशिवाय नोकरशाहीच्या या स्वार्थी धोरणाला तोंड देणें अशक्य आहे, असें आम्हांला आढळून आल्यास आम्ही कायदेमंडळांतून बाहेर पडूं व देशाला कायदेभंगाकरितां तयार करण्याच्या कामीं आम्ही महात्माजींना मदत करूं. या वेळपर्यंत देश जर तयार झाला नसेल, तर आम्ही त्यांच्या देखरेखीखालीं काम करण्यास तयार आहों. कायदेभंगाचा मोठा प्रयत्न करण्यासाठीं एकजुटीनें आम्ही त्यांच्या निशाणाखालीं जमूं.

## कॉंग्रेस आणि कामगार

देशातील कामगार व शेतकरी संघटणांना मदत करण्याचें काम आम्ही हातीं घेतलेंच पाहिजे. कामगाराचा प्रश्न सोडविणें हीं प्रत्येक राष्ट्रांतील एक विकट गोष्ट होऊन बसली आहे. हिंदुस्थानांत तर ह्या बाबतींत बऱ्याच अडचणी आहेत. एका बाजूनें जमिनदार व भांडवलवाले ह्यांनीं चालविलेली पिळणूक बंद करण्याकरितां आपण एखादी संघटणा निर्माण केली पाहिजे. तसेंच दुसऱ्या बाजूनेंही अवास्तविक व असामान्य मागण्या तयार करून, ह्या संघटणाच कामगार वर्गावर जुलूम करूं लागतील तर तसें होऊं देतां कामा नये. कामगार वर्गाला निःसंशय संरक्षणाची जरूरी आहे. पण भांडवलवाल्यांनाही त्याची जरूरी नाहीं असें नाहीं. पिळणुकीपासून कॉंग्रेसनें दोन्हीं पक्षांचें रक्षण केलें पाहिजे. आणि हा हेतु साध्य होईल ह्या तत्त्वावरच ट्रेड युनियन कॉंग्रेस संघटित केली पाहिजे. दूरवर विचार करतां ह्या दोन्हीं वर्गांचे खरे हितसंबंध एकच आहेत असें आमचें मत आहे.

## तात्पर्य

महात्मा गांधींच्या मतावरोबरच आम्हालाही आमचें मत प्रगट करण्याला संधि मिळाली याबद्दल आम्हांला आनंद वाटतो. हीं दोन्हीं पत्रकें वाचलीं असतां एक गोष्ट स्पष्ट होईल कीं, आमचे कांहीं मतभेद असले तरी मूलतः हिंदी राष्ट्रीय सभेंतील हे पक्ष एकच आहेत असें आढळून येईल. कौन्सिलांत असो किंवा कौन्सिलाबाहेर असो, विधायक कार्यक्रम अमलांत आणणें जरूर आहे, असें दोन्हीं पक्षांस वाटत आहे. आणि ह्यांतच महात्मा गांधी व स्वराज्यपार्टी ह्यांच्या सलोख्याचें बीज सांठवून ठेवलें आहे, असें आमचें मत आहे. आम्ही एकजुटीचा प्रयत्न केल्यास मग तो एका दिशेनें केलेला असो किंवा अनेक

दिशेनें असो, आमचे स्वातंत्र्याचे हक्क मान्य न करणाऱ्या नोकरशाहीला योग्य मार्गे-उत्तर आम्ही देऊं शकूं.

२७–२८ व २९ जून रोजीं अहमदाबाद येथील ऑ. इं. काँ. कमिटीच्या सभेंत झालेल्या निर्णयाचा मार्ग जुहू येथील चर्चेनें मोकळा करून दिला होता. कॉंग्रेस सस्थांतील निवडून आलेल्या सभासदांनीं दरमहा २००० वार सारखें व चांगलें पिळदार सूत दिलें पाहिजे, असा नियम कॉंग्रेसच्या घटनेंत समाविष्ट करण्यांत आला होता. आणि हा नियम मोडणाऱ्या लोकांनीं आपली जागा साहजि-कच रिकामी करून द्यावी, असें ठरविण्यांत आलें होतें. हा शासनविषयक नियम ज्या वेळीं ऑ. इं. कॉं. कमिटीच्या सभेपुढें चर्चेकरितां निघाला त्या वेळीं त्याचा निषेध करण्याकरितां बरेच सभासद सभेंतून उठून बाहेर निघून गेले. हा ठराव ६७ विरुद्ध ३७ मतांनीं पास झाला. परंतु, जे सभासद बाहेर निघून गेले होते, त्यांचीं मतें लक्षांत घेतलीं तर हा ठराव नापास झाला असतां, हें जाणून महात्मा गांधींनीं हें शासनविषयक कलम परत घेतलें. शिस्त मोडणाराला शासन कर-ण्यांत यावें अशी सामान्य शिफारस या सभेंत करण्यांत आली.

परदेशी कापड, कोर्टें, शाळाकॉलेजें, पदव्या यांच्यावरील बहिष्कारासंबंधानें चर्चा होऊन, जर कॉंग्रेसच्या सभासदांनीं यांपैकीं त्यांना लागू असणाऱ्या बहिष्काराचा अवलंब केला नसेल तर, कॉंग्रेस कमिटींतील अधिकाराच्या जागां-वर त्यांची निवड करण्यांत येऊं नये, याही प्रश्नावर चर्चा होऊन त्याचा अनुकूल निकाल लागला. अफूच्या बाबत असलेल्या सरकारी धोरणाचा निषेध करण्यांत आला. आसामी लोकांत पसरलेल्या अफूच्या संवयींबद्दल चौकशी करण्याकरितां मि. अँड्रयूज यांना विनंति करण्यांत आली. जैतो येथें झालेल्या अनवश्यक व क्रूरपणाच्या गोळीबारप्रसंगीं शिखांनीं दाखविलेल्या शौर्याबद्दल व शांतवृत्ती-बद्दल त्यांचें अभिनंदन करण्यांत आलें.

गोपिनाथ शहानें केलेल्या मि. अर्नेस्ट डे यांच्या खुनाचा निषेध करणाऱ्या ठरावानें या सभेंत खूप खळबळ उडवून दिली. या कृत्याबद्दल ऑ. इं. कॉंग्रेस कमिटीनें दिलगिरी प्रदर्शित केली. " या खुनाच्या मागें असलेल्या देशप्रेमाची, मग तें कितीही चुकीच्या वळणावर गेलेलें असो, पूर्ण जाणीव कमिटीला आहे. तथापि, असल्या राजकीय खुनांचा ही कमिटी तीव्र निषेध करीत आहे. आणि हीं सर्व कृत्यें कॉंग्रेसच्या अहिंसामूलक धोरणाशीं विसंगत आहेत असें या

कमिटीचें ठाम मत आहे. तसेंच स्वराज्याच्या प्रगतीच्या मार्गांत व कायदेभंगाच्या तयारीच्या दृष्टीनें असलीं कृत्यें अडथळा उत्पन्न करणारीं आहेत असेंही कमिटीला वाटत आहे." मि. अर्नेस्ट डे यांच्या खुनासंबंधाचा वरील ठराव चर्चेस निघाला त्या वेळीं कमिटीच्या सभेंत खूप जोराची दंगल उडाली. देशबंधु दास यांना ही गोष्ट आवडत होती किंवा अहिंसेची शपथ त्यांनीं घेतली नव्हती असेंही नाहीं; परंतु, ठरावांतील निरनिराळ्या कलमांवर जो विशेष जोर देण्यांत आला होता, त्यांत शाब्दिक फेरफार करावे, एवढेंच त्यांचें म्हणणें होतें. आपल्याला अत्यंत प्रिय असलेल्या व आपल्याशीं निकट संबंध असलेल्या आपल्या अनुयायांपैकीं कांहीं सभासदांनीं ठरावाविरुद्ध मत दिलें हें पाहून गांधीजींची निराशा झाली. गांधीजींना दुःखावेग सहन झाला नाहीं व ते भर सभेंत रडूं लागले. अशा त्यांच्या आयुष्यातील काही थोड्या प्रसंगांपैकीं हा एक प्रसंग होता. दिनाजपूर येथें भरलेल्या बंगाल प्रांतिक कॉंग्रेस परिषदेंत झालेल्या ठरावांत गोपिनाथ शहाचा स्वार्थत्याग व निरपेक्षता या गुणांची स्तुति करण्यांत आली होती व त्यांच्या देशाभिमानाचा आदरपूर्वक गौरवही करण्यांत आला होता. यामुळेंच ऑ. इं. कॉं. कमिटीच्या सभेंत बरोबर त्याच्याविरुद्ध ठराव आल्यामुळें खूप दंगल उसळली. स्वराजिस्टांना जें पाहिजे होतें तें या सभेंत त्याना मिळालें नाहीं. नोव्हेंबरपर्यंत त्यांना याकरितां थांबावें लागलें. नाफेरवादी लोकाच्या दृष्टीनें पाहतां सूतसभासदत्वाच्या नियमाला आश्चर्यकारक पाठिंबा मिळाला. ऑगस्टमध्यें नियमानें सूत देणारे सभासद २७८० होते, सप्टेंबरांत ६३०१, आक्टोबरात ७७४१ आणि नोव्हेंबरांत ७९०५ याप्रमाणें या सभासदांची संख्या वाढत गेली.

परंतु या वर्षांतील अत्यंत अनिष्ट गोष्ट म्हणजे हिंदुस्थानांत निरनिराळ्या ठिकाणीं झालेले हिंदु-मुसलमानांतील दंगे ही होय. दिल्ली, गुलबर्गा, नागपूर, लखनौ, शहाजहानपूर, अलाहाबाद, जबलपूर वगैरे सर्व ठिकाणीं हिंदु-मुसलमानांचे दंगे झाले. परंतु, कोहट येथें झालेल्या दंग्यानें हिंदुस्थानचें पेकाटच मोडलें. कोहट येथील दंग्याचीं कारणें व दंग्यामुळें उत्पन्न झालेली परिस्थिति यांची चौकशी करण्याकरितां महात्मा गांधी व मौलाना शौकतअली यांची एक कमिटी नेमण्यांत आली. या दोघांनीं याबाबत रिपोर्ट प्रसिद्ध केला पण, दंग्याचा दोष कोणत्या पक्षाला द्यावयाचा या बाबतींत दुर्दैवानें मतभेद झाला. हा दंगा

होऊन १० वर्षें होऊन गेलीं तथापि कोहट येथील भ्रातृ शाळेचे हेडमास्तर लाला नंदलाल यांनीं हा दंगा झाल्याबरोबर थोडक्याच दिवसांत जें पुस्तक प्रसिद्ध केलें, त्यांतील हकिगती आपलीं अंतःकरणें थरारून सोडतील अशी आहेत यांत शंका नाहीं. कोहटहून दंग्याच्या वेळी जे लोक पळून आले त्यांपैकीं लाला नंदलाल हे एक होते. या दंग्यांतील हकिगती आम्ही या ठिकाणीं देऊं शकत नाहीं; फक्त एवढेंच सांगतों कीं, ९ व १० सप्टेंबर रोजीं या शहरांत ठिकठिकाणीं भयंकर गोळीबार व कत्तली झाल्या. तेथील हिंदूंची दाणादाण उडाली व चार हजार हिंदु लोकांना स्पेशल ट्रेननें दुसरीकडे न्यावें लागलें. त्यापैकीं २६०० लोक रावळपिंडी येथें व १४०० लोक इतर ठिकाणी लोकांनी दिलेल्या भिक्षेवर जगून राहिले होते.

यावेळी गांधीजींनी २१ दिवस उपवास करण्याचें ठरविलें यांत कांहींच आश्चर्य नव्हतें. ह्या सर्व संतापाला व खुनी वृत्तीला आपणच कारणीभूत झालेले आहों, अशी जबाबदारी महात्माजींनी आपल्या अंगावर घेतली व आपल्या अपराधाच्या निरसनार्थ प्रायश्चित घेण्याचें ठरविलें. जवळ जवळ प्राणावर प्रसंग आलेल्या ॲपेंडिसायटिसच्या आजारातून महात्माजी नुकतेंच बरें झाले होते. अशा वेळीं हा उपवास म्हणजे एक आणिबाणीचाच प्रसंग होता. दिल्ली येथील मौ. महंमदअल्ली यांच्या वाड्यांत या उपोषणाला सुरवात झाली. परंतु, पुढें शहराबाहेरील एका वाड्यांत त्यांना नेण्यांत आलें. या उपोषणाचा फायदा घेण्यात आला व देशांतील सर्व जमातींचे प्रमुख पुढारी एकत्र आणून एक ऐक्य परिषद भरविण्यांत आली. या परिषदेच्या बैठकीं २६ सप्टेंबर ते २ ऑक्टोबर १९२४ पर्यंत चालू होत्या. स्वातंत्र्य, सद्सद्विवेक बुद्धि व धर्म या संबंधींची तत्त्वें निश्चित करण्याचा जोराचा प्रयत्न या परिषदेंत करण्यांत आला व प्रक्षोभाचें कारण घडून आलें तरी तत्त्वच्युत होतां कामा नये, असल्या वर्तनाचा निषेधच केला पाहिजे असें या परिषदेंत ठरविण्यांत आलें. एक मध्यवर्ती राष्ट्रीय पंचायत नेमण्यांत आली. महात्मा गांधीजींना या पंचायतीचे अध्यक्ष नेमण्यांत आलें. हकीम अजमलखान ( निमंत्रक ), लाला लजपतराय, जी. के. नरिमन, डॉ. एस्. के. दत्त, लियालपुरचे मास्टर सुंदरसिंग यांना या कमिटीचे सभासद नेमण्यांत आलें. धर्मश्रद्धा, धर्माचरण, धर्मक्षेत्रांचें पावित्र्य, गोवध मशिदीपुढील वाद्यें या सर्व प्रश्नांच्या बाबतींत या कमिटीनें मूलभूत हक्क

निश्चित ठरविलें. वर्तमानपत्रांनीं या संबंधाच्या हकिगती प्रसिद्ध करतांना काळजी घ्यावी, व या उपोषणाच्या अखेरच्या आठवड्यांत देशांत सर्वत्र प्रार्थना करण्यांत याव्या. आभारप्रदर्शनार्थ सर्वत्र ८ ऑक्टोबर रोजीं प्रचंड सभाही भरवाव्या अशी या कमिटीनें शिफारस केली.

या उपोषणांतून गांधीजी बाहेर पडतात न पडतात तोंच त्यांना मुंबई येथें २१ व २२ नोव्हेंबर (१९२४) रोजीं झालेल्या सर्वपक्षीय परिषदेला तोंड द्यावें लागलें. व त्याचप्रमाणें त्यापुढें लगेच २३ व २४ रोजीं झालेल्या ऑ. इं. कॉं कमिटीच्या सभेला हजर रहावें लागलें. सरकारनें बंगालमधील स्वराज्यपक्षाविरुद्ध व तसेंच तारकेश्वर येथें चालू असलेल्या सत्याग्रहाविरुद्ध जी जोराची दडपशाही चालू ठेवली होती, त्याबद्दल राष्ट्राचें निश्चित मत ठरविणें, हा या सर्वपक्षीय परिषदेचा हेतु होता. बंगालसरकारनें सुरू केलेल्या क्रिमिनल लॉ ॲमेंडमेंट ऑर्डिनन्सचा या परिषदेंत निषेध करण्यांत आला. हा कायदा व तसेंच १८१८ चा तिसरा रेग्युलेशन हीं दोन्हीं रद्द करावी, अशी आग्रहाची मागणी केली. स्वराज्याचें हक्क देण्याचे तहकूब ठेवल्यामुळेंच देशांत असंतोष पसरलेला आहे, असें मत या कमिटीनें नमूद केलें. व जातीय निर्णयासह स्वराज्याची योजना तयार करण्यासाठीं एक प्रातिनिधिक कमिटी या परिषदेंत नेमण्यांत आली. ३१ मार्च १९२५ च्या आंत या कमिटीनें आपला रिपोर्ट सादर करावा, असें ठरलें. या परिषदेपासून कांहीं फायदा होईल अशी अपेक्षा कोणीच केली नव्हती; परंतु देशबंधु दास यांची अटक मात्र यामुळें टळली असण्याचा संभव आहे. कौन्सिलबहिष्कार रद्द करून, कौन्सिलप्रवेशाच्या बाबतींत देशबंधु दास व मोतिलालजी यांचें म्हणणें गांधीजींनीं मान्य केलें हीं या वर्षांतील महत्त्वाची गोष्ट होय. वरील कमिटींतील प्रसिद्ध तीन व्यक्तींनीं जाहीर केलेला संयुक्त निर्णय ऑ. इं. कॉं. कमिटीनें मान्य केला. या संयुक्त पत्रकाविरुद्ध दुसरीं अनेक पत्रकेंही त्याच वर्षाच्या मे महिन्यात प्रसिद्ध झालीं. सर्व पक्षांचें सहकार्य पाहिजे असेल तर राष्ट्रीय कार्यक्रमाच्या दृष्टीनें असहकारितेचा कार्यक्रम तहकूब करण्यात यावा असा आशय या पत्रकांत प्रगट करण्यांत आला होता. परदेशी कापड वापरण्याचें नाकारणें एवढाच या कार्यक्रमातील भाग अपवादभूत ठरविण्यात आला होता. कॉंग्रेसमधील निरनिराळ्या गटांनीं विधायक कार्यक्रमांतील निरनिराळीं कामें करावीं व स्वराज्यपक्षानें कौन्सिलांतील काम सांभा-

ळावें असें ठरविण्यांत आलें. याच्या बदला गांधीजींना एक मोठा फायद झाला. वार्षिक चार आण्याऐवजीं कॉँग्रेसच्या सभासदांनीं दरमहा २००० वार कातलेलें सूत दिलें पाहिजे, असें ठरविण्यांत आलें. कॉँग्रेसच्या नियुक्त सभासदांनाच नव्हे तर कॉँग्रेसच्या सामान्य सभासदांनांही हा नियम लागूं करण्यांत आला. वर्ष संपत आलें होतें. म. गांधीजींच्या अध्यक्षतेखालीं बेळगांव येथें कॉँग्रेसचें अधिवेशन भरावयाचें होतें. कॉँग्रेसचे अध्यक्ष होण्याची काय पण संधि!

## बेळगांव कॉँग्रेस (१९२४)

असहकारितेच्या इतिहासांत बेळगांव ही सीमान्त रेषा होती. अलौकिक कार्यक्रमांचा उपक्रम अलौकिक पुरुषांनींच करावयाचा असतो. त्याचप्रमाणें तो तहकूब करावयाचा असल्यास अलौकिक पुरुषच तसें करूं शकतात. इतर कोणीही तसें करूं शकत नाहींत. या दृष्टीनें महात्मा गांधी हे १९२४सालीं बेळगांव कॉंग्रेसचे अध्यक्ष झाले हेंच उचित झालें. कर्नाटक शांत व गरीब स्वभावाचा आहे. पुढाऱ्यानें दिलेला हुकूम बजावण्यांतच त्याला समाधान वाटतें. म्हणून म. गांधीजींना बेळगांव येथें अनुकूल वातावरण मिळालें. गांधीजींचें अध्यक्षीय भाषण उदात्त विचारांनीं भरलेलें होतें. हें भाषण साराश रूपांत प्रतिनिधींना वाटण्यांत आलें. १९२०च्या सप्टेंबरपासून घडलेल्या हकीकतींचें महात्माजींनी समालोचन केलें असून कॉँग्रेस ही मुख्यतः आंतरिक बल वाढविणारी संस्था आहे असें त्यांनीं दाखवून दिलें. आपल्या वांट्याला आलेले बहिष्काराचे कार्यक्रम त्या त्या लोकांनीं पार पाडलें. यांपैकीं कोणताही कार्यक्रम जवळ जवळ पूर्णांशानें पार पडला, असें जरी म्हणतां आलें नाहीं तरी ज्या संस्थांवर बहिष्कार घालण्यांत आले त्यांची इभ्रत मात्र बऱ्याच अंशानें कमी झाली. सर्वांत महत्त्वाचा बहिष्कार म्हणजे हिंसेवरील बहिष्कार होय. ज्या लोकांनी असहकारितेचा कार्यक्रम स्वीकारला नाहीं, त्याच्याबद्दल सहनशीलता राखतां न आल्यामुळें एका नवीन सूक्ष्म स्वरूपांत हिंसेचा उदय झाला. कसेंही असलें तरी अहिंसेनें हिंसेला कावूंत ठेवलें. या वृत्तीमुळें आपल्या ध्येयाकरिता आत्मकष्ट सहन करण्याचें सामर्थ्य वाढलें यांत शंकाच नाहीं. तथापि चळवळ थांबविण्याची वेळ आली. ज्यांनीं असहकारिता केली होती त्यापैकीं पुष्कळांना पश्चात्ताप वाटूं लागला. या प्रतिक्रियेमुळें असहकारिता करण्यापूर्वी त्याची जी मनःस्थिति होती त्यांपेक्षांही ती अधिक बिघडली. म्हणून सर्व बहिष्कार बंद करावें लागलें. फक्त परदेशी कापडावरील बहिष्कार कायम राहिला. हा बहि-

ष्कार केवळ हक्क म्हणून नव्हे तर कर्तव्य म्हणून चालू ठेवावा लागला. बहिष्काराची वृत्ति, निःसंशय मनावर दडपण पडल्यामुळें उत्पन्न होते. आणि हें दडपण स्वेच्छेनें व विचारपूर्वक निर्माण झालेलें असतें. क्रोधानें किंवा नाखुषीनें निर्माण झालेलें नसतें. लँकेशायरचा व्यापार अनीतिमूलक आहे. कारण हिंदुस्थानांतील लाखों शेतकऱ्यांच्या नाशावर तो उभालेला आहे व चालविण्यांत येत आहे. एक अनीति दुसऱ्या अनीतीला निर्माण करते. ब्रिटनकडून जीं अनेक अनैतिक कृत्यें झालीं, त्याच्या मुळाशीं हा अनीतीनें भरलेला व्यापार होता. यामुळेंच सूत कांतण्याच्या व विणकामाच्या धंद्याकडे आपल्याला लक्ष द्यावें लागलें. सर्वच ब्रिटिश वस्तु आम्हांला हानिकारक आहेत असें नाहीं. कापड, मग तें ब्रिटिश असो किंवा इतर देशांतील असो आम्हाला तें हानिकारक आहे. यंत्राविरुद्ध आम्ही झगडा चालविलेला नाहीं. या यंत्रामुळें हिंसेला जें उत्तेजन मिळतें त्याविरुद्धच आमची तक्रार आहे. उपासमारीच्या संकटाला तोंड देणारा घरगुती धंदा नष्ट झाला यावद्दलच आमची काय ती तक्रार आहे. मतभेद असूनही स्वराज्यपक्षीयांबरोबर संगनमत झालें आहे. सूत-मत-दान हक्काला त्यांनीं सम्मति दिली आहे. व कौन्सिलातील त्यांच्या कामालाही मी सम्मति दिली आहे. याप्रमाणें महात्मा गांधींनीं असहकारितेच्या चळवळीचा इतिहास सांगून कोहट येथील दंग्याबद्दल त्यांनीं दिलगिरी प्रदर्शित केली. अकाली शिखाबद्दल सहानुभूति प्रकट केली. नंतर अस्पृश्यतेसंबंधानें आपले विचार सांगून, स्वराज्य हें आपलें अंतिम ध्येय आहे व चरखा, हिंदु-मुसलमान ऐक्य व अस्पृश्यतानिवारण हीं त्याचीं साधनें आहेत, असें त्यांनीं आपल्या भाषणांत प्रतिपादन केलें. " साधनांचें ज्ञान झालें म्हणजे मला बस्स आहे. साधन आणि साध्य हीं दोन्हींही माझ्या जीवनांच्या तत्त्वज्ञानांतील आभिन्न अंगें आहेत." महात्मा गांधींच्या तत्त्वज्ञानाचें हें रहस्य आहे. इतर मनोवृत्ति धारण करणाऱ्या लोकांना महात्माजींचें हें तत्त्वज्ञान पटत नाहीं. महात्माजींनी आपल्या भाषणात स्वराज्याच्या योजने संबंधानेंही पुढील विचार प्रदर्शित केले आहेत.

हस्तव्यवसाय केल्याशिवाय कोणालाही मतदानाचा हक्क असूं नये. लष्करी खर्च कमी करावा, थोडक्या खर्चांत लोकांना न्याय मिळवून घेतां यावा. मद्यपान व इतर मादक पदार्थांस बंदी. मुलकी व लष्करी खात्यांतील लोकांचे पगार कमी करावे. भाषावार तत्त्वांवर प्रांतांची पुनर्विभागणी करावी. परकीयांच्या

मक्तेदारीवर नियंत्रण ठेवावें. संस्थानिकाचा दर्जा कायम राहील अशी हमी घ्यावी. वरीष्ठ सरकारनें या बाबतींत ढवळाढवळ करूं नये. अरेरावींचे अधिकार रद्द करावे. नोकऱ्यांच्या बाबतींत जातीय भेदभाव ठेवूं नये राज्यकारभाराचें काम मातृभाषेंतून चालवावें. आणि हिंदी ही राष्ट्रभाषा करावी.

स्वातंत्र्यासंबंधानेंही महात्माजींचीं मतें आतां बदलत चालली होतीं. सरकारच्या विरोधी धोरणामुळे त्यांच्या आशा नष्ट झाल्या होत्या. "साम्राज्यान्तर्गत स्वराज्याकरितां मी प्रयत्न करीन, परंतु खुद्द ग्रेट ब्रिटनच्या चुकीमुळें जरूर पडल्यास साम्राज्याशीं संबंध तोडण्यास मी मागें पुढें पाहणार नाहीं" असें ते म्हणाले. नंतर स्वराज्यपक्ष, विधायक कार्यक्रम, बंगालमधील परिस्थिति, याबद्दल आपलें विचार प्रदर्शित करून अहिंसेवरील आपला विश्वास त्यांनीं व्यक्त केला व आपलें भाषण संपविलें.

लॉर्ड रीडींग साहेबांनीं नुकताच एक ऑर्डिनन्स बंगाल प्रांतांत लागूं केला होता. क्रांतिकारक संस्थांशीं एकाद्या इसमाचा संबंध आहे असा संशय आल्याबरोबर त्याला तावडतोब अटक करून स्पेशल कमिशनपुढें चौकशीकरितां त्याचा खटला पाठवावयाचा असा अधिकार या ऑर्डिनन्स अन्वयें बंगाली पोलिस अधिकाऱ्यांना मिळाला होता. स्वराज्यपक्षीयांना हाणून पाडण्याकरितां सरकारनें हें धोरण स्विकारलें होते ही गोष्ट महात्मा गांधींनाही पटली होती.

बी आम्मा, सर ए चौधरी, सर ए मुकर्जी, भूपेंद्रनाथ बसू, डॉ. सुब्रह्मण्यम् अय्यर शिवाय इतर बरेच कॉंग्रेस कार्यकर्ते व पुढारी यांच्या मृत्यूबद्दल कॉंग्रेसनें दुःख प्रदर्शित केलें. ऑल इंडिया काँग्रेस कमिटीच्या नोव्हेंबरच्या सभेंत गांधी-दास नेहरु तडजोडीला सम्मति देण्यांत आली होती. काँग्रेसनें या कराराला, स्वतंत्र ठराव करून पुष्टि दिली. काँग्रेसच्या मतदानाच्या हक्कात बदल केला. कोहट सोडून बाहेर चाललेल्या हिंदुलोकाबद्दल दिलगिरी प्रदर्शित करण्यांत आली व कोहटमधील मुसलमानांनीं आपल्या हिंदु बांधवांस, त्यांच्या जीवितांचें व मालमत्तेचें पूर्ण रक्षण होईल असें आश्वासन द्यावें अशी विनंति करण्यांत आली. कोहटमधील मुसलमानांनी सन्मानानें परत बोलावल्यानच ग्रामत्याग केलेल्या हिंदूनीं परत कोहटमध्यें यावें, असा सल्ला देण्यांत आला. निजाम संस्थानांतील गुलबर्गा येथें झालेल्या दंग्यांत जखमी झालेल्या लोकांबद्दल सहानुभूति व्यक्त करण्यांत आली. अस्पृश्यता व वायकोम सत्याग्रह या

संबंधानेही विचार करण्यांत आला. पगारी राष्ट्रीयसेवा पूर्ण मानास्पद आहे असें जाहीर करण्यांत आलें. अकाली चळवळ, मद्य व दारु यांचा व्यापार वगैरेंचा विचार करून काँग्रेसच्या घटनेंत जरूर ते फेरफार करण्यांत आलें.

परदेशांतील हिंदी लोकांच्या बाबतींत श्री. वझे, बनारसी दास चतुर्वेदी व श्रीमती सरोजनीदेवी यांच्या सेवेबद्दल अभिनंदन करऱ्यांत आलें. केनियाच्या बाबतींत सरकारचीही हालचाल चालू होती. केनियांतील हिंदी लोकांच्या हित-संबंधाविरुद्ध धोरण स्वीकारण्यांत आलें तर ब्रिटिश साम्राज्याशीं संबंध तोडण्या-बद्दल व वसाहतीविरुद्ध प्रतिकाराचें उपाय योजण्याबद्दल हिंदुस्थानांत जोराची चळवळ सुरु होण्याचा संभव आहे, अशी सावधगिरीची सूचना हिंदुस्थानसर-कारनें स्टेटसेक्रेटरीला दिली होती. १९२३ च्या साम्राज्यपरिषदेला डॉ. तेज-बहादुर सप्रू व अलवारचे महाराज. हिंदुस्थानचे प्रतिनिधी म्हणून हजर होते. हिंदी लोकांच्या समानतेच्या हक्काला या परिषदेंत मान्यता देण्यांत आली, इत-केंच नव्हें तर वसाहतसरकारशीं हिंदी लोकांच्या हितसरक्षणासबधानें सरकारशीं तडजोड करण्यासाठीं एक कमिटीही नेमावी असें ठरलें. फक्त दाक्षिण आफ्रि-केनें या ठरावाला विरोध केला. या "कॉलनिज कमिटी" मध्यें मि. होपस् शिम्पसन्, आगाखान, सर वेन्जामिन रॉबर्टसन्, दिवाण बहादुर टी. रंगाचारी आणि के. सी. रॉय वगैरेंची नेमणूक करण्यात आली होती. १९२४ च्या प्रारंभीं या कमिटीच्या कामास सुरवात झाली, व जुलै अखेर हिचें काम संपलें. केनिया, फिजी, टॅगानिका येथील हिंदी लोकांच्या नेहमींच्या गाऱ्हाण्यांचा या कमिटीच्या बैठकींत विचार करण्यांत आला. १९२४ च्या आगस्टमध्यें वसाह-तीचें सेक्रेटरी मि. थॉमस यांनीं हिंदी लोकाना वसाहतींत येण्याबाबत प्रतिबंध करणाऱ्या जादा कायद्याची वसाहतींत अमलबजावणी करण्यात येऊं नये, असा निर्णय दिला. मतदानाच्या प्रश्नाबाबतचें गाऱ्हाणें तसंच कायम राहिलें. हिंदु-स्थानातून येणाऱ्या शेतकऱ्यांना उतरणीवरील जमिनी वसाहतीकरिता द्याव्या, अशी सूचना करण्यांत आली. १९२४ जून मध्यें लॉर्ड साऊथबरो यांच्या अध्यक्षतेखालीं ईस्ट आफ्रिकन कमिटी नेमण्यात आली. हिंदी लोकांच्या प्रश्ना-संबंधानें या कमिटीपुढें विचार व्हावा असें ठरविण्यांत आलें. फार क्रान्ति झाल्यामुळें दक्षिण आफ्रिकेंतील क्लास एरिया बिल पुढें येऊं शकलें नाहीं.

---

## प्रकरण सहावें

# फारकत कीं भागीदारी ? १९२५

१९२५ चें राजकारण कौन्सिल भोंवतीच मुख्यतः घुटमळत होतें. नाफेरवाद्यांनीं स्वराज्यपक्षीयांना छळण्याचें सोडून दिलें होतें. या दोन्ही पक्षांना समतोल राखण्याचें काम महात्माजी करीत होते. दास, नेहरू, पटेल, लालाजी ही माणसें दुसऱ्याच्या सांवलीखालीं वाढणारी नव्हती. बंगाल व मध्यप्रांत ह्या ठिकाणीं द्विदल राज्यपद्धतीला मूठमाती देण्यांत आली. लॉर्ड लिटन यांची विनंति झिडकारून दासांनीं बंगालमध्ये प्रधानमंडळ स्थापन केलें नाहीं, व दुसऱ्यालाही स्थापूं दिलें नाहीं. कौन्सिलचा धुव्वा उडविण्याची त्यांची कल्पना अशा प्रकारची होती. १९२४ च्या पहिल्या ऑर्डिनन्सची मुदत संपल्यामुळें बंगाल कायदेमंडळांत ह्या संबंधाचें बिल पुढें माडण्यांत आलें, पण स्वराज्य पक्षीयांच्या वजनामुळें तें फेंटाळलें गेलें. लॉर्ड लिट्नसाहेबांनीं हें बिल सर्टिफिकेशनच्या जोरावर पास करून घेतलें व तें बादशहांच्या मंजुरीकरिता लंडनला पाठविलें. दिवाणाच्या पगाराची अंदाजपत्रकात तरतूद करण्यासंबंधाचा ठराव १७ फेब्रुवारीं रोजीं बंगाल कायदेमंडळांत पास झाला. स्वराज्यपक्षीयांची ही पिछेहाटच झाली. तथापि त्यानीं आपली बाजू लवकर सावरली. २३ मार्च रोजीं कायदेमंडळांत अंदाजपत्रकावर चर्चा चालूं असतांना नवीन नेमलेल्या दोन दिवाणांच्या पगार मंजुरीसंबंधानें मतें घेण्यात आलीं व ६९ विरुद्ध ६३ मतांनीं तो ठराव नापास झाला. आपल्या जाहीर धोरणाप्रमाणें बंगालनें असहकारितेला उचलून धरलं होतें. दिवाणगिऱ्या स्वीकारून कौन्सिलला आंतून पोखरून उलथून कां पाडूं नये याबद्दल मध्यप्रांतांत उघड उघडपणें चर्चा चालू होती. वरिष्ठ कायदेमंडळांत २४ व २५ सालीं स्वराज्यपक्ष, सनदशीर मार्गानें विरोध करीत होता. सिलेक्ट कमिटीतलि जागा ते पटकावीत होते व उपयुक्त कायदे करण्याच्या कामीं सरकारशीं सहकार्य करीत होते. आज एका पक्षाबरोवर तर उद्यां दुसऱ्या पक्षाबरोवर तर कधीं कधीं सरकारबरोबरही लॉबीमध्यें ते प्रवेश करीत होते.

बंगाल ऑर्डिनन्स रद्द करावा, असा ठराव मि. सी. दोरास्वामी अय्यंगार ह्यांनीं असेम्ब्लींत मांडला. ५८ विरुद्ध ४५ मतांनीं तो पास झाला. १८५० चा स्टेट प्रीझनर्स अॅक्ट, १८६७ चा फ्रांटियर आऊटरेजेस अॅक्ट, १९२१ चा सिडिशस मिटींग अॅक्ट, हे सर्व कायदे रद्द करावे असें बिल श्री. विठ्ठलभाई पटेल ह्यांनीं मांडलें. फ्राटियर आउटरेजेस अॅक्ट वगळून बाकीचें बिल मंजूर झालें. मि. नियोगी ह्यांनीं रेल्वे अॅक्टांत दुरुस्ती करणारें बिल विचाराकारितां मांडलें. एखाद्या विशिष्ट जातीकारितां स्वतंत्र डबे राखून ठेवण्यात येऊं नयेत असें ह्या ठरावांत म्हटलें होतें. पण तो टराव नामंजूर झाला. प्रिव्ही कौन्सिल-कडे अपीलें करण्यांत येऊं नयेत असा एक ठराव डॉ. गौर ह्यांनीं मांडला पण तोही नापास झाला. कांहीं दिवस "लंडनमधील प्रिव्ही कौन्सिलकडे आपल्या-ला अपीलें केलीं पाहिजेत" असें पंडित मोतिलाल हे म्हणाले. हिंदुस्थानांत मिलिटरी कॉलेज स्थापन करावें हा व्यंकटपती राजू ह्यांचा ठराव पास होऊन सरकारचा पराभव झाला. रेल्वे बजेटवर चर्चा करताना ट्रेझरी बेंच वरील रोंख सोडून देऊन स्वराज्य व स्वतंत्र दोन्ही पक्षानीं आपआपल्यातील वडघा तोफा परस्परावर रोंखल्या. अर्थातच पंडित मोतीलालजींचा रेल्वे बजेट नाकारण्याचा ठराव ६६ विरुद्ध ४१ मतांनीं नापास झाला. याप्रमाणें अंदाजपत्रक व त्यांतील कलमें ह्यांचा विचार अंतर्गत गुणदोषानुसारच करण्यात आला. सतत सारखा अडवणुकीचा प्रश्न ह्या ठिकाणीं कोठेंच उद्भवला नाहीं. कार्यकारी मंडळातील सभासदाना प्रवास खर्चाबद्दल भत्ता देण्यात येऊं नये, हा पंडित मोतीलाल ह्यांचा ठराव ६५ विरुद्ध ४८ मतानीं पास झाला. प्रत्येक पार्टीनें आपापलें स्वतंत्र कारण दाखवून ह्या ठरावाला विरोध केला कोहटचे अत्याचार–लष्क-राचें हिंदीकरण–गोलमेज परिषद–दडपशाही हे सर्व प्रश्न विचाराकारितां कौन्सिल-पुढे आले होते. बंगाल क्रि. लॉ. अमेंडमेंट अॅक्ट अन्वयें झालेल्या खटल्याच्या बाबतींत अपीलें करण्याची मोकळीक देणारें बिल असेम्ब्लीपुढे आलें त्या वेळीं एक चमत्कारीक परिस्थिति निर्माण झाली. हेबियस कॉर्पस अॅक्टची तह-कुबी व आरोपींना पोलिस पहाऱ्यांत ठेवणें वगैरेंचा उल्लेख ह्या बिलांत करण्यांत आला होता. स्वराज्यपक्ष व स्वतंत्रपक्ष हे दोघेही पहिल्या कलमाला पाठिंबा देण्यास तयार होते. दुसरें कलम त्यांना नापसंत होतें. सरकारशीं ज्याचा संबंध असेल तेवढा भाग गाळण्याची त्यांची तयारी होती. अशा सर्व तरतूदी करून

हें बिल पास करण्यांत आलें. तेव्हां लॉर्ड रीडिंग साहेबांना आपल्या अधिकारांत तें मंजूर करून घ्यावें लागलें.

कॉंग्रेसच्या चळवळींत देशबंधु दास ह्यांनीं ह्या वेळीं अग्रस्थान पटकावलें होतें. बेळगांव कॉंग्रेसच्या सुमारास देशबंधु दासांनीं आपली सर्व इस्टेट राष्ट्रकार्याकरितां देण्याचें ठरविलें आहे अशी बातमी प्रसिद्ध झाली. ह्यामुळें दासासबंधानें जनतेच्या मनांतील आदर खूपच वाढला. ह्याच वेळीं कॉमनवेल्थ ऑफ इंडिया बिलाचा मसुदा डॉ. बेझंट ह्यांच्या नॅशनल कन्व्हेन्शन मार्फत प्रसिद्ध झाला. ऐक्य परिषदेनें नेमलेली कमिटी जातीय प्रश्नाचें त्रांगडे सोडविण्याच्या कामीं डोकें खाजवित बसली होती. २५ फेब्रुवारी रोजीं हिंदुसभेमार्फत एक प्रश्नावली लाला लजपतराय यांनीं प्रसिद्ध केली. मुंबई येथें भरलेल्या सर्वपक्षीय परिषदेनें नेमलेल्या सब कमिटीला स्वराज्याची योजना तयार करण्यांत यश मिळालें नाहीं. त्यामुळें ही कमिटी मार्चमध्यें कायमची अस्तंगत झाली. गांधीजींनीं दक्षिण हिंदुस्थान व केरळ ह्या भागांत १९२५ च्या मार्च-एप्रीलमध्यें दौरा काढला. वायकोम सत्याग्रह या वेळीं मध्यान्हीवर आला होता. गांधीजींच्या उपस्थितीमुळें ह्या वादाची तडजोड करणें सोपें गेलें. वायकोमधील कांहीं विशिष्ट रस्त्यावरून कांहीं विशिष्ट जातीच्या अस्पृश्यांनीं जातां कामा नये, या धार्मिक प्रतिबंधाविरुद्ध हा सत्याग्रह चालू होता. त्रावणकोर सरकारनें कांहीं ठिकाणीं तटबंदी करून, तर कांहीं ठिकाणीं पहारे बसवून सत्याग्रहींच्या प्रवेशाला अटकाव केला होता. असें करण्यानें आपल्या भौतिक शक्तीच्या जोरावर आपण त्रावणकोरमधील हिंदूंच्या सनातनवादाला पाठिंबा देत आहों ही गोष्ट ज्या वेळीं सरकारला पटाविण्यांत आली; त्या वेळीं सरकारनें रस्त्यावरील मधले अडथळे दूर केले, व पहारेकरी उठवून लाविले. या नंतर शिल्लक राहिलेला केवळ लोकमताचा विरोध फार दिवस टिकाव धरूं शकला नाहीं. दक्षिणेंतून महात्माजी ह्या नंतर बंगालकडे वळले. देशबंधू दास ह्यांची प्रकृती या वेळीं नादुरुस्त झाली होती. सायंकाळच्या सुमारास त्यांचा ताप वाढत असे त्यामुळें त्यांच्या प्रकृतीसंबंधानें लोकांना काळजी वाटून राहिली होती. रोग परिहाराकरितां त्यांनीं युरोपला जावें अशीही विनंति करण्यांत आली होती.

ब्रिटिश सरकारशीं आपण कांहीं तडजोड घडवून आणूं अशी देशबंधू दास यांना या वेळीं पूर्ण आशा वाटूं लागली होती. अहमदाबाद कॉंग्रेसचे वेळीं

चालू असलेल्या गांधी–रीडिंग वाटाघाटीच्या बाबतींत महात्मा गांधींनीं सगळा गडबडगुंडा व घोंटाळा केला असें देशबंधु दास ह्यांनीं दक्षिण हिंदुस्थान दौऱ्यावर असतांना मद्रासच्या वाळवंटावर झालेल्या जाहीर सभेंत बोलून दाखविलें होतें. अलिपूर जेलमध्यें असतांनाच आपल्याला ह्या तडजोडी संबंधीच्या अटी समजल्या होत्या असेंही त्यांनीं जाहीर केलें. प्रचंड चळवळी ज्यांनीं संघटित केलेल्या असतात त्या सार्वजनिक कार्यकर्त्यांच्या मनांत विजयासंबंधाची मनोभावना सामान्यतःच प्रगट होत असते. १९१७ सालीं मॉटेग्यू हिंदुस्थानात आले, त्यावेळी मिसेस बेझंट ह्यांना ह्याच भावनेनें पछाडले होतें. दासांनीं १९२१ चा चित्तागांगचा संप यशस्वी रीतीनें चालविला. युवराजांच्या स्वागतावरील बहिष्काराच्या कार्यक्रमाला बंगालमध्यें फारच अपूर्व यश आलें. बंगालमधील कायदेमंडळें काबीज करून प्रधान मंडळ नेमणें त्यांनीं अशक्य करून सोडलें व द्विदल राज्यपद्धतीची धुळधाण उडविली. इतकें झाल्यावर तडजोडीच्या कामीं यश येईल अशी आशा त्यांनी कां करूं नये ?

फरीदपूर येथें झालेल्या बंगाल प्रांतिक कॉंग्रेस परिषदेच्या वेळीं अशी परिस्थिति होती. वरील मनोभावनेनें युक्त होऊनच काहीं विशिष्ट अटींवर सहकार्य करण्यास आपण तयार आहों, असें त्यांनीं फरीदपूर येथें झालेल्या भाषणांत जाहीर केलें. देशांत पसरलेला असंतोष नष्ट करण्याकरिता आवश्यक असलेल्या वृत्तीनें सरकारचें अंतःकरण अद्याप काबीज केलें नाहीं, असें महात्माजींना वाटत होतें; परंतु, सरकारच्या हृदयांत जरूर ती क्रांति झाली आहे, असा देशबंधु दास ह्यांना विश्वास वाटूं लागला होता. जिकडे तिकडे सरकारच्या हृदयांतील क्रांति आपल्या मदतीस येत आहे असें स्टेट्समनच्या प्रतिनिधीपाशीं देशबंधु दास ह्यांनीं बोलून दाखविलें, "समेटाचीं चिन्हें मला सर्वत्र दिसूं लागलीं आहेत. तंट्याबखेड्याला जग कंटाळलें आहे. पुनर्घटणा व दृढीकरण करण्याची खरी इच्छा उत्पन्न झाली आहे." १९२५मे च्या पहिल्या आठवड्यांत फरीदपूर येथें देशबंधु दास ह्यांनीं वरील विचार जाहीरपणें प्रगट केले. त्याच वेळीं महात्मा गांधींनीं त्याच पत्राच्या प्रतिनिधीपाशीं पुढील उद्‌गार काढले. "देशबंधु दास ह्यांच्या म्हणण्याप्रमाणें असहकारितेचें मनोमय धोरणच माझ्यापाशीं शिल्लक राहिलें आहे. व ह्या मनोवृत्तीला मी व्यक्तिशः अतिशय किंमत देतों. ब्रिटिशांचा मी मित्र आहे, असें जसें हक्कानें मी सांगत असतों त्याच नात्यानें

मला असें सांगणें अवश्य वाटतें कीं, हृदय क्रांतीचा लवलेशही मला कोठें दिसून येत नाहीं."

ब्रिटिश मुत्सद्यांचा गौरव करून देशबंधु दास पुढें म्हणाले कीं, दोघांनाही सन्माननीय अशा अटींवर आजही तडजोड घडवून आणतां येईल. गांधीजींनीं ह्याचवेळीं दास हे आपले वकील आहेत व स्वराज्यपक्ष, कॉंग्रेसचा प्रतिनिधी म्हणून कौन्सिलांत काम करीत आहे असें म्हटलें होतें. फरीदपूर येथें दे. दास यांनीं आपल्या तडजोडीच्या अटी जाहीर रीतीनें सांगितल्या. हिंसा ही अनैतिक व अनुपयुक्त आहे. कॉंग्रेसनें आपल्याशीं सहकार्य करावें, असें सरकारला फार फार वाटत असल्याचाही त्यांनीं उल्लेख केला. राज्यकारभारांत खऱ्या खऱ्या जबाबदारीचे हक्क लोकांना दिल्याशिवाय आम्ही तरी सरकारशीं सहकार्य करण्यास कसें तयार होणार? परंतु, ह्या बाबतींत दोन गोष्टींची आवश्यकता आहे. पहिली अशी कीं, अंतःकरणांत खरोखरी बदल झाला पाहिजे व पूर्णांशानें स्वराज्याचे हक्क स्वाभाविकच थोड्याच अवधींत मिळतील अशी व्यवस्था करण्यांत आली पाहिजे, असें ते म्हणाले.

बंगाली लोकांना मध्या कशाची निकड आहे याबद्दल कांहीं सूचना करण्यास हरकत नाहीं. (१) सर्व राजकीय कैद्यांची सार्वत्रिक मुक्तता (२) थोड्याच कालात साम्राज्यांतर्गत स्वराज्याचें स्थापनेला पूर्णांशानें मान्यता आणि त्या दृष्टीनें स्वराज्याच्या हक्काचा पाया घालावा. आम्हीही शब्दानें, कृतीनें किंवा आविर्भावानें, क्रांतिकारक चळवळीला उत्तेजन देणार नाहीं, व असली चळवळ मोडून काढण्याकरता सर्व प्रकारचे प्रयत्न करूं, असें आमच्यातर्फे आम्ही आश्वासन दिलें पाहिजे" असेंही त्यांनीं सुचविलें. अराजक चळवळ नाहींशी करण्याकरिता राष्ट्रीय प्रयत्न करण्यात यावा असें एक कलम भावी तडजोडीच्या अटींत समाविष्ट करण्यांत आलें होतें. फरीदपूर येथील प्रांतिक परिषद या दृष्टीनें फारच महत्वाची झाली. क्रांतिकारक इसम हृदयात क्रांति घडून आल्यानंतर जनतेची खरी सेवा करणारा फेरिस्ता बनतो ही गोष्ट वरील सर्व हकीगतीवरून समजून येण्यासारखी आहे. या वेळीं लॉर्ड रीडिंग थोड्या दिवसाच्या रजेवर इंग्लंडला गेले होते. स्वराज्यपक्षीयांनीं आमच्याशीं सहकार्य करावें, कौन्सिलें मोडून टाकण्याचा विचार करूं नये असा उपदेश लॉर्ड बर्कनहेडांनीं स्वराज्यपक्षीयांना याच वेळीं केला होता. शिवाय कर्नल वेजवूड व रॅम्से मॅकडोनल्ड हेही हिंदु-

नाच्या बाबतींत कांहीं तरी तडजोड घडून आणावी या खटपटींत होते. देशबंधु दास ह्यांचा लॉर्ड बर्कनहेड ह्यांच्यावर फार विश्वास होता. व हिंदुस्थानच्या बाबतींत ते बऱ्याच महत्त्वाच्या सुधारणा घडवून आणतील असें देशबंधु दासांना वाटत होतें. दास हे वकील होते त्याचप्रमाणें बर्कनहेडही लॉर्ड होण्यापूर्वी वकीलीचा धंदा करीत होते. ज्या पुरुषानें आयर्लंडला मदत केली तो पुरुष हिंदुस्थानच्या बाबतींतही तसेंच वागेल असें दासांना वाटलें असल्यास त्यांत नवल नाहीं.

पंडित मोतिलाल नेहरू यांना पाठविलेल्या आपल्या शेवटल्या पत्रांत देशबंधु दासांनीं पुढील विचार प्रकट केले. "अत्यंत आणीबाणीचा प्रसंग आपल्यावर लौकरच येणार आहे. बरेचसें भरींव काम या वर्षाअखेर आपल्या हातून झालें पाहिजे. पुढील वर्षाच्या आरंभीं आपल्यांतील सर्व शक्तिवर कामाचा ताण पडेल आणि आम्ही दोघेही तर आजारी आहोंत. काय होणार आहे परमेश्वरालाच माहीत." त्या नंतर थोड्याच दिवसात देशबंधू दास दिवगत झाले. (दार्जीलींग १६ जून १९२५) दासांचें जीवन म्हणजेच हिंदुस्थानच्या इतिहासांतील एक-प्रकरण होय. खुलना येथें दास ह्यांच्या निधनासंबंधानें या ठरावावर भाषण करतांना म. गांधी म्हणाले कीं, त्यांचें कायमचें स्मारक करण्याकरिता आपल्याला काय करता येईल ? डोळ्यांतून अश्रु गाळणें सोपें आहे. ह्या अश्रु गाळण्यानें देशबंधू दास ह्यांच्या अत्यंत निकटवर्ती व प्रेमाच्या माणसाला कलल्याही प्रकारची आपण मदत देऊं शकणार नाहीं. आपल्यापैकीं प्रत्येक हिंदु, मुसलमान, पार्शी, ख्रिश्चन, जें आपल्याला हिंदी म्हणवून घेत असतील त्या सर्व लोकानीं दास ज्याच्याकरितां जगले व ज्याच्याकरितां त्यांनीं अटोकाट प्रयत्न केले तेच काम करण्याची प्रतिज्ञा केली पाहिजे. आपण सर्व ईश्वरावर भरंवसा ठेवणारी माणसें आहोंत. शरीर नाशवंत आहे हें आपण जाणतों. आत्मा शाश्वत आहे. ज्या शरीरानें दासांना धारण केलें तें नष्ट झालें आहे, परंतु, त्याचा आत्मा कधीही नाश पावणारा नाहीं. ज्यानें ह्या देशाच्या सेवेकरिता अलौकिक स्वार्थ त्याग केला, तो अजरामरच राहील. म्हणून आपल्यापैकीं प्रत्येक तरुणानें व वृद्धानें त्यांचें उदाहरण गिरवावें, व त्याप्रमाणें आपलें आचरण थोडेतरी ठेवावे. म्हणजेच त्यांचें स्मारक शाश्वत होईल. त्याची बुद्धिमत्ता आपल्यापाशीं नसेल, परंतु मातृभूमीवर प्रेम करणाऱ्या त्यांच्या आत्मीय भावनेचें आपणाला

अनुकरण करितां येईल." या बाबतींत आतां सरकारचें मत काय आहे तें पाहूं. "शत्रु पक्षाची मर्मस्थानें शोधून काढण्याची अचुक बुद्धि देशबंधू दास यांच्या ठिकाणीं वसत होती. एकदां एखादी योजना मनांत निश्चित केल्यानंतर तिचा चिकाटीनें पाठपुरावा करण्याचा त्यांचा स्वभाव असल्यामुळे तें इतकें पुढें येऊं शकलें." महात्मा गांधींप्रमाणें त्यांच्या विरोधकांकडूनही त्यांना मान मिळाला. त्यांच्या निधनासंबंधानें, अनेक युरोपियन गृहस्थांनीं व मोठमोठ्या सरकारी अधिकाऱ्यांनींही कळकळीनें व उघड्या अंतःकरणानें दे. दासासंबंधींचें आपलें मत प्रगट केलें. स्टेट सेक्रेटरी व व्हाइसरॉय यांनींही त्यांच्या मृत्यूबद्दल दिलगिरीचे संदेश पाठविले. यानंतर ऑगस्टमध्यें भरलेल्या असेंब्लीच्या बैठकींत देशबंधु दास व बंगालचे जुने पुढारी सर सुरेंद्रनाथ बानर्जी यांच्या निधनाबद्दल दुःख प्रदर्शनपर ठराव करण्यांत आले. बंगालचे हे वृद्ध पुढारी ६ ऑगस्ट १९२५ रोजी दिवंगत झाले.

महात्मा गांधीजींचें देशबंधु दास यांच्यावर अलोट प्रेम होतें. महात्माजी यावेळीं बंगालमध्यें जाऊन राहिले व त्यांनीं त्यांच्या सन्मानार्थ एक वडे स्मारक उभारण्याची खटपट केली. १० लाख रुपये त्यांनीं जमा केले. आणि देशबंधु दास यांच्या वाड्याचें, ( १४८ रूसा रोड ) त्यांच्या इच्छेप्रमाणें स्त्रिया व मुलें यांच्या हॉस्पिटलमध्यें रूपांतर केलें. बेळगांव काँग्रेसच्या वेळींच अशा प्रकारची आपली इच्छा देशबंधु दास यांनीं प्रकट केली होती. गांधीजींनीं बंगालमधील स्वराज्य पक्षाचें आसन स्थिर व बळकट राहील अशीही खटपट केली. श्री. देशबंधु दास यांच्या मागें श्री. सेनगुप्त यांना बंगाल कायदे मंडळांतील स्वराज्यपक्षाचे पुढारी, कलकत्ता कॉर्पोरेशनचे मेयर, व बंगाल प्रांतिक काँग्रेस कमिटीचे अध्यक्ष निवडण्याचा प्रयत्न केला. याप्रमाणें देशबंधु दास यांच्यावरची तिन्ही जबाबदारीचीं कामें सेनगुप्त यांच्याकडे सोंपविण्यांत आली.

याप्रमाणें महात्माजी स्वराजिस्टांना मदत करीत होते व डळमळींत विचाराच्या लोकांना स्वराज्य पक्षांत सामील होण्यास सांगत होते. तथापि, स्वराज्य पक्षा-कडून महात्माजींच्या या त्यागबुद्धीचें चीज झालें नाहीं. सूतमतदानाच्या हक्का-विरुद्ध स्वराज्य पक्षाचें जनरल कौन्सिलमधील पुढारी पहिल्यापासूनच विरोध करीत होते. बेळगांव काँग्रेसमध्यें या हक्काला मान्यता मिळाली होती, तरी ऑ. इं. कमिटीच्या बैठकींत या हक्काच्या चिंधड्या उडविण्याचें त्यांनीं ठरविलें असतें

तर ते त्यांना शक्य होतें. कारण ऑ. इं. कॉंग्रेस कमिटींत त्यांचेंच बहुमत होतें. १५ जुलै रोजीं कलकत्ता येथें वर्किंग कमिटीची सभा झाली, त्या वेळीं या सभेच्या शेवटीं गांधीजींनीं पं. मोतीलाल नेहरू यांना एक चिठ्ठी पाठविली. कॉंग्रेसमध्यें स्वराजिस्टांचें बहुमत आहे, पंडितजी हे स्वराज्य पक्षाचे अध्यक्ष आहेत तेव्हां त्यांनीं कॉंग्रेसच्या वर्किंग कमिटीचेही अध्यक्ष व्हावें अशी सूचना या चिठ्ठींत केली होती. अध्यक्ष राहणें हें आपल्याला यापुढें आवडणार नाहीं, असें गांधीजींनीं स्पष्टपणें कळविलें होतें. या चिठीनें स्वराज्यपक्षांतील मंडळींत गडबड उडवून दिली. निदान या वर्षाअखेर तरी, गांधीजींनीं ऑ. इं. कॉं. कमिटीचे अध्यक्ष राहावे, असा अखेर निर्णय ठरविण्यांत आला. ऑ. इं. कॉं. कमिटीच्या पुढल्या सभेंत सूतमतदान हक्क गाळून टाकण्यांत आला तर, गांधीजी आपल्या जागेचा राजीनामा देतील व स्वतंत्र चरखा संघ स्थापन करतील हें उघड होतें. सूतमतदान हक्कासंबंधानें, फेर विचार करण्याचें वर्किंग कमिटीनें ठरविलें. शेवटीं १ ऑक्टोबर रोजीं ऑ. इं. कॉंग्रेस कमिटीची सभा भरून या प्रश्नाचा अखेरचा निर्णय लावावा, असें निश्चित करण्यांत आलें. तोंपर्यंत या मधल्या काळांत स्वरज्यपक्षाला आपल्या हातून होईल तेवढी मदत गांधीजींनीं केली. कांहीं विशिष्ट अटी मान्य न झाल्यास, स्वराज्यपक्ष अडवणुकीचा मार्ग स्वीकारील या स्वराज्य पार्टीच्या धमकीवजा ठरावाखालीं पंडितजींबरोबर महात्माजींनींहि आपली सही केली होती. लवकरच बेळगांव कॉंग्रेसचा ठराव व स्वराजिस्टांशीं कॉंग्रेसचा झालेला करार हे दोन्हींही कॉंग्रेसचे मुख्य आधार गांधीजींच्या एका शब्दानें कोसळून पडले. गांधीजींनीं या वेळीं आपल्या जागेचा राजीनामा देण्याचा निश्चय केला होता. लॉर्ड बर्कनहेड यांच्या नुकत्याच प्रसिद्ध झालेल्या जाहीर उद्गाराप्रमाणें कॉंग्रेस ही राजकीय संस्था व्हावयास, सूतमतदानाचा हक्क रद्द करणें जरूर होतें. गांधींजींनीं हळूहळू स्वराजिस्टांना आपले राजकीय प्रतिनिधीत्व अर्पण केलें. गांधीजींनीं यापुढें इतका नम्रपणा स्वीकारला कीं, त्यांनीं आपल्या हातांतील सर्व सूत्रें स्वराजिस्टांच्या स्वाधीन केली. "कॉंग्रेसच्या मार्गांत मी आतां आड येऊं इच्छित नाहीं. सुशिक्षित हिंदी लोकांच्या हातांतच तिचीं सूत्रें जाणें इष्ट आहे. गरीब जनतेच्या दृष्टीनें विचार करणाऱ्या माझ्यासारख्या माणसाचा या बाबतींत कांहीं उपयोग नाहीं. बुद्धिमान वर्गाच्या मनोवृत्तीला माझें धोरण आवडत नाहीं. त्यांच्यांत व माझ्यांत मूलतःच मत-

भेद आहेत. त्यांचें मन वळवावें अशी माझी अद्यापिही इच्छा आहे. कॉंग्रेसला मी सोडून जाणार नाहीं. स्वराजिस्टांच्या मार्गातून बाजूला होणें हाच त्यांना मदत करण्याचा उत्तम मार्ग आहे. कॉंग्रेसच्या मदतीनें विधायक कार्यक्रमाकडेच माझी सर्व शक्ति मी खर्च करीन. आणि हें सुद्धां कॉंग्रेसमधील बुद्धिवान लोकांची परवानगी मिळेल तर करूं शकेन." अशा आशयाचे विचार महात्माजींनीं ऑगस्ट महिन्यांत लिहिलेल्या लेखनांतून प्रगट केलें होते. एका बाजूला गांधीजींच्या तत्त्वांचा स्वराजिस्ट निषेध करीत होते व दुसऱ्या बाजूला गांधीजींचें नेतृत्व त्यांना पाहिजे होतें. गांधीजींच्या सहकार्याची स्वराजिस्टांना आवश्यकता वाटत होती. पण स्वराजिस्टांच्या मर्जीप्रमाणें गांधीजींनीं हें सहकार्य केलें पाहिजे अशी त्यांची इच्छा होती. गांधीजींचा संदेश एकच आहे व तोही आतां शिळा होत चालला आहे असें सरोजिनी नायडू यांनीं त्या वेळीं पुष्कळांजवळ उद्गार काढले होते. या वेळीं पंडित मोतिलाल यानीं स्कीन कमिटीवरील जागा पत्करली होती. पंडितजींचें हें कृत्य त्यांच्या पक्षांतील अनुयायांना आवडलें नाहीं. असेंब्लींतील स्वराज्यपक्षाच्या सभासदांच्या तीन चतुर्थांश बहुमतानें त्यांनीं ही जागा खरोखरीच स्वीकारावयास पाहिजे होती. पंडितजींच्या या कृत्याला वरीलप्रमाणें हरकत घेण्यांत आली. ही हरकत केवळ तांत्रिक नव्हती; तिला अधिक गंभीर स्वरूप प्राप्त झालें होतें. या कृत्यामुळें पक्षाच्या धोरणामध्येंच क्रांति घडून येण्याचा संभव होता. अशा प्रकारची जागा पत्करणें म्हणजे, प्रत्यक्ष सहकार्य करण्यास तयार होण्यासारखें आहे, असें स्वराज्य पक्षांतील आक्षेपकांचें म्हणणें होतें. स्कीन कमिटीवरील सभासदत्व पत्करल्यास, लष्करी प्रश्नाचें अंतरंग समजून घेण्याची व त्याचा अभ्यास करण्याची दुर्मिळ संधी मिळेल, असेंही समर्थन या वेळीं करण्यांत येत होतें. पण हें समर्थन कोणालाही पटण्याजोगें नव्हतें.

असेंब्लीच्या सिमला अधिवेशनाच्या ( १९२५-२६ ) प्रारंभीं इंडियन सँढर्स्ट कमिटीवरील जागा मोतिलाल नेहरू यांनीं पत्करली होती. स्कीन कमिटी या नांवानें ही कमिटी ओळखली जात होती. तेव्हां स्कीन कमिटीचा इतिहास या वेळीं थोडक्यांत सांगण्यास हरकत नाहीं. सँढर्स्टप्रमाणेंच हिंदुस्थानांतही एक मिलिटरी कॉलेज स्थापन करावें, अशी १९२५ पूर्वी कित्येक वर्षें हिंदी लोक मागणी करीत होते. १९२५ च्या अंदाज पत्रकांत, लष्करी शिक्षणाकरितां १ लाख रुपये नमूद करण्यांत आले होते. डेहराडून येथील प्रिन्स ऑफ वेल्स कॉलेज, जार्क-

दर व झेलम येथील किंग जॉर्ज मिलिटरी स्कूल्स यांच्याकरितां वरील रक्कम खर्च व्हावयाची होती. १९२५ सालीं ॲसेंब्लीच्या दिल्ली अधिवेशनांत पास झालेल्या ठरावाप्रमाणें सरकारला अशी सँढर्स्टप्रमाणें एखादी लष्करी शिक्षण संस्था हिंदुस्थानांतही स्थापावयाची होती. म्हणून सरकारनें या बाबतींत विचार करण्याकरितां पंडित मोतिलाल नेहरू, मि. जीना व जनरल सर अँड्र्यूज स्कीन (अध्यक्ष) यांची कमिटी नेमली. हिंदुस्थानांत या वेळीं लष्करी कॉलेज स्थापणें इष्ट व व्यवहार्य आहे कीं नाहीं तसेंच, हें कॉलेज स्वयंपूर्ण असावें कां पुढील शिक्षण इंग्लंडांत मिळेल अशी व्यवस्था करावी, या गोष्टींचा विचार करण्याकरितां ही कमिटी नेमण्यांत आली होती. या कमिटीच्या हिंदुस्थानांत पुष्कळ बैठकी झाल्या व १९२६ च्या उन्हाळ्यांत या कमिटीनें नेमलेल्या पोट कमिटीचे सभासद इंग्लंड, फ्रान्स, कॅनडा, अमेरिका वगैरे देशांतून लष्करी अधिकाऱ्यांची पैदास कशी करतात व त्यांच्या शिक्षणाची पद्धती कशी असते वगैरे माहिती मिळविण्याकरितां बाहेरदेशीं फिरून आले.

मुडिमन कमिटीच्या रिपोर्टावर जी महत्त्वाची चर्चा झाली तिच्याकडे आपण वळूं. १९२४ सालीं मॉंटफर्ड सुधारणांच्या अमलबजावणीचें परीक्षण करण्याकरितां मुडिमन कमिटी नेमण्यांत आली होती. या कमिटीनें बहुमत व अल्पमत वाल्यांचा रिपोर्ट असे दोन रिपोर्ट प्रसिद्ध केले होते. पहिला रिपोर्ट अर्थात सरकारी रिपोर्टच होता. तथापि, सरकार त्या शिफारशी मान्य करण्यास तयार नव्हतें. रिपोर्टातील मुख्य तत्त्व तरी मान्य करण्यांत यावें, असा एक ठराव १९२५ सालीं ॲसेंब्लीपुढें मांडण्यांत आला. राज्यकारभाराचें यंत्र जेथें जेथें करकरत असेल तेथें तेथें तेलाचे थेंब टाकावे, त्याच्या बेरिंग्जनाही चांगलें तेल द्यावें, दात्यांच्या चाकांतील घरघर कमी करावी, हेंच तें मुख्य तत्त्व होय. यामुळें दिवाणांचा पगार अंदाजपत्रकांत समाविष्ट करून, त्यावर मतें न घेतां दिवाणांची नेमणूक करणें शक्य होईल व कोणीही कितीही अडवणूक केली तरी, सरकारला आपला राज्यकारभार चालवितां येईल. मॉंटफर्ड सुधारणांत या गोष्टीची कल्पना करण्यात आली होती. असा प्रसंग फारा दिवसांनीं येईल अशी कल्पना होती. पण आतां या गोष्टी प्रत्यक्ष घडून येत होत्या. स्वराज्यपक्षाला आपल्यांतील प्रतिरोधाच्या शक्तीची पूर्ण जाणीव झाली होती. व म्हणूनच त्यांनीं १९२४ च्या फेब्रुवारीमध्यें पुढील ठराव ॲसेंब्लीपुढें मांडला होता:—

"हिंदुस्थानांत पूर्ण जबाबदारीचें स्वराज्य स्थापन करण्याच्या दृष्टीनें गव्हर्मेंट ऑफ इंडिया ॲक्टची फेरतपासणी करण्याची पुढील प्रमाणें उपाय योजना करावी.

(अ) देशांतील अल्पसंख्याकांचें हितसंबंध व हक्क सुरक्षित राहतील इकडे लक्ष देऊन स्वराज्याची घटना ठरविण्याकरितां एक प्रातिनिधिक गोलमेज परिषद सरकारनें लवकरच बोलवावी.

(ब) हल्लींचें वरिष्ठ कायदेमंडळ रद्द करून नवीन निवडलेल्या कायदेमंडळापुढें ही योजना संमतिकरितां ठेवावी. व ती कायद्यांत समाविष्ट करण्याकरितां ब्रिटिश पार्लमेंटकडे पाठवून द्यावी."

वरील ठरावाला अनुसरूनच मुडिमन कमिटीची नेमणूक करण्यांत आली होती. याच कमिटीतर्फे प्रसिद्ध झालेलें बहुमत व अल्पमत रिपोर्ट सर अलेक्झांडर यांनीं मांडलेल्या ठरावाच्या रूपानें ७ सप्टेंबर १९२५ रोजीं ॲसेंब्लीपुढें विचाराकरितां आलें होतें. या ठरावावर पंडित मोतिलाल नेहरू यांनीं एक लांबलचक उपसूचना आणली. तिचा सारांश पुढीलप्रमाणें होता. (१) हिंदुस्थानातील राज्यकारभारात व घटनेंत अशा प्रकारचे फेरफार करावे कीं, ज्याच्यायोगानें हिंदुस्थानांत पूर्ण जबाबदारीचें स्वराज्य प्रस्थापित होईल. (२) देशातील अल्पसंख्याकांचें हितसंबंध रक्षण होतील अशी घटना तयार करण्याकरितां एक प्रातिनिधिक गोलमेज परिषद भरवावी, किंवा अशी एकादी मध्यस्थ कमिटी नेमावी. ही उपसूचना ७२ विरुद्ध ४५ मतांनीं पास झाली. यावरून असें दिसून येईल कीं, १९२४ फेब्रुवारीतील ताणाताणीचें वातावरण १९२५ सप्टेंबरमध्यें अधिक स्नेहयुक्त बनलें होतें. व २४ फेब्रुवारीतील निव्वळ गोलमेज परिषदेची मागणी आतां मृदु करण्यांत आली होती.

बर्कनहेड यांनीं स्वराज्यपक्षासंबंधानें बोलतांना हिंदुस्थानांतील "एक अत्यंत सुसंघटित पक्ष अशी प्रशंसा केली होती." हें एका दृष्टीनें समाधानकारक होतें. परंतु लॉर्ड बर्कनहेड यांनीं अशाच एका पक्षाला मान्यता दिली होती कीं, ज्यानें त्यांच्या राज्यघटनेला व कारभाराला मान्यता दिली होती. स्वराज्यपक्षानें केवळ कौन्सिलप्रवेश केला होता असें नाहीं तर, कौन्सिलांतील जागा त्यांनीं स्वीकारल्या होत्या, अंदाजपत्रकांना मंजुरी दिली होती. व सिलेक्ट कमिटीवरही या पक्षाचे लोक काम करूं लागले होते. मुडिमन कमिटीवर काम

करण्याचें स्वराज्यपक्षानें नाकारलें, पण स्कीन कमिटीवरील जागेचा त्यांनीं स्वीकार केला. कांहीं तरी तडजोड घडून येईल याबद्दल लॉर्ड बर्कनहेड यांना आशा वाटत होती. त्याचप्रमाणें दे. दास यांनाहि आशा वाटत होती व पुढें पं. नेहरू यांनाही तसेंच वाटूं लागलें होतें.

सर बेसिल ब्लॅकेट यांनीं असेंब्लींतील पं. मोतीलाल यांच्या सहकार्यासंबंधानें पुढील स्पष्टोद्गार काढले होते:—

"पोलाद संरक्षक बिल, तसेंच गेल्या सालचें अंदाजपत्रक व रेल्वे बदलीच्या प्रश्नाचा स्वतंत्रपणें विचार करणें या सर्व बाबतींत पंडितजी दुसरें काय करीत आहेत? या मंडळाचें अध्यक्ष होऊन, मि. पटेल तरी दुसरें काय करीत आहेत?" यानंतर सर बेसिल ब्लॅकेट यांनीं पब्लिक अकौंटस कमिटीवर राहून अमूल्य कामगिरी बजावल्याबद्दल मि. ए. रंगास्वामी अय्यंगार यांची खूप स्तुति केली. वस्तुस्थिति अशी होती कीं, स्वराज्यपक्षाला कोणीकडून तरी सहकार्य करण्यास प्रवृत्त करावयाचें या प्रयत्नांत सरकार गुंतलें होतें.

१९२५ सप्टेंबरमध्यें पाटणा येथें घडलेल्या हकीकती सांगण्यापूर्वी स्वराज्य पक्षांतील पुढाऱ्यांत पक्षाच्या कार्यक्रमासंबंधानें कशा प्रकारचीं मतें प्रतिपादन करण्यांत येत होतीं हें पाहण्यासारखें होतें. महात्माजींनीं कांग्रेसचीं सर्व सूत्रें स्वराजिस्टांच्या हातीं सोंपविण्याचें ठरविलें होतें, या बद्दल आपली पूर्ण पसंती दर्शवून पं. मोतीलालजी त्याना लिहितात:—

"दे. दास यानीं पुढें केलेला सहकार्याचा हात लॉर्ड बर्कनहेड यांनीं झिडकारला. त्यामुळें आपल्या स्वातंत्र्याच्या झगड्यांत अद्यापि अनेक अडचणींना आपल्याला तोंड द्यावयाचें आहे. चुकीची माहिती मिळाल्यामुळें पूर्वग्रहदूषित झालेल्या अनेक विरोधकांना प्रतिकार करणेंही प्राप्त आहे. तेव्हां ठराविक धोरणाचा स्वीकार करून बेजबाबदार व अरेरावी सत्तेला तोंड देण्याची तयारी आपण करणें जरूर आहे."

"एकादा मध्यम मार्ग निश्चित करून त्याच्या अनुरोधानेंच काम करणें सध्यां जरूरीचें झालें आहे. आम्ही सरकारशीं सहकार्य करण्यास तयार नाहीं. आजच्या परिस्थितींत जें कांहीं हितावह, व्यवहार्य व शक्य आहे तेंच केलें पाहिजे." अशा आशयाचें आपलें मत लालाजींनीं २५ जुलै रोजीं वर्तमानपत्रांतून प्रसिद्ध केलें. बंगाली स्वराजिस्टांनीं दिवाणगिऱ्या स्वीकारण्याचें नाकारलें व

दिवाणमंडळ नेमूनही दिलें नाहीं, पण त्यांचें बल दिवसेंदिवस कमी होत चाललें होतें. बंगाल कौन्सिलच्या अध्यक्षाच्या जागेकरितां उभ्या असलेल्या स्वराजिस्ट उमेदवाराचा पराभव एका स्वतंत्र पक्षाच्या उमेदवारानें ६ मतांनीं केला होता. दे. दास यांना स्ट्रेचरवर घालून कौन्सिलमध्यें नेण्यांत आलें त्या वेळचीं परिस्थिति देखील संशयास्पद होती. याच सुमारास डॉ. सुऱ्हावर्दी यांनीं ना. गव्हर्नर यांची मुलाखत घेतली. त्या वेळीं खुद्द गांधीनींच या भेटीसंबंधानें नापसंती व्यक्त केली. डॉ. सुऱ्हावर्दी यांनीं ही अनुचित गोष्ट केली असून, राष्ट्राला त्यांनीं विकलें आहे," असें म. गांधींनीं म्हटलें. डॉ. सुऱ्हावर्दी यांना ही गोष्ट समजली, त्या वेळीं "या नव्या जुलमाखालीं राहण्यापेक्षां राजकीयदृष्ट्या मला मृत्यू पत्करावा लागल्यास ती अधिक मानाची गोष्ट आहे, असें जाहीर करुन डॉ. सुऱ्हावर्दी यांनीं स्वराज्यपक्षांतील सभासदत्वाचा राजीनामा दिला. डॉ. सुऱ्हावर्दी यांची मुलाखत वर्तमानपत्रांतून प्रसिद्ध झाली, त्या वेळीं महात्माजींनीं कलकत्त्यांतील एका वर्तमानपत्राच्या प्रतिनिधीजवळ पुढील उद्गार काढले. "पक्षाच्या परवानगी शिवाय कोणत्याही सभासदानें सरकारी अधिकाऱ्यांचीं भेट घेऊं नये, हा या पक्षाचा नियम हितकर आहे." २२ आगस्ट रोजीं श्री. विठ्ठलभाई पटेल हे असेंब्लीचे पाहिले बिनसरकारी अध्यक्ष झाले.

याच सुमारास म्हणजे २१ सप्टेंबर १९२५ रोजीं पाटणा येथें ऑ. इं. कॉं. कामिटीची सभा झाली. १९३४च्या मे महिन्यांत पाटणा येथें ऑ. इं. कॉं. कमिटीची सभा भरून, कायदेभंगाची चळवळ तहकूब करण्यांत आली ही गोष्ट लक्षांत घेतां पाटण्याची ही १९२५ सालची सभाही तशीच स्मरणीय झाली असें म्हणण्यास हरकत नाहीं. कारण या सभेंत कॉंग्रेसच्या घटनेंत तीन महत्त्वाचे फरक घडून आले. खादीचें महत्व नष्ट करण्यांत आलें. कॉंग्रेसचें चार आण्याचें सभासदत्व मान्य करुन सूतमतदानाचा हक्क वैकल्पिक करण्यांत आला. व सर्व राजकीय कार्यक्रम स्वराज्यपक्षाकडे सोंपविण्यांत आले. स्वराज्य पार्टी ही कॉंग्रेसची एक शाखा राहिलेली नव्हती. विरोध करणारी पार्टी राहिलेली नव्हती. सवलतींचा स्वीकार करणारी अल्पमतवाली पार्टी नव्हती किंवा जोराचें बहुमत करूं पाहणारी कटाकटीची बहुमतवाली पार्टीही नव्हती. ही पार्टी आतां प्रत्यक्ष कॉंग्रेसच बनली होती. यापुढील निवडणुकी स्वराज्यपार्टीतर्फे व्हावयाच्या नव्हत्या. आतां त्या कॉंग्रेसतर्फे व्हावयाच्या होत्या. आतां हे लोक 'स्वराजिस्ट' राहिले

नव्हते. कौन्सिलांतील कॉंग्रेसचे सभासद झाले होते. सूतमतदान हुक एकटाच कायम राहूं शकला नाहीं यार्चे कारण या कल्पनेला कोणाचा पाठिंबा मिळाला नाहीं म्हणून नव्हे; तर स्वराजिस्टांना ही गोष्ट आवडली नाहीं, म्हणून. सूतमतदानाच्या यादीवर १० हजार सभासद होते. लॉर्ड बर्कनहेड व लार्ड रीडिंग यांच्या म्हणण्याप्रमाणें म. गांधींनीं स्वराजिस्टांबरोबर अर्धा अधिक मार्ग चालून जावयार्चे ठरविलें होतें. १९२४ सालीं गोपीनाथ शहा यांच्या बाबत शिराजगंज येथें झालेल्या ठरावामुळे दे. दास यांच्या दर्जाला कमीपणा येण्याचा प्रसंग प्राप्त झाला व त्यांच्या स्वातंत्र्यावरही गदा येण्याचा संभव दिसला. त्यानंतर बंगाल ऑर्डिनन्स ॲक्टही पास झाला. त्या वेळीं महात्मा गांधींनीं दास यांचा पाठीराखेपणा करण्यार्चे ठरविलें. या वर्षी दे. दासांचें निधन झालें व लॉर्ड बर्कनहेड यांचें गुरकावणें हवेंत गुरगुरत राहिलें. असहकारिता पक्षाचे मागे राहिलेले पुढारी संघटित करून कौन्सिलांतून चळवळ करणाऱ्या लोकांना त्यांनीं सर्व प्रकारचीं मदत करण्यार्चे ठरविलें. यामुळेंच पाटणा येथील ऑ. इं. कॉंग्रेस कमिटीच्या सभेंत स्वराज्यपार्टीकडे सर्व राजकीय कार्यक्रम सुपूर्द करण्याचा ठराव एकाएकीं पुढें आला. वर्किंग कामिटीपुढें ता. २२ रोजीं सकाळीं हा ठराव आला. फक्त पाचच मिमिटें या ठरावावर विचार करण्यात आला. पाटणा येथील सभेंत या बाबत जो मुख्य ठराव झाला त्यातील 'ब' कलम पुढील प्रमाणें होतें.

" महात्मा गांधी व दास नेहरू याच्यांत झालेल्या कराराला बेळगांवच्या अधिवेशनांत पुष्टि देण्यांत आली व विधायक कार्यक्रमाचा अमल करण्यार्चे काम कॉंग्रेसनें करावें व वरिष्ठ व प्रांतिक कायदेमंडळांतील काम स्वराज्यपक्षाकडे सोंपवावें, असें ठरविण्यात आलें. स्वराज्य पार्टीनें हें काम करण्याकारिता आपले स्वतंत्र नियम बनवावे व त्या करितां लागणारा फंडही स्वतंत्रपणें उभारावा अशी त्यास मोकळीक देण्यात आली.

२ परंतु बदललेल्या परिस्थितींत इतर निर्बंधही काढून टाकून कॉंग्रेस मुख्यतः राजकीय संस्था बनवावी.

३ कॉंग्रेसनें यापुढें देशहिताला जरूर त्या सर्व चळवळी हातीं घ्याव्या व कॉंग्रेसच्या सर्व साधनांचा व पैशाचा उपयोग करावा. अर्थात् ऑ. इं. खादी बोर्ड, प्रां. खादी बोर्ड, व म. गांधींनीं सुरू केलेलीं ऑ. इं. स्पिनर्स असोसिएशन यांच्याकरितां राखून ठेवलेला कॉंग्रेसचा फंड त्या त्या संस्थांकडेच राहूं द्यावा.

वरिष्ठ व प्रां. कायदेमंडळांतील काम स्वराज्य पार्टीनें ठरविलेल्या धोरणा-प्रमाणें व नियमाप्रमाणें करावें, तसेंच, कॉंग्रेसलाही वेळोवेळीं आवश्य वाटेल त्या प्रमाणें या धोरणांत व कार्यक्रमांत बदल करण्याचा हक्क असावा.

"वरिष्ठ व प्रां. कौन्सिलांतील कामकाज कॉंग्रेसनें वेळोवेळीं ठरविलेल्या धोरणाप्रमाणें करण्यांत यावें" अशी उपसूचना करण्यांत आली व 'ब' कलमा-ऐवजीं वरील उपसूचना त्या ठिकाणीं घालण्यांत यावी असें सुचविण्यांत आलें. स्वराज्य पार्टीच्या मध्यस्थीची जरूरी न ठेवतां खुद्द कॉंग्रेसचेंच हें काम हातीं घ्यावें असा या उपसूचनेचा अर्थ होता. स्वराज्यपक्षानें राष्ट्राचा विश्वासघात केला आहे, असेंही उपसूचना मांडतांना सांगण्यांत आलें. त्या वेळीं पंडितजी संतप्त झालें व सभेंत सर्वत्र गोंधळ माजला. परंतु, गांधीजींनीं मध्यें पडून उप-सूचना मांडणारानें आजच्या प्रसंगीं स्वराज्य पार्टीची खरडपट्टी काढण्याचें मनांत आणूं नये अशी विनंति केली व सभेंत सर्वत्र स्थिरस्थावर केलें.

पं. मोतिलाल नेहरू यांनीं वाटेल तें मागावें व म. गांधी यांनीं त्यांना तें देऊन टाकावें अशा मनःस्थितींत म. गांधी या वेळीं होते. ऑ. इं कॉं.कमिटीचे अध्यक्ष या नात्यानें महात्माजींनीं स्वराज्य पार्टीच्या कार्याचें परीक्षण करण्यासही कोणाला परवानगी दिली नाहीं. या वेळीं उत्पन्न झालेलें वातावरण नष्ट होईल व आपण जें देणार त्याच्या मागें असलेलें प्रेमाचें वातावरणही नष्ट होईल, असें महात्माजींना वाटलें. "दास नेहरूंशीं आपला कांहीं करार झाला आहे काय," असें ज्यावेळीं राजेंद्रबाबूंनीं विचारलें, त्या वेळीं गांधीजींनीं नकारार्थी उत्तर दिलें. परंतु दुसरा पक्ष जें काय मागेल तें तें सर्व त्याला देऊन टाकणें हें आपलें ब्रीद आहे असें गांधीजींनीं सांगितलें. म. गांधी जे मागतील ते त्याना देऊन टाकणें हें त्याच्या अनुयायांचेंही ब्रीद होतें. यामुळें या बैठकींत सर्व गोष्टी गांधीजींच्या मनाप्रमाणें घडून आल्या.

पाटणा येथें झालेल्या ठरावामुळें कॉंग्रेसवाल्यांत फारकत झाली कां, ते भागीदारीच्या व सहकारितेच्या भावनेनें परस्परांशीं वागू लागले असा प्रश्न साहजिकच उद्भवतो. 'भटाला दिली ओसरी व भट हातपाय पसरी' असाच अनुभव या बाबतींत आला. बेळगांव कॉंग्रेसच्या वेळची न्यायबुद्धि पुढें राहिली नाहीं. बेळगांव येथें जें घडून आलें तें पाटणा येथें झुगारण्यांत आलें. कौन्सिल-पक्षानें कॉंग्रेसची इभ्रत राखण्याची सर्व जबाबदारी आपल्या अंगावर घेतली. व

सूतमतदान हक्कही काढून घेतला. यामुळें कौन्सिलचे फेरिस्ते व खादीचे पुरस्कर्ते यांच्यांत फारकत घडून आली. ऐक्याचा देखावा बाहेर कितीही दिसला तरी खादीवाल्या पक्षांतील असंतोष लोकांच्या लक्षांत आल्यावांचून राहिला नाहीं. " गोलमेज परिषद किंवा या सारखीच दुसरी एकादी बैठक " ही स्वराजिस्टांची मागणी अपुरी आहे असेंच सर्वांना वाटलें. पक्षकारानें दिलेल्या सूचना वकीलानें मानल्या नाहींत, असेंच या प्रसंगीं दिसून आलें. पण गांधीजींना हा हिशेब नको होता. जेव्हां ते कोणाला कांहीं देतात त्या वेळीं ते निःसकोच वृद्धीनें देतात. या वेळीं या दानाबद्दल त्यांच्या मनांत दिलगिरीचा लवलेश नसतो व ते घेणाराच्या मनांतही तशी भावना उत्पन्न न होण्याची ते खबरदारी ते घेतात. पितामह भीष्मांनीं दानाच्या मागें हीच भावना असावी असें सांगितलें आहे. अर्थात् कानपूर येथें पाटणानें दिलेल्या सनदाच रजिस्टर करण्यांत आल्या.

कानपूर कॉंग्रेस जवळ येत चालली होती ( १९२५ ). कॉंग्रेसच्या घटनेप्रमाणें श्री. सरोजिनी देवींना कॉंग्रेसचे अध्यक्ष निवडण्यांत आलें होते. " श्री. सरोजिनी देवींनीं जेथें पाऊल ठेवावयास पाहिजे त्या ठिकाणीं मी पाऊल ठेवीत आहे " असें महात्माजींनीं बेळगांव कॉंग्रेसच्या वेळींच म्हटलें होतें. कॉंग्रेसच्या नियुक्त अध्यक्ष श्री. सरोजिनी देवी यांनीं आक्टोबरच्या प्रारंभीं नव्या वर्षाचा पुढील आशयाचा संदेश जाहीर केला होता:—

" हिंद मातेला आपल्या घरांतील सर्व सत्ताधारी धनीण बनवावी, तिचा खरा दर्जा तिला प्राप्त करून द्यावा, असाच स्त्रीला शोभण्यासारखा माझा साधा, मर्यादशील व घरगुती कार्यक्रम आहे. आपल्या प्रचंड सांपत्तिक साधनांची हिंद मातेला मालकीण बनवावें, कोणाचें आतिथ्य करावें किंवा कोणाचें करूं नये, हें तिचें तिनें ठरवावे, असाच माझा कार्गक्रम आहे. येत्या वर्षात भारत मातेची एकनिष्ठ कन्या या नात्यानें माझ्या आईच्या घराची व्यवस्था लावून देणें, हें रमणीय काम मला करावयाचें असलें तरी तें अत्यत विकट आहे. देशांत आज शोचनीय झगडे चालूं आहेत. देशांतील निरनिराळ्या जमाती व धर्मपंथ यांच्यातील ऐक्यावर आज प्राणसंकट प्राप्त झालें आहे. हिंदुस्थानांतील एकत्र कुटुंब पद्धतीवरच यामुळें घाला येऊं पाहात आहे. हे सर्व तंटे आपल्याला मिटवावयाचे आहेत. रावापासून रंकापर्यंत सर्व हिंदमातेच्या लेकरांना, सावत्र लेकरांनासुद्धां, तसेंच देशांत येऊन राहिलेल्या पाहुण्यांना व परकीयांनाही त्यांचा योग्य व

मानास्पद दर्जा प्राप्त होईल, असा प्रयत्न आपल्याला करावयाचा आहे." हें फार सुंदर ध्येय आहे. विशेषतः स्त्री या नात्यानें ठेवण्यात आलेलें हें ध्येय फारच रमणीय आहे. पण नाफेरवाद्यांनीं हा सलोखा कसा घडवून आणावा ? पाटण्याच्या ठरावाला मान्यता द्यावी किंवा राजीनामा देऊन कॉंग्रेसपासून अलग व्हावे असा महात्माजींनीं असहकारितावाद्यांवर प्रसंग आणला होता. त्यांनीं स्वस्थ पडून राहावें किंवा स्वतःचें अस्तित्वच नष्ट करून टाकावें अशी परिस्थिति निर्माण झाली होती. आपल्या तत्त्वांना ऊजळा देऊन, गांधीजींनीं या वेळीं आपला कार्यक्रम तात्पुरता मागे घेतला होता.

जनता तयार होती. पण तिला धक्का देणारी शक्तीच आतां अस्तित्वांत राहिलेली नव्हती. राष्ट्रांत नवजीवन ओतणारी व नवचैतन्य निर्माण करणारी स्वतंत्र शक्ति असावी लागते; हा स्फूर्ती उत्पन्न करणारा कार्यक्रम बुद्धिमान् लोकांनींच ठरवावयाचा असतो. पण ते लोक आतां मागें पडले होते. साधन सामुग्री तयार होती पण तिचा उपयोग करणारा कोणी नव्हता. दारू तयार होती, पण ती पेटविणारा कोणीच नव्हता. पण असल्या स्थिरतेच्या काळांतही स्थानिक संस्था काबीज करण्याच्या कल्पनेमुळें तरुणाचीं मनें आकर्षून जाण्यास एक साधन मिळालें होतें. कॉंग्रेसच्या निवर पुढाऱ्याना बऱ्याचशा सार्वजनिक चळवळी करावयाच्या होत्या व त्यांचें मन गुंतून राहील असें कार्यक्रमही त्याच्या पाशीं होतें. तथापि, तरुणांच्या उत्साहशक्तिचा कसा उपयोग करावयाचा व तिला कसें वळण लावावयाचें हा एक प्रश्न होता. निवडणुकीच्या आवेशानें त्यांचें मन भरून गेलें होतें. या निवडणुकींतील जाणीवेनें व विश्वासानें त्यांचीं अंतःकरणें भारून गेलीं होतीं. कलकत्ता कॉर्पोरेशनच्या मेयरच्या निवडणुकींत ही गोष्ट दिसून आली होती. प्रथम देशबंधु दास व नंतर सेनगुप्त ह्यांच्या निवडणुकीनें हेंच काम केलें होतें. देशांतील चार मोठी कॉर्पोरेशनें कॉंग्रेसच्या लोकांनीं काबीज केलीं होतीं. वल्लभभाई पटेल हे अहमदाबाद म्युनिसिपालिटीचे अध्यक्ष झाले होते. व १९२८ पर्यंत त्यांनीं आपली ही जागा आपल्याकडे राखून ठेवली होती. श्री. विठ्ठलभाई पटेल यानीं मुंबईच्या कॉर्पोरेशनला भूषविलें होतें. असेंब्लीचे अध्यक्ष झाल्यावर आपण आपलें काम कसें बजावाल असें त्यांना विचारलें असता सस्मित होऊन ते म्हणाले, "बॉम्बे कार्पोरेशनचा अध्यक्ष असतांना जसें मी काम केलें तसें करीन" पं. जवाहरलाल हे अलाहा-

बाद कॉर्पोरेशनचे अध्यक्ष झाले. परंतु, स्थानिक संस्था कॉंग्रेसवाल्यांच्या उपयोगी नाहींत, हें त्यांच्या अनुभवास आलें. बाबू राजेंद्रप्रसाद हे पाटणा म्युनिसिपालिटीचे अध्यक्ष होते. पण त्यांना या बाबतींत जो अनुभव आला, त्यावरून त्यांना फारसें समाधान झालें, असें दिसून आलें नाहीं. १५ महिन्यांतच त्यांनीं हें काम सोडून दिलें. मद्रास कॉर्पोरेशनच्या बाबतींत कॉंग्रेसवाल्यांना हाच अनुभव आला. १९२५ च्या मे महिन्यांत मद्रास कॉंग्रेस कमिटीनें कॉर्पोरेशनमधील जागा काबीज करण्याच्या बाबतींत लक्ष घातलें. व उत्साहशक्ती व पैसा किती खर्च झाला याचा विचार न करतां १० पैकीं ७ जागा काबीज करण्यांत तिनें यश मिळविलें. विधायक कार्यक्रम तडीस नेण्याच्या हेतुनें स्थानिक संस्था काबीज करावयाच्या असें ठरलें होतें. ही कल्पना अत्यंत स्तुत्य होती. आणि सरकारनें या बाबतींत कॉंग्रेसला प्रतिकार करण्याची खटपट केली, तरी कॉंग्रेसवाल्यांनीं स्थानिक-संस्था काबीज केल्या व आपला हेतु सिद्धीस नेण्याचा प्रयत्न केला. सरकारची चक्की सावकाश चालते खरी, तथापि तिचें दळण्याचें काम अखंड व शांतपणानें चालूं असतें. कॉंग्रेसवाले, स्थानिक-संस्था काबीज करूं लागले हें पाहून, सरकारनें त्यांच्या कामांत वर सांगितल्याप्रमाणें अर्थातच अडथळा आणण्याचा प्रयत्न केला. जे लोक तुरुंगात जाऊन आलेले आहेत त्यांना स्थानिक संस्थातून शिक्षकाच्या किंवा इतर जागावर नेमणें सरकारनें अशक्य करून सोडलें. तसेंच, खादी खरेदी करणें, हिंदी शिकविणें, शाळामधून चरख्याचें शिक्षण सुरूं करणें, राष्ट्रीय पुढाऱ्याचें स्वागत करणें, व त्यांचीं व्याख्यानें करविणें, स्थानिक संस्थांच्या शाळांवर व ऑफिसवर राष्ट्रीय झेंडा लावणें, ह्या सर्व गोष्टींना सरकारनें बंदी केली होती. कांहीं झालें तरी या संस्थांनीं एक नवीनच तेज निर्माण केलें ह्यात मात्र शंका नाहीं. श्री. श्रीनिवास अय्यंगार याना कॉंग्रेसच्या चळवळींत ओढण्यास हीच चळवळ कारणीभूत झाली. मद्रास शहरांतील कॉंग्रेसवाल्यांचें पुढारीपण त्यांनीं घेतलें. सार्वजनिक कामाकरितां लागणारा पैसा त्यांनीं खर्च केला. व थोड्याच दिवसात ते तेथील कॉंग्रेसपक्षाचे पुढारी बनले. नवे कार्यक्रम नव्या पुढाऱ्यांना निर्माण करतात. जुन्या पुढाऱ्यांना नवें वादळ सहन होत नाहीं व त्यांतून आपलें जहाज हाकारण्याची ताकद त्यांच्यांत उरलेली नसते.

एकंदरींत १९२५ साल अत्यंत खळबळीचे गेलें. खादीचा प्रसार, अस्पृश्यता

निवारण, जातीय ऐक्य, असले कार्यक्रम नाफेरवाले करीत होते, तरी त्यांच्यातही फांटाफूटीला सुरुवात झाली होती. फेरवाद्यांनीं तर एक नवीनच कार्यक्रम हातीं घेतला होता, तेव्हां त्यांच्यांत मतभेद उत्पन्न झाले तर त्यांत कांहीं नवल नव्हतें. स्वराज्य पार्टीविरुद्ध मध्यप्रांत व महाराष्ट्र ह्या प्रांतांत प्रथम बंडाचें निशाण उभारलें गेलें. देशबंधू दास जिवंत असेपर्यंत महाराष्ट्रानें बंगालची पाठ सोडली नव्हती. परंतु, देशबंधूच्या मरणानंतर महाराष्ट्रानें आपलें डोकें वर काढलें. कोणी कांहीं वाह्यातपणा करूं लागला, तर ती गोष्ट देशबंधूंना सहन होणें शक्य नव्हतें. गांधींपासून ज्यांनीं आपल्याला लागणाऱ्या सवलती मिळविल्या होत्या ते देशबंधू दास आपल्या पक्षांतील बंडवाल्या भटक्यांना दाद देतील असा संभव नव्हता. परंतु, देशबंधू निधन पावल्याबरोबर महाराष्ट्रांत एक अनपेक्षित गोष्ट घडून आली. मध्यप्रांत कौन्सिलचे स्वराजिस्ट अध्यक्ष श्री. तांबे यांनीं कार्यकारी मंडळावरील सभासदाची जागा पत्करली. मध्यप्रांत, वऱ्हाड व महाराष्ट्र ह्या प्रांतातील पुढाऱ्यात ह्याच वादाला जोरानें सुरुवात झाली. पंडित मोतिलाल-जींनीं श्री. तांबे ह्याच्या वर्तनाबद्दल संताप व्यक्त केला. केळकर जयकरां-सारख्यानीं ह्या गोष्टीकडे लक्ष देऊं नये या बद्दल त्यांना आश्चर्य वाटलें. या गोष्टीला मदत केल्या बद्दल वरील व ह्या दोन गुन्हेगारांविरुद्ध शिस्तीचा भंग केल्याबद्दल शासन करण्याची धमकी पं. नेहरू यांनीं दिली. मुंबईच्या स्वराज्य-पार्टीनेंही कोणालाही न डरतां आपल्या मनांतील भावना व्यक्त कराव्या असें केळकर–जयकर सांगत होते. केळकराचा घोष शब्द ‘ अमृतसरकडे परत चला ’ ( Back to Amritsar ) असा होता. पंडित मोतीलाल नेहरू हेही तितकेंच कडक होते. नागपूर येथें १९२५ च्या नोव्हेंबरांत भाषण करतांना ते म्हणाले कीं, “ श्रीयुत तांबे ह्यानीं अधिकाराची जागा स्वीकारली हीं अगदीं एकाएकीं घडून येणारी गोष्ट नाहीं. अधिकाराच्या जागा स्वीकाराव्या ह्याबद्दल पुष्कळ दिवस चाललेल्या चळवळीचें तें फळ आहे. ” पंडितजींनीं स्कीन कमिटीवरील जागा कां स्वीकारली असें त्याना उलट विचारण्यांत आलें. ह्या दोन्ही गोष्टी अत्यंत भिन्न आहेत हें सांगावयास पाहिजे असें नाहीं. मध्य प्रांतांत स्वराजिष्टांची परिषद भरली त्या वेळीं अभ्यंकर खरे एका बाजूला व डॉ. मुंजे एका बाजूला–अशा या दोन तटांत आवेशयुक्त व कडाक्याचा वादविवाद झाला. दिवाण-गिरीच्या जागा स्वीकारण्याबद्दल डॉ मुंजे अनुकूल आहेत अशी शंका लोकांना वाटू

लागली होती. श्री. राघेंद्रराव व बी. जी. खापर्डे हे स्वीकार करण्याच्या पक्षाकडे होते. डॉ. मुंजे ह्यांनीं अत्यंत आवेशानें हा आरोप नाकारला. पण त्यांचें या बावतींतील एक पत्र उघडकीस आल्यामुळें आपण व्यक्तिशः दिवाणगिऱ्या स्वीकारण्याच्या बाजूचे असलों तरी स्वराज्यपक्षाशीं व त्याचे पुढारी पंडित मोतीलाल ह्यांच्याशीं आपण एकनिष्ठ आहों, असें त्यांनीं जाहीर केलें. श्री. केळकर यांनीं स्वराज्यपक्षाची शिस्त कडक असल्याबद्दल वर्तमान पत्रांतून तक्रार केली. अशा प्रकारची शिस्त पक्षामधील निरनिराळ्या गटांच्या आकांक्षेच्या आड येते असें त्यांचें म्हणणें होतें. वरिष्ठ कायदेकौन्सिलात सतत व संगतवार अडवणूक चालू ठेवावयाची या मूळच्या कार्यक्रमापासून स्वराज्यपक्ष च्युत झाला आहे. आजच्या परिस्थितींत अधिकाराच्या जागा स्वीकारणें हेंच तर्कशुद्ध आहे असें त्यांनीं प्रतिपादन केलें. " अशी एक वेळ होती कीं, ज्यावेळीं आपण ॲसेंब्ली-मध्यें विधायक कार्यक्रमाची सूचनाच आणू शकत नव्हतो. कोणतेंही बिल सिलेक्ट कमिटीकडे पाठवावें, असला साधा ठरावही असेंब्लीपुढें सरकारनि-युक्त सभासदाना आणतां येत नव्हता. नंतर अशी वेळ आली कीं, आपल्याला असले ठराव मांडतां येऊं लागले परंतु, कमिट्यांवर काम करण्याची मोकळीक मात्र आम्हांला नव्हती. कमिटीवरील लोकनियुक्त जागाच तेवढ्या स्वीकाराव्या अशी वेळ आली. या नंतर लोकनियुक्त जागाही आपण स्वीका-राव्या असाही बूट निघाला. हे सगळे प्रगतीपर बदल स्वाभाविकच होते, व आपलें नवें निश्चित धोरण स्वीकारण्याची लक्षणें दिसूं लागली. ऑल इंडिया स्वराज्य-पार्टीच्या कार्यकारी मंडळाची सभा नागपूर येथें, १ नोव्हेंबर रोजीं झाली. ह्या सभेंत श्री. श्रीपाद बलवंत ताबे ह्यांनीं शिस्त मोडली. पार्टीचा विश्वासघात केला म्हणून त्यांचा तीव्र निषेध करण्यात आला.

आतां आपण मुंबईकडे वळूं. पं. मोतीलालजी ह्या वेळीं नागपूरहून मुंबईस घाईनें आले होते. जयकर–केळकरांचें बंड मोडून काढावें ह्या उद्देशानें त्यांचें मुंबईला आगमन झालें होतें. केळकर-जयकरांनीं प्रथमच प्रतियोगी सहकारितेची घोषणा केली होती. पुढें ह्या दोघां विद्वान् राजकीय पुढाऱ्यांनीं स्वराज्यपार्टीच्या कार्यकारीमंडळावरील आपल्या जागेचा राजीनामा दिला व पुढील आशयाचें पत्रक प्रसिद्ध केलें. " नागपूर येथें झालेल्या कराराचा पं. मोतीलाल हे भंग करीत आहेत. आणि प्रतियोगी सहकाऱ्यांविरुद्ध त्यांनीं एक स्वारीच काढली

आहे. ह्या टीकांना उत्तर देण्याचा आमचा हक्क आम्हीं बजावीत आहोंत. आम्ही स्वस्थ बसलों तर लोकांच्या मनांत व्यर्थ गैर समजूती उत्पन्न होतील. स्वराज्य पार्टीच्या कार्यकारी कौन्सिलांतील सभासदत्वाचा राजीनामा देणें योग्य आहे असें आम्हांला वाटतें. तथापि, पंडितजींवर टीका करण्याचा आमचा हक्क आम्ही बुडवूं इच्छित नाहीं. आमच्या दोस्तांना अडचणींत आणूं नये म्हणून आम्ही राजीनामे दिले आहेत. पंडितजींवर स्वतंत्र व मोकळेपणानें टीका करतां यावी, म्हणूनही आम्ही राजीनामा देत आहोंत."

एवढ्यानेंच भागलें नाहीं, तर डॉ. मुंजे, केळकर व जयकर ह्यांनीं कायदे-मंडळांतील आपल्या सभासदत्वाचाही राजीनामा दिला. स्वराज्याच्या तिकीटा-वर ते निवडून आल्यामुळें या जागांचा राजीनामा देणेंच योग्य आहे असें त्यांना वाटलें.

ह्याप्रमाणें स्वराजिस्टांच्या दुर्गंधीपासून आपला बचाव करण्याकरितां आपलें शरीर, आत्मा व वस्त्रें धुवून पिळून स्वच्छ केलीं. पंडितजींनीं ९ नोव्हेंबर रोजीं ह्या पत्रकाला उत्तर दिलें. स्वराज्यपार्टीनें आपला स्वतंत्र कार्यक्रम आंखला आहे. सहकारिता, असहकारिता, विघातक अविघातक ह्यांचा जसा प्रसंग येईल, व राष्ट्राची मागणी पुढें मांडावयाची असेल त्यावेळीं जरूर त्या धोरणांचा अव-लंब करावयाचा असा स्वराज्यपार्टीचा उद्देश आहे. जयकरांनी पंडितजींच्या ह्या अरेरावी धोरणाबद्दल संताप व्यक्त केला. शेवटीं ४ सप्टेंबर रोजीं कॉंग्रेसची बैठक होईपर्यंत स्वराज्यपार्टीच्या धोरणासंबंधानें सर्व सार्वजनिक वादविवाद बंद करावयाचा असें ठरविलें.

१९२५ सालीं घडून आलेल्या एका विशिष्ट प्रसंगाबद्दल माहिती सांगणें जरूर आहे. कॉंग्रेसशीं या प्रसंगाचा प्रत्यक्ष काहीं सबंध नाहीं, परंतु, कायदे-भंगाच्या राज्य उलथून पाडण्याच्या धोरणामुळें हा प्रसंग घडून आला असें सरकारचें म्हणणें होतें. सीताराम राजू ह्याच्या नेतृत्वाखालीं गोदावरी व विजगापट्टण जिल्ह्यांत एक बंड झालें. मोपल्याच्या बंडाच्या बाबतींत सरकारनें अशींच चुकीची समजूत करून घेतली होती. १९२२ सालीं ह्या गुदेद बंडाला सुरुवात झाली. मोपल्यांच्या बंडाप्रमाणें जातीय तंट्याचा या बंडाशीं कांहीं संबंध नव्हता. ह्या बंडांतही लष्करी हालचाली करण्यांत आल्या. परंतु, १९२३ अखेरपर्यंत ह्या बाबतींत फारशी प्रगती झाली नाहीं. १९२४ सालीं आसाम

रायफल्स पलटण तिकडे पाठविण्यांत आली. ह्या पलटणींत २५० अधिकारी व इतर रॅंकमधील लोक होते. सिताराम राजूचे अनुयायी फार तर २०० लोक असतील, परंतु, ह्या लोकांनीं गनिमी काव्याचें युद्ध लढवून एवढ्या प्रचंड शक्तिमान् ब्रिटिश सरकारला ३ वर्षे दमवून सोडलें. परंतु, यांतील अत्यंत दुःख-कारक गोष्ट म्हणजे सीताराम राजूला गोळी घालून ठार करण्यांत आलें, ही होय. अटकेंतून पळून जाण्याचा प्रयत्न केल्यामुळें त्याच्यावर गोळी झाडण्यात आली असें सांगतात. सरकारने ह्या बाबतींत तपशीलवार हकीकत प्रसिद्ध करावी व चौकशीचा रिपोर्ट प्रसिद्ध करावा अशी मागणी सरकारजवळ करण्यांत आली, पण सरकारनें तिला दाद दिली नाहीं.

आता आपण कानपूरच्या कॉंग्रेसकडे वळूं. ह्या कॉंग्रेसपुढें अनेक प्राणसंकटें दत्त म्हणून उभीं होतीं. पाटण्यानें काढलेल्या हुकूमावर शिक्कामोर्तब करावयाचें एवढेंच काम कानपूरला करावयाचें होतें. या कॉंग्रेसमधलि पहिली महत्त्वाची गोष्ट म्हणजे, महात्मा गांधींनीं सरोजिनी देवींना आपल्या कामाचा चार्ज दिला ही होय. गांधी यावेळीं फक्त ५ मिनिटेंच बोलले. ते म्हणाले कीं, "गेल्या ५-वर्षांत मी जे काय काम केलें आहे, त्याच्या अनुभवावरून त्यांतील एकही कलम मागें घ्यावें किंवा एकही मत परत घ्यावें असें मला वाटत नाहीं. जीवनाचा जसजसा मी अधिकाधिक विचार करतों, तसतसें जें जें पाऊल मी पुढें टाकलें तें बरोबर होतें अशी माझी खात्री झाली आहे. लोकांमध्यें तितकी आच व उत्साह आहे, असें मला आढळेल तर आजसुद्धां मी कायदेभंगाला सुरुवात करीन. पण दुर्दैवानें तसें मला आढळून येत नाहीं." अगदी निवडक शब्दांत उत्तर देऊन सरोजिनी देवींनीं आपल्या कामाचा चार्ज घेतला. त्यांचें अध्यक्षीय भाषण कॉंग्रेसच्या व्यासपीठावरून झालेल्या सर्व अध्यक्षीय भाषणांत अत्यंत लहान, पण अत्यंत गोड असें झालें. त्यांनीं आपल्या भाषणांत पक्षोपपक्षांत ऐक्य व्हावें, हिंदुस्थानांतील निरनिराळ्या जमातींत ऐक्य व्हावें व परदेशांतील हिंदी लोकांतही ऐक्य व्हावें, असा उपदेश केला. असेंब्लीच्या द्वारा ठेवण्यात आलेल्या राष्ट्रीय मागणीकडे लक्ष वेधून, तिच्या प्राप्तीकरितां निर्भयपणें झगडत राहिलें पाहिजे असें त्यांनीं सांगितलें. एकंदरींत त्यांचें भाषण उत्साह व आशा या भावनांनी भरलें होतें. या अधिवेशनांत त्यांनीं आपल्या नाजुक हातांनीं वेळोवेळीं निर्देश करून, शिस्त राखण्याचा प्रयत्न केला.

व अनेक प्रसंगीं सहनशीलवृत्तीनें हें काम तडीस नेलें. कामगारांच्या कांहीं मिरव-णुका व कांहीं प्रतिनिधींमधील भांडणें, याशिवाय कॉंग्रेसचीं बाकी सर्व कामें शांतपणें पार पडलीं. वरील गडबडी शांत करण्याच्या कामीं पंडित जवाहरलालसारख्या कणखर पुढाऱ्यांनीं त्यांना साह्य केलें. देशबंधु दास, सर सुरेंद्रनाथ बानर्जी, डॉ. सर रामकृष्ण गोपाळ भांडारकर व इतर कांहीं पुढारी यांच्या निधनाबद्दल दुःख प्रदर्शित करून, कॉंग्रेसच्या कामाला सुरुवात झाली. साऊथ् आफ्रिकेहून हिंदुस्थानांत आलेल्या शिष्टमंडळाचें कॉंग्रेसनें स्वागत केलें. एरिया रिझर्व्हेशन (जमीन राखून ठेवणें), एमिग्रेशन रजिस्ट्रेशन (दक्षिण आफ्रिकेंत जाणाऱ्या लोकांचीं नांवें नोंदणें) वगैरे बिलें पास करणें म्हणजे १९१४ सालीं झालेला स्मटस-गांधी करार मोडण्यासारखेंच आहे, असें कॉंग्रेसनें आपलें मत दिलें. आणि या बाबतींत निर्णय देण्याकरिता पंचकमिटी नेमण्यांत यावी अशी आग्रहाची मागणी केली. या प्रश्नाचा निर्णय लावण्याकरिता गोलमेज परिषद भरविण्याच्या कल्पनेलाही कॉंग्रेसनें दुजोरा दिला. आणि हें बिल पास झालें असलें तरी साम्राज्य सरकारनें त्याला समति देण्याचें तहकूब ठेवावें, अशी सूचना करण्यांत आली. बंगाल ऑर्डिनन्स ॲक्ट व गुरुद्वार कैदी या प्रश्नाचा स्वतंत्र ठराव करून विचार करण्यांत आला. ब्रह्मदेशांतील रहिवासी नसलेल्या लोकांना हाकून लावण्याचें बिल व समुद्रांतून प्रवास करणाऱ्या उतारूवर ब्रह्मदेशात घेण्यांत येणारा कर यांच्यासंबंधानेंही कॉंग्रेसमध्यें विचार झाला, व हीं बिलें म्हणजे नागरिकांच्या स्वातंत्र्यावर घाला घालणारीं आहेत, असें आपलें मत दिलें. नंतर मतदान हक्कासंबंधाचा ठराव कॉंग्रेसपुढें आला. पाटणा येथें (२२-९-१९२५) पास झालेल्या या ठरावाचें 'बी' कलम कॉंग्रेसपुढें विचाराकरित मांडण्यांत आलें. देशाच्या हितरक्षणाच्या दृष्टीनें जरूर ती राजकीय कामें कॉंग्रेसनें हातीं घ्यावी आणि आपली सर्व साधन संपति व आपल्यापाशीं असलेलें सर्व द्रव्यबल या कामीं उपयोगांत आणावें असें या ठरावांत म्हटलें होतें. कायदे-भंगावर आपला विश्वास असल्याचें कॉंग्रेसनें पुनः जाहीर केलें व सर्व राजकीय चळवळी करतांना स्वावलंबनावर भर देण्यांत यावा अशी आग्रहाची सूचना कर-ण्यात आली. नंतर पुढील वर्षाकरिता विस्तृत कार्यक्रम आखण्यांत आला:—

(१) हिंदी जनतेंत आपल्या हक्काची जाणीव उत्पन्न करण्याकरितां व ते प्राप्त करून घेण्यासाठीं जरूर ते बल व प्रतिकारशक्ति निर्माण करण्या-

**सरोजिनी नायडू**
१९२५ कानपूर काँग्रेसच्या अध्यक्ष

**श्रीनिवास अय्यंगार**
१९२६ गोहत्ता काँग्रेसचे अध्यक्ष

**डॉ. अन्सारी**
१९२७ मद्रास काँग्रेसचे अध्यक्ष

**पं. जवाहरलाल नेहरू**
१९२९ लाहोर काँग्रेसचे अध्यक्ष

**वल्लभभाई पटेल**
१९३१ कराची काँग्रेसचे अध्यक्ष

**नेली सेनगुप्त**
१९३३ कलकत्ता काँग्रेसच्या अध्यक्ष

करितां कॉंग्रेसनें विधायक कार्यक्रम अमलांत आणण्याचा प्रयत्न करावा. चरखा व खादी ही लोकप्रिय करून त्यांचा प्रसार करण्याकरितां विशेष परिश्रम घेण्यांत यावे. आंतरजातीय ऐक्य, अस्पृश्यतानिवारण व मागसलेल्या लोकांची स्थिति सुधारणें, या गोष्टींवर भर द्यावा. मद्यपान व इतर मादक पदार्थांचें सेवन यांना आळा घालण्याचा प्रयत्न करावा. स्थानिक स्वराज्यसंस्था काबीज कराव्या, खेड्यांची संघटना करावी, राष्ट्रीय धोरणावर शिक्षणाचा प्रसार करावा, औद्योगिक व शेतकऱ्यांची संघटना करावी, मालक व मजूर, जमीनदार व कुळें यांच्यांतील संबंध सलोख्याचे होतील असा प्रयत्न करावा. व देशाच्या राष्ट्रीय, औद्योगिक, आर्थिक, व्यापारविषयक हितसंबंधाचें वर्धन होईल, असा प्रयत्न करावा.

( २ ) परराष्ट्रांतून हिंदुस्थानासंबंधानें बिनचूक माहिती पुरविण्याचें काम, परराष्ट्रांतील कॉंग्रेस कार्यकर्त्यांनीं करावें.

( ३ ) असेंब्लींतील स्वतंत्र व स्वराज्यपक्षाच्या लोकांनीं १८ फेब्रुवारी १९२४ रोजीं ठराव पास करून पुढें मांडलेल्या तडजोडीच्या मागणीला कॉंग्रेसचा पाठिंबा आहे. सरकारनें अद्याप या बाबतींत कांहींच उत्तर न दिल्यामुळें पुढील उपाय योजावा असें कॉंग्रेसचें मत आहे.

( १ ) वरील मागणीच्या बाबतींत सरकारनें अखेरचा निर्णय द्यावा, अशी विनंति स्वराज्यपार्टीनें शक्य तितक्या लौकर करावी. व येत्या फेब्रुवारी अखेरपर्यंत हा निर्णय जाहीर करण्यात आला नाहीं किंवा जाहीर करण्यांत आलेला निर्णय वर्किंग कमिटीनें नेमलेल्या खास कमिटीला समाधानकारक वाटला नाहीं तर, स्वराज्य पक्षानें हल्लींच्या कायदेमंडळांत राहूं नये व काम करण्याचें नाकारावें. असेंब्लींतील व कौन्सिल ऑफ स्टेटमधील स्वराजिस्ट सभासदांनीं फायनॅन्स बिल फेटाळण्यासंबंधानें मत द्यावें; आणि नंतर ताबडतोब आपल्या जागा सोडाव्या. तसेंच त्या वेळीं चालू असलेल्या प्रांतिक कायदेमंडळांतील स्वराजिस्ट प्रतिनिधींनींही आपल्या जागा सोडाव्या व ज्या कौन्सिलांचें काम त्या वेळीं चालू नसेल त्यांतील सर्व स्वराजिस्ट सभासदांनीं पुढल्या बैठकीला हजर राहूं नये, व आपल्या कार्यासंबंधींचा रिपोर्ट खास कमिटीकडे पाठवून द्यावा.

( २ ) कौन्सिल ऑफ स्टेट, असेंब्ली व प्रांतिक कायदेकौन्सिलें यांतील कोणत्याही स्वराज्यपार्टीच्या सभासदानें यापुढें वरील कायदेमंडळाच्या

कोणत्याही अधिवेशनाला किंवा कमिटीच्या कोणत्याही बैठकीला हजर राहूं नये; फक्त आपली जागा रिकामी झाली असें जाहीर करतां येऊं नये यासाठीं मधून मधून आपल्या जागेवर हजर राहावें. तसेंच प्रांतिक अंदाजपत्रकें व नवीन कर लादण्याची बिलें फेटाळून लावण्यासाठींही कौन्सिलांत हजर राहावें.

कौन्सिलांतील आपल्या जागा सोडून देण्यापूर्वी पार्टीच्या हल्लींच्या नियमाप्रमाणें निरनिराळ्या कौन्सिलांतून जें काम करतां येईल तें करीत राहावें.

कांहीं विशेष कारणाकरितां स्वराजिस्टांनीं कौन्सिलमध्यें हजर राहाणें जरूर आहे, असें वाटल्यास स्पेशल कमिटीला तशी परवानगी स्वराजिस्टांना देण्याचा हक्क आहे.

( ३ ) स्पेशल कमिटीला वरील पोटकलमें (१) मध्यें निर्दिष्ट केल्याप्रमाणें रिपोर्ट मिळाल्यानंतर ऑ. इं. कॉं. कमिटीची बैठक भरविण्यांत यावी व कॉंग्रेस कार्यकर्त्यांनीं व स्वराजिस्टांनीं सहकार्यानें सर्व देशभर कोणत्या प्रकारची चळवळ करावयाची याची आंखणी करावी.

( ४ ) कलम १ व २ यांत निर्दिष्ट केलेल्या धोरणानुसार हा कार्यक्रम ठरविण्यांत यावा. मतदार संघांना शिक्षण देण्याचें कामही हातीं घेऊन कॉंग्रेसचे उमेदवार कोणत्या हेतूनें कायदेमंडळांत निवडून येऊं पाहात आहेत याची स्पष्ट कल्पना मतदारांना द्यावी.

आपण केलेल्या मागणीला कॉंग्रेसच्यामतें समाधानकारक उत्तर येईपर्यंत अधिकाराच्या जागा स्वीकारूं नयेत.

( ५ ) देशांतील निरनिराळ्या प्रांतिक कॉंग्रेसकमिट्यांनीं, प्रांतिक कायदे मंडळाच्या व वरिष्ठ कायदेमंडळाच्या पुढील जनरल निवडणुकीकरितां उमेदवार निवडावे.

( ६ ) तडजोडीच्या अटींच्या बाबतींत सरकारकडून आलेलें उत्तर समाधानकारक असलें व तें कमिटीला स्वीकारार्ह वाटले तर, ऑ. इं. कॉं. कमिटीची सभा भरवून कमिटीच्या या निर्णयाला मान्यता द्यावी किंवा त्यावर आपली नापसंती व्यक्त करावी. व पुढील कार्यक्रमही निश्चित करावा.

(७) वर सांगितल्याप्रमाणें स्वराजिस्ट प्रतिनिधि कायदेमंडळांतून बाहेर पडलेले नाहींत तोंपर्यंत स्वराज्य पार्टीच्या घटनेंतील नियमाप्रमाणें त्यांनीं वागावें. कॉंग्रेस व ऑ. इं. कॉं. कमिटी यांनीं वेळो वेळीं या नियमांत कांहीं फेरबदल केला असल्यास तोही विचारांत घ्यावा.

( ८ ) पोट कलम ३ व ४ प्रमाणें कामाला सुरवात झाल्यानंतर आरंभींच्या खर्चाकरितां म्हणून जरूर असलेले पैसे ऑ. इं. कॉ. कमिटीनें मंजूर करावें. व या कामाकरितां आणखी पैसे लागल्यास वर्किंग कमिटीनें ते जमा करण्याची खटपट करावी. अधिवेशनापुढें आलेला हा मुख्य ठराव प्रतिपक्षांकडून थोडा-बहुत विरोध होऊन पास झाला. पंडित मदनमोहन मालवीय यांनीं या ठरावा-वर पुढील उपसूचना मांडली होती व मि. जयकर यांनीं तिला अनुमति दिली होती.

" हिंदुस्थानांत पूर्ण जबाबदारीचें स्वराज्य लवकर प्रस्थापित होईल या दृष्टीनें कायदेमंडळांचा शक्य तितका उपयोग करावा. राष्ट्रीय कार्याच्या प्रगतीला पोषक अशा प्रसंगीं सरकारशीं सहकार्य करावें, आणि या कार्याच्या प्रगतीला जरूर असेल तरच अडवणूक करावी." या उपसूचनेला अनुमति देतांना श्री. जयकर यांनीं आपण स्वतः, केळकर व मुंजे यांनीं कायदेमंडळांतील आपल्या जागांचे राजीनामे दिले आहेत असें जाहीर केलें. स्कीन कमिटीवरील जागा स्वीकारल्या-बद्दल मोतिलालजींवर त्यांनीं जोराचा हल्ला चढविला. 'इंडियन सँढर्स्ट' निर्माण करावें, अशी असेंब्लीनें मागणी केली "तर मग मार्ग दाखवा" असें सरकारनें विचारलें. आपल्या इतर मागण्या मान्य करून घेण्याकरितां सरकारशीं वाटाघाटी करणें जर जरूर आहे तर, सुधारणाच्या बाबतींतही सरकारनें आम्हांला असेंच विचारलें तर आम्हीं सरकारशीं खात्रीनें सहकार्य करूं.

कॉंग्रेसचें व ऑ. इं. कॉं. कमिटीचें काम यापुढें हिंदी भाषेंत चालावें, असें ठरविण्यांत आलें. परदेशांतील हिंदी लोकांचें हितरक्षण करण्याकरितां परराष्ट्रीय खातें उघडण्याचा अधिकार ऑ. इं. कॉं. कमिटीला देण्यांत आला. कॉंग्रेसची पुढील बैठक असाममध्यें भरवावी असें ठरलें. डॉ. अन्सारी, मि. ए. रंगस्वामीं अयंगार आणि मि. के. संतानम् यांना सेक्रेटरी नेमण्यात आलें. कानपूर कॉंग्रेस-नंतर जूनच्या दुसऱ्या आठवड्यांत मि. बी. जी. हॉर्निमन हिंदुस्थानांत परत आले.

अमेरिकेचे रे. मि. होल्म्स हे या कॉंग्रेसला उपस्थित होते. त्यांनीं अमे-रिकन पोषाख केला होता पण डोक्यावर गांधी टोपी घातली होती. टाळ्यांच्या गजरांत ते उठून उभे राहिले व म्हणाले, "गांधीजी द. आफ्रिकेचे रहिवाशी ( साऊथ आफ्रिकन ) आहेत असें डॉ. अबदुल रहिमान यांनीं काल म्हटलें व गांधीजींवर आपला हक्क सांगितला. गांधीजी हे सर्व जगाचे आहेत, त्यांच्यावर

कोणत्याही अधिवेशनाला किंवा कमिटीच्या कोणत्याही बैठकीला हजर राहूं नये; फक्त आपली जागा रिकामी झाली असें जाहीर करतां येऊं नये यासाठीं मधून मधून आपल्या जागेवर हजर राहावें. तसेंच प्रांतिक अंदाजपत्रकें व नवीन कर लादण्याचीं बिलें फेटाळून लावण्यासाठींही कौन्सिलांत हजर राहावें.

कौन्सिलांतील आपल्या जागा सोडून देण्यापूर्वी पार्टीच्या हल्लींच्या नियमाप्रमाणें निरनिराळ्या कौन्सिलांतून जें काम करतां येईल तें करीत राहावें.

कांहीं विशेष कारणाकरितां स्वराजिस्टांनीं कौन्सिलमध्यें हजर राहाणें जरूर आहे, असें वाटल्यास स्पेशल कमिटीला तशी परवानगी स्वराजिस्टांना देण्याचा हक्क आहे.

(३) स्पेशल कमिटीला वरील पोटकलमें (१) मध्यें निर्दिष्ट केल्याप्रमाणें रिपोर्ट मिळाल्यानंतर ऑ. इं. कॉं. कमिटीची बैठक भरविण्यांत यावी व कॉंग्रेस कार्यकर्त्यांनीं व स्वराजिस्टांनीं सहकार्यानें सर्व देशभर कोणत्या प्रकारची चळवळ करावयाची याची आंखणी करावी.

(४) कलम १ व २ यांत निर्दिष्ट केलेल्या धोरणानुसार हा कार्यक्रम ठरविण्यांत यावा. मतदार संघांना शिक्षण देण्याचें कामही हातीं घेऊन कॉंग्रेसचे उमेदवार कोणत्या हेतूनें कायदेमंडळांत निवडून येऊं पाहात आहेत याची स्पष्ट कल्पना मतदारांना द्यावी.

आपण केलेल्या मागणीला कॉंग्रेसच्यामतें समाधानकारक उत्तर येईपर्यंत अधिकाराच्या जागा स्वीकारूं नयेत.

(५) देशांतील निरनिराळ्या प्रांतिक कॉंग्रेसकमिट्यांनीं, प्रांतिक कायदे मंडळाच्या व वरिष्ठ कायदेमंडळाच्या पुढील जनरल निवडणुकीकरितां उमेदवार निवडावे.

(६) तडजोडीच्या अटींच्या बाबतींत सरकारकडून आलेलें उत्तर समाधानकारक असलें व तें कमिटीला स्वीकारार्ह वाटले तर, ऑ. इं. कॉं. कमिटीची सभा भरवून कमिटीच्या या निर्णयाला मान्यता द्यावी किंवा त्यावर आपली नापसंती व्यक्त करावी. व पुढील कार्यक्रमही निश्चित करावा.

(७) वर सांगितल्याप्रमाणें स्वराजिस्ट प्रतिनिधि कायदेमंडळांतून बाहेर पडलेले नाहींत तोंपर्यंत स्वराज्य पार्टीच्या घटनेंतील नियमाप्रमाणें त्यांनीं वागावें. कॉंग्रेस व ऑ. इं. कॉं. कमिटी यांनीं वेळो वेळीं या नियमांत कांहीं फेरबदल केला असल्यास तोही विचारांत घ्यावा.

( ८ ) पोट कलम ३ व ४ प्रमाणें कामाला सुरवात झाल्यानंतर आरंभींच्या खर्चाकरितां म्हणून जरूर असलेले पैसे ऑ. इं. कॉं. कमिटीनें मंजूर करावें. व या कामाकरितां आणखी पैसे लागल्यास वर्किंग कमिटीनें ते जमा करण्याची खटपट करावी. अधिवेशनापुढें आलेला हा मुख्य ठराव प्रतिपक्षांकडून थोडा-बहुत विरोध होऊन पास झाला. पंडित मदनमोहन मालवीय यांनीं या ठरावा-वर पुढील उपसूचना मांडली होती व मि. जयकर यांनीं तिला अनुमति दिली होती.

" हिंदुस्थानांत पूर्ण जबाबदारीचें स्वराज्य लवकर प्रस्थापित होईल या दृष्टीनें कायदेमंडळांचा शक्य तितका उपयोग करावा. राष्ट्रीय कार्याच्या प्रगतीला पोषक अशा प्रसंगीं सरकारशीं सहकार्य करावें, आणि या कार्याच्या प्रगतीला जरूर असेल तरच अडवणूक करावी. " या उपसूचनेला अनुमति देतांना श्री. जयकर यांनीं आपण स्वतः, केळकर व मुंजे यांनीं कायदेमडळांतील आपल्या जागांचे राजीनामे दिले आहेत असें जाहीर केलें. स्कीन कमिटीवरील जागा स्वीकारल्या-बद्दल मोतिलालजींवर त्यांनीं जोराचा हल्ला चढविला. 'इंडियन सँढर्स्ट' निर्माण करावें, अशी असेंब्लीनें मागणी केली "तर मग मार्ग दाखवा " असें सरकारनें विचारलें. आपल्या इतर मागण्या मान्य करून घेण्याकरितां सरकारशीं वाटाघाटी करणें जर जरूर आहे तर, सुधारणांच्या बाबतींतही सरकारनें आम्हांला असेंच विचारलें तर आम्हीं सरकारशीं खात्रीनें सहकार्य करूं.

कॉंग्रेसचें व ऑ. इं. कॉं. कमिटीचें काम यापुढें हिंदी भाषेंत चालावें, असें ठरविण्यांत आलें. परदेशांतील हिंदी लोकांचें हितरक्षण करण्याकरितां परराष्ट्रीय खातें उघडण्याचा अधिकार ऑ. इं. कॉं. कमिटीला देण्यांत आला. कॉंग्रेसची पुढील बैठक असाममध्यें भरवावी असें ठरलें. डॉ. अन्सारी, मि. ए. रंगस्वामी अयंगार आणि मि. के. संतानम् यांना सेक्रेटरी नेमण्यात आलें. कानपूर कॉंग्रेस-नंतर जूनच्या दुसऱ्या आठवड्यांत मि. बी. जी. हॉर्निमन हिंदुस्थानांत परत आले.

अमेरिकेचे रे. मि. होल्म्स हे या कॉंग्रेसला उपस्थित होते. त्यांनीं अमे-रिकन पोषाख केला होता पण डोक्यावर गांधी टोपी घातली होती. टाळ्यांच्या गजरांत ते उठून उभे राहिले व म्हणाले, "गांधीजी द. आफ्रिकेचे रहिवासी ( साऊथ आफ्रिकन ) आहेत असें डॉ. अबदुल रहिमान यांनीं काल म्हटलें व गांधीजींवर आपला हक्क सांगितला. गांधीजी हे सर्व जगाचे आहेत, त्यांच्यावर

सर्व जगाचा हक्क आहे असें आज मी कां म्हणू नये? पाश्चात्य सुधारणांच्या चुकीच्या मार्गानें जाऊन आम्ही फारच दूरवरच्या आडवाटेवर लागलों आहों. गाजवीपेक्षां फाजील आसक्तीनें संपत्ति व सामर्थ्य यांच्या मागें आम्ही लागलों आहों. पाश्चात्य सुधारणेंतील ही अत्यंत अनिष्ट गोष्ट आहे. आमच्या द्रव्य-लोभामुळें प्रचंड प्रमाणांत पैसा सांठवण्याची आमची वृत्ति वाढली आहे. सामर्थ्याच्या आमच्या लालसेमुळें युद्धामागून युद्धें होत आहेत व आणखीही संस्कृति नष्ट होईपर्यंत अशींच युद्धें होत राहतील. दुसरा व अधिक हितकर मार्ग तुम्ही दाखवीत आहां, म्हणून आम्ही तुमच्याकडे वळत आहों। आणि निसर्गातील व शास्त्रीय शोधांतील चांगल्या गोष्टींचें संरक्षण करुन तुमच्या-तील थोर पुरुषानें जी बंधुत्वाची भावना प्रसृत केली आहे तिचें आम्ही अनु-करण करूं अशी आम्हाला आशा वाटत आहे."

या सालची हकीकत संपविण्यापूर्वी या व १९२६ सालीं दुर्दैवानें हिंदु-स्थानभर जे हिंदु-मुसलमानांचे दंगे झाले त्यांचा उल्लेख करणें जरूर आहे हिंदु-मुसलमान ऐक्यासंबधानें कलकत्त्यांतील मिर्झापूर पार्कमध्यें (१ मे) भाषण करतांना म. गांधी म्हणाले कीं, "माझी नालायकी मला कबूल आहे. डॉक्टर या नात्यानें या रोगावर औषध योजना करण्याचें काम मला साधलें नाहीं हेंही मला कबूल आहे. हिंदु वा मुसलमान कोणीही मी सांगितलेला इलाज करण्यास तयार आहेत असें मला आढळून आलेलें नाहीं. म्हणून या प्रश्नाचा जातां जाता उल्लेख करण्यापलीकडे मी अलीकडे कांहीं करीत नाहीं. आपला देश स्वतंत्र व्हावा अशी आपली इच्छा असेल तर आपण हिंदु व मुसल-मान केव्हां तरी एकादे दिवशीं एक झालेंच पाहिजे या भावनेवरच मी माझें समाधान करून घेत आहे. आणि आपण एक होण्यापूर्वी आपण परस्पर रक्तपात केला पाहिजे असेंच जर आमच्या नशिबी असेल तर ती गोष्ट जितक्या लवकर घडून येईल तितकें बरें। परस्परांचीं डोकीं आपण फोडलींच पाहिजेत असेंच आमचें मत झालें असेल तर तें कृत्य आपण मर्दपणानें करूं या. मग उगाच नक्राश्रु ढाळण्यांत अर्थ नाहीं. दुसऱ्या कोणी आपल्याबद्दल सहानुभूति दाखवावी असा दावा आपण ठेवणार नसलों तर तशी अपेक्षाही आपण करूं नये." १९२५ च्या जुलै महिन्यांत दिल्ली, कलकत्ता, अलाहाबाद येथें हिंदु-मुसलमानांत कटकटी झाल्या. बकरीद सणाच्या प्रसंगीं गुलबर्ग्यापासून ४० मैलांवर असलेल्या हुमणा-

बाद गांवांत आणखी एक दंगा झाला. मागच्या सालीं याच दिवसांत तेथें दंगा झाला होता. १९२५ साल सपविण्यापूर्वी शिखांच्या प्रश्नासंबंधानें कांहीं माहिती सांगितली पाहिजे. गुरुद्वार-बिल कौन्सिलपुढें मांडण्यांत आलें व तें मंजूरही झालें. गुरुद्वारचे कैदी हा कायदा मान्य करतील व पूर्वीसारख्या चळवळी पुन्हां न करण्याची अट पाळण्याचें कबूल करतील तर त्यांना मुक्त करण्यांत येईल असें सर मालकम् हेले यांनीं बोलून दाखविलें असें म्हणतात. हेले यांच्या उद्गारावद्दल पुष्कळांनीं संताप व्यक्त केला पण कांहीं काल लोटल्यानंतर ही भावना तितकी तीव्र राहिली नाहीं. पुष्कळ कैद्यांनीं कायद्यांतील अटी मानण्याचें कबूल केलें. प्रत्यक्ष गुरुद्वार शिरोमणि प्रबंधक कमिटींतही या प्रश्नावर फूट पडली. बरेच कैदी मुक्त झाले. कांहींनीं आपली शिक्षेची मुदत संपवूनच बाहेर पडण्याचें ठरविलें.

---

## प्रकरण सातवें

# १९२६ मधील घडामोडी

कौन्सिलांतील चकमकी–प्रतियोगी सहकारिता–स्वराज्यपक्षीय सभासद असेंब्लींतून बाहेर पडतात–अध्यक्ष पटेल–अधिकाराच्या जागा स्वीकारण्यासंबंधाची अट–साबरमती करार–पं. नेहरू आपलें म्हणणें स्पष्ट करून सांगतात–प्रतियोगी व स्वराजिस्ट यांच्यांतील ताणाताणीचे संबंध–वाटाघाटी मोडतात–पंडितजींचें इंग्लंडास प्रयाण–बंगाली स्वराजिस्ट–कलकत्यांतील दंगे–हुंडणावळीचें प्रमाण–लालाजी विरुद्ध मोतीलालजी–गव्हर्नर जनरलांच्या कार्यकारी मंडळांत मुसलमानाला नेमण्यासंबंधानें सर अबदुल रहीम यांस आयर्विन यांचें उत्तर–जनरल इलेक्शन–गोहत्ती काँग्रेस–स्वामी श्रद्धानंद यांच्यावर गोळी झाडण्यांत आली–अध्यक्षांचें भाषण ठराव–गांधी यांचे खुनासंबंधीं विचार–मुख्य ठराव–प्रसिद्ध प्रेक्षक–नाभासंबंधीं मोतीलालजींचें मत–निवडणुकीचा कार्यक्रम १९२६ खादीची प्रगति.

१९२५ च्या शेवटीं प्रतियोगी सहकाराच्या विचारानें वातावरण भरून गेलें होतें. २० जानेवारी १९२६ रोजीं असेंब्लीची बैठक सुरूं होण्यापूर्वी स्वराज्य पार्टीच्या मुंबई कौन्सिलानें प्रतियोगी सहकाराच्या प्रचाराला पूर्ण पाठिंबा देण्याचें निश्चित ठरविलें होतें.

पं. मोतीलाल नेहरू यांनीं जानेवारीच्या ( १९२६ ) दुसऱ्या आठवड्यांत व्हाइसरॉयांची मुलाखत घेतली. पार्टीच्या कार्यकारी मंडळाची त्यांनीं या बाबतींत परवानगी घेतली होती. लाला लजपतराय व इतर चार पुढारी पं. नेहरू यांच्याबरोबर होते. द. आफ्रिकेच्या प्रश्नासंबंधानें चर्चा करण्याकरितां ही मुलाखत घेण्याचें ठरविण्यांत आलें होतें. या मुलाखतीच्या बातमीमुळें लोकांना आशा वाटूं लागली होती; पण वातावरण तावडतोब बदललें व सर्व आशाचिन्हें नष्ट झालीं. २० जानेवारी १९२६ रोजीं असेंब्ली सुरूं होतांना लॉर्ड रीडिंग यांनीं जें सामोपचारपूर्ण भाषण केलें होतें व लॉर्ड बर्कनहेड यांच्या भाषणांतील जो पुढील उतारा वाचून दाखविला होता त्यामुळेंच या आशेला जागा झाली होती. "आम्हांला सदिच्छेची अपेक्षा आहे व लोकांनीं सदिच्छेनें

आमच्याशीं वागावें अशीही आमची इच्छा आहे. उदार मनानें कोणी आमच्याशीं मित्रत्वानें वागूं लागल्यास त्यांच्याशीं आम्ही कृपण व्यापारी दृष्टीनें वागणार नाहीं. औदार्यपूर्ण मैत्रीचे आम्ही अंतःकरणापासून चहाते आहोंत."

दिल्ली येथें ६ व ७ मार्च १९२६ रोजीं ऑ. इं. कॉंग्रेस कमिटीची सभा झाली व तींत पुढील आशयाचा ठराव पास झाला:—

" स्वराज्याच्या प्रगतीविरुद्ध असलेल्या प्रत्येक कृत्याला, मग तें सरकारचें असो वा इतर कोणाचें असो, जोराचा विरोध व प्रतिकार करावा. व विशेषतः सरकारकडून समाधानकारक उत्तर मिळेपर्यंत कायदेमंडळांतील कॉंग्रेसवाल्यांनीं अधिकाराच्या जागा स्वीकारूं नयेत." ५ मार्च रोजीं झालेल्या वर्किंग कमिटीच्या सभेंत हिंदुस्थानी सेवादलाकरितां २००० रु. व परराष्ट्रीय प्रचाराकरितां ५००० रु. मंजूर करण्यांत आले. कोकोनाडा कॉंग्रेसमध्यें झालेल्या ठरावाप्रमाणें हे स्वयंसेवक दल उभारण्यांत आलें होतें. या दलाच्या मौ. शोकतअल्ली यांच्या अध्यक्षतेखालीं बेळगांव येथें व श्री. टी. सी. गोस्वामी यांच्या अध्यक्षतेखालीं कानपूर येथें अशा दोन परिषदा भरविण्यांत आल्या. परराष्ट्रीय प्रचारासंबंधानें आतांपर्यंत केवळ चर्चा चालू होत्या, पण तो आतां व्यवहारिक महत्त्वाचा प्रश्न होऊन बसला होता. श्री. कमला नेहरूंच्या औषधोपचाराकरितां पं. जवाहरलाल स्वित्झर्लंडला गेले व स्कीन कमिटीच्या कामाकरितां पं. मोतीलाल इंग्लंडला निघाले त्या वेळीं या प्रश्नानें उचल खाल्ली.

असेंब्लीच्या बैठकींत अंदाजपत्रक मताकरितां पुढें मांडण्यांत येईल त्या वेळीं आपण व आपले अनुयायी त्यावर मतें देणार नाहींत असें पं. मोतीलाल यांनीं जाहीर केलें होतें. स्वराजिस्ट सभासद असेंब्लींतून यावेळीं कसे बाहेर पडतात हें पाहण्याकरितां असेंब्लीच्या प्रेक्षकांच्या ग्यालरींत खूप गर्दी जमली होती. कारण स्वराजिस्ट या प्रसंगीं असेंब्लींतून बाहेर निघून जाणार ही गोष्ट पूर्वी प्रसिद्ध झाली होती. दे. दासांनीं सहकार्याचा पुढें केलेला हात सरकारनें कसा झिडकारला हें या प्रसंगीं पं. मोतीलाल यांनीं दाखवून दिलें. सरकार जर यापुढें काळजी घेणार नाहीं तर सर्व देशभर मधाच्या पोवळ्याप्रमाणें गुप्त मंडळ्या स्थापन होतील अशी सावधगिरीची सूचना पं. मोतीलाल यानीं सरकारला दिली व त्यानंतर आपल्या पक्षाच्या सर्व सभासदांसह ते असेंब्ली हॉलमधून बाहेर पडले.

स्वराजिस्टांच्या या वॉकआऊटमुळें घडलेली एक लहानशी गोष्ट या ठिकाणीं

थोडक्यांत सांगण्यास हरकत नाहीं. असेंब्लींतील बहुमतवाला प्रबल पक्ष बाहेर निघून गेल्यामुळें गव्हर्नमेंट ऑफ इंडिया कायद्याप्रमाणें या असेंब्लीचें प्रातिनिधिक स्वरूप आतां नष्ट झालें आहे असें असेंब्लीचें अध्यक्ष श्री. पटेल यांनीं जाहीर केलें; यामुळें असेंब्लीचें काम पुढें चालवावें कीं नाहीं या प्रश्नाचा सरकारला विचारच करावा लागला. कोणताही विवादात्मक कायदा सरकारनें असेंब्लीपुढें मांडू नये. सरकारनें ही गोष्ट ऐकली नाहीं तर आपल्या हातांतील जादा अधिकारान्वयें असेंब्लीची वैठक कायमची तहकूब ठेवावी लागेल असें त्यांनीं सरकारला कळविलें. दुसरे दिवशीं श्री. पटेल यांनीं आपले हे शब्द मोठ्या खुबीनें परत घेतलें. ते म्हणाले, विचारा अंतीं मला असें आढळून आलें कीं, अध्यक्ष या नात्यानें आपल्या हातीं असलेल्या अधिकारांचा मी निर्देश करावयाचा नव्हता किंवा ज्या प्रकारची भाषा वापरण्यांत आली, तशी ती वापरावयास नको होती. अशी भाषा योजून मी सरकारला धमकीच देत आहे असा याचा अर्थ कदाचित् करण्यांत आला असता. तेव्हां या बाबतींत आपले विचार प्रकट करण्यापूर्वी यापुढें कोणत्या गोष्टी घडून येतात हें पाहावयास पाहिजे होते." श्री. पटेल यांचें हें भाषण ऐकून सरकारला हायसें वाटलें !

गयेच्या टेंकडीवरून सुटलेला असहकारितेचा धोंडा घरंगळत घरंगळत १९२६ च्या आरंभीं साबरमतीच्या तळाशीं येऊन पोंचला. प्रतियोगी पक्षाचे लोक तर स्वतंत्र व नॅशनॅलिस्ट या पक्षांशीं जवळ जवळ एकरूपच झाले होते. मुंबई येथें एप्रिलमध्यें या सर्व पक्षांच्या पुढाऱ्यांची सभा भरली व "इंडियन नॅशनल पार्टी" नांवाची एक नवीन पार्टी काढण्यांत आली. कायदेभंग व करबंदी खेरीज करून बाकीच्या सर्व शांततामय व न्याय्य मार्गांनीं वसाहतीच्या पद्धतीचें स्वराज्य संपादन करावयाचें हें पार्टीचें ध्येय ठरविण्यांत आलें. कायदेमंडळांत शिरून प्रतियोगी सहकार करावा, असें स्वातंत्र्य या पक्षाच्या सभासदांना देण्यांत आलें होतें. हा नवीन पक्ष स्थापन करणें म्हणजे स्वराज्यपक्षीयांना एक प्रकारचें आव्हान देण्यासारखेंच आहे, असें पं. मोतीलालजींना वाटलें. हा पक्ष म्हणजे अठरा धान्याचें कोडबोळें आहे असें त्यांनीं बोलून दाखविलें. कांहीं प्राथमिक वाटाघाटी झाल्यानंतर, स्वराज्य पक्षांतील या दोन गटांच्या पुढाऱ्यांची सभा ता. २१ एप्रिल रोजीं साबरमती येथें भरवावी व या दोन्ही पक्षांत ऐक्य होणें शक्य आहे कीं नाहीं हें पाहावें असें ठरविण्यांत आलें.

स्वराज्यपार्टीच्या प्रमुख पुढाऱ्याशिवाय श्री. सरोजिनी देवी, लाला लजपतराय, केळकर, जयकर, अणे, मुंजे, वगैरे मंडळी या सभेस हजर होती. प्रांतांतील दिवाणांना आपलें काम परिणामकारक रीतीनें करतां येण्याच्या दृष्टीनें अवश्य असलेले अधिकार देण्यांत आल्यास, २४ फेब्रुवारी रोजीं स्वराजिस्टांच्या मागणीस सरकारनें दिलेलें उत्तर समाधानकारक आहे असें मानण्यांत यावें, असा करार या पुढाऱ्यांच्या सभेंत करण्यांत आला. व त्यावर उभय पक्षांच्या पुढाऱ्यांच्या सह्याही झाल्या. अर्थात् या कराराला ऑ. इं. कॉं. कमिटीची संमति मिळणें जरूरीचें होतेंच. प्रांतिक दिवाणाना दिलेले अधिकार पुरेसें आहेत कीं नाहींत हें प्रां. कौन्सिलांतील कॉंग्रेसवाल्यानीं ठरवावें, व प. मोतीलाल व श्री. जयकर यांच्या कमिटीनें या निर्णयाला मंजूरी द्यावी."

या कराराची शाई अद्याप वाळलीही नव्हती, इतक्यांत आंध्र प्रां. कॉंग्रेस कमिटीचे अध्यक्ष मि. प्रकाशम् यांनीं वरील कराराच्या बाबतींत आपला मतभेद असल्याचें जाहीर केलें व कानपूर पेक्षांही साबरमती येथें कॉंग्रेसला हीन स्थितीला पोहोंचविण्यांत आलें, असें त्यानीं बोलून दाखविलें. (इंडिया १९२५-२६) पुष्कळ प्रमुख कॉंग्रेस पुढाऱ्यांनींही या बाबतींत आपलें असमाधान व्यक्त केलें. स्वराजिस्ट पुन्हां कौन्सिलांत शिरतील व दिवाणगिऱ्या स्वीकारतील अशींच सर्वसामान्य समजूत झाली होती. परंतु, पुढील तीन अटी पूर्ण झाल्याशिवाय दिवाणगिऱ्या स्वीकारण्यांत येणार नाहींत असें जाहीर करून, पंडितजींनीं हें वातावरण शुद्ध केलें.

(१) दिवाणांना सरकारी नियंत्रणापासून पूर्ण स्वतंत्र व कायदेमंडळाला जबाबदार करावे.

(२) राष्ट्र संवर्धन खात्याच्या वाढीकरितां पुरेसा पैसा मंजूर करण्यांत यावा.

(३) राखीव खात्यांतील नोकरांच्या बाबतींत पूर्ण नियंत्रण करण्याचें अधिकार दिवाणाना देण्यांत यावें.

कमिटीपुढें जो मसूदा ठेवण्यांत आला तो साबरमती येथें झालेल्या कराराविरुद्ध आहे, अशी श्री. जयकर यांनीं तक्रार केली. व स्वराजिस्ट व प्रतियोगी यांच्यातील संबंधांत पुन्हां ताणाताण सुरू झाली. ५ मे रोजीं अहमदाबाद येथें झालेल्या ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटीच्या सभेंत साबरमती करारावर निर्णय देण्यांत यावयाचा होता. परंतु, या करारावर सह्या करणाऱ्या लोकां-

तच त्यांतील कलमांचा अर्थ लावण्याचें बाबतींत मतभेद झाल्याकारणानें प्रतियोगी पक्षाबरोबर गेले कांहीं दिवस ज्या वाटाघाटी चालू होत्या, त्या नाशाबीत ठरल्या आहेत, व करारार्चे अस्तित्वच नष्ट झालें आहे असें पंडितजींनीं या बैठकीच्या वेळीं जाहीर केलें. प्रतियोगी पुढाऱ्यांकडून आलेले पत्रही या सभेंत वाचण्यात आलें. या पत्रांत पंडितजींच्या मतालाच पुष्टि देण्यांत आली होती. पंडितजींनीं स्वीकारलेल्या या धोरणाबद्दल श्री. एस. श्रीनिवास अयंगार यांनीं त्यांचें आभार मानलें, हीं गोष्ट या वेळीं विशेष लक्षांत ठेवण्याजोगी होती. कारण दक्षिण हिंदुस्थान साबरमती कराराविरुद्ध होते. मिसेस बेझंट यांच्या कॉमनवेल्थ ऑफ इंडिया बिलावरील रिपोर्टावर विचार करण्याकरितां एक कमिटी नेमावी अशी सूचना पं. मोतीलाल यांनीं केली, पण ती फेंटाळण्यांत आली. प्रतियोग्यांतर्फे सर मोरोपंत जोशी या सभेला हजर होते. त्यांनीं साबरमती करारासंबंधानें या सभेंत विचार करण्यांत यावा अशी आग्रहाची सूचना केली. प्रतियोगी व स्वराजिस्ट यांच्यांत मूलतःच मतभेद आहेत असें पं. नेहरूंनीं सांगितलें. सुधारणा आहेत तशा राबवाव्या असें प्रतियोग्यांचें मत आहे, तर देशबंधु दास यांनीं घातलेल्या फरीदपूर अटी मान्य करण्यांत आल्याशिवाय सरकारकडून पुढें करण्यांत आलेल्या कोणत्याही धोरणाला मान्यता द्यावयाची नाहीं असें स्वराजिस्टांचें मत आहे, असा दोन्ही पक्षांतील तात्त्विक मतभेद पं. मोतीलालजींनीं स्पष्ट करून दाखविला. हा वादविवाद यापुढें समाप्त झाला हें खरें, पण पंडितजी यांतून अगदीं निर्दोष रीतीनें बाहेर पडले असें म्हणतां यावयाचें नाहीं. पंडितजींना यावेळीं इंग्लंडला जावयाचें होतें व त्यांनीं दोन महिन्यांची रजा घेतली होती. पंडितजींच्या मागें श्री. एस्. श्रीनिवास अयंगार यांनीं त्यांची ज़ागा घेतली. त्या वेळेपुरतें कां होईना पण एकाएकीं मि. अयंगार यांचा भाग्यरवि मध्यान्हीवर आला असें म्हणावयास हरकत नाहीं.

नेतृत्वाच्या बाबतींत हिंदुस्थानची ही स्थिति होती, तर अनुयायांमध्यें सर्वत्र फांटाफूट होत चाललेली दिसत होती. बंगालमध्यें सेनगुप्त हे पुढारीपदावर आरूढ झाले होते तरी या पुढारीपणाविरुद्ध बंगालमधील एक पक्ष बंड करून उठला होता. बंगालमध्यें यावेळीं हिंदू स्वराजिस्ट स्वराजिस्ट हिंदू, मुसलमान स्वराजिस्ट व स्वराजिस्ट मुसलमान असे चार पक्ष होते. विशेषण व विशेष्य यावर भर देऊनच हें पक्षभेद व्यक्त करण्यांत येत होतें. हिंदु-मुसलमानांत झालेल्या करारा-

भोंवतीं हे पक्षभेद घुटमळत होते. ( १ ) करारार्चे पालन ( २ ) कृष्णनगर परिषदेकडे दुर्लक्ष, ( ३ ) अधिकाराच्या जागांचा अस्वीकार, याप्रमाणें सेनगुप्त यांच्या तीन मागण्या होत्या. सेनगुप्त यांचा शिलेदारी बाणा लोकांना आवडत नव्हता. ग्रामसंघटनेकडे त्यांनीं दुर्लक्ष केलें असा त्यांच्यावर आरोप होता. ज्या कामाकरितां फंड उभे करण्यांत आले त्या करितां त्यांचा विनियोग करण्याकडे त्यांनीं दुर्लक्ष केलें अशीही त्यांच्याविरुद्ध तक्रार होती. ज्या लोकांनीं त्यांना पुढें आणले त्याच्याशींच ते भांडले अशीही एक तक्रार त्यांच्याविरुद्ध होती. कर्मी पक्षानें बाबू निर्मळचंद्र चंदर यांच्या नेतृत्वाखालीं बंडाचें निशाण उभारलें होतें. बंगालमधील हे आपआपसांतील भांडण अद्याप चालू असल्यामुळें तेथील फाटाफुटीसंबंधानें इतकी माहिती वर दिली आहे.

लॉर्ड आयर्विन ह्यांनीं ६ एप्रिल १९२६ रोजीं हिंदुस्थानांत पाऊल टाकलें त्याच वेळीं कलकत्ता येथें हिंदु-मुसलमानांतील दंग्याचा डोंबाळा उठला होता. ६ आठवडेपर्यंत कलकत्त्यांतील रस्ते दंगेधोपे व अत्याचार ह्यांच्यामुळें भयाण दिसत होते. मुसलमान व आर्यसमाजिस्ट ह्यांच्यामध्यें एका मशीदीबाहेर दंग्याला सुरुवात झाली आणि ५ एप्रिल रोजीं ह्या दंगेखोरांवर गोळीबार करण्यांत आला. रस्त्यांतून जाणाऱ्या येणाऱ्यांवर हल्ले तर सर्रास चालूंच होते. शहरांत जाळपोळीला ऊत आला होता. या दंग्यांत एकंदर ११० ठिकाणीं आगी लावण्यांत आल्या. देवळावर व मशिदीवर तर सारखे हल्ले चालू होते. ह्या दंग्यामुळें कलकत्त्याच्या अब्रूला काळीमा लागला. पहिल्या गोळीबारात व दंग्यांत ४४ मृत्यू व ५८० जखमी झाले. आणि दुसरें वेळीं ६६ मृत्यू व ३९१ जखमी झाले. सरकारतर्फेंच हे आंकडे प्रसिद्ध करण्यांत आले आहेत. सहा आठवड्यानंतर ही लूटमार, कत्तल व दगेधोपे बंद झाले. ह्या दुर्दैवी प्रकारामुळें लॉर्ड आयर्विन ह्यांचे मन अस्वस्थ झालें. "हिंदी राष्ट्रीय जीवन व धर्म यांचें नांव राखण्याकरितां तरी असले दंगे थांबवा," असें लॉर्ड आयर्विन ह्यांनी कळकळीचे उद्‌गार काढले.

आगस्ट महिन्यांत 'हिल्टन यंग कमिशन'नें चलन व हुंडणावळ ह्या बाबतींत रिपोर्ट प्रसिद्ध केला. ह्या रिपोर्टाच्या आधारावर ताबडतोब १८ पेन्सांच्या प्रमाणाचें बिल कायदेकौन्सिलांत आणलें. सरकारच्या ह्या घाईबद्दल त्यांच्यावर टीका करण्यांत आली व हें बिल फेब्रुवारी १९२७पर्यंत तहकूब करण्यांत आलें.

सप्टेंबरमध्यें लाला लजपतराय आणि मोतीलाल नेहरू यांच्यांत मतभेद झाला. लालाजी वीर वृत्तीचे खरें, परंतु असेंब्लीमधून वॉक आऊट करण्याचें स्वराजिस्टांचें धोरण त्यांना आवडलें नाहीं. हिंदूच्या हितरक्षणाच्या दृष्टीनें हें धोरण अत्यंत हानिकारक आहे असें त्यांचें म्हणणें होतें. शिवाय साबरमती करारांतील अधिकाराच्या जागा स्वीकारण्याच्या बाबतींत ते अनुकूल होते. लालाजी व पंडितजी यांच्यांत बरीच जोराची वादावादी झाली, व कधीं कधीं हें प्रकरण वैयक्तिक एकेरीवरहीं आलें. लालाजींनीं असेंब्लींतील कॉंग्रेस पार्टीचा राजीनामा दिला. असेंब्लीची टर्म लवकरच सपणार होती. नवीन निवडणुका जवळ आल्या होत्या. दिवाण बहादूर टी रंगाचार्य, सर पी. शिवस्वामी अय्यर, बॅप्टिस्टा, नियोगी, महंमद याकूब, मालवीय आणि मुडिमन ह्या सर्वांनीं अध्यक्ष पटेल ह्यांच्या कामासंबंधानें प्रशंसोद्गार काढले होते. येत्या निवडणुकींत पुन्हा सर्व स्वराजिस्ट निवडून येणार असें भविष्य वर्तविण्यांत आलें होतें. अध्यक्षाची जागा दुसऱ्या कोणीही लढवितां कामां नये असेंच सर्वांचें मत होतें. नवीन इलेक्शनमध्यें पुष्कळ स्वराजिस्ट असेंब्लींत निवडून येतील ही गोष्ट सरकारला कळून चुकली होती. कर्नल वेजवूड व लालाजी ह्यांच्यांत पत्रव्यवहार चालू होता. लालाजींनीं प्रतियोगी सहकाराचा अवलंब करावा अशी खटपट चालू होती.

ह्याच वेळीं सर अब्दुल रहीम हिंदुस्थानसरकारच्या कार्यकारी मंडळांत मुसलमानाची नेमणूक करण्यांत यावी म्हणून खटपट करीत होते. लॉर्ड आयर्विन ह्यांनीं ह्या बाबतींत अब्दुल रहीम ह्यांना चोख उत्तर दिलें. असल्या निवडणुकीच्या बाबतींत लोकहिताचा विचार करून कोणाची नेमणूक करावी हें गव्हर्नर जनरलनीं स्वतंत्र बुद्धीनें ठरवावें, असें लॉर्ड आयर्विन ह्यांचें म्हणणें होतें. जातीय ऐक्याच्या बाबतींत लॉर्ड आयर्विन यांनीं जोराचा प्रयत्न केला. मद्रास इलाख्यांतील पानागलचे राजेसाहेब लॉर्ड आयर्विन ह्यांच्या धोरणाकडे लक्ष देऊन ह्याच भावनेचा पुरस्कार करूं लागले.

ह्याच वेळीं लंडनमध्यें साम्राज्य परिषदेच्या बैठकी चालूं होत्या. वसाहतींची व्याख्या ठरविण्याचें काम या परिषदेंत करण्यांत आलें. आक्टोबरच्या तिसऱ्या आठवड्यांत दक्षिण आफ्रिकेचें शिष्टमंडळ हिंदुस्थानांत आलें. हिंदुस्थानसरकारनें ह्या मंडळाला आमंत्रण दिलें होतें. मि. बेअर्स हे ह्या मंडळांतील प्रमुख होते. हिंदुस्थानांतील परिस्थितीचा अभ्यास करावा, हिंदी संस्कृतीची प्रत्यक्ष माहिती

मिळवावी व ती तीन आठवड्यांत मिळवावी म्हणून हें मंडळ हिंदुस्थानांत आलें होतें.

नोव्हेंबर १९२६ मध्यें जनरल इलेक्शन झालें. मद्रासमध्यें कॉंग्रेस उमेदवार विजयी झाले. ते आतां स्वराजिस्ट राहिले नव्हते. गौहत्तीची कॉंग्रेस सहकारितेकडे आपला कल दर्शविते कीं काय याची लॉर्ड वर्कनहेड वाट पहात होते. मि. एस्. श्रीनिवास अय्यंगार ह्यांना गौहत्ती कॉंग्रेसचे अध्यक्ष निवडण्यांत आलें होतें. मि. अय्यंगार हे स्वतंत्र वृत्तीचे होते. हा त्यांना स्वतंत्रपणाच पुढें त्यांना नडला व पं. मोतिलाल नेहरू ह्यांच्यांशीं त्यांना जोराचे दोन हात करावे लागले. हे दोघेही प्रसिद्ध वकील होते. त्यांतच ते प्रसिद्ध राजकीय मुत्सद्दी ठरल्यामुळें दोघामध्यें अशा प्रकारचें वितुष्ट वाढलें असल्यास त्यांत कांहीं नवल नव्हतें. पंडितजी-जयकर, पंडितजी-लालाजी, पंडितजी-आणि अय्यंगार, यांच्यांत एकामागून एक वादविवाद झाले. पंडितजींना ह्याप्रमाणें मुंबई, पंजाब व मद्रास ह्यांच्याशीं सारखें झगडावें लागले.

## गौहत्ती कॉंग्रेस

वरील प्रकारच्या भांडणाच्या वातावरणातच गौहत्ती कॉंग्रेसला सुरुवात झाली. सहकार व असहकार ह्यांच्यातीलच हा झगडा होता. सारखा, सतत व एकजुटीचा अडवणुकीचा कार्यक्रम चालविण्यांत यावा असें असहकारवाद्यांचें म्हणणें होतें. स्वराजिस्ट बहुमतानें निवडून आले तर हेंच धोरण स्वीकारण्यांत यावें असें ठरलें होतें. परंतु, हळूंहळूं ते सुटत जाऊन सहकारतेच्या पल्ल्यापर्यंत येऊन ठेपलें होतें. कायदेमंडळातील लोकनियुक्त कमिट्यातच नव्हें, तर सरकारी कमिट्यावरही काम करण्यास आता स्वराज्यपक्षीयाची तयारी झाली होती. शेवटीं शेवटीं सहकारितेच्या अगदीं मर्यादेवर ते येऊन ठेपले होते. कौन्सिलपक्ष वाटाघाटी करण्यास तयार होता, पण ह्या वाटाघाटींनंतर जें पदरांत पडेल त्याचा स्वीकार करण्याची त्याला भीति वाटत होती. स्वराज्य पार्टीमधील कांहीं लोक सहकारवादी होते, तरी नॅशनॅलिस्ट स्वतंत्र किंवा लिबरल ह्यांच्याइतकें खालीं उतरावयास ते तयार नव्हते. प्रतियोगी सहकारिता, सन्माननीय सहकारिता, शक्य असेल तेथें सहकारिता व अवश्य असेल त्या ठिकाणीं अडवणूक, सुधारणांच्या बाबतींत जेथें जेथें शक्य असेल तेथें सहकारिता अशा सहकारितेसंबंधाच्या अनेक कल्पना प्राग ज्योतिषपुरांतील ह्या कॉंग्रेसच्या वेळीं वातावर-

णांत वावरत होत्या. ह्याशिवाय, कधीं उघड स्तुति, तर कधीं गुप्त आमंत्रणें, त्यामुळें चलचित्त व भीरू प्रवृत्तीच्या लोकांना सरकारनें आपलेंसें करून टाकलें होतें.

गौहत्ती कॉंग्रेसच्या वेळचें वातावरण अशा ताणाताणीच्या कल्पनांनीं भरलें होतें, तरी त्यांत वाईट वाटण्याजोगें कांहीं नव्हतें. परंतु, स्वामी श्रद्धानंद ह्यांच्या आकास्मिक मृत्यूमुळें हें वातावरण प्रक्षुब्ध झालें. स्वामीजी आजारीपणांत आपल्या बिछान्यावर बसले असतांना, एका मुसलमानानें त्यांची मुलाखत घेण्याचा प्रयत्न केला व ती मिळाल्याबरोबर त्यानें त्यांच्यावर गोळी चालवून ठार केलें. अध्यक्षांची हत्तीवरून मिरवणूक काढण्याच्या दिवशीं ही बातमी गौहत्तीला येऊन थडकली. आसाम हा हत्तींचा प्रांत असल्यामुळें, कॉंग्रेसच्या अध्यक्षांची हत्तीवरून मिरवणूक काढून त्यांचा गौरव करावा, अशी आसामीयांची फार इच्छा होती. पण वरील बातमी एकाएकीं आल्यामुळें वरील मिरवणुकीची कल्पना सोडून द्यावी लागली. ह्या बातमीमुळें अधिवेशनाचें वातावरण औदासीन्यानें भरून गेलें होतें. ह्या सूचनेच्या प्रकारामुळें कॉंग्रेसमधील मुसलमान व हिंदु आतिशय दुःखी झालेले दिसत होते. नेहरूंच्या शिष्टाचारानंतर कॉंग्रेसच्या अधिवेशनास सुरुवात झाली. आसाममधील रानटी टोळ्यांचें गायनानें इतिहासांत प्रसिद्ध असलेल्या ह्या कामरूप राष्ट्रांतील नैसर्गिक रमणीयतेंत भरच पडली होती. ब्रह्मपुत्राच्या काठांवर महात्माजींच्याकरितां एक लहानशी झोपडी बांधली होती. श्री. श्रीनिवास अय्यंगार ह्यांच्या भाषणांत लोकांना नवीन असें कांहीं वाटलें नाहीं कारण त्यांचें विचार पूर्वींच सर्वांना माहीत होते. स्वामी श्रद्धानंद ह्यांच्या मृत्यूबद्दल दुःख प्रदर्शन करून, व त्यांचा गुणगौरव करून श्री. अय्यंगार यांनीं आपल्या भाषणास आरंभ केला. कॉंग्रेसचे खजिनदार उमर सोभानी ह्यांच्याही दुःखदायक मृत्यूचा त्यांनीं उचित शब्दांत उल्लेख केला. निवडणुकीसंबंधानें बोलतांना स्वराज्यपक्षाचे कौन्सिलांतील धोरण लोकांना कितपत पसंत आहे हें ह्या निवडणुकीनेंच सिद्ध केलें आहे, असें ते म्हणाले. मद्रास, बंगाल, बिहार व ओरिसा या प्रांतांतून कॉंग्रेसचा अपूर्व विजय झाला आहे. पंजाब वगैरे इतर प्रांतांतून थोड्या कमी प्रमाणांत हें यश मिळालें असलें तरी कॉंग्रेसच्या आज्ञेला लोकांनीं चांगला मान दिला असून कॉंग्रेसची शिस्त पाळण्यासही लोक तयार आहेत, असें त्यांनीं सांगितलें. द्विदल–राज्यपद्धतीवर

त्यांनीं सडकून टीका केली. देशबंधूंची मागणी, हिंदुस्थानचा दर्जा, लष्कर व आरमार, कौन्सिलांतील कार्यक्रम, ह्या सर्व विषयांवर त्यांनीं आपलें विचार प्रकट केलें. स्वराज्याच्या प्रगतीच्या आड येणाऱ्या सरकारी धोरणाचा प्रतिकार हें मूलभूत तत्त्व कानपूर काँग्रेसमध्यें मान्य करण्यांत आलें होतें. आणि ह्या तत्त्वावरच कौन्सिलांतील काँग्रेसवाल्यांचें विशिष्ट धोरण निश्चित करावयास पाहिजे असें त्यांनीं आपल्या भाषणांत प्रतिपादन केलें. अधिकाराच्या जागा स्वीकारण्याच्या कल्पनेचा त्यांनीं निषेध केला. व आपली पार्टी कौन्सिलांत बहुमतानें निवडून आलेली असेल तर दिवाणापेक्षांही ती अधिक महत्त्वाचें काम करून दाखवील, असें त्यांनीं दाखवून दिलें. नंतर चलन, जातीनिष्ठा, खादीप्रसार, अस्पृश्यता निवारण, मद्यपान निषेध वगैरे विषयाचा त्यांनीं आपल्या भाषणांत समाचार घेतला. "स्वराज्य हा बुद्धीवादावर उभारलेला सिद्धांत नसून, भावनामय अंतःकरणानें ठरविलेलें तें ध्येय आहे. एकनिष्ठ व अचल श्रद्धेनें आपल्या अंतःकरणांत आपण ह्या ध्येयाची जोपासना केली पाहिजे," असें सांगून त्यांनीं आपलें भाषण संपविलें.

गौहत्तीचे ठराव नेहमींच्या स्वरूपाचे होते. स्वामी श्रद्धानंद यांच्या मृत्यूबद्दलचा ठराव अपेक्षेप्रमाणें महात्मा गांधी यांनीं मांडला. व मौलाना महंमदअल्ली यांनी त्याला दुजोरा दिला. महात्माजींनीं खरा धर्म म्हणजे काय याचें आपल्या भाषणांत विवेचन केलें. या खुनाला कोणतीं कारणें घडून आलीं तेंहि त्यांनीं सांगितलें. "यावरून अब्दुल मसजिद याला मी बंधु कां म्हणतों हें तुम्हांला कळून येईल. स्वामींच्या खुनाचा अपराधी असेंही मी त्याला मानीत नाहीं. ज्या लोकांनीं परस्पराविरुद्ध देशाच्या भावना प्रसृत केल्या तेच खरे गुन्हेगार आहेत," असें महात्माजींनीं बोलून दाखविलें. यानंतरचा ठराव केनिया संबंधाचा होता. तेथील हिंदी वसाहतवाल्यावरील निर्बंध अधिकाधिक कडक करण्याचा कायदेशीर प्रयत्न चालू होता. पहिली डोईपट्टी २० शिलिंगाची होती. चलनांतील फेरफारामुळें ती ३० शिलिंग झाली होती. व आतां तर कायद्यानें ती ५० शिलिंगापर्यंत वाढविण्यांत आली. हिंदी लोकांचें हितरक्षण, त्यांचें स्वातंत्र्य, त्यांच्या आकांक्षा हाणून पाडून युरोपियनांचें हितरक्षण करण्याचाच हा मार्ग होता. यानंतर कौन्सिलांतील कामासंबंधानें पुढील निश्चित धोरण आंखण्यांत आलें:—

(अ) राष्ट्रीय मागणीच्या बाबतींत सरकारकडून समाधानकारक उत्तर

मिळेपर्यंत दिवाणगिन्या व इतर अधिकाराच्या जागा स्वीकारण्याचें नाकारावें. दुसऱ्या पक्षाच्या साहाय्यानें प्रधानमंडळाची नेमणूक अशक्य करून टाकावी.

( ब ) सरकारी खात्यांना लागणारा खर्च नामंजुर करावा व बजेटें फेंटाळून लावावी.

( क ) आपली सत्ता दृढतर करण्याकरितां नोकरशाही जीं कायद्याचीं बिलें आणील तीं फेंटाळून लावावी.

नोकरशाहीची सत्ता नष्ट होईल, भाषणस्वातंत्र्य, सभास्वातंत्र्य, मुद्रणस्वातंत्र्य, यांचें रक्षण होईल, राष्ट्राची आर्थिक, कार्षिक, औद्योगिक, व्यापारविषयक उन्नति होईल व राष्ट्रीय जीवनाची हितकर वाढ होईल, अशा प्रकारचीं जरूर तीं बिलें कायदेमंडळापुढें मांडावीं व त्यांना पाठिंबा द्यावा-

( ड ) कुळांची स्थिती सुधाण्याकरितां खंडाचें प्रमाण निश्चित होईल व इतर फायदे त्यांना मिळतील, असें उपाय योजण्यांत यावे.

( फ ) तसेंच कार्षिक व औद्योगिक कामगारांचे हक्क साधारणतः सुरक्षित राहतील व जमिनदार व कुळें, भांडवलवाले व कामगार यांच्यांतील संबंध सलोख्याचे राहतील अशी तजवीज करण्यांत यावी.

बंगाल डेटिन्यूच्या बाबतींत जादा कायदे करण्याच्या धोरणाचा निषेध करण्यांत आला. राष्ट्रांतील व राष्ट्राबाहेरील राजकीय चळवळीचा प्रसार, हिंदु-मुसलमान ऐक्य, गुरुद्वार कैदी व चलन पद्धति वगैरे विषयांचा योग्य शब्दांत ठराव करून समाचार घेण्यांत आला. कॉंग्रेसच्या पुढील अधिवेशनाची जागा ठरविण्याचें काम, ऑ. इं. कॉंग्रेस कमिटीकडे सोंपाविण्यांत आलें.

आतां कॉंग्रेसमधील कांहीं मजेदार गोष्टी सांगावयास हरकत नाहीं. प्रदर्शना-मध्यें मांडलेल्या जुन्या चिलखताकडे झूरिचहून आलेल्या दोन प्रोफेसरांचें लक्ष गेलेलें दिसलें. ते कसें तरी मोडके तोडके इंग्लिश बोलत होते. ‘ तुम्ही इंग्रजी कसें शिकला ’ असें त्यांना विचारलें असतां, ‘ अहो, आम्ही तें शिकलों, तुमच्यासारखेंच आम्हीही तें शिकलों. ’ मिस्टर अँड मिसेस पिथविक लॉरेन्स कॉंग्रेसमध्यें हजर होत्या. मि. पिथविक यांना थोडें कमी ऐकूं येत होतें. पिथ-विकबाई जास्त चलाख होत्या. हिंदुस्थान हें केवळ राजकीय दृष्ट्याच गुलाम आहे असें नसून आर्थिक व वैपारिक दृष्टीनेंही ते गुलाम आहे हा एक नवीन शोधच त्यांना लागला.

काँग्रेसमध्यें गांधी उपस्थित होतेच. ते नुसते मुकाट्यानें पाहात बसलेले नव्हते. काँग्रेसच्या चर्चेत त्यांनीं प्रत्यक्ष भाग घेतला. विषयनियामक कमिटींत प्रत्यक्ष पास झालेले दोन ठराव दुसरे दिवशीं बदलण्यांत आले. यांपैकीं एक नाभा संस्थानासंबंधाचा होता व दुसऱ्या ठरावांत चलनपद्धतीचा विचार केला होता. स्वातंत्र्यासंबंधाचा तिसरा ठराव गांधींनीं आपल्या वक्तृत्वानें तोंड दाबून मारून टाकला.

नाभासंबंधानें मोतीलालजींनीं एक लहानसें भाषण केलें. नाभाच्या महाराजांनीं आपल्याला वकीलपत्र दिलें असल्याकारणानें आपण जाहीर रीतीनें या बाबतींत बोलूं शकत नाहीं, असें ते म्हणाले. चलनपद्धति आणि हुंडणावळ यांच्यासंबंधानें काँग्रेसमध्यें विचार करण्यांत यावा, म्हणून नरोत्तम मुरारजी व इतर काहीं अर्थशास्त्रज्ञ काँग्रेसला उपस्थित होते. जयकर काँग्रेसला आले नव्हते व केळकरही कोठें दिसत नव्हते. यावेळीं दोघेही आजारी होते. प्रतियोगी सहकारितावाले काँग्रेसमधून आतां निश्चितपणें फुटून बाहेर पडले होते. ग्रामसेवेवर गोहत्ती येथें विशेष भर देण्यांत आला. काँग्रेस कमिटींतील अधिकाराच्या जागीं असलेल्या प्रत्येक इसमानें नेहमीं खादी वापरलीच पाहिजे असा ठराव करण्यांत आला. तसेंच, ज्यांना काँग्रेसच्या निवडणुकींत मत द्यावयाचें आहे, त्यानीं नेहमीं खादी वापरली पाहिजे, असें निश्चित करण्यांत आलें. आतां आपण गौहत्ती काँग्रेसची व रमणीय कामरूप देशाची रजा घेऊं. येथील रहिवाशांचे चेहरे मंगोलियन छापाचे असले तरी, हिंदुस्थानातील इतर भागांप्रमाणें एकाच देव-देवतांची ते लोक पूजा करतात. त्यांच्याही चालीरीती हिंदुस्थानांत रूढ असलेल्या चालीरीतीप्रमाणेंच आहेत व त्यांची संस्कृतीही हिंदु संस्कृतीला धरून आहे. कामारण्य मंदिर काँग्रेसच्या प्रतिनिधींनीं पाहिलें. ब्रह्मपुत्रेच्या पात्रांतील उंच खडकावर प्रतिष्ठापित केलेल्या देवीचें दर्शनही त्यांनीं घेतलें. गौहत्तीपासून तेरा मैलावर असलेल्या वशिष्ठाश्रमाचें त्यांनीं कौतुक केलें.

देवदेवतांचा विचार आतां पुरे, पुन्हां आपण काँग्रेसच्या प्रपंचाचा विचार करूं. १९२६ मधील स्वराजिस्टांच्या निवडणुकीसंबंधानें काँग्रेसच्या अध्यक्षांनीं निसटता उल्लेख केला होता. काँग्रेसवाल्यांचा निवडणुकीचा कार्यक्रम काळजीपूर्वक तयार करण्यांत आला होता. मद्रासनें या बाबतींत चांगलाच

घाल मारला व सरकारनेंही ही गोष्ट कबूल केली. संयुक्त प्रांतांत तितकेसें यश आलें नाहीं. पंडित मोतीलालजींनीं या बाबतींत पुढील उद्गार काढले होते:—

' स्वराजिस्टांना या ठिकाणीं उधळून लावण्यांत आलें. पराजय हा त्याला अन्वर्थक शब्द नाहीं. ते स्वराजिस्ट म्हणून नव्हे, तर ते राष्ट्रीय होते म्हणून ही गोष्ट घडून आली. इतर पक्षांच्या राजकीय कार्यक्रमांशीं या निवडणुकींचा कांहीं संबंध नव्हता. राष्ट्रीयत्व व हीन प्रकारची जातिनिष्ठा यांच्यांतील हा लढा होता. जातिनिष्ठेला द्रव्यबलाचा भरपूर पाठिंबा होता. लांचलुचपत, दहशत व खोट्या कंड्या पिकविणें, यांचा अवलंब या जातिनिष्ठ लोकांनीं केला होता. कॉंग्रेस-विरुद्ध असलेल्या हिंदु व मुसलमान या दोघांनींही ' धर्मावर संकट आलें आहे ' असा एकच ओरडा सुरू केला होता. मी गोमांस खातों, गोवध करतों, मशिदी-पुढील वाद्यांच्या मनाईला पाठिंबा देतों. अलाहाबादमधील रामलीला मिरवणुकी बंद झाल्या त्याला मीच जबाबदार आहे, अशी माझी उघडउघड नालस्ती करण्यांत येत होती. या सगळ्या खोट्या कंड्यांना सार्वजनिक सभांतून मी उत्तरें दिलीं असतीं पण, खेडेगांवांतून व झोपडयांतून त्यांचा प्रवेश झाला होता. मी त्या ठिकाणीं पोहोंचूं शकत नव्हतों. डाक बंगल्यांत व इन्स्पेक्शन बंगल्यांत मी राहातों व युरोपियन पद्धतीवर तयार केलेलें अन्न मी खातों यांच्या आधारा-वर या खोटया कंडया पिकविण्यांत आल्या होत्या.

वार्षिक अधिवेशनांतून धर्मबुद्धीनें ठराव पास करावयाचे व कौन्सिलप्रश्ना-च्या बाबतींत सारखें भांडत राहावयाचें असलें कंटाळवाणें स्वरूप कॉंग्रेसला अलीकडे प्राप्त झालें होतें. एकच गोष्ट समाधानकारक होती व ती म्हणजे अखिल भारतीय चरखा संघाची स्थापना ही होय. खादीपैदाशीमुळें खेड्यांतील वातावरण शुद्ध झाल होतें व खेडयांचीं आर्थिक सुधारणा व खेडेगांवांतील लोकांची नैतिक सुधारणा या गोष्टींला खादीप्रसारानें मदत झाली होती. खादी-च्या कार्यांत एकनिष्ठेनें काम करणारे स्त्री-पुरुष मतदानाच्या गडबडीपासून व लॉबींतील भावनोद्दीपक वातम्यांपासून अलिप्त होते. या कलेची किती जोरानें प्रगति होत आहे ही गोष्ट वार्षिक प्रदर्शनांतून दिसून येत होती. गेल्या सहासात वर्षांत बिहारमध्यें या कलेंत झालेल्या प्रगतीनें सर्व हिंदुस्थानाला एक धडा घालून दिला होता. बिहारची कोकटी व आंध्रची शिकोकोल पाहून प्रेक्षक त्यांचें कौतुक करीत होते. आसामांतील एंडी व मुगा रेशमानें लोकांचें

लक्ष आपणाकडे वेधून घेतलें होतें. सुताचा पीळ, टिकाऊपणा व सारखेपणा यांत सारखी प्रगति होत चाललेली दिसून आली. या धंद्यामुळें ठिकठिकाणच्या परागंदा झालेल्या कुशल कामगारांना पुन्हां आपला पूर्वीचा धंदा मिळाला होता. खादीमध्यें त्यांनीं कला व सौंदर्य निर्माण केलें होतें. रंगारी, धोबी, सूत कांतणारा, विणकर व किरकोळ व्यापार करणारा, या सर्वांनाच खादीमुळें धंदा मिळाला होता. प्रदर्शन हें कॉंग्रेसचें एक अंगच होऊन बसलें होतें. एकदोन वर्षे खेरीजकरून दरसाल या प्रदर्शनांत खादीशिवाय दुसरें कापड ठेवण्यास मनाई करण्यांत आली होती. कॉंग्रेसमधील इतर चळवळींबरोबरच ही औद्योगिक चळवळ सुरू झाल्यामुळें स्वराज्य म्हणजे गरिबांना अन्न व वस्त्र पुरविणें, अशी लोकांची खात्री झाली होती.

---

## प्रकरण आठवें

# कॉंग्रेसचा कौन्सिलमधील लढा, १९२७

अॅसेंब्लींत कॉंग्रेसनें चालविलेला लढा—एस्. सी. मित्र यांच्यासंबंधाचा तहकुबीचा ठराव—चकमकी—हुंडणावळीच्या दराचा प्रश्न—सकलातवालांची भेट—अध्यक्ष पटेल यांचा ट्रस्ट—पंडितजी विरुद्ध अयंगार—पंडितजींचा स्कीन कमिटी-वरील जागेचा राजीनामा—द. आफ्रिका—नवें वातावरण—लालाजींचें युरोपला प्रयाण—मुंबईतील ऑ. इं. कॉंग्रेस कमिटीची सभा—घटना तयार करण्याचा निर्णय—ऑ. इं. कॉंग्रेस कमिटीचे इतर ठराव—मद्रास कौन्सिल पक्ष—सुभाषचंद्र बोस यांची मुक्तता—जातीय तंटे—धर्मभावना दुखविल्याबद्दल शिक्षा करणारा नवा कायदा—ऐक्य परिषद (ऑक्टोबर)—इतर ठराव—सायमन कमिशनची नेमणूक जाहीर करण्यांत आली—डॉ. बेझंट व कमिशन—पं. मोतिलालजी यांचें कमिशनसंबंधाचे विचार—कमिटीचें कार्य—मद्रास कॉंग्रेस—डॉ. अन्सारी यांचें भाषण—इतर ठराव—स्टॅटयूटरी कमिशनवर बहिष्कार—काकोरी—खटला स्वातंत्र्याचें ध्येय—प्रदर्शन—गिरणी कापडाला मंजुरी.

निरनिराळ्या कायदेमंडळांतून कॉंग्रेस पार्टीचें काम कसें काय चालूं होतें तें आतां आपण पाहूं. गेल्या तीन वर्षांत बंगाल व मध्यप्रांत येथील द्विदलराज्य-पद्धति नष्ट झाली होती हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. १९२७ सालीं दोन्ही प्रांतांत ती पुन्हां सुरू करण्यांत आली. दिवाणाच्या पगाराच्या मागणीचा ठराव बंगाल कायदेकौन्सिलांत ९४ विरुद्ध ८८ मतांनीं व मध्यप्रांतांत ५५ विरुद्ध १६ मतांनीं पास झाला. २६ मार्च रोजीं स्वराज्यपक्ष अॅसेंब्लीतून बाहेर पडला. जनरल् इलेक्शन होण्यापूर्वी पुन्हां अॅसेंब्लींत जावयाचें नाहीं असें त्यानें ठरविलें होतें परंतु, रुपयाची किंमत १६ पेन्साऐवजीं १८ पेन्स करावी हा ठराव सरकारनें अॅसेंब्लीपुढें मांडल्याबरोबर स्वराज्यपक्षाला अॅसेंब्लींत पुन्हा प्रवेश करावा लागला. व तहकुबीचा ठराव मंजूर करून घेऊन हा ठराव अॅसेंब्लीच्या पुढील बैठकीपर्यंत म्हणजे नव्या निवडणूकी होईपर्यंत, ढकलण्यांत आला. निवडणुकी-नंतर अॅसेंब्लीची बैठक भरली त्या वेळीं या '१८ पेन्साच्या' प्रश्नानें अॅसेंब्लीच्या प्रत्येक सभासदाचें चित्त व्यग्र करून सोडलें होतें. या बैठकींत पं. मोतीलाल

त्यांनीं श्री. सत्येंद्रचंद्र मित्र यांच्या अनुपस्थितीसंबंधानें चर्चा करण्याकरितां असेंब्लीची बैठक तहकूब करण्याचा ठराव आणून तिच्यावर पहिला हल्ला चढविला. श्री. सत्येंद्रचंद्र मित्र हे तुरुंगांत असतांनाच त्यांना असेंब्लीकरितां निवडण्यांत आलें होतें. १९३५ सालीं श्री. शरदचंद्र बोस यांच्या अनुपस्थितीसंबंधानें असेंब्लींत असाच ठराव येऊन तो पास झाला. पं. मोतीलाल यांनीं आणलेला हा ठरावही त्या वेळीं सरकारविरुद्ध १८ अधिक मतांनीं पास झाला. पण श्री. सत्येंद्रचंद्र मित्र यांना असेंब्लीच्या बैठकीस हजर राहाण्याकरितां मुक्त करण्यांत आलें. बंगाल डेटिन्यूसंबंधाचाही ठराव असेंब्लीपुढें माडण्यात आला होता. पंडितजींनीं मुख्य ठरावावर उपसूचना जोडून सर्व डेटिन्यूंना मुक्त करण्यांत येऊन त्यांच्यावरील आरोपाची कोर्टापुढें चौकशी करावी अशी मागणी केली होती. पंडितजींची ही उपसूचना सरकारविरुद्ध १३ अधिक मतें पडून पास झाली. चीनकडे हिंदी लष्कर रवाना करण्यांत आलें. फिजीला गेलेल्या हिंदी शिष्टमंडळाच्या प्रसिद्धीला बंदी करण्यांत आली. (या ठरावाला परवानगी देण्यांत आली नाहीं.) रेलवे बजेट मंजूर होईपर्यंत चलनाच्या बाबतींतील कायद्याचा विचार करूं नये. याप्रमाणें अनेक तहकुबीचे ठराव असेंब्लीपुढें माडण्यांत आले. त्यापैकीं शेवटला ठराव ७ मताच्या बहुमतानें पास झाला. खरगपूर येथील रेलवे संपासंबंधाचा ठराव या तहकुबीच्या ठरावापैकीं शेवटचा ठराव होता. यानंतर असेंब्लींतील सरकारी व बिनसरकारी सभासदांत अनेक चकमकी झडल्या. पोलाद संरक्षण बिलानें या चकमकीला आरंभ करून दिला. १९२३ सालींच हा प्रश्न उपस्थित झाला होता. टॅरिफ बोर्डानें या धंद्याला मदत देण्यासंबंधानें शिफारस केली होती. त्यानंतर पुन्हा या प्रश्नानें उचल खाल्ली व देशांत आयात होणाऱ्या या मालावरील जकात वाढवावी अशी शिफारस केली. बोर्डाच्या या शिफारशीला अनुसरून, सरकारनें आणलेल्या ठरावाला असेंब्लीनें मान्यता दिली. नॅशनॅलिस्ट पक्षाचे डेप्युटी लीडर मि. जयकर यानीं सर्व अंदाजपत्रक फेटाळून लावावें असा ठराव पुढें माडला व लोकपक्षाला ९ मतें अधिक मिळून तो मंजूर झाला. नंतर रुपयाची किंमत १८ पेन्स करण्यासंबंधाचा सर्वांत महत्त्वाचा प्रश्न चर्चेला निघाला. महायुद्धापूर्वी व युद्धाच्या दिवसांत एका पौंडाची किंमत १५ रु. होती. ती आतां १३ रु. ५ आ. ४ पै करण्यांत आली. यामुळें हिंदुस्थानांत माल आयात करणाऱ्या व्यापाऱ्यांचा अर्थातच फायदा झाला. याच्या उलट पर-

देशांत आपलें धान्य निर्गत करणाऱ्या रयतांचें नुकसान झालें. याप्रमाणें १९२५ सालीं निर्गत झालेल्या ३१६ कोटि रु. किंमतीच्या मालांत हिंदुस्थानच्या रयताला ४० कोटि रुपयांचें नुकसान सोसावें लागलें. २४९ कोटि रु. चा माल आयात करणाऱ्या व्यापाऱ्यांना ३१ कोटि रु. आधिक मिळाले. तेव्हां ज्या देशाची निर्गत आयातीपेक्षां जास्त आहे, त्याचें वरीलप्रमाणें सालोसाल नुकसान होणें हितावें नाहीं. यामुळेंच या प्रश्नावर जोराचा वादविवाद झाला. परंतु, ६८ विरुद्ध ६५ मतांनीं लोकपक्षाचा पराभव झाला.

असेंब्लीच्या नव्या निवडणुकीनंतर श्री. विठ्ठलभाई पटेल यांची अध्यक्षस्थानीं पुन्हां निवडणूक झाली. अध्यक्ष पटेल यांनीं यावेळीं आपल्या पगारापैकीं द. म. १६५६ रु. महात्मा गांधींना अर्पण करण्याचें व २००० रु. आपल्या स्वतःच्या खर्चाकरितां ठेवण्याचें ठरविलें. म. गांधींनीं ही जबाबदारी स्वतः एकट्याच्या अंगावर घेतली नाहीं. या ट्रस्टचा कारभार कसा करावयाचा यासंबंधानें सूचना मागविल्या व इतर मंडळींनाही त्यांनीं आपल्याबरोबर या ट्रस्टीमध्यें घेतलें. रास येथें ( गुजराथ ) ३१ मे १९३५ रोजीं मुलींचें हायस्कूल उघडण्याचा समारंभ झाला, त्या वेळीं या फंडाचे ४० हजार रु. आपल्याकडे आहेत व त्यावरील व्याजाचे १००० रु. तेवढे खर्च करण्यांत आले आहेत असें त्यांनीं सांगितलें.

कानपूर येथें म. गांधींनीं घेतलेल्या मौनव्रताची एक वर्षाची मुदत संपली. महात्माजींच्या बाबतींत ही गोष्ट नवीन नाहीं. काँग्रेसनें ज्या ज्या वेळीं त्यांच्या सल्ल्याकडे दुर्लक्ष केलें त्या वेळीं स्वतः बाजूला होऊन काँग्रेसला योग्य वाटेल त्याप्रमाणें वागण्यास मोकळे सोडले होते. बिहारमध्यें दौरा काढून त्यांनीं आपल्या कामाला पुन्हां सुरुवात केली. देशबंधु दासांच्या स्मारकार्थ पैसा जमा करून खादी पैदाशीच्या कामाकरितां तो खर्च करावयाचा असें त्यांनीं ठरविलें. कौन्सिलच्या कार्यक्रमांत त्यांना कधींच गोडी वाटली नाहीं. खुद्द लालाजींनींही या कामाच्या निष्फळतेसंबंधानें टीका करून हें काम करणें राष्ट्राच्या शक्तीचा व उत्साहाचा अपव्यय करण्यासारखें आहे असें त्यांनीं सांगितलें. लालाजींनंतर श्री. श्रीनिवास अय्यंगार यांनींही कौन्सिलच्या कामाची निष्फळता दाखवून दिली व आपल्या अडवणुकीच्या धोरणाचा प्रभाव दाखविण्यास असेंब्ली किंवा कौन्सिलें हीं पुरेशीं कार्यक्षेत्रें नाहींत असें त्यांनीं प्रतिपादन केलें.

श्री. सरोजिनीदेवींच्या द. आफ्रिकेंतील दौऱ्याचा उल्लेख मागेंच केला आहे.

ही १९२४ सालची गोष्ट होती द. आफ्रिकेंतील हिंदी लोकांची परिस्थिति या वेळीं अत्यंत हीन दर्जाची झाली. जनरल स्मट्स् हे सेग्रीगेशन बिल पास करून घेण्याच्या विचारांत होते. श्री. सरोजिनीदेवी हिंदी राष्ट्रीय सभेच्या विनंतीवरून प्रथम पूर्व आफ्रिकेला गेल्या व नंतर द. आफ्रिकेंत येऊन त्या दाखल झाल्या. तेथील हिंदी लोकांनीं त्यांचें मोठ्या उत्साहानें स्वागत केलें. ज० स्मट्स् यांच्या सरकारचेंच धाबें दणाणल्यामुळें वरील बिल मागें पडलें. तरी १९२५ सालीं ज. हर्टझॉग अधिकारारूढ झाल्यावर क्लास एरियाज बिल या नांवानें पूर्वीपेक्षांही कडक स्वरूपाचें सेग्रिगेशन बिल तयार करण्यांत आलें. युनियन पार्लमेंटपुढें हें बिल आलें असतें तर त्याला थोडा विरोध झाला असता, हें खरें; तथापि सरकारची त्याला तावडतोब संमति मिळाली असती. ह्या वेळीं मि. ॲंड्र्यूज यानीं हें बिल पास झाल्यास गांधी–स्मट्स् करार मोडल्यासारखाच होतो असा प्रश्न उपस्थित केला. हिंदुस्थान सरकारनेंही युनियन सरकारकडे पॅडिसन शिष्टमंडळ पाठविलें. युनियन सरकारनें त्याच मनापासून स्वागत केलें नाहीं. हें बिल ह्या वेळीं मागें घेण्यात्त आलें. द. आफ्रिकेंतील हिंदी लोकांच्या प्रश्नासंबंधानें दोन्ही सरकारांनीं एकत्र विचार करावा असें ठरलें. पहिली केप–टाऊन कॉन्फरन्स ह्याचमुळें भरविण्यात आली. मि. ॲंड्र्यूज ह्यांना ह्या वेळीं पुन्हां साऊथ आफ्रिकेंतील हिंदी काँग्रेसच्या प्रतिनिधींना स[illegible] देण्यांकरिता म्हणून द. आफ्रिकेला पाठविण्यांत आलें. ह्या परिषदेचा फारसा उपयोग झाला नाहीं तरी अशा प्रकारचें बिल पुन्हा लवकर युनियन पार्लमेंटपुढें येणार नाहीं अशी तजवीज झाली. त्याचप्रमाणें ह्या चर्चेचा आणखी एक महत्त्वाचा परिणाम झाला. हिंदी लोकांचें हितरक्षण करण्याकरिता द. आफ्रिकेला हिंदुस्थानातर्फे एजंट जनरल पाठविण्याचें ठरलें.

१९२५–२६ सालीं दक्षिण आफ्रिकेचे काँग्रेस प्रातिनीधिमंडळ हिंदुस्थानांत दौऱ्यावर होतें. १९२६ च्या ऑक्टोबरांत सर महंमद हबीबुल्ला ह्याच्या नेतृत्त्वाखालीं हिंदी प्रतिनिधिमंडळ साऊथ आफ्रिकेला गेलें. १७ डिसेंबर १९२६ रोजीं द. आफ्रिकेचे मुख्य प्रधान ह्यांच्या निमंत्रणावरून एक परिषद भरविण्यांत आली. ह्या परिषदेचें काम १३ जानेवारी १९२७ पर्यंत चालू होतें. सेवटीं दोन्ही प्रतिनिधिमंडळांच्या संमतीनें पुढील हंगामी करार ठरविण्यांत आलाः—

द. आफ्रिका सर्व न्याय्य व कायदेशीर मार्गानें पाश्चिमात्य राहणी क़ायम

टिकविण्याचा प्रयत्न करील. द. आफ्रिकेंतील हिंदी नागरिकांपैकीं जे लोक पाश्चिमात्य राहणीचा स्वीकार करण्यास तयार होतील त्यांना तसें करण्याचे कामीं युनियन सरकार मदत करील. ज्या हिंदी लोकांना ह्या सोयीचा फायदा घ्यावयाचा नसेल त्यांना ज्या ठिकाणीं पाश्चिमात्य राहणीची जरूरी नाहीं अशा देशांत जाण्याच्या कामीं युनियन मदत करील. युनियनमध्यें ३ वर्षें सतत गैर-हजेर राहिल्यास हिंदी इसमाचा द. आफ्रिकेच्या नागरिकत्वाचा हक्क काढून घेण्यांत येईल. सरकारच्या योजनेप्रमाणें त्याची मदत घेऊन परदेशीं गेलेला इसम पुन्हां ३ वर्षांत साऊथ आफ्रिकेंत येऊं इच्छित असेल तर त्याला तशी मोकळीक देण्यांत येईल. मात्र त्याला बाहेर देशीं पाठविण्याच्या बाबतींत परत सरकारनें जो खर्च केला असेल तो त्यानें भरला पाहिजे. आफ्रिकेंतून जे हिंदी लोक हिंदुस्थानांत येतील त्यांची हिंदी प्रजा ह्या नात्यानें हिंदुस्थान सरकारनें काळजी घ्यावी. पूर्वीं कोणत्या तरी ब्रिटिश देशाचा नागरिक असलेल्या इसमाला आपली बायको व मुलें दक्षिण आफ्रिकेंत आणतां येतील. कोणत्याही इसमाला आपली एकच बायको आणि मुलें दक्षिण आफ्रिकेंत आणतां येतील, एकापेक्षां अधिक बायकांना आणतां येणार नाहीं. आपली बायको व मुलें कायदेशीर रीतीनें आपलीच असल्याबद्दल हिंदुस्थान सरकारचें सर्टिफिकेट सादर केलें पाहिजे.

वरील अटी मान्य झाल्यास दक्षिण आफ्रिकेपुढें असलेल्या सर्व अडचणी नाहींशा होतील व आर्चेरिझर्वेशन, इमिग्रेशन, व रजिस्ट्रेशन वगैरे बिलें पास करून घेण्याचा प्रयत्न द. आफ्रिकन सरकार ह्यापुढें करणार नाहीं.

हा करार कसा पाळला जातो याकडे दोन्ही सरकारांनीं लक्ष द्यावें व ह्या बाबतींत वेळो वेळीं परस्परांनीं आपसांत विचार विचारविनिमय करावा.

दोन्ही सरकारांमध्यें सततचें सहकार्य राहावें ह्याकरितां एक एजंट नेमण्यांत यावा अशी युनियन सरकारनें हिंदुस्थान सरकारला विनंति केली. द. आफ्रिकेंत हिंदुस्थानचा एजंट ठेवण्याची कल्पना म. गांधींना पसंत होती. केपटाऊन गोल-मेज परिषदेस शेवटीं महात्माजींनीं हिंदी वर्तमानपत्रांतून नामदार शास्त्री ह्यांचें एजंट म्हणून नांव सुचविलें. सरकारनेही ह्या गोष्टीला तावडतोब संमति दिली. व नामदार शास्त्री ह्यांची ह्या कामीं नेमणूक केली. ह्या परिषदेंत जो करार झाला त्या बद्दल दोन्ही पक्षांनीही आपलें समाधान व्यक्त केलें. हा करार म्हणजे दोन्ही पक्षामधील सन्माननीय तडजोड आहे असें महात्माजींनींही कबूल केलें.

गोहत्ती अधिवेशनांत कायदेभंगाचा चुकून देखील उल्लेख करण्यांत आला नव्हता. ह्यामुळें १९२७ सालीं एक नवीनच वातावरण हिंदुस्थानांत निर्माण झालें. गोहत्ती काँग्रेसनें सहकार्याची तयारी दाखविली नाहीं याबद्दल सरकार निराश झालें होतें. तथापि प्रत्यक्ष परिस्थिती अशी होती कीं, सर्व प्रांतांतून प्रधानमंडळें बनविण्यांत आली होती व द्विदल राज्यपद्धतीचा अमलही चालू होता.

महात्माजींनीं असहकारितेचा व कायदेभंगाचा कार्यक्रम तहकूब ठेवला होता. व केवळ खादी-प्रसाराच्या दौऱ्यावर ते निघाले होते. तेव्हां हिंदुस्थानांतील संस्थानांच्या महाराजांना त्यांची आतां भिती वाटेनाशी झाली होती. कांहीं महाराजांनीं म. गांधींना आपल्या संस्थानास भेट देण्याबद्दल विनंति केली होती. खादी हा कॉंग्रेसच्या स्वयंसैनिकदलाचा लष्करी राष्ट्रीय पोषाख नसून देशाची आर्थिक स्थिति सुधारण्याकरितां हा धंदा काढण्यांत आला आहे, या दृष्टीनें खादीकडे हे महाराज पाहूं लागले होते. कांहीं थोडे दिवस हा दौरा काढल्यानंतर महात्माजी आजारी झाले. १५-१६ मे रोजीं भरलेल्या ऑल इंडिया कॉं. कमिटीच्या सभेंत त्यांची प्रकृति लौकर सुधारावी ह्याबद्दल प्रार्थना करण्यांत आली. ह्या वेळीं लाला लजपतरायानीं देखील युरोपला प्रयाण केलें. श्रद्धानंदांचा खून झाला त्या वेळीं ते कलकत्ता येथें होते. गोहत्ती कॉंग्रेसला हजर राहाण्याकरितां ते जात होते, पण ही बातमी ऐकल्याबरोबर ते काँग्रेसला न जातां पंजाबमध्यें परत गेले. मुंबई येथें ऑल इंडिया काँग्रेस कमिटीची सभा झाली, त्यावेळीं वर्कींग कमिटीनें तयार केलेली हिंदु-मुसलमान ऐक्याची योजना पुढें मांडण्यांत आली. लोकसंख्येच्या तत्त्वावर निरनिराळ्या जमातींना कौन्सिलांतून जागा राखून ठेवाव्या, परंतु वरिष्ट व प्रांतिक कौन्सिलांतील प्रतिनिधींची निवडणूक संयुक्त मतदारसंघातर्फे व्हावी असें ह्या योजनेंत म्हटलें होतें. प्रांताप्रांतातील निरनिराळ्या जमातींनीं कौन्सिलातून आपले प्रतिनिधी किती असावेत हे परस्पर विचारविनिमयानें ठरवावें व हेंच प्रमाण वरिष्ट कायदेकौन्सिलांतही कायम ठेवण्यांत यावें, असेंही ह्या योजनेच्या मसुद्यांत नमूद केलें होतें. ऑ. इं. काँग्रेस कमिटीच्या ह्या सभेंत साम्राज्यशाहीविरुद्ध आंतरराष्ट्रीय काँग्रेस वसाहतींत चाललेला जुलूम व राष्ट्रीय स्वातंत्र्य ह्या विषयावरही चर्चा झाली. पंडित जवाहरलाल ह्यावेळीं युरोपांत होते. हिंदुस्थानचे प्रतिनिधी म्हणून ते या काँग्रेसला हजर होते. ही काँग्रेस

ब्रुसेल्स येथें भरली होती. कॉंग्रेसमध्यें झालेल्या कामकाजाचा रिपोर्ट पं. जवाहर-लाल यांनीं ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटीकडे पाठविला होता, व मुंबईच्या आंतरराष्ट्रीय कॉंग्रेसमध्यें पंडित जवाहिरलाल ह्यांनीं बजाविलेल्या कामगिरीबद्दल गौरव करण्यांत आला. साम्राज्यविरोधी संघानें राष्ट्रीय स्वातंत्र्याबद्दल चालविले-ल्या प्रयत्नाचें अभिनंदन करण्यांत आलें. व आपल्या बरोबरीची एक संस्था या नात्यानें या लीगला कॉंग्रेसनें मान्यता द्यावी असाही ठराव ऑ. इं. कॉंग्रेस कमिटीच्या या सभेंत करण्यांत आला.

कॉंग्रेसचें हें धोरण एका दृष्टीनें महत्त्वाचें होतें. परराष्ट्रीयप्रचाराचें काम कॉंग्रेसनें गेलीं २ वर्षे चालू केलें होतें. चिनी लोकांनीं चालविलेल्या स्वातंत्र-युद्धाला हिंदी लोकांची पूर्ण सहानुभूती आहे असाही एक ठराव करण्यांत आला. चीनकडे हिंदुस्थानसरकारनें लष्कर रवाना केलें ह्याबद्दल निषेध व्यक्त करून हें लष्कर तावडतोब परत बोलाविण्यात यावें अशीही मागणी ऑल इंडिया कॉं. कमिटीच्या ह्या सभेंत करण्यांत आली. हिंदुस्थानी सेवादलानें चीनमध्यें अॅब्युलन्स कोर पाठविण्याचें ठरविलें होतें त्याबद्दलही अभिनंदन कर-ण्यांत आलें. नंतर ब्रिटिश ट्रेड युनियन बिल, बंगाल प्रांतिक कॉंग्रेस-कमिटींतील तंटे, कामगाराची संघटणा, नागपूर सत्याग्रह, ब्रिटिश मालावर बहिष्कार वगैरे विषयावरही योग्य ते ठराव करण्यात आले. शेवटल्या विषया-वर बराच वादविवाद झाला. मद्रास कौन्सिलातील कॉंग्रेस पार्टीच्या कामा-संबंधानें जोराची टीका करण्यांत आली. व या बाबतींत निंदाव्यंजक ठराव आणण्याची धमकीही देण्यांत आली. वस्तुस्थिती अशी होती कीं, एकंदर लोक-नियुक्त १०४ सभासदांपैकीं ४५ कॉंग्रेस पार्टीचे सभासद होते. सरकारच्या म्हणण्याप्रमाणें १०४ पैकीं कॉं. चे सभासद ३८ होते. गव्हर्नरानीं प्रधानमंडळ बनविण्याबद्दल ह्या बहुमतवाल्या पार्टीच्या पुढाऱ्याला बोलावून घेतले पण त्यानें तसें करण्याचे नाकारले. तो स्वतःच कौन्सिलचा प्रेसिडेंट झाला, व कॉंग्रेसपक्षानें खाजगी रित्या अनुमति दिल्यामुळें स्वतंत्र पक्षानें आपलें प्रधानमंडळ बनविलें. कॉंग्रेस पार्टीच्या ह्या वर्तनाबद्दल आक्षेप घेण्यांत आला. कायदे-भंगाचा कार्यक्रम पुढें नसला तरी असहकारतेच्या भावनेनें ऑ. इं. कॉंग्रेस-कमिटीचे सभासद भरून गेले होते. त्यांचा दृष्टीकोनही बदललेला होता. निंदाव्यंजक ठरावाला अनुकूल मतें मिळविण्याकरितां जोराचा प्रयत्न करण्यांत

आला. हा ठराव मि. गोपाळ मेनन ह्यांनीं पुढें मांडला. श्री. केळकर ह्यांनीं ह्या ठरावाला विरोध केला ही गोष्ट अपेक्षितच होती. श्री. केळकर यांनीं आपलें भाषण ह्या वेळीं लिहून आणलें होतें. पंडित मोतीलाल नेहरू हे अधिकारमदानें व संपत्तीमदानें धुंद झाले आहेत असे श्री. केळकर यांनीं आपल्या भाषणात म्हटलें होतें. त्यानीं पं. मोतीलालजींवर ह्या प्रमाणें शाब्दिक सूडच उगवला होता. मद्रासच्या सभासदांनीं या परिस्थितिचाही फायदा घेतला. कौन्सिलांतील कॉंग्रेसपक्षानें दिवाणाचे पगार व सरकारी खात्यावरील खर्च याच्या मंजुरीविरुद्ध मतें कां दिलीं नाहींत याबद्दल वर्किंग कमिटीनें चौकशी करून रिपोर्ट करावा, अशी उपसूचना या ठरावावर आणण्यात आली होती, ती त्यानीं मान्य केली. मद्रास कौन्सिलातील स्वतंत्र पक्षानें प्रधानमंडळ बनविलें या गोष्टीला श्री. श्रीनिवास अय्यंगार अनुकूलच होते. यामुळें त्यानीं कौन्सिल पार्टीतील सनातनी कोंग्रेस प्रतिनिधींना विरोध केला. या लोकांच्याच सहकार्यानें राजकीय चळवळींत श्री. अय्यंगार पुढें आलें होतें, तथापि त्यानीं या लोकांची पर्वा केली नाहीं. वर्किंग कमिटीचे सभासद थकून गेले होते. स्टॅटयूटरी इन्क्वायरी, रॉयल कमिशन, इंग्लंडचें डेप्युटेशन यासंबंधाचीं सगळीं कामें वर्किंग कमिटीला करावयाची होतीच, शिवाय वरील गोष्टीमुळें जी प्रत्यक्ष परिस्थिती निर्माण झाली होती तिलाही तोंड देण्याशिवाय गत्यतर नव्हते. प्रधानमंडळ बनविण्याच्या बाबतींत लालाजीही विरुद्ध होते, पण त्यानींही मद्रासी लोकांच्या या धोरणावर हल्ला चढविला नाहीं.

चार वर्षाच्या शिक्षेनंतर श्री. सुभाषचंद्र बोस हे मेच्या चौथ्या आठवड्यांत मुक्त झाले. बंगाल डेटेन्यूंच्या बाबतीत लॉर्ड लिटन काहीं करू शकले नाहींत. सर स्टॅन्ले जॅक्सन हे या डेटेन्यूंना कोणत्या प्रकारचा आराम देतात याचा अनुभव अद्याप यावयाचा होता. श्री. सुभाष बोस यांची प्रकृति तुरुगवासातील कष्टामुळें बरीच नादुरुस्त झाली होती व लोकाना साहाजिकच त्यामुळें काळजी वाटत होती. १९२७ च्या उन्हाळ्यात, कौन्सिवाल्यांनीं फारशी हालचाल केली नाहीं. परंतु हिंदु-मुसलमानांच्या दंग्यानीं सर्व देशभर धुमाकूळ माडला होता. ३ ते ७ मे १९२७ या दिवसांत लाहोर येथें हिंदु-मुसलमानाचा भयंकर दंगा झाला व त्यांत २७ मृत्यू व २७२ इसम जखमी झाले. बिहार, मुलतान (पंजाब) बरेली (संयुक्तप्रांत) व नागपुर (मध्यप्रांत) वगैरे ठिकाणीं अशान्त

प्रकारचे दंगे झाले. नागपूर येथें झालेल्या दंग्यांत १९ मृत्यु व १२३ लोक जखमी झाले. लाहोरप्रमाणें नागपूर येथेंही या दंग्याला भयंकर स्वरूप प्राप्त झालें होतें. तीन वर्षापूर्वी "रंगीला रसूल" नांवाचें एक चोपडें प्रसिद्ध झालें होतें. पुस्तकाच्या वरील मथळ्यावरून आंतील मजकूर किती आक्षेपार्ह असेल, याची कल्पना करतां येण्याजोगी होती, या बाबतींत करण्यांत आलेल्या फिर्यादीची चौकशी २ वर्षे चालली. पहिल्या कोर्टांत आरोपीला शिक्षा देण्यांत आली, दुसऱ्या कोर्टांत ही शिक्षा कायम करण्यांत आली आणि शेवटीं हायकोर्टामध्यें आरोपी निर्दोष सुटला. 'रिसाला वर्तमान' नांवाचा खटलाही असाच चालू होता त्यांत आरोपीला शिक्षा झाली यामुळें कायद्याच्या बाबतींत निश्चितपणें कांहीं मत देतां येणें शक्य नव्हतें. म्हणून १९२७ च्या ऑगस्टमध्यें असेंब्लीनें "समाजांतील कोणत्याही धार्मिक भावना दुखावण्याचें कृत्य करणाराला २ वर्षांची शिक्षा दिली जाईल," अशा आशयाचें बिल मंजूर केलें. हिंदुस्थानांत यावेळीं १० संयुक्तप्रांत ६ मुंबई, पंजाब, मध्यप्रांत, बंगाल, बिहार आणि दिल्ली या प्रांतांत प्रत्येकीं दोन दोन याप्रमाणें एकंदर २६ दंगे झाले. २९ ऑगस्ट रोजीं लॉर्ड आयर्विन साहेबांनीं या दंग्याचा आढावा असेंब्लीपुढें सादर केला. या सर्व दंग्यांत २५० लोक मरण पावले व २५०० इसम जखमी झाले, असें त्यांनीं सांगितले. व हिंदु-मुसलमानांनीं एक व्हावें अशी अत्यंत कळकळीनें विनंति केली. व्हाइसरॉयांच्या या विनंतिनंतर एक ऐक्य परिषद भरविण्यांत आली, पण तिचा कांहीं उपयोग झाला नाहीं. ऑ. इं. कॉं. कमिटीनेही २७ आक्टोबर १९२८ रोजीं अशींच एक ऐक्य परिषद भरविली. मि. श्रीनिवास अयंगार यांनीं या बाबतींत पुढाकार घेतला होता. हिंदु-मुसलमान ऐक्याचा एक सर्वसंमत मसुदा मंजूर करून घेणें ही आपल्या आयुष्यांतील एक महत्त्वाकांक्षा आहे, असें त्यांनीं वेळोवेळीं बोलून दाखविले होते. या परिषदेंत बरीच वाटाघाट होऊन पुढील आशयाचा ठराव मंजूर करण्यांत आला :—

"हिंदुस्थानांतील कोणत्याही समाजानें दुसऱ्या समाजावर आपलीं धर्ममतें लादणाचा प्रयत्न करू नये. सार्वजनिक शांतता व नीति यांच्या आड न येईल अशा रीतीनें कोणत्याही समाजाला किंवा व्यक्तीला धर्मकृत्यें करण्यास पूर्ण मोकळीक असावी. हिंदूंनीं केव्हांही मशिदीवरून वाद्यें वाजवीत जावें, परंतु मशिदीपुढें मुद्दाम उभे राहून किंवा गाणीं गात राहून मशिदींतील निमाज पढणारांना

त्रास होईल असें कृत्य करू नये. कोणत्याही शहरांत किंवा खेडयांत मुसलमानांनींही गोवध करण्याचा आपला हक्क मोकळेपणानें वजावावा. मात्र रहदारीच्या रस्त्यावर, मंदिराशेजारीं किंवा हिंदुंना दिसेल अशा जागीं हें कृत्य करू नये. व वधाकरितां निश्चित केलेल्या गाईची मिरवणूक काढू नये. गाईच्या संबंधानें हिंदुची भावना तीव्र स्वरूपाची असल्यामुळें मुसलमानांनीं हिंदूंना कोणत्याही प्रकारें त्रास न होईल अशा रीतीनें गोवधाचें कृत्य करावें. ”

या दंग्यांत झालेल्या प्राणहानिकारक हल्ल्यांचा निषेध करण्यांत आला आणि देशांत अहिंसेचें वातावरण निर्माण करावें, अशी हिंदु-मुसलमान पुढाऱ्यांना विनंति करण्यांत आली. ऑल इंडिया काँग्रेस कमिटीनें हिंदु-मुसलमान ऐक्याचा प्रचार करण्याकरितां प्रत्येक प्रांतांत एकएक कमिटी नेमावी असेंही ठरविण्यांत आलें. या ऐक्य परिषदेनंतर तावडतोब २८-२९-३० आक्टोवर रोजीं कलकत्ता येथें ऑ. इं. काँग्रेस कमिटीची सभा झाली. ऐक्य परिषदेंतील ठराव जसेच्यातसे या परिषदेंत पास करण्यांत आले. वंगाल डेटीन्यूंचा प्रश्न अर्थातच या सभेंत विचारात घेण्यांत आला. या डेटीन्यूपैकीं कांहींनीं चार वर्षे कारागृहवास भोगला होता. या लोकांना मुक्त करण्यासंबंधानें खटपट करण्याकरितां एक कमिटी नेमण्यात आली. हे दोन ठराव पास झाल्यानंतर सभा ओसरू लागली व खुद्द अध्यक्षच प्रकृतीच्या नादुरुस्तीमुळें पुढील बैठकीला हजर राहिले नाहींत. काँग्रेसच्या लोकानीं अधिकाराच्या जागा स्वीकारू नयेत व प्रधानमंडळ बनविण्याचें कामीं अडथळा करावा, असा ठराव मि. टी. विश्वनाथम् (आंध्र) यांनीं सभेपुढें मांडला. परंतु मद्रासचे अधिवेशन संपेपर्यंत या प्रश्नाचा विचार करू नये, असें कमिटीनें ठरविले आहे. तेव्हां हा ठराव अस्थानीं आहे, असें सेक्रेटरीनीं सांगितलें. या गोष्टीचा निषेध करण्याकरितां ही बैठक कायमची तहकूब करावी, असा ठराव कांहीं वंगाली सभासदांनीं आणला व तो पास झाला. अमेरिकेंतील हिंदी लोक, हिंदी लोकांच्या चळवळीला मदत केल्याबद्दल सेनेटर कोपलंड यांचें आभार, सकलातवाला यांना पासपोर्ट देण्यांत आला नाहीं याबद्दल निषेध, नाभांच्या महाराजाची अधिकारच्युति वगैरे ठरावही कलकत्त्याच्या या सभेंत पास करण्यांत आले. शेवटला ठराव मि. बी. जी. हॉर्निमन यांनीं मांडला. नाभाच्या महाराजांच्या बाबतींत न्याय देण्यांत यावा, अशी कमिटीनें जोराची मागणी केली.

नोव्हेंबरचा पहिला आठवडा गडबडीचा गेला. व्हाइसरॉयांनीं आपला दौऱ्याचा कार्यक्रम रहीत केला व ते दिल्लीला परत गेले. दिल्लीस आल्यानंतर त्यांनीं हिंदुस्थानांतील राजकीय पुढाऱ्यांना निमंत्रणें पाठविली. महातमाजी या वेळीं मंगलोर येथें होते. त्यांनाही आपला दौऱ्याचा कार्यक्रम रद्द करावा लागला आणि दिल्लीला जावें लागले. त्यांनीं व्हाइसरॉयांची मुलाखत घेतली. सायमन कमिशनसंबंधींचे स्टेट सेक्रेटरींचें जाहीर पत्रक लॉर्ड आयर्विन यांनीं महात्माजींच्या हातीं दिलें. 'कां, एवढेंच काम होतें ?' या महात्माजींच्या प्रश्नाला आयर्विन साहेबांनीं होकारार्थी उत्तर दिलें. एक आण्याच्या, पोस्टाच्या तिकिटानें हें काम झालें असतें असें महातमाजी म्हणाले. लॉर्ड आयर्विन बिचारे काय करणार! त्यांना आपलें कर्तव्य बजावावयाचें होतें व सायमन कमिशन येण्यापूर्वीं हिंदुस्थानांतील राजकीय पुढाऱ्यांची सहानुभूति संपादन करावयाची होती. हें जाहीर पत्रक ८ नोव्हेंबर १९२७ रोजीं जाहीर झालें. हिंदी पुढाऱ्यानीं मित्रत्वानें या बाबतींत सहकार्य करावें, अशी व्हाइसरॉयनीं खटपट केली. या कमिशनमध्यें एकही हिंदी इसम न घेतल्याकारणानें हिंदुस्थानांतील सर्व राजकीयपक्ष संतप्त झालें होतें. कॉंग्रेसनें केलेल्या स्वराज्याच्या मागणीचा यांत कोठेंच पत्ता नव्हता. 'गंडस्योपरि पिटिका संवृत्ता' असे डॉ. बेझंट यांनीं ब्रिटीश सरकारच्या या कृत्याचें वर्णन केलें. पं. मोतीलाल नेहरू यावेळीं इंग्लंडमध्यें होते. हें कमिशन म्हणजे लहान मुलाची समजूत काढण्यासारखेंच आहे असें त्यांनीं आपलें मत दिलें. मि. डी. ई. वाच्छा वगैरे अखिल भारतीय पुढाऱ्यांच्या सहीनें या कमिशनच्या नेमणुकीविरुद्ध एक जाहीरनामा प्रसिद्ध करण्यांत आला. जाहीरनाम्यावर सही केलेल्या मंडळींत कॉंग्रेसच्या पुढाऱ्यांपैकीं कोणी नव्हते. सायमन कमिशनच्या नेमणुकीविरुद्ध देशांत सर्वत्र निषेध प्रदर्शित करण्यांत आला. अमृतसरच्या अत्याचारानतर ब्रि. सरकारच्या दुसऱ्या कोणत्याही कृत्याला एवढ्या मोठ्या प्रमाणावर निषेध करण्यात आला नाहीं असें मिस् विल्किन्सन यानीं बोलून दाखविलें. या बाबतींत लॉर्ड बर्कनहेड यांची मुलाखत घेऊन त्यांच्याशीं चर्चा करण्याकरितां लेबर पक्षानें मि. लॅन्सबरी, मॅकडोनाल्ड व स्नोडन यांची नेमणूक केली. लेबर पक्षासंबंधानें हिंदुस्थानचें मन शुद्ध राहिलेलें नव्हतें. कारण लेबर पक्ष अधिकारारूढ होता त्या वेळींच हिंदुस्थानचे स्टेट सेक्रेटरी लॉर्ड ऑलिव्हर यांनीं बंगालच्या जादा कायद्यावर सही

केली होती. कॉंग्रेसच्या अध्यक्षांनीं या कमिशनचा निषेध केला. कमिशनवर बहिष्कार घातला म्हणून हिंदुस्थानासंबंधानें कोणाचीही गैरसमजूत होण्याचें कारण नाहीं असें क. वेजवुड यांनीं म्हटलें. कॉंग्रेसच्या अध्यक्षांनीं याच उद्गाराचा अनुवाद केला.

हिंदुस्थानसरकारची राज्यपद्धति, शिक्षणप्रसार व हिंदुस्थानांतील प्रातिनिधिक संस्थांची वाढ या संबंधानें चौकशी करावी. हिंदुस्थानच्या राज्यकारभाराला जबाबदारीच्या स्वराज्याचें तत्व लागूं करणें कितपत इष्ट आहे, त्याचप्रमाणें स्थानिक कायदेकौन्सिलांतून दुय्यम मंडळें स्थापणेही इष्ट आहे कीं नाहीं याचाही विचार करावा व त्या संबंधानें रिपोर्ट करावा. सर्वत्र निषेध करण्यांत येत असलेल्या या कमिशनकडे वरील कामें देण्यांत आलीं होतीं. हिंदुस्थान सरकारनें व ब्रि. सरकारनें या रिपोर्टाची छाननी केल्यानंतर ब्रि. सरकारनें पार्लमेंटपुढें या बाबतींतल्या सूचना मांडाव्या. पार्लमेंटनें या रिपोर्टासंबंधानें हिंदी लोकांचें मत घ्यावें. हौस ऑफ लॉर्डस् व हौस ऑफ कामन्स् या दोन्ही सभांची एक संयुक्त कमिटी नेमून तिच्याकडे या सूचना विचाराकरितां सोंपवाव्या. संयुक्त कमिटीनें हिंदुस्थानांतील कायदेमंडळांच्या शिष्ट मंडळाला व देशातील निरनिराळ्या संस्थांच्या प्रतिनिधींना बोलावून त्याच्याशीं या बाबतींत चर्चा करावी, असेंही ठरविण्यांत आलें होतें.

आतां आपण १९२७ च्या कॉंग्रेसच्या अधिवेशनाकडे वळूं. कॉंग्रेसचें या वर्षाचें अधिवेशन मद्रास येथें व्हावयाचें होतें. १९२७ सालीं रॉयल कमिशन यावयाचें असल्यामुळें जिल्ह्याच्या मुख्य शहरीं कॉंग्रेसचें अधिवेशन भरविण्यांत येऊं नये असें गोहत्तीला जमलेल्या मंडळींचेंच मत होतें. कमिशनच्या बाबतींत कॉंग्रेसला कोणतें धोरण स्वीकारावें लागेल याची त्यावेळीं कोणालाच कल्पना नव्हती. अधिवेशनाची जागा ऑ. इं. कॉं. कमिटीनेंच मुक्रर करावी असें त्यावेळीं ठरलें होतें. या सालीं हिंदुस्थानांत हिंदु-मुसलमानांचे दंगे झाले व हिंदु मुसलमान पुढाऱ्यांच्या ऐक्य परिषदाही झाल्या. दोन ऐक्य परिषदांपैकीं एका परिषदेच्या ठरावाला ऑ. इं. कॉ. कमिटीनें मान्यताही दिली होती. अशा प्रसंगीं मुसलमानांपैकीं डॉ. अन्सारी यांच्यासारखा लायक मुसलमान दुसरा कोण आढळणार! डॉ. अन्सारी १८९६–९७ मध्यें मद्रास मेडिकल कॉलेजचे विद्यार्थी होते. १९१२ सालीं बाल्कन युद्धाच्यावेळीं ते रेड कॉस मिशनबरोबर

गेले होते. आपल्या धंद्यांत ते चांगले वाकबगार आहेत. इस्लामी संस्कृतीचे ते चाहते असून जुन्याचे अभिमानी आहेत. डॉ. अन्सारी यांना मद्रास कॉंग्रेसचें अध्यक्षस्थान देण्यांत आलें व त्यांनीं आपल्या भाषणापैकीं बराचसा भागांत जातीय ऐक्याचाच विचार केला. कॉंग्रेसनें ३५ वर्षें सरकारशीं सहकार्य केलें, १॥ वर्ष असहकार केला, व ४ वर्षें कौन्सिलांतून विरोध करून व सनदशीर पद्धतीनें डेड लॉक उत्पन्न करून अडवणूक केली. याप्रमाणें कॉंग्रेसच्या आजवरच्या धोरणाचा त्यांनीं आढावा काढला. " असहकारितेनें आम्हांला अपयश दिलें नाहीं तर आम्हीच असहकारितेला फशीं पाडलें " असें त्यांनीं उद्गार काढले. यानंतर सुधारणा कमिशन, डेटिन्यू, हिंदुस्थान, आशिया, व राष्ट्रीय आरोग्य या विषयांचा त्यांनीं आपल्या भाषणांत विचार केला. पार्लमेंटांतील मि. मार्डी जोन्स, मजूर प्रतिनिधी मि. पर्सेल व मि. स्प्रॅट हे या अधिवेशनाला हजर होते. या कॉंग्रेसमध्यें मंजूर झालेल्या ठरावांत सायमन कमिशनच्या ठरावाशिवाय दुसरा कोणताही महत्त्वाचा ठराव नव्हता. मृत्यूबद्दल दुःखप्रदर्शन, साम्राज्य विरोधी संघ, चीन, पासपोर्ट नाकारणें, हे नेहमींच्या परिचयाचे विषय होते. महायुद्धाची भीति एका ठरावानें प्रदर्शित करण्यांत आली व असल्या युद्धांत सरकारशीं हिंदुस्थाननें सहकार्य करूं नये असें जाहीर करण्यांत आलें. जनरल अवारी याच्या अन्नसत्याग्रहाला ७५ दिवस झाले होते. हत्यारांच्या कायद्याविरुद्ध त्यांनीं सत्याग्रह केल्यामुळें ते तुरुंगांत गेले होते. मनाई केलेली शस्त्रें घेऊन त्यांनीं मिरवणुकी काढल्या होत्या. जनरल अवारींचें अभिनंदन करण्यांत आलें व त्यांच्याबद्दल सहानुभूति प्रदर्शित करण्यांत आली. हिंदुस्थानापासून ब्रह्मदेश अलग करण्याच्या सूचनेचा निषेध करण्यांत आला. ब्रह्मदेश खालसा करण्यांत आला त्या वेळी सरकारच्या या कृत्याचा निषेध करण्यांत आला होता. व ब्रह्मदेशला काऊन कॉलनी बनवावें असें त्या वेळीं सुचविण्यांत आलें होतें. राजकीय कैद्यांना तावडतोब मुक्त करण्यांत यावे अशी मागणी एका ठरावानें करण्यांत आली. द. आफ्रिका व पूर्व आफ्रिका येथील हिंदी रहिवाशासंबंधानें दोन ठराव पास करण्यांत आले. ऑ. इं. कॉ. कमिटीनें स्वीकारलेल्या धोरणानुसारच हिंदु-मुसलमान ऐक्यासंबंधाचा ठराव करण्यांत आला. ब्रिटिश मालावरील बहिष्कार या नवीन विषयाचा कॉंग्रेसमध्यें विचार झाला. अलीकडे कांहीं वर्षें या विषयावर बरीच

चर्चा सुरू झाली होती. पूर्वी सूचना दिल्याप्रमाणें बऱ्याच स्वराज्ययोजना काँग्रेसपुढे आल्या होत्या. वर्किंग कमिटीनें इतर संस्थांशीं सहकार्य करून स्वराज्ययोजना तयार करावी व खास परिषदेपुढें ती मांडण्यांत यावी असें ठरविण्यांत आले. काँग्रेसच्या योजनेंत एक लहानसा फेरफार करण्यांत आला. या सालचा सायमन कमिशनसंबंधाचा मुख्य ठराव पुढीलप्रमाणें होता·—

## स्टॅटयूटरी कमिशनवर बहिष्कार

हिंदुस्थानच्या स्वयंनिर्णयाच्या हक्काकडे पूर्ण दुर्लक्ष करून ब्रि. सरकारनें ज्या अर्थी स्टॅटयूटरी कमिशन नेमलें आहे त्या अर्थी या कमिशनवर पावलोंपावलीं बाहिष्कार घालणें हाच एक स्वाभिमानाचा मार्ग काँग्रेसला शिल्लक राहिला असून काँग्रेस या बाबतींत पुढीलप्रमाणें ठराव करीत आहे:—

( अ ) ही काँग्रेस हिंदी जनतेला व देशांतील सर्व काँग्रेस संस्थांना पुढील विनति करीत आहे:—

( १ ) हें कमिशन हिंदुस्थानांत येईल त्या दिवशीं देशांतील सर्व जनतेनें व तें ज्या शहराला भेट देईल त्या दिवशीं तेथील नागरिकांनीं मोठ्या प्रमाणावर जंगी मिरवणुका काढाव्या.

( २ ) देशांतील सर्व राजकीय पक्षाच्या लोकांनीं या कमिशनवर परिणामकारक बाहिष्कार घालावा म्हणून त्यांचें मन वळविण्याकरितां देशांत सर्वत्र जोराचा प्रचार करावा.

( ब. ) हिंदी कायदेमंडळांतील विनसरकारी सभासदांनीं, हिंदुस्थानांतील सर्व राजकीय पक्षाच्या व जमातींच्या पुढाऱ्यांनीं व इतर लोकांनीं या कमिशनपुढें साक्षी देऊं नयेत. कोणत्याही रीतीनें कमिशनशीं सहकार्य करूं नये. तसेंच त्याच्याकारितां करण्यांत आलेल्या सार्वजनिक व खासगी समारंभांना हजर राहू नये अशी या काँग्रेसची विनंति आहे.

( क ) हिंदी कायदेमंडळांतील बिनसरकारी सभासदांना ही काँग्रेस अशी विनंति करते कीं,

( १ ) या कमिशनच्या संबंधांत नेमण्यांत आलेल्या सिलेक्ट कामिटीवर काम करूं नये व ती नेमण्याच्या बाबतींत अनुकूल मत देऊं नये.

( २ ) कमिशनच्या कामासंबंधांत करण्यांत आलेली पैशाची मागणी, ठराव किंवा सूचना फेटाळून लावावी.

(डी) कायदेमंडळाच्या कोणत्याही बैठकींना बिनसरकारी प्रतिनिधींनीं हजर राहूं नये. फक्त आपल्या जागा रिकाम्या झाल्या आहेत असें जाहीर करतां येऊ नये, यासाठी तेवढे बैठकीला हजर असावे. त्याचप्रमाणें हा बहिष्कार परिणामकारक करण्यासाठीं, प्रधानमंडळ मोडण्यासाठीं, किंवा देशाच्या हिताला विघातक अशा एकाद्या महत्त्वाच्या ठरावाला विरोध करण्यासाठीं या सभासदांनीं कायदेमंडळाच्या अधिवेशनाला हजर राहण्यास हरकत नाहीं.

(इ) हा बहिष्कार पूर्णांशानें यशस्वी व परिणामकारक करण्यासाठीं देशांतील इतर संस्थांशीं व पक्षांशीं सहकार्य करण्याचा ही कॉंग्रेस वर्किंग कमिटीला अधिकार देत आहे.

या ठरावासंबंधानें विवेचन करीत बसण्याचें कारणच नाहीं. या ठरावाशिवाय कॉंग्रेसनें काकोरी खटल्यांतील आरोपींना झालेल्या शिक्षासंबंधानें एक जादा ठराव मंजूर केला. या खटल्यांतील आरोपींना झालेल्या जबर व सुडाची भावना व्यक्त करणाऱ्या शिक्षांबद्दल लोकांनीं संताप व्यक्त केला, तरी सरकारनें त्याकडे लक्ष दिलें नाहीं व त्यांच्या शिक्षा कमीही केल्या नाहींत या बद्दल कॉंग्रेसनें तीव्र निषेध व्यक्त केला.

शेवटीं एक स्वतंत्र ठराव करून कॉंग्रेसच्या ध्येयाची पुढील व्याख्या करण्यांत आली. " पूर्ण राष्ट्रीय स्वातंत्र्य हें हिंदी लोकांचें ध्येय आहे. " हा ठराव दरसाल यावयाचा व तो नापास व्हावयाचा असें गेलीं कांहीं वर्षें चालू होते. पण पं. जवाहरलाल नेहरू युरोपांतून आल्यानंतर या ठरावाला जोराचा पाठिंबा मिळाला. मिसेस बेझंट यांनाही या ठरावांत आक्षेपार्ह असें कांहीं वाटलें नाहीं. " हिंदुस्थानानें आपलें ध्येय या प्रमाणें स्पष्ट शब्दांत मांडणें ही माननीय गोष्ट आहे, " असें मिसेस बेझंट यांनीं विषयनियामक कमिटींत बोलून दाखविलें. म. गांधी या वेळीं कमिटीच्या सभेंत हजर नव्हते.

१९२७ चा इतिहास संपविण्यापूर्वीं गुजराथेंतील महापुराच्या बाबतींत तेथील कॉंग्रेसवाल्यांनीं जें प्रशंसनीय काम केलें त्याची हकीकत देणें जरूरीचें आहे. १९२७ जुलैच्या शेवटच्या आठवड्यांत गुजराथमध्यें महापूर आला. या महापुरांत गावेंचीं गांवें वाहून गेलीं व हजारों लोक निराधार झाले. ठिकठिकाणच्या सुपीक जमीनीवर वाळूंचे मोठमोठाले थर येऊन पडले. रेल्वेचे रस्ते वाहून गेले व तारांचें दळणवळणही बंद झालें. या जलप्रलयांत ४००० खेड्यांचें नुकसान

झालें. या खेड्यांतील शें. ५०, ६० व कांहीं ठिकाणीं शें. ९० घरेंही उध्वस्त झालीं.

या संकटाचें वेळीं जातीय भेदभाव विसरून सरदार वल्लभभाई यांच्या नेतृत्वाखालीं सर्व लोक परस्परांना मदत करण्यास तयार झाले. सरदार वल्लभभाई यावेळीं अहमदाबाद म्युनिसिपालिटीचे अध्यक्ष व गुजराथ प्रां. काँ. कमिटीचे अध्यक्ष होते. जवळ जवळ २००० स्वयंसेवकांचें पथक सरदार वल्लभभाई यांच्या नेतृत्वाखालीं उभारलें गेलें. व सरकारी अधिकारी वरिष्ठांचा हुकूम मिळवून लोकांच्या मदतीच्या कामाला लागण्यापूर्वी काँग्रेसचें यंत्र पूर्ण वेगांत सुरू झालें.

म. गांधी यावेळीं म्हैसूर संस्थानांत होते. प्रकृती एकाएकीं ढासळल्यामुळें ती सुधारण्यासाठीं ते या भागांत आले होते. गुजराथची वातमी ऐकतांच ते तिंकडे जाण्यास निघाले पण, सरदार वल्लभभाई यांनींच या गोष्टीस विरोध केला व गांधींच्या शिकवणीमुळें गुजराथी लोकांत सेवावृत्तीची भावना किती वाढली आहे हें प्रत्यक्ष दाखविण्याचें ठरविलें. पुरांत सांपडलेल्या लोकांना व अधिकाऱ्यांना अन्नवस्त्र पुरविण्याचें काम या स्वयंसेवकांनीं केलें. खेडाचे डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेट पुरांत सांपडल्यामुळें बाहेरच्या जगाशीं कित्येक दिवस तरी त्यांचा संबंध तुटला होता. त्यानीं अत्यंत कृतज्ञता बुद्धीनें काँग्रेसची मदत स्वीकारली. सरदार वल्लभभाई यानीं खास स्वयंसेवक पाठवून त्यांच्याकरितां सर्व प्रकारची सामुग्री पाठवून दिली.

या महासंकटाला काँग्रेससारख्या विनसरकारी संस्थेनें तोंड देणें हें तिच्या सामर्थ्याबाहेरचें होतें. धान्य व इतर सामुग्री पुरवून लोकांना तावडतोबीची मदत करण्यान आली पण, पिकांचें नुकसान भरून काढण्यासाठीं पुन्हां जमिनी पेरणें, वाहून गाडलेल्या सुपीक जमीनी पुन्हां लागवडीस आणणें व निराधार झालेल्या लोकांकरितां आसऱ्याची व्यवस्था करून देणें हें प्रचंड काम अद्याप करावयाचें होतें. एक एक बहुमोलाचा दिवस जात होता. पुन्हां पेरण्या करण्याची वेळ निघून जाण्याचा प्रसंग आला होता. सरकार मदत करण्यास कांकूं करीत होतें. अशा वेळीं सरदार पटेलांनीं व गुजराथेंतील सुशिक्षित वर्गाच्या लोकानीं आपलें वजन खर्ची घालून फॅमिन इन्शुअरन्स फंडापैकीं. १५४०००० रु. शेतकऱ्याच्या मदतीकरितां मंजूर करण्यास सर लेस्ली विल्सन यांच्या सर-

कारास भाग पाडलें. सरकारच्या मदतीशिवाय कॉंग्रेस व इतर संस्थांनीं या संकटग्रस्तांच्या मदतीकरितां ३०००००० रु. जमा केले. या पैशांतून शेतकीचीं आऊतें, जनावरें, घरें बांधण्याची सामुग्री संकटग्रस्त शेतकऱ्यांना पुरविण्यांत आली. ब्रि. सरकार, कॉंग्रेस व बडोदा सरकार या तीन्ही प्रचंड संघटनात्मक संस्था या कामीं एक जुटीनें प्रयत्न करण्यास कंबर कसून तयार झाल्या होत्या. व कॉंग्रेसच्या नेतृत्वाखाली या भागाच्या पुनर्घटनेचें काम सुरु करण्यांत आलें होतें. गुजराथी तरुणांना या प्रसंगीं सेवेचा नवीन धडा शिकावयास मिळाला. मुंबई कौन्सिलांत वसूली खात्याचे सभासद सर सी. व्ही. मेथा यांनीं कॉंग्रेस व तिचे पुढारी महात्मा गांधी यांच्या संबंधानें प्रशंसापर उद्गार काढले.

---

## प्रकरण नववें

# कॉंग्रेसचा वाढता प्रभाव १९२८

१९२८ सालीं सायमन कमिशनच्या नेमणुकीमुळें उत्पन्न झालेल्या लोक-क्षोभानें हिंदुस्थानचें वातावरण भरून गेलें होतें. कमिशनवरील बहिष्कार यशस्वी करावयाचा इकडेच सर्व राष्ट्राचें मन गुंतून राहिलें होतें. "कमिशननें कोणत्या पद्धतीनें काम करावें हें बादशाहा सरकारनें नक्की ठरवून दिलेले नसले तरी वरिष्ठ कायदेकौन्सिलांतील बिनसरकारी सभासदांनीं आपल्यांतून निवडून दिलेल्या जॉइंट सिलेक्ट कमिटीच्या मदतीनें व तिचें वेळोंवेळीं विचार समजून घेऊन हें कमिशन काम करील तर साक्षी घेण्याचें काम त्याला फार सोयीचें जाईल असें सरकारचें मत आहे." असें लॉर्ड आयर्विन यानीं हें कमिशन जाहीर करतांना सांगितलें होतें. या व्यवस्थेमुळें हिंदी कमिटी केवळ असेसर बनणार होती. ज्यूरीची योग्यता तिला प्राप्त होत नव्हती. हिंदी लोकांचा हा एक प्रकारचा अपमानच होता. अशी व्यवस्था ठरविण्यांत हिंदी लोकांच्या स्वाभिमानास व मानास धक्का देण्याचा बादशहा सरकारचा मुळींच हेतु नाहीं, असें लॉर्ड आयर्विन यांनीं परोपरीनें सांगितलें. त्याचवेळीं ते असेंही म्हणाले कीं, हिंदी लोकांची मदत मिळो न मिळो, कमिशन आपले चौकशीचें काम चालू ठेवील. पार्लमेंटकडे आपला रिपोर्टही सादर करील व पार्लमेंटही आपल्याला योग्य वाटेल त्याप्रमाणें त्या रिपोर्टाचा उपयोग करील असेंही लॉर्ड आयर्विन यानी सांगून टाकले. २ फेब्रुवारी रोजी व्हाइसरॉयानीं वरील प्रकारचे उद्गार काढून हिंदी जनतेला आव्हान दिलें. व ३ फेब्रुवारी रोजी हें कमिशन मुंबई येथें दाखल झालें. या दिवशीं सर्व हिंदुस्थानभर हरताळ पडून बहिष्काराला सुरुवात झाली. परंतु, विशेष कांहीं घडून आलें नाहीं. मद्रास येथें हायकोर्टानजीक मिरवणूक गेली असतां गडबड उडाली व पोलिसांनीं गोळीबार केला. या गोळीबारांत एक इसम तावडतोब ठार झाला व दुसरे दोघे हॉस्पिटलांत मरण पावले. कलककत्त्यांत पोलिस व विद्यार्थी यांच्यांत बाचाबाची झाली. दिल्लीला कमिशनची पहिली भेट व्हावयाची असल्या-मुळें तेथील बहिष्काराच्या चळवळीला जोराचा रंग चढला होता. व "गो बॅक सायमन" हीं वाक्यें असलेलीं शेंकडों निशाणें घेऊन लोक मिरवणुकींतून चालले

होते. द. हिंदुस्थानांतील साउथ इंडियन लिबरल फेडरेशन (जस्टिस पार्टी) व मुसलमानांच्या कांहीं संस्था खेरीज करून, हा बहिष्कार पूर्णांशानें यशस्वी झाला होता.

सायमन कमिशनवरील बहिष्काराला याप्रमाणें यश येत असलेलें पाहून, सरकारला बरें वाटलें नाहीं व त्यानें अर्थातच आपला दडपशाहीचा दंडा हातीं घेतला. लाहोर येथें लाला लजपतराय यांच्या नेतृत्वाखालीं कमिशनच्या बहिष्कारार्थ प्रचंड मिरवणूक निघाली असतां, पोलिसांनीं या मिरवणुकीवर हल्ला केला व बॅटननें व लाठीनें लोकांना व त्यांच्यातील कांहीं माननीय पुढाऱ्यांनाही बेदम झोडपून काढलें. लालाजींवरही या प्रसंगीं लाठी चालविण्यांत आली. या भ्याडपणाच्या हल्ल्यामुळेंच लालाजींचें मरण अधिक लवकर ओढवलें. या लाठीमाराबद्दल पोलिसांवर उघड उघड आरोप करण्यांत येत असतांही सरकारनें या बाबतींत चौकशी करण्याचें नाकारलें.

लखनौ येथें कमिशन गेलें त्या वेळीं लोकांच्या निःशस्त्र व शांततायुक्त जमावावर पोलिसांनीं विनाकारण हल्ले केले. संयुक्त प्रांतीय पोलिसांनीं पंडित जवाहिरलाल यांचीही कदर ठेविली नाहीं. घोडेस्वारांनीं व पोलिसांनीं सर्व पक्षाच्या प्रसिद्ध कार्यकर्त्यांच्या डोक्यावर व पाठीवर बॅटनचे व लाठ्यांचे तडाखे लगावून आपलें कौशल्य प्रगट केलें. वीसोगणति इसम या हल्ल्यांत जखमी झाले.

चार दिवसपर्यंत लखनौ हें, हजारों स्वार व पायदळ पोलीस तेथें आल्यामुळें लष्करी ठाणेंच बनलें होतें. पोलिसांनीं रस्त्यांतून जाणाऱ्या येणाऱ्या लोकांवर हल्ले चढविले इतकेंच नव्हे तर, खासगी घरावरही छापे घालून सन्मान्य राजकीय पुढाऱ्यांना बडवून काढले व "सायमन गो बॅक" असा घोष केल्याबद्दल त्यांना अटक केली. पोलिसांच्या या अत्याचारांना लखनौच्या नागरिकांनीं दाद दिली नाहीं. पोलिसांच्या या कृत्यांचा व त्यांच्या अधिकाऱ्यांचा शहरांत सर्वत्र उपहासच करण्यांत आला. केसर बागेंत कांहीं तालुकदारांनीं सायमन कमिशनला मेजवानी दिली. या बागेला हजारों पोलिसांनीं वेढा दिला होता. व बहिष्कारवादी म्हणून ज्यांच्याबद्दल संशय आला, अशा लोकांना बागेच्या आसपासच्या रस्त्यावरूनही जाण्यायेण्याची मनाई करण्यांत आली होती. इतकी सगळी काळजी घेऊनही मेजवानीकरितां जमलेल्या लोकांवर काळ्या पतंगांनीं व

कागदी फुग्यांनीं आकाशांतून हल्ला केला. त्यांच्यावर "सायमन गो बॅक" "इंडिया फॉर इंडियन्स" अशीं वाक्यें लिहिलेलीं होतीं।

पाटणा येथें कमिशन दाखल झालें त्यावेळीं ५०००० लोकांनीं विरोधी मिरवणूक काढून कमिशनचा धिक्कार केला. कांहीं चपरासी व सरकारी नोकर स्टेशनवर कमिशनचें स्वागत करण्याकरितां आले होते. आजूबाजूच्या गांवांतून कमिशनच्या सरंजामाकरितां सरकारनें कांहीं मोटारी मागविल्या होत्या. पण या मोटारी स्वागतार्थ जाण्याऐवजीं बहिष्कारवाल्यांच्या मिरवणुकींत सामील झाल्या. इतका प्रचंड जमाव स्टेशनवर जमा झाला असतांही अत्याचाराचें क्षुल्लक कृत्यही यावेळीं घडून आलें नाहीं. हें पाहून सरकारचे चांगले डोळे उघडले व काँग्रेसचें जनतेवर किती वजन आहे, हें त्याला कळून चुकलें.

सायमन कमिशनच्या बहिष्काराची चळवळ चालविण्याकरितां मद्रास काँग्रेसवाल्यानीं कौन्सिलचें काम आखडतें घेण्याचा प्रयत्न केला होता. पण त्याचा उपयोग झाला नाहीं. वर्किंग कमिटीनें असेंब्लीतील व प्रांतिक कायदेमंडळांतील सभासदाना अधिक स्वातंत्र्य द्यावें, अशी सूचना ऑ. इं. कॉ. कमिटीकडे केली व ती मान्य करण्यांत आली. ३१ मार्च रोजीं कमिशननें मुंबईचा निरोप घेतला. "हिंदुस्थानच्या सर्व भागातील सर्व वर्गांच्या व जमातींच्या पुढाऱ्याचा कमिशननें चांगला परिचय करून घेतला," असें सायमन साहेबांनीं यावेळी उद्‍गार काढले. सायमनसाहेबांचें हे उद्‍गार म्हणजे केवळ शाब्दिक अवडंबर होतें. असेंब्लींतील बिनसरकारी सभासदांनीं कमिशनवर सरकारीरीत्या तर नाहींच पण सामाजिकरीत्याही संबंध ठेवावयाचा नाहीं, अशी प्रतिज्ञा केली होती. त्यामुळें सर जॉन सायमन व त्याचे दोस्त याच्याशीं या लोकांचा परिचय होणें शक्यच नव्हते, असें खुद्द सरकारनेंच आपल्या रिपोर्टांत कबूल केलें आहे. सरजॉन सायमन यांनीं हिंदुस्थानांत आल्यावरोवर नामदार व्हॉइसरॉय यांना ६ फेब्रुवारी रोजीं पत्र लिहिलें व हें पत्र ७ फेब्रुवारी रोजीं वर्तमानपत्रांतून प्रसिद्ध झालें.

वरिष्ठ कायदेमंडळांतील सभासदांनीं निवडलेल्या ७ इंग्लिश व ७ हिंदी सभासदांच्यापुढें कमिशननें जमा केलेलीं सगळी सामुग्री विचाराकरितां ठेवण्यांत येईल, असें या पत्रांत म्हटलें होते. या १४ जणांच्या संयुक्त बैठकींत इंग्रज व हिंदी असा भेदाभेद करण्यांत येणार नाहीं, अशीही मखलाशी या पत्रांत केली होती.

अशाच प्रकारचीं मंडळें प्रांतिक कायदेकौन्सिलांतूनही निवडण्यांत यावी

अशीही सूचना या पत्रांत करण्यांत आली होती. वरिष्ठ कायदेकौन्सिलांतील संयुक्त कमिटीनें, वरिष्ठ सरकारी कारभारासंबंधींच्या विषयाचा विचार करावा. व प्रांतिक कौन्सिलांतील कमिट्यांनीं प्रांतिक विषयाचा विचार करावा, असें ठरविण्यांत आले होतें. ब्रिटिश कमिशनरांनीं आपलें रिपोर्ट स्वतंत्रपणें बादशहा सरकारकडे पाठवावे व संयुक्त कमिटीनें आपला रिपोर्ट वरिष्ठ कायदेमंडळाकडे पाठवावा असें ह्या पत्रांत नमूद करण्यांत आले होते. सायमनसाहेबांच्या या पत्राचा कांहीं उपयोग झाला नाहीं. हें पत्र प्रसिद्ध झाल्यानंतर, ३-४ तासांनींच दिल्ली येथें राजकीय पुढाऱ्यांची बैठक भरली. कमिशनवर घेण्यांत आलेले आक्षेप या पत्रांमुळें कोणत्याही प्रकारें कमी होणार नसून कोणत्याही परिस्थितींत कमिशनशीं कसलाही संबंध ठेवण्यांत येऊ नये असेंच या पुढाऱ्यांच्या बैठकींत ठरविण्यांत आले. सेंट्रल कमिटीकरितां प्रतिनिधि निवडण्याच्या कामाकडे असेंब्लीनें यत्किंचितही लक्ष दिलें नाहीं. उलट या कमिशनची घटना व योजना असेंब्लीला सर्वस्वी नापसंत असून या कमिटीशीं कोणत्याही परिस्थितींत व कोणत्याही स्वरूपांत संबंध ठेऊ नये, असा ठराव लाला लजपतराय यांनीं आणला. पंडित मोतीलाल यांनीं ठरावावर बोलतांना असें सांगितलें कीं, "हा ठराव नकारात्मक नाहीं. या कमिशनवर निम्मे हिंदी सभासद व निम्मे इतर सभासद नेमण्यांत आलें पाहिजेत तरच हिंदी लोक या कमिशनशीं सहकार्य करतील." हा ठराव ६८ विरुद्ध ६२ मतांनीं पास झाला. असेंब्लीतील लोकनियुक्त सभासदांनीं मध्यवर्ती कमिटी न निवडल्यामुळें सरकारनेंच या कमिटीवर सभासद नेमून दिलें. हें कमिशन मुंबईला आलें त्या वेळीं शहरांतील २२ 'सरांपैकीं' एकाही 'सरा'नें कमिशनकडे ढुंकून पाहिलें नाहीं. कमिशनच्या बहिष्काराच्या बाबतींत देशांत कोणत्या प्रकारची भावना होती हें वरील गोष्टीवरून सिद्ध होण्याजोगें आहे. सहजासहजीं एक विशेष लक्षांत ठेवण्याजोगी गोष्ट सांगावयाची म्हणजे सायमन कमिशन एका बाजूनें आपलें ठरलेलें काम करीत असतांना त्यांतले कांहीं धूर्त सभासद राजकारण बाजूला ठेऊन हिंदुस्थानांतील मार्केटचा अभ्यास करण्यांत गुंतलें होते. ब्रिटिश व्यापाराला हातपाय पसरण्यास पंजाबांत पुष्कळ वाव आहे असे लॉर्ड बरह्याम यांना आढळून आलें. ब्रिटिश मोटारगाड्या, ट्रॅक्टर व लॉऱ्या हिंदुस्थानांत पाठविल्यास त्यांचा मोठ्या प्रमाणावर खप होईल असें लॉर्ड बरह्याम यांनी

आपलें ठासून मत दिलें. केवळ एजंटानींच हिंदुस्थानच्या बाजारांचा अभ्यास करतां कामा नये, तर खुद्द मालकांनींही या विषयाचा अभ्यास केला पाहिजे. व राष्ट्रीय भावना व पूर्वग्रह काय आहेत हें समजून घेऊन त्यावर आपलीं अनुमानें नक्की ठरविलीं पाहिजेत असें त्यांनीं बोलून दाखविलें.

सायमन कमिशनच्या हालचाली, सर्वपक्षीय परिषदेच्या बैठकी, व बार्डोलीची चळवळ या या सालांतील मुख्य गोष्टी होत. काँग्रेसच्या ठरावाप्रमाणें दिल्ली येथें फेब्रुवारी व मार्च या महिन्यांत ( १९२८ ) सर्वपक्षीय परिषदेच्या बैठकी झाल्या व पूर्ण जबाबदारीच्या स्वराज्याच्या तत्त्वावर राज्यघटनेचा विचार करावा. तसेंच जातीय संबंध व प्रतिनिधींचें प्रमाण हाही या परिषदेपुढील दुसरा एक महत्त्वाचा प्रश्न होता. या परिषदेच्या एकंदर २५ बैठकी झाल्या व परिषदेपुढील प्रश्नांपैकीं तीन चतुर्थांस प्रश्नांचा विचार सामोपचारपूर्वक करण्यांत आला. १९ मे रोजीं डॉ. अन्सारी यांच्या अध्यक्षतेखालीं तिसरी परिषद झाली. ता. १ जुलैच्या आंत घटनेच्या तत्त्वांचा मसूदा तयार करण्यासाठीं पं. मोतीलाल नेहरू यांच्या अध्यक्षत्वाखालीं एक कमिटी नेमण्यांत यावी व या कमिटीनें तयार केलेला मसूदा देशांतील सर्व राजकीय संस्थाकडे पाठविण्यांत यावा, असें ठरविण्यांत आलें. २९ राजकीय संस्थांनीं या ठरावाला अनुकूल मतें दिलीं.

जूनच्या तिसऱ्या आठवड्यांत तीन महत्वाच्या गोष्टी घडून आल्या. येत्या काँग्रेसचें अधिवेशन कलकत्ता येथें भरावयाचें होतें. पं. मोतीलाल हे या काँग्रेसचे अध्यक्ष होणार अशी सर्वत्र मोकळेपणाने चर्चा चालू होती. या गोष्टींत अडथळा येऊ नये म्हणून, एंपायर पार्लमेंटरी डेलिगेशनमधील आपल्या जागेचा त्यांनीं राजीनामा दिला होता. या डेलिगेशनमध्यें असेंब्लीनें निवडून दिलेल्या चार प्रतिनिधींपैकीं पं. मोतीलाल हे एक होते. बंगालला पं. मोतीलाल नेहरू पाहिजे आहेत. सन्माननीय तडजोड करण्यात ते वाकबगार आहेत. देशाला या गोष्टींची जरूर आहे व अशी तडजोड व्हावी अशी लोकांची इच्छा आहे म्हणून त्यानाच निवडा असें महात्माजींनी म्हटलें होते.

दुसरी महत्त्वाची गोष्ट म्हणजे काँग्रेसला जोडून होणाऱ्या प्रदर्शनासंबंधानें उपस्थित झालेला वाद होय. खादीला प्राधान्य देऊन, देशांत उत्पन्न होणाऱ्या सर्व वस्तु या प्रदर्शनांत ठेवण्यांत याव्या, असें प्रदर्शनाचे चिटणीस मि. एन्. आर. सरकार यांचें म्हणणें होते. हिंदी गिरण्यांतून तयार झालेलें कापड व

देशी गिरण्यांच्या सुतापासून तयार झालेलें कापड प्रदर्शनांत ठेवावयाचें कीं नाहीं हा प्रश्न त्या वेळेपुरता तसाच अनिर्णीत ठेवण्यात आला. यंत्रें, हत्यारें, आउतें यांच्याशिवाय दुसऱ्या कोणत्याही वस्तु प्रदर्शनांत ठेवण्यांत येऊ नयेत, असें ठरविण्यांत आलें. प्रांतिक औद्योगिक खात्यातर्फे तयार झालेल्या मालास मनाई करण्यांत येऊ नये, व सरकारपासून पैशाची मदत घेऊ नये असेंही ठरलें. प्रदर्शनाच्या बाबतींतील या व्यवस्थेविरुद्ध सोदेपूर, कलकत्ता येथील खादी प्रतिष्ठानचे व्यवस्थापक सतीशचंद्र दास गुप्त व त्याचे बंधू क्षितीश बाबू या सनातनी नाफेरवाद्यानीं कोलाहल माजविला. पण या कोलाहलाचा वेळेवरच निषेध करण्यात आल्यामुळें हा प्रश्न येथेंच मिटला.

तिसरी गोष्ट यापेक्षाही जास्त महत्त्वाची होती. बार्डोली तालुक्यांत सामुदायिक कायदेभंगाचा प्रयोग करण्याचें गांधीजींच्या मनात फारा दिवसापासून होतें. दोन तीन वेळां तहकूब करून १९२२ च्या फेब्रुवारींत शेवटीं या प्रयोगाचा नाद सोडून देण्यात आला होता. ११।१२ फेब्रुवारी रोजीं वर्किंग कमिटीनें बार्डोलीच्या बाबतींत केलेले ठराव कोणालाच पसंत पडले नव्हते. २० किंवा ३० वर्षांनीं होणारी कराची फेर आकारणी झाली त्यावेळीं बार्डोलींतील रयतांच्या जमिनीवरील सारा २५ टक्क्यानीं वाढविण्यात आला. स्वतःच्या खर्चानें व श्रमानें या भागातील पिकाची वाढ आपण केलेली असल्यामुळें अशी सारावाढ करणें योग्य नाहीं असें बार्डोलीच्या रयताचें म्हणणें होतें. सारावाढ मुळींच करण्यांत येऊ नये असें हे रयत म्हणत नव्हते, तर या तालुक्यातील आर्थिक पाहणी करण्याकरितां एक निःपक्षपाती कमिटी नेमण्यांत यावी व अशी सारावाढ करणें योग्य आहे कीं काय याचा निर्णय करावा असें त्याचें म्हणणें होतें. या बाबतींतील नेहमींची पद्धति अरेरावीपणाची गुप्तपणाची व एकतंत्री असते. आर्थिक चौकशी करताना लोकांना विश्वासात घेतले जात नाहीं, अशी या रयताची तक्रार होती. या बाबतींत चौकशी कमिटी नेमण्यात येण्याबद्दल नेहमींचे सर्व सनदशीर मार्ग संपले व शेवटीं निर्वाणीचें पत्रक जाहीर करून करबंदीची चळवळ संघटित करण्यांत आली. ही करबंदी स्वराज्याकरिता नव्हती किंवा कायदेभंगाचाही तो एक भाग नव्हता. केवळ कृषिविषयक गाऱ्हाणें दूर करून घेण्याकरितां ही करबंदी जाहीर करण्यांत आली होती. सरकारनें आपला हट्ट सोडला नाहीं व लोकही आपल्या निश्चयाला चिकटून राहिले.

कॉंग्रेसनें आरंभीं या चळवळींत दखलगिरी दिली नाहीं. तालुका परिषदेंत ठराव करून कर देण्याचें रयतानीं तहकूब केलें व सरदार पटेलांना या बाबतींत मदत करण्यास व या चळवळीचा पुढाकार घेण्यास बोलावले. पटेलांनीं लोकांच्या विनंतीला मान देऊन या चळवळीची संघटना केली. सरकारनें लोकांच्या गुरांवर जप्त्या आणल्या. तालुक्यातील निरनिराळ्या जातींत फूट पाडण्याचे प्रयत्न केले. पण ते सर्व फुकट गेले. या जप्त्यांची अमलबजावणी करण्याकरितां सरकारनें बाहेरून पठाण आणले. जप्त्याच्या बाबतींत लोक प्रतिकार करीत नव्हते. सरकारजवळ इतर लोकही पुष्कळ होते. पठाण आणण्याची जरूरी नव्हती. एकंदर ४० पठाण या कामाकरिता नेमण्यात आले होते. सर लेस्ली विल्सन यांनीं फक्त २५ पठाण नेमले होते असें शेवटीं कबूल केले. हे पठाण जप्त केलेले म्हशींचे तांडे किती निर्दयपणानें हांकून नेत असत यांची वर्णनें जाहीर सभांतून करण्यात येत व या अत्याचारावर रचलेलीं गीतेंही सभातून म्हणून दाखविण्यात येत असत. बार्डोलींत चालू असलेल्या अत्याचारांचा निषेध करण्याकरिता मुंबई कौन्सिलातील चार सभासदानी आपल्या जागाचे राजीनामे दिले व या चळवळींत लक्ष घातलें.

असेंब्लीचे अध्यक्ष श्री. विठ्ठलभाई पटेल यानींही व्हाइसरॉयांना या बाबतींत पत्र लिहिलें. आणि सरकार आपला ताठरपणा सोडून या प्रश्नाचा विचार करण्यास तयार नसेल तर आपण आपल्या जागेचा राजीनामा देऊ व ही जळवळ हातीं घेऊ अशी धमकी दिली. शेवटीं वाढीची रक्कम मध्यस्थानें सरकारकडे अनामत ठेवावी असा एक मार्ग काढण्यात आला. चळवळीच्या बाबतींत शिक्षा झालेल्या सर्व कैद्यांना मुक्त करण्यात आले. जप्त झालेली मालमत्ता परत देण्यांत आली. चळवळ थाबविण्यात आली व या प्रश्नाची चौकशी करण्याकरिता एक कमिटीही नेमण्यांत आली. म. गांधींना शिक्षा सुनावलेले मि. ब्रूमफिल्ड यांना कायदेपंडित या नात्यानें, व मि. मॅक्सवेल याना एक सरकारी अधिकारी या नात्यानें कमिटीवर नेमण्यांत आले होते. या कमिटीनें शें. ६। टक्यापेक्षां जास्त सारावाढ करू नये अशी शिफारस केली. सरकारनें या शिफारशीला आगष्टमध्यें मान्यता दिली. व याचा फायदा रास तालुक्यालाही मिळाला. या तालुक्यानें सारावाढ झाली होती तरी चळवळींत भाग घेतला नव्हता. "चोराशी तालुका वाढलेला सारा देऊ शकतो तर बार्डोलीनें कां देऊ नये असें सरकारचें

म्हणणें होतें. पण बार्डोली आपल्या हक्काकरितां लढली, आपल्यावर झालेल्या अन्यायाला तिनें तोंड दिलें व शेवटीं चौराशी तालुक्यालाही त्याचा फायदा मिळाला.

बार्डोलींतील करबंदीची चळवळ हाणून पाडण्याकरितां साम्राज्याच्या हातीं असलेल्या सर्व साधनांचा उपयोग करण्यांत येईल, असें ना. गव्हर्नरांनीं मुंबई कायदेकौन्सिलांत बोलून दाखविले होतें. बार्डोलीच्या चळवळीच्या बाबतींत जी चौकशी कमिटी नेमण्यांत आली ती वास्तविक पाहतां बेकायदेशीर होती. अशी कमिटी नेमावी असें कोणत्याही कायद्यांत किंवा लँड रेव्हिन्यू कोडमध्यें कोठेंही नमूद केलेलें नव्हतें. या कामिटीनें शें. सहापुर्णांक एक चतुर्थांश टक्के वाढ केली खरी पण इतर अनेक प्रश्नांचा विचार करून, त्या बाबतींत ज्या सवलति देण्यांत आल्या त्यामुळें ही सारावाढ केवळ नांवापुरती झाली. बार्डोलींतील साऱ्याचें पहिलें जें प्रमाण होतें तेंच कायम राहिलें. या तडजोडींतील आणखी एक नांवाजण्याजोगी गोष्ट म्हणजे ज्यांच्या जमिनी जप्त करून विकण्यांत आल्या होत्या त्या, त्यांच्या त्यांच्या मालकांना परत देण्यांत आल्या. व चळवळींत सामील झाल्याबद्दल ज्या पाटलांना व तलाठ्यांना कामावरून काढून टाकलें होतें त्यांना त्यांच्या पूर्वीच्या नोकऱ्या देण्यात आल्या ही होय.

सर्वपक्षीय परिषदेचें काम लखनौ येथें २८, २९, व ३० आगस्ट (१९२८) या प्रमाणें तीन दिवस आलें. नेहरू कमिटीनें घेतलेल्या परिश्रमांबद्दल त्यांचें अभिनंदन करण्यांत आलें व वसाहतीच्या स्वराज्याला परिषदेनें मान्यता दिली. मात्र ज्या राजकीय पक्षाचें ध्येय पूर्ण स्वातंत्र्य आहे, त्यांना आपल्या चळवळी चालविण्याबद्दलही पूर्ण स्वातंत्र्य देण्यांत यावें असें ठरविण्यांत आलें. वसाहतीचें ध्येय मान्य नसलेल्या व पूर्ण स्वातंत्र्याच्या ध्येयाला मान्यता देणाऱ्या कमिटींतील सभासदांनीं आपलें एक स्वतंत्र पत्रक प्रसिद्ध केलें. हिंदुस्थानची घटना पूर्ण स्वातंत्र्याच्या तत्त्वावर तयार करण्यांत आली पाहिजे असें या पत्रकांत म्हटलें होतें. रिपोर्टाच्या प्रास्ताविक भागात पूर्ण-स्वातंत्र्य वाद्यांना जें स्वातंत्र्य देण्यांत आलें होतें त्याचा पूर्ण फायदा घेण्याचें या पत्रकावर सही करणाऱ्या सभासदांनीं ठरविलें होते. या रिपोर्टान्वयें परिषदेपुढें येणाऱ्या ठरावाला पाठिंबा द्यावयाचा नाहीं, असें या स्वातंत्र्यवाद्यांनीं ठरविलें होते, तरी परिषदेच्या कामांत अडथळा उत्पन्न करावयाचा नाहीं असेंही त्यांनीं आपलें धोरण निश्चित केलें होतें. शिव

प्रांतांची पुनर्विभागणी व संयुक्त मतदारसंघ वगैरे इतर विषयांचाही विचार करण्यांत आला. "प्लॅटफॉर्मवर बसलेले महमदाबादचे राजेसाहेब व राजा रामपालसिंग यांच्यासारखे तालुकदार हे समाजातील अनवश्यक लोक आहेत." असें एक विधान पं. जवाहरलाल यांनीं या वेळीं केलें. पंडितजींच्या या विधानानें अधिवेशनांत खळबळ उडवून दिली व या विधानाबद्दल कांहीं लोकांनीं संतापही व्यक्त केला. परंतु, या विधानाचा परिणाम म्हणूनच कीं काय दुसरें दिवशीं पुढील ठराव परिषदेंत मंजूर करण्यात आलाः—

"कॉमनवेल्थची प्रस्थापना झाल्यानंतर कायदेशीर रीतीनें मिळविण्यांत आलेले व उपभोगण्यांत येत असलेले खासगी व वैयक्तिक मालमत्तेवरील सर्व हक्क सुरक्षित राहतील अशी हमी घेण्यांत यावी."

वरील दोन भल्या जमीनदाराशिवाय डॉ. सप्रू, सर अली इमाम, सर. सी. शंकर नायर, मि. सच्चिदानंद सिंह, सर सी. पी. रामस्वामी वगैरे वरिष्ठ व प्रांतिक कार्यकारी कौन्सिलचे सभासद या परिषदेला हजर होते. लष्करी कारभाराच्या बाबतींत लखनौ योजनेनें द्विदलराज्यपद्धति मान्य केलेली होती, हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. सर्वपक्षीय परिषदेनें तयार केलेला रिपोर्ट दिल्ली येथें नोव्हेंबर ता. ४ व ५ रोजीं भरलेल्या ऑ. इं. काँ. कमिटीच्या सभेंत विचारांत घेण्यांत आला. पूर्ण स्वातंत्र्याच्या ध्येयाला पाठिंबा देण्यांत आल्यानंतर नेहरू कमिटीनें जातिविशिष्ट प्रतिनिधित्वाच्या बाबतींत केलेल्या निर्णयाला मान्यता देण्यांत आली. तसेंच राजकीय प्रगतीच्या दृष्टीनें या रिपोर्टांतील सूचना बऱ्याच उपयुक्त आहेत असें मत देऊन त्याबद्दल सामान्यतः पसंती दर्शविण्यात आली. पण रिपोर्टांतील प्रत्येक कलम अमलांत आणलें जाईल अशी हमी मात्र घेण्यात आली नाहीं.

आतां आपण कौन्सिलचे चळवळीकडे वळूं. स्वराज्यपक्षाच्या सभासदांनीं कौन्सिलची चळवळ हातीं घेतली होती खरी, पण त्यांतील प्रतिकाराचें धोरण आतां मावळत चाललें होतें. राष्ट्राचें लक्ष सायमन कमिशनच्या बहिष्काराकडे लागलें होतें. व ती चळवळ दिवसेंदिवस जोर धरीत चालली होती. अध्यक्षांच्या ऑफिसच्या व्यवस्थेसंबंधानें व कायदेमंडळाच्या खात्यापासून ते वेगळे काढण्यासंबंधानें असेंब्लींत जोराचा वादविवाद चालू होता. लॉबीमध्यें अध्यक्षासंबंधानें कांहीं जबाबदार सभासदांनीं गैरशिस्त विधानेंही केलीं होतीं. अध्यक्ष

पटेल यांचे निर्णय व त्यांचें काम तुच्छ लेखण्याच्या कटांत सिमला सरकारही सामील झालें आहे, असा पायोनियरनेंही सरकारवर आरोप केला होता. लॉबी-मध्यें अध्यक्षांवर केलेले आरोप आपणही ऐकले आहेत, असें निरनिराळ्या पक्षाच्या पुढाऱ्यांनींही सांगितलें. अध्यक्षांचा अपमान तोच असेंब्लीचाही अपमान होय. लॉर्ड आयर्विन ह्यांच्या कानावर ही गोष्ट जातांच हिंदुस्थानसरकारनें गृहमंत्र्याच्या द्वारें हिंदी जनतेची माफी मागितली. व पंडित मोतीलाल नेहरू यांनीं तिचा स्वीकार केला.

असेंब्लीपुढे असलेले दुसरे दोन महत्वाचें प्रश्न म्हणजे रीझर्व बॅंक बिल व पब्लिक सेफ्टी बिल हे होत. सुवर्णचलन व रिझर्व्ह बँक बिल या बाबतींत काँग्रेसनें सरकारशीं दोन हात केले पण ते निष्फळ होते. या बिलामुळें चलनाच्या धोरणाचें सर्व नियंत्रण, सेक्रेटरी ऑफ स्टेट याच्या हातून निघून राष्ट्रांतील एका स्वदेशी बँककडे येत असल्यामुळें स्वायत्ततेच्या दृष्टीनें हें बिल प्रगतीपरच आहे असें सरकारचें म्हणणें होतें. सरकारच्या त्या हेतुविषयीं विश्वास बाळगणें कठीणच होतें. द्विदलराज्यपद्धती अमलांत आणण्याकरितां आकाशपाताळ एक करणारे सरकार करन्सी व बँकिंग यांच्या नियंत्रणाच्या बाबतींत आपले अधिकार साळसूदपणें सोडून देईल, हें शक्यच नव्हते. यामुळें जनतेच्या हिताला विघातक असें यांत कांहीं तरी असलें पाहिजे अशी शंका लोकप्रतिनिधींना आली होती. दोन्ही पक्ष जेव्हां हमरीतुमरीवर आले, त्या वेळीं अनेक प्रश्नांवर कडाक्याचे वाद झाले. त्यांपैकीं ही बँक सरकाच्या इच्छेप्रमाणें शेअर होल्डरांची बँक असावी कां लोकांनीं सुचविल्याप्रमाणें स्टेट बँक असावी, हा एक प्रश्न होता. दुसरा प्रश्न म्हणजे डायरेक्टर किती असावे, ते सरकारनें नेमलेले असावे कां लोकानियुक्त असावे हा होय. बँकेची योजना एकदां नक्की ठरल्यानंतर बाकीच्या गोष्टी साहजिकच निश्चित केल्या जातात. जर ही बँक शेअर होल्डरांची असेल तर शेअर होल्डर यांचाच मतदार संघ होऊ शकतो. जर ही स्टेट बँक असेल, तर वरिष्ठ व प्रांतिक कायदेकौन्सिलें, प्रांतिक को-ऑपरेटिव्ह बँका, व्यापारी चेंबर्स, फेडरेटेड चेंबर, व असोसिएटेड चेंबर यांना डायरेक्टर निवडण्याचा हक्क प्राप्त होतो. या डायरेक्टरांत किती लोक असावेत या बद्दलच्या चर्चेंत आम्ही शिरत नाहीं. परंतु, डायरेक्टरांपैकीं ९ डायरेक्टर लोकनियुक्त असावे असें सरकारचेंच म्हणणें होतें. रिझर्व्ह

बँक कायद्यानें १६ पैकीं ८ लोकनियुक्त सभासदांची आज सोय केली आहे. हें बिल कौन्सिलांत विचाराकरितां आलें असतां त्यांत बरेच फेरफार झालें. शेवटीं मि. श्रीनिवास अय्यंगार ह्यांच्या ठरावाप्रमाणें स्टॉक होल्डर्सची ही बँक असावी ह्याला सरकारनेंही संमति दिली. प्रत्येक मतदाराचा स्टॉक निदान १० हजार तरी असावा, असें ठरविण्यांत आलें. आतां हें बिल साळ-सूदपणें पास होणार, असें सभासदाना वाटू लागलें. परंतु, सरकारला ह्याच्या परिणामाविषयीं भीति वाटली व या बिलाचा पुढील विचार करण्याचें थांबवून एक नवेंच बिल आणण्याचा सरकारनें विचार केला. अध्यक्ष पटेल ह्यांनीं असें नवें बिल आणता येत नाही, तें नियमबाह्य आहे असें दाखवून दिलें. अशा परिस्थितींत सरकारनें जुनें बिलच पुन्हा विचाराकरितां कौन्सिलपुढें मांडलें. पण त्यापैकीं एका महत्त्वाच्या कलमावर सरकारचा पराभव झाल्यावरोबर या बिलाचा विचार कायमचा तहकूब करण्यांत यावा, असें ठरविण्यांत आलें.

पब्लिक सेफ्टी बिलावरही असाच कडाक्याचा वाद झाला. हें बिल पर-राष्ट्रीय लोकांच्या करिता उपयोगांत आणलें जाईल, असें जरी असलें तरी हिंदी लोकांच्या विरुद्धही या बिलाचा उपयोग करण्यांत येईल अशी लोकप्रतिनिधींना शंका वाटली. असेंब्लींत या बिलासंबंधानें बोलताना लाला लजपतराय म्हणाले कीं, "हें बिल केवळ परदेशीय कम्युनिस्टांकरितां उपयोगांत आणावयाचें नसून हा केवळ चचुप्रवेश आहे. हिंदुस्थानातील राष्ट्रीय व मजूर पक्षाच्या पुढाऱ्यांच्या बाबतींतही ह्या बिलाचा खात्रीनें उपयोग करण्यांत येईल. हें बिल परदेशीय कम्युनिस्टांचें बाबतींत उपयोगात आणलें तर कर देणाऱ्या रयतेच्या पैशांतून त्याला ग्रेट ब्रिटनमध्यें किंवा दुसरें कोठेही पी अँड ओ कंपनीच्या स्टीमवर एखादा सुखसोयी असलेला बर्थ त्याला देऊन पाठविण्यात येईल. जर कां हें बिल असेंब्लींत पास झालें, तर ह्या बिलांतील दुसऱ्या कलमाचा उपयोग करून हिंदुस्थानातील आर्थिक व राजकीय लढे लढविणाऱ्या राष्ट्रीयावरही ह्या बिलाची गदा बसल्याशिवाय राहाणार नाहीं. ह्या कायद्याच्या मागें खरोखरी हाच हेतु आहे हें कलम व्यापक आहे. केवळ कम्युनिस्टाच्या कृत्याला आळा घाल-ण्याचा किंवा असलीं कृत्यें करणाऱ्या कम्युनिस्टांना शिक्षा करण्याच्या कामींच केवळ या बिलाचा उपयोग करण्यांत येणार नाहीं. प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष रीतीनें कायद्यानें प्रस्थापित झालेलें सरकार उलथून टाकण्याचा जो उपदेश करील

त्याच्या बाबतींत ह्या कायदा लागू करतां येईल, असें शब्द ह्या कलमांत आहेत. पूर्ण स्वातंत्र्याचा पुरस्कार करणारे पंडित जवाहरलाल व श्रीनिवास अय्यंगार हे ह्या कायद्याच्या कचाटयांत सांपडूं शकतात. ह्या बिलावर मतें घेण्यांत आलीं. तेव्हां दोन्ही बाजूला सारखींच मतें पडलीं. अध्यक्षांनी विरुद्ध मत दिल्यामुळें हें बिल गाळण्यांत आलें.

कॉंग्रेसच्या अधिवेशनापैकी कलकत्ता कॉंग्रेसचें आधिवेशन हें अत्यत महत्वाचें आधिवेशन म्हणून गणलें जाईल यांत शंका नाहीं. भावी प्रगतीची दिशा या आधिवेशनांत दाखविण्यात आली. पं. मोतीलाल नेहरू यांना अध्यक्षस्थान दिल्यामुळेंही ह्या आधिवेशनाला आणखी महत्व प्राप्त झालें होतें. सर्वपक्षीय परिषदेच्या रिपोर्टावर ह्या अधिवेशनात विचार व्हावयाचा होता. सायमन कमिशन दुसऱ्यांदा हिंदुस्थानांत आलें होतें. व कॉंग्रेसचें आधिवेशन चालू असतां ह्या कमिशनचा दौराही चालू होता. पं. मोतीलाल नेहरू यांनीं आपल्या भाषणांत कमिशनवरील बहिष्कारासंबंधानें विचार प्रगट केले होते. कानपूर, लाहोर, लखनौ वगैरे ठिकाणीं ह्या कमिशनच्या बहिष्काराला किती तीव्र स्वरूप आलें होतें व या बहिष्कारामुळें अँग्लो इंडियनांच्या मनावर कसा परिणाम झाला व त्यांच्या दृष्टीकोनामध्येंही कसा फरक झाला, हें त्यांनीं आपल्या भाषणांत दाखवून दिलें होतें. सरकारनें यापुढें २० वर्षेपर्यंत अगदीं कणखर धोरण स्वीकारावें व हिंदुस्थानच्या स्वातंत्र्याच्या मागणीला मुळींच दाद देऊं नये. ह्या प्रचाराकरितां आपल्या जवळ १ औंस दारूगोळा असेपर्यंत झगडत राहावे असा सल्ला कलकत्त्यांतील इंग्लिश वर्तमानपत्रांतून सरकारला दिला होता. पुन्हा असलीं अनिष्ट कृत्यें होतील त्यांचा बंदोबस्त करण्याकरितां सरकारला जे जे उपाय आवश्यक वाटतील ते ते केल्याशिवाय सरकार राहणार नाहीं, असें लॉर्ड आयर्विन यांनीं जाहीर केलें. आपलें घर फोडून लोकांनीं आंत शिरावें, आपल्या पाहूण्यांना चांगलें चदडून काढावें व त्यांना अटक करून रात्रभर तुरुंगांत ठेवावें, ही गोष्ट इंग्रज गृहस्थाचे बाबतींत घडून आल्यास त्याला कसें वाटेल? अहमदाबादचे महाराज व त्यांचा राजवाडा याच्या भोंवतीं पोलिसचा वेढा आहे. व त्या लगतच्या बागेंतच कमिशनला मेजवानी देण्यांत आली! कमिशन लाहोरला आलें त्या वेळीं डॉ. अलम व डॉ. सत्यपाल यांनीं लाला लजपतराय यांच्या नेतृत्वाखालीं कमिशनच्या विरुद्ध

मिरवणुका काढल्या.. लाला लजपतराय यांच्या छातीवर तडाखे बसले व या जखमेमुळेंच त्यांचा अंत झाला. आमचें ध्येय पूर्ण स्वातंत्र्य असून त्याचें स्वरूप काय असेल हें ज्या वेळीं आम्हांला तें मिळेल त्यावर अवलंबून राहील. सर्वपक्षयि परिषदेसंबंधानें बोलतांना ते म्हणाले कीं, सर्वपक्षीय परिषद ज्या निर्णयाला येऊन पोहोंचली आहे तेथूनच सरकारनें आतां प्रारंभ करावा व त्यापुढें जितकें जातां येईल तितकें जावें अशी त्यानी सरकारला सूचना केली. "आतां आपण थोडें थांबूं, आपल्या बलाबलाचा विचार करूं, व आपलें शक्तिसर्वस्व आपलें ध्येय गांठण्यासाठीं खर्च करूं," असें बोलून पंडितजींनीं आपलें भाषण संपविलें.

परदेशांतील अनेक व्यक्तींकडून आलेले संदेश हा ह्या कॉंग्रेसमधील एक विशेष होता. मिसेस सन्यत् सेन, एम्, रोमारोलांड, पर्शियन सोशालिस्ट पार्टी, न्यूझीलंडमधील कम्युनिस्ट पार्टी व मानवी हक्कसंरक्षक संघ ह्याच्याकडून काँग्रेस-ला शुभचिंतनपर संदेश आले होते. श्रीमती सरोजिनी देवी नायडू यांच्या-कडूनही न्यूयार्कहून असाच एक संदेश आला होता.

हिंदुस्थानाच्या भावी ध्येयासंबंधानें सरकारला निर्वाणीचा खलिता पाठविण्यांत आला. या ठरावाशिवाय या अधिवेशनांतील बाकीचे ठराव नेहमींचेच ठराविक नमुन्याचे होते. परदेशांतून आलेल्या संदेशांचा अंतःकरणपूर्वक स्वीकार कर-ण्यांत आला, व एक परदेशीय खातें उघडून या लोकांबरोबर व संस्थांबरोबर आपला परिचय वाढवावा अशी सूचना ऑ. इं. काँग्रेस कमिटीला देण्यांत आली. पॅन आशियॅटिक फेडरेशन भरविण्यासंबंधानेंही या अधिवेशनांत विचार करण्यांत आला. पूर्ण स्वातंत्र्य संपादन केल्याबद्दल चीनचें व त्याचप्रमाणें सीरिया, पॅले-स्टाईन, इजिप्त व इराक ह्या राष्ट्रांचेंही अभिनंदन करण्यांत आलें. साम्राज्य-विरोधी संघाच्या जागतिक काँग्रेसच्या दुसऱ्या अधिवेशनासंबंधानें पसंती दर्शविण्यांत आली. महायुद्धाच्या भीतीसंबंधाचा मद्रास येथें पास झालेला ठराव येथेंही पुन्हां पास करण्यांत आला. ब्रिटिश मालावर बहिष्कार घालावा, असेंही सुचविण्यांत आलें.

बार्डोलीच्या लढयांत यश संपादन केल्याबद्दल सरदार वल्लभभाई पटेल यांचें अभिनंदन करण्यात आलें. सरकारनें दिलेल्या मेजवान्या, दरबार व इतर सर-कारी व बिन सरकारी समारंभ ह्यांच्यात काँग्रेसवाल्यांनीं भाग घेऊं नये असें

ठरविण्यांत आलें. हिंदी संस्थानांतून जबाबदारीचें स्वराज्य प्रस्थापित करण्या-संबंधानें मागणी करण्यांत आली. हिंदी संस्थानिकांच्या बाबतींत कलकत्त्यानें केलेला ठराव महत्त्वाचा असून संस्थानी चळवळीसंबंधानें प्रश्न निघाला असतां अद्यापही याच ठरावाचा आधार देण्यांत येत असतो. हिंदी संस्थानांत व बाहेर जी चळवळ चालू आहे, तिच्या बाबतींतही हा ठराव मार्गदर्शक झाला असल्या-कारणानें आम्ही तो जशाचा तसा खालीं देत आहों.

" संस्थानांतून प्रातिनिधिक संस्थांच्या तत्त्वावर जबाबदारीचें स्वराज्य हिंदी संस्थानिकांनीं प्रस्थापित करावें, अशी कॉंग्रेसची आग्रहाची मागणी आहे. नागरिकत्वाचे स्वाभाविक व जन्मसिद्ध हक्क उदाहरणार्थ–सभास्वातंत्र्य, मुद्रण-स्वातंत्र्य, भाषणस्वातंत्र्य देण्याची व जीवित व मालमत्ता यांचें संरक्षण करण्याची कायद्यानें हमी द्यावी. व अशा प्रकारचे जाहीरनामे संस्थानातर्फे ताबडतोब जाहीर करण्यांत यावें."

नाभाच्या माजी महाराजासंबंधानें व कारागृहांत मरण पावलेल्या पांच बंगाली कैद्यांच्या कुटुंबाबद्दलही सहानुभूति प्रगट करण्यांत आली. लाला लजपतराय, हकीम अजमलखान, आंध्ररत्न गोपाळ कृष्णय्या, मगनलाल गांधी, गोपबंधु-दास व लॉर्ड सिंह ह्यांच्या मृत्यूबद्दल दुःख प्रदर्शित करण्यांत आलें. पूर्वी उल्ले-खित केलेला निर्वाणीच्या खलित्याबाबतचा ठराव पुढीलप्रमाणें होताः—

" सर्वपक्षीय परिषदेनें तयार केलेल्या योजनेचें ही कॉंग्रेस स्वागत करीत आहे. हिंदुस्थानांतील राजकीय व जातिविषयक प्रश्न सोडविण्याच्या बाबतींत या परिषदेनें बरेंच मोठें काम केलें आहे, असें या कॉंग्रेसचें मत आहे. सर्व-पक्षीय कमिटीनें बहुतेक एकमतानें या शिफारसी केल्या याबद्दल ही कॉंग्रेस तिचें अभिनंदन करीत आहे. मद्रास कॉंग्रेसमध्यें मंजूर झालेल्या ठरावाप्रमाणें पूर्ण स्वातंत्र्याच्या ध्येयाशीं एकनिष्ठ राहूनही सर्वपक्षीय कमिटीनें तयार केलेल्या योजनेबद्दल ही कॉंग्रेस आपली पसंती व्यक्त करीत आहे. कारण राजकीय दृष्टीनें एक बरेंच प्रगतीपर पाऊल या कमिटीनें टाकलें आहे व देशांतील सर्व प्रमुख पक्षांतील प्रतिनिधींनीं एकमतानें या योजनेला मान्यता दिली आहे.

३१ डिसेंबर १९२९ च्या आंत ब्रिटिश पार्लमेंटनें या योजनेला पूर्णपणें मान्यता दिली तर, आजची राजकीय परिस्थिति लक्षांत घेऊन, कॉंग्रेसही तिचा स्वीकार करील. परंतु या तारखेपर्यंत सरकारनें तिला मान्यता दिली नाहीं किंवा

तत्पूर्वी तिचा त्याग केला तर अहिंसात्मक असहकारितेची चळवळ. कॉंग्रेस सुरू करील व करबंदी करण्यास व ठरेल त्या इतर मार्गांचा अवलंब करण्यास राष्ट्राला सल्ला देईल.

वरील प्रकारचा ठराव करूनही कॉंग्रेसच्या नांवानें पूर्ण स्वातंत्र्याच्या प्रचाराची चळवळ करण्यास कोणत्याही प्रकारचा अडथळा येत नाहीं असें या कॉंग्रेसचें मत आहे. "

कलकत्ता कॉंग्रेसमध्यें पास झालेला मुख्य ठराव वरील स्वरूपाचा असून बराच कडाक्याचा वादविवाद होऊन हा ठराव पास झाला. महात्मा गांधींनीं आणलेला मूळ ठराव वरील मंजूर झालेल्या ठरावाप्रमाणेंच होता. फक्त 'हा ठराव सर्वपक्षीय परिषदेच्या रिपोर्टसह व्हाइसरॉयकडे पाठवून देण्याचा अधिकार अध्यक्षांना द्यावा' एवढेंच वाक्य महात्माजींच्या मूळ ठरावांत जास्त होतें.

या ठरावावर पं. जवाहिरलाल नेहरू व श्री. सुभाषचंद्र बोस यानीं उपसूचना आणल्या. या दोन्हीही उपसूचना जवळ जवळ एकाच स्वरूपाच्या होत्या. या ठरावांत कालमर्यादेचा निर्देश करूं नये व सर्वपक्षीय परिषदेनें केलेल्या योजनेंत सुचविलेल्या वसाहतीच्या स्वराज्यास हिंदुस्थानची मान्यता आहे असें ध्वनितार्थानें देखील दाखवूं नये, असें या दोघांचें म्हणणें होतें. पं. जवाहिरलाल यांची उपसूचना पुढीलप्रमाणें होती.

(१) "पूर्ण स्वातंत्र्य हें हिंदुस्थानचें ध्येय आहे, या मद्रास कॉंग्रेसमध्यें झालेल्या निर्णयाच्या बाबतींत ही कॉंग्रेस एकनिष्ठ असून, ब्रिटिशांशीं असलेला संबंध तोडल्याशिवाय हिंदुस्थानला खरें स्वातंत्र्य मिळणार नाहीं असें तिचें मत आहे.

(२) जातीय प्रश्नाच्या निर्णयाच्या दृष्टीनें लखनौ येथील सर्वपक्षीय परिषदेनें संमति दिलेल्या नेहरू कमिटीच्या शिफारशींना ही कॉंग्रेस मान्यता देत आहे.

(३) नेहरू कमिटीनें हा रिपोर्ट तयार करण्याच्या कामीं केलेले परिश्रम; त्यांचा देशाभिमान व त्यांचें दूरदर्शित्व याबद्दल ही कॉंग्रेस त्यांचें अभिनंदन करीत आहे. पूर्ण स्वातंत्र्याच्या ठरावाशीं विसंगत न होतां, राजकीय प्रगतीच्या दृष्टीनें नेहरू कमिटीच्या शिफारशींनीं बरेंच पुढें पाऊल टाकलें असें आपलें मत

ही कॉंग्रेस प्रदर्शित करीत आहे. व या रिपोर्टांतील प्रत्येक कलमाला मंजुरी दिली पाहिजे, असें बांधून न घेतां सामान्यतः या शिफारशींना ती आपली संमति देत आहे."

ठराव मांडणारे या नात्यानें शेवटीं उत्तर देतांना महात्मा गांधी यांनीं "हा ठराव व्हाइसरॉयकडे पाठवावा" हा भाग गाळून टाकल्याबद्दल आपली नापसंति दर्शविली व व्हाइसरॉयांना हा ठराव पाठविणें ही एक साधी शिष्टाचाराची गोष्ट आहे. व्हाइसरॉय आपल्यापेक्षां कोणी वरिष्ठ आहेत, अशी अनवश्यक भावना आपण मनांत बाळगली नाहीं किंवा आपल्या सामर्थ्याबद्दल आपल्या मनांत अविश्वासही बाळगला नाहीं तरी हें कलम काढून टाकण्याचा आपण आग्रह धरूं नये असें महात्मा गांधी म्हणाले. ठरावाच्या इतर कलमांच्या बाबतींत स्वातंत्र्य-संघाचे सभासद व विषय नियामक मंडळांतील इतर सभासद यांच्यांत तडजोड होऊन ठरावाची वरील भाषा निश्चित करण्यांत आली. कॉंग्रेसच्या खुल्या अधि-वेशनामध्यें या तडजोडीचा आदर ठेवण्यांत आला नाहीं. तडजोडीच्या बाबतींत आपली संमति देऊनही बाबू सुभाषचंद्र बोस व पं. जवाहरलाल नेहरू यांनीं तडजोडीशीं आपला कांहीं संबंध नाहीं असें जाहीर केलें. या रीतीनें वरील दोघांनीं वचनभंग केल्यामुळें महात्मा गांधी व इतर कांहीं मंडळींना अत्यंत वाईट वाटलें. खुल्या अधिवेशनांत वरील तडजोडीचा ठराव महात्माजींनीं मांडला व तो बहुमतानें पास झाला. या ठरावावर भाषण करतांना महात्माजींनीं पुढील कडक शब्दांत वरील वचनभंगासंबंधानें आपल्या भावना व्यक्त केल्या.

"मुसलमान ज्याप्रमाणें अल्लाचें नांव घेतात किंवा श्रद्धाळू हिंदु राम-कृष्णांचें नांव घेतात त्याप्रमाणें स्वातंत्र्याचा जप तुम्ही केला, तरी जोंपर्यंत त्याच्या मागें सत्यनिष्ठा नाहीं तोपर्यंत हा जप फोल आहे. जर तुम्ही आपल्या शब्दांना जागला नाहीं तर स्वातंत्र्य कोठलें? खंबीर मनेंच स्वातंत्र्य संपादन करूं शकतात. केवळ शब्दांचे खेळ करून तें प्राप्त होत नसतें.

कलकत्ता कॉंग्रेसनें (१९२८) भावी कार्यक्रमासंबंधानें पुढील ठराव मांडला:—

## ९ भावी कार्यक्रम

(१) मद्य व इतर मादक पदार्थ यांची पूर्ण बंदी करण्याकरितां कायदेमंडळां-तून व कायदेमंडळाबाहेरही जोराचा प्रयत्न करण्यांत यावा. ज्या ज्या ठिकाणीं

इष्ट व शक्य असेल त्या त्या ठिकाणीं दारू व इतर मादक पदार्थांच्या दुकानां-वर पिकेटिंग करावें.

( २ ) परदेशी कापडाचा बहिष्कार यशस्वी करण्याकरितां कायदेमंडळांतून व बाहेर तावडतोब उपाय करण्यांत यावे. हातसुताच्या व हातविणीच्या खादीची पैदास करूनही या बहिष्काराला मदत करावी.

( ३ ) बार्डोलीप्रमाणें ज्या ठिकाणीं जनतेचीं कांहीं विशिष्ट गाऱ्हाणीं आहेत असें दिसून येईल, त्या ठिकाणीं तीं अहिंसात्मक मार्गानें दूर करण्याचा प्रयत्न करावा.

( ४ ) कॉंग्रेस कमिटी वेळोवेळीं ठरवील तो विधायक कार्यक्रम अमलांत आणण्याच्या कामीं काँग्रेसतिकिटावर उभे राहून कायदेमंडळांतून निवडून आलेल्या सभासदांनीं आपला सर्व वेळ खर्च करावा.

( ५ ) सभासद नोंदून व कडक रीतीनें शिस्तीची अंमलबजावणी करून काँग्रेससंघटणा मजबूत करावी.

( ६ ) स्त्रियांच्या मार्गांतील अडचणी दूर करून राष्ट्रीय उन्नतीच्या कार्यांत भाग घेण्याकरितां त्यांना उत्तेजन द्यावें.

( ७ ) सामाजिक अनिष्ट रूढीपासून देशाचें नुकसान होऊं नये याबद्दल प्रयत्न करावा.

( ८ ) हिंदु असलेल्या काँग्रेसवाल्यांनीं अस्पृश्यतानिवारण करणें हें आपलें कर्तव्य आहे असें समजून त्याकरिता सर्व प्रकारचे उपाय अमलांत आणावे व त्याचप्रमाणें त्यांची स्थिति सुधारण्याकरितां व त्यांच्या मार्गांतील अडचणी दूर करण्याकरितां त्यांना शक्य ती मदत करावी.

( ९ ) शहरांतील मजूरवर्गांतून काम करण्याकरितां व चरखाप्रसार व खादी यांच्या द्वारा चाललेल्या ग्रामसंघटणेच्या कार्यांत आणखी मदत करण्याकरितां स्वयंसेवक दल उभारावें.

( १० ) राष्ट्राची सर्वांगीण सुधारणा व्हावी या दृष्टीनें निरनिराळ्या धंद्यांतील लोकांचें या कामीं सहकार्य मिळावें या उद्देशानें योग्य तें इतर उपाय काँग्रेसनें योजावे.

वरील कार्यक्रमांतील सर्व चळवळी चालविण्याकरिता लागणारा पैसा काँग्रेस-वाल्यांनीं स्वतःच्या उत्पन्नापैकीं शें. कांहीं प्रमाणांत रक्कम देऊन उभा करावा.

साम्राज्यविरोधी संघातर्फे कॉंग्रेसला प्रतिनिधी म्हणून आलेले मि. डब्ल्यू.

रिपोर्टावर अनेकांनीं अनेक प्रकारच्या टीका केल्या, असें दिसून येतें. या पुरवणीरिपोर्टांत एके ठिकाणीं असें म्हटलें आहे कीं,

" आमच्यावर टीका करणारांमध्यें ना. आगाखान हेही सामील झाले हें पाहून आम्हांला वाईट वाटतें. त्यांचें म्हणणें असें कीं, ज्या देशांतील सुराज्याबद्दल इंग्लिश लोक जबाबदार नाहींत त्या देशांत आपलें हत्यारबंद लष्कर व मुलकी अधिकारी सोडून देण्यास ते तयार होणार नाहींत. वेडेपणाच्या लहरींत ब्रिटिश लोक असें करतील तर–इतिहासांत तर अशा प्रकारचें उदाहरण आढळून येत नाहीं–जगाच्या दृष्टीनें त्यांची किंमत कमी होईल. इतकेंच नव्हे तर इतिहासांतही त्यांच्या नांवाला काळीमा फांसला जाईल. ज्या देशांतील राज्यकारभारावरील आपली जबाबदारी संपुष्टांत आली त्या देशावर परराष्ट्रांनीं आपल्या लहरीप्रमाणें राज्यकारभार चालवावा याकरितां तेथें आपलें हत्यारबंद लष्कर इंग्लिशांनीं ठेवून दिलें अशीं नावें त्यांना ठेवण्यांत येतील. "

हिंदुस्थानांतील प्रत्येक प्रांताला स्वातंत्र्य द्यावें असा पुरस्कार ना. आगाखान करीत असत. या प्रत्येक प्रांताचा दर्जा जर्मन फेडरेशनमधील वव्हेरियाप्रमाणें असावा. अमेरिकेंतील संस्थानांप्रमाणें किंवा स्वित्झर्लंडमधील कॅन्टनप्रमाणें तो नसावा असें त्यांचें म्हणणें होतें. कलकत्त्यांतील सर्वपक्षीय परिषदेच्या बैठकींतच मौ. महमदअली यांनीं अनेक मुख्य ठरावांवर उपसूचना मांडल्या होत्या पण त्या सर्व नामंजूर करण्यात आल्या.

कोरम न भरल्यामुळें मि. जिना यांनीं लीगची बैठक तहकूब ठेवली. सर्वपक्षयि परिषद कलकत्ता येथें मृत्युशय्येवर पडली होती. म. गांधींनीं ही परिषद कायमची तहकूब करण्यांत यावी असा ठराव मांडला व तो मंजूर करण्यांत आला. या वेळीं कॉंग्रेस निश्चितपणें पुन्हा परत म. गांधींच्या आश्रयाला येऊं लागली होती. कॉंग्रेस महात्माजींकडे आली खरी पण आपल्या पाठीवर अनेक प्रकारचीं ओझीं लादून घेऊन ती त्यांच्याकडे आली. कौन्सिलाचा मोह झुगारून देण्यास कौन्सिलांतील कॉंग्रेसपार्टी आणखी काय करणार आहे याचीच महात्माजी वाट पाहात होते. १९२८ ऑक्टोबरमध्यें दिल्ली येथें झालेल्या सभेंत ऑ. इं. कॉं. कमिटीनें या संबंधात पुढील ठराव केला होताः—

" कौन्सिलांतील कामासंबंधानें मद्रास कॉंग्रेसच्या ठरावांतील सूचनाप्रमाणें निरनिराळ्या कौन्सिलातील कॉंग्रेस पक्षाचे सभासद वागत नाहींत हीं मोठ्या

दिलगिरीनें म्हणावें लागत आहे. या काँग्रेसपक्षांना तोंड द्याव्या लागणाऱ्या बिकट परिस्थितीचा विचार करून त्याला अधिक सवलति देण्याचें ठरविण्यांत आलें असून काँग्रेसच्या ठरावांतील मूळ धोरणाला विसंगत न होईल अशा रीतीनें काँग्रेसपक्षाचे लोक वागतील, अशी कमिटीला आशा वाटत आहे."

म. गांधी कलकत्त्याला गेल्यानंतर काँग्रेसच्या कामांत त्यांनीं प्रत्यक्ष भाग घेतला. ठरावाचे मसूदे तयार करण्याच्या कामीं त्यानीं सूचना दिल्या व अधिवेशन पार पाडण्याच्या कामींही त्यांनीं पुढाकार घेतला. देशांतील राजकीय परिस्थिति त्या वेळीं अंधकारमय झाली होती. स्वातंत्र्याचा पुरस्कार करणाऱ्या लोकांना पकडण्यांत येणार असल्याची बातमी, व्हाइसरॉयांचें कलकत्ता येथील प्रक्षोभकारक भाषण, 'फॉरवर्ड'च्या संपादकाना झालेली शिक्षा, मद्रास येथील खटल्यांचा गोंधळ या सर्वांचा महात्माजींच्या मनावर खोल परिणाम झाला होता. या सर्व गोष्टी मनाची शांति विघडवून टाकणाऱ्या होत्या. शिवाय कलकत्ता येथें त्यानीं जें प्रत्यक्ष पाहिलें त्यावरून त्यांचें मन अधिकच त्रस्त झालें. समजून उमजून प्रथम तडजोड करावयाची व ती प्रथम बंगाल, नंतर सं. प्रांत व नतर मद्रास यांनीं मोडावयाची हें पाहून त्याचें मन संत्रस्त झालें असल्यास त्यांत नवल नव्हतें. अशा रीतीनें सरकारचा रोष व आपसातील फूट अशी दुहेरी अडचण उपस्थित झाली असतां महात्माजींना युरोपांत येण्यासंबंधाचें निमंत्रण आलें. परिस्थिति अनुकूल असेल तर १९२९ च्या प्रारंभीं महात्माजींनीं युरोपांत प्रवासास जाण्याचें ठरविलेंही होतें. आश्चर्य हें कीं, पं. मोतीलाल याचीं त्यांना परवानगी मिळाली. परंतु या बाबतींत बराचसा विचार केल्यानंतर व मित्रांचा सल्ला घेतल्या नंतर युरोपात या वर्षी तरी जावयाचें नाहीं असें त्यांनीं ठरविलें. "पुढल्या वर्षीं काय होईल हें मला सांगतां येत नाहीं. स्वतंत्र हिंदुस्थानचा प्रतिनिधि म्हणूनच जर मी युरोपला गेलों तरच माझ्या येण्याचा उपयोग होईल असें एका डॅनिश मित्रानें लिहिलें आहे. या विधानातील सत्यता मला पटतें." असें गांधीजींनीं या वेळीं लिहिलें. सहजस्फूर्तीनें गांधीजींनीं या बाबतींत बरोबर निर्णय ठरविला. "मी युरोपला जावे असें माझें अंतःकरण मला सांगत नाहीं. उलट काँग्रेसपुढें विधायक कार्यक्रम ठेवला असतांना व त्याला सार्वत्रिक पाठिंबा मिळाला असतांना जर मी आतां युरोपला जाईन तर आयत्या वेळीं लोकाचा परित्याग केल्याचा गुन्हा मी केला असें होईल. ज्या लोकांनीं या ठरावाला

अनुकूल मतें दिलीं त्यांनीं हा ठराव अमलांत आणावा लागेल असा कधींही विचार केला नाहीं, हेंही खरें असेल. कार्यकर्त्यासंबंधानें मला वाटणारा विश्वास मी गमाऊं इच्छित नाहीं. माझ्या अंतःकरणांतील आवाज मला सांगतो कीं माझ्या वांट्यास जें येईल तें करण्यास मी तयार असलें पाहिजे इतकेंच नाहीं तर मला जो महत्त्वाचा कार्यक्रम वाटतो त्यासंबंधानें विचार करून तो अमलांत आणण्याचे मार्गही मी सुचविले पाहिजेत. एकंदरींत पुढील वर्षाच्या झगड्याकरितां मला स्वतःला तयारी केली पाहिजे. मग या झगड्याला कोणतेंही स्वरूप प्राप्त होवो. " १९२९ फेब्रुवारीच्या अखेरीस महात्माजींनीं हे शब्द उच्चारले. १९३० च्या फेब्रुवारींत देशापुढें काय वाढून ठेवलें होतें तें आतां आपण पाहूं.

# मौलवी मझरूल हक्

१९१० सालच्या अलाहाबाद येथें भरलेल्या २५ व्या अधिवेशनांत मि. जिना यांनीं जातीय प्रतिनिधित्वाचा निषेध करणारा जो ठराव मांडला त्याला मौलवी मझरूल हक् यांनीं अनुमोदन दिलें. यावेळीं जोरदार भाषण करून हिंदु-मुसलमानांनीं यावेळीं एक झालें पाहिजे असा त्यांनीं उपदेश केला. मोर्ले मिंटो सुधारणा यावेळीं अमलांत आल्या होत्या आणि कायदेकौन्सिलांतील जातीय प्रतिनिधीचें तत्त्व या सुधारणा योजनांत प्रथमच सामील करण्यांत आलें होतें. आपल्या मिळालेल्या या हक्काबद्दल मुसलमान लोक हर्षित झाले होते. अशा वेळीं शुद्ध हेतूनें व आपल्या मनांवरील विश्वासानें बोलणारा पुढारी पाहिजे होता. व तें काम मौलवी मझरूल हक् यांनीं केलें. मुसलमानांना मिळालेला विजय हा दोन्ही जमातींच्या सामान्य हितसंबधाला विघातक असून या दोन्ही समाजांनीं परस्परांमधून विस्तव देखील जाऊं द्यावयाचा नाहीं अशा रीतीनें अलग न राहतां त्यांनीं एक व्हावे अशीच राष्ट्राची अपेक्षा असल्याचें त्यांनीं सांगितलें.

१९१४ सालीं बाबू भूपेंद्रनाथ बसू, जिना, समर्थ, सिंह, शर्मा, व लाला लजपतराय यांचें जें शिष्टमंडळ इंग्लंडला पाठविलें, त्यांत मौलवी मझरूल हक् यांचीही निवड करण्यांत आली होती. यानंतर कॉंग्रेसच्या राजकारणांत त्यांनीं प्रत्यक्ष भाग घेतला नाहीं. परंतु शेवट पर्यंत ते राष्ट्रीय राहिले. त्यांच्यांतील शुद्ध राष्ट्रीयत्वाला त्यांच्या साधुवृत्तीमुळें अधिकच तेज चढलें होतें, व हिंदुस्थानांतील जनतेला विशेषतः बिहारमधील जनतेला ते अत्यंत प्रिय झाले होते. आपल्या आयुष्यांतील शेवटचे दिवस एकांतांतच केवळ नव्हे तर खऱ्या फकीराप्रमाणें संन्यस्त वृत्तीनें घालविले.

# न्या. महादेव गोविंद रानडे

न्यायमूर्ति महादेव गोविंद रानडे हे काँग्रेसमधील नामांकित व वजनदार पु होऊन गेले. अगदीं शब्दार्थानें घ्यावयाचे असल्यास त्यांना 'काँग्रेसमन' अ म्हणतां यावयाचें नाहीं, कारण मुंबई सरकारच्या न्याय खात्यांतील ते एक मो अधिकारी होते. परंतु कित्येक वर्षेपर्यंत काँग्रेसच्या सिंहासनामागें राहून ति सूत्रें ते हलवीत होते. काँग्रेसच्या चळवळींत स्फूर्तीचा पुरवठा करणारे असे एक पुरुष होते. त्यांची उंच व भव्य देहयष्टि, त्यांचा उमदा चेहरा, त्यां महाराष्ट्रीय पागोटें, प्राचीन हिंदू पद्धतीप्रमाणें लांववर रूळणारा त्यांचा आंगरखा यामुळें काँग्रेसच्या कित्येक अधिवेशनांतून ते चटकन ओळखूं येत. एक विद्वा अर्थशास्त्रज्ञ व इतिहासकार म्हणून त्यांची प्रसिद्धी होती. 'Rise of the Maratha powar,' Essays in Indian Economics व Socia Reform या नांवाचीं पुस्तकें त्यांनीं लिहिलीं. काँग्रेसला जोडूनच कित्येक व होत असलेलें सामाजिक अधिवेशन हें त्यांचें आवडतें बालक होतें. १८९५ सालीं पुणें येथें भरलेल्या अधिवेशनाचे वेळीं काँग्रेसनें सामाजिक प्रश्नावाबत कितपत संबंध ठेवावा हा प्रश्न उपस्थित झाला. त्या वेळीं न्यायमूर्ति रानडे यांच्या सहनशील व शहाणपणाच्या धोरणामुळेंच हें प्रकरण शांतपणानें मिटलें असें बाबू सुरेंद्रनाथ बानर्जी यांनीं म्हटलें आहे. प्लेगचा प्रादुर्भाव झाला त्या वेळीं त्यांनीं राष्ट्राची अनुपम सेवा केली. काँग्रेसची चळवळ व सामाजिक सुधारणा या संबंधांत १५ वर्षे अविश्रांत परिश्रम करून न्या. मू. महादेव गोविंद रानडे १९०१ सालीं दिवंगत झाले.

प. जवाहरलाल नेहरु.
स्वातंत्र्ययुगाचे नेते.

# भाग ४ था

## प्रकरण १ लें

## १९२९

१९२९ सालच्या आरंभींची हिंदुस्थानातील परिस्थिति खरोखरच आणी-बाणीची होती. त्यात लक्षात राहण्यासारखी एक मुख्य गोष्ट म्हणजे सप्टेंबर १९२८ मध्यें असेंब्लींत आलेलें पब्लिक सेफ्टी बिल अध्यक्षाच्या जादा मतानें फेटाळलें गेलें होतें, ही होय. तें बिल पुनः १९२९ च्या जानेवारींत असेंब्ली-पुढें आलें आणि तो एक लहानशा वादळाचा विषय झाला. कौन्सिल ऑफ स्टेटनें निवडलेले ४ सभासद व सरकारानियुक्त असे असेंब्लीचे ५ सभासद अशी ९ सभासदांची मध्यवर्ती कमिटी तयार होऊन ती सायमन कमिशन बरोबरच सर्व देशभर संचार करीत होती. त्याच वेळीं कांहीं पोटकमिट्यांचेंही काम सुरू होतें. सर हरकोर्ट बटलर याच्या अध्यक्षतेखालीं नेमलेल्या इंडियन स्टेटस् कमिटीनें (हिंदी संस्थान-समिती) १९२९ च्या एप्रिलमध्ये आपला रिपोर्ट पार्लमेंटला सादर केला.सर फिलिप हार्टोग याच्या नेतृत्वाखालीं एज्युकेशन कमिटीचें काम चालू होतें. ती शिक्षणसमिति ब्रिटिश हिंदुस्थानातील शैक्षणिक परिस्थितीची पाहणी करीत सर्व देशभर हिंडत होती व तिला रिपोर्ट १९२९ च्या सप्टेंबर महिन्यात सादर करावयाचा होता. खुद्द सायमन कमिशननें १४ एप्रिल १९२९ रोजीं आपल्या कार्याची परिसमाप्ति केली.हें कमिशन इंग्लंडला पोहोंचतें न पोहोंचतें तोंच पार्लमेंटमध्यें कान्झरव्हेटिव्ह पक्षाचा मे १९२९ च्या सर्व-साधारण निवडणुकींत पराभव झाला आणि मजूरपक्ष अधिकारारूढ होऊन मि. मॅकडोनल्ड हे मुख्य प्रधान व मि. वेजवुड बेन हे भारतमंत्री झाले. जून महिन्याच्या अखेरीस लॉर्ड अर्विन ४ महिन्यांच्या रजेवर इंग्लंडला गेले. राज्यघटनेच्या प्रश्नाला कांहींतरी व्यवस्थित स्वरूप देण्याचा मार्ग शोधून काढावा असा त्याचा इंग्लंडला जाण्यात हेतु होता. त्याप्रमाणें हिंदुस्थानांतील सर्व राजकीय पक्षांचें जास्त व्यापक प्रमाणावर सहकार्य घडवून कमिशनच्या चौकशीनंतर सुधारणेची जी काय योजना मांडावयाची ती अशा सहकार्यानेंच पार्लमेंटपुढें मांडावी असें त्यानीं सुचवलें.

हिंदुस्थानांत परत आल्यानंतर त्यांनीं आपल्या धोरणाबद्दल जे विधान केलें त्याची चर्चा आपण ओघाओघानें करूंच. त्यापूर्वी कॉंग्रेस पक्षानें कायदेमंडळांत जी चढाई केली तिच्या हालचालीचें निरीक्षण करूं या.

जाने. १९२९ मध्यें पब्लिक सेफ्टी बिल पुन्हा एकदा असेंब्लीपुढें मांडण्यात आलें. त्याची चर्चा एप्रिलमध्यें सुरू झाली. परंतु ११ एप्रिल रोजी अध्यक्षानींच ती चर्चा बंद केली. २ एप्रिल रोजी अध्यक्षानी खालील पत्रक प्रसिद्ध केलें —

"गेल्या वेळेस आपली बैठक झाल्यापासून एकदोन अप्रिय गोष्टी मला आढळून आल्या आहेत. त्यापैकीं एक म्हणजे या कायदेकौंसिलच्या नेत्यानें (Leader of the House) वेळोवेळीं या बिलावर केलेलीं भाषणें व दुसरी म्हणजे मीरत कोर्टांत सरकारनें ३१ इसमावर केलेला खटला ही होय. बराच विचार करून मला असें दिसून आलें आहे कीं, वरील ३१ इसमावर भरलेला खटला व पब्लिक सेफ्टी बिल या दोन्हींतील मूळ भूमिका अगदीं सारखी आहे. बादशहाच्या साम्राज्यात कोणच्याही ठिकाणीं ज्याचे निर्णय प्रमाण आहेत अशा न्यायकोर्टाच्या अधिकाराच्या मर्यादेंत ज्या गोष्टी येतात अशा कोणच्याही गोष्टीबद्दलचा ठराव किंवा चौकशी या मंडळाला करता येत नाहीं, असा या मंडळाच्या कामकाजाचा नियम आहे. ह्या गोष्टी या मंडळाचे सन्मान्य सभासद जाणतच आहेत. तेव्हा मीरत खटल्याच्या न्यायकक्षेंत ज्या गोष्टी येतात त्या गोष्टींचा निर्देश न करता पब्लिक सेफ्टी बिलाचा फेरविचार करण्याबद्दलच्या सूचनेची चर्चा करणें या मंडळास शक्य आहे कीं नाहीं असा प्रश्न उत्पन्न होतो. या बिलावर खरा वादविवाद होणें शक्य नाहीं याबद्दल दुमत होणार नाहीं असें मला वाटतें. शिवाय, बिल स्वीकारणें म्हणजे मीरत खटल्यातील मूल भूमिका मान्य करण्यासारखेंच होणार आहे. आणि बिल नाकारणें म्हणजे त्या खटल्यातील मुख्य भूमिका नाकारण्यासारखें आहे आणि स्वीकार किंवा नकार यांपैकीं काहींही घडून आलें तरी खटल्याची अनुकूल किंवा प्रतिकूल बाजू यामुळें कलुषित झाल्यावांचून राहणार नाहीं. या बिलाच्या चर्चेचा कसाही निर्णय झाला तरी त्या निर्णयाचा वरील खटल्यांतील न्यायदानाच्या कामावर परिणाम झाल्याशिवाय राहणारच! अशा स्थितींत यावेळीं बिलाची चर्चा चालू ठेवण्यास सरकारला मला कायदेशीर परवानगी कशी देता येईल याबद्दल मी साशंक आहे. स्वतः काहीं ठोकळेबाज निर्णय देण्याऐवजीं एकंदर हें माझें मत विचारांत घ्यावें व मीरत खटल्याचा निर्णय होईपर्यंत या बिलाची चर्चा तहकूब करावी असा मला सरकारला सल्ला द्यावासा वाटतो.

किंवा दुसरें असें कीं, याचवेळीं बिल पास करणें सरकारला जास्त महत्त्वाचें वाटत असेल तर मीरत खटला काढून घ्यावा व मग बिलाचा विषय चालू करावा." सुचवलेल्या दोन मार्गांपैकीं एकही मार्ग पत्करता येत नाहीं असें सरकारनें जाहीर केलें आणि 'बिलाचा फेरविचार करण्याच्या सूचनेच्या स्वरूपात व कायदेमंडळाच्या कार्यपद्धतींतच दोष उत्पन्न होत आहे' या मुद्यावर अध्यक्षानींच बिलाचा फेरविचार करण्याची सूचना आपल्या अधिकारात फेटाळून लावली. दुसऱ्या दिवशीं व्हाइसरॉयने दोन्ही मंडळास उद्देशून भाषण केलें आणि असें जाहीर केलें कीं, पब्लिक सेफ्टी बिलात नमूद केलेले अधिकार तावडतोब असलात आणणें सरकारला अत्यंत अवश्य आहे. त्याप्रमाणें लगेच व्हाइरॉयनीं कार्यकारी मंडळास ( एक्झिक्युटिव्ह ) पाहिजे असलेली अनियंत्रित सत्ता देण्यासाठीं वटहुकूम ( ऑर्डिनन्स ) काढला. आपण दिलेल्या निर्णयावर व्हाइसरॉयच्या भाषणात टीका झालेली आहे, असें वाटून त्या टीकेचा निषेध करण्यासाठीं श्री. पटेल यानीं व्हाइसरॉयना एक पत्र पाठविलें. परंतु व्हाइसरॉयचे खाजगी चिटणीस यानीं त्यास खालीलप्रमाणे उत्तर दिलें —

आपल्या निर्णयावर टीका करण्याचा किंवा त्या निर्णयाबद्दल आपणास दोष देण्याचा आमचा मुळींच हेतु नव्हता आणि मंडळाची इभ्रत व आपल्या स्थानाचा ( अध्यक्षपदाचा ) अधिकार टिकविण्याबद्दल आपल्याप्रमाणेच स्वतः-सही कळकळ वाटत आहे, असें व्हाइसरॉयच्या इच्छेवरून मी आपणास कळवीत आहे !

ट्रेड्स् डिस्प्यूट्स् बिलाचा उल्लेख मागें झालाच आहे. त्या बाबतींत एवढेंच सागावयाचें राहिलें आहे कीं, तें बिल ८ एप्रिल रोजीं पास झाले आणि त्या बिलाचा कार्यक्रम एका विलक्षण घडामोडीमुळें चिरस्मरणीय झाला. ती घडामोड म्हणजे अशी कीं, ज्या वेळीं मतविभागणीनंतर मंडळाचे सभासद सभा-स्थानीं परत येत होते आणि पुढील कामाकडे आता आपण वळूं या असें अध्यक्ष जाहीर करीत होते त्याचक्षणीं प्रेक्षकाच्या गॅलरींतून दोन बॉंब तीरासारखे सुटले आणि ते सरकारी सभासदांच्या बाकावर येऊन आदळले ! त्या स्फोटामुळे काहीं जणाना थोड्यागा दुखापती ही झाल्या !

कलकत्ता येथील बैठक संपताच, आपला कार्यक्रम अमलात आणण्यासाठीं राष्ट्रीय सभेच्या कार्यकारी मंडळानें ( वर्किंग कमिटी ) काहीं पोटकमिट्या नेमल्या. परदेशी कापडावर बहिष्कार घालण्यासाठीं, मद्यपान बंदीसाठीं, अस्पृश्यता-

निवारणासाठीं, राष्ट्रीय सभेच्या कार्यप्रसारासाठीं, स्वयंसेवकासाठीं आणि स्त्रियावरील निर्बंध दूर करण्यासाठीं अशा विविध कमिट्याची नेमणूक झाली. यापैकीं शेवटच्या पोटकमिटीनें जवळ जवळ कांहींच कार्य केलें नाहीं आणि कांहीं रिपोर्टही सादर केला नाहीं !

स्वयंसेवक कमिटीनें बऱ्याचशा सूचनाची शिफारस केली. विशेषतः हिंदुस्थान सेवादलाची कार्यशक्ति वाढवावी आणि राष्ट्रीय कार्याचें स्वयंसेवकाना शिक्षण देण्याच्या कामीं दलाचा पूर्णपणे उपयोग करून घ्यावा अशी स्वयंसेवक कमिटीची शिफारस होती.

श्री. मो. क. गांधी यांच्या अध्यक्षत्वाखालीं व श्री. जयरामदास दौलतराम यांच्या सारख्या कार्यक्षम व कार्यकारी चिटणीसाच्या हाताखालीं विदेशी कापड बहिष्कार मंडळानें सर्व वर्षभर कार्य चालू ठेवलें व बहिष्काराची चळवळ अव्याहतपणें परिणामकारक रीतीनें चालवली. बहिष्काराचें कार्य अव्यग्रपणें करता यावें म्हणून श्री. जयरामदास दौलतराम यानीं मुंबई कौन्सिलमधील आपल्या जागेचा राजीनामा दिला. मुंबईला हें आपल्या कार्याचें त्यानीं केंद्र केलें.

या बहिष्कार मंडळानें प्रांतिक व जिल्हा कॉंग्रेस कमिट्याशीं आपला प्रत्यक्ष संबंध वाढवला आणि कित्येक पुस्तिका व पत्रकें प्रसिद्ध केली. या वर्षाच्या सुरवातीसच परदेशी कापडाच्या होळ्या ठिकठिकाणीं पेटल्या ! आणि यापैकीं कलकत्ता येथील एका होळीचा परिणाम असा झाला कीं, सरकारला गांधीजींना अटक करणें भाग पडलें, त्याचा उल्लेख मागें आलाच आहे.

मद्यमान निषेध कमिटीचें नेतृत्व श्रीयुत सी. राजगोपालाचार्य यांच्याकडे होतें. तें कार्याशीं तद्रूप झाले होते. ती चळवळ प्रगतिपर करण्याच्या कामीं त्यांनीं आपलें महान् कर्तृत्व केंद्रीभूत केलें. दक्षिण हिंदुस्थान व गुजराथ या प्रांतात चळवळीचें कार्य बऱ्याच मोठ्या प्रमाणावर चाललें आणि त्याला संस्मरणीय यश प्राप्त झालें. त्या चळवळीकडे इतर राष्ट्रांचेंसुद्धा लक्ष वेधण्याइतकी ती व्यापक होत गेली. मद्यपान व इतर अंमली पदार्थांचें सेवन थांबवण्याच्या कामीं सरकारनेंही प्रचार करावा अशा इच्छेनें ४ लाख रुपये खर्च करण्याचीहि तयारी मद्रास सरकारमध्यें उत्पन्न करण्यांत आली. संयुक्तप्रांत सरकारही या दिशेनें विचार करूं लागल्याचें दिसूं लागलें. श्री. राजगोपालाचार्य हें भारतीय मद्यपान निवारक संघाचे चिटणीस झाले व मद्यपाननिवारक ( Prohibition ) त्रैमासिकाचे ते संपादक ही होते.

अस्पृश्यतानिवारणाची मोहीम श्री. जमनालाल बजाज याच्याकडे होती. आणि त्याकामीं त्यानीं जिवापाड श्रम केले. बऱ्याच कालापासून दलित झालेले असे जे वर्ग होते त्याच्यावरील प्रतिबंध कमी करण्याकडे समाजाचा कल वळविण्यांत आला. या वर्गाला ज्या प्रसिद्ध देवालयात प्रवेश करूं देत नसत अशीं कित्येक प्रसिद्ध देवळें दलितासाठीं खुलीं झालीं. या दलित वर्गासाठीं कित्येक विहिरी व शाळा उघडण्याच्या कामींही कमिटीने यश मिळविलें. कित्येक स्थानिकस्वराज्य संस्था या कामीं सहकार्य करीत आहेत. कमिटीचे सेक्रेटरी श्री. जमनालाल बजाज यांनीं मद्रास मध्यप्रांत, राजपुताना, सिंध, कराची, पंजाब ते वायव्यसरहद्दप्रात असे दूरवर दौरे काढले.

अस्पृश्यतानिवारणाच्या प्रचाराचा दोन तऱ्हेने परिणाम झाला. ज्याना उच्चवर्णीय म्हणतात त्यानीं मत्सरानें कित्येक शतकापासून आपल्याकडे जें अधिकार अट्टाहासानें राखून ठेवले होते ते सोडण्याची त्याच्या मनाची तयारी झाली, व दलितवर्गामध्यें आत्मनिष्ठा व हक्काची जाणीव उत्पन्न झाली. ज्या ठिकाणीं आपल्या अडचणी व प्रतिबंध दूर करण्याविषयींची दलितवर्गाची मागणी समाधानकारक रीतीने पुरवली गेली नाहीं अशा कांहीं ठिकाणीं तेढ उत्पन्न झाली व सत्याग्रह किंवा त्यासारखाच प्रतिकारमार्ग याचा अवलंब करण्याची धमकी घातली गेली. त्यावेळीं गांधी हिंदुस्तानात दौरा करीत होते व ब्रह्मदेशकडे जाता जाता ते कलकत्त्यावरून गेले. त्या ठिकाणीं परदेशी कापडाची एक होळी झाली व त्या संबंधानें १९२९ मार्चच्या दुसऱ्या आठवड्यात त्यांच्यावर आरोप ठेवण्यात आला. सार्वजनिक गवत व अशा इतर वस्तू जाळण्याचा प्रतिबंध करण्याविषयीं जो हुकूम होता तो मोडणें किंवा मोडण्यास उत्तेजन देणे असा आरोप गांधीवर ठेवण्यात आला. कलकत्त्याचे पोलिस कमिशनर सर चार्लस टेगार्ट यानी कलकत्ता पोलिस ॲक्टचे ६६ (२) कलम पुढें केलें. बुडत्याला काडीचा आधार अशी म्हण आहे खरी ! परंतु या सहीसलामत नोकरशाहीनें सिटीपोलिस ॲक्टाच्या "गवती" कलमाचा आधार का घ्यावा कोणास ठाऊक ? थोडक्यात सांगावयाचें म्हणजे विदेशीवस्त्र-बहिष्कार चळवळीच्या मुख्य रूळावरील गाडी पोलीसानीं कायदेभंगाच्या दुय्यम मार्गावर खेचून आणली. परंतु हा डाव शेवटीं फसलाच ! गांधी ब्रह्मदेशकडे निघून गेले व लवकरच परत आले. त्यांची चवकशी झाली व त्यांना १ रु. दंड ठोठावण्यांत

आला! नंतर त्यांना आपला आंध्रदेशातील संस्मरणीय दौरा काढला. त्या दौऱ्यात त्यांनीं २ लाख ७० हजार रुपये खादीफंड सहा आठवड्यात जमविला. पुढे लवकरच मे १९२९ मध्यें मुंबईस ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटीचें अधिवेशन झाले.

हें मुंबईचें अधिवेशन कांहींसें महत्त्वाचेंच होतें. असेंब्लीची मुदत वाढविण्यात येईल असें सरकारनें जाहीर केलें होतें. एवढ्याच एका कारणामुळें कॉंग्रेसला चळवळीचा अवलंब करावा लागला. सर्व देशभर धरपकडीचें सत्र सुरूं झाले होतें. त्यात वर्किंग कमिटीचे सभासद श्री. सांबमूर्ति यांच्या सारख्याचासुद्धा समावेश होऊं लागला. पंजाबमध्यें तर अत्यंत निर्घृणपणे दडपशाही चालू होती. या सर्व प्रकारावरून असा संशय सहजच उत्पन्न झाला कीं, लाहोर येथें कॉंग्रेसचें जें पुढील अधिवेशन होणार आहे त्याच्या तयारीला पायबंद बसावा याच हेतूनें ही दडपशाही जारीने सुरूं असावी. अर्थात् या सरकारी हालचालींमुळेंच कॉंग्रेसलाही प्रत्येक प्रांतातून आपल्या कार्याचा अत्यंत नेटानें प्रसार करण्याचें काम तांबडतोब हातीं घ्यावें लागलें. मुंबईस असें ठरण्यात आलें होतें कीं, प्रांतिक कॉंग्रेस कमिटीमध्यें प्रांताच्या लोकसंख्येच्या निदान ¾ तरी लोक प्राथमिक सभासद असले पाहिजेत; आणि जिल्ह्यातील शेकडा ५० लोक तरी प्रांतिक कमिटींत कॉंग्रेसचे प्रतिनिधि असले पाहिजेत. जिल्हा व तालुका कॉंग्रेस कमिटींत एकंदर लोकसंख्येच्या ¾ इतके तरी सभासद असले पाहिजेत. खेड्यातील कॉंग्रेससंघटनेंत निदान शें. १ तरी लोकसंख्या सभासद असली पाहिजे. जी कॉंग्रेसशाखा कॉंग्रेसच्या सूचना अमलात आणणार नाहीं त्या समितीचें कॉंग्रेसशी संबंध रद्द करण्याचा अधिकार वर्किंग कमिटीला होताच. देशाच्या हितास योग्य अशा ज्या कांहीं गोष्टी असेंब्लींतील व प्रांतिक कायदेमंडळातील कॉंग्रेसपक्षीय प्रतिनिधींनी कराव्यात असें वर्किंग कमिटीस वाटत असेल त्या गोष्टी घडवून। आणण्यासाठीं आवश्यक त्या हालचाली करण्याचे अधिकार वर्किंग कमिटीला दिलेले होते. पूर्व आफ्रिका हाही एका ठरावाचा विषय झाला व त्यावावत असें ठरविण्यांत आलें कीं, राजकीय व आर्थिक समानता मिळविण्यासाठीं पूर्व आफ्रिकेचे जे प्रयत्न चालले आहेत त्या कामीं कॉंग्रेसनें सर्वतोपरी सहाय्य करावें. कमिटीनें आणखी असें ठरविलें कीं, स्वराज्याच्या चळवळीत शासनपद्धतीविषयीं व आर्थिक व सांस्कृतिक प्रश्नांविषयीं जे कांहीं निर्णय वेळोवेळीं झाले ते प्रकरण एकत्र करून एक कॉंग्रेस मॅन्युअल

वाच्या कामासाठीं १५०० रु. मंजूर केले. या खटल्यांतील प्राथमिक चौकशी-चेंच काम किती तरी महिने रेंगाळत होतें आणि वर्ष संपण्याच्या सुमारास तें काम पूर्ण झालें. या खटल्याने हिंदुस्थान व इंग्लंडमधील ब्रिटिशांचें सुद्धां लक्ष वेधलें.

लवकरच १५ जुलै रोजीं वर्किंग कमिटीची दिल्ली येथें बैठक झाली, आणि निरानिराळ्या कायदेमंडळातील सभासदानीं आपल्या जागेचे राजीनामे देणें हें स्वराज्याच्या चळवळीच्या दृष्टीनें हितावह आहे असें त्या बैठकीचें मत होतें. परंतु या प्रश्नाचें महत्त्व लक्ष्यांत घेऊन या विषयाचा निर्णय ऑ.इं.कॉं.कमिटीवरच सोपवावा असें ठरलें.यासाठीं वर्किंग कमिटीनें असें ठरवलें कीं, २६ जुलै १९२९ रोजीं शुक्रवारीं अलाहाबाद येथें ऑ इं. कॉं. कमिटीची खास बैठक या कामाकरिता तावडतोब बोलवावी. कलकत्ता येथील मुख्य ठरावातील शेवटच्या विभागात असें म्हटलें होतें कीं, कॉंग्रेसच्या चळवळीस आर्थिक सहाय्य करण्यासाठीं लोकानीं आपल्या उत्पन्नाचा कांहीं ठराविक हिस्सा राष्ट्रीय कार्यास द्यावा. प्रथम हा हिस्सा शे. ५ हा सुचवला होता व पुढें तो शें. २॥ करण्यात आला. परंतु कॉंग्रेसच्या बैठकीस हजर असलेल्या काहीं श्रीमंत सभासदानीं या सूचनेच्या वेळीं जो भित्रेपणा व घाबरटपणा दाखवला तो लक्ष्यात घेतां असे ठरलें कीं, हा आर्थिक सहाय्याचा वैयक्तिक प्रश्न प्रत्येक व्यक्तीवरच सोपवावा. अशा रीतीनें ज्यानें त्यानें आपआपल्या मताप्रमाणें दिलेल्या मदतीची यादी जुलैच्या पत्रकात प्रसिद्ध झाली. एकंदरींत या आर्थिक सहाय्याच्या मागणीला फारच उपेक्षणीय प्रत्युत्तर मिळालें !

हा काळ देशात वऱ्याच दडपशाहीनें व्यापलेला होता. डॉ. संदरलंड यांचें इंडिया इन् बॉंडेज ( वंदिवान भारत ) हें पुस्तक सरकारनें याचवेळीं आक्षिप्त ठरवलें होतें व तें पुस्तक प्रसिद्ध करण्यावद्दल मॉर्डन रिव्ह्यूचे संपादक श्री. रामानंद चतर्जी याना अटक करण्यांत आली होती.

दिल्ली ( असेंब्ली ) बॉंबच्या खटल्यात अटक झालेले भगतसिंग व दत्त याना जन्मठेप काळेपाण्याची शिक्षा झाली होती. कार्याच्या प्रसिद्धीसाठीं आपण ते बॉंब फेकले होते असें त्यानीं स्वत च जाहीर केलें होतें !

लाहोर कटांतील खटल्यांत आलेल्या अन्नसत्याग्रहाविषयीं निरूप सिनाक पूर्वी आलाच आहे.

दुसरा एक सामुदायिक खटला कलकत्त्यास चालू होता. त्यांत वर्किंग कमिटीचे सभासद श्री. सुभाषचंद्र बोस हे व इतर काहीं प्रसिद्ध कॉंग्रेसभक्त याची चौकशी होत होती.

शाघाय व मलाया द्वीपकल्प या ठिकाणींही काही हिंदी लोकांना राजकीय कारणासाठीं अटक झाल्याच्या बातम्या आल्या होत्या.

राजकीय कार्यकर्ते व कामगार कार्यकर्ते यांच्या बाबतींत चाललेल्या असंख्य चौकशा व खटले व शिक्षा याखेरीज ऑ. इं. कॉंग्रेसने ज्यांचें ' रानटी ' या शब्दानीं वर्णन केले अशा दडपशाहीच्या पद्धतीचा पोलिसाकडून अवलंब होत होता.

त्या व त्यानंतर झालेल्या चौकशीव्यतिरिक्त व शिक्षाव्यतिरिक्त हेंही लक्ष्यात ठेवले पाहिजे कीं, दीर्घकालीन शिक्षा झालेले असे कित्येक राजकीय कैदी त्याच वेळीं अंदमान व हिंदुस्थान येथील तुरुंगात आधींच नेऊन बसवले होते ! १८१८ सालच्या ३ ऱ्या रेग्युलेशनप्रमाणे अटक झालेले व मॉर्शल लॉ प्रमाणे कैद झालेले असे कित्येक कैदी होते कीं ज्याना पंजाबमध्ये १९१९ सालच्या लष्करी कायद्याच्या अंमलात जादा न्यायकोर्टाकडून ( स्पेशल ट्रिब्यूनल ) शिक्षा फर्मावण्यात आल्या होत्या. याखेरीज १९१४ ते १५ चे दरम्यान युद्धाच्या वेळीं ज्याना जन्मठेपीची शिक्षा झाली होती असें २७ कैदी यावेळीं तुरुंगांत होते. त्याचीसुद्धां चौकशी व शिक्षा सामान्य न्यायकोर्टाकडून न होतां खास न्यायकमिशनकडूनच झाली होती. यावेळीं त्याचें तुरुंगवासाचे १५ वें वर्ष संपले होतें !

मजुराचे लढे व संप या वर्षभर चालूच राहिले व दिवसेंदिवस त्यांना तीव्र स्वरूप येत चाललें. मुंबईच्या गिरण्यामध्यें एक जंगी संप झाला, त्यात १ लक्ष ५० हजार मजूर सामील झाले होते. हिंदी मजुराचा दृष्टिकोन बदलत चालला आहे ही गोष्ट त्या संपानें स्पष्टपणें निदर्शनास आणली. सुरुवातीस त्या संपानें चांगलेंच यश मिळवलें आणि संपामागे खूप मोठी संघशक्ति उभी आहे हे दिसून आलें. परंतु ६।७ महिन्यानंतर संप मोडला ! बंगालमधील ज्यूटचें पिक ज्या विभागात होतें त्या प्रांतात २५ हजार मजुराचा एक जंगी संप झाला. जरी ज्यूट कामगाराची संघटना अर्धवट झाली होती तरी त्यानीं संप यशस्वी करून दाखवला. मात्र मधून मधून बारीक सारीक संप होत राहिले व त्यामुळें सार्वत्रिक संपाचें कार्य अंशतः वाया गेलें !

याहीपेक्षा एक प्रचंड संप यावेळीं झाला. त्या संपानें सार्वत्रिक सहानुभूति संपादून सर्वांचें लक्ष वेधलें. तो संप जमशेटपूर जवळील गोलमूरी येथील पत्र्याच्या कारखान्यातील ३००० मजुरांनीं केला होता. संप साडेआठ महिने चालला होता. संपवाल्याच्या मागण्या अगदी बेताच्या होत्या परंतु मालकांनीं व बहार सरकारनें नुसती चौकशीसुद्धा न करण्याचा अट्टाहास चालू ठेविला. कायदेमंडळानें सरकारच्या या धोरणाबद्दल निषेध केला आणि पत्र्याच्या धंद्याला दिलेले संरक्षण काढून घेण्याचा ठरावही पास केला. परंतु नेहमीं कायदेमंडळाच्या ठरावाची जी वासलत होते तीच याही ठरावाची झाली. सरकारने तो ठराव लक्षातच घेतला नाहीं. कांहीं चौकशी झाली नाहीं व संप चालूच राहिला. बजबज व इतर ठिकाणीं या संपाच्या सहानुभूतिपर संप पुकारण्यांत आले.

दक्षिण हिंदुस्थान रेल्वेसंप १९२८ सालीं झाला. त्यात पुष्कळ लोकाना कटाच्या आरोपावरून शिक्षा होऊन व चौकशी होऊन संपाचा शेवट झाला! त्रिचनापल्ली येथील न्यायाधिशानें एप्रिलमध्यें या कटवाल्यापैकीं १५ लोकाना १०।१० वर्षांची सक्तमजुरी सुनावली!

वर्किंग कमिटीचे दोन सभासद जवळ जवळ वर्षभर परदेशात होते. श्रीमती सरोजनी नायडू या अमेरिकेंतील आपल्या यशस्वी दौऱ्यावरून ऑगस्टमध्यें परत आल्या. नोव्हेंबरमध्ये त्या पूर्वआफ्रिकेंत ईस्ट आफ्रिकन इंडियन कॉंग्रेसच्या अध्यक्ष म्हणून गेल्या. कॉंग्रेसच्या खाजिनदारांपैकीं एक खजिनदार श्री. शिवप्रसाद गुप्त हे युरोपमध्यें पुष्कळ महिने होते. फ्रॅंकफूर्ट येथें जुलैमध्यें साम्राज्यविरोधक संघाच्या दुसऱ्या जागतिक परिषदेस कॉंग्रेसतर्फे ते हजर होते. या जागतिक परिषदेबद्दलचा त्याचा रिपोर्ट वर्किंग कमिटीपुढें हजर करण्यात आला.

बर्लिन येथील विद्यार्थीसंघ स्थापण्यासाठीं (स्टूडंटस् इन्फर्मेशन ब्युरो) महिना ३० पौंड देण्याचा ठराव वर्किंग कमिटीने कलकत्त्याचें अधिवेशन संपल्याबरोबर केला. श्री. ए. सी. एन्. नंबीयार याच्या देखरेखीखालीं हा संघ लवकरच सुरू झाला आणि कित्येक हिंदी विद्यार्थ्यांना व पाहुण्याना मदत करून संघानें आपली उपयुक्तता पटवली. युरोपातील मुक्कामांत श्री. शिवप्रसाद गुप्त यांनीं या संघाची तपासणी केली आणि संघाबद्दल अनुकूल अभिप्राय उद्गार काढले. श्री. गुप्त याच्या शिफारसीवरून वर्किंग कमिटीने संघाची देणगी २ पौंड महिना वाढवली व तिनें वाचनमंदिराची व्यवस्था करावी असें

सुचवले. संघाचे काम अत्यंत चोखपणे चालू राहिले. व दर महिन्यास सघा-कडून सर्व रिपोर्ट व जमाखर्च पाठविले जात होते. संघाचे सर्व यश बहुतांशी श्री. नंबियार यांच्या निर्वेतन सेवेचेंच फळ होते.

ऑ. इं. कॉ. कमिटीनें एक परराष्ट्रीय खाते सुरू करावे अशी सूचना कलकत्ता कॉंग्रेसने केली आणि या कामीं जरूर ती व्यवस्था कॉंग्रेसच्या वतीनें करण्याचे अधिकार वर्किंग कमिटीने कार्यकारी मंडळाच्या चालू चिटणीसास दिले. ऑ. इं. कॉ. कमिटीच्या परराष्ट्रीय खात्याचें कार्य व्यक्तिशः चिटणीसावर सोपवले होते. व त्याप्रमाणे इतर देशातील संस्थाशी व व्यक्तींशी परिचय वाढविण्याचे चिटणीसानी प्रयत्न केले परंतु सरकारच्या नियंत्रणामुळे (सेन्सारशिप्) परराष्ट्रीय पत्रव्यवहाराच्या कार्यांत बऱ्याच अडचणी उपस्थित झाल्याने हें कार्य अगदीं सहजसाध्य असे झाले नाहीं.

१९३० साली पॅन ॲशियाटिक फेडरेशन हिंदुस्थानात भरविण्याच्या कामीं जरूर ते प्रयत्न करण्याविषयीं कलकत्ता कॉंग्रेसने वर्किंग कमिटीला सुचविलें होते. कमिटीने श्री. एस्. सत्यमूर्ति व चिटणीस याच्यावर हे काम सोपवले व त्यानीं आपल्या प्रयत्नाचा रिपोर्ट सादर करावा असे ठरले. या रिपोर्टांत असे नमूद करण्यात आले कीं, जर १९३० सालीं ही बैठक बोलवावयाची असेल तर ती १९३० डिसेंबरमध्ये काग्रेस अधिवेशनाच्या वेळींच बोलवावी. याखेरीज अशी पॅन–ऑशियाटिक कॉन्फरन्स बोलावण्याच्या मार्गातील इतर अडचणीही त्या रिपोर्टांत नमूद केल्या होत्या.

ऑ. इं. कॉं. कमिटीच्या ठरावानुसार कॉ. कमिटीच्या ऑफिसची एक शाखा म्हणून लेबर रिसर्च डिपार्टमेंट (मजुराच्या प्रश्नाचे संशोधन करणारे खाते) उघडण्यात आले.

स्वयंसेवकाना शिक्षण देण्याचें कार्य हिंदुस्थानात सेवादलानें देशाच्या निरनिराळ्या विभागातून चालू ठेवलेंच आहे. यापैकीं पुष्कळसे कार्य कर्नाटकमध्यें झालें. कर्नाटकात दलाची मुख्य कचेरी व शारीरिक शिक्षणसंस्था होती. परंतु इतर प्रातातही दलाने आपले कॅंप उभारले होते आणि सेवादलाकडे दिवसेंदिवस स्वयंसेवक शिक्षकाची मागणी वाढत गेली. कॉंग्रेसचे सभासद वाढवून व विदेशी वस्त्रबहिष्काराचेंही कार्य करून दलानें फार मोठे सहाय्य केलें.

महिन्यातून एक दिवस राष्ट्रीय ध्वजवंदनदिन पाळण्याचा प्रघात सुरू करण्यात हिंदुस्थान सेवादलानें अकल्पनीय यश मिळविले. कलकत्ता कॉंग्रेसमध्यें

असें ठरविण्यात आलें कीं, दर महिन्याच्या शेवटच्या रविवारीं सकाळीं ८ वाजता सर्व देशभर झेंडावंदन व्हावे. राष्ट्रीय ध्वजारोहण करावे. हा राष्ट्रीय ध्वजारोणाचा उपक्रम अत्यंत लोकप्रिय झाला. कित्येक इमारतींवर व स्थानिक स्वराज्यसंस्थांवर हें ध्वजारोहणाचें कार्य अत्यंत गांभीर्यानें झालें. हिंदुस्थान सेवादलास मान्यता देण्यात आली.

ऑगस्ट महिना या कोणच्याही बाबतींत पूर्वीच्या महिन्यापेक्षा जास्त शांततेचा नव्हता. पुढाऱ्याना बंदिवान करण्याचा क्रम सर्वत्र चालू होताच. सरदार मंगलसिंग आणि मौलाना जाफरअली तसेंच सात वर्षें कारागृहवास भोगलेले मास्टर मोटासिंग व डॉ. सत्यपाल हे पंजाबमध्यें, आंध्रमध्यें श्री. अन्नपूर्णय्या असे पुढारी कैद होते. डॉ. सत्यपाल याना २ वर्षें सक्तमजुरी मिळाली. पंजाबमधील दडपशाही विशेष नैष्ठुर्यानें चालू होती. यावेळीं भगतसिंग, दत्त व इतर बंदिवानाचा अन्नसत्याग्रहाचा सहावा आठवडा होत आला होता.

असेंब्ली बाँब केसच्या संबंधात भगतसिंग व दत्त याना जन्मठेपीची सजा नुकतीच सुनावण्यात आली होती. हेच दोघेजण लाहोर कटाचा खटला या नावानें प्रसिद्ध झालेल्या खटल्यातही आरोपी ठरले होते. त्यापैकीं दत्ताची पुढें या आरोपांतून मुक्तता झाली. मि. सॉडर्स नावाच्या लाहोर पोलिसचा १७ सप्टेंबर १९२८ रोजीं दुपारीं ४ वाजता जो खून झाला त्यातून या कटाच्या खटल्याची उभारणी झाली. आपल्या गाऱ्हाण्याची दाद मिळविण्यासाठीं या बंदिवानानीं अन्नसत्याग्रह चालूच ठेवला होता. तुरुंगात निदान माणुसकीनें तरी वागवलें जावे अशी त्याची मुख्य मागणी होती. प्रसिद्ध जतींद्रनाथदास या सत्याग्रहींपैकीं एक होता. युरोपियन कैद्यापेक्षा हिंदी कैद्याना निराळ्या तऱ्हेनें वागविण्यात येतें असा जतींद्रनाथाचा आक्षेप होता. त्याना मिळ-णाऱ्या जादा सवलतीची त्याला कधींच रुखरुख वाटली नाहीं. आणि टेरेन्स मॅकस्विनीप्रमाणें आमरणान्त आपला अन्नसत्याग्रह चालवणारा तो पुरुष होता. त्यानें ६४ व्या दिवशीं या सत्याग्रहयुद्धभूमीवर आपला देह ठेवला ही हकीगत पुढें येईलच.

या वर्षी इंग्लंड व युरोपांतील इतर देशांतील कित्येक राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय संस्थाशीं परिचय घडून आला. मुंबईस काँग्रेस मुस्लीम पार्टी स्थापन झाली आणि अ. इं. काँग्रेसच्या अल्लाहाबाद येथील अधिवेशनाच्या वेळीं अरिंदमार्ग व

मुसलमान राष्ट्रीय संघ स्थापन झाला. या अधिवेशनाच्या वेळीं कौन्सिलमधील काँग्रेस सभासदांनीं राजीनामे द्यावेत या वर्किंग कमिटीच्या मतास दुजोरा देण्यात आला. परंतु यासंबंधींचीं आलेली पत्रे लक्ष्यात घेता हा प्रश्न लाहोर काँग्रेसपर्यंत तहकूब करणे योग्य आहे: असे ठरलें. परंतु राजनामें देण्याची ज्याची तयारी आहे, त्यानीं तसे तोंपर्यंत करू नये असा मात्र याचा अर्थ नव्हता.

पंजाबातील अन्नसत्याग्रहामुळे सरकारला पेचात पडल्यासारखें झाले. लाहोर कटाच्या खटल्यात पोलिसाचे काम अडवून धरावें अशा हेतूने मुद्दाम हे सत्याग्रह सुरू आहेत असे सरकारला वाटले. त्यासाठीं असेंब्लीपुढे १२ सप्टेंबर १९२९ रोजीं एक ठराव माडण्यात आला. ज्या वेळीं आरोपी आपल्या स्वत:च्या कृत्यानीं दुबळा होऊन कोर्टांत हजर राहण्यास असमर्थ झाला असेल त्या वेळीं आरोपीच्या गैरहजरींतही खटल्याचें काम चालू ठेवण्याचा अधिकार न्यायाधिशाना देणें हा ठरावाचा हेतु होता. या ठरावाचे वादग्रस्त स्वरूप लक्ष्यात घेऊन तो ठराव मतप्रदर्शनासाठीं आधीं प्रसृत करावा हें सरकारनें कबूल केले. परंतु अगदीं जरूरीचा प्रसंग उत्पन्न झाल्यास या ठरावाची अंमलबजावणी करण्याचे अधिकार सरकारनें आपल्याकडे राखून ठेवले होते आणि वस्तुत: सरकारने अशा अर्थाचा वटहुकूम लवकरच जाहीरही केला. हा वटहुकूम ‘ लाहोर कॉन्स्पिरसी ट्रायल ऑर्डिनन्स ’ म्हणून प्रसिद्ध आहे.

महत्त्वाच्या घडामोडींची उभारणी जारीने होत होती. लाहोरचें अधिवेशन आज ऐतिहासिक महत्वास पोहोंचलें आहे. इतक्या महत्त्वाच्या अधिवेशनासाठीं इतर अधिवेशनाप्रमाणेच अध्यक्ष निवडावयाचा होता. प्रांतिक मतदानात दहा प्रांतानीं गांधींना मत दिलें, ५ प्रांतानीं वल्लभभाई पटेल याना मत दिलें आणि तिघानीं जवाहरलाल नेहरू याना मत दिले. गांधींच्या अध्यक्षपदाची रीतसर घोषणा झाली परंतु त्यानीं राजिनामा दिला. तेव्हा काँग्रेसच्या घटनेस अनुसरून दुसरा अध्यक्ष निवडणे जरूर झाले. ऑ. इं. काँग्रेसची बैठक लखनौ येथें २८ सप्टेंबर १९२९ रोजीं बोलावण्यात आली. काँग्रेसचें अध्यक्षपद हें सर्व राष्ट्राच्या संबंधाचें उगमस्थान होतें !

सर्व लोकाचे डोळे गांधीकडे लागले होते. कारण काँग्रेसला अडचणींतून पुन्हा एकदा सोडवणारी व जयाच्या मार्गाकडे नेणारी अशी तेवढीच एक

अगदीं वेळेवर सरकारने सत्याग्रहींच्या सर्व अटी मान्य केल्या होत्या आणि त्यांच्या तक्रारींची भरपाई करण्याचे प्रयत्नही होत होते! ही वस्तुस्थिति लक्षात घेऊन अन्नसत्याग्रहींनीं आपले आग्रह सोडावेत असे कॉंग्रेसने सांगितले.

पूर्व आफ्रिकेतील परिस्थितीच्या बाबतींत हिंदुस्थान सरकारनें असें प्रसिद्ध केले होतें कीं, आम्ही फक्त पुरस्कर्ते आहोंत. प्रत्यक्ष कांहीं करण्याचा मक्ता आम्ही घेत नाहीं. या सरकारी स्पष्टीकरणाविषयीं व पूर्व आफ्रिकेंतील विकट परिस्थितीविषयींही एक ठराव झाला. त्याचवेळीं पूर्व आफ्रिकेचें एक शिष्टमंडळ हिंदुस्थानात प्रवास करीत होतें व त्यापैकीं एक गृहस्थ मि. जे. बी. पंड्या यांची लखनौ येथें भेट घेण्याची संधि कॉंग्रेसला लाभली. इकडे या गोष्टी होत होत्या त्यावेळीं दक्षिण अफ्रिका युनियनला अलीबंधू भेट देऊं इच्छित होते; परंतु दक्षिण आफ्रिका सरकारने त्यांच्यावर अव्यवहार्य बंधनें लादलीं आणि या सर्व गोष्टी लक्ष्यात घेऊन कॉंग्रेसनें एक योग्य ठराव या बाबतींत पास केला.

आक्टोबर हा धामधुमीचा महिना होता. लॉर्ड आर्विन २५ आक्टो. रोजीं इंग्लंडहून परत आले व त्यानीं हिंदुस्थानला उद्देशून बऱ्याच गोष्टी जाहीर केल्या. त्या घोषणेला उद्देशून पं. मोतिलाल नेहरु यानीं १ नोव्हें. रोजीं वर्किंग कमिटीची बैठक दिल्ली येथें तांतडीनें बोलावली. कमिटीच्या सभासदाबरोबर इतरही पक्षाचे पुढारी राजधानीच्या ठिकाणीं जमले होते. अपेक्षित अशा आगामी गोष्टींचा स्वीकार करण्यासाठीं व त्याबाबत संघटित प्रयत्न करण्याची दिशा ठरविण्यासाठीं हे सर्व पक्षोपपक्ष दिल्लीस जमा झाले. १९२९ च्या जूनच्या शेवटीं लॉर्ड अर्विन यानीं इंग्लंडला जातांना असें सांगितलें होतें कीं, मी इंग्लंडला गेल्यावर साम्राज्यसरकारबरोबर या गंभीर स्वरुपाच्या प्रश्नाची चर्चा करण्याची संधि साधणार आहे. हिंदुस्थानांतील जबाबदार पुढाऱ्यांचे राजकीय दृष्टिकोन साम्राज्य सरकारपुढें मांडणें हें मी दुसरीकडे एकदा बोलल्याप्रमाणें माझें कर्तव्यच समजतों.

नंतर त्यांनीं १९१७ ऑगस्टच्या दोन महत्त्वपूर्ण घोषणांचा उल्लेख केला. त्याचप्रमाणें बादशहाकडून त्याना जें खालील आशयाचें आज्ञापत्र आलें होतें त्याचाहि उल्लेख केला.

'साम्राज्याचा अंतर्गत भाग या दृष्टीनें ब्रिटिश हिंदुस्थानासाठीं जबाबदार राज्यपद्धति वाढत्या प्रमाणात घडवून आणण्याविषयीं ज्या योजना आमच्या पार्लमेंटनें तयार केल्या आहेत, त्या फलद्रूप व्हाव्यात व शेवटीं हिंदुस्थानला

आमच्या वसाहतींमध्यें आपल्या योग्यतेचें स्थान मिळून त्या योजनांची फलश्रुति व्हावी, अशी आमची इच्छा आहे व यातच आमचा संतोष आहे.

बादशहानीं ३१ आक्टोबर रोजीं प्रसिद्ध केलेल्या पत्रकाविषयीं माहिती सांगताना लॉर्ड आर्विन म्हणाले--

कमिशनच्या अध्यक्षांनीं मुख्य प्रधानाशीं जो पत्रव्यवहार केला व जो इंग्लंडमध्ये प्रसिद्ध करण्याचें काम चालले आहे त्या पत्रव्यवहारांत असे निदर्शित केलें आहे कीं, जसजसें चौकशीचें काम पुढें चालले आहे तसतसे हिंदुस्थानच्या भावी राज्यघटनेच्या दृष्टीनें विचार करीत असता एक महत्त्वाची गोष्ट कमिशनचे अध्यक्ष व त्याचे सहकारी याच्या मनात प्रामुख्यानें येत चालली आहे. ती गोष्ट म्हणजे ब्रिटिश हिंदुस्तान व संस्थानें यांच्या भावी संबंधाचें महत्व ही होय. अध्यक्षाचे असे ठाम मत आहे कीं, ज्या मार्गांनीं अखिल हिंदुस्तानच्या या दोन महत्त्वाच्या घटकाचे संबंध ठरवले जाणार आहेत त्या मार्गांचें पूर्णपणे परिशीलन होणें जरूर आहे. अध्यक्षानीं पुढे असें म्हटले आहे कीं, जर कमिशनचा रिपोर्ट व त्यावरून सरकारकडून तयार व्हावयाच्या योजना यांत हे संबंध येत असतील तर सरकारनें त्या सर्व योजना आता सुचवल्याप्रमाणें पुन्हा एकदा तपासून पाहणें जरूर आहे. स्टॅट्यूटरी कमिशनचे रिपोर्ट व इंडियन सेंट्रल कमिटीचें रिपोर्ट तयार झाल्यावर त्यावर विचार होतील व ते प्रसिद्ध होतील आणि नंतर काय करावें लागेल हें अध्यक्षानीं सुचवलें आहे. परंतु जॉइंट पार्लमेंटरी कमिटीची वेळ येण्यापूर्वी एक परिषद बोलवावी लागेल. त्या परिषदेंत ब्रिटिश सरकार ब्रिटिश हिंदुस्थान व संस्थानें याच्या प्रतिनिधींची एकत्र भेट घेईल व त्या परिषदेत अंतिम निर्णयाबद्दल सूचनाच्या बाबतींत जास्तींत जात एकमत या दोन्हीं घटकाचें करण्याचा प्रयत्न होईल. तेथें एकमतानें मान्य झालेल्या सूचना पार्लमेंटपुढें मांडणें हें सरकारचें कर्तव्य ठरेल. जॉइंट पार्लमेंटरी कमिटीचा कार्यक्रम असा आहे कीं, हिंदी कायदेमंडळाचे व इतर संस्थाचे प्रतिनिधी याच एक परिषद बोलवावी. बिल ज्या वेळीं पार्लमेंटपुढें येईल त्या वेळीं त्या बिलाची छाननी करण्यासाठीं हा परिषदेचा मार्ग जास्त योग्य ठरेल. ही परिषदेची कल्पना पूर्वींच लक्ष्यात होतीच आणि सर जॉन सायमन यांनीं मला ता. ६ फेब्रु. १९२८ रोजीं पाठविलेल्या पत्रांतही तिचा उल्लेख आहेच. परंतु

कमिशनचें असें मत आहे कीं, जॉ. पा. कमिटीपूर्वी कमिशननें सुचविलेली परिषद बोलविण्याची जरुरी आहे. त्यांचें ध्येय हिंदुस्थानात स्वयंसिद्ध संस्थेचा हळूहळू विकास करणें असें आहे व हिंदुस्थान हा ब्रिटिश साम्राज्याचा एक घटक व्हावा अशा धर्तीच्या जबाबदार राज्यपद्धतीची पायरीपायरीनें प्राप्ति व्हावी असा त्यात हेतू आहे.

मी आताच सांगितल्याप्रमाणें बादशहाकडून मिळालेल्या सूचनापत्रकामध्यें असें स्पष्ट नमूद केलें आहे कीं, पार्लमेंटनें १९१९ सालीं आखलेल्या योजने- प्रमाणें ब्रिटिश हिंदुस्थानला साम्राज्यातील वसाहतीचा दर्जा प्राप्त व्हावा अशी बादशहाची इच्छा आहे. साम्राज्य सरकारच्या प्रधानांनीं असें अनेकदा जाहीर केलें आहे कीं, हिंदुस्थाननें वसाहतीच्या बरोबरीचे स्थान योग्य कालमर्यादा पूर्ण होताच मिळवावें अशीच ब्रिटिश सरकारची इच्छा आहे. परंतु १९१९ चे बिल अंमलांत आणताना ब्रिटिश सरकारच्या हेतूचा अर्थ काय केला जाईल याबद्दल हिंदुस्थानात व इंग्लंडमध्यें सुद्धा पुष्कळ संशय व्यक्त केले जातात. त्या संशयाचें निराकरण करण्यासाठीं मी अधिकारपूर्वक बादशाही सरकारच्या वतीनें असें जाहिर करतों कीं, वसाहतीचा दर्जा प्राप्त होणें हेंच हिंदी शासन- पद्धतीच्या सुधारणाचें अंतिम पर्यवसान आहे. असाच स्पष्ट अर्थ १९१७ च्या जाहीरनाम्यांत आहे असें आमच्या न्यायबुद्धीस वाटत आहे.

वरील मजकूर ३१ आक्टोबर रोजीं जाहीर करण्यात आला व २४ तासाच्या आंत प्रसिद्ध पुढारी दिल्लीस जमा झाले. त्यात पं. मालवीय, सर टी. बी. सप्रु डॉ. बेझंट याही व्यक्ति होत्या. कॉंग्रेसची वर्किंग कमिटी अर्थात् हजर होतीच. पूर्ण विचार करून या मिश्र संमेलनानें आपला निर्णय एका जाहीरनाम्याच्या द्वारें प्रसिद्ध केला.

हिंदुस्थानच्या आकांक्षाना अनुसरून जी वसाहतीची शासनपद्धति तयार कर- ण्याचे बादशाही सरकारचे प्रयत्न चालू आहेत त्यांत आम्ही मनःपूर्वक सहकार्य करण्याची आशा करतो. परंतु देशातील प्रमुख राजकीय पक्षामध्यें विश्वास उत्पन्न करण्यासाठीं त्यांचें सहकार्य मिळविण्यासाठीं कांहीं गोष्टी करणें व कांहीं मुद्दे स्पष्ट करणें जरूर आहे असें आम्हास वाटतें.

नियोजित परिषदेचें कार्य यशस्वी होण्यासाठीं खालील गोष्टी अत्यावश्यक आहेत असें आम्हास वाटतें.

(१) जास्त शांत वातावरण उत्पन्न करण्यासाठीं सर्वसाधारणतः सहानु-भूतीचें राजकीय धोरण स्वीकारावें.

(२) राजकीय कैद्यांची मुक्तता व्हावी.

(३) प्रगतिपर राजकिय संस्थांचे प्रतिनिधित्व यशस्वी रीतीनें मिळावयास पाहिजे व राष्ट्रीय सभा ही त्या संस्थेंत अतिशय मोठी असल्यामुळें तिला प्रामु-ख्यानें प्रतिनिधित्व मिळालें पाहिजे.

(४) वसाहतीच्या दर्जाबद्दल बादशाही सरकारच्या वतीनें जो जाहीरनामा व्हाइसरॉयनीं प्रसिद्ध केला आहे, त्यातील एका पॅरिग्राफच्या अर्थाबद्दल संशय व्यक्त केला जात आहे. वसाहतींचें स्वराज्य केव्हा स्थापावें याची चर्चा करण्या-साठीं ही परिषद होणार नसून वसाहतीची शासनपद्धति हिंदुस्थानसाठीं तयार करणें हा परिषदेचा हेतु आहे, अशी आमची समजूत आहे. व्हाईसरॉय साहेबाच्या जाहीरनाम्याचा असा अर्थ करण्यात आमची कांहीं चूक होत नसेल अशी आशा आहे. नवीन शासनपद्धति अंमलात येईपर्यंत प्रचलित शासनपद्धतींत जास्त औदार्याचें धोरण दाखविणें अत्यंत जरूर आहे असें आम्हांस वाटतें. तसेच येत्या परिषदेच्या दृष्टीनें कार्यकारी मंडळ (एक्झिक्युटिव्ह) व कायदेमंडळ यांचें संबंध जास्त सलोख्याचे करावयास पाहिजेत. आणि शासनविषयक पद्धतीकडे व त्याच्या अंमलबजावणीकडे जास्त कळकळीनें पाहणेंही जरूर आहे. अगदीं आजपासून नवयुगास सुरुवात झाली आहे असें लोकास वाटूं लागणें अत्यंत जरूर आहे, आणि अशीही भावना लोकात उत्पन्न झाली पाहिजे कीं, नवीन शासनपद्धीत म्हणजे आजपासून बदललेल्या शासनपद्धतीची फक्त नोंद होणें आहे.

शेवटीं परिषदेचा हेतु सफल होण्यासाठींच ती शक्य तितक्या लवकर बोलावणें ही फार आवश्यक गोष्ट आहे असें आम्हास वाटतें ! !

नवीन धोरण निश्चित ठरविण्याचें हें कार्य मजूरपक्षाच्या विशाल दृष्टिकोना-मुळेंच घडून आलें होतें. सर जॉन सायमन यांनीं मुख्य प्रधानाना पत्र लिहून 'आपला रिपोर्ट प्रसिद्ध झाल्यानंतर एक परिषद भरवावी. त्या परिषदेंत शक्य तितकें एकमत व्हावें आणि तें पार्लमेंटला सादर करावें असें म्हटले होतें. या पत्राचा उल्लेख व्हाईसरॉयच्या खुलाशांत आहे. हे शब्द १६ आक्टो. १९२९ या दिवशीं लिहिले होते आणि हेच शब्द व्हाइसरॉयनीं केवळ आपल्या पत्रकांनच

नव्हे तर नंतर केलेल्या जाहीर भाषणातसुद्धां वेळोवेळीं उद्गारले होते. हें लक्ष्यात घेतलें म्हणजे आपल्या सहज लक्ष्यांत येईल कीं हिंदी मताचा दृढभाजक मान्य न करतां कॅबिनेटनें लघुत्तमच पार्लमेंटला सादर केला.

म्हणूनच जेव्हा नवयुगाची जाणीव लोकाच्या तात्काल अनुभवास आणावी व नवी घटना म्हणजे फक्त त्याची नोंद असावी असे पुढाऱ्यांनीं सुचवलें, त्यावेळीं पुढाऱ्यानीं आपल्या जाहीरनाम्यात या सूचनाच्या द्वारें आपल्या मनांतील जबरदस्त भीतीच व्यक्त केली होती. यांतली कमीत कमी गोष्टही सरळपणें परिषदेंतून निष्पन्न होईल अशी त्या सभेस हजर असलेल्या कॉंग्रेस सभासदाची अपेक्षा नव्हती. राजकीय कैद्याच्या मुक्ततेच्या बाबतींत वास्तविक कांहींच घडून आलें नाहीं. पंजाब जेल कमिटीनें १९१९ च्या लष्करी कायद्याचे कैदी सोडण्याबद्दल शिफारस केली होती; तसेंच १९१५ च्या लाहोर कटांतील कैद्यानाही मुक्त करावें असें सुचवलें होतें. मि. फेन्नर ब्रॅकवे यांनीं श्री. सांबमूर्ति याच्या सुटकेसंबंधीं कॉमन्स सभेंत प्रश्न विचारला होता. परंतु या बाबतींत सरकारने कांहींही हालचाल केली नाहीं. हिंदुस्थानच्या सहाय्यार्थ मजूरपक्ष जे प्रयत्न करीत आहे त्याला दुजोरा मिळावा अशा तारा मध्यंतरी गांधींना इंग्लिश मित्राकडून येत होत्या. त्याना उत्तरादाखल गांधींनीं लिहिलें कीं, सहकार्यासाठीं मी तळमळत आहे. पुढें गांधींनीं लिहिलें कीं, सहकार्यासाठींच मी मिळालेल्या पहिल्या संधीला पुढें आलों. परंतु कलकत्ता कॉंग्रेसच्या प्रसिद्ध ठरावाप्रमाणेंच संयुक्त जाहीरनाम्यातीलही (Joint manifesto) प्रत्येक शब्द मला खरा व्हावयास पाहिजे आहे. तो ठराव व हा जाहीरनामा यात काडीइतकाही विरोध नाहीं. एखाद्या ठरावपत्रकातील हेतु जर सिद्धीस नेला तर त्या पत्रकाचे शब्द हे मुळींच महत्वाचे नसतात. जर मला खरोखरच प्रत्यक्ष कृतींत वसाहतीचा दर्जा मिळत असेल तर त्या वसाहत शास्त्रपद्धती-साठीं थांबण्यासाठीं माझी तयारी आहे. याचाच अर्थ असा कीं, जर खरोखरच मनें शुद्ध होऊन अंतःकरणात पालट झाला असेल, हिंदुस्थान स्वतंत्र व स्वाभि-मानसंपन्न झालेला पहाण्याची जर ब्रिटिश लोकाची खरोखर इच्छा असेल, आणि हिंदुस्थानातील नोकरशाहीला हिंदुस्थानात खरा सेवाधर्म आचरावा असें मनापासून वाटत असेल तर मी अद्याप वाट पहाण्यास तयार आहे. परंतु चाल-लेल्या प्रकाराचा अर्थ मला असा वाटतो कीं आता लोकाच्या संमतीनें पोलादी संगिनींचा पहारा उभा केला जाणार आहे! आपल्या जीविताच्या व संरक्षणा

संरक्षणासाठीं तोफा डागलेल्या किल्ल्याचा आश्रय घेण्याऐवजीं हिंदी लोकांच्या सदिच्छेवर विसंबून रहावयास ब्रिटिश स्त्रीपुरुष तयार आहेत काय ? तशी त्यांची तयारी झाली नसेल तर कोणत्याही वसाहतीच्या स्वराज्यानें माझें समाधान होणार नाहीं. मला वाटलें तर ब्रिटिशांशीं संबंध तोडण्याचें सामर्थ्य वाटेल त्या क्षणीं माझ्यात यावें एवढीच माझी वसाहतींच्या स्वराज्याची एकमेव कल्पना आहे. म्हणून ब्रिटिश जनता व हिंदुस्थान यांचे संबंध ठरविणाऱ्या योजनांच्या बाबतींत सक्तीची भाषा अगदीं असंभवनीय आहे.

जर मी ब्रिटिश साम्राज्यात राहण्याचें पत्करलें तर तें जगात शांतता व सदिच्छा याचा प्रसार करण्याच्या सामर्थ्यात भागीदार होण्यासाठीं पतकरीन. लुटीसाठीं किंवा ज्याला इंग्लंडचे साम्राज्यशाहीचें ब्रीद म्हणतात त्याचा प्रसार करण्यासाठीं पतकरणार नाहीं.

मी वर उल्लेखिलेले विचार कदाचित् मजूरपक्षाच्या कधीं मनातही नसतील. हे विचार व्यक्त करताना मी जाहीरनाम्याच्या अर्थाची ओढाताण केली आहे असें मला वाटत नाहीं. परंतु हा अर्थ जाहीरनाम्यांत असला किंवा नसला तरी माझी मूळ भूमिका स्पष्टपणें समजून घेणें हें माझ्या ब्रिटिश व हिंदी मित्रांचें कर्तव्य नाहीं काय ?

येथें नुसती जातां जाता दाखविलेली भूमिका धारण करण्याइतकें सामर्थ्य हिंदुस्थानांत अद्याप आलें नाहीं याची मला जाणीव आहे. म्हणून आज जर ती भूमिका प्राप्त होत असेल तर ती ब्रिटिश लोकांच्या कृपेनेंच बहुतांशीं प्राप्त होईल. तेव्हां आज ही भूमिका व्यक्त करून नंतर मागें हिंदुस्थानात केलेल्या अन्यायाच्या क्षालनाची तयारी त्यांनीं सुरू केली तर त्यात आश्चर्य वाटण्यासारखें कांहीं नाहीं.

परंतु जर आपलें स्वत्व प्रकट करण्याइतकी तयारी हिंदुस्थानची अद्याप झाली नसेल तर त्या काळापर्यंत थांबण्याइतका धीर माझ्या ठिकाणीं आहे. दुसऱ्या कोणत्याही ध्येयासाठीं मी जगूं शकत नाहीं व श्रम करूं शकत नाहीं. माझे शब्द हे केवळ व्यक्तिमात्राचे शब्द आहेत याचीही मला जाणीव आहे. ते शब्द किती प्रमाणात लक्षावधि हिंदु लोकाचे प्रतिनिधि आहेत हें कोणास सांगतां येणार नाहीं. मला तर तें सांगणें खास शक्य नाहीं.

व्हाइसरॉयच्या जाहीरपत्रकात हिंदी लोकांना फारच थोड्या गोष्टी देऊं केल्या

लिहीत होते व लॉर्ड अर्विनना लाहोर कॉंग्रेसपूर्वी काहीं तरी निश्चित हालचाल करण्यास आग्रह करीत होते. कारण तसें झालें म्हणजे हिंदी राजकारणातील पुढाऱ्याना लाहोरला हात हालवीत जावें लागले नसतें १५ तारखेस मला भेटा असें आमंत्रण डॉ. सप्रूंच्या हातीं लॉर्ड अर्विन यांनीं पं. मोतीलालना पाठविलें होते "परंतु लखनौ येथील आपल्या व्यवसायाच्या कामामुळें ता. १५ च्या सुमारास पंडीतजींना जाता आलें नाहीं. मि. वुइल्सन यांनीं वृत्तपत्रांतून जाहीर केले कीं, लवकरच व्हाइसरॉय, गाधी, पं. नेहरू, व पं. मालवीय याची भेट घेणार आहेत. १५ तारखेस किंवा त्या सुमारास व्हाइसरॉय दक्षिण हिंदुस्थानच्या दौऱ्यावर निघणार होते. त्यानीं डॉ. सप्रूंना कळवले कीं, मी २३ डिसेंबरला गाधी व नेहरू याची दिल्लीस भेट घेईन . त्यापूर्वी दक्षिण हैद्राबाद येथें शक्य झाल्यास भेटेन, परंतु काहीं झालें तरी नाताळपूर्वी तर खास भेट घेईन. लॉर्ड अर्विन २३ डिसेंबरला परत आले आणि गाडी नव्या दिल्लीपासून एक मैलावर असता जुन्या किल्ल्याजवळ त्याच्या गाडीला बॉंबचा धक्का बसला. तो बॉंब घड्याळातील यंत्रयोजनेशीं जोडला होता. ते स्वत. फार थोडक्यात बचावले परंतु त्याचा भोजन व्यवस्थेचा डबा मोडला व एका नोकरास दुखापत झाली. त्या धोक्याचा लॉर्ड अर्विनच्या मनावर चागलाच परिणाम होणे अगदीं स्वाभाविक ठरलें असतें. त्या दिवशीं म्हणजे २३ डिसें. १९२९ रोजीं व्हाइसरीगल लॉज मध्यें व्हाइसरॉय रहावयास गेले त्याच दिवशीं गाधीं व मोतिलाल कॉंग्रेसच्या वतीनें त्याची भेट घेणार होते.

दुसऱ्या पक्षाचीं मतें माडण्यासाठीं जीना, सप्रू व विठ्ठलभाई हेही तेथें होते. मनमोकळेपणानें बोलणेंचालणें होईल अशी अपेक्षा होती तेथें फक्त व्यावहारिक शिष्टाईचेंच काम झालें ! तरी लॉर्ड अर्विन अत्यंत आनंदी मनःस्थितीत होते. सकाळीं झालेल्या प्रसंगामुळें त्याचें मन अस्थिर झालें नव्हतें. पाहुण्याशीं वागताना त्यानीं दाखवलेल्या कळकळीमुळें त्याचें व्यक्तित्व जास्तच उदार भासलें. १९२७ च्या नोव्हेंबरमध्यें गाधींना सायमन कमिशनचें वृत्त जाहीर करताना त्यानीं जो रुक्षपणा दाखवला तो त्या दिवशीं मुळींच नव्हता. बॉंब व त्याचा परिणाम या विषयाच्या बोलण्यात ४५ मिनिटें गेलीं. नंतर लॉर्ड अर्विन यानीं प्रस्तुत विषयास हात घातला. त्यानीं विचारलें कोणच्या प्रश्नापासून आपण सुरवात करू या ? हा पहा तुमचा मॅनिफेस्टो. राजकीय बंदिवानापासून सुरुवात करा

यची ? मुलाखतीस योग्य सुरवात करावी अशी त्याची कळकळ दिसली व राजकीय कैद्याच्या प्रश्नापासून सुरवात करून आपल्या सदिच्छेबद्दल त्यांनीं पुरावाच दाखवला.परंतु व्हाइसरॉयना वसाहतीचे स्वराज्य या प्रश्नाकडे न्याव-याचें अशी गांधींची इच्छा होती. गोलमेज परिषदेचें काम वसाहतीचे संपूर्ण स्वराज्य हे धोरण ठरवूनच चालेल असे आश्वासन गांधींना पाहिजे होते. व्हाइस-रॉयनीं उत्तर दिलें कीं, सरकारनें आपला दृष्टिकोन आपल्या पत्रकात स्पष्ट केलाच आहे आणि यापेक्षा जास्त अभिवचन देता येत नाहा. गोलमेज परिष-देस आमंत्रण देताना वसाहतीच्या स्वराज्याचें स्पष्ट अभिवचन देणें शक्य नाहीं असें व्हाइसरॉयनीं सांगितलें.

लाहोरला जात असताना वाटेंतच बातमी कळली कीं, व्हाइसरॉयच्या गाडीखालीं बॉम्ब फुटला व व्हाइसरॉयच्या बंगल्यावर आशेचा भोपळा फुटला. पुढें दिसणाऱ्या भविष्यकाळात होणाऱ्या दारुण युद्धासाठीं निश्चय करण्यास सुरवात झाली. हिवाळ्याच्या मध्यकालीं उत्तर हिंदुस्थानात झोंबणाऱ्या वाऱ्यात झालेली शेवटची बैठक म्हणजे लाहोरची होय. उत्तर हिंदुस्थानातलि थंडीची ज्याना माहिती नव्हती त्याच्यासाठीं राहण्याची सोय लाहोरच्या व्यवस्थेंत नव्हती. तंबूतला मुक्काम अतिशय जाचक झाला. वर्किंग कमिटींत आम्हाला आमचे पाय वारंवार शेकावे लागत होते. बाहेर असह्य थंडी होती. परंतु अंतःकरणातील ऊब, भावनेची,व संतापाची उष्णता, सभेटाच्या अपयशा-मुळें आलेली चीड आणि युद्धाची नौबद ऐकतांना चेहऱ्यावर चढणारी लाली या सर्व गोष्टींनीं वातावरणाशीं फार रम्य विरोध उभा केला होता ! त्या क्षणीं अत्यंत लोकप्रिय तरुण राजकीय पुढारी असे पंडित जवाहरलाल होते ! ते सव विधमान पुढाऱ्यातही सर्वात तरुण होत्ते. आपल्या भाषणात त्यांनीं देशासमोर आपलें अंत.करण ओतलें. आणि हिंदुस्थानात चाललेल्या अपमानाच्या पर्वत-प्राय ढिगाऱ्यावर त्यांनीं आपला संताप झाडला. स्वातंत्र्याच्या आपल्या योजना, आपलीं समाजसमतावादाची स्पष्ट ध्येयें व विजयाबद्दल अचल निर्धार -हीं त्यांनीं व्यक्त केलीं.

लाहोरची कॉंग्रेस म्हणजे एक उकळती कढई होती. दिवसेंदिवस बंदिवाना-ची संख्या वाढत होती त्यामुळें पेटलेल्या देशप्रेमाच्या धगीवर हजारों ध्येयें व कल्पना तेथें रसरसत होत्या. मि. बेन यानीं डिसेंबरच्या तिसऱ्या आठ-

वक्त्यांत जाहीर केलें कीं, हिंदुस्तानच्या मतांच्या स्पष्ट निर्वेध उत्तराची नुसती अपेक्षा आहे इतकेंच नव्हे तर तें या स्थितींत अत्यंत उपयोगी ठरणार आहे. परंतु या विधानानें हिंदी भावनावर कांहीही परिणाम झाला नाहीं किंवा दडपशाहीच्या धोरणांतही काहीं उतार झाला नाहीं. वसाहतीच्या स्वातंत्र्या-बद्दल सागायचें तर मि. वेन हे जगास पटवीतच होते कीं, एक शतकापासून हिंदुस्थानात वसाहतीचें स्वराज्य सुरू आहे. व्हर्सेलिसच्या तहनाम्यावर हिंदु-स्थानची सही, हायकमिशनरच्या जागीं हिंदी माणसाची नेमणूक, राष्ट्रसंघांमध्यें हिंदुस्थानच्या प्रनिनिधींत एका हिंदी गृहस्थाचें नेतृत्व, आतरराष्ट्रीय आरमार कमिशनपुढें हिंदुस्थानचें स्वतंत्र मत, वसाहतीच्या कायदेमंडळ कान्फरन्समध्यें आणि पाच राष्ट्राच्या आरमार परिषदेंत हिंदुस्थानचें सहकार्य, आणि आतरराष्ट्रीय मजूर संघाच्या नियामक मंडळात हिंदुस्थानला एक जागा या सर्व गोष्टी हिंदुस्थानात वसा-हतीचें स्वराज्य चालूच आहे या घोषणेला आधार म्हणून पुढें करण्यात आल्या.

परंतु अशा बाहुलीच्या खेळानें लोक फसले नाहींत. त्याना निर्घृण परि-स्थितीशी तोंड द्यावयाचें होतें व वर्तमानकाळांत उद्भवलेल्या मुद्याची व्यवस्था करावयाची होती.

लाहोर येथें खालील गोष्टीवर सर्व वादविवाद केंद्रीभूत झाले होते.

दिल्ली मॅनिफेस्टोला मान्यता द्यावी काय ?

व्हाइसरॉयच्या सद्धेतूचें गुणग्रहण करावें काय ? "हल्लीच्या परिस्थितींत" हे शब्द ठरावात राहूं द्यावेत काय ? आपलें ध्येय नुसत्या स्वराज्य या शब्दाचा असा असा अर्थ होतो एवढ्याच शब्दानीं व्यक्त करण्याऐवजी ध्येयाची भाषा बदलावी काय ? कौन्सिलवर बहिष्कार घालावा काय आणि जर बहिष्कार ठरला तर युनिव्हर्सिटी, सभा, पोर्टट्रस्ट, शाळा, कॉलेजें, कोर्ट याचाही त्यात समावेश करूं नये काय ? लोकलबोर्डाचा त्यांत समावेश करावयाचा काय ? लोकसत्तात्मक शासनपद्धती आपण आंखावी काय? आपणापुढें आगळेली वस्तुस्थिति लक्ष्यात घेऊन आपण गोलमेज परिषदेस हजर रहावें काय ? किंवा संपूर्ण स्वातंत्र्य हें कॉंग्रेसचें ध्येय जाहीर करण्यापूर्वी दोन महिने आपण वाट पहावी काय ?

आपण सर्वांनी ज्या उज्वल परंपरेचा आस्वाद घेतला त्या परंपरेत आपणांस हे अध्यक्षपद देऊन स्थान दित्याबद्दल पं. जवाहरलाल नेहरु यांनी आपल्या अध्यक्षीय भाषणात आभार मानले. त्या परंपरेचे त्यानी जरा विस्तारानें वर्णन केले व बदलत्या जगाबद्दल ओझरता उल्लेख केला. ते जग प्रसूतिवेदना अनुभावित आहे व त्यांतून एका नवीन पारिस्थितीस तें जन्म देणार आहे. पंडितजी म्हणाले, आजचा हिंदुस्थान जागतिक चळवळीचा इतर पौर्वात्य राष्ट्राप्रमाणेंच एन घटक आहे. परंतु आज तो यातना भोगीत आहे याचें कारण समानतेवर उभारलेली व स्थैर्य व सातत्य यास नेहमी आवश्यक असलेली अशी सामाजिक पुनर्घटना करण्याचें सामर्थ्य हिंदुस्तानात नाहीं. धार्मिक स्वातंत्र्य हा हिंदुस्थानचा एक मोठा विशेष होता. परंतु त्याच्या जागीं भीरुता, अविश्वास व एकमेकाविषयींची संशयग्रस्तता हीं आलीं आहेत. हिंदु, मुसलमान व शीख यांचे सामाजिक व राजकीय संबंध जमविण्याचे प्रयत्न चालू आहेत परंतु सर्वपक्षीय परिषदेंत तयार झालेली योजना वरील पंथाना पसंत पडली नाहीं. व्हाइसरॉयचें जाहीरपत्रक शांततेची आशा दाखविणारे आहे. व्हाइसरॉयचा हेतू शुद्ध होता व त्यानीं वापरलेली भाषा ही तहाची भाषा होती. परंतु आपल्याभोंवतीं असलेल्या कटु वस्तुस्थितीची भरपाई शांततेच्या सौम्य शब्दप्रयोगानीं कधींच होत नसते. आपण अद्याप राष्ट्रीय युद्धाच्या रणभूमीवर उतरलों नाहीं. विचारविनिमयाच्या वाटा अद्याप मोकळ्याच आहेत. कॅ. वेजवुडचे ' वसाहतीचे प्रत्यक्ष स्वराज्य' हें एक आपल्याभोंवतीं जाळें पडलें आहे. कलकत्ता कॉंग्रेसचा ठराव हाच एक आपला ठराव आहे व स्वातंत्र्य हेंच आपलें एकमेव ध्येय नाहीं.

अध्यक्षानी ब्रिटिश साम्राज्यशाहीबद्दलही काहीं गोष्टी सांगितल्या व असे स्पष्ट विधान केले कीं, मी स्वतः समाजसत्तावादी व लोकसत्तावादी आहे व राजे व संस्थानिक याच्यावर माझी काडीइतकीही श्रद्धा नाहीं. नंतर आपल्या पुढें असलेल्या महत्त्वाच्या तीन प्रश्नाबद्दल चर्चा केली. हिंदी संस्थानें, मजूर व शेतकरी व अल्प संख्याक समाज हे ते प्रश्न होते. नंतर त्यांनीं अनत्याचाराच्या प्रश्नाची छाननी केली. अत्याचारानें ही पुष्कळ वेळा प्रतिक्रिया व नैतिक अधःपात हीं लागोपाठ घडून येतात. आणि विशेषतः आपल्या देशात अत्याचाराचें पर्यवसान बेबंदशाहीतच होणार. संघटीत अत्याचाराचा आज जगावर

अंमल चालला आहे व कदाचित् त्याचा अवलंब करून आपलाही फायदा होणें संभवनीय आहे हेंही खरें असेल. परंतु आपल्या जवळ अत्याचाराचीं साधनें नाहींत किंवा सनदशीर अत्याचाराचें शिक्षणही नाहीं, आणि वैयक्तिक किंवा प्रासंगिक अत्याचार ही निराशेची कबुली आहे. मी असे गृहीत धरतो कीं, आपल्यापैकीं बहुतेकजण या प्रश्नाची उपयुक्तता नैतिक दृष्टीनें न ठरवतां व्यवहारिक दृष्टीनेच ठरवतात आणि आपण अत्याचाराला नकार देतो ते सुद्धा त्यापासून काहीं भरीव फायदा होण्याचा संभव वाटत नाहीं म्हणूनच. स्वातंत्र्याची कोणचीही चळवळ ही निश्चयेंकरून बहुजनसमाजाचीच चळवळ असावयास पाहिजे व संघटित क्रांतीचा काळ असला तर ती सामुदायिक चळवळ शांतताप्रधान असणें जरूर आहे.

अशा रीतीनें अनत्याचार हें एक धोरण आहे, ध्येय नव्हे किंवा धर्म नव्हे. अशा धोरणानें अनत्याचाराचें स्पष्टीकरण केल्यावर, कौन्सिलबहिष्कार, राष्ट्रीय कर्ज व कॉंग्रेसची पुनर्घटना करणें व ती एक शिस्तशीर संस्था करून कार्यक्षम करणें इत्यादि प्रश्नाकडे अध्यक्ष वळले. या बाबतींत प्रचंड प्रयत्न करण्याबद्दल कळकळीनें विनंति करतांना ते समारोपादाखल म्हणालेः

" आपण काय व केव्हा मिळवूं शकूं हें आपणापैकीं कोणासही सागता येणार नाहीं. यशावर आपण अधिकार गाजवूं शकत नाहीं. परंतु जे धैर्य दाखवितात व कार्य करतात त्यानाच बहुधा यश मिळतें. बहुधा, ' साहसे श्री. प्रतिवसतिः ' जे परिणामाविषयीं घाबरतात, त्या भेदरटांकडे क्वचितच यश वळतें. आपण फार मोठा पैजेचा डाव टाकला आहे आणि जर महान् गोष्टी मिळविण्याचे आपले प्रयत्न असतील तर त्या गोष्टी महान् संकटातूनच प्राप्त करून घ्याव्या लागतील. "

मद्रास कॉंग्रेसचा ( १९२७ ) स्वातंत्र्याविषयींचा जो ठराव होता तो शासनपद्धतीच्या ध्येयाचा एक भाग म्हणून मान्य करावा. ध्येयाचे स्पष्टीकरण म्हणून मानावा हा लाहोर कॉंग्रेसपुढें प्रश्न होता. या प्रश्नाविषयीं अध्यक्षीय भाषणात कांहीं मननीय विचार आहेत ते असेः--

स्वातंत्र्याचा आपला अर्थ ब्रिटिश बमाहती व ब्रिटिश साम्राज्यशाही यांपासून पूर्ण मुक्तता असा आहे. आपण आपलें स्वातंत्र्य मिळविल्यावर जागतिक सहकार्याचे व संघटनेचे सर्व प्रयत्न हिंदुस्थान मोठ्या आनंदानें स्वागत-

पूर्वक मान्य करील यांत मला मुळींच शंका वाटत नाही. इतकेंच नव्हे तर ज्या मोठ्या विश्वसंघाचा हिंदुस्थान हा एक घटक आहे त्यांतील एकाद्या मोठ्या घटकाच्या कल्याणासाठीं हिंदुस्थान आपल्या स्वातंत्र्याचाही एकादा हिस्सा सोडण्यास तयार होईल." पुढें अध्यक्ष म्हणाले:

" साम्राज्यशाही व तत्सम अशा सर्व गोष्टी झुगारून दिल्याखेरीज हिंदुस्थानला कॉमनवेल्थमध्यें समान दर्जाचा घटक होता येणार नाहीं."

खरी वस्तुस्थिति कळण्याकरिता अध्यक्षीय भाषणातले इतर भाग उपयोगी ठरतील म्हणून काहीं उतारे दिल्यास अप्रस्तुत होणार नाहीं.

'सत्ता जिंकणे ही मुख्य गोष्ट आहे. मग त्या सत्तेला काहींही नांव असो. वसाहतीच्या स्वराज्याच्या कोणत्याही प्रकारानें हिंदुस्तानच्या हातीं खरी सत्ता येणार नाही असें मला वाटतें परकीय कायम सैन्य व परकीय आर्थिक सत्ता हीं येथून पूर्णपणें दूर करणें ही या सत्तेची कसोटी होऊं शकेल म्हणून आपण या गोष्टींवरच सामर्थ्य एकवटूंया आणि मग बाकीच्या बाबी आपोआप मागोमाग येतील."

हिंदुस्थानचे पुढारी गांधी व त्या सालचे अध्यक्ष जवाहरलाल यांचे या विचाराचे बाबतींत मतैक्य होतें त्यामुळें लाहोर कॉंग्रेसच्या कामकाजाच्या बाबतींत काहींहीं अडचणी नव्हत्या. जतींद्रनाथ दास व श्री. विजय यांच्या महान् आत्मार्पणाबद्दल अभिनंदन व्यक्त केल्यावर व पंडित गोकर्णनाथ मिश्र, प्रो. शि. म. परांजपे, श्री भक्तवत्सल नायडू, रोहिणीकांत हतिबरुआ, आर. के. लाहिरी व व्योमकेश चक्रवर्ति यांच्या मृत्यूबद्दल दुःख प्रदर्शन केल्यावर नुकत्याच झालेल्या बॉंब अत्याचाराबद्दल खालील ठराव मांडण्यात आला.

व्हाइसरॉयच्या गाडीवर झालेल्या बॉंबफेकीबद्दल ही कॉंग्रेस अत्यंत दुःख व्यक्त करीत आहे आणि असें पुन्हा एकदा निश्चयपूर्वक आपलें मत जाहीर करीत आहे कीं,असले कृत्य कॉंग्रेसच्या ध्येयास विसंगत आहे,इतकेंच नव्हे तर तें राष्ट्रकार्यास विघातक ठरतें. व्हाइसरॉय व लेडी अर्विन आणि त्यांचा गरीब नोकर ज्यात एक होता असे बरोबरचे लोक यांची त्या संकटातून सुदैवानें जी सुटका झाली त्याबद्दल ही सभा त्यांचें अभिनंदन करीत आहे.

राष्ट्रीय सभेचा मुख्य ठराव पूर्ण स्वातंत्र्याविषयींचा होता तो असाः—

व्हाइसरॉयनीं ३१ आक्टोबर रोजीं वसाहतीच्या स्वातंत्र्याविषयींचें जें

जाहीरपत्रक काढले त्यावरून वर्किंग कमिटीनें कॉंग्रेसपक्षीय लोक व इतर पक्षीय लोक अशा सर्वपक्षीय पुढाऱ्याच्या सह्याचा जो जाहीरनामा प्रसिद्ध केला त्यास ही सभा मान्यता देत आहे व स्वराज्यासाठीं चाललेल्या राष्ट्रीय चळवळीस स्थैर्य आणण्याच्या कामीं व्हाइसरॉयनीं जे प्रयत्न केले ते ही सभा साभार नमूद करीत आहे. त्यानंतर झालेल्या सर्व घडामोडी व महात्मा गांधी पं. मोतिलाल नेहरु व इतर पुढारी व व्हाइसरॉय याच्या भेटीची फलश्रुति ही लक्ष्यात घेता कॅाग्रेसचें असें मत आहे कीं, नियोजित गोलमेजपरिषदेस प्रतिनिधि पाठवून प्रचलित परिस्थितींतच काहींही फायदा होण्याचा संभव नाहीं. म्हणून गेल्या वर्षी कलकत्ता येथील बैठकींत पास झालेल्या ठरावास अनुसरूनच कॉंग्रेस असें जाहीर करते कीं, कॉंग्रेसच्या घटनेंतील स्वराज्य या शब्दाचा अर्थ संपूर्ण स्वातंत्र्य असा राहील. कॉंग्रेस आणखी असें जाहीर करते कीं, नेहरू कमिटीच्या रिपोर्टांतील सर्व योजना रद्द झाली आहे व यापुढें सर्व कॉंग्रेसभक्त आपलें सर्व लक्ष्य हिंदुस्थानला संपूर्ण स्वातंत्र्य मिळविण्याच्या कार्याकडे लावतील अशी ही कॉंग्रेस आशा व्यक्त करते. संपूर्ण स्वातंत्र्याच्या मोहिमेची पहिली पायरी म्हणून आणि बदललेल्या ध्येयास शक्य तितकें सुसंगत धोरण आखण्यासाठीं ही कॉंग्रेस सर्व सभासदाना व राष्ट्रीय चळवळींत भाग घेणाऱ्या इतर लोकाना असें बजावीत आहे कीं, त्यांनीं येत्या निवडणुकींत प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष भाग घेऊं नये आणि कायदेमंडळे व कमिटया यांमधील कॉंग्रेस सभासदाना ही कॉंग्रेस असें फर्मावीत आहे कीं, त्यानीं आपापल्या जागाचे राजीनामे द्यावेत. कॉंग्रेसचा भरीव कार्यक्रम कळकळीनें पार पाडण्याबद्दल ही सभा राष्ट्रास विनंति करीत आहे आणि ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटीला ही सभा असा अधिकार देत आहे कीं, त्या कमिटीस योग्य वाटेल त्या वेळीं सविनय कायदेभंगाच्या चळवळीस सुरवात करावी. त्यात करबंदीच्या चळवळीचाही समावेश होतो. न. का. भंगाची चळवळ कांहीं निवडक क्षेत्रात किंवा सार्वत्रिक स्वरूपात करावी. आणि आवश्यक वाटणारें संरक्षण मिळवून या चळवळीस सुरवात करावी."

यानंतर कॅांग्रेसच्या वार्षिक अधिवेशनाचा काल बदलण्यात आला. ज्या अर्थी कॅाग्रेस ही गरीब जनतेची प्रतिनिधि व्हावी असा हेतु आहे व ज्या अर्थी डिसेंबर अखेरीस अधिवेशन भरविल्यानें गरीब लोकाना जादा कष्टे पडतात

व्यवस्था करावी लागून खर्च वाढतो व इतरही कारणासाठीं ते गैरसोईचे होतें त्या अर्थी अधिवेशनाची वेळ फेब्रुआरी किंवा मार्च या महिन्यांत कोणची तरी असावी. यांपैकीं निश्चित वेळ अधिवेशनाच्या प्रांतातील प्रांतिक कमिटीच्या सल्ल्यानें वर्किंग कमिटीनें ठरवावी. ”

घटनेंत वेळोवेळीं आवश्यक ते फरक करण्याचा अधिकार कॉंग्रेसनें वर्किंग कमिटीस दिला.

नेहमींप्रमाणें पूर्व आफ्रिकेबद्दल एक ठराव झाला. स्वतःची बरीच गैरसोय करूनही श्रीमती सरोजिनी नायडू या पूर्व आफ्रिकेस गेल्या. याबद्दल कॉंग्रेसनें त्यांचें अभिनंदन केलें व त्या उपखंडात हिंदी प्रश्नाबद्दल जी राष्ट्रीय वृत्ति पूर्व आफ्रिकेंतील हिंदी लोकानीं दाखविली त्याबद्दल हिंदी लोकांचेही अभिनंदन केलें. जेथें जातिनिष्ठ प्रतिनिधिपद्धति आहे आणि ज्यात विषम अशी मतदानपद्धति आहे किंवा जेथें जमीनदार हिंदी माणसांवर नालायकी लादली जाते अशा कोणच्याही मार्गानें वादग्रस्त मुद्याचा निकाल लावण्याच्या प्रयत्नाने राष्ट्रांचें समाधान होणें शक्य नाहीं असें जाहिरपणे सांगण्यात आले.

नंतरचा महत्त्वाचा विषय म्हणजे हिंदी संस्थानें हा होय. कॉंग्रेसचे असें मत झालें कीं, संस्थानिकानीं यावेळीं आपल्या प्रजेला जबाबदार राज्यपद्धति देणें व आचारस्वातंत्र्य, भाषास्वातंत्र्य व सभास्वातंत्र्य व व्यक्ति व संपत्ति याची सुरक्षितता इत्यादि मूलभूत हक्काचे संरक्षण करणार असे कायदे किंवा जाहीरनामे काढणें अगदीं जरूर आहे.

नेहरू रिपोर्ट रद्द झाल्यानें जातिविषयक प्रश्नांचा पुन्हा एकदा विचार करणें जरूर झालें. कॉंग्रेसनें आपलें जातिविषयक प्रश्नाविषयींचें धोरण जाहीर करणें आवश्यक आहे असें वाटलें. ‘ कॉंग्रेसची अशी भावना आहे कीं, स्वतंत्र हिंदुस्थानात जातिविषयक प्रश्न राष्ट्रीय भूमिकेनेंच सोडवले जातील. परंतु ज्या अर्थी नेहरु रिपोर्टांत दाखविलेली जातिविषयक प्रश्नाची विल्हेवाट विशेषतः शीखाना व सामान्यतः मुसलमान व इतर अल्पसंख्याकाना असमाधानकारक वटलीं त्याअर्थी या कॉंग्रेसनें वरील लोकाना असें आश्वासन दिलें कीं ज्या मार्गांत वरील लोकाचें पूर्ण समाधान होणार नाहीं असा कोणचाही मार्ग कॉंग्रेस स्वीकारणार नाहीं. ”

श्री. शापुर्जी जे सकलातवाला, पार्लमेंटचे माजी सभासद व इंग्लंड व इतर

परदेशात राहणारे आणखी काही लोक यांना परत देशास येण्याचा परवाना नाकरल्यावद्दल कॉंग्रेसनें निषेध केला.

राष्ट्रीय कर्ज व त्याचा इन्कार हा प्रश्न १९२२ सालच्या गया कॉंग्रेसनंतर लाहोरला पुन्हां चर्चेस निघाला. त्या वावतींत असें ठरलें:—

" परकीय सत्तेनें हिंदुस्थानवर प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष रीतीनें जो कर्जाचा बोजा लादला आहे तो असा आहे कीं स्वतंत्र हिंदुस्थानला तो बोजा शिरावर घेणें अशक्य आहे व तो पार पाडण्याची अपेक्षाही हिंदुस्तानच्या वावतींत बाळगता येणार नाहीं. म्हणून १९२२ सालीं गया कॉंग्रेसमध्यें झालेला ठराव पुन्हां एकदां निश्चित करून या प्रश्नाशीं संबंध असलेल्याच्या माहितीसाठीं असें आपलें मत नमूद करतो कीं, कोणच्याही तऱ्हेचें ऋण व सवलती पत्कर-ताना स्वतंत्र हिंदुस्थान त्याची एका स्वतंत्र लवादाकडून चौकशी केल्याखेरीज तीं पत्करणार नाही. आणि जे कोणचेंहि ऋण किंवा सवलती, मग ते कोण-च्याही मार्गानें हिंदुस्थानवर लादलेलें असो जर तें लवादाच्या चौकशींत न्याय्य व समर्थनीय ठरलें नाहीं तर तें दिलेले किंवा घेतलेलें ऋण किंवा सवलत नामंजूर केले जाईल व स्वतंत्र हिंदुस्तान त्याचा इन्कार करील.

वॉंबच्या अत्याचारावरच्या ठरावास बऱ्याचशा अडचणींतून वाट काढावी लागली. प्रतिनिधींच्या एका विभागानें त्या ठरावास तीव्र विरोध केला आणि शेवटीं तो अगदीं थोड्या वहुमतानें पास झाला. मुख्य ठरावाच्या वावतींतही वरेंच विरोध झाले. व्हाइसरॉयच्या प्रयत्नाचें अभिनंदन करण्यावद्दलचे विचार ठरा-वास घालण्यास वराच विरोध झाला. तसेंच या परिस्थितींत गोलमेज परिषदेंत भाग घेण्यात काहीं फायदा आहे असें वाटत नाहीं असें कॉंग्रेसने विधान केलें, त्यावेळींही **"या परिस्थितींत"** या शब्दावर जोरानें आक्षेप घेण्यात आला. चार्लसच्या डोक्याप्रमाणें परिस्थिति वदलली अशा सबवीवर गोलमेज परिषद क्षणोक्षणीं इकडेतिकडे आंदोलनें घेत राहील अशी भीति व्यक्त करण्यात आली. परंतु गांधींनीं वारंवार स्पष्ट केलेंच होतें कीं, त्याचा सर्व असहकार-योग हा सहकारासाठींच आहे व चाललेला सर्व झगडा झगडा मिटविण्या-साठींच आहे. परदेशी वस्त्रबहिष्कार–कमिटी, मद्यपानबंदी–कमिटी व अस्पृ-श्यतानिवारण–कमिटी या तीन समिती कॉंग्रेसच्या मुख्य कामापासून विभक्त करून स्वायत्त करण्याचा प्रयत्न जेव्हां गांधींनीं केला, त्या वेळीं त्यांना गंभीर

मत आपल्या बाजूला वळवतां आलें नाहीं, आणि कॉंग्रेसच्या सभासदांची संख्या मर्यादित करून ती सुटसुटीत करण्याचा त्यांचा प्रयत्नहि यशस्वी झाला नाही.

हें येथें स्पष्ट केलें पाहिजे कीं, वरील समिती या कलकत्ता कॉंग्रेसनंतर फेब्रुवारी १९२९ पासूनच अस्तित्वात आल्या होत्या. त्याचें काम कार्य-कुशल व्यक्तिवर सोपविलें होतें. स्वयंसेवकाची संघटना करण्याचें कार्य पं. जवाहिरलाल व सुभाष बोस यावर सोंपविलें होतें. अशा रीतीनें कॉंग्रेस-च्या कामाची वाटणी करण्याचा व ती कामें वर्किंग कमिटीच्या निरनिराळ्या सभासदावर सोंपविण्याचा हा पहिलाच प्रयत्न होता. परंतु या सर्व समिती ऑल इंडिया स्पिनर्स असोसिएशन (अखिल भारतीय विणकरसंघ) या संस्थेच्या तत्त्वावर उभाराव्यात म्हणजे त्यांना स्वतंत्रपणें काम करता येईल अशी गांधींची इच्छा होती. परंतु त्याच्या सूच-नेबद्दल लोक साशंक होते. कारण पुढारी हा अनुयायापेक्षा नेहमींच दोन पावलें पुढें असावयाचा व त्याची "कालची" तत्त्वें नेहमीं "आज" स्वीकारली जावयाचीं हें नेहमींचेंच आहे. असा आज म्हणजे १९३५ सालीं अस्पृश्यतेचें कार्य हें एकंदर राजकारणाच्या धुळवडीपासून अगदी आलिप्त राहून देशातील राजकीय घडामोडीच्या संसर्गाचा त्याच्यावर काहींही परिणाम न होता तें स्वतंत्रपणें चाललें आहे. तसेंच आज कॉंग्रेसच्या सभासदाची संख्या मुंबईच्या अधिवेशनाच्या वेळच्या संख्येच्या $\frac{1}{3}$ पर्यंत उतरली आहे आणि लाहोरला गांधींना जें मिळवता आलें नाहीं तें काहींसें कारागृहात असताना व काहींसे बाहेर आल्यावर त्यानीं मिळविलेलें दिसत आहे.

राष्ट्राच्या मागण्या कबूल करण्यासाठीं सरकारला कलकत्ता अधिवेशनात एक वर्षाचा अवधि दिला होता आणि ३१ दिसेंबर रोजीं रात्रीं १२ वाजता त्या वादग्रस्त प्रश्नाचा निकाल लागला व अखिल राष्ट्रीय सभेनें त्याक्षणीं संपूर्ण स्वातंत्र्याची घोषणा करून निशाण फडकावलें.

लाहोरचें अधिवेशन जितकें महत्त्वाचें होतें तितकेंच कष्टाचेंही होतें. गांधींच्या विरुद्ध जे लागोपाठ ठराव आले होते ते तात्त्विक अगर विघातक स्वरूपाचे असत. जे संपूर्ण स्वातंत्र्याची कास धरण्याची चिकाटी दाखवीत होते व कोणचाही मूर्खपणा ज्याना नको होता ते कौन्सिलबहिष्कारास मुळींच

तयार नव्हते. त्यांचा असा प्रयत्न होता की मूळ ठराव हाणून पाडावयाचा किंवा त्याचे हातपाय तोडावयाचे आणि अशा रीतीनें त्याला छिन्नविछिन्न करून टाकावयाचे. विरोधकाच्या बाजूस काही संपूर्ण स्वातंत्र्याचे विरोधक होते व ते गोलमेज परिषदेच्या बाजूला उत्साह चढवीत होते. काहीं संपूर्ण स्वातंत्र्याच्या बाजूचे होते तरी वर्किंग कमिटी किंवा व्हाइसरॉय यांच्या संबंधींचा शिष्टाचार त्याना नको होता आणि या मूर्तिभंजन प्रवृत्तीनें कायदेमंडळात जाऊन देशाची सेवा करण्याची त्याची मनीषा होती. या कारणांनीं मुख्य ठरावावर होणारी चर्चा ही एकसूत्रीपणानें किंवा सद्धेतूनें होईनाशी झाली. परंतु मुख्य बैठकीच्या वेळीं मात्र मुख्य ठरावाच्या विरुद्ध फक्त १५ हात उभे होते. व्हाइसरॉयच्या प्रयत्नाचें अभिनंदन करण्याच्या वेळीं दोन्ही बाजूचीं मतें जवळ जवळ सारखीं पडलीं. यावेळीं सुद्धा दोन्ही पक्षांत १८० मताचें अंतर होते आणि बॉम्ब अत्याचाराच्या निषेधाच्या वेळीं फक्त ८४ मतें निषेधाच्या बाजूला जास्त होती. विरोधकात समान भावना होत्या किंवा त्यांची कांहीं श्रद्धा होती अथवा त्यांचा स्वतंत्र कार्यक्रम होता असें नाहीं पण अधिकारी पक्षाशीं तेढ हेंच त्यांच्या विरोधाचें कारण होतें. बंगालमधील निवडणुकीविषयींचे कलह दीर्घकाल ज्या आपआपसांतील दुहीमुळें उत्पन्न झाले त्याच दुहीमुळें मोतिलाल व सुभाषबाबू यांच्यांत कटुशब्दाची वाचावाची झाली व ते मतभेद लाहोरच्या अधिवेशनांत फार स्पष्टपणें दिसून आलें. श्री. सेनगुप्त व सुभाषचंद्र बोस याच्यामध्यें मुख्यतः प्रांतिक पुढारीपणाबद्दल तेढ होती त्यामुळें कौन्सिलप्रवेशाच्या प्रश्नाच्या वेळीं ती तेढ हातघाईवर आली व तीव्र मतभेद उत्पन्न झाले. तसेंच राष्ट्रीय कर्जाच्या प्रश्नाचा विचार स्वतंत्र हिंदुस्थानच्या लवादानें करून त्यातलि योग्यायोग्य कर्जाच्या जबाबदारीचा निर्णय करावा अशी सूचना पुढें करण्यात आली त्यावेळीं सर्वच्या सर्व राष्ट्रीय कर्ज नाकारावें असेंही एककल्ली मत व्यक्त झाल्याखेरीज राहिलें नाहीं. कॉंग्रेसच्या ध्येयवाक्यात शांततापूर्ण व कायदेशीर असे शब्द होते त्या जागीं सत्य व अहिंसात्मक असे शब्द बदलून घेण्याचा गांधींनीं अटोकाट प्रयत्न केला पण तो यशस्वी झाला नाहीं.

तो प्रश्न अद्यापही अनिश्चितच आहे व आक्टो. १९३३ च्या मुंबई अधिवेशनात तो तहकूब झाला. तरीही हाच अगदी नंतर जवाहरलाल व गांधी

यानीं लाहोरला मिळविलेले यश हे केव्हांही नाकबूल करतां येणार नाहीं. लाहोर कॉंग्रेस संपल्याबरोबर श्रीनिवास अय्यंगार व श्री. सुभाषचंद्र बोस यानीं कॉंग्रेस डेमॉक्रॅटिक पार्टी काढली; व त्यामुळें सरकारचा असा समज झाला कीं, विरोधकाना सामील करून घेण्याचा प्रयत्न कॉंग्रेसमध्यें यशस्वी झाला नाहीं व त्यामुळे अशी फूट तात्काल होणें स्वाभाविकच आहे. वरील सद्गृहस्थाचे असें ह्मणणें होतें कीं, वर्किंग कमिटी ही निवडणुकीच्या पद्धतीनें निवडावी आणि त्याचें हें ह्मणणे मान्य झालें नाहीं तेव्हा ते आपल्या काहीं मद्रासी मित्रांबरोबर अधिवेशनातून बाहेर पडले. गांधींची पद्धत नेहमीं अशी असे कीं, वर्किंग कमिटीच्या जुन्या सभासदासच आपलीं नावें कमी करण्यास कोण तयार आहे असें विचारावयाचें. लाहोरला वर्किंग कमिटी निवडली, त्या-वेळीं दोन याद्यावरून सभासद निवडले गेले. एक यादी पंडित मोतिलालनीं गांधींच्या सल्ल्यानें तयार केली व दुसरी यादी श्री. जमनालाल बजाज यानीं तयार केली. एका नावाखेरीज बाकी दोन्ही यादींत तींच नावें होतीं. तो फरक मिटविण्यात आला व वर्किंग कमिटी तयार झाली. परंतु वरील मित्राना निवडणूकच पाहिजे होती. पण तें म्हणणें फेटाळ-ण्यात आलें व त्याचा परिणाम असा झाला कीं, ते एकदम बाहेर पडले ! १० मिनिटाच्या आत ही वातमी सर्वत्र पसरली व नवीन पक्ष स्थापन झाला. कॉंग्रेस डेमोक्रॅटिक पार्टी असें या पक्षाचें नामकरण झाल्याबरोबर श्री. सुभाषचंद्र बोस यानीं खालील मजकुराची तार कै. दे. बं. दास याच्या पत्नीस पाठविली:—

" परिस्थितीमुळें व परिस्थितीच्या जुलमामुळें गयेप्रमाणेंच येथेंही आम्हास नवीन पक्ष स्थापन करणें भाग पडलें. त्याचें नाव कॉंग्रेस डेमोक्रॅटिक पार्टी. देशबंधूंचा पक्षाभिमान आम्हास मार्गदर्शक होवो व आपल्या आशीर्वादानें आम्हास स्फूर्ति मिळो "

वरील पक्षाच्या अधिकृत जाहीरपत्रकात चिटणीसानीं खालील शब्दात आपलें धोरण सांगितले आहे.—

' हिंदुस्थानचें संपूर्ण स्वातंत्र्याचें ध्येय कलुषित होऊं न देता, ते गाठ-ण्याच्या कामीं ज्या चळवळी व धोरणें पक्षास आवश्यक वाटतील त्या बाबतींत इतर पक्षाशींही सहकार्य करण्याचा शक्य तितका प्रयत्न आमच्या पक्षाकडून होईल. '

मुख्य ठरावाच्या विरोधकाना कौन्सिल वहिष्कार मान्य होताच परंतु त्यानीं निवडणूका लढवाव्या व कौन्सिलात जावें असे ठरविले.

लाहोरला मोठें चमत्कारिक गट पहावयास मिळाले व गांधींच्या सामर्थ्या-विषयीं कांहीं जणाना थोडी धास्तीच वाटत होती. पुढील प्रवास खूप वादळा-तून करावयाचा होता याची आम्हास जाणीव होती. आमची नाव तकलुबी होती. समुद्र खवळला होता,आकाशात ढग जमले होते,सर्वत्र धुके पसरलें होतें खलाशी बेशिस्त होते व त्याना कामाचाही अनुभव नव्हता या सर्व गोष्टी आम्ही जाणून होतों. आम्ही फक्त एकाच कारणानें निर्धास्त होतो व तें म्हणजे आमचा कर्णधार आपल्या प्रवासाचा मार्ग पूर्णपणें जाणणारा होता. तो एक अनुभवसिद्ध कप्तान होता व आपला नकाशा व होकायंत्र त्याच्याजवळ सिद्ध होतें. जर खलाशानीं त्याची आज्ञा पाळली तर यश अगदीं हात जोडून उभें होतें. नाहींतर बोट उध्वस्त केल्याबद्दल राष्ट्राच्या न्यायकोर्टाकडून आम-च्यावर लष्करी कायद्याची सुनावणी ठेवलेलीच होती.

---

## प्रकरण ४ थें

## १९३०

तिष्ठत बसण्याचा एक वर्षाचा काल संपवून कॉंग्रेसभक्ताच्या प्रत्यक्ष कार्याचा काल सुरू झाला होता. परंतु ३ आठवडे होतात न होतात तोंच महाराष्ट्रात एक क्रांति झाली. असहकारितेच्या सुरवातीच्या काळात ती चक्र-वक्र थोपवून धरण्याच्या बाबतींत महाराष्ट्रानें बंगालशीं कसें सहकार्य केलें होतें तें आपण पाहिलेंच;।आतां महाराष्ट्र प्रा.कॉ.कमिटीनें कौन्सिल बहिष्काराचा अट्टाहास करूं नये असें वर्किंग कमिटीस सुचवून संपूर्ण स्वातंत्र्याच्या भूमिकेनें व दिल्ली कराराप्रमाणें गोलमेज परिषदेस जाण्याची त्वरा करणें जरूर आहे असे जनतेस सांगितले. वास्तविक या गोष्टींचा मोक्षमोक्ष कायमचा झालेलाच होता. राज-कीय कैद्यांची मुक्तता करून व ठरावाच्या दिवसापासून देशात वसाहतींच्या स्वातंत्र्याचें वातावरण उत्पन्न करून सरकारनें आपल्या चित्तात पालट झाल्याचें दाखवावयास पाहिजे होतें. तसें झाले नव्हतें तेव्हां दिल्लीच्या जाहीरनाम्याच्या

अर्थ उरला होता ? व्हाइसरॉयशीं २३ डिसेंबर १९२९ रोजी झालेल्या मुलाखतीच्या वेळीं राजकीय कैद्याच्या मुक्ततेच्या प्रश्नाची चर्चा करण्याचें गांधींनीं नाकारलें होतें. राजकीय कैदी आणखी कांहीं दिवस तुरुंगात धीर धरूं शकतील असें गांधी म्हणाले होते. वसाहतींच्या स्वराज्याच्या प्रश्नावरच त्यांचे सर्व लक्ष होतें आणि त्या बाबतींत तर व्हाइसरॉय या नात्यानें आपण कांहींही आश्वासन देत नाहीं असे त्यांनीं सांगितलें. व्हाइसरॉयकडून असें आश्वासन घेण्याचा गांधींनीं आग्रह का धरला हें कळणें हितावह होईल. १९२५ सालीं, लॉर्ड बर्कनहेड ( भारतमंत्री ) हे सहकार्याची वाटाघाट करण्यासाठीं दास व गांधी यांना लंडनला बोलावण्याच्या विचारात आहेत काय असें मि. लान्सबरी यांनीं विचारलें. त्यास नकारात्मक उत्तर देताना अर्ल विंटरटन दुय्यम भारतमंत्री यांनीं खालील कारणें दिली.

हिंदुस्थानातलि शासनपद्धति व धोरण यांची प्रत्यक्ष अंमलबजावणी करण्याचें कार्य हिंदुस्थानसरकार व प्रांतिक सरकार यावर सोपवलें होतें हें एक कारण झालें. म्हणून अशा तऱ्हेची चर्चा ही त्या अधिकाऱ्यांशीं करावयास पाहिजे. ज्या गोष्टी ( साम्राज्य ) सरकारकडे शेवटच्या निर्णयासाठीं येणारच व ज्या निर्णयासाठीं साम्राज्य सरकार पार्लमेंटला जबाबदार आहे. त्या गोष्टींमध्यें यावेळीं हात घालून व ढवळाढवळ करून कांहीं फायदा होणार नाहीं. दुसरें कारण असें कीं, इतर कारणाबरोबरच हिंदुस्थानातील राजकीय परिस्थितीची चर्चा करण्यासाठींही येथें येण्याचा व्हाइसरॉयचा बेत होता;तरी त्याच्या येथील मुक्कामातच हिंदुस्थानातील राजकीय पक्षांशीं वाटाघाट केल्यानें व्हाइसरॉय व हिंदुस्थान सरकार यांच्या विचित्र परिस्थितींत भर टाकल्यासारखें होईल.

व्हाइसरॉयनीं सर्व परिस्थितीचें सूत्र आपल्या हातीं ठेवलें होतें व २३ डिसेंबर १९२९ च्या दिल्ली येथील मुलाखतींत तें सूत्र आपल्या हातीं घ्यावयाचा गांधींचा प्रयत्न होता.

नव्या वर्किंग कमिटीची बैठक २ जानेवारी १९३० रोजीं झाली. कॉंग्रेसचा कायम चिटणीस नेमण्याच्या कामासुद्धा सर्व महत्त्वाचीं कामें जुन्या वर्किंग कमिटीनें उरकलीं होतीं. जेव्हा नव्या कमिटीची बैठक झाली तेव्हा पहिली गोष्ट तिनें जी केली ती म्हणजे कौन्सिल बहिष्काराचा ठराव अंमलात आणण्याबद्दलची खटपट ही होय. कॉंग्रेसची विनंति जे उमेदवार मानणार नाहींत त्यांना राजी-

नामे द्यावयास भाग पाडण्याची व पुढील कायदेमंडळाच्या निवडणुकीपासून अलिप्त राहण्याची आग्रहाची विनंति मतदाराना वर्किंग कमिटीनें केली. ह्याचा परिणाम असा झाला कीं असेंब्लीच्या २७ सभासदांनीं राजिनामे दिले. पूर्ण स्वराज्य दिन ( स्वातंत्र्य दिन ) म्हणून २६ जाने १९३० हा दिवस सर्व हिंदुस्थानभर साजरा करावा असें ठरलें.

त्यावेळीं लवकरच प्रसिद्ध होणारें पत्रक खेडोपाडीं व शहरोंशहरीं लोकाना वाचून दाखवावयाचें व श्रोत्यानीं हात वरती करून संमति व्यक्त करावयाची असें ठरलें. वायव्य सरहद्द प्रातात जे काहीं त्रासदायक कायदे चालू होते, त्यांची चौकशी करण्यासाठीं एक कमिटी नेमण्यात आली. सब-कमिट्यांना आपापलें काम त्वरेनें उरकण्यास सांगण्यात आलें आणि कॅांग्रेसचे सभासद होण्याबद्दल ही तितक्याच कळकळीनें देशभर खटपट करण्यात आली.

ता. २६ जानेवारीस स्वातंत्र्यदिनाच्या दिवशीं वाचावयाचें प्रसिद्धि पत्रक खालीलप्रमाणें होतें:-

रविवार २६ जानेवारी १९३० रोजीं व्हावयाच्या पूर्ण स्वराज्य दिनाच्या दिवशीं सर्व देशभर ज्या सभा व्हावयाच्या त्या बद्दलवर्किंग कमिटीच्या वतीनें खालील पत्रक प्रसिद्ध केलें आहे.

आपल्या उन्नतीस पूर्ण वाव मिळावा यासाठीं, इतर कोणच्याही राष्ट्राप्रमाणेंच हिंदी लोकानाही स्वतंत्र असण्याचा, आपल्या श्रमफलांचा उपभोग घेण्याचा व आयुष्यातील आवश्यक गोष्टी मिळविण्याचा निर्वंध हक्क आहे असें आमचें ठाम मत आहे; तसेंच आमचें असेंही मत आहे कीं, हे हक्क जनतेपासून हिरावून घेण्याचा व त्याच्यावर जुलूम करण्याचा, जर एखाद्या सरकारनें प्रयत्न केला तर तें सरकार बदलण्याचा किंवा नाहींसें करण्याचाही जनतेला अधिकार आहे. हिंदुस्थानांतील ब्रिटिश सत्तेनें हिंदी लोकाचें नुसतें स्वातंत्र्यच हरण केलें नाहीं तर गरीब रयतेला नामोहरम करण्यावरच आपल्या सत्तेचें अधिष्ठान ठेवलें आहे व हिंदुस्थानचा आर्थिक, राजकीय, सांस्कृतिक व नैतिक अधःपात केला आहे. म्हणून हिंदुस्थाननें ब्रिटिशाचे संबंध तोडणें व पूर्ण स्वराज्य किंवा संपूर्ण स्वातंत्र्य मिळवणें अत्यंत जरूर आहे असें आम्हास वाटतें.

हिंदुस्थानचा आर्थिक ऱ्हास केला गेला आहे. आमच्या उत्पन्नाच्या मानानें बेसुमार कर आमच्यापासून गोळा केला जातो. आमचें दैनिक सरासरी उत्पन्न

७ पैसे ( २ पेन्सांपेक्षां कमी ) आहे. आणि आम्हीं देत असलेल्या जबर करा-पैकीं शें. २० टक्के कर जमीनीवर शेतकऱ्याकडून वसूल होतो. शे. ३ मिठावर वसूल होतो. त्याचें गरीबावर फार मोठें दडपण पडतें

हातमागासारखे ग्रामोद्योग उध्वस्त केले आहेत. आणि हस्तव्यवसाय नसल्यानें शेतकरी वर्षांतून ४ महिने तरी बेकार झाले आहेत. इतर देशात एका नष्ट व्यवसायाऐवजीं दुसरा व्यवसाय पुरवतात. तसें त्या व्यवसायाची उणीव कशानेंही भरून काढण्यात आली नाहीं.

शेतकऱ्यावरचा बोजा आणखी वाढावा अशा रीतीनें कर व नाणीं यांचें व्यवहार चालू आहेत. आमच्या आयात मालात फार मोठा भरणा ब्रिटिश मालाचाच असतो. जकात वसुलींत ब्रिटिश मालाबद्दलचा पक्षपात स्पष्टपणें उघडकीस येत आहे आणि त्याच्यापासून जी करवसुली होते ती गरीब रयतेचे ओझें कमी करण्यासाठीं नसून बेसुमार उधळपट्टीची राज्यपद्धति टिकवण्यासाठीं आहे.हुंडणावळीच्या दरामध्यें सावळागोंधळ असल्यामुळें लक्षावधि रुपयांची संपत्ति या देशातून धुऊन नेली जात आहे.

ब्रिटिश अमदानींत राजकीय क्षेत्रात हिंदुस्थानची जितकी अवनति झाली. आहे तितकी कोणच्याही अमदानींत झाली नाहीं. कोणच्याही सुधारणानीं हिंदी लोकाना खरी राजकीय सत्ता दिली नाहीं. आमच्यातील श्रेष्ठ विभूतींना परसत्तेपुढें मान वाकवावी लागते मतस्वातंत्र्याचें व संघस्वातंत्र्याचे आमचे हक्क हिरावून घेतले आहेत आणि आमच्यापैकीं कित्येक बांधवावर हद्दपारी लादण्यात आली असून त्याना आपल्या घराकडे परत येता येत नाहीं. आमच्यातील शासनशास्त्राची वुद्धिमत्ता मारून टाकली आहे आणि पाटील कुलकर्ण्यांसारख्यां क्षुद्र अधिकारावर व कारकुनीवरच आमच्या बहुजनसमाजास समाधान मानावें लागत आहे.

शिक्षणपद्धतीनें आमच्या संस्कृतीस आम्हास मुकवलें आहे व शिक्षणामुळें आम्हास आमच्या शृंखलानाच कवटाळावें लागत आहे.

नैतिक दृष्टया पाहिलें तर निःशस्त्रीकरणामुळें आम्ही पौरुषास मुकलों आहोंत, आणि आमच्यातील प्रतिकारशक्ति चिरडून टाकण्यासाठीं जें खडें परकीय लष्कर आमच्या भोंवतीं उभें आहे. त्यानें आम्हास असें वाटावयास लावलें आहे कीं, आम्हास स्वतःची व्यवस्था पाहाता येणार नाहीं.

परचक्रास तोंड देतां येणार नाहीं. फार काय स्वतःचीं घरेंदारें व कुटुंबयाचेंही चोरदरवडेखोरांपासून संरक्षण करतां येणार नाहीं !

अशा रीतीनें हा चतुर्विध नाश घडवून आणणाऱ्या सत्तेपुढें यापुढें मान वाकविणें हे मानवजातीचा व परमेश्वराचा उपमर्द करण्यासारखें आहे असें आमचें मत आहे. अर्थात् आमचें स्वातंत्र्य मिळविण्याचा अत्यंत यशदायी मार्ग अत्याचाराच्या दिशेचा नाहीं हें आम्ही जाणतों म्हणून ब्रिटिश सत्तेशीं शक्य तितका असहकार पुकारण्याला आम्ही सिद्ध आहोंत. आणि करबंदीचा समावेश असलेला सविनय कायदेभंग करण्याची आम्ही तयारी करणार आहोंत. जर अत्याचार न करता किंवा प्रक्षुब्धही न होता आम्ही सरकारशीं सहकार्य केलें नाहीं व कर दिले नाहीत तर या अमानुष सत्तेचा हमखास शेवट होईल ! म्हणून आम्ही असा पवित्र निश्चय करतों कीं, पूर्ण स्वराज्य स्थापनेसाठीं कॉंग्रेस वेळोवेळीं ज्या आज्ञा करील त्या आम्ही पूर्णपणें पाळूं."

जनतेंत वरवर दिसणाऱ्या निराशा व शैथिल्याच्या राखेखालीं स्वार्थत्यागाची केवढी तयारी आहे, केवढी कळकळ आहे व किती प्रखर भावना आहेत या गोष्टी स्वातंत्र्यदिनाच्या उत्सवातून व्यक्त झाल्या. राजनिष्ठा किंवा कायदा व शिस्त याच्यापुढें व्यक्त होणारी नम्रता यांच्या ढिगाखालीं देशप्रेम व स्वार्थत्याग यांची आग धुमसत होती. भावना व उत्साह याच्या रसराशित निखवाला झांकणारी राख फुंकावयाचेंच कार्य फक्त करावयाचें होतें.

स्वातंत्र्यदिनोत्सव पूर्ण होतो न होतो तोंच २५ जानेवारी रोजीं व्हाइसरॉयनीं कायदेमंडळापुढें केलेलें भाषण लोकांच्या हातीं पडलें. प्रयत्नवादी किंवा आशावादी अशा मनोवृत्तीचे जे काहीं राजकीय पुढारी देशांत होते त्याच्या मनांतील थोडीफार उरलेली आशेची धुगधुगी व्हाइसरॉयच्या वरील भाषणानें थंड झाली ! सर जॉन सायमन साहेबाच्या पत्रात रॅम्से मॅकडोनाल्ड यांच्या उत्तरात, लॉर्ड आयर्विन याच्या पत्रकात व वेजवुड बेन याच्या वादविदात एकाच विचाराचा सूर कसा निघत होता हें आपणास दिसतेंच आहे. "हेतूची व्याख्या कितीही स्पष्ट मांडलेली असो, तो हेतु सिद्धीस नेण्यासाठीं ज्या प्रश्नांचा निकाल करणें जरूर आहे त्या प्रश्नांचीं उत्तरें हेतूच्या स्पष्टीकरणांत आपोआप सापडतील" अशा तऱ्हेचा विश्वास हिंदी लोकांत उत्पन्न करण्याचा आपण कधींही प्रयत्न केला नाहीं असें व्हाइसरॉयनीं [illegible] वाटलें ! व्हाइसरॉयनचें पत्रक प्रसिद्ध झाल्याबरोबर २८ तारखेला [illegible]

मुद्दा उपस्थित केला तेंव्हाच व्हाइसरॉयनीं असें स्पष्ट करावयास पाहिजे होतें व लॉइड जॉर्ज यांनी वेजवुड बेन याना कॉमन्स सभेंत हटकलें त्यावेळीं वेजवुड बेन यानीं खुलासा करावयास पाहिजे होता कीं, गोलमेज परिषद वसाहतींच्या स्वराज्याच्या व्याख्येवर भाष्य करण्यासाठीं होणार आहे आणि त्या स्वराज्याच्या वाटेवर उपस्थित होणाऱ्या प्रश्नाचा निकाल लावण्याचे मार्ग सुचवण्यासाठीं होणार नाहीं ! असें आधींच जाहीर केलें असतें तर हिंदुस्थानवर फार उपकार झाले असते. व्हाइसरॉयनीं एका वाक्यांत सागून टाकलें कीं, ध्येयाची व्याख्या ठरवणें (मग त्याचे मार्ग कितीही सुलभ असोत) व ते ध्येय गाठणे या गोष्टी निश्चितपणें फार भिन्न आहेत. व्हाइसरॉय आणखी ह्मणाले कीं, आपल्या उद्दिष्ट स्थळाची स्पष्ट व्याख्या समजणें आणि प्रवास संपवून तें स्थळ गाठणें एकच आहेत असें कोणचाही शहाणा प्रवासी समजणार नाहीं. उद्दिष्ट स्थलाची व्याख्या ( स्वरूप ) माहीत झाल्यानें फक्त त्या बाजूची दिशा नक्की कळते एवढेंच ! अशा रीतीनें ‘ व्याख्या ’ व सिद्धता, निश्चितता व प्राप्ति आणि दिशा व ध्येय यातील भेद व्हाइसरॉय साहेबानीं स्पष्ट केला ! पूर्वींच्या १० वर्षांत वसाहतींचें स्वराज्यच चालू आहे हें वेजवुड बेन याचें ह्मणणें होतें. त्याबद्दलही हिंदुस्थानचा झालेला गैरसमज दूर करण्यासाठीं व्हाइसरॉय ह्मणाले:—

साम्राज्यातील इतर भागाशीं असलेल्या बाह्य संबधात, स्वायत्त वसाहतींचीं पुष्कळशीं तत्त्वें हिंदुस्थानला प्रत्यक्ष आचरता येत आहेत हें जरी खरें असलें तरी वरील तत्त्वें आचरणात आणणें न आणणें ही बहुताशीं बादशाही सरकारच्या परिस्थितीवर किंवा अधिकारावर अवलंबून आहे. यामुळें हिंदी राजकीय पुढारी वरील महत्त्वाच्या स्थानाला फारशी किंमत द्यावयास तयार नाहींत हीहि गोष्ट तितकीच खरी आहे.

हिंदुस्थानची राज्यघटना तयार करताना बहुमताप्रमाणें काम करणें हें बादशाही सरकारनें बोलावलेल्या कॉन्फरन्सचें कर्तव्य असावें आणि बहुमतानें मान्य झालेली अशी घटना जशीच्या तशी पार्लमेंटनें मान्य करावी अशा मताचे काहीं लोक आहेत. त्या लोकानीं मागणी केलेली ती ही आगामी परिषद नव्हे !

आगामी परिषद मताचें स्पष्टीकरण करण्यासाठीं व ऐक्य घडवून आणवून अशा रीतीनें बादशाही सरकारला सहाय्य करण्यासाठीं आहे. पार्लमेंटच्या

परंतु हिंदुस्थानला मात्र अनत्याचारी असहकारितेखेरीज गत्यंतर नाहीं. या स्वराज्यमंत्राचे आपण प्रणेते व्हां आणि आपलें सर्वस्व या हिंदी स्वातंत्र्य युद्धात अर्पण करण्याचें धैर्य व सामर्थ्य परमेश्वर आपणास देवो. हें युद्ध आता अगदीं जवळ येऊन ठेपलें आहे. ”

व्हाइसरॉयनीं आपलें जें भाषण केलें त्यावेळीं कायदेमंडळाचें वासंतिक अधिवेशन चालू होतें.

त्यावेळीं टेक्स्टाइल इंडस्ट्रीज् ( प्रोटेक्शन ) बिल नुकतेंच पास झालें असल्यानें एकंदर वातावरण अगदीं प्रक्षुब्ध होतें. त्या बिलाच्या विरोधकाचें असें मत होतें. आजपर्यंतच्या जमाबंदीच्या रूढ व्यवहाराचें तत्त्व उल्लंघून या बिलानें साम्राज्याचें हित हिंदुस्थानवर लादलें जात होतें. या बिलामुळेंच पं: मदन मोहन मालवीय आणि त्याच्या राष्ट्रीय पक्षाचे कांहीं सभासद यानीं आपल्या सभासदत्वाचे राजीनामे दिले. अनपेक्षित बाजूनें कॉंग्रेसच्या चळवळीला सहाय्य व्हावें असा खरोखरच ईश्वरी संकेत होता आणि पुष्कळ वेळा ही मदत मिळण्याच्या कामीं सरकार व सरकारची कल्पनाशून्यता यामुळेंच फार मदत झाली होती. मालवीयजी हे मुळींच असहकारितावादी नव्हते. परंतु या वेळीं त्याची अशी स्थिति होती कीं, सविनय कायदेभंगासही त्यानीं माघार घेतली नसती. परंतु त्याना “ संपूर्ण स्वातंत्र्य मान्य नव्हतें, म्हणून त्याचा नाइलाज होता. असेंब्लीची मुदत वाढली होती व ते अद्यापही तिचे सभासद होते परंतु टेक्स्टाइल इंडस्ट्री बिलानें त्याना हात टेकावयास लावले व ते असेंब्लींतून बाहेर आले. मालवीयानीं आणलेली उपसूचना नापास झाली.

अधिवेशन संपण्यापूर्वी त्या दिवसाचें काम संपल्यावर अध्यक्षांनीं सर्व सभासदाना हस्तांदोलन करण्यास सांगितलें व असे उद्गार काढले कीं, आपल्यापैकीं येथें कितीजण राहतील कोणास ठाऊक ? ” फेब्रु. १९३० पासून असेंब्लींत चाललेल्या या धडामोडींचा प्रत्यक्ष स्वातंत्र्ययुद्धाशीं कांहीं संबंध नाहीं. परंतु त्या काळीं झालेल्या घडामोडींची नोंद करण्यासाठीं म्हणूनच ही हकीगत नमूद केली. आणि पं. मालवीय आपल्या पक्षासह राजीनामा देऊन कॉंग्रेसला कसे येऊन मिळाले हेंही स्पष्ट करावयाचें होतेंच.

आता १९३० साली उपस्थित झालेल्या प्रचंड चळवळीचें परिशिलन करण्याकडे वळूं या.

आताच हें सांगितलें आहे कीं, स्वातंत्र्यदिनाचे उत्सव सर्व देशभर साजरे होऊन अत्यंत यशस्वी झाले. कोणच्या ना कोणच्या तरी कारणासाठीं सर्व देशभर धरपकड चालूच होती. मीरत खटल्यातील ३२ आरोपीपैकीं एका-खेरीज बाकी सगळ्यांची सेशन कोर्टांत चौकशी सुरु झाली. कलकत्त्यामध्यें सुभाष चंद्र बोस व इतर अकरा जण पकडले गेले व त्याना एक वर्षाची सक्त मजुरी ठोठावण्यात आली. काँग्रेसच्या आज्ञेप्रमाणें कायदेमंडळातील १७२ सभासदांनीं १९३० फेब्रुवारींत राजीनामे दिले. असेंब्लीतून २१ सभासद बाहेर आले व कौन्सिल ऑफ स्टेट मधून ९ जण बाहेर आले. प्रांतिक कायदे-मंडळातील राजीनाम्यात बंगालमध्यें सगळ्यात जास्त म्हणजे ३४, बहार व ओरीसा मध्यें ३१. मध्यप्रांतात २०, मद्रासमध्यें २०, संयुक्तप्रांतात १६, आसा-ममध्यें १४ मुंबईत १६ पंजाबमध्यें ४ व ब्रह्मदेशात १ असे राजीनामे दाखल झाले.

१४, १५ व १६ फेब्रुवारीस वर्किंग कमिटीची साबरमतीस बैठक झाली. ज्या लेजिस्लेटिव्ह कौन्सिलमधील सभासदांनीं अद्याप राजीनामे दिले नव्हते किंवा ज्यानीं राजीनामे देऊन पुन्हा नव्या निवडणुकीची तयारी तावडतोब चालविली त्याना, ज्या काँग्रेस कमिट्यात निवडणुकीनें सभासद निवडले जातात अशा कोणत्याही काँग्रेस कमिटींतून राजीनामे देण्यास सांगण्यात आलें. त्यानीं राजिनामे न दिल्यास शिस्तीचे उपाय योजण्याचे सांगितले गेले. राजकीय कैद्याना चांगल्या तऱ्हेनें वागवण्यात येईल असें आश्वासन सरकारनें दिल्यावरून २८ सप्टें. १९२९ रोजीं लखनौ येथें काँग्रेसनें आत्मत्याग करणाऱ्या सर्व राजकीय बंदिवानाना अन्नसत्याग्रह सोडून देण्याबद्दल विनंति केली होती. परंतु सरकारनें तें आश्वासन पाळलें नाहीं याबद्दल खेद व्यक्त करण्यात आला. आणि लाहोर कैद्याना, या वचनभंगाचा निषेध म्हणून अन्नसत्याग्रह भाग आहे असें वाटलें. परंतु वरील बैठकींतील मुख्य ठराव सविनय कायदे-भंगाविषयीं होता. तो ठराव असा.—

पूर्ण स्वराज्याचे ध्येय गांठण्यासाठीं अनत्याचार हें एक तत्त्व आहे असें ज्याना वाटत असेल त्यानीं व काँग्रेसच्या सभासदात फक्त वरील श्रद्धेनेच

लोक नाहींत तर ज्यांना देशाच्या परिस्थितींत अनत्याचार हें एक आवश्यक धोरण आहे एवढेच वाटतें असेही लोक आहेत, त्याहि स्त्रीपुरुषांनीं सविनय कायदेभंगाच्या चळवळीचा पुढाकार घ्यावा व ती चळवळ चालवावी असं वर्किंग कमिटीचें मत आहे. महात्मा गांधी यांची सूचना वर्किंग कमिटी मोठ्या आनंदानें स्वीकारीत आहे. त्यांना व वरील अर्थानें ज्यांना अनत्याचार हें एक तत्त्व श्रद्धासूत्र वाटलें असे जे महात्माजींच्या हाताखालीं काम करणारे असतील त्या कार्यकर्त्यांना, त्यांना वाटेल त्या मार्गानें, वाटेल त्या वेळीं, वाटेल तितक्या पद्धतीच्या व मर्यादेच्या सविनय कायदेभंगास सुरवात करण्याचा अधिकार वर्किंग कमिटी देत आहे.

वर्किंग कमिटीचा असा पूर्ण विश्वास आहे कीं, ज्या वेळीं ही मोहीम प्रत्यक्ष सुरू होईल त्या वेळीं सर्व कॉंग्रेसभक्त आणि इतर लोक सविनय प्रतिकारकांना आपलें सहकार्य शक्य त्या सर्व प्रकारें देतील आणि संतापजनक असे कांहींही प्रसंग पुढें आले तरी अनत्याचाराचें तत्त्व तें पाळतील व टिकवतील. वर्किंग-कमिटीला आणखी अशी आशा आहे कीं ज्यावेळीं सामुदायिक चळवळ सुरू होईल त्यावेळीं, वकील लोकांप्रमाणें सरकारशीं स्वखुषीनें सहकार्य करणारे, सरकारपासून मामुली फायदा मिळविणारे विद्यार्थि वगैरे सरकारला सहकार्य करण्याचें बंद करतील व ते फायदे घेण्याचे नाकारतील आणि स्वातंत्र्याच्या या शेवटच्या मोहिमेंत सामील होतील.

पुढारी कैद झाले तर जे मागें उरतील व ज्यांच्यात स्वार्थत्याग व सेवाधर्म हीं विंवलीं आहेत ते कॉंग्रेसचें कार्य पुढें चालवतील व आपल्या सामर्थ्याची पराकाष्ठा करून चळवळीचा पुरस्कार करतील अशी वर्किंग कमिटीला आशा आहे.

गांधी व त्यांच्या तत्त्वाचे अनुयायी यांना सविनय कायदेभंगास सुरुवात करण्याचा अधिकार या ठरावानें दिला. पुढें ऑ. इं. कॉं. कमेटीची अलाहाबादला जी बैठक झाली तिनेंही ही सविनय कायदेभंगाची मोहिम सुरू करण्याचा अधिकार मान्य केला. ही गोष्ट येथें मुद्दाम नमूद करण्यात येत आहे. कारण मे १९३४ मध्यें ही चळवळ थांबवण्यात आली तरी गांधीपुरता अपवाद ठेवण्यांत आला. म्हणजे असें कीं, गांधींना परवानगी देऊन सुरू केलेली चळवळ थांबवितांनासुद्धा गांधींना चळवळ करण्याची दिलेली परवानगी कायमच होती. हें कसें झालें हें वरील हकीगतीनें स्पष्ट करावयाचें होतें.

साबरमती येथील वर्किंग कमिटीच्या सभेंत पास झालेल्या औपचारिक ठरावापेक्षां खासगी बैठकींत गांधींनीं कित्येक आमंत्रित मित्राना दिलेल्या मुलाखती जास्त महत्त्वाच्या होत्या. त्या मुलाखती विशेषतः मिठाविषयीं होत्या. मिठागरांतून मीठ गोळा करून व मीठागरावर हल्ला करून अशा रीतीनें मीठाचा कायदा कसा मोडावा याची चर्चा त्या मुलाखतींत मुख्यत्वें झाली.

सार्वत्रिक प्रमाणावर सविनय कायदेभंग करण्याची देशाची आज तयारी नाहीं अशीही एक भीति व्यक्त करण्यात आली. लोक कायदेभंग करण्यात विनय टिकवूं शकतील कीं नाहीं, प्रतिकार न करतां यातनाचें स्वागत करण्याची त्याची तयारी होईल कीं नाहीं, क्लेश सहन करून शात व आनंदी वृत्तीनें लढत राहण्यास ते समर्थ आहेत कीं नाहीं या प्रश्नाच्या उत्तरावरच देशाची सिद्धता व तयारी अवलंबून होती. याबद्दल साशंक असणाऱ्या लोकात, ज्याना कित्येक दशकापासून सार्वत्रिक सविनय कायदेभंगाचें स्वप्न पडलें होतें असें कांहीं सहृदय मित्र होते परंतु ते कुत्सित टीकाकार असते तर त्याच्या शंकाना कांहींच उत्तर देण्याची जरूर नव्हती. समजा सविनय कायदेभंगाची चळवळ तहकूब केली तर हे टीकाकार आपण स्वतः कोणचा तरी दिवस ठरवून त्या दिवशीं मोहीम करावयास आपणहून निघणार आहेत, असें थोडेंच आहे ? पोहण्याची तयारी म्हणजे प्रत्यक्ष पोहोणेंच होय. लार्ड रिपन याच्या मताप्रमाणें एखाद्या देशाची स्वराज्याची लायकी पहाणें म्हणजे स्वराज्य देणें हेंच होय. प्रत्यक्ष करता करताच शिकणें हें तत्त्व जसें शारीरिक शिक्षणात हात आणि डोळे याच्या बाबतींत असतें तसेंच नैतिक शिक्षणातही तें तत्त्व लागूं आहे.

सविनय कायदेभंग सुरू करावयाचें तर ठरलेंच. आता आपण काय करावयास पाहिजे एवढेंच पहावयाचें होतें. आपला मनोदय गांधींनीं जाहीर केलाच होता.

साबरमती येथें वर्किंग कमिटीची बैठक सुरू होण्यापूर्वींच गांधींनीं मिठागरावरील मोहीम जाहीर केल्याची बातमी मुंबईस येऊन धडकली होती. तेव्हाच प्रचारास सुरुवात झाली आणि १४ फेब्रुवारी पूर्वींच मुंबईस मिठाच्या कराची भूमिका डळमळीत झाली. असें निदर्शनास आणण्यात आलें कीं, मीठ कमिशन १८३६ मध्यें नेमलें होतें व त्या कमिशननें अशी शिफारस केली कीं, इंग्लिश मीठ

हिंदुस्थानांत विकले जावें, यासाठीं हिंदी मीठावर कर बसवावा. कारण लिव्हरपूलच्या गोदींत जहाजें पडून राहिलीं होतीं. जहाजाचा तळ पाण्यांत जितका बुडावा लागतो तितका बुडण्यासाठीं काहीं जड वजन टाकावें लागतें तितकें वजन नसल्यानें जहाजें स्वस्थ डुलत पडलीं होती. कारण पुरेसें वजन झाल्या-खेरीज खवळलेल्या समुद्रातून जहाज हाकारणें अशक्य होतें यासाठीं काहीं तरी भरताड जहाजात टाकणें जरूर होतें. काहीं दिवस त्या जहाजातून भरताड म्हणून लंडनच्या मैदानातली माती घालून ती हिंदुस्थानात आणली होती. त्या मातीनेंच कलकत्ता येथील चौरंगी रोड तयार करण्यात आला.

साबरमतीची बैठक संपते न संपते तोंच सर्व वातावरण 'क्षार' मय झालें। मीठ तयार करणें फायदेशीर होईल काय, अशी चौकशी लोक करूं लागले. समुद्राच्या पाण्यापासून मीठ तयार करताना जळण व मजुरी किती लागते याचेही आकडे सरकारनें काढले. तयार केलेलें मीठ हें कर देऊन मिळणाऱ्या मिठापेक्षा तिप्पट महाग पडलें असें सिद्ध करून दाखविण्यापर्यंत मजल गाठली. तो पैशासाठीं चाललेला व्यावहारिक लढा नसून तें एक नैतिक युद्ध होतें, हें सरकारच्या लक्षात येऊं नये ही एक कींव करण्यासारखी गोष्ट होती.

साबरमतीस जमलेल्या गृहस्थानीं गांधींचे कार्यक्रम काय आहेत याबद्दल चौकशी केली. लॉर्ड किचनेर किंवा मॉर्शल फॉच किंवा व्हॉन हिंडेनबुर्ग याना गेल्या महायुद्धाच्या वेळीं पुढील बेत विचारणें जसें अप्रस्तुत ठरलें असतें तसेंच हेंही विचारणें होतें. परंतु साबरमतीस जमलेल्या पुढाऱ्यानीं असें विचारणें हेंही रास्तच होतें. वरील सेनानींच्या योजना ठरलेल्या होत्या. परंतु त्या त्यानी कधीं उघड केल्या नव्हत्या. सत्याग्रहाची गोष्ट तशी नव्हती. तेथें कार्यक्रमाचा गुप्तपणा नव्हता. परंतु अद्याप कार्यक्रमच स्पष्ट आखले नव्हते. धुक्यानें व्यापलेल्या वातावरणात अगदीं सकाळीं पुढील मार्ग दिसत नाहीं. परंतु वेगानें जाणाऱ्या मोटारला एका यार्डापासून दुसऱ्या यार्डापर्यंत-चा मार्ग भराभर दिसत जातो. त्याचप्रमाणें सत्याग्रहाच्या सुरवातींत जरी पुढील मार्गाबद्दल काहीं कल्पना होत नाहीं, तरी युद्धाच्या प्रगतीबरोबरच पुढील मोहिमांचें स्वरूप कळत जाणार होतें. सत्याग्रही आपल्याजवळच दिव्य प्रकाशाची मशाल बाळगीत असतो. त्या प्रकाशात त्याला पुढील पावलाची वाट दिसते.

चालू मीठ–सत्याग्रहाची योजना अशी होती. गांधींनीं पुढे जाऊन मीठागरांतून मीठ उचलावयाचें, बाकीच्या पुढाऱ्यांनीं ते करावयाचें नाहीं. जर बाकीच्यांनीं विचारलें कीं, आम्हीं स्वस्थ रहावयाचे काय ? तर गांधी उत्तर देत 'होय स्वस्थ रहा.' परंतु फक्त चढाई करण्याकरता गप्प रहा. प्रतिक्रिया लवकरच होणार अशी गांधींची खात्री होती. वल्लभभाईंनासुद्धा या बाबतींत गांधींच्या बरोबर जाण्याची मनाई होती. गांधी आपल्याबरोबर आश्रमातीलच लोक घेत. वर्धा आश्रमाला सुद्धा तयार रहाण्याबद्दल आज्ञा होती. परंतु गांधींना अटक होईपर्यंत त्यांना स्तब्ध रहाण्याचा हुकूम होता. कारण गांधींना अटक झाल्याबरोबर सर्व देशभर एकदम प्रतिक्रिया सुरू होणारच. त्यावेळीं आपल्यामागे मात्र लोकांनीं स्वतःच्या विचारशक्तीवरच भिस्त ठेवावी व जें योग्य वाटेल तें करावें असें गांधींचें सांगणें होतें. आपल्या अटकेनंतर ही चळवळ सर्व देशभर पसरावी, सर्व दिशांना व्यापली जावी आणि अत्यंत निकराच्या वेळीं आपणास विजय तरी मिळेल किंवा आपला पूर्ण नाश तरी होईल असा गांधींचा अंदाज होता. ज्या राष्ट्रानें इंग्लिशांचें कधींही अकल्याण इच्छिलें नाहीं तें राष्ट्र धुळीस मिळवणें विरोधकांना अगदीं अशक्य होतें. जर हें राष्ट्र धुळीस मिळालेंच तर त्याच कृत्यानें साम्राज्याचाही पाया खचेल ! हेंच अनत्याचाराचें तर्कशुद्ध व निष्ठुर कार्य आहे. सरकारनें बाँबचा वर्षाव केला तर काय करावें असें लोक विचारतात. त्याचें हेंच उत्तर आहे कीं, जर निरुपद्रवी स्त्रीपुरुष व मुलें अशा तऱ्हेनें बेचिराख झालीं तर त्याच राखेंतून अशी आग उठेल कीं, ती साम्राज्यावरच प्रत्याघात करील !

सगळीकडे मीठ तयार करण्याचें काम चालत नसलें तरी मीठागरें सर्वत्र होतीं. त्या मीठागरांचा ताबा आम्हीं घेऊं शकत होतों. 'परंतु ही लूट नाहीं काय ?' असें लोक विचारतील. नाहीं. कारण त्यांतील एक कणही तुम्हीं तुमच्यासाठीं घेत नाहीं." मीठ हें जीवनाला आवश्यक आहे. सामुदायिक चळवळ घडवून आणणें हें कांहीं आपलें कर्तव्य किंवा ध्येय नाहीं. जर चळवळ सामुदायिक झाली तर ती ताब्यात घेऊन चालविणें आपणास जरूर आहे एवढेंच. ती मुद्दाम घडवून आणण्याची गरज नाहीं. तर वेळ आल्यास तिच्यासाठीं तयारी असावयास पाहिजे. सामुदायिक चळवळ सुरू झाली असती तर वकिलांनीं आपलीं कोर्टें व विद्यार्थ्यांनीं आपले अभ्यास बाजूस

सारून चळवळींत सामील व्हावयास पाहिजे होते. गांधींनीं भरलेला बार वाया जाणारा नव्हता.

गांधींचें मत असें होतें कीं, ठिकठिकाणीं अत्याचाराबरोबर आपण गोवले जात आहोंत. अत्याचाराला प्रतिकार होत नसल्यानें तो आपल्याभोंवतीं फोंफावत आहे. म्हणून अत्याचारास प्रतिकार करण्यासाठीं अनत्याचाराचें आचरण आवश्यक आहे. अशा तऱ्हेच्या विचारसरणीनेंच कॉंग्रेसला १९३० सालीं स्फूर्ति दिली.

गांधींच्या सर्व योजना त्यांच्या स्वयंस्फूर्तीनें त्याना सुचत आलेल्या आहेत. मनाच्या सारासारपद्धतीच्या रुक्ष तर्कशास्त्रानें त्या तयार होत नाहींत. त्यांची अंतःस्फूर्ति, अंतरात्म्याचा संदेश हाच त्यांचा उपदेशक, मुख्य हस्तक, मित्र, तत्त्वोपदेशक व मार्गदर्शक आहे. लॉईड जॉर्ज यानीं म्हटल्याप्रमाणें या अंतःस्फूर्तीनेंच त्यानीं एका शतकाची उन्नति एका दशकात घडवून आणली. हिंदुस्थानात त्याचें असें वर्णन करता येईल कीं हजारों वर्षांची प्रगति त्यानीं एका वर्षाच्या घडामोडींत व्यापून टाकली. गांधींच्या भविष्यकालीन दृष्टीची शुद्धता सर्व जगानें मान्य केली आहे. मिठाचा सत्याग्रह हा भयंकर विघातक किंवा माथेफिरूपणाचा काहीं प्रकार आहे, अशीं ज्या मवाळाचीं मतें होतीं त्यानासुद्धा गांधींच्या ध्येयाची उदात्त भूमिका मान्य करावी लागली. गांधींनीं आपले बेत व्हाइसरॉयना कळविण्यास विलंब केला नाहीं. त्यांच्या नेहमींच्या पद्धतीप्रमाणें त्यानीं लॉर्ड आयर्विन याना पत्र पाठविलें तें सर्व पत्र खालीं उद्धृत केलें आहे.

सत्याग्रह आश्रम.

साबरमती, मार्च २, १९३०.

प्रिय मित्र,

जें धाडस अंगावर घेण्यास मला गेलीं काहीं वर्षें धास्ती वाटत होती तें धाडस सविनय कायदेभंगास सुरवात करून घेण्यापूर्वी मी मोठ्या आनंदानें आपणाकडे यावयास पाहिजे व काहीं मार्ग काढावयास पाहिजे असें मला वाटतें.

माझीं वैयक्तिक मतें अगदीं स्पष्ट आहेत. कोणत्याही सजीव वस्तूला मी हेतुपुरस्सर दुखवूं शकत नाहीं. मनुष्यानीं मला व माझ्या संबंधींना भयंकर

दु:ख दिलें तरीसुद्धां मानवी जीवितास इजा करणें हें तर माझ्या बाबतींत सुतराम् अशक्य ! म्हणून ब्रिटिश सत्ता हा एक शाप आहे असें मला वाटतें तरी एकाही इंग्रजाला दुखविण्याचा माझा हेतु नाहीं किंवा हिंदुस्थानांतील त्याच्या एकाही न्याय्य हितसंबंधास हात घालण्याची माझी इच्छा नाहीं.

माझ्याविषयीं आपला गैरसमज मी होऊं देणार नाही. जरी हिंदुस्थानातील ब्रिटिश राज्य हा एक शाप आहे असें माझें मत आहे तरी त्यासाठीं पृथ्वीच्या पाठीवरील कोणच्याही माणसापेक्षा इंग्लिश लोक सामान्यतः अधिक हीन आहेत असें मला वाटत नाहीं. कित्येक इंग्लिश लोक माझे सन्मित्र असण्याचें भाग्य मला लाभलें आहे. ज्या धैर्यवान् व खुल्या अंतःकरणाच्या इंग्लिश गृहस्थानीं या सत्तेबद्दलचें कटु सत्य काहींही संकोच न बाळगता स्पष्टपणें लिहून ठेवलें त्याच्या लेखनामुळेंच मला ब्रिटिश सत्तेच्या दुष्परिणामाचें ज्ञान झालें आहे.

आणि ब्रिटिश सत्तेला एक शाप असें तरी मी का समजतों ?

" या सत्तेनें या देशाला कधींही झेपणार नाहीं इतका भयंकर खर्च करून लष्करी व मुलकी शासनपद्धति उभारली. त्या शासनपद्धतीमुळें व वाढत्या प्रमाणावर चाललेल्या लुटीमुळें या सत्तेनें लक्षावधि अज्ञानी लोकांना भिकेस लावले आहे. '

राजकीय दृष्ट्या आम्हाला या सत्तेनें जवळ जवळ गुलाम बनविलें आहे. आमच्या संस्कृतीचीं पाळेंमुळें शोषून टाकलीं आहेत आणि निःशस्त्रीकरणाच्या धोरणानें आमचा नैतिक अधःपात झाला आहे आणि आमच्यात आत्मबल नसल्यानें आम्ही हीन असहायतेच्या पायरीजवळ येऊन ठेपलों आहोंत.

माझ्या पुष्कळ देशबांधवाप्रमाणें मीही अशी आशा मनाशीं बाळगून होतों कीं, गोलमेजपरिषदेकडून यावर कांहीं उपाययोजना केली जाईल. परंतु तुम्हींच स्वतः स्पष्ट सांगितलेंत कीं, मी किंवा ब्रिटिश प्रधानमंडळ पूर्ण वसाहतीच्या स्वराज्याच्या योजनेला पाठिंबा देईनच असें आश्वासन देण्यास मी तयार नाहीं. आपणच असे जाहीर केलें मग ज्यासाठीं हिंदुस्थानातील जागृत जनता हेतुपुरःसर मागणी करीत आहे व अगी मुकी जनता अहेतुकपणें ज्यासाठीं तळमळत आहे असा कांहीं सुधारणेचा मार्ग गोलमेज परिषदही दाखवूं शकली नाहीं. पार्लमेंटच्या निर्णयाची आधीं कल्पना करण्याचा प्रश्नच उद्भवत नव्हता हें सांगण्याची जरूरच नाहीं. पार्लमेंटची संमति गृहीत धरून ब्रिटिश प्रधान-

मंडळानें आपले विशिष्ट धोरण आधींच ठरविलें; असे प्रसंग लागेल तितके दाखवतां येतील.

दिल्ली येथील मुलाखतीचा विचका झाल्यानंतर, मग कलकत्ता अधिवेशनांत १९२८ सालीं झालेला ठराव अंमलांत आणण्याचे प्रयत्न। करण्याखेरीज मला व पं. मोतिलाल नेहरूंना दुसरा मार्गच उरला नव्हता.

आपल्या पत्रकांत, वसाहतीचें स्वराज्य, हा शब्द आपण त्या शब्दाच्या सर्वमान्य अर्थानेंच वापरला असेल तर संपूर्ण स्वातंत्र्याच्या ठरावाची कांहींच धास्ती बाळगण्याचें कारण नाहीं. कारण वसाहतीचें स्वराज्य वस्तुतः संपूर्ण स्वातंत्र्यच होय असें जबाबदार ब्रिटिश राजकारणी मुत्सद्यांनीं मान्य केलेंच आहे ना? तथापि मला अशी दाट शंका आहे कीं, हिंदुस्थानला निकटवर्ती भविष्यकाळात वसाहतीचें स्वराज्य देण्याचा कधींच उद्देश नव्हता.

परंतु हा सगळा गतेतिहास झाला. जाहीरनाम्यानंतर अशा पुष्कळ घडामोडी झाल्यात कीं ज्यांत ब्रिटिश धोरणाची वृत्ति अचूक व्यक्त झाली आहे.

ज्यामुळें ब्रिटनच्या हिंदुस्थानशीं असलेल्या व्यापारावर काहीं दुष्परिणाम होईल किंवा ज्यामुळें ब्रिटिशांचे हिंदुस्थानशीं जे व्यवहार झाले त्यांची निःपक्षीय व कसून चौकशी करण्याचा प्रसंग ओढवेल अशा तऱ्हेचा कोणताही बदल ब्रिटिश धोरणांत करण्याचा ब्रिटिश मुत्सद्यांचा विचारही नाहीं ही गोष्ट सूर्यप्रकाशाइतकी स्पष्ट दिसते आहे. हिंदुस्थानची नागवणूक थांबविण्याचे काहींही प्रयत्न झाले नाहींत तर हिंदुस्थानचा रक्तशोष अत्यंत वेगानें होत जाणार हें निश्चित.

१८ पेन्स ही अगदीं निश्चित गोष्ट आहे,असें फडणीस मानतात आणि लगेच लेखणीच्या एका फटकाऱ्यानें हिंदुस्थानात कांहीं कोटींचें द्रव्यशोषण होतें। जेव्हां सनदशीर मार्गानें ही गोष्ट नाशावीत करण्याचे व प्रत्यक्ष हालचाल करण्याचे कसून प्रयत्न केले जातात, त्यावेळीं इतर कित्येकांप्रमाणेंच आपणांसही हे प्रयत्न हाणून पाडण्यासाठीं धनाढ्य जमीनदाराना हाक मारल्याखेरीज राहवत नाहीं. ज्या शासनपद्धतीनें हिंदुस्थानचा कणशः चूर होतो आहे, त्या शासनपद्धतीच्या सुव्यवस्थेच्या नांवानें हें आपण करतां हें विशेष होय!

राष्ट्राच्या नावानें कार्य करणारे जे कार्यकर्ते आहेत त्याना स्वातंत्र्याच्या तळमळीचा खरा अर्थ कळला नाहीं व त्यांनीं तो इतरापुढें मांडला नाहीं तर तें स्वातंत्र्य

भलत्याच स्वरूपांत आमच्यापुढे येईल अशा धोक्याचा खास संभव आहे. ज्या लक्षावधि मूक मजुरासाठीं जें स्वातंत्र्य मिळविण्याचे प्रयत्न होत आहेत व ज्याच्यासाठीं फक्त तें मिळविणें योग्य आहे तें स्वातंत्र्य त्या भलत्या स्वरूपात त्या दीनाना कवडीमोल ठरेल! एवढ्यासाठीं स्वातंत्र्याचा खरा अर्थ मी जनतेला वारंवार सागत आहे.

मी आपणापुढें काहीं महत्त्वाचे मुद्दे ठेवू इच्छितो.

जमीनमहसुलाचें जें असह्य दडपण आहे व एकंदर जुलुमात ज्याचा भाग फार मोठा आहे तें दडपण स्वतंत्र हिंदुस्थानात पुष्कळच कमी झालें पाहिजे.

कायमधारा वसूलपद्धति फार जरूर आहे असें म्हणतात परंतु त्या पद्धतीनेंसुद्धा काहीं श्रीमंत जमीनदाराचाच फायदा होतो, रयतेचा होत नाहीं. रयत आहे तशीच दुबळी राहिली आहे. शेतकरी हा नुसता भाडेकरीच राहिला आहे.

यासाठीं जमीनमहसूल केवळ बराचसा कमी करूनच भागणार नाहीं; तर ज्यामुळें शेतकऱ्याचें प्रामुख्याने कल्याण होईल अशा स्वरूपात त्याची पुनर्रचना करावयास पाहिजे. परंतु ब्रिटिश पद्धति मात्र शेतकऱ्याच्या जिवावरच उठली आहे असें दिसतें. ते वापरीत असलेलें जें मीठ त्यावरसुद्धा अशा रीतीनें कर लादला आहे कीं, त्याच्यावरचें तें दडपण खूप असह्य होतें. श्रीमंत माणसें व्यक्तिशः व सामुदायिक रीत्या जेवढें मीठ खातात त्यापेक्षां गरीब मनुष्याला जास्त मीठ खावें लागतें. मीठ ही अशी एक वस्तु आहे कीं जी श्रीमंतापेक्षां गरीबाचीच जास्त मोठी गरज आहे हें लक्ष्यात आणलें म्हणजे मीठावरील करांचें जास्तच भयंकर ओझें दिसतें. दारू व औषधें यावरील करही गरीबाकडूनच वसूल होतो.या दोन बाबींनीं त्याच्या आयुष्याचा शारीरिक व नैतिक पाया ढासळून पडतो. व्यक्तिस्वातंत्र्याच्या नांवाखालीं वरील गोष्टींचें समर्थन करण्यात येतें परंतु खरें पाहाता त्या गोष्टी अगदीं मुद्दाम कायम ठेवण्यांत आल्या आहेत. १९१९ च्या सुधारणा तयार करणाऱ्या ‘ सुधारकार्नी ’ मोठ्या धोरणानें या वरील बाबींचा महसूल द्विदल राज्यपद्धतींतील केवळ नावामध्यें जबाबदार अशा विभागाकडे दिला आहे. त्यांत या गोष्टी थांबविण्याची जबाबदारीच अंगाबाहेर टाकण्याचें धोरण साधलें आहे. अशा रीतीनें हा ‘ जबाबदार ’ विभाग कोणचेंही सत्कृत्य करण्यास प्रथमपासूनच असमर्थ करून टाकला आहे. जर एखाद्या दुर्दैवी दिवाणानें हा वसूल रद्द केला तर त्यामुळें शिक्षण

खात्याची उपासमार करण्याचें पाप त्याला पत्करावें लागणार. कारण विद्यमान परिस्थितींत रद्द केलेल्या कराऐवजीं दुसरा कर बसविणें त्याला शक्य नाहीं. कराच्या ओझ्याखालीं गरीब रयत वरून दडपली जाते व इकडे हातमागासारखे मुख्य पोटधंदे बुडाल्यानें पैसा मिळविण्याचें त्यांचें सामर्थ्यही नामशेष झालें आहे.

हिंदुस्थानच्या नावावर जें कर्ज उभारण्यांत आले आहे त्याचा उल्लेख केल्याखेरीज हिंदुस्थानच्या नाशाचें पुराण पूर्ण होत नाहीं. वर्तमानपत्रांतून याबद्दल पुष्कळ लिहिलें गेलें आहे. हें सर्व कर्ज अत्यंत कसोशीनें तपासणें आणि न्यायी निःपक्षपाती पंचाकडून जें कर्ज अन्याय्य व अयोग्य ठरेल तें नाकारणें हें स्वतंत्र हिंदुस्थानचें कर्तव्य होणारच !

जगांत अत्यंत खार्चिक अशी ही परकीय शासनपद्धति मोठ्या दिमाखानें चालू ठेवण्यासाठींच केवळ वर सांगितलेल्या नमुन्याची विषमता राखण्यात आली आहे. उदाहरणार्थ, आपल्याच पगाराची गोष्ट घ्या. दरमहा २१००० रु. पक्षाही तो जास्त आहे. याशिवाय त्यात अप्रत्यक्ष पडणारी भर निराळीच. ब्रिटिश मुख्य प्रधानाला वर्षाला ५००० पौंड म्हणजे महिन्याला ५४०० रु. मिळतात. हिंदी माणसाचें दररोजचें सरासरी उत्पन्न २ आण्यापेक्षाही कमी आहे. म्हणजे हिंदी माणसाच्या दैनिक उत्पन्नापेक्षा आपलें दैनिक उत्पन्न ७०० रु. जास्त आहे.

तेंच इंग्लिश माणसाचें दैनिक उत्पन्न २ रु. आहे. व ब्रिटिश प्रधानापेक्षां रोज यापेक्षां १८० रु. जास्त मिळतात. हिंदुस्थानच्या सरासरी उत्पन्नाच्या पांच हजारपट आपलें उत्पन्न जास्त आहे. आणि ब्रिटिश प्रधानास ब्रिटनच्या सरासरी उत्पन्नाच्या ९० पट जास्त पगार मिळतो. आपल्यापुढें नम्रपणें गुडघे टेकून मी आपणास या गोष्टीचा विचार करण्याची विनंति करीत आहे. मी हें वैयक्तिक उदाहरण घेतलें तें केवळ हें कटु सत्य मनावर बिंबवण्यासाठींच होय. एक व्यक्ति या नात्यानें आपल्याविषयीं मला इतका आदर आहे कीं आपल्या भावना दुखविण्याचें माझ्या हातून कधींही होणार नाहीं. आपणास आपल्या मिळकतीची गरज नाहीं हें मला माहीत आहे. बहुतेक आपला सर्व पगार दानधर्मांत खर्च होत असेल. परंतु ज्या राज्यपद्धतींत अशी भरमसाट उधळपट्टीची सोय होते ती एकदम नाहींशी होणें जरूर जरूर आहे. व्हाइसरॉयच्या पगाराची जी गोष्ट तीच एकंदर या सर्व शासनपद्धतीची स्थिति आहे.

म्हणून महसुलाचें प्रमाण बरेंचसें कमी करणें हें एकंदर शासनपद्धतीच्या उधळपट्टीचें प्रमाण कमी करण्यावरच अवलंबून आहे. याचाच अर्थ असा कीं, हें सरकारच बदलणें जरूर आहे. संपूर्ण स्वातंत्र्याखेरीज हा बदल होणें अशक्य आहे. या हेतूनेंच २६ जानेवारीचा स्वयंस्फूर्त समारंभ होत आहे असें मला वाटते. त्या समारंभात लक्षावधि खेड्यांतील लोक एकदम सामील झाले ते तरी या स्फूर्तीनेंच. या घातकी दडपणापासून सुटका हेंच संपूर्ण स्वातंत्र्य अशी त्यांची भावना आहे. ग्रेटब्रिटनच्या मदतीनें हिंदुस्थानची ही लूट चालली आहे. हिंदी लोकांनीं एकजुटीनें ती थाबवण्याची धरपड केली तरी लूट दिवसानुदिवस चाललीच आहे. एकही मोठा ब्रिटिश राजकीयपक्ष ही लूट थावविण्यास तयार आहे असें दिसत नाहीं.

कांहीं झालें तरी, जर राष्ट्र म्हणून हिंदुस्थानला जगायचे असेल, आणि उपासमारीने हळूहळू येणारा हिंदी जनतेचा हा मृत्यु थाबवावयाचा असेल तर तावडतोबीचा काहीं तरी उपाय शोधणे अगदीं जरूर आहे. नियोजित परिषद हा खात्रीनें तो उपाय नव्हे. वादविवादानें मतें पटविण्याचा हा प्रश्न नाहीं. हा प्रश्न शेवटीं सामर्थ्याच्या कसोटीवरच येऊन बसतो. मतें पटोत किंवा न पटोत ग्रेट ब्रिटन आपला हिंदी व्यापारी संबंध व इतर हितसंबंध उचलून धरण्यासाठीं आपल्या हातीं असलेल्या सर्व सामर्थ्याची पराकाष्ठा करणारच ! म्हणून त्या मगरमिठींतून सुटका करण्यासाठी हिंदुस्थाननेंही तितकें पुरेसें सामर्थ्य संपादिलें पाहिजे हें ओघानेच येतें.

अत्याचारी पक्ष कितीही विस्कळित व म्हणून आज कितीही क्षुद्र असला तरी तो दिवसेंदिवस प्रबळ होत आहे व आपलें आस्तित्व जाणवीत आहे. त्या पक्षाचें जें ध्येय तें माझेंहि ध्येय आहे. परंतु माझी खात्री आहे कीं, अत्याचारी मार्गानें लक्षावधि दीनाची मुक्तता होणार नाहीं. ब्रिटिश सरकारचा सनदशीर अत्याचार थाबविण्यासाठीं अत्यंत शुद्ध स्वरूपाचा अनत्याचार हाच एकमेव उपाय आहे अशी माझी खात्री दिवसेंदिवस दृढच होत चालली आहे. माझा अनुभव मर्यादित आहे हें तर खरेंच परंतु तेवढ्यावरून सुद्धा अनत्याचार ही एक प्रत्यक्ष अमोघ शक्ति होऊं शकते असें मला पटलें. अत्याचारी पक्षाच्या विस्काळित सामर्थ्याशीं व सनदशीर मार्गानें चाललेल्या ब्रिटिश सत्तेच्या अत्याचारी सामर्थ्याशीं टक्कर देण्याची सिद्धता करणें हा माझा हेतु आहे. स्वस्थ बसणें म्हणजे त्या दोन अत्याचारी शक्तींच्या हातात जाण्यासारखें आहे.

माझ्या माहितिप्रमाणें कळलेल्या अनत्याचारी मार्गाच्या उपयुक्ततेवर माझी निःसंशय व अचल श्रद्धा आहे. म्हणून यापुढें जास्त वेळ थावणे हें माझ्या दृष्टीनें घातकीपणाचें ठरणार आहे.

सविनय कायदेभंगाच्या द्वारें अनत्याचार व्यक्त होईल. सविनय कायदेभंगाची चळवळ आज फक्त सत्याग्रहआश्रमातील आश्रमवासीयापुरतीच मर्यादित राहणार आहे. परंतु या चळवळीच्या स्पष्ट असलेल्या मर्यादा ओळखून जे तींत सामील होण्याची इच्छा दाखवतील त्या सर्वांचा या चळवळींत समावेश पुढें मागे नक्की होणार हें खास.

अत्याचारास सुरवात करणें म्हणजे एका वेडसर साहसास हात घालण्यासारखें होणार हें मला माहीत आहे. परंतु साहसाखेरीज कधींही सत्याचा विजय होत नाहीं. आणि तीं साहसें सुद्धा अत्यंत धडाडीचीं अशींच असतात. आपल्यापेक्षा लोकसंख्येनें व प्राचीनत्वानें किती तरी मोठें असलेलें व सांस्कृतिक दृष्टया कोणच्याही दृष्टीनें कमी नसलेलें अशा एखाद्या राष्ट्रास कळत किंवा न कळत गिळंकृत करणारें जें राष्ट्र असतें त्या राष्ट्राचें आमूलाग्र मतांतर घडवून आणणें ही गोष्ट वाटेल तेवढ्या साहसाच्या योग्यतेची आहे.

मी मतांतर हा शब्द हेतुपुरस्सरच वापरला आहे. अनत्याचारी मार्गानें ब्रिटिश लोकाचें मतांतर घडवून आणणें आणि या रीतीनें त्यानीं हिंदुस्थानवर केलेले अन्याय त्यानाच पहावयास लावणे हीच माझी महत्त्वाकांक्षा आहे. तुमच्या लोकांना दुखविण्याचा मार्ग मी शोधीत नाहीं. माझ्या देशबांधवाप्रमाणेंच त्याचीही सेवा करावी अशी माझी इच्छा आहे. मी त्यांची नेहमीं अव्याहत सेवाच केली आहे अशी माझी श्रद्धा आहे. १९१९ सालपर्यंत मी अंधश्रद्धेनें त्याची सेवा करीत आलोंच. परंतु जेव्हा माझे डोळे निवळले व असहकारितेची कल्पना मला आली त्या वेळीं सुद्धा त्यांची सेवा करणें हेंच ध्येय होतें. माझ्या कुटुंबांतील प्रियतम अशा व्यक्तींवर लाचार होऊन मी ज्या शस्त्राचा यशस्वी प्रयोग केला तेंच शस्त्र मी येथें योजलें आहे. जर माझ्या बांधवाइतकेंच मला आपल्याही बांधवाबद्दल प्रेम वाटत असलें तर माझ्या बाबतींत तें कधीं गुप्त राहणार नाहीं. माझी पुष्कळ दिवस कसोटी घेतल्यावर माझ्या कुटुंबियानीं माझें प्रेम शेवटीं जसें कबूल केलें अगदीं त्याचप्रमाणें तुमचे बांधवही माझें प्रेम कबूल करतीलच. जर जनता मला येऊन मिळाली (आणि

ती नक्की मिळणारच ) आणि जर ब्रिटिश राष्ट्रानें लवकर माघार घेतली नाहीं तर माझ्या बरोबर आलेल्यांना इतकीं भयंकर दुःखें भोगावीं लागणार आहेत कीं, तीं पाहून पाषाणापेक्षां पाषाण असलेलीं अंतःकरणें विरघळतील !

मी वर ज्या दुष्ट गोष्टींचें उदाहरण दिलें तसल्या दुष्ट गोष्टींशीं युद्ध करणें हा सविनय कायदेभंगाचा कार्यक्रम आहे. आम्हाला ब्रिटिश संबंध तोडावे लागले तर ते त्या दुष्ट गोष्टीमुळेंच. जेव्हा त्या गोष्टी दूर होतील त्यावेळीं सर्व मार्ग सुरळीत निर्वेध होईल. नंतर मित्रत्वाच्या वाटाघाटीला वाट मोकळी होईल. जर ब्रिटिशाचा हिंदुस्थानबरोबर होत असलेला व्यापार हव्यासरहित झाला, तर आमचें स्वातंत्र्य मान्य करण्यास आपणास अडचण भासणार नाहीं. वरील दुष्ट परिस्थिति तावडतोब दूर करण्याचे मार्ग तयार करण्यासाठीं मी आपणास अत्यंत आदरपूर्वक विनंति करीत आहे. कारण असें केलें तरच समानशील मित्राच्या परिषदेस वाव मिळूं शकेल. असे मित्र स्वयंस्फूर्त सहकार्यानें मानव जातीच्या कल्याणासाठीं झटणारे पाहिजेत. आणि त्यानीं सहकार्याची वाट तयार करावयास पाहिजे व दोघानाही हितावह असा व्यवहार करणारे ते पाहिजेत. ज्या जातिविषयक प्रश्नाचा या देशावर दुष्परिणाम झाला आहे त्या प्रश्नावर आपण विनाकारण इतका भर दिला आहे. जरी राज्यपद्धतींची योजना करताना ते विचारात घेण्याइतकें महत्त्वाचे आहेत तरी जातीपेक्षा अत्यंत महत्त्वाचे व सर्वांना सारख्याच प्रमाणात लागू होणारे असे महत्त्वाचे प्रश्न आहेत त्याच्याशीं या जातिप्रश्नाचा फारच थोडा संबंध आहे. जर माझ्या पत्राचा आपल्या मनावर कांहींच परिणाम झाला नाहीं व जर या संकटातून आपणास कांहीं मार्ग काढता आला नाहीं तर या महिन्याच्या १० तारखेस मला स्वीकार्य वाटलेल्या आश्रमवासीय सहकाऱ्यासह मी मिठाच्या कायद्याचीं बंधनें झुगारून देण्यास सुरवात करीन. गरीब माणसाच्या दृष्टीनें मिठाचा कायदा हा सर्वांत मोठा अन्याय आहे असें वाटते. ज्या अर्थी संपूर्ण स्वातंत्र्याची चळवळ अत्यंत दीन अशा हिंदी जनतेसाठींच आहे त्या अर्थी या अन्यायापासूनच सुरवात केली जाईल. इतक्या क्रूर अरेरावीला इतक्या दिवस आम्हीं मान वाकवली हेंच आश्चर्य आहे. मला अटक करून माझे बेत हाणून पाडण्यास आपण मोकळे आहात. मला आशा आहे कीं माझ्यानागें माझें काम हातीं घेण्यासाठीं सहस्रावधि लोक सुसंघटित होऊन सज्ज होतील

माझ्या माहितीप्रमाणें कळलेल्या अनत्याचारी मार्गाच्या उपयुक्ततेवर माझी निःसंशय व अचल श्रद्धा आहे. म्हणून यापुढें जास्त वेळ थांबणे हें माझ्या दृष्टीनें घातकीपणाचें ठरणार आहे.

सविनय कायदेभंगाच्या द्वारें अनत्याचार व्यक्त होईल. सविनय कायदेभंगाची चळवळ आज फक्त सत्याग्रहआश्रमातील आश्रमवासीयापुरतीच मर्यादित राहणार आहे. परंतु या चळवळीच्या स्पष्ट असलेल्या मर्यादा ओळखून जे त्यांत सामील होण्याची इच्छा दाखवतील त्या सर्वांचा या चळवळींत समावेश पुढें मागें नक्की होणार हें खास.

अत्याचारास सुरवात करणे म्हणजे एका वेडसर साहसास हात घालण्यासारखें होणार हें मला माहीत आहे. परंतु साहसाखेरीज कधींही सत्याचा विजय होत नाहीं. आणि तीं साहसें सुद्धा अत्यंत धडाडीचीं अशींच असतात. आपल्यापेक्षा लोकसंख्येनें व प्राचीनत्वानें किती तरी मोठें असलेलें व सांस्कृतिक दृष्टया कोणच्याही दृष्टीनें कमी नसलेलें अशा एखाद्या राष्ट्रास कळत किंवा न कळत गिळंकृत करणारें जें राष्ट्र असतें त्या राष्ट्राचें आमूलाग्र मतांतर घडवून आणणें ही गोष्ट वाटेल तेवढ्या साहसाच्या योग्यतेची आहे.

मी मतांतर हा शब्द हेतुपुरस्सरच वापरला आहे. अनत्याचारी मार्गानें ब्रिटिश लोकांचें मतांतर घडवून आणणें आणि या रीतीनें त्यांनीं हिंदुस्थानवर केलेले अन्याय त्यानाच पहावयास लावणें हीच माझी महत्त्वाकांक्षा आहे. तुमच्या लोकाना दुखविण्याचा मार्ग मी शोधीत नाहीं. माझ्या देशबांधवाप्रमाणेंच त्यांचीही सेवा करावी अशी माझी इच्छा आहे. मी त्यांची नेहमीं अव्याहत सेवाच केली आहे अशी माझी श्रद्धा आहे. १९१९ सालपर्यंत मी अंधश्रद्धेनें त्याची सेवा करीत आलोंच. परंतु जेव्हा माझे डोळे निवळले व असहकारितेची कल्पना मला आली त्या वेळीं सुद्धा त्याची सेवा करणें हेंच ध्येय होतें. माझ्या कुटुंबांतील प्रियतम अशा व्यक्तींवर लाचार होऊन मी ज्या शस्त्राचा यशस्वी प्रयोग केला तेंच शस्त्र मी येथें योजलें आहे. जर माझ्या बांधवाइतकेंच मला आपल्याही बांधवाबद्दल प्रेम वाटत असलें तर माझ्या बाबतींत तें कधीं गुप्त राहणार नाहीं. माझी पुष्कळ दिवस कसोटी घेतल्यावर माझ्या कुटुंबीयानीं माझें प्रेम शेवटीं जसें कबूल केलें अगदीं त्याचप्रमाणें तुमचे बांधवही माझें प्रेम कबूल करतीलच. जर जनता मला येऊन मिळाली (आणि

ती नक्की मिळणारच ) आणि जर ब्रिटिश राष्ट्रानें लवकर माघार घेतली नाहीं तर माझ्या बरोबर आलेल्यांना इतकीं भयंकर दुःखें भोगावीं लागणार आहेत कीं, तीं पाहून पाषाणापेक्षां पाषाण असलेलीं अंतःकरणें विरघळतील !

मी वर ज्या दुष्ट गोष्टींचें उदाहरण दिलें तसल्या दुष्ट गोष्टींशीं युद्ध करणें हा सविनय कायदेभंगाचा कार्यक्रम आहे. आम्हांला ब्रिटिश संबंध तोडावे लागले तर ते त्या दुष्ट गोष्टींमुळेंच. जेव्हा त्या गोष्टी दूर होतील त्यावेळीं सर्व मार्ग सुरळीत निर्वेध होईल. नंतर मित्रत्वाच्या वाटाघाटीला वाट मोकळी होईल. जर ब्रिटिशांचा हिंदुस्थानबरोबर होत असलेला व्यापार हव्यासरहित झाला, तर आमचें स्वातंत्र्य मान्य करण्यास आपणास अडचण भासणार नाहीं. वरील दुष्ट परिस्थिति तावडतोब दूर करण्याचे मार्ग तयार करण्यासाठीं मी आपणास अत्यंत आदरपूर्वक विनंति करीत आहे. कारण असें केलें तरच समानशील मित्राच्या परिषदेस वाव मिळूं शकेल. असे मित्र स्वयंस्फूर्त सहकार्यानें मानव जातीच्या कल्याणासाठीं झटणारे पाहिजेत. आणि त्यानीं सहकार्याची वाट तयार करावयास पाहिजे व दोघानाही हितावह असा व्यवहार करणारे ते पाहिजेत. ज्या जातिविषयक प्रश्नाचा या देशावर दुष्परिणाम झाला आहे त्या प्रश्नावर आपण विनाकारण इतका भर दिला आहे. जरी राज्यपद्धतींची योजना करताना ते विचारात घेण्याइतके महत्त्वाचे आहेत तरी जातीपेक्षा अत्यंत महत्त्वाचे व सर्वांना सारख्याच प्रमाणात लागू होणारे असे महत्त्वाचे प्रश्न आहेत त्यांच्याशीं या जातिप्रश्नाचा फारच थोडा संबंध आहे. जर माझ्या पत्राचा आपल्या मनावर काहींच परिणाम झाला नाही व जर या संकटातून आपणास काहीं मार्ग काढता आला नाहीं तर या महिन्याच्या १० तारखेस मला स्वीकार्य वाटलेल्या आश्रमवासीय सहकाऱ्यासह मी मिठाच्या कायद्याचीं बंधनें झुगारून देण्यास सुरवात करीन. गरीव माणसाच्या दृष्टीनें मिठाचा कायदा हा सर्वात मोठा अन्याय आहे असें वाटते. ज्या अर्थी संपूर्ण स्वातंत्र्याची चळवळ अत्यंत दीन अशा हिंदी जनतेसाठींच आहे त्या अर्थीं या अन्यायापासूनच सुरवात केली जाईल. इतक्या क्रूर अरेरावीला इतक्या दिवस आम्हीं मान वाकवली हेंच आश्चर्य आहे. मला अटक करून माझे बेत हाणून पाडण्यास आपण मोकळे आहात. मला आशा आहे कीं माझ्यामागें माझें काम हातीं घेण्यासाठीं सहस्रावधि लोक सुसंघटित होऊन सज्ज होतील

आणि कायदेभंग करीत असतां, कायद्याच्या पुस्तकास कलंक झालेले असे जे कायदे आहेत त्यांच्या दुष्ट अंमलबजावणीस ते लोक तोंड देतील.

आपणांस विनाकारण अडचणींत पाडावें अशी माझी इच्छा नाहीं, किंवा शक्य तोंवर कोणच्याही तऱ्हेनें आपणांस पेंच पडूं नये असेंच इच्छितों. जर माझ्या पत्रात कांहीं स्वारस्य आहे असें आपणांस वाटत असेल व जर माझ्या बरोबर विचारविनिमय करण्याची आपणांस फिकीर वाटत असेल आणि तोंपर्यंत मी हे पत्र प्रसिद्ध करूं नये अशी आपली इच्छा असेल तर त्या अर्थाची आपली तार आल्याबरोबर मी स्वस्थ बसेन, परंतु जर या पत्रातील मतलबानुसार आपण आपला मार्ग शोधूं शकत असाल तरच आपण मला थोपवावें. नाहींतर माझ्या योजनेपासून मला परावृत्त न करण्याची कृपा करावी.

हे पत्र कोणच्याही अर्थानें धमकीवजा म्हणून लिहिले नाहीं. तर सविनय कायदेभंग करणाऱ्या कार्यकर्त्याचे हें अत्यंत पवित्र व साधें असें प्राथमिक कर्तव्य आहे. म्हणून मी हें पत्र मुद्दाम एका तरुण इंग्लिश मित्राच्या हस्ते पाठवीत आहे. त्या मित्राना हिंदुस्थानच्या कार्याबद्दल आस्था वाटते. त्याची अनत्याचारावर श्रद्धा आहे आणि जणूं या कार्यासाठींच परमेश्वरानें त्यांना माझ्याकडे धाडलें आहे.

आपला मित्र

मो. क, गांधी.

वरील पत्र मि. रेजिनॉल्ड रेनाल्ड हे इंग्लिश तरुण दिल्लीस घेऊन गेले. ते गृहस्थ आश्रमांत काहीं दिवस राहिलेले होते. गांधींच्या पत्राला लॉर्ड अर्विन साहेबानीं तावडतोब असंदिग्ध असें उत्तर पाठविलें. ते उत्तर म्हणजे एक निर्वाणींचा निरोप होता असा अभिप्राय जनतेनें व वृत्तपत्रानीं व्यक्त केला. ज्या मार्गामुळें कायदेभंग नक्की होणार व ज्यामुळें सार्वजनिक शांततेस धोका होईल हें स्पष्ट दिसत आहे अशा मार्गाचा विचार गांधींनीं ठरवावा याबद्दल व्हाइसरॉय साहेबांनीं दिलगिरी व्यक्त केली. गांधींनीं या उत्तरास प्रत्युत्तर पाठविलें तें त्यांच्या वैशिष्ट्यास साजेसेंच होतें. कमालीचा विनय व धैर्य हीं कोणच्याही सत्याग्रहीची मुख्य सिद्धता त्या पत्रात ओतप्रोत होतीं.

गांधींनीं लिहिलें:—आपल्यापुढें गुडघे टेकून मी भाकरीची याचना केली आणि भाकरीऐवजीं धोंडा माझ्या पदरांत पडला! इंग्लिश राष्ट्र फक्त सक्तीला जुमानतें आणि म्हणून व्हाइसरॉयच्या पत्राचें मला आश्चर्य वाटलें नाहीं.

सार्वजनिक तुरुंगांनीं उत्पन्न केलेली शांतता एवढाच शाततेचा प्रकार जनतेच्या परिचयाचा आहे। हिंदुस्थान हा एक विशाल तुरुंग आहे. या ब्रिटिश कायद्याचा-मी धिःक्कार करतों आणि मुस्कटदाबी करून राष्ट्राचे प्राण ज्यामुळें गुदमरूं लागात ती सक्तीची शांतता व तिचें करुणाजनक ओंगळ स्वरूप यांचा विध्वंस करणें हें मी माझें कर्तव्य समजतो.

अशा तऱ्हेनें गांधींची मोहीम अपरिहार्य झाली होती. जरूर ती सर्व तयारी आधींच झाली होती आणि खरें म्हणजे जगडव्याळ तयारीची जरूरीहि नव्हती. विद्यापीठांतून आपणहून ज्यांनीं स्वयंसेवक होण्याची तयारी दाखविली असे ७९ स्वयंसेवक आश्रमांतून व विद्यापीठांतून निवडण्यांत आले होते. २०० मैल अंतर पायीं तुडवताना जी शिस्त व जो काटकपणा जरूर असतो तो त्या स्वयंसेवक सैनिकाच्या अंगीं पुरेपूर बाणला होता. दांडी हें समुद्रकाठचें एक खेडें आहे. दाडीच्या वाटेवर जीं कांहीं खेडीं होतीं त्यांना अशी सक्त ताकीद दिली होती कीं हे दांडीचें यात्रेकरू आपला मार्ग काढीत असतां त्याच्या ऐषआरामाची कोणीही खटपट करूं नये. केवळ नैतिक स्वरूपाची अशी ही तयारी गाधी करीत होते. यावेळीं येत्या संकटाला तोंड देण्यास शेतकऱ्यास सिद्ध करण्यासाठीं वल्लभभाई आपल्या गुरूच्या आधीं निघाले होते. पहिला तडाखा लगावण्याची संधि सरकारला लवकरच मिळाली. गांधीचे दूत म्हणून वल्लभभाई पुढें चाललेले सरकारनें पाहिले. त्या वेळीं १९०० वर्षांपूर्वी होऊन गेलेल्या जॉन दि बॅप्टिस्ट या येशूच्या देवदूतासारखे सरकारला वल्लभभाई भासले. आणि ती कल्पना मनांत येतांच मार्चच्या पहिल्या आठवड्यात सरकारनें वल्लभभाईवर रास येथें हात टाकला. त्याना ३ महिने कैद ठोठावली. वल्लभभाईना अटक झाल्याबरोबर सर्व गुजराथ प्रांत खडबडून जागा झाला व सरकारशीं सामना देण्यास पुढें आला. साबरमतीच्या वाळवंटावर ७५००० लोक जमा झाले व त्यांनीं खालील ठराव पास केला।

" आम्ही अहमदाबादचे रहिवासी असा निश्चय जाहीर करतों कीं, आम्ही वल्लभभाईच्याच मार्गानें त्याच्या मागोमाग जाणार. आणि तो मार्ग आक्रमीत असतां आम्ही पूर्ण स्वातंत्र्य मिळवणार. देशाला स्वातंत्र्य मिळाल्याखेरीज आम्ही शात बसणार नाहीं आणि सरकारला शांतता लाभूं देणार नाहीं.

मंदिरात असत्यावर सत्याचा जय व्हावा अशी योजना असेल, प्रकाशापुढें अंधार पराभूत व्हावा व अविनाशी आत्म्यानें मृत्यूवर जय मिळवावा अशी योजना असेल तर हिंदुस्थानलाही जय मिळणें अपरिहार्य आहे.

हिंदी स्वातंत्र्य नाटकाचा हा विलक्षण प्रसंग जगाच्या रंगभूमिवर रंगत असतांना नवीन शब्दप्रयोग प्रचारांत आले. एकाद्या प्रांताचें बार्डोलीकरण, या शब्दाचा अर्थ आपण पाहिलाच. आता बोरसादचें " चैतन्य " हा शब्द-प्रयोग ही त्यावरोबर सुरू झाला व तो रूढ होण्याच्याच योग्यतेचा आहे.

दांडीचें प्रयाण सुरू झालें त्याच वेळी ऑ. इं. कॉं. कमिटीची बैठक २१ मार्च १९३० रोजीं अमदाबाद येथें झाली. मिठाच्या कायद्याकडेच लोकांनीं सर्व लक्ष स्थिर करावें व गांधी दांडीस पोंहोचेपर्यंत व त्यांनीं मिठाचा कायदा मोडेपर्यंत सविनय कायदेभंग देशात कोठेंही सुरू करूं नये अशी सूचना देण्यात आली. सरदार वल्लभभाई व सेनगुप्त यांच्या कारागृहवासाबद्दल अभिनंदन करण्यांत आले आणि गुजराथमधील खेडेगावच्या ज्या अधिकाऱ्यांनीं सरकारी नोकरीचे राजीनामे दिले त्याचेंही कमिटीनें अभिनंदन केलें. सत्याग्रहीनें करावयाच्या प्रतिज्ञेचा एक मसुदा तयार करावा असें वाटल्यावरून गांधींच्या संमतीनें खालील प्रतिज्ञा तयार करण्यात आली:—

( १ ) राष्ट्रीय सभेने हिंदुस्थानच्या संपूर्ण स्वातंत्र्यासाठीं सुरू केलेल्या सविनय कायदेभंगाच्या चळवळींत मी सामील होऊं इच्छितों.

( २ ) सर्व शांतताप्रधान व न्याय्य साधनांनीं हिंदुस्थानच्या लोकांनीं संपूर्ण स्वातंत्र्य मिळविणें हें राष्ट्रीय सभेचें ब्रीद मला मान्य आहे.

( ३ ) तुरुंगात जाण्याची माझी तयारी आहे व या मोहिमेंत मला जीं कांहीं इतर दुःखें व प्रायश्चित्तें भोगावीं लागतील तें सर्व भोगण्यास मी स्वखुषीनें तयार आहे.

( ४ ) जर मी तुरुंगात गेलों तर माझ्या कुटुंबाकरिता कोणचीही आर्थिक मदत कॉंग्रेस फंडातून मिळविण्याचा प्रयत्न करणार नाहीं.

( ५ ) मोहिमेच्या अधिकाऱ्याची आज्ञा मी कसोशीनें पाळीन.

आपल्या अटकेच्या नंतर लोकांचीं कर्तव्यें व वागणूक यांबद्दल त्यांना सूचना देणें ही गांधींची नेहमींचीच पद्धति आहे. मोहिमेच्या वेळीं लवकरच अपेक्षिलेल्या अटकेच्या आधीं गांधींनीं खालील लेख २७ फेब्रु. रोजीं लिहिला:

'मला अटक झाल्यानंतर'

ही गोष्ट गृहीतच धरली पाहिजे कीं, सविनय कायदेभंग सुरू झाला म्हणजे मला अटक होणार हें नक्कीच. जेव्हां तो प्रसंग येईल त्यावेळीं काय करावयास पाहिजे याचा विचार करणें जरूर आहे.

१९२२ सालीं माझ्या अटकेच्या वेळीं मी लोकांना बजावून सांगितलें होतें कीं, कोणचाही देखावा करूं नये. शांतपणें पूर्ण अनत्याचाराचें पालन एवढी एकच गोष्ट करावयास पाहिजे आणि लोकास असे सांगितले होतें कीं सविनय कायदेभंगासाठीं देशाची तयारी होण्याकरिता काहीं प्रत्यक्ष सुसंघटित काम करणें एवढा एकच मार्ग आहे. तेव्हा असें काहीं प्रत्यक्ष कार्य अत्यंत कसोशीनें चालू राहिलें पाहिजे. त्यापैकीं पहिला भाग शब्दशः व पूर्णपणे पाळला गेला याबद्दल परमेश्वराचे आभार मानले पाहिजेत. लोकांनीं इतकी शांतता त्या प्रसंगीं पाळली कीं, कोणीं एका इंग्लिश उमरावानें कुत्सितपणें वर्णन केलें कीं, "एक कुत्रेंसुद्धां भुंकलें नाहीं." मला ज्यावेळीं तुरुंगांत कळलें कीं, लोक पूर्णपणें अनत्याचारी राहिले, त्यावेळीं मला वाटलें कीं, अनत्याचाराच्या शिकवणुकीचा हा परिणाम जाहिरपणें व्यक्तच झाला व बारडोलीला केलेला निश्चय ही फार शहाणपणाची गोष्ट झाली. मला अटक झाल्याबरोबर 'कुत्रीं' भुंकलीं असतीं व लोकानीं मोकाटपणें अत्याचार केले असते तर काय झालें असतें याचा अंदाज करीत बसणे मूर्खपणाचें होईल. एक गोष्ट मात्र मी सांगू शकतो कीं, जर तसें झालें असतें तर लाहोरचा संपूर्ण स्वातंत्र्याचा ठराव झाला नसता आणि अनत्याचाराच्या सामर्थ्यावर विश्वास ठेवून अकल्पनीय असें विलक्षण साहस करण्याचा बेत करणारा एकही "गांधी" उरला नसता !

आपण आता समोर आलेल्या भविष्य कालाबरोबर विचार करूं.यावेळीं माझ्या अटकेनंतर शांत निष्क्रिय असा अनत्याचार नको आहे. तर प्रत्यक्ष अनत्याचारास सुरुवात व्हावयास पाहिजे.प्रत्यक्ष अनत्याचाराचा तो प्रयोग इतक्या विशाल प्रमाणावर व्हावयास पाहिजे. अनत्याचारावर हिंदुस्थानच्या स्वातंत्र्य संपादनाचें एक तत्त्व म्हणून श्रद्धा ठेवणारा एकही माणूस त्या प्रयोगाच्या शेवटीं या गुलामगिरीपुढें मान वाकविण्यास रिकामा राहता किंवा जिवंत राहता कामा नये. म्हणून माझ्या जागीं माझ्या मागून येणाऱ्या पुढाऱ्याच्या सांगण्याप्रमाणें सविनय कायदेभंगात भाग घेणें हें प्रत्येकाचें कर्तव्य आहे.

माझ्यामागें सर्व राष्ट्राच्या वतीनें पुढें येईल असा कोणी मला आज दिसत नाहीं हे मला कबूल केलें पाहिजे. म्हणून 'माझ्या मागें 'काँग्रेस' आज्ञा करील त्याप्रमाणें' असेंच म्हणावयास पाहिजे. परंतु माझ्या सहकारी मित्रांवर आणि माझ्या कार्यावर माझा इतका पूर्ण विश्वास आहे कीं, परिस्थितीच माझ्यामागें असा माणूस तयार करील असें मला वाटतें. उद्दिश्य ध्येयासाठीं अनत्याचाराच्या उपयुक्ततेवर पूर्ण विश्वास असणें ही अट प्रत्येकास अगदीं अक्षरशः लागू आहे; कारण अशी जातिवंत श्रद्धा असल्याखेरीज, आणीबाणीच्या वेळीं अनत्याचाराचा मार्ग कोणता हें त्याला उमगणार नाहीं.

अर्थात् माझ्या या शब्दामुळें काँग्रेसच्या पूर्ण अधिकारावर व मतावर कोणच्याही तऱ्हेचें बंधन पडत नाहीं हें सागण्याची आवश्यकताच नाहीं. येथें सांगितलेल्या सर्व गोष्टींची काँग्रेस अशी व्यवस्था करील कीं, त्या साधारणपणें प्रत्येक काँग्रेसभक्तास लागूं पडतील.

मला वर्किंग कमिटीनें दिलेल्या स्वातंत्र्याचा खरा अर्थ जर योग्य रीतीनें लक्ष्यांत घेतला तर असें दिसेल कीं अनिर्बंध अशा अनत्याचारी मार्गाने कोणत्याही व्यक्तीवर किंवा संस्थेवर बंधनें लादलीं जात नाहींत. अनत्याचाराचीं जीं काय बंधनें आहेत तीं ज्यानें त्यानें आपणच आपल्यावर लादून घेतलेलीं च स्वयंस्फूर्तीनें पाळावयाचीं अशीं असतात. या परिस्थितींत अनत्याचार एवढा एकच मार्ग आहे अशी जोंपर्यंत प्रत्येक काँग्रेसभक्ताची खात्री कायम आहे, माझ्यामागून चळवळींचीं सूत्रें हातीं घेणाऱ्या माणसावर आणि वर सागितलेल्या अर्थानें अनत्याचाराच्या तत्त्वावर, श्रद्धा ठेवणाऱ्या प्रत्येक व्यक्तीवर, नुसता त्यांच्या स्थानाचा अधिकार एवढ्यापुरतीच श्रद्धा न ठेवता, चळवळीचे मार्गदर्शक होण्याविषयीं त्यांच्या वैयक्तिक लायकीवरही प्रत्येक काँग्रेसभक्ताचा विश्वास असेल तर प्रत्येकाला व त्या चळवळींच्या सूत्रचालकाना काँग्रेस आपले आशीर्वाद देईल आणि वर मी सांगितलेल्या गोष्टी व माझ्या मागून येणाऱ्या पुढाऱ्यांच्या योजना अंमलात आणून दाखवील. (म्हणजे पुढाऱ्यांच्या वैयक्तिक लायकीवर व अनत्याचाराच्या तत्त्वावर जर प्रत्येक काँग्रेसभक्ताचा पूर्ण विश्वास असेल तर काँग्रेसही त्यावर विश्वास ठेऊन माझें इतकें वैयक्तिक स्वातंत्र्य प्रत्येकास देईल कारण अनिर्बंध अशा शुद्ध अनत्याचारास कोणच्याही अटी व नियम लागत नाहींत. त्याचे नियम खऱ्या तत्त्वपालकासच आपोआप कळतात.)

माझ्यापुरतें मी असें ठरवलें आहे कीं, आश्रमवासी मित्र व आश्रमांत

असलेली शिस्त ज्यांनीं पाळली आहे व आश्रमाचे ध्येय ज्याच्या आचरणांत मुरलें आहे असे मित्र एवढेच लोक बरोबर घेऊन मी चळवळीस सुरवात करणार आहे. युद्धाच्या आरंभीच जे आत्मदानास तयार होतील त्याची जगात कीर्ति ऐकूंसुद्धा येणार नाहीं ! शिस्तीचे दीर्घकालीन आचरण करून आश्रमास स्थैर्य प्राप्त व्हाव या हेतूनें आजपर्यंत आश्रमाचें सामर्थ्य मुद्दाम राखून ठेवले होतें. आजपर्यंत आश्रमावर जो विश्वास ठेवण्यात आला आहे व मित्रानीं त्यावर जो प्रेमाचा वर्षाव केला आहे त्याला जर सत्याग्रहाश्रम योग्य ठरावयाचा असेल तर सत्याग्रह या शब्दात व्यक्त होणारे सर्व गुणधर्म आश्रमाने जगास दाखविण्याची वेळ आली आहे असें मला वाटतें. मला असेंही वाटतें कीं, आम्ही आमच्यावर लावून घेतलेल्या बंधनाना सूक्ष्मपणें ढिलाई प्राप्त झाली आहे व आम्हीं मिळविलेल्या लौकिकाच्या जोरावर आम्हाला काहीं विशेष हक्क व सवलती मिळालेल्या आहेत. त्या हक्कास व सवलतीस आम्हीं कदाचित् पूर्णपणें नालायक असूं. परंतु सत्याग्रहाच्या मार्गानें आम्हीं या सवलतीचा व हक्काचा चोख हिशेब देऊं असा एखादा दिवस उगवेल, अशा आशेनें आम्ही या सवलती व जादा हक्क आभारपूर्वक पत्करले. १५ वर्षांनंतर जर आश्रमाला सत्याग्रहाचें आदर्श स्वरूप व्यक्त करता आलें नाहीं तर मी व तो आश्रम नष्ट व्हावा हें चांगलें आणि त्यात माझें, आश्रमाचें व राष्ट्राचें कल्याणच होईल.

" कार्याची सुरुवात चागली व मनापासून झाली आहे ह्मणून सर्व देशभर त्याला पाठिंबा मिळेल अशी मला आशा आहे. ज्याना ही चळवळ यशस्वी व्हावयास पाहिजे असेल त्यांनीं ती पूर्णपणें अनत्याचाराची व शिस्तशीर राखली पाहिजे. सेनानीनें बोलाविलें नाहीं तोंपर्यंत कोणीही आपली जागा सोडता कामा नये. जर आपोआप सार्वत्रिक सहानुभूति मिळाली, आणि मला तर खात्री आहे कीं, ती मिळणारच आणि मागला अनुभव जर उपयोगाचा ठरला तर माझी खात्री आहे कीं, ही चळवळ आपोआप स्वयंशासित राहील. तिला कोणाच्या मार्गदर्शकत्वाची किंवा बंधनाची जरूर राहणार नाहीं. परंतु धोरण ह्मणून किंवा तत्त्व ह्मणून असो ज्याची ज्याची अनत्याचारावर श्रद्धा आहे त्यानें त्यानें या सर्वव्यापी चळवळीस सहाय्य करावयास पाहिजे. सर्व जगाचा असा अनुभव आहे कीं सामुदायिक चळवळी अनपेक्षित पुढारी निर्माण

करतात.ही चळवळही त्याला अपवाद ठरूं नये म्हणून अत्याचाराच्या शक्तीस सुचेल त्या व शक्य त्या मार्गानें प्रतिकार करावयास पाहिजे व त्याच वेळीं याचीही काळजी घेतली पाहिजे की या वेळी एकदा सविनय कायदेभंग सुरू झाला कीं तो कोणच्याही कारणासाठीं थांबला जाऊं नये आणि जोंपर्यंत एखादा तरी सविनय कायदेभंग करणारा शिल्लक राहिला आहे किंवा जिवंत उरला आहे तोपर्यंत तो बंद पडूं नये. प्रत्येक सत्याग्रही खालीलपैकीं कोणत्या तरी एकाद्या स्थितींत असलाच पाहिजे; तो तुरुंगात तरी असावा, कायदेभंगात तरी मग्न असावा, हातरहाटावर त्याचें कार्य चालू असावें किंवा स्वराज्य जवळ आणणाऱ्या कोणच्या तरी विधायक कार्यात तो काम करीत असावा. मो. क. गांधी.

याच सुमारास पंडित मोतीलाल नेहरूंनीं आनंदभुवनाची बादशाही देणगी जाहीर केली.

१९२० सालीं लखनौ येथे सर्वपक्षीय परिषद चालू होती आणि पंडित जवाहरलाल नेहरू समाजसत्तावादाच्या ( Socialism ) बाजूनें बोलत होते. त्यावेळीं संयुक्त प्रांतातील एका ठाकूरनें उठून थोड्याश्या उपहासाच्या स्वराने विचारलें, " आनंदभुवनाचें काय झालें ? तें अद्याप जमीनदोस्त झालें नाहीं. " आनंदभुवनासारखे कलेचें काम जमीनदोस्त करतां येत नाहीं. त्याची फक्त मालकी आणि हेतु बदलूं शकतात. रशियामध्ये सोव्हिएटांनींसुद्धा झारचा क्रेमलीन राजवाडा उध्वस्त केला नाहीं किंवा जमीनदोस्त केला नाहीं तर त्याचें एका वस्तुसंग्रहालयात रूपांतर केलें. समाजसुधारणेचे तें एक शैक्षणिक केंद्र करून टाकलें. आनंदभुवनाचें सुद्धा असेंच रूपांतर झाले. ते ह्यापुढें स्वराज्य-भुवन या नावानें ओळखले जात आहे. पंडित मोतिलाल नेहरु हे या दानाचे मुख्य दाते आणि तें दान आपल्या पुत्राच्या द्वारें त्यांनीं राष्ट्रास अर्पण केलें आहे. सर्व राष्ट्र या दानाबद्दल त्याचें कृतज्ञतेनें अभिनंदन करित आहे.

दांडीचें प्रयाण चालू होतें त्यावेळीं हिंदुस्थानचे वातावरण अत्यंत आशा-वादी झाले होते. सुप्त सामर्थ्य नाहींसें करणें हें जितकें अवघड आहे तितकेंच अधीरता ताब्यांत ठेवणेंही अवघड आहे. परंतु कोणच्याही संघटनेंत शिस्त हें मुख्य तत्त्व असते. आणिबाणीच्या वेळीं हिंदुस्थाननें-ही आपल्या शिस्तीचा प्रभाव दाखवला. गांधींनीं सुरु केलेली

चववळ संख्येने, सामर्थ्याने आणि संपत्तीनें फोफावत होती. गांधींनीं आपली योजना सूत्ररूपाने व्यक्त केली. त्यांच्या शिष्यांनीं ती जनतेला समजावून सांगितली आणि तत्त्वोपदेशकानीं तो संदेश दूरवर पोहोंचविला. धर्मसंस्थापक एकच असतो, शिष्यसुद्धा थोडेसेच असतात आणि धर्मोपदेशक हे बहुसंख्य असतात. अशा रीतीनें या नवीन पंथाचा सर्व देशात घरोघर प्रसार झाला. ही एक लुटुपुटुची लढाई आहे असे फक्त एकट्या डॉ. बेझंट वर्णन करीत होत्या. काहीं दिवसापूर्वी अप्रत्यक्ष प्रतिकाराचें वारे राष्ट्रांत वाहात होते. नंतर प्रत्यक्ष विरोधाच्या ऐवजीं असहकार सुरू झाला. पुढें सविनय कायदेभंग त्या ठिकाणीं आला आणि क्रमानें सत्याग्रहानें त्यांची जागा घेतली.

गाधींचें प्रयाण सुरू झाल्यानंतर एक आठवडा गेला नाहीं तोंच वरवर शांत दिसणारें सरकार बेभान झाल्याचें दिसूं लागले गाधींचें महा-प्रस्थान सुरू होण्यापूर्वीच मार्चच्या पहिल्या आठवड्यात वल्लभभाईंना झालेली अटक बेकायदेशीर होती आणि त्याना झालेली चार महिन्याची शिक्षा ही तर त्याहूनही बेकायदेशीर होती. लवकरच आणखी एक सरकारी हुकूम आला. ज्या चित्रपटांत गाधींनीं हातांमध्यें काठी आणि टकळी घेतली आहे आणि कमरेला एक पंचा गुंडाळला आहे अशा तऱ्हेचा देखावा असलेला दाडीच्या प्रयाणाचा चित्रपट दाखवण्याची सरकारनें बंदी केली. हा हुकूम प्रातोप्रांतीं अंमलात आला. पोलिसाची आपल्या नेहमींच्या कामातून जवळ जवळ सुटका झाली होती आणि सर्व लक्ष देशातील असहकारी व्यक्तींवर रोखण्यात आलें होतें. जें सरकार सत्य आणि अनत्याचार याच्यावर उभारलेले नाहीं त्या सरकारकडून या दोन तत्त्वाच्या प्रचारकाना प्रामाणिकपणाचें किंवा कळ-कळीचें श्रेयही मनमोकळेपणाने मिळूं नये यात काहींच आश्चर्य नाहीं.

संकटाच्या आणि यातनाच्या या गर्दीतच पूर्ण स्वराज्याचा जन्म पहाण्याचें समाधान मिळत होतें. त्याच्यासाठी कोणच्याही साधनाची अपेक्षा नसते; तें फक्त सामान्य श्रमाचें फळ आहे

राजकीय सत्ता डळमळीत झाली कीं,राजकीय संकटे उत्पन्न होऊन इभ्रतीचा नाश होऊं लागतो. आणि त्यामुळें नैतिक:यातना होतात. आमचा तरी एव-ढाच हेतू होता. यापेक्षां काहीं विशेष रीतीनें सरकारचा छळ करण्यासाठीं आम्ही सिद्ध झालों आहोंत असें कोणीही समजूं नये. राजसत्ता आणि जनता

यांच्यामधील युद्ध हें धर्मयुद्धाच्याच रूपाचे असतें. लोकांचे जमीनजुमले, त्यांचीं घरेंदारें, त्यांचे व्यापार, याच्यावर हल्ला करून आणि सत्याग्रहींना मदत केल्यास आमची इतराजी होईल अशा तऱ्हेचा धाकदपटशा दाखवून सरकारनें मात्र त्या युद्धाला अमंगल स्वरूप आणलें आहे. या दहशतीपुढें लोक जितक्या प्रमाणांत मान वांकवतात, तितक्या प्रमाणांत त्याचा नैतिक अधःपात होतो. परंतु ते ह्या गोष्टींचा जितका प्रतिकार करतात त्या मानानें स्वराज्याचा मार्ग सुकर होतो. आम्हाला हें माहीत आहे कीं थोड्याशा इंग्लिश शिक्षणाचा संस्कार झालेले आणि शहरातल्या राहणीचा सुखास्वाद घेतलेले लोक जितक्या लवकर नमतात तितक्या लवकर साधेसिधे आणि देशभक्त लोक हार खात नाहींत. खेड्यामधून असलेली देशभक्ताची संख्या पाहिली, इतकेंच नव्हे तर देशभक्तीबरोबरच पुढारी होण्याची त्यांच्यातली मुबलक लायकी पाहिली कीं, मनास आनंद झाल्यावाचून राहत नाहीं. खेड्यांनीं पुढारीपण पत्करलें कीं हल्लीं वाढत असलेल्या चळवळीचें यश निश्चित झाल्यासारखें आहे. प्रत्येक युगात आणि प्रत्येक परिस्थितींत चमत्कार होत असतात. हिंदुस्थानलाही अशा तऱ्हेचा आपला एक चमत्कार करून दाखवावयाचा होता. ६ मार्च १९३० रोजीं साबरमती आश्रमात गांधींच्या निशाणाभोंवतीं हजारों लोक जमले आणि आपल्या पायात शक्ति होती तोंपर्यंत किंवा उत्साह होता तोंपर्यंत ते लोक गांधींच्या पाठोपाठ गेले. हें अभूतपूर्व दृश्य म्हणजेच २० व्या शतकात हिंदी लोकांनीं आपल्या मातृभूमींत करून दाखवलेल्या चमत्काराचें दृश्य होतें. गांधींच्या बरोबर आणि त्यांच्या धर्मवीरावरोबर जे लोक गेले त्यात देशातील आणि देशाबाहेरील वर्तमानपत्राचे बातमीदार, फोटोग्राफर, सिनेमावाले, आणि भोंवतालच्या खेड्यातील हजारों लोक होते. खेड्यातून जमा झालेले लोक निरनिराळ्या प्रांतातून समूहानें आले होते. गांधी नेहमीं म्हणत असत कीं हिंदुस्थानच्या स्वातंत्र्ययुद्धाचा भार गुजराथनें सहन करावा. आणि जर गुजराथनें ते केलें आणि गुजराथला करावयाला परवानगी मिळाली तर देशाच्या उरलेल्या भागानें त्या युद्धांतील अपरिहार्य यातना सहन करण्याचें कारण उरणार नाहीं.

त्या लोकांबरोबर असलेल्या एका बातमीदारानें केलेलें वर्णन खालीं दिलें आहे.—

"निवडक अशा ७५ स्वयंसेवकांसह १२ मार्च रोजीं सकाळीं गांधींनीं सविनय कायदेभंगाच्या मोहिमेसाठीं आपला आश्रम सोडला.

आणि समुद्रकांठीं असलेले, २०० मैल अंतरावरचे दांडी हें गाव त्यांनीं मीठ तयार करण्यासाठीं निवडलें. बॉम्बे क्रॉनिकलच्या शब्दांत सांगावयाचें म्हणजे या महत्त्वाच्या राष्ट्रीय घडामोडीच्या पूर्वी झालेले, त्या वेळीं होत असलेले आणि मागून झालेले प्रसंग इतके हृदयस्पर्शी, भव्य आणि अंत:करण हलवून सोडणारे होते कीं, त्याचें वर्णन करणें अशक्य होऊन जातें. देशभक्तीची लाट मानवी अंत:करणात आजपर्यंत कधींही चढली नव्हती, इतकी उंच ती त्या क्षणीं उचंबळलेली दिसली. हिंदुस्थानच्या स्वातंत्र्याच्या इतिहासात त्या देशभक्तीचें वर्णन करताना " एका प्रचंड चळवळीची सुरवात " या शब्दांनीं तें नमूद झाल्याशिवाय रहाणार नाही

गांधींनीं आपल्या हातात केवळ आधारासाठीं म्हणून एक मोठी काठी घेतली होती. सर्व सैन्य अत्यन्त शिस्तीनें चालले होतें. अग्रभागीं असलेला तो सेनानी हा त्या सर्वांना खरोखरच स्फुर्तीचा झरा वाटत होता. १० मैलावर असलेल्या असलाली गावापर्यंत सर्व वाटेवर हजारों लोक दोन्ही बाजूंस जमले होते. हिंदुस्थानच्या सेनापतींचें दर्शन घेण्यासाठीं ते कित्येक तासपर्यंत ताटकळत उभे राहिले होते. अहमदाबादला त्या प्रसंगीं चिरस्मरणीय होईल इतकी मोठी मिरवणूक निघाली होती. शहरातील अर्भकें आणि अधू होऊन घरात पडलेले असे लोक वगळले तर उरलेल्या प्रत्येक शहरवासीयानें दोन मैल पसरलेली ती प्रचंड मिरवणूक पाहिली असली पाहिजे.

प्रयाणाच्या मार्गावर प्रत्येक ठिकाणीं लोक जमत आणि हिंदुस्थानला मुक्त करणाऱ्या या महात्म्याला वंदन करीत.गांधींच्या जयजयकारानें आकाश दुमदुमून गेलें होतें. मुक्ततेचा नवीन मार्ग सुरू झालेला दिसत होता. परंतु उपदेश मात्र जुन्या मंत्राचाच होत होता. त्यांत खादी वापरणें, मद्यपानापासून परावृत्त होणें आणि अस्पृश्यतानिवारण या तीन गोष्टी मुख्य होत्या सर्वांनीं सत्याग्रहींना येऊन मिळावें ही नवी मागणी होती. मार्चमध्यें गांधींनीं असें जाहीर केलें कीं, "वाटेमध्ये मरण आलें तरी मी पत्करीन किंवा जगलोंच तर स्वराज्य मिळेपर्यंत आश्रम वर्ज्य करीन. मिठाचे कायदे नाहींसे करण्यात यश मिळेपर्यंत आश्रमात परत येण्याचा माझा मुळींच विचार नाहीं." खेड्याची स्वच्छता आणि सूत कातणें या गोष्टींवर ते जोर देत होते. शेंकडों स्वयंसेवक मोहिमेंत सामील होत होते. गांधींच्या अटकेची वेळ येऊन ठेपली होती. आणि त्यांची जागा अब्बास तय्यबजी घेणार होते. श्री. प्रफुल्लचंद्र रे

लॉरीनें दूध मागविलें आणि असेच आणखीही इतर खर्च त्यांनीं केले. त्या खर्चाचें त्याना समर्थन करतां आलें नाहीं त्यामुळें मी त्यांना अतिशय रागावून बोललो. परतु त्यानें माझें दुःख कमी झाले नाहीं, उलट त्याना दिलेल्या दुःखा-वर मी जो जो विचार करतों तो तो माझ्या वेदना वाढतच जातात. या गोष्टी उघडकीस आल्यानंतर असें वाटतें कीं, आमच्या सर्वसाधारण उत्पन्नापेक्षां आपला पगार ५००० पट जास्त आहे यावर जबरदस्त टीका करणारे पत्र व्हाइसरॉयनां पाठवण्याचा मला काय अधिकार उरला ? आम्ही तर आमच्या उत्पन्नाच्या मानानें बेसुमार होणारा त्याचा पगार कसा सहन करूं शकलों आहोंत ? परंतु त्याबद्दल त्याना व्यक्तिशः दोष देता येत नाहीं. त्यांना तितक्या पगाराची जरूर आहे असें नाहीं. परमेश्वरानेच त्याना श्रीमंत केले आहे. कदा-चित् त्याचा सर्व पगार दानधर्मांत खर्च होत असेल असेंही मी आपल्या पत्रांत सूचित केलें आहे. त्यानंतर मला असें समजलें कीं, माझा अंदाज खरा ठर-ण्याचा बराचसा संभव आहे, तरीसुद्धा इतक्या मोठ्या पगाराबद्दल निषेध करीत राहणे हें माझें कर्तव्य आहे. दरमहा २१००० रुपये मला माझ्या मतानें मान्य झाले नाहींत. फार काय २१०० रुपये पगारसुद्धा मला मान्य होत नाहीं, परंतु हा निषेध करण्याचा अधिकार मला केव्हा प्राप्त होणार ? जर मी स्वतःच माझ्या लोकाकडून असमर्थनीय असा ‘ कर ’ वसूल करीत असेन तर मला निषेध करण्याचा मुळींच अधिकार नाहीं. लोकाच्या सर्वसाधारण उत्पन्ना-प्रमाणे माझी काहींशी जरी राहाणी असती तरच मी निषेध करूं शकलों असतों. आपण परमेश्वराच्या नावानें हें प्रयाण करीत आहोंत. भुकेलेलें, वस्त्र-हीन आणि बेकार अशा दीनाच्या वतीनें कार्य करण्याची भूमिका आपण घेतली आहे. आपल्या लोकांचें सर्वसाधारण दैनिक उत्पन्न ७ पैसे आहे, त्या उत्प-न्नाच्या ५० पट सुद्धां जास्त उत्पन्न आपण देशाकडून लुबाडीत असलो तर व्हाइसरॉयच्या पगारावर टीका करण्याचा मला काहींही अधिकार नाहीं. सर्व खर्चाचा हिशेब आणि एकंदर सर्व कार्य कसे चाललें आहे या गोष्टी मला कळ-विण्याविषयीं मी कार्यकर्त्यांना सांगितलें. आमच्यापैकीं प्रत्येकजण ७ पैशाच्या जवळ जवळ ५० पट खर्च करीत असला तर त्यात मला आश्चर्य वाटण्याचें काय कारण ? जर त्यांनीं माझ्यासाठीं वाटेल त्या मार्गानें निवडक नारिंगें आणि द्राक्षें आणिलीं, मला १२ नारिंगाची गरज असतां १२० आणलीं, मला १ पौंड दूध पुरत असता त्यांनीं ३ पौंड मिळविले तरी त्याचासुद्धा यापेक्षां निराळा

असा परिणाम काय होणार? आमच्यापुढे तुम्ही ज्या सुखसोयी ठेवतां त्या आम्ही घेतल्या नाहींत तर तुमच्या भावना दुखावल्या जातील" अशा सबबीनें आम्ही त्या घेतल्या तर त्याचा तरी परिणाम दुसरा काय होणार? तुम्ही आम्हांला पेरू आणि द्राक्षें देता आणि एका श्रीमंत शेतकऱ्याची देणगी आहे म्हणून तीं आम्ही खातो. आता आपण कल्पना करा की, माझ्या एका उदार मित्रानें मला अतिशय मूल्यवान गुळगुळीत असे कागद आणि एक फौंटनपेन् दिलें आहे, त्या फौंटनपेननें मी अगदीं मनमोकळेपणानें व्हाइसरॅायला पत्र लिहून टाकलें व माझ्या मनाला काहींही बोचणी झाली नाहीं. तर हें तुम्हाला आणि मला बरें दिसेल काय? अशा तऱ्हेनें लिहिलेल्या पत्राचा काडीइतका परिणाम होणें शक्य आहे काय?

अशा तऱ्हेने आपली राहणी ठेवणे म्हणजेच आखोंभगत या भक्ताच्या प्रसिद्ध अभंगाचें प्रत्यक्ष उदाहरण तयार करण्यासारखेंच आहे. तो म्हणतो, "चोरलेलें अन्न हें अशुद्ध पारा खाण्यासारखेंच आहे आणि आपल्या गरीब देशाला योग्य अशा साधनापेक्षा जास्त साधनें जमवून जगणें हें चोरलेल्या अन्नावर उपजीविका करण्यासारखें आहे. अशा चोरलेल्या अन्नावर उपजीविका करून हें युद्ध आपल्याला कधींही जिंकता येणार नाहीं. आणि मी सुद्धा चैनींत दिवस काढण्यासाठीं हें प्रयाण सुरू करण्याचा व्यवहार सुरू केला नाहीं. हजारों स्वयंसेवक आपल्याला येऊन मिळतील अशी आपण वाट पहात आहोंत. अवाढव्य खर्च करून त्याची व्यवस्था करणें आपल्याला अशक्य होईल. माझें आयुष्य इतकें कार्यव्यग्र झालेले आहे कीं माझ्या ८० सोबत्याचे सुद्धा निकट सहवासात राहून व्यक्तिशः त्याची ओळख ठेवण्यास मला वेळ मिळत नाहीं म्हणून चार लोकापुढें माझ्या जीवाचें दुःख हलकें करण्याखेरीज मला मार्ग नव्हता. माझ्या सांगण्याचा मुख्य मुद्दा आपण लक्षात घ्यावा. जर तो मुख्य मुद्दा आपणास समजला नसेल तर या चालू प्रयत्नानीं स्वराज्य मिळविण्याची मुळींच अपेक्षा नाहीं. लक्षावधि दीनाचे आपण खरे खरे विश्वस्त व्हावयास पाहिजे."

या व्याख्यानाचा कल्पनातीत परिणाम श्रोत्यावर झाला आणि २०० पाटलानीं आपले राजीनामे सादर केले. नवसारी येथें पार्शी लोकांसमोर बोलतांना गांधींनीं त्याना ताडी आणि दारू यांचा व्यापार सोडून देण्याबद्दल कळकळीनें

विनंती केली. जर हिंदुस्थानातून मिठाचा कर आणि दारूचा व्यापार हद्दपार करतां आला तर तोच अहिंसेचा विजय आहे आणि असें झालें तर हिंदुस्थानला स्वराज्याच्या वाटेवर जगातील कोणची शक्ति अडवून धरूं शकेल ? जर अशी एखादी शक्ती असेल तर ती मला पहावयाची आहे, मला पाहिजे ते मिळवून मी तेथून परत येईन किंवा त्या शक्तीशीं लढतांना माझें मृत शरीर महासागरावर तरंगूं लागलेले तरी दिसेल.

५ एप्रिल रोजी सकाळी गांधी दांडीस पोहोचले. श्रीमती सरोजिनी देवी याही त्याना भेटण्यासाठीं तेथे गेल्या होत्या. त्या ठिकाणी असोसिएटेड प्रेसला दिलेल्या मुलाखतींत गाधी म्हणालेः—

" स्वातंत्र्ययुद्धाच्या पहिल्या मोहिमेचा आनंदकारक शेवट असें ज्याचे वर्णन करता येईल " त्यावद्दल परमेश्वराचे आभार मानले पाहिजेत. मला स्वतःला तर ही शेवटची मोहीम वाटते. सर्व प्रयाणात अलिप्तपणाचें धोरण पूर्णपणें पाळल्यावद्दल मला सरकारचे आभार मानल्यावाचून राहवत नाहींत. वल्लभभाईंना केलेली अटक आणि कैद हा अनुदारपणाचा आणि पोरकटपणाचा प्रकार आणि श्री. सेनगुप्त यांना केलेली अटक आणि कैद हा तसलाच दुसरा प्रकार. हे दोन्ही प्रकार पाहिल्यानंतर मात्र या कौतुक करण्यासारख्या अलिप्तपणाचें कौतुक करण्यास माझी मुळींच तयारी नाहीं. लोकाच्या भावना प्रक्षुब्ध करण्याचें आणि नंतर दडपशाहीनें त्यांना शिक्षा करण्याचें सरकारचें अनुभवसिद्ध सामर्थ्य आता एकदम नाहींसें झालें आहे असें मानण्याइतका मी मूर्ख नाहीं. अंतःकरणांत किंवा वागणुकींत खरोखरच काहीं फरक होऊन हें अलिप्तपणाचे धोरण सरकारनें स्वीकारलें आहे असा विश्वास माझ्यात उत्पन्न व्हावयास पाहिजे. लेजिस्लेटिव्ह असेंब्लीमध्यें वेदरकारपणे लोकाच्या भावना लाथाडण्याची कृति आणि त्याची एकंदर अरेरावी ही पाहिली म्हणजे वाटेल त्या मार्गानें निर्दयपणें हिंदुस्थानची लूट करण्याचे धोरण टिकवलें जाणार आहे यावद्दल संशय बाळगण्याचें काहींच कारण उरत नाहीं. या अलिप्तपणाच्या वागणुकीचा मी एवढाच अर्थ करतों कीं ब्रिटिश सरकारला अद्याप लौकिकाची चाड आहे. जोंपर्यंत कायदेभंग हा विनयशील मार्गानें आणि पूर्ण अनत्याचारानें चालू आहे तोंपर्यंत सविनय कायदेभंग ही फार मोठी राजकीय क्रांति आहे. अशा तऱ्हेच्या उग्र स्वरूपाचे

राजकीय प्रक्षोभ दडपून टाकण्याचे प्रयत्न जगाला कधींही मान्य होणार नाहींत, हें सरकारला माहीत आहे. ब्रिटिश सरकार सामर्थ्यवान् असले तरी जगाबद्दलही दहशत बाळगून आहे.

सरकारने हे प्रयाण चालूं दिले तसेंच उद्यापासून असंख्य लोक मीठाच्या कायद्याचा जो प्रत्यक्ष कायदेभंग करतील तें सहन केले जाईल कीं नाहीं हें अद्याप पाहावयाचें आहे. वर्किंग कमिटीच्या ठरावाला विस्तृत प्रमाणावर लोक दुजोरा देतील अशी मला आशा आहे. सर्व कमिट्यानीं आणि संघानीं आपली तयारी असेल तर उद्यापासून मिठाच्या कायद्याच्या बाबतींत सविनय कायदे-भंगास सर्व देशभर सुरवात करावी अशा तऱ्हेची सूचना मी नुक्तीच केली आहे. ती सूचना रद्द करण्याचें मला अद्याप काहींच कारण दिसत नाहीं. परमे-श्वराची इच्छा असेल तर उद्या सकाळीं ६॥ वाजता माझ्या स्वयंसेवक मित्रा-बरोबर सविनय कायदेभंगास मी प्रत्यक्ष सुरवात करणार आहे. ६ एप्रिल हा जालीअन्वाला – कत्तलादिन आहे. म्हणून तो आमचा तपश्चर्येचा आणि आत्मशुद्धीचा दिवस आहे. म्हणून प्रार्थनेने आणि उपवासानें आम्ही त्या दिवसास सुरवास करतो. उद्यापासून जें राष्ट्रकार्य सुरु होईल ते ज्या भावनेने योजिलेलें आहे त्या भावनेनें सर्व हिंदुस्थानभर ते केलें जाईल अशी मला आशा आहे. राष्ट्रकार्यासाठीं जितके जास्त मोठें " अर्पण " होईल, आणि जितके जास्त शुद्धिकरण होईल तितक्या जास्त वेगाने, ज्यासाठीं लक्षावधि हिंदी लोक जाणूनबुजून किंवा न कळत झगडा करीत आहेत, त्याचा तेजस्वी शेवट होईल याबद्दल मला तिळमात्र शंका नाहीं.

सकाळची प्रार्थना संपली आणि समुद्राकिनाऱ्यावर पडलेले मीठ उचलून मीठाचा कायदा मोडण्यासाठीं, आपल्या स्वयंसेवकासह गांधी तिकडे निघाले. मीठ उचलल्याबरोबर गांधींनीं खालील मजकूर वर्तमानपत्राकडे पाठविला.

मीठाच्या कायद्याचा तात्त्विक किंवा औपचारिक भंग आता झाला आहे. मीठाच्या कायद्यानुसार शिक्षा पत्करण्याचें साहस असेल त्याने त्याला सोईस्कर अशा स्थळीं व वेळीं मीठ तयार करण्यास हरकत नाहीं. माझें तर सागणें असे आहे कीं, कार्यकर्त्यांनीं सर्वत्र मीठ तयार करावें आणि शुद्ध मीठ तयार करण्याचे ज्याना माहीत असेल त्यानीं त्याचा उपयोग करावा व त्याचप्रमाणें खेडेगावातील लोकास शिकवावें. परंतु असे करण्यात शिक्षेचें साहस आपण करीत आहांत हेंही त्याना सागावें. म्हणजेच मीठाच्या

कायदेभंगाचा सर्व परिणाम त्याना समजून सांगावा.त्या बाबतींतील कायदेकानू त्यांना स्पष्ट करावेत आणि ते नाहींसे करण्यासाठीं ते कसे मोडावेत ती पद्धति ही सांगावी.

शेतकऱ्याना हें स्पष्ट समजलें पाहिजे कीं, हा कायदेभंग करणें हें पूर्ण न्याय्य आहे. त्यात काहींही पाप नाहीं. किनाऱ्याजवळच्या दरडींतून हें मीठ निसर्गानें तयार केलें आहे. त्याचा शेतकऱ्यांनीं स्वतःसाठीं व आपल्या गुरांसाठीं उपयोग करावा आणि जे घेतील त्याना तें विकावें.

हें करण्यांत त्या सर्व लोकाना हे माहीतच असतें कीं, मीठाच्या कायद्यांचा भंग आपण करीत आहोंत आणि तेंच शिक्षेचें साहस पत्करीत आहोंत किंवा शिक्षा झाली नाहीं तरी निदान मीठाच्या अधिकाऱ्याकडून आपला छळ होण्याचा तरी संभव आहेच.

राष्ट्रीय आठवडाभर म्हणजे १३ एप्रिलपर्यंत मीठाच्या कायद्यावर मोहिम चालू ठेवावी. जे या पवित्र कामात प्रत्यक्ष गुंतलेले नाहींत त्यानीं विदेशी वस्त्रबहिष्काराचें व खादीप्रसाराचें कार्य अत्यंत जोरांत करावें. शक्य तितकी खादी तयार करण्याचेंही कार्य त्यानीं करावें. यासाठीं व मद्यपाननिषेधाच्या कार्यासाठीं मी हिंदीस्त्रियासाठीं एक संदेश तयार करीत आहे. स्वातंत्र्यसंपादनाच्या कामीं पुरुषापेक्षा स्त्रिया जास्त सहाय्य करतील अशी माझी दिवसेंदिवस खात्री वाढत चालली आहे.अनत्याचाराच्या तत्त्वाचा अर्थ सागण्याचें कामीं पुरुषापेक्षा स्त्रिया जास्त लायक ठरतील असें वाटतें. याचें कारण, त्या दुर्बल आहेत असें पुरुषाना अरेरावच्या भरात वाटतें; तसें नाहीं तर त्याना सत्यस्वरूपाचें जास्त धैर्य आहे, आणि आत्मत्यागाची त्याची वृत्ति पुरुषापेक्षा किती तरी पटींनीं विशाल आहे हें त्याचें खरें कारण आहे. ”

एका पत्रकात गांधींनी सागितलें:—

आतांपर्यंत हातीं आलेल्या माहितीवरून मला असें वाटतें कीं, गुजराथेतील सविनय कायदेभंगाच्या विलक्षण स्वरूपाचा सरकारावर परिणाम झाला आहे. मुख्य लोकाना अटक करण्यात सरकारनें मुळींच उशीर केला नाहीं. परंतु इतर प्रातातील लोकावरसुद्धा सरकारची अशीच दृष्टी वळली असेल हें मला माहित आहे. ही एक अभिनंदनाची बाब आहे.

“ सविनय विरोधकाना सरकारनें आपाआपल्या मार्गानें जाऊं दिलें असतें तर ती एक आश्चर्याची गोष्ट झाली असती. न्यायाचा मार्ग सोडून जर सरकारनें

शरीर व संपत्ति यावर आतिक्रमण केले असतें तर ते कृत्य रानटीपणाचे ठरलें असते.

रीतसर फिर्यादी व शिक्षा यांच्या बाबतींत कोणचाही अपवाद संभवत नाहीं. काहीं झालें तरी, सविनय प्रतिकाराचें हे तर्कशुद्ध फळच आहे.'

" इतक्या लोकांना अटक झाल्यानंतरही जर सरकारी वा निमसरकारी शाळातील व कॉलेजातील विद्यार्थी आपल्या शाळा व कॉलेजें सोडून बाहेर येऊन सहानुभूति दाखवणार नाहींत तर मला त्याबद्दल फार दुःख वाटेल ! "

जेव्हां एका स्वयंसेवकाच्या मनगटावर पोलिसांनीं लहानशी दुखापत केली त्या वेळी गांधी म्हणाले.—

मीठ काढून घेण्यासाठीं लोकांच्या अंगांवर हात टाकणे हा नैतिक गुन्हा आहे. मला असे वाटतें कीं, इंग्लिश कायद्याप्रमाणें हा प्रत्यक्ष गुन्हाच आहे. परंतु कायद्याने कोणचे अधिकार त्यांना दिलें आहेत ते मला माहित नाहीं. कायदेशीर मार्ग सरकारला या स्थितींत फार अनावर वाटत असतील परंतु त्यानीं आरंभ चांगला केला आतां शेवट वाईट करूं नये. जर त्यानीं दंडुकेशाहीचा आश्रय केला तर त्याला लोक तयार आहेत असे त्याना आढळून येईल. प्रयत्न खुंटेपर्यंत लोकांनीं मीठाचें रक्षण करावें. परंतु हें सगळें करतांना रागाचा शब्द उच्चारतासुद्धा कामा नये. मीठाचा ताबा घेण्याचा राजमार्ग पोलिसांना खुला आहे. प्रथम त्यानीं सविनय प्रतिकारकाना कैद करावी आणि नंतर मीठ त्याना ताब्यात घेता येईल. कारण कैदेनें त्याना शरीराचा ताबा मिळतो. परंतु तें मीठ फक्त शिक्षेनंतरच जप्त करता येईल. तत्पूर्वी करता येणार नाहीं."

स्त्रियाविषयीं नवसारी येथे गांधी म्हणाले :—

मीठाच्या आगरासाठीं झगडताना पुरुषाबरोबर स्त्रियानीं भाग घेऊं नये. स्त्रियाशीं सरकार युद्ध करणार नाहीं असें मी सरकारच्या वतीनें सांगतों.आपण सरकारला असें करावयास भाग पाडणें चुकीचें ठरेल. सरकार फक्त पुरुषांवर नजर ठेवीत आहे तोंपर्यंत हें युद्ध, हें पुरुषांचें युद्ध आहे. सरकार ज्या वेळीं मर्यादा सोडील त्यावेळीं स्त्रियाना हल्ल्यास तोंड देण्यास पुरेसा अवधि मिळेल ! !

६ एप्रिलपासून मीठ-सत्याग्रह करण्यास परवानगी मिळाल्यानें सर्व देश-

झाड तोडून लोकाना झाडें तोडण्यास सागितलें. ४ मे रोजीं सुरत येथें स्त्रियांच्या सभेंत गाधी म्हणाले " यापुढें माझ्या सभेंत तुम्ही टकळीवाचून बसता कामा नये:— "

खेडा जिल्हा गुजराथमधील मोहिमेचें मुख्य रणक्षेत्र होतें. गाधींनीं नवजीवनमध्यें लिहिलें

"लोकानीं शांतता राखली आहे परंतु तीव्र सामाजिक बहिष्काराच्या बाबतींत मात्र अद्याप राग द्वेष असल्यानें त्यात अत्याचाराचें बीज आहेच. सरकारी अधिकाऱ्याना अगदीं क्षुद्र बाबतींत लोक हैराण करतात व त्याची बदनामीं करतात.यानें लोकाचा जय होणार नाहीं.मामलेदार आणि फौजदार या सरकारी अधिकाऱ्याचे दोष आपण उघडकीस आणावेत. आपल्या तीव्र बहिष्कारात आदर व प्रेम असावयास पाहिजे. नाहींतर केंव्हां तरी दंगे उद्भवतील. मामलेदार व फौजदार मर्यादा ओलाडतील.फौजदारांनीं तर मर्यादा सोडलीच आहे मग लोकानीं मर्यादा सोडली तर त्यात काय आश्चर्य आहे!

" खेडा जिल्ह्यातील लोकानीं बहिष्काराची मर्यादा नीट लक्ष्यात ठेवावी. खेडेगावातील अधिकाऱ्यावर फक्त त्याच्या अधिकारापुरताच मी बहिष्कार घालावयास सागितला आहे. त्याच्या आज्ञा फक्त मानूं नयेत परंतु त्याची अन्नसामग्री थाबविण्याचें कारण नाहीं. घरातून त्याची हकालपट्टी करूं नये. जर हें आपल्याला जमत नसेल तर बहिष्कार सोडून द्यावा."

गाधींनीं नंतर व्हाइसरॉयना दुसरें पत्र लिहिलें व धारासना चारसाडा येथील मीठागरावर हल्ला करण्याचा आपला इरादा कळविला. अर्थात्‌च गाधींच्या अटकेची वेळ येऊन ठेपली होती आणि ५ तारखेस सकाळीं त्यांना येरवड्यास प्रत्यक्ष नेईपर्यंत त्याच्या अटकेबद्दल कोणाला माहितीसुद्धा नव्हती.

सुरत जिल्ह्यातील धारासना येथें पहिला हल्ला होणार होता. सरकारला या मीठागरापासून लोकाना परतवायचें असलें तर ते फक्त बंदुकींच्या जोरावरच करता येणार. गाधींनीं त्या मीठागराचा ताबा घेण्याचें ठरवलें व त्याप्रमाणें व्हाइसरॉयना पत्र लिहिलें—

प्रिय मित्र,

परमेश्वरानें अनुमति दिली तर माझ्या अनुयायासह धारासना येथें जाऊन तेथील मीठागराचा ताबा मागण्याचा माझा बेत आहे. धारासना ही खासगी इस्टेट आहे असें लोकांना सागण्यात आलें आहे. परंतु ही निव्वळ बतावणी

आहे. व्हाइसरॉयचें घर हें जितकें सरकारी आहे, तितकेंच धारासना मीठागरही सरकारी आहे. अधिकाऱ्याची आगाऊ परवानगी घेऊन तेथून मीठाची चिमूटही नेता येत नाहीं. आपल्याला हा हल्ला तीन प्रकारें थांबवितां येईल.

१. मीठाचा कर काढून टाकून.

२. मला व माझ्या तुकडीला अटक करून; पण तेंही जर लोकांनीं तावडतोब दुसरी तुकडी तयार केली नाहीं तरच ! पण लोक तावडतोब तसें करणार अशी मला खात्री आहे.

३. केवळ गुंडगिरी करून; पण तेथें प्रत्येकाचें डोकें फोडल्यावर पुनः नवीन डोकीं तेंथें तावडतोब उभीं राहिलीं नाहींत तर; पण मला तसें वाटत नाहीं.

हें पाऊल टाकण्यापूर्वी मी संशयग्रस्त होतों. सरकार सविनय विरोधकाशीं सभ्यपणानें वागेल अशी मला आशा होती. कायद्याच्या नेहमींच्या पद्धतीनें सरकारनें विरोध चालू ठेवला असता व त्यातच समाधान मानलें असतें तर माझें काहीं म्हणणें नव्हतें. परंतु काहीं प्रसिद्ध पुढाऱ्याच्या बाबतींत कायदेशीरपणा दाखवून बाकीच्या लोकाना मात्र रानटीपणानें व कित्येक वेळां तर असभ्यपणानें मारपीट करण्यात आली आहे. याही गोष्टी अपवादासारख्या एकदोन असल्या तरी तिकडे दुर्लक्ष झालें असतें. परंतु बंगाल, बहार, उत्कल, संयुक्तप्रांत, दिल्ली, मुंबई या सर्व ठिकाणाहून मला जी माहिती मिळाली आहे ती गुजराथच्या अनुभवाला दुजोरा देणारीच आहे असें मी साधार दाखवूं शकेन. कराची, पेशावर आणि मद्रास येथें झालेला गोळीबार अगदीं अनावश्यक होता व शांत वातावरणात तो झाला असे दिसून येईल. हाडें मोडलीं गेलीं व इतर त्रास देण्यात आला आणि हें कशासाठीं तर— स्वयंसेवकाना सरकारी किंमत देणें भाग पाडण्यासाठीं आणि स्वयंसेवकाच्या दृष्टीनें पाहिलें तर त्याच्याकडून अमूल्य मीठ हिरावून घेण्यासाठीं ! मथुरा येथें एका दहा वर्षाच्या मुलाजवळील राष्ट्रीय निशाण मॅजिस्ट्रेटनें हिसकावून घेतलें ! भोंवतालच्या लोकसमूहानें तें निशाण देऊन टाकण्याबद्दल मागणी केली असता त्याना निष्ठुरपणें पिटाळून लावण्यात आलें ! आणि शेवटीं तें निशाण देऊन टाकण्यांत आलें. यात वाईट मनोवृत्ति व्यक्त झाली ! बंगाल-

मध्यें मीठाच्या बाबतींत धरपकड कमी झालेली दिसते. परंतु स्वयंसेवकाकडून निशाण खेंचण्यात मात्र असामान्य क्रौर्य दाखविण्यात आलें. भाताचीं शेतें जाळण्यात आलीं व अन्नसामुग्री हिसकावण्यात आली असें समजतें. सरकारी अधिकाऱ्याना भाजी विकण्याचें नाकारल्यावरून गुजरायेंत एक भाजीमार्केट लुटण्यात आले. कॉंग्रेसतत्त्वासाठीं जे लोक अप्रतिकारपणें शात राहिले, अशा लोकाच्या समूहाच्या डोळ्यासमोर या गोष्टी झाल्या. सत्याचें व्रत घेतलेल्या लोकानीं सागितलेल्या या हकीकतीवर आपण विश्वास ठेवा. वरिष्ठ अधिकाऱ्यानीं केलेला निषेध व इन्कार बारडोली प्रकारातल्याप्रमाणेंच खोटा आहे हें सिद्ध झालें आहे. गेल्या पाच आठवड्यातसुद्धा अधिकाऱ्यानीं खोट्या गोष्टी लोकाना सागण्यात कुचराई केली नाहीं याबद्दल मला खेद होतो. गुजराथेंत कलेक्टरच्या ऑफिसातून प्रसिद्ध झालेलें खालील पत्रक मी उदाहरण म्हणून घेतों:—

( १ ) " मोठ्या माणसाना वर्षाला ५ पौंड मीठ लागतें. म्हणजे त्याना प्रत्येकीं ३ आणे कर द्यावा लागतो. जर सरकारनें आपला मक्ता काढून घेतला तर लोकाना जास्त किंमत द्यावी लागेल आणि मक्ता काढल्यामुळें होणारें सरकारी नुकसान भरपाई करावी लागेल तें निराळेंच. समुद्राकिनाऱ्यावर आपण वेंचता ते मीठ खाण्यासारखें नसतें आणि सरकार तें नाहीं-करून टाकतें.

( २ ) " गाधी म्हणतात कीं, सरकारनें या देशातील हातसुताचा धंदा बुडवला हें खरें नाहीं. कारण प्रत्येकाला हें माहीत आहे कीं, देशात असें एकही खेडें नाहीं कीं, जेथें हातसुताचा धंदा चालू नाहीं. याशिवाय प्रत्येक प्रातातील सूत कातणाऱ्याना सूत काढण्याच्या सुधारलेल्या पद्धति दाखविल्या जातात. आणि कमी किंमतींत जास्त चागली यंत्रसामुग्री पुरविली जाते व अशा रीतीनें सरकारकडून त्याना सहाय्य करण्यात येतें. "

(३) सरकारनें जें कर्ज काढलें आहे त्यातल्या प्रत्येक पाच रुपयापैकीं ४ रुपये अत्यंत हितावह मार्गानें खर्च झाले आहेत.

मी हीं तीन विधानें तीन निरनिराळ्या पत्रकातून घेतलीं आहेत. यातलें प्रत्येक विधान अगदीं उघडउघड खोटें आहे. वर सागितलेल्या रकमेच्या निम्मट रकमेचें मीठ प्रत्येकाला लागतें आणि अर्थात् प्रत्येकाला दरवर्षी १ आणे कर

द्यावा लागतो यात काही संशय नाहीं. हा कर पुरुष, स्त्री, मूल, गुरे यांच्या कडून सरांस घेतला जातो! त्यात वयाचा किंवा आरोग्याचा विचारच नाहीं.

प्रत्येक खेड्यांत सूतरहाट चालू आहे आणि सूतकामाच्या चळवळीला कोणच्यातरी प्रकारनें किंवा स्वरूपाने सरकार आश्रय किंवा उत्तेजन देत आहे. हीं अत्यंत दुष्ट अशीं खोटीं विधानें आहेत. सरकारच्या रोजच्या व्यवहारातलि जीं हजारो असत्य विधानें लोकाच्या परिचयाचीं आहेत त्याचे वरील नुसते नमुनेच आहेत. कालच एका गुजराथी कवीला–एका शूर माणसाला सरकारनें खोटा पुरावा उभारून शिक्षा केली. तरी तो ओरडून सागत होता कीं, त्या विशिष्ट वेळीं तो दुसरीकडेच शात झोंप घेत होता!

जे स्वयंसेवक अगदी शातपणे काम करीत होते असें अधिकाऱ्यानीं कबूल केलें आहे त्या स्वयंसेवकावर दारू दुकानदारानीं हल्ले केले व कायदा गुंडाळून ठेवून दारू विकली! सरकारच्या तटस्थपणाचे हें उदाहरण आहे. बेकायदेशीर दारू विक्रीकडे किंवा स्वयंसेवकावरील हल्ल्याकडे त्यानीं मुळींच लक्ष दिलें नाहीं.

मी वर्णन केलेल्या गोष्टी कदाचित् आपणास माहितिही नसतलि. आपला त्यावर विश्वासही बसणार नाहीं. परंतु त्याकडे आपळें फार काळजीपूर्वक लक्ष वेधणें एवढेंच मला करता येईल.

अधिकाराचीं वाघनखें आपण उघड करावींत असे मी आपणास आव्हान करणें हे भेकडपणाचें होईल असें मला वाटतें. यातनानीं आणि आपल्या मालमत्तेच्या राखरांगोळीनें लोकाना कार्य करण्यास चेतवलें आहे व त्यामुळें सरकारचें खरें स्वरूप उघड झालें आहे. आपण सत्तेचीं वाघनखें उघड करून दाखविलींत कीं, त्या परिस्थितींत सत्याग्रहाचा कार्यक्रम जितका पूर्णपणें पार पाडता येईल तितका पार पाडण्याची लोक पराकष्ठा करतील! कारण सत्याग्रहाचें शस्त्र असें आहे कीं सरकारची दडपशाही आणि बेकायदेशीरपणा जितका जास्त असेल तितकें जास्त दुःख त्या सरकारला वळी पडणाऱ्या लोकानीं पत्करलें पाहिजे. स्वयंस्फूर्तीनें पत्करलेलीं भयंकर दुःखें सहन केलीं कीं विजय हेच त्याचे पर्यवसान असतें. माझ्या मार्गातील धोके मला माहीत आहेत परंतु लोक माझ्या हेतूचा गैरसमज करणार नाहींत असें वाटतें. मला जे वाटते तेंच मी बोलतों. गेलीं १५ वर्षे हिंदुस्थानात व २० वर्षे हिंदुस्थानच्या बाहेर मी सागत आलो तेंच आता पुन्हा सागतों कीं अत्याचाराला जिंकण्याचा मार्ग म्हणजे अत्यंत शुद्ध असा अनत्याचार हाच एक आहे.

वारंवार हें सागून सुद्धां लोक अत्याचारी होतीलच ! प्रत्येक मनुष्यावर इतर प्रत्येक माणसाच्या कृत्याची जेवढी जबाबदारी असते तेवढीच मी पत्करतो. यापेक्षा जास्त जबाबदारी मी घेऊं शकत नाहीं. परंतु जबाबदारीचा प्रश्न सोडून दिला तरी कोणच्याही कारणासाठीं मला कार्य थांबवता येत नाहीं कारण अनत्याचार ही एक शक्ति आहे.जगातील विभूतींनीं तें कबूल केलें आहे आणि त्याचे मला जे व्यापक अनुभव आहेत ते मला खोटे ठरवायचे नाहींत; यासाठीं मला अनत्याचाराचें कार्य केलेंच पाहिजे.

" परंतु याच्यापुढें पाऊल टाकण्याचें मात्र मी मोठ्या आनंदानें टाळीन. म्हणून मी आपणास मीठाचा कर काढून टाकण्याबद्दल विनंति करीत आहे. आपल्या कित्येक सुप्रसिद्ध देशबांधवानीं त्याचा तीव्र निषेध केला आहे. जागतिक धिक्कार त्या करामुळें उत्पन्न झाला आहे व सविनय कायदेभंगानें त्याबद्दलचा क्रोध व्यक्त झाला आहे. या गोष्टी आपल्याही नजरेंतून सुटल्या नसतील. सविनय कायदेभंगाचा आपण वाटेल तेवढा निषेध करा त्याच्याऐवजीं आपणास अत्याचारी प्रतिकार चालेल काय ? सविनय कायदेभंगाचे शेवटीं अत्याचारात पर्यवसान होणार असें आपण म्हणालात तसें म्हणत असाल तर इतिहास असा निर्णय देईल कीं,अनत्याचाराचें ज्ञान नसल्यानें व तें ज्ञान ऐकण्याचें नाकारल्यानें सरकारनें लोकाना अत्याचारास प्रवृत्त केलें.कारण सरकारला अत्याचार काय हें समजूं शकतें,परंतु अशी कितीही चिथावणी झाली तरी चिथावणीशी लढण्याइतकें सामर्थ्य व शहाणपण परमेश्वर हिंदी लोकांना देईल व ते त्या अत्याचाराच्या मोहाला किंवा चिथावणीला बळी पडणार नाहींत अशी मी आशा करीन.

जर मीठाचा कर व खाजगी रीतीनें मीठ तयार करण्यावरचे निर्बंध आपणांस दूर करता येत नसतील तर मी या पत्राच्या सुरवातीला सांगितलेली मोहीम मला नाखुषीनें सुरू करावी लागेल.

आपला सहृदय मित्र.

मो. क. गांधी.

रात्रीं १ वाजून १० मिनिटांनीं गांधींना मोटार लॉरीत घालण्यात आलें. बरोबर पोलीस होते. तेथून नंतर रेल्वेनें त्याना मुंबईजवळील बोरिवलीला नेण्यांत आलें व तेथून येरवडा तुरुंगात नेलें.

लंडन टेलिग्राफचे मि. ॲशमीड बार्कलेट यानीं या अटकेचें खालील वर्णन केलें आहे—

'आम्ही गाडीची वाट पहात होतों. त्यावेळीं एकंदर वातावरण अत्यंत रोमहर्षणपर होतें, कारण आम्हां सर्वांना अशी जाणीव झाली. कीं, या प्रसंगाचे आम्हीच एकटे साक्षीदार आहोंत. हा एका खऱ्या किंवा खोट्या महात्म्याच्या अटकेचा प्रसंग अत्यंत इतिहासप्रसिद्ध होणार होता कारण खरें म्हणा किंवा खोटें म्हणा आज लक्षावधि हिंदी लोक गांधींना एक पवित्र व्यक्ति व साधू समजत आहेत हे दिसतें आहे. कोणी सांगावे आजपासून शंभर वर्षांनीं ३० कोट लोक त्यांची देवांत गणना करून भक्ति करतील! हे विचार आम्हाला टाळता आले नाहींत. पहाटेच्या वेळेस एका महात्म्याला ताब्यांत घेण्यासाठीं एका स्टेशनवर हजर राहणें हें आम्हाला विसंगतच वाटे.'"

अटकेच्या पूर्वींच गांधींनीं दांडी येथें खालील संदेश तयार करून ठेवला होता :—

"हा शुभारंभ शेवटास नेला तर संपूर्ण स्वातंत्र्यही खात्रीने मिळेल. आणि त्यामळें हिंदुस्थानने सर्व जगापुढें आपल्या सामर्थ्याचा आदर्श ठेवला असें होईल. स्वार्थत्यागावाचून मिळविलेलें स्वराज्य कधींही टिकाव धरीत नाहीं. म्हणून लोकाना अमर्याद स्वार्थत्याग करावा लागेल. खऱ्या स्वार्थत्यागात फक्त एकागीं दुःख भोगावीं लागतात. आणि तीं म्हणजे दुसऱ्याला न मारतां स्वतःस मरण पत्करावें लागतें. हिंदुस्थानला हें ध्येय गाठता येवो. या क्षणीं हिंदुस्थानचा स्वाभिमान व सर्वस्व एका मूठभर मिठात साठवलें आहे. मनगट मोडले तरी हरकत नाहीं परंतु मूठ उघडी होता कामा नये.

"परमेश्वर हाच या युद्धाचा नेता आहे, मी नाहीं. जर आपल्यामध्यें आत्मविश्वास असेल तर परमेश्वर आपणास नक्की मार्ग दाखवील. आपला मार्ग ठरलेला आहे. सर्व खेडीं मीठ उचलण्यासाठीं किंवा तयार करण्यासाठीं पुढें आलीं पाहिजेत; प्रत्येक आबालवृद्धानें टकळी चालवावी व दररोज पिळूंचें गठ्ठेच्या गठ्ठे विणले गेले पाहिजेत. परदेशी कापडाच्या होळ्या पेटल्या पाहिजेत. हिंदूंनीं कोणालाही अस्पृश्य मानूं नये. हिंदु, मुसलमान, पार्शी व ख्रिश्चन या सर्वांनीं एकमेकांना प्रेमालिंगनें दिलीं पाहिजेत. अल्पसंख्याक जातींना पुरेसें झाल्यावर जें उरेल त्यात बहुसंख्याक जातींनीं संतुष्ट रहावें. विद्यार्थ्यांनीं सरकारी शाळा सोडाव्यात, सरकारी नोकरांनीं राजीनामे द्यावेत आणि राजीनामे देणाऱ्या शूर पाटील व तलाठ्याप्रमाणें त्या सर्वांनीं जनसेवेंत नाव नोंदवावे. अशा रीतीनेंच आपणास पूर्ण स्वराज्य सहज मिळेल."

सरोजिनी नायडूनीं त्यानंतर स्फूर्तिदायक संदेश दिला.

गांधींच्या अटकेनंतर देशाच्या या टोंकापासून त्या टोंकापर्यंत स्वयंस्फूर्तीनें हजारों मार्गांनी सहानुभूति व्यक्त झाली. मुंबई, कलकत्ता व इतर कित्येक शहरांनीं आपणहूनच हरताळ पाळले. गांधींची अटक ही या स्फूर्तीची सूचनाच होती. अटकेच्या दुसऱ्या दिवशीं हरताळ खूपच पसरला. मुंबईला एक प्रचंड मिरवणूक काढण्यात आली आणि संध्याकाळीं झालेल्या प्रचंड जाहिर सभेंत अनेक व्यासपीठें उभारावीं लागलीं. ८० पैकीं ४० गिरण्याना स्वस्थ बसावें लागलें, कारण ५० हजारावर लोक निषेधार्थ बाहेर पडले. जी. आय. पी. आणि बी. बी. सी. आय. रेल्वेचे कामगारही कामावरून दूर झाले व हरताळात सामील झाले. अटकेचा निषेध व्यक्त करण्यासाठीं कापड व्यापाऱ्यांनीं सहा दिवस हरताळ पाळण्याचें ठरवलें. पुण्यास महात्माजींना ठेवले होतें तेथेंही पूर्ण हरताळ होता. ऑनररी कामगार व पगारी नोकरदार याचे राजीनामे मधून मधून जाहिर होत होते. एक दोन ठिकाणीं थोड्याश्या कटकटी होत होत्या. परंतु एकंदरींत सर्व देशानें महात्माजींचें तत्त्वज्ञान काहींशा आश्चर्यकारक प्रमाणात अंगीं बाणलेलें दाखवलें. सोलापूर येथें सहा पोलीस चौक्या जाळल्या गेल्यानें पोलिसांनीं गोळीबार केला व जवळ जवळ २५ माणसे ठार झालीं आणि शंभर जखमीं झालीं. कलकत्ता येथें शहरात हरताळ शांतपणें चालू होता तरी हौरा येथें पोलीसानीं गोळीबार केला. पंचनानूताल येथें जमाव मोडण्यासाठीं, १४४ कलम लागू करण्यात येऊन पाचांपेक्षा जास्त इसमाना एकत्र येण्याची बंदी करण्यात आली.

गांधींची अटक हा सर्व जगाचा एक विषय झाला. पनामा कालव्यात काम करणाऱ्या हिंदी लोकांनीं २४ तास हरताळ पाळला. सुमात्राच्या पूर्व किनाऱ्यावरील हिंदी लोकांनीं तेंच केलें आणि व्हाइसरॉयना व कॉंग्रेसला तारा करून त्यांनीं आपली दिलगिरी प्रदर्शित केली. गांधी व त्यानें कार्य यांच्या वर्णनांनीं फ्रेंच वर्तमानपत्रांचीं पानें भरून गेलीं होतीं. नैरोबी येथील हिंदूंनीं हरताळ जाहिर केला.

या दरम्यान निरनिराळ्या धर्मपंथाच्या १०२ अमेरिकन धर्मगुरूंनीं मि. रॅम्से मॅकडोनाल्ड याना आपल्या सह्यांची एक तार पाठविली व गांधींशीं व हिंदी जनतेशीं सामोपचारानें तडजोड करावी असें कळविलें. न्यू यॉर्क

येथील मि. जॉन हाइनस होम्स यानीं सभा जमवून ब्रिटन, हिंदुस्थान व जग याच्या वतीनें मुख्य प्रधानाना असा कळकळीचा निरोप पाठविला कीं, ही शोककारक तेढ टाळावी कारण ही तेढ म्हणजे सर्व मानवजातीवरील मोठें संकटच ठरेल.

स्वातंत्र्याचीं तत्त्वे, लोकशाही आणि बंधुत्व याचा पुरस्कार करणारे मि. मॅकडोनाल्ड श्री. गांधीशीं आणि ते ज्या आध्यात्मिक ध्येयाशीं पूर्णपणे एकरूप झाले आहेत त्या तत्त्वाशीं समेट करूं शकत नाहीत या गोष्टीवर सही करणाऱ्या गृहस्थानीं विश्वास ठेवण्याचें साफ नाकारले.

परिस्थितीचें गंभीर स्वरूप हिंदुस्थान सरकारलाही पूर्णपणे जाणवत होत. व्हाइसरॉयनीं सर तेजबहादुर सप्रू आणि सर चिमणलाल सेटलवाड या लिबरल पुढाऱ्याशीं लांबलचक भेटी घेतल्या. प्रचलित राजकीय परिस्थितीचा विचार करण्यासाठीं लिबरल फेडरेशनची मुंबई येथें बैठक झाली आणि राउंड टेबल कान्फरन्सची लवकरच तारीख ठरल्याचें जाहीर करणारे एक पत्रक व्हाइसरॉयनीं तावडतोब काढावें असा विचार व्यक्त केला. परंतु सर्वपक्षीय परिषद व कौन्सिल ऑफ फेडरेशन याच्या बैठकी होण्यापूर्वीच व्हाइसरॉयनीं एक महत्त्वाचें पत्रक प्रसिद्ध केलें व मुख्य प्रधानाशीं झालेला पत्रव्यवहार प्रसिद्ध केला. कौन्सिल ऑफ फेडरेशननेंही प्रचलित परिस्थितीबद्दल एक पत्रक प्रसिद्ध केलें. सविनय कायदेभंग चळवळीचा कौन्सिलनें तीव्र निषेध केला आणि त्याबरोबरच, वसाहतीच्या स्वराज्याची चर्चा करण्यासाठीं गोलमेज परिषदेची जारीनें तयारी करण्यासाठीं निकडीची सूचना केली. कौन्सिलनें गोलमेज परिषदेच्या मर्यादा ठरविल्या व सरकारचे वैशिष्ट्य अत्यंत महत्वाचें आहे असें सांगितलें. हेतू असा कीं त्यामुळें तटस्थ राहिलेले लोक लिबरल पक्षाशीं आणि गोलमेज परिषदेला जाणाऱ्या इतर पक्षाशीं सहकार्य करतील.

राजकीय कारणासाठीं ज्याना तुरुंगात टाकलें आहे त्याची सरकारनें मुक्तता करावी, व सरकारनें त्याना आपल्या विश्वासात घ्यावे. त्याबरोबर सविनय कायदेभंगही एकदम थांबावा या गोष्टीवरही कौन्सिलनें जोर दिला.

श्री. अब्बास तय्यबजी यानीं महात्माजींच्या मागून मीठाचा सत्याग्रह करणाऱ्या सत्याग्रहींचे पुढारीपण पत्करलें होतें. त्याना १२ एप्रिल रोजी अटक झाली. कैद, लाठी मार व दडपशाही नेहमींप्रमाणें चालूच होती. स्वयंसेवकाच्या तुकड्या मीठागरावर हल्ले चढवीत आणि त्याना लाठी मार देण्याचा

पोलीसाचाही क्रम चालूच होता. पुष्कळ स्वयंसेवकांना भयंकर जखमा झाल्या होत्या.

गांधींच्या अटकेनंतर अहमदाबाद येथें मे महिन्यांत वर्किंग कमिटीची बैठक झाली. कमिटीनें सविनय कायदेभंगाचें क्षेत्र विस्तृत केलें आणि खालील ठराव पास केलें.

( १ ) महात्मा गांधींबरोबर कराडी येथें असलेल्या स्वयंसेवकाचें ही सभा अभिनंदन करते. नव्या तुकड्या मोहिमाचें कार्य अंगावर घेण्यासाठीं सरसावतील असा या सभेला विश्वास वाटत आहे. यापुढें मिठागरावरील हिंदी मोहिमांचें धारासना हेंच केंद्र आहे असें समजावें असें ही सभा ठरवते. (२)या मोहिमेला नांवारूपास आणण्याबद्दल ही सभा गांधींचें अभिनंदन करीत आहे.सविनय कायदेभंगावरचा आपला विश्वास आम्ही पुन्हां एकदा जाहीर करतों आणि महात्माजींच्या गैरहजेरींत दुप्पट जोरानें हें युद्ध चालू ठेवण्याचा निश्चय करतो.

( ३ ) आपलें ध्येय संपादन करण्याचा पराकाष्ठेचा प्रयत्न सर्व राष्ट्रानें एकदम करावा अशीं वेळ आली आहे असें या सभेचें मत आहे; म्हणून सर्व विद्यार्थी, वकील व इतर सर्व व्यवसायी लोक, कामगार, शेतकरी, व्यापारी, उद्योगधंद्यातले लोक, सरकारी नोकर आणि इतर सर्व यांनीं शक्य तितका स्वार्थत्याग करावा अशी या सभेची विनंति आहे.

( ४ ) देशाच्या कल्याणासाठीं परदेशी कापडावर पूर्ण बहिष्कार तावडतोब घडवून आणणें जरूर आहे.त्यासाठीं आज साठविलेल्या परदेशी मालाची विक्री थांबविण्यासाठीं, दिलेल्या ऑर्डर्स रद्द करण्यासाठीं आणि पुढील मागण्या थांबवण्यासाठीं काहीं परिणामकारक प्रयत्न करणें जरूर आहे असें या कमिटीचें मत आहे.

( ५ ) विदेशीवस्त्रबहिष्कार व विदेशी कापडाच्या दुकानावर पिकेटिंग या दोन गोष्टींचा जोरानें प्रचार करावा अशी सर्व कॉंग्रेसकमिट्यांना आज्ञा आहे.

(६) बहिष्काराच्या चळवळीला सहाय्य करण्याचे प्रयत्न केल्याबद्दल कमीटी पं. मदन मोहन मालवीय याचें अभिनंदन करीत आहे. काहीं ठराविक काळपर्यंत परदेशी कापडाची मागणी न करण्याचें कबूल केलें तर व्यापाऱ्यांना हल्लीं शिल्लक असलेला विलायती माल विकण्याची परवानगी द्यावी आणि

तडजोड करण्याचा पंडितजींनीं प्रयत्न केला परंतु तडजोडीस संमति देतां येत नाहीं याबद्दल कमिटीला खेद वाटत आहे. परदेशी कापडाचा व्यापार करणारे व तो माल आणवणारे असे जे व्यापारी असतील त्यांच्याशीं वर सांगितलेली किंवा त्यासारखी कोणचीही तडजोड किंवा ठराव, कबुली, वगैरे करण्यास कोणच्याही कॉंग्रेस सभेने मुळींच भाग घेऊं नये असें ही सभा त्यांना सांगत आहे.

(७) शुद्ध स्वदेशी कापडाची मागणी पुरवण्यासाठीं हाताने कातलेलें व हातमागावर विणलेलें कापड जास्त प्रमाणावर तयार करण्यास उत्तेजन देण्याचे ही कमिटी ठरवीत आहे. हातानें कातलेलें सूत विकत घेण्याबरोबर त्या ऐवजी मोबदला म्हणून खादीच देण्याची पद्धत सुरू करण्यासाठीं संघटना करावी असें ही कमिटी ठरवीत आहे. प्रत्येक व्यक्तीनें आपला कांहीं काळ तरी सूत कातण्यात घालवावा अशी या कमिटीची विनंति आहे.

( ८ ) करबंदीची चळवळ सुरू करण्याची वेळ आली आहे असें या कमिटीचें मत आहे. कांहीं प्रांतातील कांहीं विशिष्ट कर देण्याचे बंद करून करबंदीची मोहीम सुरू व्हावी. रयतवारीपद्धत असलेल्या गुजराथ, महाराष्ट्र, कर्नाटक, आंध्र, तामीळनायडू आणि पंजाब या प्रांतातून जमीनमहसुलापासून करबंदीची मोहीम सुरू करावी. आणि बंगाल, बहार व ओरिसा या प्रांतानीं चौकीदारी करापासून सुरवात करावी. वरील प्रांतातील प्रांतिक कॉं. कमिटीनें आपापल्या क्षेत्रात करबंदीच्या चळवळीचें स्थान निवडावे व त्या क्षेत्रात त्या प्रांतानें जमीनमहसूल किंवा चौकीदारी या कराच्या बाबतींत करबंदीची चळवळ करावी.

( ९ ) विगरपरवाना मीठ तयार करण्याचे कार्य प्रांतिक कॉंग्रेस कमिट्यानीं चालू ठेवावें व त्याचा प्रसार करावा.ज्या ठिकाणी कैद वगैरे मार्गानीं सरकारनें मीठाचा कायदेभंग मोडून काढण्याचा प्रयत्न चालविला आहे तेथें दुप्पट जोराने कायदेभंग व्हावा, असे प्रांतिक कमिट्याना या कमिटीचें सांगणें आहे. मीठाच्या कायद्याचा सर्व देशाचा निषेध व्यक्त करण्यासाठीं दर रविवारीं मीठाच्या कायदेभंगाचें सार्वजनिक कार्यक्रम करावेत.

(१०) कॉंग्रेसच्या कामचलाऊ अध्यक्षांनीं मध्यप्रांतात जंगलचा कायदेभंग करण्याची परवानगी दिली आहे. तिला ही कमिटी मान्यता व मंजुरी देत आहे

आणि आपल्या प्रॉ. लेक कॉ. कमिटीच्या मंजुरीने इतर प्रांतानींही मिठाच्या कायदेभंगास सुरवात करावी असा ही सभा ठराव करते.

(११) स्वदेशी गिरण्यातील कापडाचे दर अतोनात वाढले आहेत व बनावट खादी तयार होत आहे. या गोष्टी थांबवण्यासाठीं उपाययोजना करण्याकरिता हिंदी गिरणी-मालकाशीं वाटाघाट करण्याचे अधिकार अध्यक्षाना ही कमिटी देत आहे.

(१२) ब्रिटिश मालावरील बहिष्कार शक्य तितक्या लवकर अत्यंत परिणामकारक करण्याचे प्रयत्न व्हावयास पाहिजेत असें ही कमिटी लोकांना आग्रहपूर्वक सांगत आहे.

(१३) ब्रिटिश बँका, विमा, बोटी व अशा इतर संस्था यावर बहिष्कार घालण्याबद्दल कमिटी जनतेला आग्रहपूर्वक सांगत आहे.

(१४) दारू किंवा ताडी याच्या दुकानावर पिकेटिंग करण्याची प्रा. कॉ. कमिटीला ही सभा आज्ञा करीत आहे. मद्यपान पूर्णपणें बंद होणें अत्यंत आवश्यक असल्यानें त्या बाबतींत अत्यन्त एकाग्रतेनें प्रयत्न व्हावयास पाहिजेत.

(१५) काहीं ठिकाणीं लोकसमूह प्रक्षुब्ध झाला याबद्दल कमिटीस खेद होत आहे. अशा प्रक्षोभाचा ही कमिटी अत्यन्त तीव्रपणे निषेध करीत आहे. अनत्याचाराचे अत्यंत कसोशीनें आचरण होणें जरूर आहे. यावर ही कमिटी जोर देत आहे.

(१६) प्रेस ऑर्डिनन्सचा ही सभा तीव्र निषेध करते आणि ज्या वर्तमानपत्रानीं हा वटहुकूम मानण्याचें नाकारलें त्याबद्दल त्याचे ही कमिटी गुणाभिज्ञता व्यक्त करते. सर्व वृत्तपत्रानीं आपलीं वृत्तपत्रें अद्याप तरी बंद करावींत व ज्यानीं एकदा बंद करून पुन्हा सुरू केलीं त्यानीं तावडतोब पुढील अंकाचें काम थांबवावें. यापुढें प्रसिद्ध होणाऱ्या सर्व ॲंग्लो-इंडियन व देशी वृत्तपत्रावर लोकानीं बहिष्कार घालावा. ”

वर्किंग कमिटीच्या बैठकीसाठीं श्री. सौ. सरोजिनीदेवी अलाहाबादकडे निघाल्या होत्या. परंतु श्री. तय्यबजींच्या अटकेची बातमी कळतांच त्या धारासनाकडे वळल्या. काम चालू ठेवण्याचें गांधींना दिलेलें वचन पाळण्यासाठीं त्यानीं मोहिमेचें नेतृत्व पत्करलें. त्याना आपल्या तुकडीसह १६

तारखेस तात्पुरती अटक करण्यात आली व पोलिसाच्या गराड्यातून नंतर सोडून देण्यात आलें. नंतर मीठागराकडे स्वयंसेवकाच्या तुकड्यावर तुकड्या येऊं लागल्या. त्याना मार बसे व त्याचा पाठलाग होई. त्याच दिवशीं संध्याकाळीं पोलिसांनीं २०० पेक्षा जास्त स्वयंसेवकाना अटक केली. बेकायदेशीर समूहात राहिल्याबद्दल त्याना ही अटक झाली होती व त्यांना धारासना येथील सत्याग्रहछावणींतच डांबण्यात आलें.

नंतर वडाळा मीठागराकडे लोक वळले. १९ तारखेस सकाळीं पुष्कळ स्वयंसेवक तिकडे जमा झाले. परंतु पोलिसांनीं फार चपळाई केली. बंदुकाच्या जोरावर त्यानीं ४०० पेक्षांही जास्त सत्याग्रहींना कैद केले.

फ्री प्रेसचा बातमीदार या प्रसंगीं लिहितो—विणकामाच्या मालावर सर्व मोहिम असल्यानें चळवळीचा परिणाम त्या क्षेत्रात अगदीं स्पष्ट जाणवतो. परंतु हिंदी बाजार शेवटीं आपला हातचा जाणार याचें व्यापाऱ्याना इतकें वाईट वाटत नाहीं, तर ठरलेले सवदे पदरात पडणार नाहींत किंवा रद्द केले जातील याची त्याना खरी भीति वाटते. कारण मागवलेल्या मालाच्या आर्डरी रद्द कराव्या, याकडे हिंदी व्यापाऱ्याची अधिकाधिक प्रवृत्ति होऊं लागली.

डेलि मेलचा मँचेस्टर येथील बातमीदार लिहितोः—

हिंदुस्थानातून ताजी बातमी येण्याचा अवकाश कीं, लँकेशायरचा हिंदी व्यापार आटपतो कीं काय अशी भीति वाटते. सुताच्या गिरण्या व विणकामाचीं खातीं आताच बेमुदत बंद होत आहेत. आणि हजारो कामगार बेकाराच्या संख्येंत भर घालीत आहेत."

मीठागरावरील हल्ले चालूच होते. 'गांधी दी मॅन अँड मिशन' या इंग्रजी पुस्तकांत पा. १३३ वर त्याविषयीं दिलेली हकीगत खालीं साराशानें दिली आहे.

२१ मे रोजी २५०० गुजराथच्या स्वयंसेवकानी धारासनावर हल्ला केला. ६२ वर्षांचे वृद्ध इमाम साहेब त्या हल्ल्याचे नायक होते. दक्षिण आफ्रिकेंत गांधींचे ते सहकारी होते. हल्ला सकाळीं चढविण्यात आला. लवकरच पोलीसांनीं लाठ्यानीं स्वयंसेवकांच्या पाठी झोडपून काढल्या. हजारो लोक तो देखावा पहात होते. २ तास असे गेल्यावर इमाम साहेब, प्यारेलाल आणि मणिलाल गांधी यांना अटक झाली व कांहीं वेळानें श्री. सरोजिनी नायडू ह्या त्याच्याबरोबर आल्या. एकंदर २९० स्वयंसेवकाना जखमा झाल्या, श्री. भाइ-

लालभाई दादाभाई हे एक स्वयंसेवक जखमांमुळे मरण पावले. नंतर लष्कराच्या सहाय्यानें पोलिसांनी धारासना आणि उंताडी या जागांचा बाह्य संबंध तोडून टाकण्यासाठीं तिकडे जाणारे सर्व रस्ते अडवले व कोणतेंही वाहन किंवा वाटसरू याना तिकडे जाणे बंद केलें.उंताडी येथील स्वयंसेवकाना एका अज्ञात ठिकाणीं नेण्यात आले व नंतर त्याना सोडून देण्यात आलें.

एकंदर २०० स्वयंसेवकाच्या दोन तुकड्या ३ जून रोजीं उंताडी छावणी-कडे निघाल्या. धारासनावर हल्ला करण्यासाठीं त्याची योजना होती. पोलिसांनीं दोन्हीही तुकड्या आडवल्या आणि मनाई केलेल्या मर्यादेत लोके शिरले. त्या वेळीं लाठी हल्ला झाला. जखमी माणसाना छावणीच्या दवाखान्यांत नेण्यात आलें.

**वडाळा मोहीम:** वडाळा येथील मिठागरावरही हल्ले झाले. २२ मे रोजीं १८८ स्वयंसेवकाना अटक करून वरळीस नेण्यात आलें. २५ तारखेस १०० स्वयंसेवक निघाले. त्याच्यावरोवर २००० लोकही होते. पोलिसांनी सरास लाठी चालवून १७ लोक जखमी केले आणि नंतर ११५ कैद केले. हा हल्ला २ तासपर्यंत टिकला. दुपारी तो पुनः चालू झाला. १८ लोक आणखी जखमी झाले. २६ तारखेस ६५ स्वयंसेवक पुन्हा त्या रणभूमीवर हजर होते. त्यात ४३ ना कैद झाली. बाकीचे जमावाबरोबर मीठासह निसटले. सरकारनें असें प्रसिद्ध केलें कीं, आजपर्यंत झालेले प्रक्षोभ हे भोंवताली जमलेल्या प्रेक्षक समूहामुळें होतात. कारण ते लोक स्वयंसेवकाइतके शिस्तशीर नसतात. म्हणून लोकांनीं वडाळा-पासून दूर रहावे.

परंतु तरीसुद्धां १ जून रोजी एक प्रेक्षणीय हल्ला होणारच होता. युद्ध समितीनें (वॉर कौन्सिल) त्यासाठीं विशेष तयारी केली होती. १ तारखेस सकाळीं १५००० स्वयंसेवक व इतर लोक वडाळा येथील सामुदायिक हल्ल्यांत सामिल झाले.

स्वयंसेवकांच्या तुकड्यामागून तुकड्या पोर्ट ट्रस्ट रेल्वे फाटकापर्यंत जात होत्या. तेथें जमलेल्या लोकासह सर्वांना पोलिसांनीं वेढा घातला. लवकरच स्त्री व बालस्वयंसेवकांनीं वेढ्याची कोंडी फोडली व चिखल तुडवीत ते निघाले आणि मीठाच्या खाचरापर्यंत ते पोंहोचले. १५० स्वयंसेवकाना थोड्याफार जखमा झाल्या. होम मेंबर (गृहमंत्री) तेथें स्वतः हजर होते व त्यांच्या देखरेखीखाली पोलिसांचे लाठीप्रयोग चालू होते.

३ जून रोजीं वरळी कॅंपवर दोन लाठीहल्ले झाले व लष्कर बोलावण्यात आलें. ४ हजार स्वयंसेवकांना पोलिसांनीं पिटाळलें. ९० लोकाना जखमा झाल्या आणि त्यात २५ लोक अत्यवस्थ होते.

परंतु पोलिस स्वयंसेवकांना वाईट रीतीनें वागवीत होते त्यामुळें लोक फार खवळले. भोवतालच्या लोकाना तें दृश्य अंगावर शहारे आणणारें वाटले. मुंबई स्मॉ. कॉ. कोर्टचे माजी न्यायाधीश मि. हुसेन, श्री. के. नटराजन् सर्व्हंटस् ऑफ इंडिया सोसायटीचे अध्यक्ष श्री.गो.कृ. देवधर हे गृहस्थ जातीनें धारासनास हजर होते. त्यानीं समक्ष पाहिलेल्या हकीगतिवरून खालील पत्रक प्रसिद्ध केलें:—

"सत्याग्रहींना मीठागरापासून दूर काढल्यावर युरोपियन घोडेस्वार भरधाव धांवत, लाठ्या चालवीत. त्यानीं खेड्यात घुसून रस्त्यानें आणारे लोकसुद्धां पिटून काढले होते. त्यात मुलें किंवा स्त्रिया यांचीही गय केली नाहीं. शेतकरी बोळात दडून वसत व घराचीं दारें वंद करून ठेवीत. परंतु जर चुकून कोणी सापडले तर त्याना खूप मार मिळे." मि. वेब मिलर यानीं न्यू फ्रीमन पत्रात लिहिलेल्या लेखात धारासना येथील प्रकार ममक्ष पाहिल्यावरून वर्णन केला. गेल्या आठरा वर्षें मी बातमीदाराचें काम करीत आहे व एकंदर २२ देशात हिंडलों आहे. या काळात हजारों दंगे, सामाजिक बंडें, रस्त्यातील मारामाऱ्या असल्या प्रसंगीं मी हजर होतों. परंतु धारासना येथें पाहिलेल्या प्रसंगाइतके प्रकार मला कोठें दिसले नाहींत. काहीं वेळा तो देखावा इतका भयंकर वाटला कीं ( बातमीचें काम सोडून ) मला मधून मधून तोंड फिरवावें लागे. स्वयं-सेवकाच्या शिस्तीबद्दल आम्हाला कल्पनातीत आश्चर्य वाटलें. गांधींचें अनत्याचाराचें व्रत त्याच्या रोमारोमात भिनलें आहे असें दिसलें."

लंडन येथील डेली हेरल्ड पत्राचे प्रातिनिधि मि. जॉर्ज स्लोकोम हे कांहीं हल्ल्याच्या वेळीं हजर राहून एका टेकडीवरून सर्व देखावा पहात होते. ते लिहितात:—

अत्यंत कार्यतत्पर, प्रेमळ परंतु प्रक्षुब्ध असा स्वयंसेवकांचा व कळकळीनें उभे राहिलेल्या इतर लोकाचा प्रचंड समुदाय भोवतालीं पाहिला कीं, आपण एक इंग्लिश गृहस्थ त्याच्यात आहोंत याची जाणीव होऊन तेथें उभें राहण्याची लाज वाटत असे. देशाच्या राज्यव्यवस्थेचे घटक त्या ओंगळ व किळस-

कायदेभंगापेक्षा विदेशी वस्त्राचा प्रचंड बहिष्कार जास्त परिणामकारक होईल.मला असें वाटत नाहीं. बहिष्कारासाठीं ३००.लक्ष लोकांचें सहकार्य लागतें. कायदेभंग दहा हजार लोकांच्या स्वार्थत्यागावर होऊं शकतो. सरकारला या १०००० ची विस्मृति हवी असेल तर त्याना फाशींच दिलें पाहिजे. जर हे दहा हजार स्वयंसेवक श्रद्धावान् सत्यप्रिय असले तर त्याच्या अस्तित्वानें सुद्धा सरकारला मरणप्राय यातना होत राहतील.

काहीं म्हणतात ही चळवळ शेवटीं अत्याचारी होणार परंतु खरें म्हणजे अत्याचाराला नमवण्यासाठीं ही चळवळ सुरू झाली आहे. तेव्हा अनत्याचाराचा मार्ग मोकळा नसला तर अत्याचाराचा धोका नेहमीं दरडावीत राहील. वस्तुस्थिति अशी आहे कीं, क्रांतिकारक पक्षानें गांधींना असें आश्वासन दिलें आहे की,१९३१ च्या सालीं मध्यापर्यंत आम्ही तुमच्याशीं पूर्ण सहकार्य करण्यास तयार आहोत. अनत्याचार ज्यावेळीं परिणामकारक होईल त्यावेळीं वाटेल त्या अडचणी व अडथळे असले तरी त्याचा उपयोग झाल्याखेरीज राहाणार नाहीं. अनत्याचार स्वभावतः त्या सर्व अडचणींची विल्हेवाट लावील व त्या निरुपद्रवी करून टाकील. परंतु जर अंतःकरणात फसवेगिरी व दुष्ट इच्छा असली तर त्या अंतस्थ संकटानींच ती चळवळ ठार होईल.

गांधींना दिवसेंदिवस ही खात्री पटत चालली होती कीं, अत्याचाराच्या शक्तींचा संचार सुरूं झाला आहे आणि अत्याचाराचीं मूळ कारणें आपल्या कह्यात येत आहेत. लोकाना भीति वाटत होती कीं, गांधींच्या अटकेनंतर चळवळ अनावर होईल. परंतु ती भीति निराधार होती. कारण दक्षिण आफ्रिकेंत असा अनुभव आला होता. कीं, त्याच्या स्वतःच्या प्रत्यक्ष कृतीखेरीजही चळवळीला जोर चढत होता ते तुरुंगात होते आणि चळवळ चालू राहण्यास तेंसुद्धां पुरेसें होतें.

मनुष्य मोकळा असतां जितका सामर्थ्यवान् ठरतो त्यापेक्षा त्याचा तुरुंगवास जास्त सामर्थ्य उत्पन्न करतो. हा अनुभव पुष्कळ वेळा येत असतो. दक्षिण आफ्रिकेंत हजारों लोक चळवळींत सामील झाले होते. क्षणार्धांत त्यांना समजलें कीं, ही चळवळ आपल्या सुटकेसाठीं आहे. तीन पौंडाच्या करामधून सुटण्याकरिता एक महात्मा सिद्ध आहे हें त्यांना पटलें होतें. आणि या

खात्रीवर त्यांनीं चळवळींत उडी घेतली आणि त्याच्या भोंवतीं किती भयंकर संकटें आ वासून उभीं होतीं ? आपल्यावर यमयातनाचा वर्षाव होईल याची त्याना खात्री होती तरी ते डगमगले नाहींत किंवा अडखळले नाहींत. ती एक जादू झाली. अद्याप अनुकूल वेळ आली नाहीं, असा संशय काहीं लोकाना भेडसावीत होता. गांधींनीं त्याना उत्तर दिलें कीं, कलकत्ता अधिवेशनानंतर बाह्य परिस्थिति मुळींच बदलली नाहीं. परंतु माझ्यामध्यें जें अंतस्थ युद्ध चालू होतें तें थांबलें आहे. ही चळवळ मी कधींच सुरू करावयास पाहिजे होती अशी माझी खात्री झाली आहे. अनुकूल वेळ कधींच येऊन ठेपली आहे. लवकरच अशी आणीबाणीची वेळ येईल कीं, त्यातून एक परिषद बाहेर यईल. गोलमेज नव्हे–चौकोनी मेजाची ! त्या ठिकाणीं प्रत्येकाला आपापल्या कर्तव्याचा बोजा माहीत होईल. मला त्या परिषदेचें नेमकें स्वरूप आज सांगतां येणार नाहीं. परंतु त्या परिषदेतले प्रतिनिधी समान दर्जाचे असतील व हिंदुस्थानसाठीं एक स्वतंत्र शासनपद्धति स्थापन करण्याचे मार्ग व साधनें शोधण्यासाठीं ते सर्वजण एकमतानें विचार करतील, एवढें मी सांगू शकतों.

लॉर्ड आयर्विन हे स्क्रू आवळण्याचे प्रयोग करूं लागले. गांधींना अटक करण्याची परवानगी ते प्रथम देत नव्हते. गांधींच्या प्रयाणाचा सर्व राष्ट्रावर परिणाम झाला होता. सर्वत्र मोहिमा सुरू झाल्या. त्याच्या हाकेला ओ देऊन हजारों स्त्रिया युद्धभूमीवर दाखल झाल्या. सरकारला त्यांनीं खूपच गोंधळांत पाडले. दारू दुकानें व विदेशी वस्त्राचीं दुकानें यांवर पिकेटिंग करण्याचें काम स्त्रियाकडे होतें. पोलीसाचे हात एकदम थिजले परंतु शेवटीं अरेरावी प्रवृत्तीनें त्याच्या सभ्यतेचा पराभव झाला. त्या वेळीं ते मन मोकळेपणानें स्त्रियावर हत्यार चालवूं लागले. गांधींना अटकेत ठेवलें नाहीं तर अज्ञात व सुप्त स्थानांतून चेतना उठतात. त्याच्या हातीं जणूं काय जादूची कांडी आहे आणि ती एकदा फिरवल्याबरोबर माणसें व पैसा जमा होतात. त्याना कैद करणें जरूर असून इतक्या दिवस पकडलें नव्हतें कारण त्याची अटक ही राष्ट्राला कैद केल्यासारखें होणार. १४ एप्रिल रोजीं जवाहिरलालना अटक होऊन शिक्षाही झाली.*

---

* त्याना ११ आक्टो. १९३० रोजीं सोडून पुन्हां १९ आक्टो. रोजीं पकडण्यात आलें होतें व २० तारखेस त्याना २३ महिन्यांची शिक्षा झाली. त्याच्या पत्नी सौ. कमला नेहरू यांना १ जाने. १९३१ रोजीं अटक झाली. जवाहिरलाल याच्या अटकेनंतर लवकरच त्याचा ४१ वा वाढदिवस १७ नोव्हें. रोजीं होता. आणि सर्व देशभर विशेषत संयुक्त प्रांतात तो जवाहिर दिन म्हणून पाळण्यात आला.

जवाहिरलालच्या अटकेमुळें कॉंग्रेसलाच बंदिवान् केल्यासारखें झालें पिकेटिंग, करबंदीचा उपदेश, सामाजिक बहिष्काराची चळवळ याना बंदी करणारे वटहुकूम निघत होते. राष्ट्रीय निशाणाच्या भोंवती हजारों चकमकी होऊं लागल्या. लवकरच शिक्षाचें स्वरूप जास्त रौद्र होऊं लागलें. शिक्षेबरोबर दंड सुरूं झाले नंतर त्याच्या जोडीला लाठीहल्ले आले आणि सत्याग्रहींवर हल्ला करण्याचे सर्व प्रकार एकदम सुरुं झाले. आता नुसता धाक व संशयास्पद वातावरण राहिलें नव्हते. प्रत्यक्ष परिस्थिति रौद्र स्वरूपात डोळ्यासमोर उभी होती. लाठीहल्ला हा आता अंगावरच येत होता. सभा बेकायदेशीर ठरल्या व उध्वस्त करण्यात येऊं लागल्या.आणि त्या कामी सुद्धा लाठीचे जबरदस्त तडाखे उपयोगी पडले.' मिठाच्या कायद्याना पीनल कोडनें पाठिंबा दिला आणि शिक्षा शक्य तितक्या दीर्घकालीन होऊं लागल्या. १९३० फेब्रुवारीस एक सरकारी हुकूम निघाला. राजकीय कैदी हा वर्ग निराळा करण्याचे नियम त्यात प्रसिद्ध झाले. अर्थात् राजकीय हे शब्द नावापुरतेच होते. हिंदुस्थानच्या सरकारी सांवत्सरिकांत 'राजकीय' हे शब्द अवतरणचिन्हात गेल्या दहा वर्षें येत होते. परंतु तो शब्द आतां बाजूसच टाकण्यात आला.

'अ' हा वर्ग नावापुरताच होता. 'बी' हा वर्गसुद्धा चिक्कूपणें मिळत असे. कारण धनवान् व सुसंस्कृत लोकानासुद्धा ते सरकारचे निर्बंध पाळणारे असूनही 'क' वर्गांत घातलें जात होते आणि तुरुंगात त्यांना सदी फोडणें तेलाचा घाणा फिरवणें व पंप ओढणे हीं कामे मिळत असत. परंतु सत्याग्रहींनीं कधीं तक्रार केली नाहीं किंवा कामाबद्दल कुरकुरही केली नाहीं. त्यांची संख्या वाढतच होती. पुष्कळाना अटक होत नसे.त्यांची फक्त लाठीहल्ल्यावरच समजूत केली जाई!

दक्षिण हिंदुस्थानात प्रथम प्रथम कैद व जबर दंड असें धोरण सुरू होतें परंतु त्याऐवजीं लवकरच माराची योजना झाली. बाजारांत [illegible] गांधी टोपी किंवा खादीचा पोषाख दिसला कीं लाठी सुरू होई. मलबारातील [illegible] शिपाई आंध्र प्रातात पाठविण्यात आले आणि त्यांनीं [illegible]पूरपासून [illegible] पर्यंत संचार केला. जाता जाता कोकोनाडा व राजमहेंद्रवरम् [illegible] बाजारांतून फिरवण्याची हौस म्हणून ते गेले, आणि जाता जातां [illegible] खादी पोषाखाच्या माणसाला त्यांनी झोडपलें! [illegible] येथें त्यांना [illegible] झाला.त्या प्रतिकारात गोळीबार होऊन २।२ मृत्यु व [illegible] जखमी [illegible]

दडपशाहीचीं विविध वर्णनें करणे अगदीं अशक्य आहे. सविनय कायदेभंगाच्या चळवळीबरहुकूम दडपशाहीचींही स्वरूपें बदलत होतीं, म्हणून १९३० व १९३१ मधील काहीं महत्त्वाचे प्रसंग फक्त येथें देता येतील. १९३१ नंतर समेटाचे काहीं प्रयत्न झाले व या प्रसंगाना आळा पडला. मुंबई हें लवकरच प्रक्षोभाचें केंद्र झालें. परदेशी कापड बहिष्काराच्या भोंवती सर्व सामर्थ्य जमा करण्यात आले. सुदैवानें पं. मोतिलाल नेहरू त्यावेळीं मोकळे होते. त्यानीं मुंबईस येऊन मुंबई व अहमदाबाद येथील गिरण्यांशीं वाटाघाट केली. अहमदाबादचे व्यापारी जरा समंजस होते परंतु मुंबईच्या गिरण्यात युरोपियनाची भागीदारी होती.

कॉंग्रेसचें सर्टीफिकेट घेण्याची अट त्याना मान्य करावयास लावणे ही पंडितजींनासुद्धा फार अवघड गोष्ट होती. तरीसुद्धा त्यानीं तें बरेच शक्य करून दाखवले. बहिष्काराचे वातावरण भोंवताली तयार झालें होतें. परदेशी कापडाचे गठ्ठेच्या गठ्ठे बंदरात पडून होते. ते परत करावयाचे नाहींत, असा व्यापाऱ्यानीं निश्चय केला होता. त्यामुळें देशात कापडाची तूट पडली होती.

याच वेळीं २७ जूनला वर्किंग कमिटीची अहमदाबाद येथे बैठक झाली व खालील ठराव पास आलेः—

[ १ ] कमिटीच्या हेतूप्रमाणे ज्या व्यापाऱ्यानीं परदेशी कापडाची विक्री थांबवली इतकेंच नव्हे तर आधीं देऊन ठेवलेली मागणीसुद्धा रद्द केली, आणि अशा रीतीनें परदेशी कापडाचा खप खूप उतरला, याबद्दल ही कमिटी त्याचें अभिनन्दन करते. ज्या व्यापाऱ्यांनीं अद्याप हें केलें नसेल त्यानीं ते तावडतोब करावें आणि त्यांनीं तसें केलें नाहीं तर कॅांग्रेस-संस्थानीं त्याच्यावर कडक पिकेटिंग करावें १५ जुलै १९३० पर्यंत परदेशी कापडाची विक्री सर्वत्र पूर्णपणें बंद होईल अशी कमिटीला आशा आहे.

[ २ ] ज्या वस्तु स्वदेशी मिळत नाहींत त्याऐवजीं माल घेताना ब्रिटिशेतर वस्तूंची निवड करण्यात येत आहे. परंतु त्यापेक्षा तीव्रपणें ब्रिटिश मालावर सरोस बहिष्कार घालावा.

[ ३ ] सर्व सरकारी अधिकाऱ्यावर व राष्ट्रीय चळवळ हाणून पाडण्याच्या कामीं प्रत्यक्ष सहाय्य करणाऱ्या इतर लोकांवर कडकपणें सामाजिक बहिष्कार घालावा.

[ ४ ] गया येथें १९२२ साली व लाहोर येथें १९२९ सालीं राष्ट्रीय सभेनें हिंदुस्थानवर लादलेल्या राष्ट्रीय कर्जाबद्दल ठराव केले त्याची वर्किंग कमिटी आठवण करून देत आहे. तेव्हां लोकांनीं यापुढें हिंदुस्थानसरकारचे कोणतेही नवे कर्जरोखे [ बॉंडस् ] विकत घेऊं नयेत किंवा स्वीकारूं नयेत.

[ ५ ] लोकाच्या विरोधाची पर्वा न करता सरकारनें रुपयाची किंमत अरेरावीनें ठरविली आहे, सरकारनें ठरविलेली रुपयाची किंमत खऱ्या किंमतीच्या एकतृतीयांश देखील नाहीं आणि रुपयाची किंमत आणखी-सुद्धां कमी होण्याचा संभव आहे. म्हणून हिंदी जनतेनें रुपये किंवा करन्सी नोटा सरकारकडून सरकारी व्यवहारात स्वीकारूं नयेत, शक्य असेल तेथें सोन्याच्या रूपानेंच फेड करून घेण्याचा निश्चय करावा. आपल्या करन्सी नोटा किंवा रुपये सोन्यात रूपांतर करण्याची लोकांनी त्वरा करावी आणि विशेषतः निर्यात होणाऱ्या मालाचे पैसे सुवर्णचलनांतच घेण्याची खट-पट करावी.

[ ६ ] कॉलेजांतील विद्यार्थ्यांनीं या वेळींच चळवळींत भाग घेणें जरूर आहे असे या कमिटीचें मत आहे. म्हणून ही कमिटी प्रांतिक कॉंग्रेस कमि-ट्यांना आपल्या हद्दींतील कॉलेज विद्यार्थ्यांना कॉलेजें सोडून राष्ट्रास जरुर लागेल तेव्हां मदत करण्यास सिद्ध असण्याची जरूरी पटवावी.

[ ७ ] दडपशाही धोरणास अनुसरून सरकारनें काहीं जिल्हा कॉंग्रेस-कमिट्या व इतर दुय्यम संस्था बेकायदेशीर ठरविल्या आहेत. बाकीच्या कॉंग्रेस संस्थाही लवकरच बेकायदेशीर ठरविल्या जातील असें दिसते आहे. म्हणून ही कमिटी असें सागते कीं, बेकायदेशीर ठरलेल्या किंवा यापुढें ठरतील त्या सर्व कॉंग्रेस संस्थांनीं पूर्वीप्रमाणेंच कार्य चालू ठेवावें व वरील सरकारी हुकुमास न जुमानतां कॉंग्रेसचा कार्यक्रम चालू ठेवावा.

[ ८ ] या कमिटीनें ७ जूनच्या बैठकींत लष्करी व पोलीस शिपायाच्या कर्तव्याबद्दल जो ५ नंबरचा ठराव केला, त्याच्या प्रति संयुक्तप्रांत सरकारनें सरकारजमा झाल्याचें जाहीर केलें. पोलीस व लष्कर याचा सरकारनें लोका-वर अमानुष हल्ले करण्याच्या कामीं जो उपयोग केला, त्या मानानें पाहता वरील ठरावापेक्षाही जास्त निषेधपर ठरावसुद्धां न्याय्यच ठरला असता. परंतु त्याविषयींचा जो कायदा आज चालू आहे तेवढीच हकीकत वरील नं.

५ च्या ठरावात नमूद केली आहे. आणि सध्या तेवढेंच पुरेसे आहे असे कमिटीस वाटलें. सर्व कॉंग्रेससंस्थांनी वरील मनाईहुकुमास न जुमानतां नं. ५ चा ठराव शक्य तितक्या व्यापक रीतीने प्रसिद्धीस आणावा

[ ९ ] कमिटीच्या गेल्या बैठकीनंतर सरकारनें सत्याग्रह चळवळ हाणून पाडण्यासाठीं सर्व शक्ति एकवटून दडपशाही चालवली आहे. अशा स्थितींत जनतेने जो विलक्षण टिकाव धरला त्याबद्दल देशाचे अभिनन्दन करीत आहे आणि सरकारला पुनः एकदा बजावते कीं, सर्व तऱ्हेच्या छळणुकीचे प्रकार लोकावर लादले तरी शेवटपर्यंत हिंदी जनता स्वातंत्र्याचे युद्ध लढत राहील.

[१०] हिंदी स्त्रिया राष्ट्रीय चळवळींत वाढत्या प्रमाणावर भाग घेत आहेत व कैद व हल्ले धैर्यानें सहन करीत आहेत, ही गोष्ट कृतज्ञतापूर्वक ही कमिटी नमूद करीत आहे.

बहिष्काराची चळवळ दिवसेंदिवस फोफावत होती व खादीचा पुरवठा काहीं केल्या पुरेसा होईना. गिरणींच्या सुताचे व हातानें विणलेले असे कापड पत्करण्याखेरीज देशभक्त शहरवासीयांना मार्ग राहिला नाही. म्हणून शेवटीं गिरण्याची तपासणी करून राष्ट्रास सहाय्यक कोणच्या व विघातक कोणच्या आहेत हे ठरवणें जरूर झाले. कॉंग्रेसने सर्टीफिकेट देऊन गिरण्याना मान्यता देणें जरूर होतें आणि कांहीं अटी त्याना कबूल करावयास लावून त्याना कॉंग्रेसच्या नैतिक नियंत्रणाखालीं आणावे लागले. कॉंग्रेसनें गिरण्यांवर घातलेल्या अटींत मुख्य अट अशी होती कीं, त्यानीं यंत्रसामुग्रीसाठीं ब्रिटिश कंपन्याचा माल घेता कामा नये व त्यांचे कामगार राष्ट्रीय चळवळींत भाग घेत असल तर गिरणी मालकानीं त्याना हरकत करूं नये आणि त्याना ही जी विशिष्ट सवलत मिळाली आहे तिचा गैरफायदा घेऊन आपल्या मालाच्या किंमती भरमसाठ वाढवूं नयेत.एकामागून एक गिरण्या वरील प्रतिज्ञा स्वीकारीत होत्या. कांहीं थोड्या गिरण्या अद्याप तयार झाल्या नव्हत्या त्यानाही लवकरच कॉंग्रेसची शक्ती पटली.

याच वेळीं ऑल इंडिया वर्किंग कमिटी ही बेकायदेशीर ठरविण्यात आली. पं. मोतिलाल नेहरूंना ३० जून १९३० रोजीं अटक झाली व त्याना ६ महिन्याची शिक्षा झाली. मुंबई येथील स्वयंसेवक संस्था जोराने कार्य करीत होती. स्त्रिया चळवळींत सामील झाल्या. सौम्य तऱ्हेनें पिकेटिंग करीत असता त्याच्या

केशरी साड्या व नाजूक देह पाहूनच लोकांचीं अंतःकरणें विरघळत. एखादा दुकानदार विदेशी मालाला सीलबंद करण्याचें नाकारूं लागला तर त्याच्या पत्नीलाच पिकेटिंगसाठीं आणण्यात येई !

मि. ब्रेल्सफोर्ड हे या सर्व हकीकतीचे प्रत्यक्ष साक्षीदार आहेत. या चळवळीच्या वेळीं लोकावर होणारा जुलूम, सर्व देशभर हिंडून त्यांनीं पाहिला होता. १२ जानेवारी १९३१ रोजीं मँचेस्टर गार्डियनमध्ये एक लेख त्यांनीं लिहिला.

" जमाव मोडीत असता पोलीसानीं केलेल्या क्रूर वर्तणुकीबद्दल सर्वत्र तक्रारी ऐकूं येतात. प्रत्यक्ष हजर असलेल्या इंग्लिश प्रेक्षकाकडून व त्या प्रसंगीं शुश्रूषा करणाऱ्या डॉक्टरांकडून मी या गोष्टी ऐकल्या आहेत. मी असें अनुमान काढलें कीं, ज्या वरिष्ठ अधिकाऱ्यानीं सभाबंदी केली त्यांच्याचकडे यातली मुख्य चूक आहे. सभातून शातपणे भाषणें होत व जरी तीं राजद्रोहात्मक असत तरी त्यात अत्याचाराचा नेहमीं निषेधच होत असे. सभेस जमलेले हजारो लोक खालीं शातपणें बसून ऐकता ऐकता सारखी टकळी चालवीत असत. त्यात स्त्रियाचाच भरणा जास्त असे. जर या सभा सरकारनें नेहमीं किंवा साधारणपणें चालूं दिल्या असत्या तर काहींही अव्यवस्था माजली नसती व श्रोत्याना लवकरच वीट आला असता ! विशेषतः मुंबईस आडदांड मार्गानें सभा उधळवल्या जात असत. त्यामुळे सर्व शहर प्रक्षुब्ध झाले आणि स्वाभिमानासाठीं लाठीहल्यास तोंड देण्यास तयार झाले. धर्मवीराच्या धैर्यानें शेकडों स्वयंसेवक हल्ला अंगावर घेण्यासाठीं पुढें आले. पुष्कळ युरोपिअन लोकाकडून मी या प्रसंगाचीं वर्णनें ऐकिलीं आहेत. पोलीस अधिकारी निरुपद्रवी तरुणाना बेसुमार झोडपताना पाहून त्या युरोपिअन प्रेक्षकांना सुद्धा अंगावर शहारे येत असत आणि त्या प्रकाराची शिसारी बसत असे.

गुजराथमधील खेड्यातून मी पाच दिवस हिंडत होतो, आणि त्या ठिकाणच्या पोलीसाच्या कृत्याबद्दल मजजवळ लागेल तेवढे पुरावे आहेत. गांधींवरील वैयक्तिक श्रद्धा, स्वराज्याची इच्छा आणि धान्याचे भाव कमालीचे उतरल्यामुळें उत्पन्न झालेली विकट आर्थिक परिस्थिति या तिन्ही हेतूंच्या एकत्र परिणामामुळें बारडोली आणि खेडा या जिल्ह्यातील जवळ जवळ प्रत्येक शेतकरी पट्टी देण्याचे नाकारीत होता. याचें उत्तर सरकार असें

देई कीं त्यानी आपलीं शेते, बैल वगैरे साधनें अत्यंत कमी किंमतींत विकावींत म्हणजे चाळीस रुपये पट्टीसाठीं माणसानें सर्वस्वाला मुकावें. पट्टी-वसुलाची तारीख साधारणतः तीन महिने आधी अलीकडे आणण्यात आली होती. त्यामुळे ज्या शेतकऱ्यानी १९३० सालचे दोन हप्ते दिले होते त्याना जानेवारी १९३१ चा हप्ता तीसच्या आक्टोबरमधेच द्यावा लागत होता. हे सर्व कायदेशीर असले तरी त्यात संतापजनक निष्ठुरता होती. या सर्वांवर कडी म्हणजे शारीरिक छळ होय. बंदुका आणि लाठ्या घेतलेले पोलीस चळवळींतून अलिप्त असलेल्या खेड्यातून फेरफटका करीत. आणि लाठीनें किंवा बंदुकीच्या दस्त्यानें शेतकऱ्याना झोडपून काढीत. अशा हल्ल्यानें जखमी झालेल्या पंचेचाळीस लोकांनीं मजजवळ व्यक्तिशः हकिगती सांगितलेल्या आहेत. बेचाळीस लोकांच्या जखमा मी स्वतः डोळ्यानें पाहिल्या आहेत. यातील काहीं जखमी लोक अत्यंत भयंकर रीतीनें जायबंदी झाले होते. एका मनुष्याचा हातच मोडला होता. दुसऱ्या मनुष्याचा आगठा हाडापर्यंत वेगळा झाला होता. बाकीच्या लोकांचें सर्व शरीर जखमानीं भरून गेलें होतें. या सर्व प्रकाराच्या मागे पुष्कळ वेळा करवसूलीचा हेतू असे. आणि काहीं प्रसंगीं म्हैस जप्त केल्यावर आणि बेदम मार दिल्यावर करवसुली होत असे. कित्येक लोकानीं मजकडे हकीगती पाठविल्या त्यातले कांहीं लोक तर असे होते कीं ते स्वतः कर देणारे नसतांना गैरहजर असलेल्या शेजाऱ्च्या शेतकऱ्याचा कर मारझोड करून त्यांच्याकडून वसूल केला होता. पुष्कळ ठिकाणीं चळवळीपासून अलिप्त असलेल्या खेड्याना केवळ दहशत बसविण्यासाठीं मारझोड होत असे. एका खेड्यात झाडावर आणि घरावर लावलेले निशाणे ओढून फाडण्यात आलीं. ज्यांचीं घरें या चिन्हाच्या जवळ होती अशा आठ शेतकऱ्याना त्या शेजारधर्माबद्दलच मार देण्यात आला. गांधीं टोपी घातलेल्या दोन माणसाना डोक्यावरची टोपी काढून घेईपर्यंत बुडविण्यात आले.

"हिंदी अधिकाऱ्यानीं केलेला अत्यंत अमानुष प्रकार म्हणजे बारिया नावाच्या गुन्हेगार जातीतील लोकांना पातीदार वर्गाविरुद्ध उठविण्याचे प्रयत्न केले. त्याना कर्ज मिळूं नये, बेदम मार बसावा आणि प्रसंगीं त्याचीं घरेंही जाळलीं जावींत अशा तऱ्हेची प्रत्यक्ष चिथावणी होत होती. या बाबतींत पात्र बारियाचे मजजवळ प्रत्यक्ष पुरावे आहेत. लहान लहान शेतकऱ्याच्या जमिनी एक किंवा

दोन रुपये एकराच्या दरानें बानियाना विकण्यात आल्या होत्या. स्वतः कमिशनर साहेब मजबरोबर एका खेडेगांवीं आले होते., त्यानीं शेतकऱ्याच्या जखमा स्वतः पाहिल्या आणि त्याना प्रश्न विचारिलें. त्यानीं पुढें काढलेल्या निर्णयाबद्दल काहींही सांगण्याचा मला अधिकार नाहीं. परंतु नऊपैकीं फक्त एका हकीगतीबद्दल तरी त्यानीं शंका व्यक्त केली. दोन स्थानिक हिंदी अधिकाऱ्याचें कृत्य मला पहाण्याचा योग आला. नंतर बोरसद येथें मी एक पिंजरा पाहिला. त्यामध्यें चौकशी न झालेले कैदी वरील अधिकाऱ्यानें ठेविले होते. आणि तीस चौरस फुटाच्या त्या जागेंत अठरा राजकीय पुढाऱ्याना रात्रंदिवस कोंडून ठेविले होते. या कैद्याना दिवसातून फक्त पाऊण तास प्रातर्विधी करण्यासाठीं आणि शौचकूपात जाण्यासाठीं बाहेर सोडण्यात येत असे. हिंदुस्थानातील बहुजनसमाज सामान्य मनःस्थितींत नाहीं, ही गोष्ट इंग्लिश लोकाना माहिती नाहीं. इंग्लिश लोकाचीं मनें हिंदी परिस्थितीबद्दल अत्यंत काळजीपूर्वक अलिप्त ठेवण्यात आलीं आहेत. हिंदी लोक आनंदाच्या ऐन भरात आहेत; त्याना प्रक्षुब्ध करण्याचे प्रयत्न चालू आहेत. आमच्या कळकळीबद्दल त्याच्या मनात संशय उत्पन्न झाले आहेत. आणि या सर्वांहून विशेष गोष्ट म्हणजे आपल्या बंदिवान पुढाऱ्याबद्दल त्याच्या मनात विलक्षण भक्ति आहे. जोंपर्यंत गांधी तुरुंगात आहेत तोंपर्यंत ही चळवळ बंद होईल किंवा ढिली पडेल असें मला वाटत नाहीं. नवीन राज्यपद्धतीचा आराखडा तयार झाल्यावर आणि वेस्ट मिनिस्टरला तो स्वीकारला गेल्यावर राजकीय कैद्याची त्याच वेळीं मुक्तता होईल अशी आशा करण्यास जागा आहे काय ? या चालू वर्षाच्या हकीगतीचा इतिहास आपणास जास्त काळजीपूर्वक पहावयास पाहिजे आणि त्याचा विसर पडण्यासाठीं आपण हिंदुस्थानास मदत केली पाहिजे.

एच्. एन्. ब्रेलसफोर्ड.
न्यू यॉर्क
१२ जानेवारी.

देशातील गोळीबाराबद्दल आणि विशेषतः पेशावर येथील गोळीबाराबद्दल १५ जुलै १९३० रोजीं असेम्ब्लीमध्यें प्रश्न विचारण्यात आला. तो प्रश्न आणि त्याचें उत्तर खालीं दिलें आहे.

मौलवी अब्दुल मातिन चौधरी ( मि. एस्. सी. मित्र याच्या वतीनें )—

( अ ) सरदार गंगासिंग ( सुपरवाइझर मिलिटरी डेअरी फार्म पेशावर ) हे आपल्या टांग्यातून आपल्या कुटुंबासह गुरुद्वार येथील धार्मिक समारंभासाठीं येत असता एका ब्रिटिश सोल्जराने पेशावर मधील कावली गेटजवळ त्यांच्या-वर गोळ्या झाडल्या आणि त्यामुळें त्याचा पंधरा महिन्याचा मुलगा व नऊ वर्षांची मुलगी ठार झालीं आणि त्याच्या पत्नीला भयंकर जखम झाली, ही गोष्ट खरी आहे काय ?

( ब ) पोलिसानी किंवा लष्करी शिपायानीं त्या जखमी स्त्रीला हॉस्पिटल-मध्यें नेण्याबद्दल काहींही खटपट केली नाहीं; आणि प्राथमिक उपचार कर-ण्याचे आणि त्या गरीब कुटुंबाला दवाखान्यांत नेण्याचें काम शेवटीं लोकाना करावें लागलें ही गोष्ट खरी आहे काय ?

( क ) त्या मृत मुलाचीं शरीरे बाजारातून मिरवत स्मशानभूमीकडे नेण्यात येत असता आणि त्यास डेप्युटी कमिशनरची परवानगी असता अचा-नकपणें काही ब्रिटिश शिपायानीं मिरवणुकीवर गोळीबार केला; आणि त्यामुळें कित्येक लोक ठार झाले व कित्येक जखमी झाले, ही गोष्ट खरी आहे काय ? त्या प्रसंगीं किती लोक मेले आणि किती जखमी झाले याची माहिती सरकार पुरवील काय ?

( ड ) या प्रसंगाची चौकशी एका सेशन्स जज्जाकडून सुरू करण्याचा सरकारचा विचार होता परंतु लष्करी अधिकाऱ्याच्या विरोधामुळे ती कल्पना सोडून देणें भाग पडलें, ही गोष्ट खरी आहे काय ?

ऑनरेबल मि. एच्. जी. हेग :—

( अ ) सर्व गोष्टी पेशावर येथील ॲडिशनल डि. मॅजिस्ट्रेट याच्या ३ जून १९३० च्या जजमेंटमध्यें नमूद केल्या आहेत. त्याची एक प्रत लायब्ररींत ठेविली आहे. हा अत्यंत खेदकारक प्रसंग केवळ आकस्मिक तऱ्हेने घडून आला.

( ब ) उत्तर देण्याचें वगळलें.

( क ) माझी माहिती अशी आहे कीं, वरील मिरवणूक ब्रिटिश पलटणीला बाजूस सारून जात होती. मिरवणुकींतील जमाव अतिशय प्रक्षुब्ध झालेला होता, आणि शिपायाच्या बंदुका हिसकावून घेण्याचे प्रयत्न झाले. लोकांनीं जमाव मोडण्याचें नाकारलें आणि गोळीबार करण्याचा हुकूम द्यावा लागला. एकंदर नऊ इसम ठार झाले, आणि अठरा जखमी झाले.

( ड ) नकारात्मक उत्तर.

गोळीबाराचे किती प्रसंग आले याविषयीं मि. एस्. सी. मित्र यानीं प्रश्न विचारला. त्यास उत्तर म्हणून ऑनरेबल मि. एच्. जी. हेग यांनीं खालील पत्रक दाखल केले. ( ले. असेंब्ली डिबेट सोमवार १४ जुलै १९३० भाग ४ नं. ३ पृ. २३७ ). तें पत्रक खालीं दिल्याप्रमाणें आहे.

## सार्वजनिक ठिकाणीं झालेले अपघात

| प्रांत | तारीख | मेले | जखमी | शेरा |
|---|---|---|---|---|
| मद्रासशहर | २७ एप्रिल | २ | ६ | १ कांही वेळानें मागाहून मेला |
| कराची | १६ ” | १ | ६ | ” |
| बंगाल ( कलकत्ता ) | १ ” | ७ | ५९ | ” |
| २४ परगणे | २४ ” | १ | ३ | ” |
| चित्तगाव | १८-१९-२० | १० | २ | दोघेही नंतर मेले |
| पेशावर | २३ ” | ३० | ३३ | |
| चित्तगाव | २४ ” | १ | — | |
| मद्रास | ३० मे १९३० | – | २ | |
| सोलापूर | ८ मे | १२ | २८ | |
| वडाळा मीठागर | २४ ” | – | १ | |
| भेंडी बाजार | २६–२७ | ५ | ६७ | |
| हौरा ( बंगाल ) | ६ मे | ० | ५ | |
| चित्तगाव | ७ मे | ४ | ८–३ नंतर मेले | |
| मैमेनासिंग | १४ मे | १ | ३० ते ४० | |
| मिदनापूर (प्रतापविधी) | ३१ मे | २ | २ | |
| संयुक्तप्रांत ( लखनौ ) | २६ मे | १ | ४२ २ नंतर मेले | |
| पंजाब कलु(झेलम् जिल्हा) | १८ मे | – | १ | |
| ब्रह्मदेश–रंगून | शेवटचा आठवडा | ५ | ३७ | |
| | | १७ | ३७ | |
| वायव्य सरहद्द दिल्ली | ६ मे | ४ | ४० | |

सोलापूर येथील डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेटनें १२ मे रोजीं रात्रीं ८॥ वाजता लष्करी अधिकाऱ्यांच्या हातात सर्व अधिकार दिले. हिंदुस्थान सरकाला

दुसऱ्या दिवशी सकाळीं ही बातमी कळली आणि १५ मे रोजी सोलापूर मार्शल लॉ ऑर्डिनन्स पुकारण्यात आला. ८ मे रोजीं सोलापूरला १२ माणसें ठार झाली. आणि २८ जखमी झाली. निरनिराळ्या सहा प्रसंगी गोळीबार झाला. ( ले. असेंब्ली डिबेटस् १४ जुलै १९३० भाग ४; नंबर ६ पृ. २७२ आणि २३८. )

वरील उताऱ्याविषयींची एकंदर हकीकत खालीलप्रमाणें आहे.

सोलापूर येथे अत्यंत किळसवाणे प्रकार घडून आले. स्वयंसेवक अतिशय शांतपणे शिस्त राखीत होते आणि रस्त्यातील रहदारी नियंत्रित करीत होते. हे बरेच दिवस चालले. पोलिस नुसते नावापुरते बदलले जात असत. अधिकारी वर्गाला ह्या देखाव्याबद्दल स्पृहा वाटणे अगदी सहाजिक होते. अशा परिस्थितींत स्वयंसेवक आणि पोलिस यांचा संबंध येणे आणि झगडा होणे अगदी संभवनीय होतें. असा एक झगडा झाला आणि त्यात चार पाच पोलीस ठार झाले. १९१९ सालीं पंजाबमधे झाल्याप्रमाणेच सोलापूर येथेंही वरील प्रकाराचे पर्यवसान लष्करी कायदा पुकारण्यात झालें. चार माणसाना फाशी देण्यात आले आणि कित्येक लोकाना लष्करी कायद्याच्या कलमाखालीं दीर्घकालीन कैद ठोठावण्यांत आली. जुलै आणि ऑगस्ट महिन्यात तहाच्या ज्या वाटाघाटी झाल्या त्यात वरील कैद्यांची मुक्तता हा एक महत्त्वाचा मुद्दा होता. तो मुद्दा शेवटीं सिद्धीस गेला नाहीं. त्याची हकीगत लवकरच येईल.

२३ एप्रिल १९३० रोजी पेशावर येथें घडलेले प्रसंगही येथे थोडक्यात सागतां येतील. हिंदुस्थानातील बाकीच्या प्रांताप्रमाणेच वायव्य सरहद्द प्रांतातही सविनय कायदेभंगाची चळवळ चालू होती. पेशावर येथे २३ एप्रिल रोजी दारू पिकेटिंग सुरू होईल असे कॉंग्रेसने जाहीर केलें. वायव्य सरहद्द प्रांतातील रेग्युलेशन्सविषयीं चौकशी करण्याकरितां ऑल इं. कॉं. कमिटीचें शिष्टमंडळ २२ एप्रिल रोजीं पेशावरकडे जाण्यास निघालें. त्यास अटक येथे अडविण्यात आले आणि पुढें जाण्याची मनाई करण्यांत आली. ही बातमी कळल्याबरोबर पेशावर येथे एक मोठी मिरवणूक निघाली आणि शाहीबागमध्यें एक सभा झाली. दुसऱ्या दिवशी अगदीं सकाळीं नऊ पुढाऱ्यांना अटक झाली. दुसरे दोन पुढारी सकाळी नऊ वाजता पकडण्यांत आले. परंतु ज्या लॉरीतून त्याना नेण्यात येत होते ती लॉरीच मोडली. पोलीस स्टेशनवर हजर राहण्याचे त्या पुढाऱ्यानीच कबूल केलें. आणि तशी त्याना परवानगी देण्यांत आली.

त्याप्रमाणें त्या पुढाऱ्यांसह लोकांची एक मिरवणूक निघाली आणि काबुली गेट पोलीस स्टेशनजवळ ती मिरवणूक आली परंतु तें बंद होतें. एक घोडेस्वार तिकडून येत होता. त्यावेळीं लोक मोठ्याने ओरडले आणि त्यांनीं राष्ट्रीय पदें म्हटलीं. तो घोडेस्वार तेथून निघून गेला. एकदम त्या ठिकाणीं दोनतीन चिलखती मोटारी येऊन त्या लोकांमध्यें घुसल्या. तिकडून एक इंग्लिश गृहस्थ मोटार सायकलवरून येत होता. त्याची वरील गाड्यांशीं टक्कर होऊन तो चिरडला गेला. चिलखती गाडींतील कोणीतरी गोळ्या झाडल्या आणि एकाएकीं चिलखती गाडीस आगही लागली. डेप्युटी कमिशनर आपल्या चिलखती मोटारमधून बाहेर आले आणि पोलिस स्टेशनकडे जात असता जिन्यावर पडून बेशुद्ध झाले आणि ते लवकर सावधही झाले. चिलखती गाड्यानीं गोळीबारास सुरवातही केली. मेलेल्या लोकांना उचलून नेण्याचे लोकांनीं प्रयत्न केले. लष्करी तुकड्या आणि चिलखती मोटारगाड्या तेथून हालविण्यात आल्या. दुसरा गोळीबार सुरू झाला. तो एकंदर तीन तास झाला. सरकारी पत्रकाप्रमाणे पाहिले असता तीस इसम ठार झाले आणि तेहतीस जखमी झाले असें दिसतें; परंतु लोकांच्या सांगण्यावरून खरी संख्या सात ते दहापट होती. संध्याकाळीं लष्करी शिपायांनीं कॅांग्रेस ऑफिसची झडती घेतली. आणि कॅांग्रेसचें निशाण व फिती नेण्यांत आल्या. २५ तारखेस लष्कर व नेहमींचे पोलीस सुद्धा एकदम दूर करण्यात आले. २८ तारखेस पुन्हा पोलीस हजर झाले आणि त्यानीं शहराचा ताबा घेतला; मधल्या काळांत कॉंग्रेस व खिलाफतचे स्वयंसेवक शहराचे रक्षण करीत होते. ४ मे रोजीं लष्करी शिपायानीं शहराचा ताबा घेतला. ६ रोजीं झालेल्या हकीगती सरकारने दिलेल्या वृत्ताताप्रमाणेच सागणें योग्य आहे. त्या दोन पुढाऱ्यांनीं आपण स्वतः होऊन पोलीस स्टेशनवर हजर राहण्याचें कबूल केले. परंतु सरकारचें म्हणणें असें आहे कीं लोकांनीं गिल्ला करून पोलीसाच्या ताब्यांतून त्याना सोडविलें. डेप्युटी कमिशनरकडे गेलेल्या पोलिसाला एक विटकरीचा टोला लागून जखम झाली होती असें सागण्यांत येतें आणि डेप्युटी कमिशनर गेटवरून गेले त्या वेळीं त्याच्या मोटारवर दगड विटाचा मारा झाला. जो मोटारसायकलवाला चिलखती मोटारवर आदळला त्याच्या बाबतींत असें म्हणतात कीं, गर्दीतून कोणीतरी त्याच्या डोक्यावर तडाखा मारला व त्यामुळें तो जवळ जवळ बेशुद्ध होऊन मोटारवर जाऊन आदळला व मोटार त्याच्या अंगावरून गेली. लोकांशीं बोलण्याचा प्रयत्न

करीत असता डेप्युटी कमिशनरनाही दगडविटांचा मार बसला. चिलखती मोटार मधील लष्करी शिपायांवर सुद्धा हल्ला झाला व त्याचे पिस्तूल पळविण्याचा प्रयत्न झाला. डे. कमिशनर बेशुद्ध झाले. आणि त्याना पोलीस चौकींत नेणे भाग पडलें. चिलखती मोटारींना सुद्धा आग लावली.

नंतर डे. कमिशनरनी गोळीबाराचा हुकूम दिला व लोकांची गर्दी मोडली. २९ एप्रिलच्या दंग्यात २० ठार झाले व ३० जखमी झाले. " आम्ही तैरंगजाईच्या दार्जीला बोलावले आहे. तो लष्कर जमवीत आहे व पेशावर जिल्ह्यात प्रवेश करण्याचा त्याचा इरादा आहे. " अशीं पत्रकें व जाहिराती पेशावर कॉ. कमिटीनें सर्वत्र वांटल्या. कॉंग्रेस व नवजवान सभा हीं त्या वेळीं बंडाच्या साठीं वातावरण तयार करीत होती.

३१ मे १९३० रोजीं कायदेभंगाच्या चळवळींत खालील गोष्टी घडल्याः—गंगासिंग खंबोज हा सरकारी नोकर होता, तो टाग्यातून चालला होता. त्याच्या मुलीचें नाव बेबी हरपाल कुवर [ वय ९॥ वर्षें ] आणि मुलाचें नांव काका बखत्यारसिंग [ वय १६ महिने ]. ते दोघे गोळी लागताच झाडावरून पक्षी पडावेत तसे पडले. त्याची आई तेजकुवर हिला हातावर व छातीवर गोळ्या बसल्या. मुलाच्या प्रेतयात्रेला डे. कमिशनरनें परवानगी दिली होती. या प्रेतयात्रेवर २ यार्ड अंतरावरून गोळ्या झाडल्या. त्यामुळें त्या मृत मुलांचीं शरीरें खालीं पडलीं व तीं लोकानीं पुन्हा पुन्हा मिरवीत नेलीं. अशा रीतीनें ९ माणसें ठार झालीं व १८ जखमी झालीं. एकंदर १७ वेळां गोळ्याची फैर झाली. अशी माहिती सरकारनें असेंब्लींत विचारलेल्या प्रश्नाला दिली.

१९३० जुलैत सरकारनें दुसरें पत्र काढलें, त्यावरून अशी माहिती मिळते कीं, ११ नं. च्या प्रेस ऑर्डिनन्सान्वये २ लक्ष ४० हजार रुपये १३ वर्तमानपत्राकडून वसूल करण्यात आले व ९ वर्तमानपत्रानीं आपलें प्रसिद्धीकरणच बंद केले. [ प्रश्न ११६ चें उत्तर. पृ. ५४७ लेजिस्लेटिव्ह असेंब्ली डिबेट भाग ४, नं. ८. ता. १५।७।३० ].

२१ जुलै १९३० रोजीं लो. टिळकाची पुण्यतिथि मुंबईस साजरी झाली आणि श्रीमती हंसा मेहता यांच्या नेतृत्वाखालीं एक मिरवणूक निघाली, त्यावेळीं त्या कॉंग्रेसच्या डिक्टेटर होत्या. तेथील वर्किंग कमिटी अद्याप बेकायदेशीर ठरली नव्हती. तिच्या बैठकी त्याच वेळीं लागोपाठ ३ दिवस

झाल्या. कांहीं सभासद संध्याकाळच्या मिरवणुकीला गेले व ते मिरवणुकी-बरोबर चालत असता १४४ कलमाप्रमाणें मिरवणुकीवर नोटीस बजावण्यात आली. मिरवणुकींत त्या वेळीं हजारों लोक जमले होते. लोक रस्त्यावर बसले आणि रात्रभर पाऊस पडत होता तरी एक रेसभरही ते हलले नाहींत. नेहमीं अशा अडविलेल्या मिरवणुकीवरील बंदी मध्यरात्रीनंतर उठवीत असत. त्याप्रमाणें त्या वेळीं होईल असें वाटत होतें. मि. हिले हे पोलीस कमिशनर होते. चीफ प्रेसिडेन्सी मॅजिस्ट्रेटनीं होममेंबर मि. हॉटसन याना पुण्यास तार केली. त्यानीं जबाब दिला कीं, मी तेथे येईपर्यंत कांहींही करूं नका. ते अगदीं सकाळींच येऊन दाखल झाले आणि बोरीबंदरच्या स्टेशनच्या इमारतीच्या गच्चीवरून सर्व देखावा त्यानीं निरीक्षणपूर्वक पाहिला. सकाळीं कांहीं निवडक लोकाना अटक झाली व त्याबरोबरच शंभर स्त्रियाही पकडल्या. आणि नंतर लाठीमार सुरू झाला. वर्किंग कमिटीच्या तेथें हजर असलेल्या सभासदांपैकीं पं. मदनमोहन मालवीय, वल्लभभाई पटेल, जयरामदास दौलतराम व सौ. कमला नेहरू याना अटक झाली. वल्लभभाईंची मुलगी श्रीमती मणिबेन यांची गुजराथमध्यें मीठसत्याग्रहात व करबंदीच्या चळवळींत प्रसिद्धि झाली होती. त्याही तेथें होत्या व त्याना अटक झाली. श्रीमती अमृत कुवर [ पंजाब ] व श्रीमती हंसा मेहता [ डिक्टेटर ] या अटक झालेल्या १०० स्त्रियातच होत्या.

मुंबईचे जुने कमिशनरसाहेब पुरेसे करडे अंमल गाजवणारे नसल्यानें त्याची बदली करून मि. वुइल्सन याची नेमणूक झाली. लाठीमाराच्या बाबतींत मि. वुइल्सन यानीं क्रांतीच केली. डोक्यावर लाठी मारण्यास त्यानीं प्रथम सुरवात केली. इतक्या दिवस अंगावर लाठीमार होत होता आणि शिवाय घेरी येऊन स्वयंसेवक रक्तबंबाळ होऊन खालीं पडले तरीसुद्धा त्याना झोडपावयाचें हा एक नवा उपक्रम लाठीराज्यात सुरू झाला. या हृदयद्रावक प्रसंगानीं लोकांचीं मनें एकमेकाकडे खेचलीं गेलीं व ५ हजाराचे ठिकाणीं २५ हजार लोक तेथें जमा होऊं लागले.

स्वातंत्र्यदिनाच्या वार्षिकोत्सवाच्या वेळीं एक लाख लोक मध्यरात्रीं एकत्र जमले होते आणि गोळीबारामुळें तो प्रसंग चिरस्मरणीय झाला! हा प्रसंग अझाद मैदानात ( मुंबई ) झाला. चळवळीच्या काळांत प्रत्येक महिन्याची ४ तारीख ही गांधी दिन म्हणून पाळण्यात येत असे

कारण ४ मे १९३० रोजी त्याना अटक झाली होती. आणि प्रत्येक महिन्याचा शेवटचा रविवार हा राष्ट्रीय ध्वजारोहण दिन म्हणून पाळला जात असे. या प्रसंगीं हजारो लोक जमत व लाठीमाराखेरीज परत जात नसत! मैदानांतून एका जागेवरून हाकललेले लोक दुसऱ्या ठिकाणी जमत व पोलिसाचें कार्य त्रिकट होऊन वसलें. एक संस्थानिक मुंबईस अशा एका प्रसंगीं प्रेक्षक होते व त्यानीं उद्गार काढले कीं, या लाठी कायद्यापेक्षा लष्करी कायदा पुष्कळ बरा. लाठींपुढें टिकलेले लोक लष्करी कायद्यापुढें सहज टिकाव धरतील! हे संस्थानिक म्हणजे विकानेरचे महाराज होत.३०जून १९३० रोजीं अटक होण्याच्यापूर्वी पं. मोतिलाल मुंबईस जात असताना हे महाराज मिरवणूक पाहण्यासाठीं एकदा गेले होते. या सर्व प्रकारात अत्यंत विस्मयकारक गोष्ट अशी होती कीं, ज्याचे वडील व आजोबा गोलमेज परिषदेकडे गुंतले होते त्याच्या मुली व नाती हिंदुस्थानात लाठीच्या हल्याने रक्तसिंचन करीत होत्या!

मद्रासकडे झालेला लाठीमार तर इतका सर्रास होता कीं, एकदा एक मिशनरी गृहस्थ रेव्ह. मि. पॅटन हे एक दिवस संध्याकाळीं खादीचे कपडे घालून व डोक्यावर हॅट घालून जात असता त्याना एका पोलिस ठाण्याजवळ वेदम मार वसला. पण पोलिस अगर सरकार कडून अशा नुकसानीची भरपाई होणे तर दूरच पण असमंजसपणा पदरात ही घेतला जात नसे. दक्षिणेकडे मि. खार्टन नावाच्या मिशनरी गृहस्थास तर हिंदुस्थान सोडण्याचा हुकूम झाला व त्याप्रमाणे त्याना करणे भाग पडलें.

पोलिसानीं सभा मोडण्याचा आणखी एक प्रकार शोधून काढला होता. स्वयंसेवकाना एका लॉरींत घालून दूर नेऊन एकाद्या अज्ञात ठिकाणीं सोडून देत व त्याच्याजवळ काहींही पैसे ठेवीत नसत. तेथून ते स्वयंसेवक आपला मार्ग शोधीत वणवण भटकूं लागत! परदेशी कापड वहिष्काराची चळवळ मुंबईस इतक्या एकनिष्ठेनें चालली होती कीं, एकदां एका लॉरींतून परदेशी कापड चोरटेपणानें जात असता वाबू गेनू नावाचा एक मुलगा कालवादेवी रोडवर लॉरीपुढे वेधडक आडवा पडला. परंतु कोणी मोटार पुढें हाकलली असेल तीं असो. मोटार पुढें सरकली व वाबू गेनूच्या अंगावरून गेली! दर महिन्यास वावू गेनू बलिदान दिन साजरा होत होता आणि कॉंग्रेसच्या पवित्र दिनाच्या यादींत एक भर पडली.

३ महिन्यांची शिक्षा भोगल्यावर वल्लभभाई पटेलांची सुटका झाली. पंडित मोतिलाल नेहरू यांनीं वल्लभभाईंची कॉंग्रेसचे ॲक्टिंग प्रेसिडेंट म्हणून नेमणूक केली. त्यानीं गुजराथ व मुंबईमध्यें संघटना करून सरकारची नाकेबंदी सुरू केली. त्याच्यामुळें स्वयंसेवकाना नवा आविर्भाव व नूर प्राप्त झाला. १३ तारखेस एका व्याख्यानात कॉंग्रेस कमिट्या बेकायदेशीर ठरविणाऱ्या ऑर्डिनन्सबद्दल ते म्हणाले कीं, प्रत्येक घर हें आतां कॉंग्रेसचें ऑफिस व प्रत्येक हृदय हें कॉं. चें संघटनाकेंद्र झालें पाहिजे. लॉर्ड आर्वीन यानीं ९ तारखेस लेजिस्लेटिव्ह असेंब्लींत नवीन सोटेशाही बिलाचे वेळीं केलेल्या भाषणाला हें चोख उत्तर होतें. गुजराथमध्यें बारडोली व बारसद तालुक्यात करबंदीच्या चळवळीनें मिळविलेलें यश हा चळवळीचा परमोत्कर्ष होता. सरकारी जुलूम इतका भयंकर होता कीं ८० हजार लोक ब्रिटिश हद्दींतून बडोदा हद्दीजवळील खेड्यांत रहावयास गेले.

वल्लभभाईंची ८० वर्षांची म्हातारी आई आपले अन्न शिजवीत होती. तिचें चुलीवरचें भाडें पोलिसानीं खालीं पाडलें. शारीरिक छळाबरोबर शेतकऱ्याच्या तांदुळात दगड, वाळू, घासलेटही मिसळण्यात येत. पण त्याची संघटना विलक्षणच होती व संघटनेपेक्षांही विलक्षण असा त्याचा अनत्याचाराच्या तत्वाच्या प्रत्येक अक्षरावर विश्वास होता.*

या राष्ट्रीय युद्धात प्रत्येक प्रातानें आपला दुःखाचा व यातनांचा भाग उचलला होता हा या सर्व वृत्ताताचा साराश आहे. स्थानिक अधिकारी, भोवतालची परिस्थिति, जमीनधारा व इतर भिन्न व्यवस्थेमुळें दडपशाहीच्या स्वरूपातही भिन्नत्व होतेंच. दक्षिण हिंदुस्थानात अरेरावीचा विशेष कहर झाला. दीर्घकालीन शिक्षा, लाठीमार, जबर दंड या गोष्टी तेथें पहिल्यापासूनच सुरू होत्या. बंगालमध्यें राजकीय कैद्याची संख्या सगळ्यात जास्त झाली. उसेंच विदेशी बहिष्कारांतही बंगाल बहार व ओरिसा याचा नंबर सर्वांत वर लागला नोव्हें. १९३० पर्यंतची आयात १९२९ नोव्हें. पर्यंतच्या आयातीपेक्षा शें. ९५

---

* चळवळीच्या प्रारंभीं चितागांव येथें काहीं हिंदी तरुणानीं लष्करी पोषाखात जाऊन काहीं अधिकाऱ्यावर गोळ्या झाडल्या. यापुढें जी दडपशाही माजली तिनें १९२१ मध्यें आयर्लंडमधील ब्लॅक व टॅन्स मधील झालेल्या कार्यक्रमाची आठवण होईल.

नें कमी झाली. स्वातंत्र्याच्या लढ्यांत गुजराथेंतील करबंदीच्या चळवळीनें केलेल्या उज्वल कामगिरीचा उल्लेख यापूर्वी आला आहेच. करबंदीची सार्वत्रिक चळवळ फक्त संयुक्त प्रातात झाली. तेथील जमीनदाराना व कुळाना कर व महसूल न देण्याची आज्ञा आक्टो. १९३० मध्यें झालीं होती. पंजाबनेंही आपली कामगिरी बजावली. वायव्यसहद्द प्रातातील अनत्याचाराचा प्रसार हा राजकीय हितापेक्षा नैतिक हिताच्या दृष्टीनेंच जास्त महत्त्वाचा होता. बहारमध्यें चौकीदारी कराची बंदी पुष्कळ व्यापक प्रमाणात झाली आणि लहानसहान रकमेबद्दल सुद्धां पुष्कळ मोठी संपत्ति जप्त होईपर्यंत लोकाना सर्व अरेरावी सहन करावी लागली. मध्यप्रातात जंगलसत्याग्रह यशस्वी रीतीनें चालू होता व जबर दंड व पोलीसांची दंडुकेशाही लोकानीं जुमानली नाहीं. कर्नाटकात करबंदीची चळवळ फार यशस्वी झाली व त्या त्या तालुक्यांचें भयंकर नुकसान झालें. एकंदर ३लक्ष ताडीचीं झाडें तोडण्यात आलीं. शिर्शी तालुक्यात १३० पैकीं ९६ पाटलानीं राजिनामे दिले, सिद्धपूर तालुक्यात २५ पाटलानीं व अकोला तालुक्यात ६३ पैकीं ४३ पाटलानीं राजिनामे दिले.*

अंकोला तालुक्यातील करबंदीची चळवळ ही मूलतः राजकीय स्वरूपाची होती व शिर्शी व सिद्धापूर तालुक्यात ती आर्थिक संकटासाठीं व धान्याच्या तुटवड्यामुळें करण्यात आली होती. सर्वात लहान अशा केरळ प्रातात सविनय कायदेभंगाचें निशाण युद्धाच्या शेवटच्या दिवसापर्यंत फडकत होतें; तर काचार व सिलहट व आसाम या प्रातात कॉंग्रेसच्या आज्ञा दणक्यानें पाळल्या जात होत्या.

या सर्व प्रातात सामान्य स्वरूपाच्या काहीं प्रमुख बाबींचा उल्लेख करतां येईल. कॉंग्रेस कचेऱ्या बंद होणें, कॉंग्रेसचे कागदपत्र, हिशेब, निशाणें जप्त होणें, लाठीमार, सार्वजनिक सभा दाडगाईनें उधळून लावणें सर्व देशभर १४४ कलमाचा अंमल, १०८ कलमाखालीं व्यक्तिशः नोटिसा मिळणें, घरावर जप्त्या, झडत्या, छापखान्याच्या जप्त्या, वर्तमानपत्राकडून व छापखान्यांकडून जबर जामीन या सर्व गोष्टींचे वरील सर्व प्रातात अनुभव येत होते. परंतु

---

***मूळांत घातलेले भर**—[ महाराष्ट्रात संगमनेर आकोला येथें मोठ्या प्रमाणावर जंगलसत्याग्रह झाला. कुलावा जिल्ह्यात चिरनेरला जंगलसत्याग्रह होऊन गोळीबार झाला आणि सातारा जिल्ह्यांत बिळाशी येथें जंगलसत्याग्रहानिमित्त गोळीबार झाला. नाशिक जिल्ह्यातील कळवण येथें जंगलसत्याग्रह होऊन तेथेंहि गोळीबार झाला. बागलणात २०० व नगर जिल्ह्यामध्यें ६०-७० पाटलानीं राजिनामे दिले. —प्रकाशक ]

विदेशी कापडवाल्याच्या व दारू मक्तेदाराच्या हिताची या प्रांतातील सरकारनें जी विशेष काळजी घेतली ती कोणाच्याही सहज लक्षात येण्यासारखी होती.!

बंगालमध्यें अरेरावीचा अंमल मिदनापूरला सर्वांत जास्त अनुभवावा लागला. कॉंग्रेस स्वयंसेवकांना अन्नपाणी किंवा आश्रय दिल्याबद्दल बंगाल व बहार प्रांतांतील गृहस्थामीयाना कैद होत होती. फार काय, मारामुळें असहाय होऊन विव्हळत पडलेल्या स्वयंसेवकाना मदत करणें हासुद्धां गुन्हा ठरविण्यांत आला होता. बंगालमध्यें विशेषतः खेरसाई येथें अगदीं क्षुल्लक कारणासाठीं गोळीबाराचे हुकूम सुटले. खेरसाई येथें एका घराची जप्ती चालू असतां कांहीं लोक भोंवतीं जमले होते. लगेच गोळीबार झाला व एक मनुष्य ठार होऊन कित्येक जखमी झाले. छेचना येथें लोक परत जात असतां गोळीबार झाला व गोळीबारांत ६ इसम ठार झाले व १८ जखमी झाले. मीठ तयार करण्याचें चालू असता तें पहात उभे असलेल्या लोकावर जून १९३० मध्यें गोळीबार झाला व २५ जण जायबंदी झाले. खेरसाई येथें एका गृहस्थास पकडीत असतां भोंवतीं लोक जमले होते व सूचना देऊन बाजूस हटले नाहींत म्हणून गोळीबार झाला व त्यांत ११ माणसे ठार झालीं. देशबंधु दास याच्या पुण्यतिथीचे समारंभास सुद्धा कलकत्ता येथें २२ जून रोजीं बंदी झाली. आणि मिरवणुकीवर ज्या वेळीं भयंकर लाठमार झाला. त्या वेळीं जखमी झालेले लोक तुडवले जाऊं नयेत म्हणून तेथील स्त्रिया घरातून बाहेर आल्या व स्वतःच्या देहाचें पाघरूण करून त्या जखमी लोकाना त्यानीं वाचविण्याची शिकस्त केली.

बारीसाल येथें एका दिवशीं ५०० इसम लाठीनें जखमी झाले. तामलुक येथें तर पोलीसानीं सत्याग्रहींच्या व त्याच्याबद्दल सहानुभूति असलेल्याच्या मालमत्तेस आग लावून दिल्याचें समजतें. कॉलेज मधील विद्यार्थी वर्गांत बसले असता पोलीस आंत घुसले व त्यानीं मुलांना झोडपलें. गोपीनाथपूर येथें कॉंग्रेस स्वयंसेवकाना मार बसला त्यात एक मुसलमानाचाही मुलगा होता. लोक भयंकर चवताळले आणि त्यांनीं पोलीसानाच कैद करून एका स्थानिक शाळेंत कोंडले व नंतर शाळेला आग लाविली ! कॉंग्रेस स्वयंसेवकानीं शाळेचीं दारें फोडलीं व स्वतःच्या प्राणाची पर्वा न करता पोलीसाना आगींतून सोडविले. ३१ डिसें. १९३१ रोजीं लाहोर येथें झालेल्या स्वातंत्र्याच्या ठरावाबद्दल स्वातंत्र्यदिनमिरवणूक निघाली होती. मिरवणुकींत सुभापबाबू होते. त्यांनाही मार बसला ! एक वर्षाची कैद भोगून ते नुकतेच बाहेर

आले होते. लाहोरांतील अधिकाऱ्याना तर इतके बेचैन झाले होते कीं असहकारवृक्षाचें चित्र सुद्धां त्यानीं सरकारजमा केलें. लुधियाना येथें गोषा घेतलेल्या एका मुसलमान स्वयंसेविकेसही कैद झाली. रावळपिंडी येथें कैद्यानीं वाईट अन्न घेण्याचे नाकारल्याबद्दल त्याचे हाल करण्यात आले. माटगॉमेरी येथें लाला लखीराम कित्येक दिवस अन्नसत्याग्रह करून शेवटीं मरण पावला. टम टम येथें एका स्त्रीला असभ्य रीतीनें वागविण्यात आलें. पंजाबमध्यें सीनेटहॉलमध्यें ( युनिव्हर्सिटी ) गव्हर्नरवर गोळ्या झाडल्या; त्यामुळें वाटेल त्या ठिकाणची झडती घेण्याची पोलिसाना चांगलीच संधि सांपडली. बहारमध्यें चळवळ शातपणें पसरत होती. समस्तीपूर प्रातांत शाहपूर पटोरिया नांवाचा एक लहानसा बाजार भरतो. जवाहरलालदिन झाल्यावर चार दिवसांनीं १२५ पोलीस सुपरिंटेंडेंटसह तेथें गेले व त्यानीं त्या बाजाराला वेढा दिला. ४६ लोकाना कैद केलें व जे लोक घरीं नव्हते त्याची मालमत्ता १२ बैलगाड्या भरून वाहून नेली. मोंघीर आणि भागलपूर चळवळींत अग्रस्थानीं होतीं. दारूदुकानावरील पिकेटिंगमुळें सरकारचें ४० लाखाचे नुकसान झाले. मोतिहारी प्रातातील फुलवारिया येथें लष्करी शिपाई व गुरखे याजकडून भाताचीं शेतें तुडवीत नेण्यात आलीं व अशा रीतीनें भोंवतालच्या लोकास दहशत बसविण्यात आली. चंपारन, सरण, मुझफरपूर, मोंघीर,पाटणा, व शहाबाद या जिल्ह्यात चौकीदारी करबंदीची चळवळ चालू होती. मध्यप्रातांत दारूच्या दुकानाच्या मक्त्याचा लिलाव शे. ५० नें कमी झाला. गढवाल दिनानिमित्त उमरावतीस लाठी फिरली. आध्र प्रातांत पेढापूर येथें २१ डिसे. १९३० रोजीं ८० मित्रमंडळी वनभोजनासाठीं जमली होती. त्यात दोन स्त्रिया होत्या. त्या सर्वांना पोलिसांनीं झोडपून काढलें. कित्येकाना भयंकर जखमा झाल्या. त्यातील दिवाणी दावा अद्याप चालू आहे. केरळ प्रातात दारूची विक्री शें. ७० नें घसरली. तामिल नाडु प्रातात ताडीविक्रीवर पिकेटिंग चालू असता गोळीबार झाला आणि कित्येक लाठीहल्ले झाले. दिल्ली येथें एक रावसाहेब दारूचें व्यापारी होते. त्यानीं ८० स्त्रीस्वयंसेविकाना व १०० पुरुष स्वयंसेवकांना अटक घडवून आपली ख्याति करून घेतली.

ब्रिटिश हद्द सोडून बडोदासंस्थानच्या हद्दीजवळ रहावयास गेलेल्या गुजराथी शेतकऱ्याचा स्थलातराचा तो देखावा मि. ब्रेल्सफोर्ड यानीं स्वतः पाहिला होता. त्याचे वर्णन करताना ते लिहितात :—

"इतिहासांतील अत्यंत विलक्षण असे तें स्थलांतर होतें. हिंदुस्थानांत जी कडक ज्ञातिबंधनें आहेत त्यामुळेंच एक विलक्षण तऱ्हेची जूट होऊं शकली व एकजमावानें शेतकऱ्यांनीं आपलें सर्वसामान बैलगाडींत भरलें. कांहीं लोकांनीं तर आपल्या माताचीं पिकें कापणीच्या हंगामाचीही वाट न पाहतां कापून घेतलीं. एक छावणी मी स्वतः पाहिली. चटयांच्या भिंती व ताडाच्या फांद्यांचें छप्पर करून त्यांनीं तात्पुरती घरें उभारलीं आहेत. पावसाळा संपला आहे. आपल्या गुरांचा गोतावळा त्याच्याभोंवतीं आहेच व त्या लहानशा जागेंत त्यांचें विंचवाच्या पाटीवरील बिऱ्हाड भरलें आहे. मोठमोठे राजण तांदुळांनीं भरले आहेत. ताब्याचीं भाडीं चकाकत आहेत. एखादा नांगरही आहे आणि तेथेंच एखादें देवाचें चित्र आणि त्या छावणीच्या सूत्रचालकाचें—महात्मा गांधींचे—फोटो तर सर्वत्र दिसतात. मी एका मोठ्या जमावाला घरेंदारें सोडण्याचें कारण विचारलें. स्त्रियानीं चटकन सरळ उत्तर दिलें, "महात्माजी तुरुंगात आहेत म्हणून" शेतकरी म्हणाले, "आर्थिक संकटाची आच लागली आहे. शेतींत उत्पन्न होत नाहीं, कर न्यायाला सोडून आहेत." एकदोघे म्हणाले "स्वराज्य मिळविण्यासाठीं आम्हीं जात आहोंत"

सुरत येथील कॉंग्रेस शाखेच्या चालकाबरोबर मी त्या ओस पडलेल्या खेड्यातून दोन दिवस हिंडलों. ते दिवस चिरस्मरणीय झाले आहेत. रस्तोरस्तीं घरें तोंडाला कुलूप घालून उभीं होतीं. एकदा उघड्या खिडकींतून डोकावून पाहिलें. आत एकही वस्तु दिसत नव्हती. रस्ते म्हणजे सूर्यप्रकाशाचीं शांत तळींच आहेत असें वाटलें. सर्वत्र शात होतें. कोठेंही चाहूलसुद्धा नव्हती. एक माकड मात्र एका छपरावरून उडी मारून गेलें, तेवढाच आवाज ऐकूं आला. कांहीं खेड्यांतील शेतकरी शेतकामासाठीं आपल्या गावीं येत व त्याची घरची मंडळी बडोदाहद्दींतच रहात असत. त्यानीं पोलिसी जुलमाविषयीं कांहीं गाऱ्हाणीं गाइलीं. तीं मात्र सहज पटलीं. कारण कांहीं लीलाचा मलाच प्रत्यक्ष अनुभव आला. एका ओसाड खेड्यातून आमची मोटार चालली होती. इतक्यात एक बंदुकवाला पोलीस तेथें आला व बंदुक रोखून त्यानें आम्हाला थांबण्यास हुकूम केला. पोलिसाचा लेखी हुकूम असला तर तुम्हाला या खेड्याबाहेर जाता येईल असें तो ओरडला. परंतु जवळ येऊन माझा युरोपियन पोशाक पाहिल्यावरोबर तो पोलिस अगदीं कोलमडलाच आणि मोडक्यातोडक्या इंग्रजींत तो वरळूं लागला; परंतु मला त्यात विशेष कांहीं

वाटलें नाहीं. त्या पोलीसच्या अंगावर कोठेंही नंवराचा बिल्ला नव्हता. मी बिल्ला मागितला तेव्हा तो म्हणाला, आमच्याजवळ गुप्त नंवर असतात. तो पोलीस एका जादा तुकडीपैकीं होता. ही व्यवस्था काहीं कोणाच्या नजरचुकीनें झालेली नव्हे. हे जादा पोलीस आयर्लंडमधल्या ब्लॅक ॲंड टॅन्ससारखे आहेत असा याचा दुर्लौकिक झाला आहे.

" अप्रत्यक्ष परंतु उघड उघड चाललेल्या निःशस्त्र प्रतिकाराच्या बंडानें सरकार गोंधळून गेलें आहे व कायद्याच्या कलमात घुटमळत आहे, याबद्दल सरकारला दोष देता येणार नाहीं. सरकारनें कॉंग्रेस संस्था बेकायदेशीर ठरविल्या. बारडोली जिल्ह्याचा सुंदर आश्रम जप्त केला. मी ज्याच्याबरोबर होतों त्या सुरत कॉंग्रेस-शाखेच्या कार्यकर्त्यांना गेल्यावरोबर पकडलें. बारडोली छावणीची मालमत्ता जप्त करून करभरपाई करण्यासाठीं गिऱ्हाईक मिळाल्यास ती विकण्याचाही सरकारचा विचार आहे आणि हें संकट डोळ्यासमोर असूनही शेतकरी शात आहेत.

हे सर्व प्रकार कायद्याच्या कक्षेतच आहेत. परंतु अरेरावी, दंडुकेशाही ही नियमबाह्य आहे व ती सारखी चालू आहे. मी ज्या ज्या शेतकऱ्याच्या भेटी घेतल्या, त्याच्या हकीकतींनीं माझ्या वह्या भरून गेल्या आहेत. त्याच्या हकीकतीस सत्यासत्यतेची कसोटी लावणें शक्य नव्हतें. पण मी त्याना खोदखोदून प्रश्न विचारीत असे, त्यावरून मात्र त्यांत बिलकूल शंका वाटत नाहीं.

एका खेड्यात दररोज रात्रीं लुटारू येत, बुरखे घेऊन वावरत, गोळ्या झाडीत. एका रात्रीं एका शेतकऱ्याचा त्यानीं कुऱ्हाडीनें खून केला. तेव्हा शेतकऱ्यानीं सरकारकडे संरक्षणासाठीं दाद मागितली. त्या वेळीं एक पोलीस आधिकारी म्हणाला कर द्या कीं आम्ही तुम्हाला साभाळू. "

आफवा प्रातांतील एका निर्जन खेड्यात एक भयंकरच प्रकार झाल्याचें मला कळलें. ज्याना जमिनी नव्हत्या असे काही शेतकरी त्या खेड्यात राहिले होते. आणि त्याच्यावरोबर आपल्या शेतकामासाठीं बडोद्याहून काहीं शेतकरी आले होते. २१आक्टोबर रोजीं पहाटेस ३ वाजता १०पोलीस व एक सब-इन्स्पेक्टर मोटारींतून तेथें आले. लोक शेतात झोपलेले पाहून पोलिसांनीं त्याना बडवलें व कर मागितला. नंतर त्याना सब-इनस्पेक्टर समोर उभें केलें. इन्स्पेक्टरसाहेवानीं त्याना आपल्या हातानीं मार दिला. दोन भावाचीं डोकीं इन्स्पे-

परिषदेमध्यें कांहीं फेरबदल होऊन शेवटीं तडतोड व्हावी. या अटी वरील मध्यस्थ गृहस्थांनीं व्हाइसरॉयना कळवल्या व गांधी, मोतिलाल व जवाहरलाल यांनां तुरुंगात भेट घेण्याची परवानगी मागितली. हें १३ जुलैला झालें. त्याच सुमारास मोतीलालना अटक झाली. व्हाइसरॉयनीं आपल्या उत्तरांत हिंदुस्थानला द्यावयाच्या स्वराज्याचें स्वरूप आणखी सौम्य करून टाकलें आणि असें अभिवचन दिलें कीं, ज्या गोष्टी हिंदुस्थानला देणें सुसंगत वाटेल त्या गोष्टींत स्वतंत्रपणें व्यवस्था करण्यासाठीं हिंदुस्थानला करवेल तितकी मदत करण्यांत येईल परंतु त्या कोणच्या गोष्टी असतील याबद्दल मात्र कांहींही अभिवचन देणें शक्य नाहीं. हे दोन्ही कागद घेऊन सप्रू व जयकर यांनीं येरवडा तुरुंगात गांधींची २३ व २४ जुलै रोजीं भेट घेतली. गांधींनीं त्याच दिवशीं, अलाहाबाद येथें नैनीताल तुरुंगात नेहरू पितापुत्राना देण्यासाठीं एक पत्र दिलें. गांधींचें म्हणणें असें होतें कीं, गोलमेज परिषदेंत सेफगार्ड्स विषयींच फक्त चर्चा व्हावी. मध्यंतरींच्या काळात संपूर्ण स्वातंत्र्याचा प्रश्न निकालात काढूं नये. गोलमेज परिषदेच्या अटी समाधानकारक असाव्यात. सरकारने स्वतःच विदेशी कापड व दारू हीं बंद केलीं नाहींत तोंपर्यंत सविनय कायदेभंगाची चळवळ थांबली तरी, विदेशी कापडावरील व दारूवरील पिकेटिंग चालूच रहावें. कोणचीही शिक्षा न होता मीठ तयार करण्याचें कार्य चालू राहवयास पाहिजे.

नंतर गांधींनीं राजकीय कैद्यांची मुक्तता, जप्त केलेली मालमत्ता, वसूल केलले दंड व जामीन परत करणें, राजीनामे दिलेल्या लोकाना पूर्वीच्या जागेवर नेमणूक करणें, आणि वटहूकूम परत घेणें, या गोष्टींचा उल्लेख केला. मध्यस्थी करणाऱ्यांना महात्माजींनीं कळवलें कीं, मी राजकीय कैदी आहे हें विसरूं नका; त्यामुळें मला कोणच्याही चळवळीबद्दल मत व्यक्त करण्याचा अधिकार नाहीं. मी केलेल्या सूचना केवळ वैयक्तिक आहेत. स्वराज्याची कोणचीही योजना माझ्या ११ मुद्यावर तपासून पहाण्याचा अधिकार मी राखून ठेवला आहेच.

वाटाघाटीस योग्य वेळ आली आहे कीं नाही याबद्दल महात्माजींनी नेहरू याना लिहिलेल्या पत्रांत भीति व्यक्त केली. सर्व कागदपत्रासह 'मध्यस्थ' २७ व २८ तारखेस नेहरूद्वयाना भेटले. आणि त्यांच्याशीं पूर्ण

चर्चा केली. २८ जुलै १९३० रोजीं नेहरू यांनीं पत्र लिहिलें कीं, मुख्य महत्त्वाच्या मुद्यावर एकमत झालें नाहीं तर कोणच्याही परिषदेनें काहीं निष्पन्न होईलसें वाटत नाहीं. जवाहिरलालनीं स्वतंत्र पत्र लिहून कळविलें कीं, गांधींचा राज्यघटनाविषयक मुद्दा आपणा दोघासही महत्त्वाचा वाटला नाहीं आणि आजची परिस्थिति व कॉंग्रेसची प्रतिज्ञा लक्ष्यात घेता तो मुद्दा सुसंगतही वाटत नाहीं. ३१ जुलै व १२ ऑगस्ट या दिवशीं जयकरानीं गाधींची भेट घेतली. त्यावेळीं गाधींनीं स्पष्ट सागितलें कीं, हिंदुस्थानला वाटेल त्यावेळीं साम्राज्यातून निघून जाण्याचें स्वातंत्र्य ज्यात नाहीं व माझ्या ११ मुद्यावर समाधानकारक रीतीनें व्यवस्था लावण्याचा हक्क व सत्ता नाहीं अशी कोणचीही राज्यपद्धति पत्करावयास मी तयार नाहीं. तसेंच गतकालीं ब्रिटिशाना ज्या सवलती व कर्ज देण्यात आलें आहे, त्यांची एका स्वतंत्र लवादाकडून चौकशी व्हावयास पाहिजेच.

गाधींनीं आणखी असें सांगितलें कीं, सरकारनें आपली ही भूमिका आधींच नीट लक्षात घ्यावी. नाहींतर गाधींनीं आपणास अचानक नव्या गोष्टी सागितल्या असें सरकार म्हणूं लागेल. नंतर थोड्याच दिवसानीं नेहरूद्वय याना डॉ. सय्यद महंमद बरोबर येरवड्यास गाधींच्या भेटीसाठीं व इतर मित्राच्या भेटीसाठीं नेण्यात आलें.

याप्रमाणें ऑगस्ट १४ तारखेस येरवड्यासच एक परिषद झाली. सप्रू, जयकर एका बाजूस व गाधी, नेहरूद्वय, वल्लभभाई पटेल, डॉ. सय्यद महमद, श्री. जयरामदास दौलतराम व श्री. सौ. नायडू दुसऱ्या बाजूस होत्या. परिषदेचा निर्णय सर्वांच्या सह्यानिशीं १५ तारखेस नमूद करण्यात आला. त्यात हाच निर्णय होता कीं, पूर्वी सागितलेल्या अटीवरच फक्त आम्हीं वाटाघाटीस तयार आहोंत. शेवटीं गाधीं, सौ. नायडू, वल्लभभाई व जयरामदास यानीं सप्रू व जयकर याच्या परिश्रमाबद्दल आभारपूर्वक अभिनंदन केलें. त्यानीं असें सुचविलें कीं, कॉंग्रेससंस्थाच्या चालकाना आमच्यापैकीं कोणाचीही भेट घेतां यावी. त्याची व सरकारचीही समेटाची तितकीच तीव्र इच्छा असेल तर आमच्या भेटींच्या बाबतींत कॉंग्रेसच्या कार्यकर्त्यांना कोणत्याही प्रकारचा अडथळा नसावा.

व्हाइसरॉयनीं २८ ऑगस्टच्या पत्रात लिहिलें कीं, राजकीय कैद्याची

मध्यंतरी व्हाइसरॉयच्या विनंतीला मान देऊन सविनय कायदेभंगाची चळवळ करण्यात गुंतलेल्या लोकांचें सहकार्य मिळालें तर तें घेण्याची व्यवस्था करण्यात येईल.

वरील बैठक संपल्याबरोबर एका आठवड्यात हिंदुस्थानात एक महत्त्वाची गोष्ट घडून आली ती म्हणजे गांधींची आपल्या १९ सहकारी मित्रांसह विनशर्त सुटका झाली.

नंतर आणखी ७ पुढाऱ्यांची सुटका झाली. ही सुटका करण्याचें फर्मान काढताना त्यात व्हाइसरॉयनीं वापरलेली भाषा व व्यक्त केलेल्या भावना हीं अत्यंत स्पष्ट व उत्कृष्ट आहेत. तें फर्मान शब्दशः देण्यापूर्वी वर्किंग कमिटीनें केलेला महत्त्वाचा ठराव खालीं दिला आहे:—

अलाहाबाद येथें स्वराज्यभुवनात २१ जाने० १९३१ रोजीं दुपारीं ४ वाजता वर्किंग कमिटीची बैठक झाली. त्यात खालील ठराव पास झाला.

गोलपरिषदेंत असलेले ब्रिटिश पार्लमेंटचे सभासद, हिंदी संस्थानिक व इतर हिंदी गृहस्थ याच्यात झालेल्या व्यवहारास राष्ट्रीय सभेची ही वर्किंग कमिटी कोणच्याही स्वरूपाची मान्यता देण्यास तयार नाहीं. कारण संस्थानिक किंवा हिंदी गृहस्थ या हिंदुस्थानच्या कोणच्याही लोकाचे प्रतिनिधि नाहींत. त्याची तशी निवडणूक झाली नाहीं. ते सरकारकडून नेमले गेले आहेत. हिंदुस्थानातील प्रतिनिधींचीं सल्ला घेण्याचा देखावा करताना ज्या मार्गाचा अवलंब करण्यात आला त्यामुळें ब्रिटिश सरकारनें स्वतःस निंदेस पात्र करून घेतलें आहे. महात्मा गांधी, पं. जवाहरलाल यासारख्या प्रमुख व्यक्तींची कैद, वटहुकूम व अटक, लाठीमार, गोळीबार इत्यादि गोष्टींमुळें लोकमताची गळचेपी होंत आहे. सविनय कायदेभंग हें गाजलेल्या राष्ट्राच्या हातातलें कायदेशीर हत्यार आहे. त्या हत्याराचा उपयोग करून हजारों शांत निशस्त्र, निरुपद्रवी हिंदी लोक आपल्या देशाच्या स्वातंत्र्यासाठीं झगडत आहेत. त्यांच्यावर वरील प्रयोग करण्यांतच सरकारचें खरें अंतरंग व्यक्त झालें आहे.

इंग्लंडचे मुख्य प्रधान मि. रॅम्से मॅकडोनल्ड यानीं मंत्रिमंडळाच्या वतीनें १९ जाने. १९३१ रोजीं ब्रिटिश सरकारचें जें धोरण जाहीर केलें तें या कमिटीनें काळजीपूर्वक विचारात घेतलें आहे. आणि या कमिटीस असें वाटतें कीं,

तें इतकें मोघम आहे कीं, त्यावरून कॉंग्रेसनें आपल्या धोरणांत कांहींही बदल करणें योग्य होणार नाहीं.

लाहोर कॉंग्रेसच्या स्वातंत्र्याच्या ठरावाला ही कमिटी दुजोरा देत आहे. येरवडा तुरुंगांतून ता. १५ ऑगस्ट १९३० रोजीं म. गांधी, पं. मोतिलाल नेहरू, पं. जवाहरलाल नेहरू व इतर पुढारी यानीं आपल्या पत्रात जो अभिप्राय व्यक्त केला, तो या कमिटीस मान्य आहे. वरील पत्रातील विचाराना कोणच्याही तऱ्हेनें योग्य असा पाठिंबा मुख्य प्रधानानीं आपल्या घोषणेंत दिलेला दिसत नाहीं. अशी सहानुभूति दिसत नसता आणि वर्किंग कमिटीचे पहिले सभासद, राष्ट्रीय सभेचे सभासद व हजारों स्त्रीपुरुष हे तुरुंगात खितपत पडले असता, सरकारची दडपशाही अद्याप ऐन जोरात चालू असता, कोणच्याही धोरणाच्या मोघम घोषणेनें हें राष्ट्रीय युद्ध समेटावर येणें शक्य नाहीं किंवा सविनय कायदेभंगाची चळवळ थांबवणेंही योग्य ठरणार नाहीं. म्हणून ही कमिटी देशास असें सांगत आहे कीं, ठरलेल्या मार्गानींच हें युद्ध चालू ठेवावें व या युद्धाचें उदात्त स्वरूप आजपर्यंत दिसलें तें तसेंच टिकेल अशी या कमिटीस खात्री वाटते.

आजपर्यंत ७५ हजार लोकाना कैद झाली आहे. त्यात निरुपद्रवी स्त्रीपुरुष आहेत. अत्यंत निष्ठुर असे लाठीहल्ले झाले आहेत, पोलिसाच्या अटकेंत असताना चौकशी व शिक्षा होण्याच्या पूर्वींसुद्धां अमानुष छळ होत आहेत, गोळीबारांनीं शेंकडों लोक मृत्यु पावत आहेत व शेंकडों जायबंदी होऊन लुले होत आहेत, मालमत्तेची लूटमार होत आहे, घरेंदारें बेचिराख होत आहेत आणि खेडेगावें उध्वस्त करीत आहेत, लोकाना भाषणबंदी होऊन मिरवणुकी बंद झाल्या आहेत, कॉंग्रेस व तिच्या शाखा हीं बेकायदेशीर करून त्याची मालमत्ता जप्त होऊन त्याच्या कचेऱ्या व घरेंसुद्धा ताब्यात घेतलीं आहेत. या भयंकर दंडुकेशाहींत मुलें व स्त्रिया याचींही गय झाली नाहीं. परंतु देशातील स्त्रीपुरुष व मुलें यानीं या प्रसंगात जें धैर्य व चिकाटी दाखविली त्याबद्दल ते फार मोठ्या दर्जाच्या अभिनन्दनास पात्र आहेत असें ही कमिटी नमूद करीत आहे.

येत्या २६ जानेवारीस पूर्वीप्रमाणेंच स्वातंत्र्य-दिन साजरा करावा व न कचरता बेधडकपणें स्वातंत्र्ययुद्ध चालू ठेवण्याचा आपला निश्चय कायम आहे हें व्यक्त करावें.

वरील ठराव नर्चेस निघाला त्या वेळीं राजेंद्रबाबू अध्यक्षस्थानीं होते. वल्लभभाईंना ११ महिन्यांत तिसऱ्यादा अटक झाली होती व भाईंनीं बाबूजींना आपल्या जागीं पाठविलें होतें. पं. मोतिलाल नेहरूंना प्रकृतीच्या अत्यंत अस्वास्थ्यामुळें मुदतीच्या पूर्वीच सोडण्यांत आलें होतें. तो त्यांचा आजार शेवटीं विघातक ठरावयाचा होता !

वर्किंग कमिटीच्या बैठकीची तारीख व हेतु वर्तमानपत्रांत स्पष्टपणें प्रसिद्ध झाला होता व सभासद त्यासाठीं अलाहाबाद येथें जमले होते. गोलमेज-परिषदेविषयींचा वरील ठराव काहीं वादविवादानंतर पास झाला. पं. मदन-मोहन मालवीय हे आजारी असूनही बैठकीस हजर होते. ठराव प्रसिद्ध करावा कीं नाहीं हा प्रश्न होता आणि दुसऱ्या दिवसापर्यंत तो प्रसिद्ध करूं नये असें शेवटीं ठरलें. परंतु दुसऱ्या दिवशीं अशी एक घडामोड झाली कीं, ठराव प्रसिद्ध करूं नये हेंच मत योग्य ठरलें.

डॉ. सप्रू व श्री. शास्त्री हे लंडनला गेले होते. त्यांनीं तेथून तार पाठविली कीं, आम्हीं लवकरच येणार आहोंत. प्रधानाच्या भाषणावरून वर्किंग कमिटीनें आम्हीं येईपर्यंत व भेट होऊन चर्चा होईपर्यंत काहीं निर्णय करूं नये. त्याप्रमाणें वरील ठराव प्रसिद्ध झाला नाहीं.

गव्हर्नर जनरलनीं २५ जानेवारी १९३१ रोजीं खालील पत्रक प्रसिद्ध केलें:—

१९ जानेवारी रोजीं मुख्य प्रधानानीं जाहीर केलेल्या पत्रकाचा विचार करण्याची संधि मिळावी म्हणून मला स्थानिक सरकारच्या संमतीनें असे योग्य वाटतें कीं, वर्किंग कमिटीच्या सभासदांना आपापसात १ जानेवारी १९३० पासून जे वरील कमिटीचे सभासद आहेत त्यांच्याशींहि मनमोकळेपणानें चर्चा करण्याचें पूर्ण स्वातंत्र्य असावें.

वरील निर्णयाप्रमाणें वरील व्यक्तींना ज्या बैठकी करावयाच्या असतील त्यात कायद्याची काहीं आडकाठी नसावी म्हणून, वर्किंग कमिटी बेकायदेशीर ठरविणारा हुकूम परत घेण्यात येईल व श्री. गांधी व वर्किंग कमिटीचे मूळचे सभासद व १ जानेवारीपासून असलेले सभासद यांची सुटका करण्याची व्यवस्था करण्यात येईल.

त्याच्यावर माझे सरकार कोणचींहीं बंधनें लादणार नाहीं. कारण शांततामय परिस्थिति प्रस्थापित करण्याची आशा पूर्ण व्हावयाची असेल तर त्या गोष्टीशीं संबंध असलेल्या व्यक्ति बिनशर्त मुक्त असावयास पाहिजेत व त्याच्या चर्चेतच वरील आशा पूर्ण होण्याचा संभव आहे. शांततामय वातावरण प्रस्थापित करण्याची अंत:करणपूर्वक इच्छा धरूनच आम्हीं हें पाऊल टाकीत आहोंत............

ज्या हेतूनें मला ही स्फूर्ति झाली आहे त्याच हेतूला धरून वरील निर्णयाशीं संबंध येणारे लोक वागतील असा विश्वास ठेवण्यास मी तयार आहे...

२६ तारखेच्या मध्यरात्रीपूर्वी पुढाऱ्यांची सुटका करावयाची होती आणि त्या पुढाऱ्यांच्या पत्न्या तुरुंगात असल्यास त्याना सोडून देण्याबद्दल हुकूम सुटले होते. एकंदर २६ माणसाच्या सुटकेबद्दल हुकूम सुटले. सुटल्याबरोबर गांधींनीं हिंदी जनतेसाठीं एक संदेश लिहिला. यशाबद्दल अभिमान किंवा पराजयाबद्दल विषाद हीं दोन्हींही ज्याच्या ठिकाणीं लेशमात्र संभवत नाहींत त्याचें वैशिष्ट्य या संदेशात व्यक्त झालें आहे.

मी तुरुंगातून अत्यंत शुद्ध मनानेंच बाहेर आलों आहे. माझ्या मनात कोणच्याही शत्रुत्वाची तेढ नाहीं, कोणच्याही मताचा दुराग्रह नाहीं. प्रत्येक बाजूनें सर्व परिस्थितीचा अभ्यास करण्याचीं तयारी आहे. आणि सर तेज बहादुर सप्रु व इतर मित्र परत आल्यावर त्याच्या बरोबर मुख्य प्रधानाच्या विधानाची चर्चा करण्याची माझी इच्छा आहे. लंडनहून काहीं प्रतिनिधींनीं पाठविलेल्या तारेंत त्यानीं अशी तीव्र इच्छा प्रकट केली असल्यानें त्याचा मान राखण्यासाठीं मी हें प्रसिद्ध करीत आहे.

केवळ वर्किंग कमिटीचेच सभासद मुक्त केल्यानें आधींच बिकट असलेली वस्तुस्थिति जास्तच बिकट झाली आहे, असें महात्माजींना दिसून आलें आणि वर्किंग कमिटीचें काम जवळजवळ अशक्य झालें. चळवळीनें लोकाच्या मनावर एवढी मोठी पकड बसविली आहे कीं, पुढारी कितीही प्रमुख असले तरी ते लोकाना आता अमकाच असा मार्ग सागू शकत नाहींत. हें सरकारला अद्याप उमगले नाहीं. हें त्यानीं स्पष्टपणे सरकारला कळविलें.

तडजोडीच्या आपल्या अटींचे धोरण गांधींनीं वर्तमानपत्राच्या प्रतिनिधींना सांगितलें; परंतु पिकेटिंगचा हक्क व मीठ करण्याचा लक्षावधि भुकेल्या हिंदी

लोकांचा हक्क कधींही आम्ही सोडणार नाहीं. हें जाहीर करण्यांत गांधींनीं क्षणाचाहि उशीर केला नाहीं. ज्या दोन गोष्टीसाठीं एवढे वटहुकूम निघाले त्या दोन गोष्टी विदेशी वस्त्रावरील व दारूवरील पिकेटिंग व मीठ तयार करणें या आहेत. गांधी म्हणालेः—या गोष्टी केवळ प्रचलित गैर राज्यव्यवस्थेला विरोध करण्यापुरत्याच आहेत असें नाहीं. या गोष्टी कायमच्याच नाहींशा करणें हें ध्येय आहे. सन्मानाशीं सन्मानानें तह होत असेल तर त्या तहासाठीं माझी तळमळ आहे. परंतु वरील तीन गोष्टींचा समाधानकारक निर्णय ज्या तहानें लागणार नाहीं त्या तहाशीं मला कांहींही संबंध ठेवावयाचा नाहीं. त्या साठीं माझ्या पक्षाला मी एकटाच उरलों तरी हरकत नाहीं. गोलपरिषदेच्या वृक्षाची योग्यता त्या वृक्षाच्या फळावरुन मला ठरविली पाहिजे.

पं. नेहरूंच्या प्रकृतीच्या चौकशीसाठीं गांधी अलाहाबादला तावडतोब निघून गेले. वर्किंग कमिटीचे सर्व सभासद स्वराज्यभुवनात जमले. ३१ जाने. व १ फेब्रु. १९३१ च्या बैठकींत खालील ठराव पास झाला.

श्री. शास्त्री, सप्रु व जयकर याच्या इच्छेस मान देऊन वर्किंग कमिटी आपला २१-१-३१ चा ठराव प्रसिद्ध करण्याचें तहकूब करीत आहे. सविनय कायदेभंगाची चळवळ तहकूब झाली असा समज सर्वत्र पसरलेला दिसतो. म्हणून स्पष्ट आज्ञा होईपर्यंत ती चळवळ चालू ठेवायची आहे असें ही कमिटी मुद्दाम जाहीर करीत आहे. परदेशी कापडा-वरील व दारुवरील पिकेटिंग सविनय कायदेभंगाच्या चळवळीचे भाग नाहींत. तर ते जोंपर्यंत शांतता राखली जात आहे व लोकाना त्यापासून कांहींही उपद्रव पोहोंचत नाहीं, तोंपर्यंत वरील प्रयत्न करीत राहणें हा प्रत्येक व्यक्तीचा हक्क आहे. परदेशी कापड बहिष्कार हें राष्ट्रीय चळवळीचें अत्यंत आवश्यक अंग आहे. आणि जोंपर्यंत परदेशी कापड पूर्णपणें बंद करण्याची सत्ता किंवा त्यावर बंधनें घालण्याचा अधिकार राष्ट्रास नाहीं तोंपर्यंत पिकेटिंग चालूच राहील.

३ फेब्रु. पर्यंत वर्किंग कमिटीचे सर्व सभासद अलहाबादलाच होते. पंडित-जींची प्रकृति दिवसेंदिवस खालावत चालली होती म्हणून 'क्ष' किरण परीक्षे-साठीं त्याना लखनौ येथें पाठवणे जरूर झालें, व पंडितजींचें देहावसान होई-तों तेथेंच राहिले. मरणाशीं झगडा चालू असतानादेखील त्याचे तोंडून पुढील उद्गार बाहेर पडले—

" स्वराज्यभुवनांत हिंदुस्थानचें भवितव्य ठरवा माझ्यासमोर तें ठरवा. माझ्या मातृभूमीचें भवितव्य ठरविणाऱ्या शेवटच्या वाटाघाटींत मला सामील होऊं द्या. मरण यावयाचेंच असेल तर मला स्वतंत्र हिंदमातेच्या माडीवर डोके ठेऊन मरण येऊं द्या. माझी शेवटची झोंप मी बंदिवान देशात घेणार नाहीं. स्वतंत्र-देशात घेईन."

हे पंडितजींचे शेवटचे शब्द होते. पंडितजी म्हणजे अस्सल नबाब होते. त्याची नबाबी संपत्तींतच तेवढी व्यक्त होत नव्हती तर त्यांच्या चारित्र्यात व संस्कृतींतही प्रगट होत होती. राष्ट्रापुढें जे गुंतागुंतीचे प्रश्न पडले होते ते सोडविण्याच्या कामीं त्याची सूक्ष्म दृष्टि व हजरजबाबी बुद्धिमत्ता फार उपयोगी पडली असती अशा ऐनवेळीं झालेला त्याचा वियोग कधींहीं भरून निघणारा नव्हता. विशाल क्षेत्रांत वेगानें विहार करणे एवढाच त्याच्या बुद्धीचा विशेष नव्हता तर आम्हाला गोंधळात पाडणारे गुंतागुंतीचे राजकीय प्रश्नसुद्धा सूक्ष्मपणें ते पाहूं शकत आणि क्षणार्धांत अत्यंत अचूक असा निर्णय काढूं शकत !

वैभवोपभोगात त्याचें आयुष्य गेलें असलें तरीही गांधींच्या शिकवणींतील दारिद्र्य व आत्मविलोकन हें जें सार त्यायोगें आपलें आयुष्य खडतर मार्गानीं यापुढें घालविणें आवश्यक असल्याचें त्याना पटलें होतें त्याच्या सुखोपभोगातही आप्पलपोटेपणा नव्हता. त्याच्या वैभवात त्यानीं राष्ट्राला वाटेकरी होऊ दिलें; त्याचें प्रत्यंतर म्हणजेच त्याची स्वराज्यभवनाची देणगी ही होय. पण ही दगडमातीची देणगी कितीही मोठी असली तरी त्यानीं आपला पोटचा गोळा जो हिंदभूमीस अर्पण केला त्यापुढें कांहींच नाहीं.

मोतिलालजी गेले असले तरी त्याचा अनिर्बंध आत्मा कॅंग्रेसभोंवतीं वावरत आहे, व तिला मार्ग दाखवून तिचें भवितव्य ठरविण्याचें कार्य करीतच आहे.

पंडितजींच्या मृत्यूविषयीं ७ फेब्रु. रोजीं महात्माजींनीं अलाहाबादहून खालील संदेश प्रसिद्ध केला:—

प्रत्येक देशभक्तानें हेवा करावा असें दिव्य मरण पंडितजींना लाभलें.आपलें सर्वस्व देशाच्या पायीं अर्पण करून ते मृत्यू पावले. ज्या स्वातंत्र्यासाठीं त्याचा आत्मा तळमळत होता तें स्वातंत्र्य आता आटोक्यात आलें आहे व तें संपादन करण्यासाठीं प्रत्येकानें सर्वस्व शक्य नसेल तरी निदान स्वातंत्र्यप्राप्ती-

साठीं अवश्य तेवढें अल्पस्व अर्पण केलें तर तें मोतीलालजींच्या स्वार्थत्यागाचें चीज केल्यासारखें होईल.

' लिबर्टी ' पत्राला दिलेला संदेश याहून हृदयस्पर्शी आहे.

" माझी स्थिति एकाद्या विधवेपेक्षांही करुणास्पद झाली आहे. पतीशीं निष्ठावंत राहून तिला आपल्या पतीच्या कीर्तीचा उपभोग घेतां येईल. तसें कांहींही करण्याचें सामर्थ्य मजजवळ नाहीं; पंडितजींच्या मृत्यूमुळें मी जें हरवून बसलों आहे तें कायमचें हरवलें आहे.

महान् पर्वत माझ्यावर कोसळूं पहात आहेत. मला तुझ्या आड आश्रय घेऊं दे!

---

# भाग ५ वा

## प्रकरण १ लें

## गांधी–आयर्विन करार

राजकीय वातावरणात या वेळीं गांधींना ज्या गोष्टींचें दुःख होत होतें व ज्याची त्याना विशेष रुखरुख होती तें म्हणजे ज्या सुधारणांचा एवढा गाजावाजा झाला त्या इंग्लंडनें देऊं केलेल्या स्वातंत्र्याचा कांहींही प्रति-ध्वनि हिंदी अधिकारी वर्गात दृग्गोचर होत नव्हता. न्यूज ‘ क्रॉनिकल ’ पत्रात गांधींनीं लिहिलें, “ सर्वत्र दडपशाही अद्यापही चाललेलीच आहे, स्त्रियांची एक मिरवणूक पोलीसांनीं उधळून लाविली. त्याना केंस धरून ओढलें व बुटांनीं लाथाडलें ! अशा दडपशाहीनें कॉंग्रेसला सहकार्य करणें अशक्य आहे. मग वाकांच्या अडचणी दूर झाल्या तरी त्याचा उपयोग नाहीं. ”

खासगी रीतीनें लोकाना असें सुचविण्यांत आले कीं, चळवळ चालू ठेवावी; परंतु कोणचीही नवीन मोहीम सुरूं करूं नये किंवा नवीन परिस्थिति उत्पन्न होऊं देऊं नये.

याचवेळीं म्हणजे ता. ६ फेब्रु. १९३१ रोजीं गोलमेज परिषदेचे २६ प्रतिनिधी देशात परत आले व किनाऱ्यावर पाय ठेवल्याबरोबर त्यांनीं कॉंग्रेसला उद्देशून खालील विनंतिपत्रक प्रसिद्ध केले.

चालू योजना ही नुसती रूपरेखा आहे. महत्त्वाच्या व दीर्घपरिणामकारी अशा गोष्टी अद्याप व्हावयाच्या आहेत. आम्ही अशी मनःपूर्वक आशा करतों कीं, कॉंग्रेसच्या व इतर पक्षाच्या पुढाऱ्यांनीं यावेळीं पुढें येऊन योजना पूर्ण करण्याच्या कामीं भरीव सहाय्य करावें. या महत्त्वाच्या प्रश्नाचा विचार कर-ण्यासाठीं शांततामय वातावरण तयार केलें जाईल व लवकरच इतर राजकीय कैद्यांचीही मुक्तता होईल अशी आम्हाला आशा वाटत आहे. ”

परंतु १९३१ च्या फेब्रुवारीपर्यंत कैदखाना चालूच होता. कानपूर येथें पिकेटिंग करण्याबद्दल १३६ स्वयंसेवकाना अटक झाली आणि अन्नवस्त्राच्या बाबतींत व औषधपाण्याच्या बाबतींत त्या बंदिवानाना अगदीं निष्ठुरपणें वाग-विण्यात येत होतें.

१३ फेब्रु. स अलाहाबाद येथें वर्किंग कमिटीची बैठक झाली. यावेळीं डॉ. सप्रु व शास्त्री हिंदुस्थानांत परत आले होते आणि गांधींना व वर्किंग कमिटीला भेटण्यासाठीं ते तावडतोब अलाहाबादला गेले. वर्किंग कमिटीने त्या दोघांशीं चर्चा करताना खूप उलटसुलट प्रश्न विचारून त्यांना भंडावून सोडले. वर्किंग कमिटीचे सभासद त्या दोघांशीं जरा कडक रीतीनेंच वागले. कारण इंग्लंडमध्ये शास्त्रींनीं जे कांहीं उद्गार काढले होते त्यामुळें लोकामध्यें नुसता प्रक्षोभच झाला नव्हता तर लोकांचीं मनें अत्यंत कलुषित झालीं होतीं.

गांधींनी लॉर्ड आयर्विनला पत्र लिहून पोलिसाची दंडुकेशाही व विशेषतः २१ जाने. रोजी बोरसद येथें स्त्रियावर झालेला हल्ला या गोष्टी मुद्दाम व्हाइसरॉयच्या नजरेस आणल्या आणि पोलिसाच्या वर्तनाची चौकशी करण्याची मागणी केली. ही मागणी झिडकारण्यात आली व जणूं काय सर्व तहाच्या वाटाघाटीचा बोजवारा झाला असेंच वाटूं लागलें!

कॉंग्रेस व सरकार याची भेट व्हावयाची असेल तर कोणीतरी एकानें पुढाकार घेतल्यशिवाय हे होणार नाहीं असें नक्की वाटूं लागलें. सरकारनें वर्किंग कमिटीच्या सभासदाना विनशर्त मुक्त केलें होतेंच. मग कॉंग्रेसच्या बाजूनें वर्किंग कमिटीनें किंवा गांधींनीं व्हाइसरॉयना मुलाखतीसाठीं विचारणा कां करूं नये? नुसत्या व्यावहारिक पत्रव्यवहारावरच का खोळंबून रहावें? आणि तहाची अशी संधि सत्याग्रही कधीं वाया घालवीत नाहीं. त्याप्रमाणें गांधींनीं व्हाइसरॉयास एक लहानसें पत्र लिहून मुलाखत मागितली व अगदीं बंधुभावानें चर्चा करण्याची इच्छा व्यक्त केली. १४ तारखेस गांधींचें पत्र गेलें व १६ तारखेस सकाळीं व्हाइसरॉयची तार आली. दिल्लीस जाण्यासाठीं गांधी १६ तारखेसच निघाले आणि लवकरच वर्किंग कमिटीचे जुने सभासदही दिल्लीस हजर झाले. एक तात्पुरती बैठक बोलवून वर्किंग कमिटीनें गांधींना कॉंग्रेसच्या वतीनें वाटाघाट करण्याचे अधिकार दिले. १७ तारखेस गांधी–व्हाइसरॉयाची प्रथम भेट झाली. चार तासपर्यंत त्या दिवशीं बोलणें झालें. व एकंदर तीन दिवस ही मुलाखत चालू राहिली.

या संभाषणात गांधींनी खालील मुद्यांची चर्चा केली. पोलिसाच्या अत्याचाराबद्दल चौकशी व पिकेटिंगचा हक्क या गोष्टींवर त्यानीं विशेष जोर दिला. याखेरीज समेटाच्या अटी म्हणून सर्वसाधारणपणें कैद्याची मुक्तता, वटहुकूम परत घेणें, कॉंग्रेसची जप्त केलेली मालमत्ता परत करणें, राजिनामे दिलेल्या व

कामावरून दूर केलेल्या अधिकाऱ्यांना व नोकरांना कामावर' घेणे या गोष्टी पुढे मांडल्या. पहिले दोन मुद्दे विशेष वादग्रस्त ठरले. आणि त्या बाबतींत ताबडतोब कांही तडजोड होण्याची अपेक्षा नव्हती. व्हाइसरीगल हाऊसमधून १९ फेब्रुस एक पत्रक प्रसिद्ध होऊन असें जाहीर झाले कीं, चर्चेतून निघणाऱ्या पुष्कळ मुद्यांचा विचार चालू आहे आणि आणखी पुढची चर्चा होण्यास कांहीं कालावधि लागण्याचा संभव आहे

गांधी डॉ. अन्सारींच्या घरीं उतरले होते पहिल्या दिवशीं ते परत आले' त्यावेळी ते अत्यत आशावादी होऊन आले होते, परंतु दुसऱ्या दिवशीं असें आढळून आले कीं, व्हाइसरॉय गांधींची भूमिका समजावून घेत आहेत, पत्करीत नाहींत.

इंग्लंडहून तार येणार होती तोपर्यंत कांही मुलाखत थांबली व २१ तारखेस व्हाइसरॉय गांधींना पुन्हा बोलावणार होते. परंतु १९ तारखेलाच एकदम बोलावणें आले. कॉंग्रेस व सरकार यांच्यामधील महत्त्वाच्या चालू प्रश्नाची चर्चा करण्याकरिता १२ गृहस्थाची सभा बोलावण्याचे ठरले व शेवटीं १२ चे २० झाले. या बाबतींत लंडनहून तार येण्याची व्हाइसरॉय वाट पहात होते. आणि २८ तारखेपर्यंत परिषद् बोलावण्याचें थांबवावें असें ठरले.

२०-२१-२२-२३ व २४ या तारखा वाट पहाण्यात गेल्या. २५ तारखेस बोलावणें येईल अशी नियोजित गृहस्थाची अपेक्षा होती. गांधींनीं आपला उपवास व मौन सोमवारीं ता. २३ रोजीं पहाटे ३ ला सोडले. कारण बोलावणें आल्याबरोबर तयार राहिलें पाहिजे. परंतु बोलावणें येईना व कांहीं सभासद अस्वस्थ झाले. गांधी सर्वांना अधीर न होण्याबद्दल सांगत होते. २५ गेली २६ ही गेली. मधला काळ पुढील कॉंग्रेस अधिवेशनाच्या तयारीच्या चर्चेत घालवणें चाललें होते. कारण गेल्या दहा महिन्यात कॉंग्रेस शाखांचें सर्वत्र उच्चाटण होत गेल्यानें निवडणुकीं होण्याच्या बाबतींत अतिशय अडचण उत्पन्न होणार होती.

हें दिवस लोटणें चालू आहे इतक्यात २६ तारखेला व्हाइसरॉयचा खलिता आलाच व २७ तारखेला गांधी भेटावयास गेले. एकदर ३॥ तास बोलणें झालें. तें अत्यंत मनमोकळेपणानें व मित्रत्वानें झालें. एकही निष्ठुर किंवा कटु शब्द संभाषणात उच्चारला गेला नाहीं. आणि गांधींनीं समेट बिघडवूं नये अशी व्हाइसरॉयना तळमळ वाटत होती.

२८ तारखेस गांधींनी आपल्या मताप्रमाणें पिकेटिंगविषयीं पत्रक प्रसिद्ध केलें व व्हाइसरॉयनीं समेटाबद्दलची हकीगत प्रसिद्ध केली.

उपस्थित झालेल्या प्रत्येक प्रश्नाबद्दल गांधींचें निश्चित मत व्हाइसरॉयना पाहिजे होतें. म्हणून १ मार्चला दुपारीं २॥ वाजतां त्यांना बोलावणें आलें. १ तारखेस पुन्हां परिस्थिति गंभीर दिसूं लागली. ' समेट मोडा ' 'समेट मोडा.' असें वर्किंग कमिटीच्या प्रत्येक सभासदाच्या तोंडीं शब्द ऐकूं येऊं लागले. सर्व देशभर बातमी तावडतोब पसरली कीं, समेट मोडला !

पं. मालवीय एवढे एकच आशावादी उरले होते. अद्याप कांहीं चांगलें घडेल असें ते सांगत होते. वर्तमानपत्रकर्ते मात्र सरकार योजीत असलेल्या योजनांचीं भविष्यें वर्तवीत होते. अरबी समुद्रातील कुरियामुरिया या सुंदर बेटावर वर्किंग कमिटीची रवानगी होईल असाही एक अंदाज होता. गांधी ठरलेल्या-वेळीं व्हाइसरॉयना भेटले व ६ वाजता संध्याकाळीं परत आले. इतक्या थोडा वेळ मुलाखत झाली त्याअर्थी सर्व फिसकटलें असें वाटलें परंतु लवकरच असें कळलें कीं, पुन्हां जमण्याची आशा आहे. १ तारखेसही व्हाइसरॉयांचें धोरण अगदीं मित्रत्वाचें होतें. होम सेक्रेटरी मि. इमर्सन हेही फार प्रेमळपणानें वागले. मि. इमर्सनबरोबर पिकेटिंग योजना ठरविण्याविषयीं व्हाइसरॉयनीं गांधींना सांगितलें. आदल्या दिवशींच आपली योजना पाठविली होती. व्हइसरॉयची चिठ्ठी व गांधींचें योजनापत्रक हीं एकाच वेळीं एकमेकाकडून रवाना झालीं होतीं.

परदेशी कापडावरील बहिष्काराच्या बाबतींत एकच वादाचा मुद्दा होता. बहिष्कार परदेशी मालावर करावयाचा किंवा ब्रिटिश मालावर करावयाचा. आणि दुसरा मुद्दा पिकेटिंगपद्धतीविषयीं होता. ब्रिटिश मालावरील बहिष्कार ह्या कॉंग्रेसच्या मूळ कार्यक्रमांत नव्हता. महायुद्धाच्या वेळीं त्याचा समावेश करण्यात आला आणि नंतर राजकीय ध्येयाला जोर येण्यासाठीं तो मुद्दा कायम ठेवण्यात आला होता. म्हणून पिकेटिंग फक्त विदेशी मालापुरतेंच ठेवणें जरूर होतें. व्हाईसरॉयनीं बहिष्कार या शब्दावर आक्षेप घेतला. तहाच्या काळात विदेशी माल व ब्रिटिश माल यात भेद करणें जरूर होतें. सामान्य चर्चेनंतर शेवटीं पिकेटिंगचा मसुदा तयार झाला.

नंतर जादा पोलीसाबद्दल संभाषण झालें. यापुढें दंडवसूली करूं नये. परंतु घेतलेले दंड मात्र परत करता येणार नाहींत असें ठरलें.

राजकीय कैद्याच्या मुक्ततेबद्दल व्हाइसरॉयनीं उदारपणाचें धोरण स्वीकारण्याचें कबूल केलें. १ मार्च रोजीं गाधी पुन्हां परत गेले. तेव्हां जीं सभाषणें झालीं त्यात तुरुंगांतील दंगेखोरी, चोऱ्या वगैरेची चर्चा झाली. ( internees ) स्थानबद्ध कैद्याबद्दल गाधींनीं प्रश्न काढला व व्यक्तिशः त्याबद्दल चौकशी करण्याचें व्हाइसरॉयनीं निश्चितपणें अभिवचन दिलें.

जप्त केलेल्या मालमत्तेसंबंधीं असें ठरलें कीं, विकून टाकलेली मालमत्ता परत देता येणार नाहीं.गांधींना या बाबतींत प्रांतिक सरकारची भेट घेण्यास सागितलें. हिंदुस्थान सरकारनें त्यांच्याशीं वाटाघाट करण्याचें नाकारले. परंतु मुंबई सरकारला या बाबतींत एक निश्चित मजकुराचें पत्र गाधींबरोबर देण्याचें व्हाइसरॉयनीं कबूल केलें.

गाधींनीं सागितलेल्या संभाषणाच्या हकीगतीवरून वल्लभभाई पटेल यांनीं आणखी एक प्रश्न विचारून घेण्याचें सुचवलें. तो म्हणजे गुजराथेंतील ज्या दोन डेप्युटी कलेक्टरांनीं राजीनामे दिले होते त्याच्याविषयीं होता.

मीठखाचरातील मीठ गोळा करण्याची मोफत परवानगी व्हाइसरॉयनीं दिली व गांधींनीं त्याबद्दल फार समाधान वाटले.

गाधी व्हाइसरॉयकडे गेले ते रात्रीं १ वाजता परत आले व २–१५ पर्यंत ते वर्किंग कमिटी पुढे सर्व हकीगत सागत होते. व्हाइसरॉय व इमर्सन साहेब फार चागले वागले.

पिकेटिंगचा मसुदा त्या रात्रींच पुरा झाला परंतु पुढील चर्चा दुसऱ्या दिवसावर म्हणजे मंगळवारवर ( ३ मार्च ) सोपविण्यात आली. कारण त्यानंतर म्हणजे रात्रीं १ वाजेनंतर उजाडणारा दिवस सोमवार होता व गाधींचा तो मौनाचा दिवस होता. मीठाबद्दलही सर जॉर्ज शूस्टर व गाधी याच्यात मसुदा तयार व्हावयाचा होता. परंतु त्या दिवशीं रात्रीं चर्चा होऊनही कांहीं निष्पन्न झालें नाहीं. कांहीं गैरसमजही जाता जाता दुरुस्त करण्यात आले.

मालमत्ता परत देण्याच्या बाबतींत समेट करण्यास कोणी तरी मध्यस्थ पाहिजे असें दिसून आले. आणि सर इब्राहिम रहिमतुल्ला व सर पुरुषोत्तमदास ठाकुरदास त्या बाबतींत काम करण्यास तयार झाले.

त्या दोन डेप्युटी कलेक्टरांच्या बाबतींत व्हाइसरॉय त्यांना पुन्हा कामावर घेण्यास तयार नव्हते परंतु त्यांना ग्रॅच्युइटी किंवा पेन्शन देण्यास मात्र त्यांनीं तयारी दाखविली.

३ मार्च रोजीं सर जॉर्ज शुस्टर यांच्याशीं सकाळीं ११ वाजता मीठाच्या बाबतींत मुलाखत ठरली. कारण व्हाइसरॉयची दुपारीं २ ला भेट घ्यावयाची होती.

३ तारखेस आणखी एक अडचण उत्पन्न झाली.

बारडोलींच्या शेतकऱ्याना जमिनी परत देण्याबद्दलचा प्रश्न अर्धवटच सुटला होता तो पुन्हा चर्चेस निघाला. या बाबतींतील कोणचाही प्रश्न वल्लभभाईंच्या संमतीनेंच निश्चित व्हावयाचा होता म्हणून वल्लभभाईंना एकदा स्वीकारणीय मार्ग विचारून येऊन रात्रीं भेटावयास येतो असे गांधींनीं व्हाइसरॉयना कळविले. व्हाइसरॉय स्वतः पेचांत सांपडले होतें. कारण असें खात्रीलायक रीत्या कळलें होतें कीं बारडोली करबंदी चळवळीच्या वेळीं जप्त झालेल्या जमिनी पुन्हां मी कोणत्याही कारणासाठीं परत करावयास सागणार नाहीं असें व्हाइसरॉयनीं मुंबईसरकारला पत्रानें कळविले होते. आणि आता पुन्हां प्रत्यक्ष काहीं पत्रव्यवहार करण्यास व्हाइसरॉय नाखूष होतें म्हणून सर पुरुषोत्तमदास ठाकुरदास व सर इब्राहिम रहिमतुल्ला याना गांधींनीं मध्यस्ती करण्यास सागावें असें व्हाइसरॉयचें म्हणणे होतें.परंतु हें व्हाइसरॉयनीं करावें असें गांधींचें मत होतें. शेवटीं वरील दोन गृहस्थाना वरील बाबतींत मदत करण्याविषयीं मुंबई सरकारला एक पत्र देण्याचें मात्र व्हाइसरॉयनीं कबूल केलें. मुंबई सरकारचे रेव्हिन्यु मेंबर हे स्वतः याचाविषयीं बोलणें करण्यासाठीं दिल्लीस गेले होते. गांधी अर्विन करारातील १७ ( क ) जें कलम फार वादाचा विषय झालें तें कलम खालीलप्रमाणें होते.

**“ज्या ठिकाणीं स्थावर मिळकत तिसऱ्या माणसाला विकलेली त्या ठिकाणीं तो व्यवहार सरकारपुरता पुरा झाला आहे असें समजावें.”** गांधींनी सरकारला या बाबतींत असें दाखवून दिलें आहे कीं यापैकीं काहीं मिळकती तरी बेकायदेशीरपणाणें विकल्या गेल्या आहेत. सरकार हें कबूल करण्यास तयार होईना. या विषयावर इतका वादविवाद झाला कीं यामुळेंच समेट फिसकटतो कीं काय अशी भीति उत्पन्न झाली.

तिसऱ्या तारखेस संध्याकाळीं पुन्हां एकदां या मुद्यावर चर्चा निघाली आणि सरकारपुरता तरी हे शब्द तसेंच राहणार असे ठरले. त्याचा अर्थ असा कीं लोकाच्या तर्फे वाटल्यास सर पुरुषोत्तमदास ठाकूरदास आणि सर इब्राहीम रहीमतुल्ला यानीं मध्यस्थी करण्यास हरकत नाहीं आणि शक्य तर शेतकऱ्याना जमिनी परत कराव्यात असें ठरलें. गांधी तीन तारखेस रात्रीं २॥ वाजतां व्हाइसरॉयकडून परत आले. प्रत्येकजण त्यांची उत्सुकतेने वाट पहात होता. गांधी परत आल्यावर बरेच आशावादी दिसले. नेहमींप्रमाणे त्यांनीं वर्किंग कमिटीच्या सभासदांना झालेली सर्व हकीगत सागितली. संध्याकाळींसुद्धां वर्किंग कमिटीत पिकेटिंगच्या मसुद्यावद्दल अतिशय वादाववाद झाला.कारण त्या मसुद्यात मुसलमान दुकानदारांना पिकेटिंगमधून वगळावें असे एक कलम होते. सरकारला ती गोष्ट हवी होती परंतु शेवटीं ती गोष्ट सोडून देण्यात आली. समेटाच्या प्रत्येक अटींत कांहींतरी एक गोम होती. कैद्याच्या सुटकेंत फक्त सत्याग्रही कैद्याचाच समावेश झाला होता. स्थानबद्धांच्या बाबतींत फक्त पूर्ण चौकशी होणार होती. सोलापूर आणि गढवाल या प्रकरणांतील कैदी कोठेंही जमेस धरले नव्हते.

( २ ) पिकेटिंगविषयींचा वादविवाद ब्रिटिश मालाविषयीं अनुकूल असा झाला नाहीं. जप्त केलेल्या किंवा विकलेल्या जमीनी परत करणे हा एक मोठा प्रश्नच होता. आणि १७ ( क )कलम कॉंग्रेसच्या डोळ्यांसमोर सारखें उभें होतें. शेवटीं शेवटच्या भेटींत गांधींनीं एक महत्त्वाची गोष्ट ठरविली. अर्थात् ती निर्णय वर्किंग कमिटीच्या संमतीवर अवलंबून ठेवलाच होता. वरील महत्त्वाची गोष्ट राज्यपद्धतीविषयीं होती. गोलमेज परिषदेत चर्चा झालेला हिंदुस्थानच्या राज्यपद्धतीविषयींचा प्रश्न विचारात घेण्याचें गांधींनीं कबूल केलें. त्या पद्धतीच्या योजनेंत फेडरेशन हा महत्त्वाचा भाग होता. हिंदुस्थानवरची जबाबदारी आणि संरक्षण ( Defence) परराष्ट्रीय राजकारण, अल्पसंख्याकांची व्यवस्था, हिंदुस्थानची आर्थिक इभ्रत आणि कर्जाची फेड यासारखे हिंदुस्थानचे सेफगार्ड्स्, हेही महत्त्वाचे मुद्दे होते. ( गांधी–अर्विन करार कलम २ ) हा समेट गांधी आणि व्हाइसरॉय यानीं ठरविला होता आणि तो पसंतीसाठीं किंवा नापसंतीसाठीं वर्किंग कमिटीपुढे आला. “ हिंदुस्थानच्या हिताचे ” हे शब्द या समेटात संरक्षणाच्या दृष्टीनें महत्त्वाचे आहेत असें कौन्सिलला वाटलें. वर्किंग कमिटीच्या सभासदांना अशी जबरदस्त शंका होती कीं, वरील शब्दां-

चा अर्थ विपरीत केला जाईल इतकेंच नव्हे तर हिंदुस्थानच्या हितास हटकून प्रतिकूल असाही केला जाईल. परंतु गांधी स्वतःच्या शब्दाप्रमाणे दुसऱ्याच्या शब्दालाही वाजवी किंमत देतात त्यामुळें त्यावावत काम करणें भाग झाले. वल्लभभाईंना जमिनीच्या प्रश्नावावतची तडजोड समाधानकारक वाटली नाहीं. जवाहिरलाल नेहरूंना राज्यपद्धतीच्या प्रश्नाचा समेट असमाधानकारक वाटला. कैद्याविषयीचा प्रश्न कोणाच्याही मनासारखा सुटला नव्हता. जर प्रत्येकाचें प्रत्येक प्रश्नाच्या बावतींत समेटांत समाधान झालें असतें तर तो समेट न ठरता कॉंग्रेसचा विजय ठरला असता. ज्या अर्थी समेटासाठीं किंवा तडजोडीसाठीं कॉंग्रेस तयार झाली होती त्या अर्थी कॉंग्रेसला आपलाच हट्ट चालविता येणे शक्य नव्हतें. परंतु सुचविलेल्या समेटाचें कोणचेंही कलम किंवा सर्व कलमें फेटाळण्याचा वर्किंग कमिटीला अधिकार होता. गांधींनी व्यक्तिशः वर्किंग कमिटीच्या प्रत्येक सभासदापुढें समेटाच्या पूर्ण अटी मांडल्या आणि कोणत्या मुद्यावर समेट मोडावा हे विचारले. कैद्याचा प्रश्न, पिकेटिंगचा मुद्दा, जमीनीचा प्रश्न यापैकीं एखादें कलम फेटाळावें कीं सर्व समेट फेटाळावा याबद्दल त्यानीं वर्किंग कमिटीच्या सभासदाचा अभिप्राय विचारला. शेवटच्या कलमाच्या बावतींत सरकारनें अशी अट घालून ठेविली होती कीं,या समेटाच्या अटी कॉंग्रेसनें पूर्णपणें पाळल्या नाहींत तर वैयक्तिक आणि सार्वजनिक सरक्षणासाठी जरूर ते सर्व उपाय सरकाला योजावे लागतील. अशा तऱ्हेची अट दोन्ही पक्षाला सारखीच लागूं न करतां फक्त सरकारनेंच एकाच बाजूनें तीं का लादावी याविषयीं अतिशय वादविवाद झाले. आक्षेपकाचें म्हणणे असें होतें कीं सरकरनें समेटाच्या अटी पाळल्या नाहींत तर, सविनय कायदेभंग सुरूं करण्याचा हक्क, अट म्हणून कॉंग्रेसनें आपल्याकडे राखून ठेवावा. परंतु सविनय कायदेभंगाची चळवळ सुरूं करण्यासाठीं कॉंग्रेसनें सरकारची परवानगी घेतली नव्हती तसेंच ती पुन्हा सुरूं करतानाही तशा परवानगीची जरूर नव्हती ही गोष्ट थोड्या विचारातीं सहज दिसून येण्यासारखी होती.अशा रीतीनें १५ दिवसपर्यंत या समेटावर रंग माजलें होतें. गांधी आणि आयर्विन ह्या दोन व्यक्तीमधल्या अत्यंत उदात्त गुणाच्या एकोप्याचें तें फळ होतें. समेटाचा सर्व मसुदा पुढें दिला आहे.

s481।31 राजकीय

गव्हर्नमेंट ऑफ इंडिया होम डिपार्टमेंट

नवी दिल्ली ५ मार्च १९३१ नोटीफिकेशन

सर्व लोकाच्या माहितीसाठीं ग. जनरल इन कौन्सिल याच्याकडून खालील पत्रक प्रसिद्ध होत आहे.

( १ ) व्हाइसरॉय आणि गांधी याच्यांमध्यें झालेल्या संभाषणांत निर्णय झाल्यावरून असें ठरलें आहे कीं सविनय कायदेभंगाची चळवळ वंद करण्यात यावी आणि साम्राज्य सरकारच्या संमतीनें हिंदुस्थान सरकारनें आणि स्थानिक सरकारनें कांहीं विशिष्ट गोष्टी कराव्यात.

( २ ) राज्यपद्धतिविषयक प्रश्नाच्या बाबतींत गोलमेज परिषदेत चर्चा झालेल्या हिंदुस्थानच्या शासनपद्धतीच्या योजनेवर बादशाही सरकारच्या संमतीनें जास्त विचारविनिमय होण्यास वाव ठेवला आहे. त्या योजनेंत फेडरेशन हा महत्त्वाचा आवश्यक भाग आहे. तसेंच हिंदुस्थानची जबाबदारी, आणि संरक्षण ( defence ) परराष्ट्रीय राजकारण, अल्पसंख्याकाची सोय, हिंदुस्थानची आर्थिक इभ्रत आणि कर्जाची फेड यासारखे हिंदुस्थानच्या हिताचे संरक्षके मुद्दे हेही महत्त्वाचे आहेत.

( ३ ) मुख्य प्रधानानीं १९ जाने. १९३१ रोजीं जाहीर केल्याप्रमाणें राज्यपद्धतीच्या पुढील चर्चेत कॉंग्रेसच्या प्रातिनिधींनीं भाग घेण्यासाठीं जरूर ती खटपट करण्यात येईल.

( ४ ) या पत्रकांतील गोष्टी सविनय कायदेभंगाच्या चळवळीवर प्रत्यक्षपणे अवलंबून आहेत.

( ५ ) सविनय कायदेभंग पूर्णपणें वंद झाला कीं त्याबरोबर सरकारही योजिलेल्या गोष्टी करील. सविनय कायदेभंग वंद होणें म्हणजे कोणच्याही स्वरूपांत तो चालू राहता कामा नये आणि विशेषतः त्या चळवळींतील खालील गोष्टी वंद झाल्या पाहिजेत.

( १ ) कायदेशीर व्यवस्थेचें संघटित उल्लंघन.

( २ ) जमीन महसूल व इतर कायदेशीर देणें असेल त्या बाबतींतील करबंदीची चळवळ.

( ३ ) सविनय कायदेभंगाच्या चळवळीला सहाय्यक अशा वातमीपत्रकाची प्रसिद्धि.

( ४ ) मुलकी व लष्करी नोकर किंवा खेडेगावांतील कामगार यांच्यावर सरकारविरुद्ध वजन पाडण्याचे प्रयत्न किंवा त्यांना राजिनामे देण्यास प्रवृत्त करण्याचे प्रयत्न.

( ५ ) परदेशी मालाच्या बहिष्काराच्या बाबतींत दोन मुद्दे उपस्थित झाले आहेत. एक बहिष्काराचें स्वरूप व दुसरा बहिष्कार घडवून आणण्यासाठीं योजावयाच्या पद्धति. सरकारची भूमिका खालीलप्रमाणें आहे.

हिंदुस्थानच्या आधिभौतिक उन्नतीसाठीं ज्या आर्थिक व औद्योगिक चळवळी होतात, त्याचा एक भाग म्हणून हिंदी उद्योगधंद्याना उत्तेजन देणें सरकारला मान्य आहे आणि म्हणून तसे प्रयत्न नामोहरम करण्याची हिंदुस्थान सरकारची मुळींच इच्छा नाहीं. त्या दृष्टीनें चाललेले स्वदेशीच्या प्रसाराचे मार्ग, लोकांचीं मनें वळविणें, प्रसिद्धीकरण, ( जाहिराती ) यास सरकार मना करूं इच्छित नाहीं. मात्र हे मार्ग वैयक्तिक आचारस्वातंत्र्यास बाधक होऊं नयेत किंवा त्यांतून कायदा व शिस्त या विषयींचा असंतोष माजवूं नये. जरी कापडाचा बहिष्कार हा सर्व परदेशास लागू आहे तरी कापडाखेरीज असलेला विदेशी-वस्तु-बहिष्कार हा सविनय कायदेभंगाच्या चळवळींत मुख्यतः ब्रिटिश मालावरच लादण्यात आला आणि राजकीय ध्येयासाठीं बहिष्काराचें तत्त्व वरील स्वरूपांत उपयोगात आणले जात आहे. जेथें ब्रिटिश हिंदुस्थानचे, हिंदी संस्थानांचे, बादशाही सरकारचे, आणि इंग्लंडमधील राजकीय पक्षाचे प्रतिनिधी जमणार आहेत व ते यावेत असा या समेटाचा हेतु आहे, अशा प्रतिनिधिसमूहांत राज्यघटनेविषयीं मित्रभावानें व मन मोकळी चर्चा होणार आहे. त्या चर्चेंत वरील विविध प्रतिनिधीप्रमाणेंच कॉंग्रेसचेही प्रतिनिधि भाग घेणार आणि वरील स्वरूपाचा बहिष्कारही चालू ठेवणार या गोष्टी अगदीं विसंगत आहेत, हें ( दोन्ही पक्षास ) मान्य झालें आहे. म्हणून सविनय कायदेभंगाची चळवळ थांबविण्यांतच राजकीय हत्यार म्हणून ब्रिटिश मालावरील जो बहिष्कार आहे तोही बंद करावा असें ठरलें आहे. आणि राजकीय कोलाहलाच्या काळात ज्यानीं ब्रिटिश मालाची खरेदी किंवा विक्री सोडून दिली, त्याची आता इच्छा असेल तर त्याना ब्रिटिश मालाचा व्यापार करण्याची विनशर्त मोकळीक असावी.

( ६ ) अहिंदी मालाच्या ऐवजीं हिंदी माल प्रस्थापित करण्यासाठीं जे मार्ग अवलंबिले जातात किंवा अमली पदार्थ व दारू याचा खप थांबवण्यासाठीं

ज्या तऱ्हेनें प्रयत्न केले जातात ते मार्ग किंवा प्रयत्न पिकेटिंगच्या मर्यादेत येणारे नसावेत. सर्वसाधारण कायद्याच्या मर्यादेत ते असावे असे पिकेटिंगही जबरदस्तीचें नसावें. त्यात पाठलाग किंवा छळणूक नसावी त्यात द्वेषमूलक देखावा नसावा, जनतेला त्यामुळें अडथळा नसावा किंवा सामान्य कायद्यानें जो गुन्हा ठरेल अशी कोणचीही कृति नसावी.

( ७ ) पोलीसाच्या वर्तणुकीवर जे कांहीं निवडक आरोप आहेत ते गांधींनीं सरकारच्या लक्ष्यात आणून दिले आहेत. आणि त्याची जाहीर चौकशी होण्याची इच्छा व्यक्त केली आहे. चालू परिस्थितींत सरकारला या मार्गात फार अडथळे दिसत आहेत. आणि चौकशीमुळे आरोप प्रत्यारोप होणें अपरिहार्य होणार आणि शेवटीं शांततेच्या पुनर्घटनेला ते विघातक ठरणार आहे असें सरकारला वाटते. या अडचणी लक्षात घेऊन वरील मुद्याविषयीचा आग्रह सोडण्याचें गांधींनीं कबूल केलें आहे.

( ८ ) सविनय कायदेभंगाची चळवळ बंद झाल्यावरोबर सरकार ज्या गोष्टी करणार आहे त्या खालीलप्रमाणे आहेतः—

( ९ ) सविनय कायदेभंगाच्या चळवळींसंबंधीं काढलेले सर्व वटहुकूम परत घेतले जातील.

क्रांतिकारकाच्या चळवळीबद्दल १९३१ सालचा नं. १ चा वटहुकूम या सदरात येत नाहीं.

( १० ) १९०८ चा क्रिमिनल लॉ अ. ॲक्ट परत घेण्यात येईल. आणि त्या कायद्याप्रमाणें सविनय कायदेभंगाच्या चळवळीसंबंधांत ज्या संस्था बेकायदेशीर ठरल्या होत्या तेवढ्याच कायदेशीर ठरतील. ब्रह्मदेश सरकारनें वरील कायद्याप्रमाणें जो हुकूम काढला आहे तो या सदरात येत नाहीं.

( ११ ) [ १ ]—सविनय कायदेभंगाच्या चळवळीसंबंधीं जे खटले चालू आहेत ते काढून घेण्यात येतील. ज्या खटल्यामध्यें टेक्नीकल अत्याचार झाले आहेत किंवा अशा अत्याचाराना प्रोत्साहन मिळाले आहे अशाच खटल्याना हा नियम लागू आहे इतर अत्याचाराना नाहीं.

[ २ ]—क्रि. प्रो. कोडाप्रमाणें जामिनकीबद्दलचे जे खटले आहेत त्यानासुद्धां वरील तत्त्व लागू करण्यात येईल. [ ३ ] कायद्याचा व्यवसाय करणाऱ्या (वकील वगैरे ) लोकांची सविनय कायदेभंगाच्या संबंधात झालेली वागणूक स्थानिक सरकारनें हायकोर्टाकडे कळविली असेल किंवा लीगल प्रॅक्टिशनर्स ॲक्ट या कायद्याप्रमाणें त्याच्याविरुद्ध काम सुरु केलें असेल तर

ते स्थानिक सरकार वरील तक्रार काढून घेण्यासंबंधीं त्या कोर्टाकडे अर्ज करील. अर्थात् वर उल्लेखिलेली वर्तणूक ही अत्याचाराबद्दलची किंवा अत्याचारामुळें उत्पन्न झालेली असेल तर वरील सवलत त्यास लागू नाहीं. (४) शिपायांच्या आणि सोल्जरांच्या विरुद्ध आज्ञाभंगाविषयींच्या ज्या कांहीं फिर्यादी असतील त्यांना ही अट लागू नाहीं.

(१२) अ— सविनय कायदेभंगामध्यें झालेल्या अपराधांबद्दल ज्या कैद्यांना शिक्षा झाली असेल त्यांची मुक्तता करण्यात येईल. मात्र त्यांच्या अपराधामध्ये अत्याचार किंवा त्यास प्रवृत्त करणारे कोणतेंही कृत्य असतां कामा नये. टेक्निकल अत्याचार झाला असला तरी मुक्तता होईल.

ब— वरील कलमाखालीं येणाऱ्या कैद्याला तुरुंगांतल्या एखाद्या गुन्ह्यासाठीं शिक्षा झाली असेल आणि तो गुन्हा अत्याचाराच्या स्वरूपाचा नसेल, तर त्याही गुन्ह्याबद्दल त्याला माफी मिळेल; किंवा त्या तुरुंगातील गुन्ह्याबद्दल त्याच्यावर खटला भरला असेल तर तोही काढून घेण्यात येईल.

क— ज्या शिपायांना आणि पोलिसांना हुकूम मोडल्याबद्दल शिक्षा झाली असेल, त्यांना ह्या कलमाखालीं माफी मिळणार नाहीं.

(१३) वसूल न केलेले दंड माफ करण्यांत येतील. जामीन जप्त करण्याबद्दल क्रि. प्रो. कोडच्या जामिनकीच्या नियमाप्रमाणे हुकूम झाला असेल आणि जर जामीन वसूल केला नसेल तर तो हुकूम रद्द करण्यात येईल.

जे दंड वसूल केले आहेत आणि जे जामीन जप्त झाले आहेत, ते परत केले जाणार नाहींत.

(१४) सविनय कायदेभंगाच्या चळवळींकरतां एखाद्या विशिष्ट भागाच्या खर्चानें जर तेथें जादा पोलीस बसविले असतील तर स्थानिक सरकारच्या अभिप्रायाप्रमाणें ते पोलीस काढून घेतले जातील. त्या बाबतींत जो पैसा वसूल झाला नसेल तेवढाच फक्त स्थानिक सरकार माफ करील.

(१५) अ— बेकायदेशीर मालकी नसलेली आणि सविनय कायदेभंगाच्या चळवळींत जप्त झालेली जंगम मालमत्ता जर अद्याप सरकारच्या ताब्यांत असेल तर ती परत केली जाईल.

ब—जमीनमहसुलाकरता किंवा दुसऱ्या येण्याबद्दल जप्त केलेली जंगम मालमत्ता परत केली जाईल. जर त्या जिल्ह्याच्या कलेक्टरला असें वाटत असेल

की, वरील मालमत्तेचा मालक योग्य काळामध्यें सरकारचें देणें असलेले पैसे देण्याचे मुद्दाम नाकारील तर मात्र त्याच्या बाबतींत ही सवलत लागूं होणार नाहीं. योग्य काळाची मर्यादा ठरवितांना ज्याचें येणें राहिलें असेल त्याना देण्याची इच्छा असूनसुद्धां कांहीं वेळ खरोखरच पाहिजे असेल तर त्याच्या अडचणी विशेष लक्षात घेतल्या जातील, आणि अवश्य असल्यास जमीनमहसुलाच्या सामान्य तत्त्वाप्रमाणें त्याला महसुलाची तहकुबीहि मिळेल.

क—नासधूस झालेल्या मालमत्तेबद्दल नुकसानभरपाई मिळणार नाहीं.

ड—जंगम मिळकत ही विकली गेली असेल किंवा सरकारनें दुसऱ्या कोणत्या मार्गानें तिची कायमची वासलात लाविली असेल तर त्याबद्दल नुकसानभरपाई मिळणार नाहीं. वाजवी येणें असलेल्या पैशाच्या मानानें जप्त करून विकून टाकलेल्या मिळकतीच्या विक्रीचा पैसा जास्त असेल तरच तो विक्रीच्या पैशातून परत मिळेल. एरव्हीं विक्रीचा पैसा परत केला जाणार नाहीं.

(१६) १९३० सालच्या ९ व्या ऑर्डिनन्सप्रमाणें ज्या स्थावर मिळकतींचा तावा घेतला गेला असेल ती मिळकत वरील ऑर्डिनन्समधील व्यवस्थेप्रमाणें परत मिळेल. (यापुढील कलमें १५ व्या कलमातील इतर कलमाप्रमाणेंच आहेत ).

(१७) सरकारची अशी खात्री आहे कीं, बेकायदेशीरपणें करवसुली किंवा करभरपाई केल्याचीं उदाहरणें फार थोडीं आहेत. अशा उदाहरणाच्या विचार करण्याकरता कांहीं विशिष्ट तक्रारींची तावडतोब चौकशी करण्यासाठीं स्थानिक सरकार जिल्हाधिकाऱ्याना हुकूम करील, आाणि अन्याय सिद्ध झाल्यास तावडतोब भरपाई देण्यास सागेल.

(१८) राजिनामा दिल्यामुळे रिकाम्या झालेल्या जागा जर कायमच्या भरल्या गेल्या असतील तर मूळच्या लोकांची त्या जागीं पुनः नेमणूक करणें सरकारला शक्य नाहीं राजिनामा दिलेले सरकारी नोकर आणि खेडेगावांतील अधिकारी यानीं पुनः अर्ज केल्यास त्याची पुनः नेमणूक करण्याविषयीं स्थानिक सरकार अतिशय उदारपणाचें धोरण ठेवील

(१९) मिठाच्या सध्यांच्या कायद्याच्या बाबतींत सरकार गुन्हा माफ करूं शकत नाहीं. त्याचप्रमाणे हल्लींच्या आर्थिक परिस्थितींत मिठाच्या कायद्यात म्हणण्यासारखी पुनर्घटना करण्यास सरकार तयार नाहीं.

तथापि कांहीं गरीब लोकांच्या सोयीसाठीं मिठागराजवळ असलेल्या खेड्यां-तल्या रहिवाशांना स्वतःच्या गरजेपुरतें मीठ नेण्याची सरकार परवानगी देईल. मात्र तें मीठ विकण्याकरिता गोळा करूं नये.

[२०] जर या समेटाचे योग्य आचरण काँग्रेसकडून झाले नाहीं तर सार्व-जनिक व वैय्यक्तिक संरक्षणासाठीं आणि कायदा व शिस्त पाळलीं जाण्या-साठीं आवश्यक गोष्टी करण्यास सरकार मोकळें होईल.

[ सही ] एच. डब्ल्यु. इमर्सन,
सेक्रेटरी टू दि गव्हर्नमेंट ऑफ इंडिया.

या वाटाघाटी चालूं असता भगतसिंग आणि त्याचे सहकारी राजगुरु व सुखदेव याना १३ सप्टेंबर १९२८ रोजीं मि. सॉंडर्स्ट याचा खून करण्याबद्दल लाहोर कटाच्या खटल्यात जी फाशीची शिक्षा झाली होती, ती सौम्य कर-ण्याबद्दल गांधी व व्हाइसरॉय यांच्यामध्यें वारंवार बोलणीं होत होतीं. लवकरच होणाऱ्या या फाशीबद्दल सर्व देशभर खळबळ उडाली होती. भोंव-तालीं जें सहानुभूतीचें वातावरण निर्माण झालें होतें, त्याचा फायदा घेऊन वरील शिक्षा सौम्य करण्याबद्दल कॉंग्रेसचे पुढारी स्वतः आतुर होते. याविषयीं व्हॉईसरॉय मनमोकळेपणें बोलत नव्हते. फक्त पंजाब सरकारला या बाबतींत आपलें वजन खर्च करून सांगून पहाण्याचें त्यानी गांधींना आश्वासन दिलें होतें. व्हॉईसरॉयाना स्वतःलाच ही शिक्षा कमी करण्याचा अधिकार होता. परंतु तो अधिकार राजकीय कारणासाठीं वापरणें शक्य नव्हतें. पंजाब सरका-रच्या वाटेमध्येंसुद्धा हीं राजकीय कारणेंच उभीं राहिलीं असतीं, आणि तशीं तीं वाटेंत आलीं होतींच. एकंदरींत लॉर्ड आयर्विन या बाबतींत कांहीं करण्यास पूर्णपणें असमर्थ होते. परंतु कराची कॉंग्रेसपर्यंत फाशी देण्याचें तहकूब करण्याचें त्यानीं कबूल केले. कराची कॉंग्रेस मार्चच्या शेवटच्या आठवड्यात भरणार होती. परंतु गांधींनीं व्हॉइसरॉयाना असें स्पष्ट सांगितलें कीं, जर त्या तरुणाना फाशीं द्यावयाचेंच असेल तर कॉंग्रेसच्या नंतर देण्यापेक्षा आधीं दिलेलें बरें. त्यामुळें देशातील एकंदर घडामोडीचा उलगडा होईल. लोकांच्या अंतःकरणात खोट्या आशा उरणार नाहींत. गांधी-अर्विन करार टिकणार कीं मोडणार हें त्या कॉंग्रेसमध्येंच ठरणार होतें आणि त्याचप्रमाणें या तिघाना झालेली फाशी याही गोष्टीचा त्यावर परिणाम होणार होता.

करारावर ता. ५ मार्च १९३१ रोजीं सह्या झाल्या आणि पाठोपाठ मि. इमर्सन याजकडून गांधींना एक सुंदर पत्र आलें. पूर्वीच्या १० महिन्यांत झालेल्या राज्यकारभाराबद्दल आपणच जबाबदार आहोंत असें इमर्सनसाहेबांनीं त्या पत्रांत कबूल केलें होतें. स्वराज्यांत हिंदुस्थानची सेवा करण्यांत आपणास आनंद वाटेल असेंही त्यांनीं त्यांत म्हटलें होतें. लॉर्ड आर्विन यांनींही गांधींना एक पत्र पाठविलें आणि लवकरच इंग्लंडला आपली भेट होईल अशी आशा व्यक्त केली.

वाटाघाटीचें एक वैशिष्ट्य असें होतें कीं, दररोज होणाऱ्या घडामोडीबद्दल पूर्ण गुप्तता राखण्यांत आली होती. गांधी-आर्विन कराराचीं रहस्यें वर्किंग कमिटीच्या सभासदांशिवाय १०।१२ मंडळींना जरी माहीत होतीं, तरी तीं बाहेर कळत नव्हतीं. वर्तमानपत्रांतून विसंगत व परस्परविरोधी हकीकती पसरत होत्या. गांधींनीं ज्या तारखेस व्हाइसरॉयना निर्वाणीचा खलिता पाठविला होता त्याच तारखेला नन्तर समेटावर सह्या झाल्या, हा योगायोग आश्चर्यकारक आहे. ४ मार्च १९३० रोजीं गांधींनीं मि. रेजिनॉल्ड रेनॉल्डबरोबर व्हाइसरॉयना पत्र पाठविलें व तें ५ ला पोंचलें आणि तें पत्र मिळाल्यापासून बरोबर एक वर्षानें ५ मार्च १९३१ रोजीं समेटावर सह्या झाल्या.

समेट झाल्याबरोबर गांधींनीं अमेरिकन, इंग्लिश, आणि हिंदी वृत्तपत्रांना व बातमीदारांना तडजोडीसंबंधीं एक महत्वाची मुलाखत दिली. ह्या मुलाखतीचा मजकूर सांगण्यास त्यांना १॥ तास लागला. त्यांत त्यांनीं लॉर्ड आयर्विन यांचें अत्यंत आदरपूर्वक अभिनंदन आणि पोलीस, व सिव्हिल सर्व्हिस व क्रांतिकारक यांना उद्देशून एक कळकळीची विनंति केली. हिंदी स्वराज्यावरच्या वाङ्मयांत ज्या पत्रकास अत्यंत महत्त्वाचें स्थान आहे तें असें होतें—

'व्हाइसरॉयच्या सहनशीलता व अविश्रांत श्रम व निरपवाद औदार्य यांखेरीज हा समेट झालाच नसता हें मला प्रथम सांगितलें पाहिजे. मी त्यांना नकळत कांहीं वेळेस संतापवण्यास कारण झालों हें मी जाणून आहें. मी त्यांच्या सहनशीलतेचीही कसोटी पाहिली परंतु ते अधीर झाले किंवा संतापले असा एकही प्रसंग मला आठवत नाहीं. या सर्व नाजूक वाटाघाटींत ते अत्यंत मनमोकळेपणानें बोलत होते आणि शक्य असेल तर समेट नक्की घडवून आणावयाचाच असें त्यांनीं

ठरविलेच होतें असें मला वाटतें. समेटाकरतां जात असतां मला भीति वाटत होती. आणि माझ्या मनात अविश्वास भरला होता. परंतु पहिल्या भेटींतच त्यांनीं माझी भीति काढून टाकली व मला निर्धास्त केलें. त्यांना भेटण्या-बद्दल मी त्याच्याकडून आमंत्रण मागितलें त्यावेळीं मी निश्चय केला होता कीं जर मानाचा समेट होत असेल तर तो मान घेण्याच्या शर्यतींत आपला पराभव होऊं द्यावयाचा नाहीं. म्हणून समेट झाल्याबद्दल मी परमेश्वराचे आभार मानतों. आणि समेट मोडल्यामुळें देशावर पुन्हां यातनाचे जे शतपट डोंगर कोसळले असते ते कांहीं काळ तरी दुरावले याबद्दलही मी देवाचे उपकार मानले पाहिजेत.

## दोघांचाही विजय

अशा प्रकारच्या समेटांत विजयी पक्ष कोणचा हें ठरवणें शक्य नाहीं. जर विजय असलाच तर दोघाचाही आहे. कॉंग्रेसने विजयासाठीं कोणचीही पैज लावली नव्हती.

कॉंग्रेसला एक निश्चित ध्येय गाठावयाचें आहे आणि त्या बाबतींत विजयी होण्याची आम्हाला मुळींच शंका वाटत नाहीं. म्हणून मी सर्व देश-बांधवाना असें सागतों कीं, आनंदानें हुरळून जाण्याऐवजीं, नम्र होऊन परमे-श्वराची अशी प्रार्थना करा कीं, आमचें ध्येय गाठण्याचें आम्हाला सामर्थ्य दे. मग ती ध्येयाची वाट दुःखांतून असो किंवा समेट, सल्लामसलत व परिषद या शाततेच्या मार्गानें जाणारी असो.

## वीरश्रीचा काळ

ज्या लोकानीं गेल्या बारा महिन्यांतील यांतनांच्या व दुःखाच्या दिवसात टिकाव धरून वाट काढली ते आतां या परिषदाच्या विधायक काळातहीं तीच तयारी, एकोपा, प्रयत्नवाद, आणि शहाणपण दाखवतील अशी मी आशा करतों.

समेटानें आनंदीत होऊन जवळ जवळ हुरळून गेलेल्या स्त्रीपुरुषाप्रमाणेंच निराश झालेलेही स्त्रीपुरुष आहेत हें मला माहीत आहे.

वीराची दुःखें हीं त्याना स्वतःच्या श्वासोच्छ्वासासारखीं परिचित असतात. त्यांत त्याना जेवढा आनंद वाटतो तेवढा दुसऱ्या कशातही वाटत नाहीं. दुःखाचा काळ वाढतच गेला तर ते तीं दुःखें मोठ्या उत्साहानें

अंगावर घेतील, परंतु जर काळ ( या समेटाने ) थांबला तर आपलें हातचें कार्य गेले असे त्याना वाटतें आणि ध्येय दृष्टिआड झालें अशी रुखरुखही वाटते. मी त्यांना असें सांगेन कीं, थांबा, प्रार्थना करा, निरीक्षण करा आणि आशावादी व्हा. ''

क्लेशाला सुद्धा कांहीं स्पष्ट मर्यादा आहेतच. क्लेश हे शहाणपणाचे असतील तसेंच मूर्खपणाचेही असतील, आणि मर्यादा गाठल्यावर हौसेखातर दुःखें भोगीत राहून त्याचा काळ वाढवावयाचा हें मूर्खपणाचेंच आहे.

जेव्हा तुमचा प्रतिस्पर्धी तुमच्या आकांक्षाबद्दल वाटाघाट करण्याचा मार्ग तुम्हाला सोपा करून देतो त्या वेळीं तो सोडून एकाडेपणानें दुःखेंच भोगीत राहणें हें सूज्ञपणाचें नाहीं. जर अशा तऱ्हेनें खरी वाट सांपडत असेल तर त्याचा फायदा घेणें हें आपलें कर्तव्य आहे आणि माझें असें प्रामाणिक मत आहे कीं,समेटानें अशी वाट मोकळी करून दिली आहे.असे समेट हे केव्हांही तात्पुरती गरज भागवण्यापुरते असतात. आज झालेला तह हा किती तरी इतर गोष्टींच्या घडामोडीवर अवलंबून आहे. ' तात्पुरत्या तहाच्या अटी' असें ज्याना म्हणता येईल तेच शब्द या लेखी मसुद्यात फार आहेत. असें होणें अगदीं स्वाभाविकच होतें. परिषदेंत मनापासून भाग घेण्यापूर्वी किती तरी गोष्टी होणें जरूर होतें. त्याचा पाढा वाचण्याची कांहीं जरूर नव्हती. गतकालीन दुःखें किंवा अन्याय कितीही महत्त्वाचे असले तरी त्याची भरपाई करून घेणें हें काँग्रेसचें ध्येय नाहीं तर पूर्ण स्वराज्य हें ध्येय आहे. पूर्ण स्वराज्य या शब्दांचेंच स्थूल भाषांतर संपूर्ण स्वातंत्र्य असें केलें गेलें आहे.

हिंदुस्थानसारख्या स्वनामधन्य देशाचा तो जन्मसिद्ध हक्क आहे आणि त्यापेक्षा दुसऱ्या कोणच्याही प्राप्तीनें हिंदुस्थानचें समाधान होणें शक्य नाहीं. पूर्ण स्वराज्यात अंशतःही अपूर्णत्व हिंदुस्थानला खपणार नाहीं. समेटात त्या शब्दाचें कोठें अक्षरही दिसत नाहीं. हें सर्वांच्या लक्षात येईल. तो शब्द ज्या कलमात दडला आहे त्या कलमाचा अर्थ उभय प्रकारचा होऊं शकेल.

तीन खावी फेडरेशन हें एकादें मृगजल असेल, किंवा ज्यात दोन इंद्रियें काम करून सर्व शरीराला सशक्त करतात अशी एखादी जिवंतपणाची स्थिति असेल.

जबाबदारी हा त्यातला दुसरा खाव आहे, ती जबाबदारी नुसती छायात्मकच असेल किंवा कदाचित् भव्य न वाकणारा व दुर्दमनीय असा ओक

वृक्षही असेल. हिंदुस्थानला हितावह अशीं संरक्षणें हीं शुद्ध आभासमय असतील. अशा रीतीनें या सर्व गोष्टी हिंदुस्थानचे हातपाय जखडून टाकणारे दोरखंड असतील किंवा एका नाजूक कोवळ्या कलमाचें रक्षण करणारीं बाजूनें उभीं असलेलीं तीं कुंपणें हीं असतील!

त्या तीन सावाचा एका पक्षाला एक अर्थ वाटेल व दुसरा दुसराच अर्थ घेईल. प्रत्येकाला आपापल्या अर्थानें तें पाळण्याची मोकळीक त्या कलमात आहे आणि कॉंग्रेसची तयारी असली तर कान्फरन्समध्यें भाग घेण्याचा मार्ग मोकळा आहे. कारण फेडरेशन, जबाबदारी, संरक्षकें, राखीव हक्क किंवा त्याची वाटेल तीं नावें असोत तीं सर्व देशाच्या सामाजिक, राजकीय, आर्थिक व व नैतिक उन्नतीस कारण व्हावींत असा त्या गोलमेजमध्यें प्रयत्न होणार आहे.

कॉंग्रेसनें आपलें सर्व म्हणणें गोलमेज परिषदेला पटविण्यांत यश मिळवलें तर माझी अशी खात्री आहे कीं, त्या श्रमाचें फळ म्हणजेच संपूर्ण स्वातंत्र्य हेंच असणार. परंतु तो मार्ग फार कष्टसाध्य आहे हेंही मी जाणतों. मध्यंतरीं बरेच खडक व खाचखळगे लागणार आहेत. परंतु ज्यासाठीं त्यांनीं आत्मविश्वासानें व धैर्यानें कॅांग्रेसला आव्हान केलें आहे तें नवें कार्य कांग्रेसनें पत्करलें तर तें निष्फळ ठरण्याची मला मुळींच भीति वाटत नाहीं. म्हणून या मिळालेल्या नव्या संधींतून अत्यंत उदात्त व प्रेक्षणीय असें कांहीं मिळविणें किंवा आत्मविश्वासाच्या अभावीं व धैर्याच्या अभावीं ती संधि घालवणें हें सर्वस्वीं कॅांग्रेसच्या हातीं आहे.

या कामीं कॉंग्रेसला इतर पक्षांची मदत घ्यावी लागेल. बडे संस्थानिक आणि इंग्लिश लोक याची मदत आवश्यक आहे. निरनिराळ्या पक्षांना मी आताच विनंति करावयास पाहिजे असें नाहीं. कारण देशाच्या स्वातंत्र्यासाठीं कॅांग्रेसभक्तापेक्षां कोणच्याही रीतीनें ते कमी उत्सुक आहेत असें मला मुळींच वाटत नाहीं.

परंतु संस्थानिकाची गोष्ट निराळीच आहे. फेडरेशन स्वीकारण्याची त्याची कल्पना ऐकून मी थक्कच झालों. परंतु जर 'फेडरेटेड' हिंदुस्थानात ते समभागी व्हावयास तयार असलें तर मी त्याना धैर्यानें असें सुचवितों कीं, गेल्या कित्येक वर्षांपासून, ब्रिटिश इंडिया असें ज्याला म्हणतात त्या हिंदुस्थान विभागानें जें स्थान मिळविण्याचा प्रयत्न चालवला आहे तें घेण्यासाठीं त्यांनीं (संस्थानिकांनीं) अगदीं मनमोकळेपणानें पुढें व्हावें.

निर्भेळ राजसत्ता व निर्भेळ लोकसत्ता हीं एकत्र नांदणें अगदीं अशक्य आहे. मग ती राजसत्ता कितीही हितावह असो. तीं दोन्हीं एकत्र झाल्यानें स्फोटच होणार! म्हणून माझें संस्थानिकांना असें सांगणे आहे कीं, त्यानीं एकांडेपणाचा दृष्टिकोन ठेवूं नये आणि त्यांच्या भावी भागीदाराचें किंवा त्यांच्या वतीनें म्हणणं असेल त्याचा धिक्कार करू नये. जर त्यांनीं असा धिक्कार केला, तर कॉंग्रेसची स्थिति अत्यंत चमत्कारिक होईल. आखिल हिंदुस्थानचें प्रतिनिधित्व कॉंग्रेसकडे आहे किंवा तसे घेण्याचा प्रयत्न तरी ती करीत आहे. ब्रिटिश हद्दींत राहणारे किंवा संस्थानात राहणारे याच्यांत ती काहाही भेद करीत नाहीं.

संस्थानातील हालचालीपासून कॉंग्रेस अत्यंत सूक्ष्मपणानें व मोठा संयम करून बाजूस राहिली आहे. त्याच्या कारभारांत कांहींही ढवळाढवळ न करण्याचें व त्यांच्या भावना निष्कारण न दुखविण्याचें हें धोरण ठेवण्यात व हें बंधन लावून घेण्यात केव्हातरी योग्य वेळीं संस्थानिक आपला शब्द ऐकतील अशी आशा कॉंग्रेसनें बाळगली होती. ती वेळ आता आली आहे. तेव्हा संस्थानी प्रजेच्या वतीनें कॉंग्रेसनें केलेल्या विनंतीकडे हिंदी संस्थानिक कानाडोळा करणार नाहींत अशी मी आशा करावी काय?

इंग्लिश लोकानाही मला हीच विनंति करावयाची आहे. जर परिषदानीं व राज्यपद्धतीनीं हिंदुस्थानला आपलें मूळपद प्राप्त करून घ्यावयाचें असेल तर इंग्लिशांची सादिच्छा व सक्रिय मदत हीं अत्यावश्यक आहेत. लंडन कॉन्फरन्समध्यें आपण जें सोडलें असें त्याना वाटतें तें काहीच नाहीं. मुळापैकीं तें अर्धं सुद्धां नाहीं. हिंदुस्थानचें ध्येय त्यामुळें थोडेंसुद्धा जवळ आलें नाहीं. हिंदुस्थानचें स्वातंत्र्य आपल्या मालकींत ठेवण्यात इंग्लिशांना जो अभिमान वाटतो त्याच दर्जाचा अभिमान हिंदुस्थानला अनुभवास आणून देण्याची त्याची तयारी पाहिजे, तर त्यानीं खरें सहाय्य केलें असें म्हणता येईल. हिंदुस्थानला चुकतचुकत जंगलात भटकूं देण्याचें, स्वातंत्र्य देण्याइतकें धैर्य इंग्लिश मनोवृत्तीनें दाखवलें पाहिजे! जर चुका करण्याचें व पाप करण्याचें सुद्धा स्वातंत्र्य असेल तरच तें 'स्वातंत्र्य' मिळविण्याच्या लायकीचें आहे. जर सर्वशक्तिमान् परमेश्वरानें अत्यंत सामान्य प्राण्यालासुद्धां चुका करण्याचें स्वातंत्र्य दिलें आहे तर नाहीं माणसें कितीही अनुभवी व समर्थ असलीं तरी तें ईश्वरदत्त स्वातंत्र्य दुसऱ्या माणसापासून हिरावून घेण्यात ती आनंद कसा मानतात याची मला कल्पनासुद्धा करवत नाहीं.

काँग्रेसलाच सामर्थ्य नसेल तर गोष्ट वेगळी. परंतु जर काँग्रेस समर्थ असेल तर तिनें आपल्या स्वातंत्र्याची पुरेपूर मागणी करावी याच हेतूनें तिला कॉन्फरन्समध्यें भाग घेण्यास आमंत्रण केलें आहे; आणि हिंदुस्थान हें रोडकें चालक आहे व त्याला कोणीतरी शुश्रूषा करण्याची व इतर बाह्य मदतीची जरूर आहे असें कॉंग्रेसला मुळींच वाटत नाहीं.

अमेरिकेंतील लोकशाहीला व जगातील इतर राष्ट्रानाही माझें हेंच सांगणें आहे. सत्य व अनत्याचार यावरच उभारलेलें हें युद्ध आहे, त्या तत्वाचें आम्ही उपासक असूनही कांहीं प्रसंगीं आम्ही त्यापासून भ्रष्ट झालों हें आमचें दुर्दैव होय. परंतु याच तत्त्वानीं त्या राष्ट्राच्याही भावना उद्दीप्त झाल्या आहेत व उत्सुकता वाढली आहे. त्या उत्सुकतेनेंच अमेरिकेनें सहानुभूतीच्या दृष्टीनें आम्हाला मोठें सहाय्य केलें आहे. माझ्या व कॉंग्रेसच्या वतीनें त्या मदतीबद्दल आम्ही सर्व अत्यंत कृतज्ञ आहोंत हें मी त्याना कळवूं इच्छितों. आणि ज्या अवघड कार्यास आता हात घालण्यास कॉंग्रेस सिद्ध झाली त्यात त्याची सहानुभूति नुसती आहे तेवढीच कायम राहणार असें नव्हे तर ती वाढत जाईल अशी मी आशा करतों. ज्या जागतिक शाततेची सर्व राष्ट्राना तळमळ लागली आहे त्या शाततेच्या कार्यास सत्य व अनत्याचार या मार्गांनीं हिंदुस्थाननें आपलें ध्येय गाठल्यास फार मोठें सहाय्य होईल. तसें झालें तर ज्यांनीं आम्हाला मदत केली आहे त्याचें अंशतः ऋण फेडल्यासारखें होईल.

शेवटीं सनदी नोकरवर्गास व पोलीसांना मला विनंति करावयाची आहे. पोलिसानीं अत्याचार केलें असा जो आरोप आहे त्याची चवकशी व्हावी अशी मागणी मी केल्याचा ध्वनि समेटात आहे. अशी चौकशी करण्याचें राहित केल्याचेंही समेटांत लिहिलें आहे. पोलिस खात्यानें चालविलेल्या यंत्राचा सनदी नोकरवर्ग हा एक अंतर्भूत भाग आहे असें जर त्याना खरोखरीच वाटत असेल व भरतभूमि आपल्या घराची स्वामिनी होणार व आपण तिची एकनिष्ठापूर्वक व इमानेंइतबारें सेवा करावी असें त्याना वाटत असेल तर त्यानीं जनतेत असा विश्वास उत्पन्न केला पाहिजे कीं, आपण जनतेचे सन्माननीय व सूज्ञ असे सेवक आहोंत. सन्मान्य व सूज्ञ खरें पण सेवक, मालक नव्हे असें त्यानीं आपल्या वागणुकीनें लोकाना वाटावयास लाविलें पाहिजे.

तुरुंगात असलेल्या शेकडो मित्रानाही मला काहीं सांगावयाचे आहे. त्याच्या वतीने मला तारा येत आहेत. गेल्या वर्षांत कैद झालेले सत्याग्रह–कैदी सुटतील त्यावेळीं हे माझे दुसरे मित्र मात्र तुरुंगातच खिचपत राहतील. तुरुंगवास ही शिक्षा आहे असें व्यक्तिश: मला मुळींच वाटत नाहीं. अत्याचारी लोकाना सुद्धा ती शिक्षा नाहीं. राजकीय हेतूनें ज्यानीं अत्याचार केले त्यांना कदाचित् सारासार विचार नसेल पण त्यांचा त्याग व त्याचे देशप्रेम मजपेक्षां कमी नाही. आणि म्हणून मी सागतों कीं, जर वाजवी पाहता मला माझ्या सुटकेच्याही अगोदर किंवा सत्याग्रहींच्या सुटकेच्या आधीं त्यांची मुक्तता करतां आली असती तर मी मनापासून ती मिळवली असती. परंतु मला त्यांच्या मुक्ततेच्या मागणीचे न्याय्य समर्थन करतां आलें नाहीं यावर ते विश्वास ठेवतील अशी आशा आहे. परतु मी किंवा वर्किंग कमिटीचे सभासद त्यांना विसरलें आहोंत असा मात्र त्याचा अर्थ नाहीं.

सहकार्याचा हा मार्ग तात्पुरता का होईना परंतु कॉंग्रेसने हेतुपुरस्सर स्वीकारला आहे. जर समेटातल्या अटी कॉंग्रेसच्या सभासदानीं पूर्णपणे सन्मानपूर्वक पाळल्या तर कॉंग्रेसला जबरदस्त अशी इभ्रत मिळेल आणि कायदेभंग करण्याइतकेंच शातता घडवून आणण्याचेंही आपलें सामर्थ्य सरकारला पटवून देतां येईल.जर सर्व जनतेनें कॉंग्रेसला तें सामर्थ्य पुरवलें तर माझी खात्री आहे कीं, राहिलेले सर्व कैदी, मीरत कैदी व इतर सर्व कैदी मुक्त होण्यास मुळींच कालावधि लागणार नाहीं.

अत्याचारी मार्गानें हिंदुस्थानचें स्वातंत्र्य मिळवूं पाहणारे थोडेफार क्रातिकारक हिंदुस्थानात आहेत यांत शंका नाहीं. अनत्याचारी मार्गाचें काय सामर्थ्य आहे याची थोडीबहुत कल्पना आता त्याना आली असावी. त्यानीं आपल्या अत्याचारी चळवळीपासून परावृत्त व्हावें असें मी त्याना पुन्हा सागतों. एकाद्या चमत्काराप्रमाणे एकाकी झालेली प्रचंड लोकजागृति ही केवळ अनत्याचाराच्या गूढ परंतु निश्चित सामर्थ्याच्या प्रभावानें झाली हें अत्याचारी कबूल करतीलच. त्यानीं धीर धरावा व कॉंग्रेसला किंवा मला सत्य व अनत्याचार यांची योजना अंमलात आणण्याची एकवार संधि द्यावी असें माझें त्यांना सागणें आहे. दाडीप्रयाणानंतर अद्याप एक वर्षही लोटलें नाहीं.

३० कोटी लोकांच्या आकांक्षेनुसार परिणाम करणाऱ्या प्रयोगागातर एक सर्व गोष्टी शांततामय असो एक गोष्टही नाहीं. म्हणून आपल्या मातृभूमीच्या मोक्षासाठीं त्यांनीं आपलें मूल्यवान् जीवित राखून ठेवावें. त्यांनाही मोठी हाक ऐकावी लागेल. मी सरकारी नेत्यांनी सुटका करण्याची फार गरज असल्याबद्दल शिक्षा झालेल्यांना प्रत्यक्ष फांशावरून उतरविण्याची संधि असणाऱ्यांनी कौशल्य करावें.

परंतु उगाच गोष्टी यांना घेरण्याची मला इच्छा नाहीं. माझ्या व कॉंग्रेसच्या आकांक्षा फक्त जाहीर रीतीनें सांगतों. प्रयत्न करणें आपल्या हातीं आहे. फळ देणें परमेश्वराधीन !

एकच वैयक्तिक गोष्ट सांगून मी पुरें करतों. सन्माननीय समेट घडवून आणण्यासाठीं मी माझें सर्वस्व कामास लावलें होतें. समेटाच्या अटी कॉंग्रेसला लागू आहेत तोंवर त्या पाळण्याबद्दल कायावाचामनेंकरून झटण्याबद्दल मी लॉर्ड आर्विन यांना वचन दिलें आहे. संधि सांपडल्याबरोबर समेट मोडावा या हेतूनें मी समेटाची खटपट केली नाहीं. तर आज तात्पुरत्या असलेल्या गोष्टी पूर्णपणें कायम स्वरूपाच्या करून टाकण्यासाठीं जीवापाड प्रयत्न करावा व कॉंग्रेसचें ध्येय प्राप्त करून घ्यावें या हेतूनें मी समेट घडवून आणला. शेवटीं समेट घडवून आणण्याच्या कामीं ज्यानीं अविश्रांत श्रम केले त्या सर्वांचे मी आभार मानतों.

६ मार्च १९३१ रोजीं ११॥ वाजतां दिल्ली, हिंदुस्थान व परदेश येथील वृत्तपत्रकाराना आणखी एक महत्वाची मुलाखत गांधींनीं दिली. हजर असलेल्या लोकात अमेरिकेंतील असोसिएटेड प्रेसचे मि. जेम्स मिल्स, लंडन-टाइम्सचे मि. टरस शिकॅगो ट्रिब्यूनचे मि. शायरर बोस्टन इव्हिनिंग ट्रॅन्साक्रिप्टचे मि. हॉल्टन जेम्स, ख्रिश्चन सायन्स मोनिटर ( अमेरिका ) चे मि. इंजल्स, हिंदुस्थान टाइम्सचे मि. जे. एन्. शहाणी, पायोनियरचे व सिव्हिल व मिलिटरी गॅझेटचे मि. नीडहॅम हे लोक होते. वरील मुलाखतींत झालेलीं प्रश्नोत्तरें खालीं दिलीं आहेतः—

प्र.–' पूर्ण स्वराज्य ' या शब्दाचा आपण काय अर्थ करतां ?

उ.–इंग्लिश भाषेंत 'पूर्ण स्वराज्य या शब्दाला योग्य प्रतिशब्द नाहीं म्हणून मला आपणांस या प्रश्नाचें योग्य उत्तर देता येणार नाहीं. स्वराज्याचा मूळ अर्थ आपली सत्ता असा आहे. स्वातंत्र्य या शब्दाला असा अर्थ नाहीं. योग्य

प्रतिशब्द न सापडल्यानें आम्ही संपूर्ण स्वातंत्र्य असा शब्दप्रयोग करतों. पूर्ण स्वराज्य या शब्दात इतर राष्ट्रांशीं मैत्री वगळली जात नाहीं, इंग्लंडविषयीं शंका कशाला! परंतु त्याचा अर्थ परस्पराच्या हितासाठीं व परस्परांच्या इच्छेनें केलेली मैत्री.

## संपूर्ण स्वातंत्र्याचा ठराव

प्र. समेटाचा दुसरा प्यारा लक्षांत घेतला तर कॉंग्रेसनें मद्रास, कलकत्ता व लाहोर येथें पास झालेला संपूर्ण स्वातंत्र्याचा ठराव कायम :ठेवावा हें सुसंगत आहे काय ?

उ.-होय खात्रीनें सुसंगत आहे. कराचीलाही तो ठराव पुन्हा जाहीर करण्यास समेटानें कोणच्याही तऱ्हेची हरकत येत नाहीं. आणि तो ठराव मी गोलमेजपरिषदेपुढेंही जोरानें प्रतिपादणार आहे,हें सागण्यांत मी कांहींही गुपित फोडतों आहे असें नाहीं. समेटास तयार होण्याच्या पूर्वींच ही माझी भूमिका नक्की करून घेण्याची मी काळजी घेतली होती.

## कॉंग्रेस व " सेफगार्डस् "

प्र०—आपण हल्लीं असलेले सेफगार्डस् व रिझर्व्हेशन्स पत्करणार आहांत काय ?

उ०—हल्ली असलेले सेफगार्डस् व रिझर्व्हेशन्स नाहीं.या बाबतींतलें कॉंग्रेसचें म्हणणें मी जगापुढे स्पष्ट माडलें आहे आणि जो कॉंग्रेसला राजकीय कॉन्फरन्समध्यें आमंत्रण देईल त्याला कॉंग्रेस कोणत्या ध्येयासाठीं झटते आहे हें माहीत असावयास पाहिजे.

कॉंग्रेसची भूमिका स्पष्ट करण्याचा मी माझ्याकडून होईल तेवढा प्रयत्न केला आहे आणि कॉंग्रेसला कॉन्फरमध्यें भाग घेण्यासाठीं न बोलावण्यास सुद्धां बादशाही सरकार मोकळें आहे. असा भाग घेण्यास कॉंग्रेसला भाग पडावे अशी समेटात कोणचीही अट नाहीं असें मला तरी वाटते.

## यंग इंडिया.

प्र०—आपण पुन्हां यंग इंडिया सुरू करणार आहांत काय ?

उ०-शक्य तितक्या लवकर समेटांत अटी ज्या प्रमाणात अंमलात येतील त्यावर तें अवलंबून आहे. कारण प्रेस ऑर्डिनन्सप्रमाणें जप्त केलेली मशिनरी

परत करणें याशी समेटाची एक अट आहे. लागलीच यानंतर यंग इंडिया अद्याप निषिद्ध आहे. समेटाची अट पाळण्यासाठी या वेळचा अंक आम्ही बंद ठेवला आहे; कारण समेटाच्या अटीप्रमाणें नामंजूर असें वृत्तपत्र बंद करावयास पाहिजे.

प्र०—भावी शासनपद्धतींत आपण कांहीं संरक्षकें ठेवणार आहात काय ?

उ०—होय; जी न्याय्य व सूज्ञपणानी आखतील तीं. उदाहरणार्थ अल्पसंख्याकांचा प्रश्न घ्या.

अल्पसंख्याकांच्या हक्कांना आम्ही एक पवित्र ट्रस्ट म्हणून जोपासना केली नाहीं तर एक महाराष्ट्र या दृष्टीनें आम्हाला आपलें ध्येय गाठता येणार नाहीं याची मला जाणीव आहे. तो ' सेफगार्ड ' मला न्याय्य वाटतो.

## सैन्य व जमाबंदी.

प्र० सैन्य व जमाबंदी ( फायनान्स ) याबद्दल आपण काय ठरवलें आहे ?

उ० जमाबंदीनें ? होय. आमच्या वाटेला जें सार्वजनिक कर्ज येईल तें फेडणें जरूर आहे. हिंदुस्थानच्या हितासाठीं व प्रसारासाठीं फक्त सेफगार्डस पत्करण्यास मी मोठ्या आनंदानें तयार होईन. सैन्य हा तर मला फार महत्वाचा सेफगार्ड वाटतो. आम्ही सैन्याना पगार देण्याची हमी घेऊं शकूं आणि हिंदुस्थानसाठीं आवश्यक असें ब्रिटिश सैन्य आम्हास लागेल तेवढ्यासाठीं आम्ही जरूर त्या सर्व अटी पाळूं शकूं.

## हिंदुस्थानचें कर्ज.

प्र० आपण हिंदुस्थानचें कर्ज नाकारणार आहांत काय ?

उ० जें कर्ज आम्ही न्यायानें देणें लागतों त्यातला एक पैसाही मी नाकारणार नाहीं. राष्ट्रीय कर्जापैकीं एक पैसासुद्धा नाकारण्याचें कॉंग्रेसच्या मनात आलें नाहीं.

परंतु कॉंग्रेसचें जें मागणें आहे व ज्यावर जोर दिला जाईल तें असें कीं, भावी सरकारवर जें कर्ज लादलें जाईल ते न्याय्य असावयास पाहिजे. एखादें गिन्हाइकसुद्धा नवीन वस्तु विकत घेताना आपणास किती पैसे द्यावे लागतील याची चौकशी करतो. जर परस्परात कांहीं तडजोड झाली नाहीं तर एखादें स्वतंत्र लवाद त्यासाठीं नेमावें असें कॉंग्रेसने सुचाविलें आहे.

## परदेशी कापडावरील बहिष्कार

प्र० समेट झाला म्हणून परदेशी कापड बहिष्कार ढिला करावा असें आपणास वाटतें काय ?

उ० मुळींच नाहीं. परदेशी कापड बहिष्कार हें राजकीय शस्त्र नाहीं. तर सार्वत्रिक अशा पोटधंद्याला म्हणजेच चरख्याच्या धंद्याला उत्तेजन देण्यासाठीं ह्या बहिष्कार आहे. ही चळवळ परदेशी कापडाच्या आयाती पुरतीच आहे. जर माझ्या हातीं राज्यकारभाराचीं सूत्रें असतीं तर मी फार मोठ्या संरक्षक जकाती बसविल्या असत्या. हल्लींच्या सरकारलासुद्धा हें करणे शक्य आहे असें मला वाटते. हल्लींचे कर हे कोणच्याही दृष्टीनें संरक्षक नाहींत. त्या केवळ पैशाकरता बसविलेल्या जकाती आहेत.

## पूर्ण समता.

प्र० आपली पूर्ण स्वराज्याबद्दलची कल्पना काय आहे ?

उ० मी एक कल्पनासृष्टींत रममाण होणारा माणूस आहे. त्यामुळें अस्तित्वात नसलेल्या गोष्टी मी माझ्या मनात रेखाटतों. पूर्ण स्वराज्य पूर्ण समानतेला विरोधी तर नाहींच, उलट तें पूर्ण समानतेवरच उभारलेलें आहे. सामान्य मनाला त्या समानतेची कल्पना करता येणार नाहीं. समानतेचा अर्थ मी असा समजतों कीं, ' डाउनिंग स्ट्रीट ' हें साम्राज्याच्या हालचालीचें केंद्र असण्याच्या ऐवजीं दिल्ली हें केंद्र असावें. कांहीं मित्र असें म्हणतात कीं, इंग्लंडला हें खपणार नाहीं.

ब्रिटिश लोक व्यवहारज्ञ आहेत. त्यांना स्वातंत्र्याची आवड आहे, तेव्हां दुसऱ्याला स्वातंत्र्य देणें ही त्याच्याच पुढची पायरी आहे. माझी अशी खात्री आहे कीं, जर मी म्हणतों तशी समानता हिंदुस्थानला दिली गेली तर ब्रिटिश लोक म्हणतील कीं, ' वा ! आमची तर किती दिवसांची हीच इच्छा होती. ' विभक्त होण्याचा हक्क म्हणजेच समानता, असें माझ्या मनाला वाटतें.

## राष्ट्रीय सैन्य.

प्र० पूर्ण स्वराज्य मिळाल्यानंतर ब्रिटिश सैन्याला रजा देणें शक्य आहे असें आपणास वाटतें काय ?

उ० एक ध्येयवादी या दृष्टीनें मला तसें वाटतें. परंतु माझ्या ह्यातींत तरी तें घडून येईल असें मला वाटत नाहीं. मुळींच सैन्य न ठेवतां आपली व्यवस्था करून घेण्याइतकी तयारी होण्यासाठीं हिंदुस्थानला कित्येक शतकें लागतील. कदाचित् श्रद्धेच्या अभावीं माझ्यांत हें नैराश्य असेल. परंतु हें

उलट जर आपण असहकारितेच्या मर्यादा ओलांडल्या तर ताबडतोब मिळणारें फळ कितीहि चांगलें असलें तरी शेवटीं त्यांतून विष पेरलेलें आढळेल, आणि सगळें नासतील, जर आपण गुन्हेगाराला बळी पडला तर बहिष्काराचें नाश होईल आणि स्वराज्य हें एक दुरचें स्वप्न ठरेल. म्हणून मला असा विश्वास वाटतो की, एक अनुभवी नेता या नात्यानें गांधी योजना सर्वांना मान्य होईल. माझ्या अर्जामुळें बहिष्कार यशस्वी झाला नाहीं तर त्याच्या अपयशाची सर्व जबाबदारी माझ्यावरच पडते हें मी जाणून आहे. आणि ती घेण्यास मी तयार आहे. ”

वर्किंग कमिटीनें कराची काँग्रेसचे अध्यक्ष म्हणून वल्लभभाईंची निवडणूक केली कारण निवडणुकीला नेहरूंना मार्ग भोवतालच्या असामान्य परिस्थितीत शक्य नव्हता.

वर्किंग कमिटीचे सभासद तुरुंगातून सुटल्यापासून कराची काँग्रेसविषयींचे बेत चालले होते. तरीसुद्धा अद्याप काँग्रेसच्या अधिवेशनाच्या मार्गांत बऱ्याच अडचणी राहिल्या होत्या. एक गोष्ट मात्र सोयीची होती ती ही कीं हिवाळ्यानंतर अधिवेशन भरणार होतें. डिसेंबरमध्यें अधिवेशन भरवूं नये तें फेब्रुवारीच्या शेवटीं किंवा मार्चच्या आरंभीं भरवावें असें लाहोर अधिवेशनात ठरलें होतें. आणि मार्चमध्येंच समेट झाल्यामुळें त्याच वेळीं कराची काँग्रेस भरविण्याचा योगायोग जुळून आला. अधिवेशनाचा काळ बदलल्यामुळें तें आतां उघड्यावरती होणें शक्य होतें. मंडपाची जरूर राहिली नव्हती. कराची काँग्रेसच्या व्यवस्थेच्या बाबतींत स्थानिक म्युनिसिपॉलिटीची जमशेट आर. मेहेता याच्या स्फूर्तीनें आणि नेतृत्वानें बरीच मदत झाली. अधिवेशनास सुरवात होण्यापूर्वी २५ मार्च रोजीं कराची येथें एक प्रास्ताविक बैठक व्हावयाची ठरली. त्या ठिकाणीं चार आणे देऊन कोणालाही गांधींचें दर्शन मिळण्याची आणि व्याख्यान ऐकण्याची सोय केली होती. या प्रास्ताविक बैठकींतच वरील व्यवस्थेमुळें दहा हजार रुपये मिळाले. “गांधी मरण पावतील परंतु गांधींचें तत्त्वज्ञान मरण पावणार नाहीं. ” हे प्रसिद्ध शब्दप्रयोग गांधींनी याच सभेंत उच्चारले. वल्लभभाई आपल्या अध्यक्षीय भाषणात म्हणाले कीं हा अध्यक्षाचा मान आपणास व्यक्ति म्हणून मिळाला नसून गेल्या स्वातंत्र्य युद्धात गुजराथनें जो मोठा भाग उचलला त्याबद्दल गुजराथलाच हा मोठा बहुमान मिळाला आहे. काँग्रेसनें गांधी अर्विन करार केला नसता तर काँग्रेसची ती फार मोठी

चूक झाली असती. आपल्या भाषणाच्या पुढील भागांत वल्लभभाईंनीं समेटाचा अर्थ आणि समेटाप्रमाणें कॉंग्रेसभक्तांचें कर्तव्य स्पष्ट करून सांगितलें.

कराची कॉंग्रेसमध्यें वास्तविक अमर्याद आनंद दिसावयास पाहिजे होता. परंतु भगतसिंग राजगुरु आणि सुखदेव या तीन तरुणाच्या फाशीच्या दु:खदायक बातमीमुळें सर्वत्र औदासीन्य पसरले होतें. अत्यंत प्रयत्न करूनही गांधींना या तीन तरुणाची शिक्षा बदलून घेणे शक्य झाले नव्हतें. एवढ्यानेंच संपले नाहीं. गांधींच्या प्रयत्नाबद्दल ज्यानीं खूप स्तुति केली तेंच लोक या हुतात्म्याबद्दलच्या ठरावातील भाषेबद्दल विलक्षण संताप व्यक्त करूं लागले. भगतसिंगाबद्दलचा ठराव आणि गांधीअर्विन कराराबद्दलचा ठराव यापैकीं कराची अधिवेशनात कोणचा ठराव जास्त चित्तवेधक ठरला हें ठरविणें आजसुद्धा अशक्य आहे. मौ. महमदअल्ली गोलमेज परिषदेसाठीं लंडनला गेले असता तेथें वारले. आणि त्याचें शव जेरुसलेम येथें पुरण्यात आलें. अधिवेशनाच्या सुरवातीस पंडित मोतिलाल नेहरू, मौ. महमदअल्ली, मौ. मझरुल हक, श्रीयुत रेवाशंकर जव्हेरी, शाह महमद झुबेर, गुरुनंद मुदलीयार याच्या मृत्युबद्दलचे दुःखप्रदर्शनाचे ठराव पास झाले; त्यानंतर भगतसिंगाविषयींचा ठराव चर्चेस निघाला. त्या ठरावात वादग्रस्त मुद्दा असा होता कीं "कोणच्याही स्वरूपातील राजकीय अत्याचारापासून स्वतःस अलिप्त ठेवून आणि त्याबद्दल नापसंती व्यक्त करून" हे शब्दप्रयोग भगतसिंग आणि त्याचे साथीदार याच्या शौर्याचे आणि आत्मत्यागाचें अभिनंदन नमूद करीत असता त्यात घालावेत कीं नाहीं, सदरील ठराव संपूर्णपणें खालीं दिला आहे.

## सरदार भगतसिंग आणि त्यांचे साथीदार

"कोणच्याही प्रकारच्या राजकीय अत्याचाराबद्दल नापसंती व्यक्त करून आणि त्यापासून स्वतःस अलिप्त राखून ही कॉंग्रेस सरदार भगतसिंग आणि त्याचे सहकारी सुखदेव आणि राजगुरू याच्या शौर्याचे आणि आत्मत्यागाचें अभिनंदन करीत आहे आणि या तिघाच्या मृत्युमुळें दु:खमग्न झालेल्या त्याच्या कुटुंबियाच्या दुःखात भागीदार होत आहे. ह्या तीन फांशी अवास्तव सूडाचें कृत्य आहे आणि सर्व राष्ट्रानें एकजुटीनें शिक्षा बदलविण्याबद्दल जी मागणी केली होती त्याचा हा हेतुपुरःसर धिक्कार आहे. असें या कॉंग्रेसचें मत आहे, या वेळीं या दोन राष्ट्रात

सदिच्छा सर्वांस जरूर आहे हें कबूल असतांना अशा तऱ्हेची सदिच्छा उत्पन्न करण्याची मुळींच सरकारनें घालविली असेंही या सभेस वाटत आहे. जो सरकारी पक्ष निर्घोर निर्दय राजकीय अत्याचारांत प्रवृत्त झाला त्या पक्षास शांततेच्या मार्गांत वळविण्याची ही संधी सरकारनें घालविली आहे."

आपल्या अनत्याचाराच्या ध्येयास विसंगत होणार नाही अशा रीतीनें काँग्रेसनें हा ठराव तयार केला. परंतु गांधींना प्रतिकूल असलेला जो एक तरुण पिढीचा भाग काँग्रेसमध्यें होता त्याला वरील वादग्रस्त शब्दप्रयोगा-मुळें विरोधाची संधि सांपडली. आणि उपसूचना आणून ते शब्दप्रयोग गाळून टाकण्याची त्यांनी खटपट केली. स्वयंसेवकपरिषदेनें वरील शब्द प्रयोग वगळून ठराव पास केला. प्रांतिक परिषदातही वरील शब्दप्रयोग हेंच मुख्य वादाचें मुख्य कारण झालें.

अधिवेशनाचें काम चालू असताना बाहेरच्या बाजूस तरुणांनीं आरडाओरडा आणि दंगा सुरू केला. कराचीपासून १२ मैल अलीकडे वल्लभभाई आणि गांधी स्टेशनवर उतरले, त्या ठिकाणींहि या तरुणांनीं काळीं निशाणें दाखविलीं. आपल्या नेहमीच्या विनोदी स्वभावाप्रमाणें गांधींनीं त्या तरुणांचें स्वागत केलें आणि त्यांच्या हातातून काळीं फुलें मोठ्या सौजन्यानें स्वीकारलीं. त्याचा परिणाम असा झाला कीं, गांधींवर "हल्ला" करण्यासाठीं आलेले गांधींच्या संरक्षणासाठीं उभे राहिले. गांधी आणि त्यांच्या बरोबरचे लोक यांच्याभोंवतीं स्टेशनपासून काहीं अंतरापर्यंत त्यानीं संरक्षणासाठीं फेर धरला होता.

दुसरा ठराव कैद्यांच्या मुक्ततेविषयींचा होता. कैद्यांच्या मुक्ततेविषयीं ज्या अटी कबूल केल्या होत्या आणि जी वचनें दिलीं होतीं तीं सर्व बाजूला ठेऊन सरकार अरेरावीनें या बाबतींत वागत होतें असे या वेळीं स्पष्ट दृष्टोत्पत्तीस आलें होतें. म्हणून काँग्रेसनें आपलें मत जोरदार शब्दात मांडलें कीं, सरकार आणि काँग्रेस यांच्यामध्यें सदिच्छा उत्पन्न व्हावी असा जर समेटाचा हेतू असेल व त्या समेटामध्यें आपली सत्ता कमी करण्याचा ग्रेटब्रिटनचा मनापासून निश्चय झाला असेल तर सरकारनें सर्व राजकीय कैदी, स्थानबद्ध आणि ज्याच्यावरती अद्याप काम चालू आहे असे समेटांत समावेश न झालेलेहीं कैदी सोडावेत; आणि हिंदी लोकांवर राजकीय मतासाठीं किंवा कृत्यासाठीं हिंदुस्थानात किंवा हिंदुस्थानच्या बाहेर जी राजकीय बंधनें लादलीं असतील तीं सर्व दूर करावींत.

"ही काँग्रेस सरकारला असें बजावून सांगते कीं जर सरकारनें या ठरा-

याचा स्वीकार केला तर नुकत्याच झालेल्या फाशीमुळें देशांत उत्पन्न झालेलें प्रक्षुब्ध वातावरण काहींसे शांत होईल. ”

कराची कॉंग्रेसच्या वातावरणांतील औदासिन्याचें आणखी एक कारण होते. कॉंग्रेसचें अधिवेशन चालू असतां कानपूर येथें हिंदु मुसलमानांचे दंगे सुरू झाले आणि त्यात हिंदूपासून मुसलमानाचें संरक्षण करण्याचा आणि शातता व सलोखा उत्पन्न करण्याचा प्रयत्न करीत असता गणेश शंकर विद्यार्थी याचा खून झाला. या प्रसंगामुळें सर्व देश दुःखानें व्याकुळ झाला. १९२६ साली गोहत्ती कॉंग्रेसच्या वेळीं स्वामी श्रद्धानंद याचा खून झाला, त्या वेळेप्रमाणेंच याही वेळीं कॉंग्रेसला अमर्याद दुःख झालें.

जातीविषयक दंग्याबद्दल कानपूरची कधींही फारशी प्रसिद्धि नव्हती. १९२७,२८ आणि २९ या सालीं लहानसहान दंगे झाले. कानपूर येथें हिंदूंची लोकसंख्या जास्त आहे. एकंदर लोकसंख्येंत $\frac{५}{६}$ हिंदू आहेत आणि राहिलेल्या $\frac{१}{६}$ त मुसलमान आणि इतर अल्पसंख्याकाचा समावेश होतो.

भगतसिंग आणि त्याचे दोन मित्र याना २३ मार्च रोजीं लाहोर येथें फाशी देण्यात आलें. सर्व देशभर त्याबद्दल हरताळ पाळण्यात आला. मुंबई, कराची, लाहोर, मद्रास आणि दिल्ली येथील हरताळ शांतपणें पार पडले. कानपूर येथें अंशतः हरताळ होता आणि त्या तीन हुतात्म्याचीं चित्रें आणि काळीं निशाणें यासह एक मोठी मिरवणूक निघाली होती. हिंदूंचीं दुकानें बंद होतीं. परंतु मुसलमानानीं मात्र तसें कांहीं केले नाहीं. यापूर्वी काहीं दिवस महमदअल्लींच्या मृत्यूच्या वेळी मुसलमानांनीं हरताळ पाळला, परंतु हिंदूंनीं त्यात भाग घेतला नाहीं. अशा परिस्थितीचें पर्यवसान काय होणार हें विस्तारानें सागण्याची जरूरी नाहीं. २४ मार्च रोजीं हिंदूंच्या दुकानाची लूट होण्यास सुरवात झाली. २३ मार्चच्या रात्रीं सुद्धा ५० हिंदू जखमी झाले होते. २५ तारखेस आगीचा डोंब उठला. दुकानें आणि देवळें पेटविण्यात आलीं आणि त्याची राख झाली. अव्यवस्था, लुटालूट खून हीं एखाद्या वणव्याप्रमाणें पसरत गेलीं. पोलिसानीं कांहींही सहाय्य केलें नाहीं. पांचशें कुटुंबांनीं आपलीं घरें सोडून खेड्याचा आश्रय केला. डॉ. रामचंद्र यांच्यावर भयंकर प्रसंग गुदरला, त्यांची पत्नी व वृद्ध आईबाप आणि कुटुंबातील जवळ जवळ सर्व माणसे ठार मारलीं गेलीं आणि त्याचीं

येथें गदारोळ माजविण्यात आला. सरकारी अंदाजाप्रमाणें १६६ लोक मारले गेले आणि ४८० जखमी झाले. बाबू पुरुषोत्तमदास टंडन व आणखी कांहीं मित्र यांना काँग्रेसनें तातडीनें कानपूर येथें पाठविलें. परंतु शांतता उत्पन्न कर- ण्याच्या कामीं फारसें कांहीं करता आलें नाहीं. २५ तारखेपासून गणेश शंकर यांचा पत्ता नव्हता, आणि शेवटीं २९ तारखेस त्यांचें शरीर सांपडलें. इस्पितळांतल्या प्रेतांत खादी पांघरलेलें तेवढें एकच प्रेत होतें. त्याच्या हातावर गोंदलेल्या अक्षरांची खूण होती. आणि त्यांच्या खिशांत कांहीं कागदपत्र होते. त्यांत कराची काँग्रेसवरील एक लेख होता. या खुणावरून त्यांचें प्रेत ओळखतां आलें. त्या दिवशीं त्यांनीं पुष्कळ मुसलमान कुटुंबांना वांचविलें होतें, आणि शेवटीं असें दिसतें कीं, त्यांना एका बाजूस मुद्दाम नेण्यांत आलें असावें आणि त्या ठिकाणीं अंगावर चालून आलेल्या प्रक्षुब्ध जमावापुढें एखाद्या खऱ्या हुतात्म्याप्रमाणें त्यांनीं आपलें मस्तक नमविलें. जर त्यांच्या रक्तामुळें एकी झाली असती आणि गुंडांची तहान शांत झाली असती तर त्यांना भोसकून ठार मारण्याची त्यांना पूर्ण मोकळीक होती. काँग्रेसनें या दुःख- कारक प्रसंगाबद्दल खालील ठराव पास केला.

' दंग्यामध्यें गणेश शंकर विद्यार्थी याचा मृत्यु झाल्याची बातमी ऐकून काँग्रेसला अतिशय दुःख होत आहे. विद्यार्थी हे संयुक्त प्रांत प्रांतिक काँग्रेस कमिटीचे अध्यक्ष होते. राष्ट्रसेवकांत ते अत्यंत निःस्वार्थी म्हणून प्रसिद्ध होते. जातीविषयक दुराग्रहापासून पूर्णपणें अलिप्त असल्यामुळें सर्व पक्षांत आणि सर्व जातींत ते लोकप्रिय झाले होते. त्याच्या कुटुंबीयांच्या दुःखाबद्दल काँग्रेस आपली सहानुभूति व्यक्त करीत आहे. आणि त्याच वेळीं काँग्रेस असें अभिमानानें नमूद करते कीं संकटग्रस्तांना मुक्त करीत असतां, ज्या ठिकाणीं दंगेखोरी आणि माथेफिरूपणा यांचें वातावरण माजलें होतें तेथें शांतता प्रस्थापित करीत असतां हा महान देशभक्त आपल्या प्राणाचें मोल वेंचीत होता. सर्व लोकांना काँग्रेसचें असें सांगणें आहे कीं शांतता प्रस्थापित करण्या- साठीं ह्या उदार आत्मयज्ञाचा फायदा घ्यावा. दंग्याचें कारण शोधण्यासाठीं, तेढ मिटविण्यासाठीं आणि जवळच्या जिल्ह्यांना व प्रांतांना या दंग्याच्या विषाचा संपर्क होऊं नये म्हणून त्यासाठीं काँग्रेस एक कमिटी नेमीत आहे. काँग्रेसनें नेमलेल्या कमिटींत सहा सभासद होते. व डॉ. भगवानदास हे तिचे अध्यक्ष होते. कमिटीनें खूप मोठा रिपोर्ट तयार करून वर्किंग कमिटीपुढें हजर

केला. तो पुढें पुष्कळ दिवसानीं छापण्यातही आला. परंतु सरकारनें तो जप्त करून त्याचा प्रसार होऊं दिला नाहीं.

या कॉंग्रेसचा मुख्य ठराव म्हणजे गांधी-अर्विन करारात घोटाळ्याच्या किंवा संशयाच्या ज्या ज्या बाबी होत्या त्या संबंधीं कॉंग्रेसला काय वाटतें हें सांगणारा परिपूर्ण खर्डाच होता. त्यात कॉंग्रेसचें मागणें काय आहे हें स्पष्टपणें मांडले होतें. आयर्विनना जे 'सेफगार्डस्' वाटत ती गांधींना 'सोईकरतां केलेली योजना वाटे' आणि करारातील 'हिंदुस्थानच्या हिताकरता असलेले सेफगार्डस्' हे 'हिंदुस्थानकरता करावी लागणारी सोईस्कर व्यवस्था' आहे असें ठरले. त्याचप्रमाणें करारातून ज्या गोष्टी गळण्याचा संभव होता त्या कराचीच्या ठरावानें स्पष्टपणें जाहीर केल्या. त्या गोष्टी म्हणजे संरक्षण, परराष्ट्रीय बाबी, पैसा व जकाती व आर्थिक धोरण यावर राष्ट्राचा ताबा असावा ह्या होत. या एका वाक्यात कॉंग्रेसनें आपलें म्हणणें सांगितलें.

नंतर, सविनय कायदेभंगाच्या चळवळींत ज्यानीं अत्यंत हाल सहन केले त्याचें कांग्रेसनें अभिनंदन केले. स्त्रियांचा विशेषतः उल्लेख केला आणि मताधिकाराच्या बाबतींत कॉंग्रेसनें स्त्रीपुरुषभेद मान्य करूं नयेत असें ठरविलें.

बाकीचे विधायक कार्यक्रमाचे ठराव खालीं दिले आहेतः—

वर्किंग कमिटी व हिंदुस्थान सरकार यांच्यामध्यें झालेल्या तात्पुरत्या समेटाला ही कॉंग्रेस मान्यता देत आहे आणि पूर्ण स्वराज्य हें कॉंग्रेसचें ध्येय तसेंच कायम आहे हेंही कॉंग्रेस स्पष्टपणें नमूद करीत आहे. जर ब्रिटिश सरकारच्या प्रतिनिधिबरोबर कॉंग्रेसला आपलें प्रतिनिधित्व करण्याची परिषदेंत वेळ आली तर कॉंग्रेसचे प्रतिनिधि याच ध्येयासाठीं परिषदेत काम करतील, आणि विशेषतः संरक्षण, परराष्ट्रीय राजकारण, जमाबंदी, जकात व आर्थिक धोरण यावर राष्ट्राचा अधिकार मिळवण्यासाठीं खटपट करतील. तसेंच एका निःपक्षपाती लवादाकडून ब्रिटिश सरकारच्या आर्थिक व्यवहाराची चौकशी करणें, राष्ट्रीय कर्जातील हिंदुस्थानचा किंवा इंग्लंडचा भाग ठरवणें, आणि तो हिस्सा पत्करण्याचें प्रत्येक पक्षास स्वातंत्र्य असणें, उभय पक्षाना आपली भागीदारी संपविण्याचा इच्छेनुरूप अधिकार असणें, त्याचप्रमाणे हिंदुस्थानला आपल्या हिताच्या दृष्टीनें जी व्यवस्था अवश्य वाटेल ती करण्याचें स्वातंत्र्य असणें या गोष्टी कॉंग्रेसचे प्रतिनिधी करतील.

या परिषदेसाठी महात्मा गांधींना काँग्रेस आपले प्रतिनिधि म्हणून नेमीत आहे व त्यांच्याशिवाय ज्या इतर प्रतिनिधींची निवड गांधींच्या नेतृत्वाखाली वर्किंग कमिटी करील, त्यांनाहि हें प्रतिनिधित्व प्राप्त होईल.

## ६ सविनय कायदेभंगांत हाल सोसलेले लोक.

ज्यांनी सविनय कायदेभंगाच्या चळवळींत कैद, गोळीबार, संगीनीचा किंवा लाठीचा मार, हद्दपारी, किंवा मालमत्तेचें बलात्कारानें अपहरण, अशा कोणत्याही प्रकारचा ज्यांनी छळ सहन केला त्यांचें ही काँग्रेस अभिनंदन करीत आहे.

ज्या हजारों हिंदी स्त्रिया या वेळीं जागृत होऊन स्वातंत्र्ययुद्धामध्यें सामील झाल्या त्यांचें ही काँग्रेस विशेषेंकरून अभिनंदन करीत आहे आणि ज्या राज्यघटनेंत स्त्रियांच्या मताधिकाराच्या बाबतींत भेद केला आहे अशी कोणचीही राज्यघटना काँग्रेस स्वीकारणार नाहीं अशी ही काँग्रेस त्यांना आश्वासन देत आहे.

## ७ जातिविषयक दंगे.

बनारस, मिर्झापुर, आग्रा, कानपुर व इतर ठिकाणीं झालेले जातीजातींतील दंगे हिंदी स्वातंत्र्याच्या चळवळीस अत्यंत विघातक आहेत असें या काँग्रेसचें मत आहे. या दंग्याची चिथावणी करणारे व असे दंगे उत्पन्न करणाऱ्या खोट्या बातम्या पसरविणारे जे कोणी असतील त्याचा ही काँग्रेस धिक्कार करीत आहे. त्यांच्या शांतताविघातक चळवळी अत्यंत निंद्य आहेत. ज्या लोकाचा विशेषतः ज्या स्त्रियाचा व मुलाचा वरील दंग्यात खून झाला त्याच्या मृत्यूबद्दल काँग्रेसला अत्यंत दुःख होत आहे आणि जे लोक त्या दंग्यात बळी पडून अद्याप यातना भोगीत आहेत त्याच्याविषयीं,व मृताच्या नातलगाच्या दुःखाविषयीं ही काँग्रेस अंतःकरणपूर्वक सहानुभूति दाखवीत आहे.

## ८ मद्यपाननिवारण

गेल्या बारा महिन्यात मद्यपाननिवारणकार्याचा जो यशस्वी प्रसार झाला त्याबद्दल ही काँग्रेस अत्यंत समाधान व्यक्त करीत आहे. सर्व काँग्रेससंस्थानीं मद्यपान व अंमली पदार्थाचें सेवन याचें निवारण करण्याची चळवळ नव्या उत्साहानें चालू ठेवावी आणि सुखी संसाराची राखरागोळी करणाऱ्या व शरीर व आत्मा याचा नाश करणाऱ्या अशा या मद्यपानव्यसनाचा जोर

कमी करण्याच्या कामीं स्त्रिया आपले प्रयत्न दुप्पट जोरानें चालू ठेवतील अशी कॅाँग्रेसला आशा आहे.

## ९ खादी

शेकडों खेड्यांतून गेल्या दहा वर्षें काम केल्यानंतर मिळालेला अनुभव असा आहे कीं, रिकाम्या वेळात जोडधंदा नसल्यानेच जो सक्तीची बेकारी उत्पन्न होते ती दारिद्र्याच्या इतर कारणापैकीं एक मुख्य कारण आहे आणि चरखा हा एकच जोडधंदा सार्वत्रिक होण्यासारखा आहे. परदेशी किंवा स्वदेशी गिरण्यांचें कापड घेत राहून लोकांनीं चरखा व खादी बाजूस टाकली आहे त्यामुळें खेड्यातून दुहेरी आहोटी लागत आहे. एक श्रमाचा मोबदला न मिळणे व दुसरी कापडाची किंमत । ही दुहेरी ओहोटी थाबविण्यासाठीं परदेशी कापड व परदेशी गिरण्या याना बाजूस सारून फक्त जरूर तेवढी खादीची जोड देणें हा एकच मार्ग आहे म्हणून लोकांनीं परदेशी कापड घेण्याचें थांबवावें असें ही कॅाँग्रेस सर्व जनतेस सागत आहे परदेशी कापड व सूत विकणाऱ्या व्यापाऱ्याना ह्या कॉंग्रेसची विनंति आहे कीं लक्षावधि शेतकऱ्यांच्या हितास विघातक असा हा व्यापार त्यानीं सोडून द्यावा.

खादीचा प्रचार वाढवून परदेशी कापडबहिष्कार जोरानें घडवून आणावा अशी सर्व कॉंग्रेस व तत्सम संस्थाना कॅाँग्रेसची आज्ञा आहे.

संस्थानाना अशी विनंति आहे कीं, या विधायक प्रयत्नाना त्यानीं सहाय्य करावें व आपल्या हद्दींत परदेशी कापड व परदेशी सूत याची आयात बंद करावी.

खालील मार्गांनीं या प्रचंड आर्थिक विधायक चळवळीस सहाय्य करावें अशी देशी गिरण्याच्या मालकाना ही कॉंग्रेस विनंति करीत आहे.—

(१) स्वतः हातसुताची खादी वापरून त्यानीं खेडेगावातील या जोडधंद्यास नैतिक पाठिंबा द्यावा.

(२) खादीशीं स्पर्धा करणारें कापड तयार करण्याचें थाबवावें आणि त्या दृष्टीनें ऑल इंडिया स्पिनर्स असोसिएशनच्या प्रयत्नाशीं सहकार्य करावें.

(३) आपल्या मालाची कमींत कमी किंमत ठेवावी.

(४) परदेशी सूत, रेशीम, कृत्रिम रेशीम, आपल्या मालात उपयोगांत आणूं नये.

( ५ ) परदेशी कापड देऊन स्वदेशी कापड घ्यावें आणि त्यांचा व्यापार स्वदेशींत रूपांतरित करून टाकावा. हें परदेशी कापड बाहेरदेशीं पाठवावें.

( ६ ) गिरणी मजुराची स्थिति सुधारावी आणि गिरणीमालक हे आपल्या सुखदु:खांचे जोडीदार अशी मजुरांची खात्री पटवावी.

परदेशांतील प्रचंड व्यापाऱ्याना ही कॉंग्रेस असें सुचवतें कीं, परदेशी कापडावर आर्थिक बहिष्कार घालणें हें हिंदुस्थानला जरूर आहे व तें न्याय्य आहे हें त्यांनीं प्रथम पटवून घ्यावें. हिंदी जनतेचे सांपात्तिक हाल करणारा परदेशी कापडाचा व्यापार त्यानीं आपणहून थाबवावा. आणि इतर राष्ट्राच्या गरजा लक्षात घेऊन त्याप्रमाणें उद्योगधंदा करण्याकडे त्यांनीं आपलें लक्ष वळवावें. एवढें जरी त्यानीं केले तरी विश्वबंधुत्व पसरविण्याचें व व्यापारी नीतितत्त्वांत क्रांति घडवून आणण्याचे श्रेय त्याना मिळेल.

## १० शांततामय निरोधन.

परदेशी कापड, मद्य व अंमली पदार्थ यांवरील बहिष्कारांत मिळालेल्या यशाबद्दल कॉंग्रेसला फार संतोष होत आहे, सरकार व कॉंग्रेस यांच्यात झालेल्या समेटांत या बाबतींतील अटींना पूर्णपणें अनुसरून पिकेटिंग होत असेल तर कॉंग्रेस संस्थानीं त्याकामीं ढिलाई करूं नये.

## ११ सरहद्दीवरील लोक.

ही कॉंग्रेस असें जाहीर करते कीं, हिंदुस्थानच्या सरहद्दीवरील लोकांशीं व राष्ट्रांशीं आमचें मुळींच वैर नाहीं. त्याच्याशी मैत्रीचें नातें जोडून तें टिकवावें अशी हिंदी लोकाची इच्छा आहे. ब्रिटिश सरकारनें वायव्य सरहद्द प्रातांच्या बाबतींत जें चढाईचें धोरण स्वीकारलें आहे आणि त्या लोकाचें स्वातंत्र्य हिरावून घेण्याचे जे साम्राज्यशाही प्रयत्न चालू आहेत ते सर्व कॉंग्रेसला नापसंत आहेत. हिंदुस्थानचें लष्करी सामर्थ्य व आर्थिक सामर्थ्य या धोरणाच्या पुरस्कारासाठीं खर्च करूं नये आणि त्या प्रांतातील लष्करी तळ उठवावे.

## १२ " वायव्य सरहद्द प्रांत "

कॉंग्रेसविषयीं सरहद्द प्रातातील लोकांचें मत कलुषित करण्याचा प्रयत्न ज्या अर्थी जोरानें चालू आहे त्या अर्थी तो गैरसमज दूर करणें जरूर आहे. ही कॉंग्रेस असें नमूद करीत आहे कीं, राज्यपद्धतीच्या कोणच्याही योजनेंत हिंदुस्थानांतील इतर प्रांताच्या बरोबरीचेंच स्थान वायव्य सरहद्द प्रांताना मिळेल.

## १३. ब्रह्मदेश

ब्रह्मदेशचे स्वतंत्र संस्थान स्थापण्यासाठीं किंवा वाटेल त्यावेळीं विभक्त होण्याचा हक्क राखून ठेवून स्वतंत्र हिंदुस्थानच्या राज्यपद्धतींत स्वायत्त प्रांत म्हणून राहण्यासाठीं हिंदुस्थानपासून विभक्त होण्याचा ब्रह्मी लोकाचा हक्क ही कॉंग्रेस मान्य करीत आहे. ब्रह्मदेशचें विभक्तीकरण हट्टानें घडवून आणण्याच्या सरकारच्या प्रयत्नाचा ही कॉंग्रेस निषेध करीत आहे. ब्रह्मी लोकाना या बाबतींत आपलीं मतें स्पष्टपणें व्यक्त करण्याची संधिही सरकार देत नाहीं व त्यांच्या राष्ट्रीय संस्थाच्या इच्छेस सरकार जुमानीत नाहीं सिंगापूरबरोबर ब्रह्मदेशही पूर्वअशियातील आपल्या साम्राज्यशाहीचा बालेकिल्ला करावा म्हणून हे प्रयत्न मुद्दाम केले जात आहेत. कारण तेथील तेलाच्या खाणी व त्या दोन्ही स्थलाची विशिष्ट भौगोलिक रचना या गोष्टीस फार अनुकूल आहेत. ब्रह्मदेश हा एक ब्रिटिशाचा आंकित देश व्हावा व तेथील भौगोलिक संपत्तीचा ब्रिटिश साम्राज्यशाहीच्या कामीं उपयोग केला जावा आणि शेवटीं स्वतंत्र हिंदुस्थानला आणि पूर्वेकडील इतर देशाना तें एक संकट होऊन बसावें अशा परिणामाच्या कोणच्याही राजकीय धोरणाचा कॅंग्रेस अतिशय जोरानें निषेध करीत आहे. ब्रह्मदेश सरकारला दिलेले जादा अधिकार परत घेतले जावेत. ब्रह्मदेशमधील राष्ट्रीय मताच्या सर्व संस्था बेकायदेशीर ठरविणारा हुकूम परत घ्यावा म्हणजे ब्रह्मदेशात शात वातावरण उत्पन्न होईल आणि कोणाचाही अडथळा न होता शातपणें आपल्या भवितव्याचा ब्रह्मी लोकाना विचार करता येईल व ब्रह्मी लोकांच्या इच्छेला वाव मिळेल.

## १४ दक्षिण आणि पूर्व आफ्रिकेंतील हिंदी लोक.

दक्षिण आणि पूर्व आफ्रिकेंत रहाणाऱ्या हिंदी लोकाच्या परिस्थितीबद्दल ज्या घडामोडी चालू आहेत त्याबद्दल कॉंग्रेसला धास्ती वाटत आहे. दक्षिण आफ्रिकेमध्यें जे कायदे करण्याचा विचार चालू आहे ते वचनभंगासारखे आहेत आणि कायदेशीर हक्कांवरही गदा आणणारे आहेत. स्वतंत्र हिंदुस्थानात ज्या तऱ्हेनें वागविले जाण्याचा . त्याना हक्क असेल त्याच तऱ्हेने दक्षिण आफ्रिकेंतील हिंदी राहिवाशांना वागविले जावें असें सरकारला कॉंग्रेसचें आग्रहपूर्वक सागणें आहे दिनबंधू ॲंड्रयूज आणि पंडित हृदयनाथ कुंझरू यानीं तेथील राहिवाशांसाठीं स्वार्थत्यागपूर्वक जे श्रम केले त्याबद्दल ही कॉंग्रेस त्यांची अतिशय आभारी आहे.

मूलभूत हक्क आणि आर्थिक घडामोडी या विषयींचा ठराव वर्किंग कमिटी-पुढें कांहींसा एकदम आला होता. खरी गोष्ट अशी आहे कीं, देशांतील वातावरणाप्रमाणेंच कॉंग्रेसचे ठराव होतात.मूलभूत हक्काचा प्रश्न अमृतसर कॉंग्रेसच्या वेळीं पंजाबच्या कडक थंडींत ऐन रात्रीं श्री.सी.विजयराघवाचार्य यानीं प्रथम हातीं घेतला होता.नंतर नागपूर कॉंग्रेसच्या वेळीं ते स्वतः अध्यक्ष असतां या प्रश्नाला महत्त्व आलें. कराची कॉंग्रेसमध्यें नव्या आणि जुन्या मध्यें कांहीं फूट पडली होती यांत वाद नाहीं. वसाहतीचे स्वराज्य, ब्रिटिश साम्राज्यशाही आणि हिंदी नोकरशाही या जुन्या प्रवाहाकडे कॉंग्रेस वहात चालली आहे, असा संशय घेऊं लागलेले बरेचसे लोक कराची कॉंग्रेसच्या वेळीं होते. शेतकरी, कामगार आणि समाजसत्तावादाचीं ध्येयें मागें टाकली जात आहेत असें वाटूं लागणारे लोक बरेच होते. याविषयीं देशाला निश्चित असें आश्वासन देणें जरूर होतें; सत्य आणि अनत्याचार यावर उभारलेल्या कोणच्याही प्रश्नास तोंड देण्यास गांधी तयार होते आणि मूलभूत हक्काचा प्रश्न हा तर उघड उघड शेतकऱ्याचा आणि गरिबाचा प्रश्न होता.

वरील अटी पाळल्या गेल्या तर समाजसत्तेचे विचार किंवा आर्थिक सुधारणा किंवा मूलभूत हक्क या प्रश्नाबद्दल गांधींना कांहींहि धास्ती वाटत नव्हती.जवाहरलाल नेहरू सुद्धा या गोष्टीविषयीं विशेष दक्ष होते आणि ते सुद्धां प्रतिपक्षाच्या टीकेमुळें नव्हे तर वरील प्रश्नाविषयीं राष्ट्राची भूमिका स्पष्ट असावी आणि त्याप्रमाणें प्रचार करून बहुजनसमाजाला त्याचें शिक्षण द्यावें असें त्याना वाटे. म्हणून या ठरावाचा इतकाच पूर्वइतिहास होता.परंतु इतका दूरवर परिणाम करणारा ठराव जास्त शांतपणें विचार करून केला जावा आणि त्यावर वर्किंग कमिटीचे सभासद आणि ऑ. इं. कॉं. कमिटीचे सभासद यानींही अभ्यास करून विचार करावा असेंही जरूर दिसलें. ह्या मताप्रमाणें त्या ठरावाचा पुनर्विचार करण्याचा, दुरुस्ती करण्याचा किंवा मूळ हेतूस आणि धोरणास धक्का न लावता त्यात भर घालण्याचा अधिकार, ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटीला देण्यांत आला. १९३१ च्या ऑगस्टमध्यें मुंबई येथें ऑ. इं. कॉं. कमिटीनें वरील ठराव दुरुस्त करून मांडला त्यावेळीं त्याचें स्वरूप खालीलप्रमाणें होतें.

मूलभूत हक्क आणि आर्थिक योजना या विषयींचा कराची कॉंग्रेसचा ठराव ऑ. इं. कॉं. कमिटीनें खालीलप्रमाणें विस्तृत केला आहे.

स्वराज्याची कॉंग्रेसची कल्पना सामान्य लोकास कळावी. म्हणून कॉंग्रेसनें सुगमपणें ती लोकांपुढें मांडणें जरूर आहे असें या कॉंग्रेसचें मत आहे. बहुजनसमाजाचा ऱ्हास थांबविण्यासाठीं राजकीय स्वातंत्र्यांत अर्धपोटीं असलेल्या लक्षावधि लोकांच्या आर्थिक स्वातंत्र्याचाही समावेश झाला पाहिजे. म्हणून कॉंग्रेसच्या वतीनें जी कोणची राज्यघटना मान्य होईल त्या घटनेंत खालील गोष्टींची व्यवस्था झाली पाहिजे किंवा त्या घटनेनें स्वराज्य सरकारला ह्या गोष्टींची व्यवस्था करणें शक्य झालें पाहिजे.

## मूलभूत हक्क आणि कर्तव्यें

( १ ) हिंदुस्थानच्या प्रत्येक रहिवाशाला मतस्वातंत्र्याचा, अनिर्बंधपणें संघटना करण्याचा आणि शांततेनें आणि निःशस्त्रपणें कायद्याला किंवा नीतीला सोडून नसलेल्या हेतूसाठीं एकत्र येण्याचा हक्क आहे.

( २ ) प्रत्येक रहिवाशाला विवेकबुद्धीचें स्वातंत्र्य मिळालें पाहिजे. सामाजिक शिस्त आणि नीति संभाळून आपल्या धर्माचें आचरण करण्याचा त्यास हक्क असला पाहिजे.

( ३ ) अल्पसंख्यांकांची आणि निरनिराळ्या भाषांच्या प्रांताची संस्कृति भाषा आणि लिपी यांचें संरक्षण झालें पाहिजे.

( ४ ) जात, धर्म किंवा लिंग यांचें भेद लक्षात न घेता कायद्याच्या दृष्टीनें सर्व रहिवाशाचा दर्जा सारखा असला पाहिजे.

( ५ ) सार्वजनिक नोकरी, अधिकाराची किंवा मानाची जागा आणि कोणचाही व्यापार किंवा व्यवसाय करण्याचा हक्क या बाबतींत कोणचाही रहिवाशी धर्मामुळें, जातीमुळें किंवा लिंगभेदामुळें नालायक ठरता कामा नये.

( ६ ) विहिरी, तळीं, रस्ते, शाळा, सार्वजनिक विश्रांतिस्थानें ( धर्मशाळा ) हीं जर राष्ट्रानें चालविलेलीं किंवा स्थानिक पैशावर चाललेलीं असतील किंवा एखाद्या खाजगी व्यक्तीनें सार्वजनिक उपयोगासाठीं देऊन टाकलीं असतील तर त्यावर सर्व रहिवाशाचे सारखेच हक्क आणि सारखीच जबाबदारी असावी.

( ७ ) हत्याराविषयीं जे कायदे केले असतील ते पाळून कोणच्याही रहिवाशाला हत्यार बाळगण्याचा अधिकार असावा.

( ८ ) कोणच्याही व्यक्तीचें स्वातंत्र्य हिरावून घेतलें जाऊं नये, त्याच्या घरात त्याच्या मालमत्तेच्या मर्यादेंत कोणीही जबरदस्तीनें शिरकाव करूं नये. किंवा कायद्याच्या आधाराखेरीज ती जप्त करूं नये.

( ९ ) सर्व धर्मांच्या बाबतींत सरकारनें तटस्थपणाचें धोरण ठेवावें.

( १० ) मतदानाचा हक्क हा वयाच्या प्रौढत्वावर ठरविला जावा.

( ११ ) मोफत आणि सक्तीच्या प्राथमिक शिक्षणाची सोय सरकारनें करावी.

( १२ ) सरकारनें कोणचेही किताब देऊं नयेत.

( १३ ) फांशीची शिक्षा असूं नये.

( १४ ) हिंदुस्थानच्या कोणच्याही भागात प्रवास करणें, राहणे, कायम वस्ती करणें, इस्टेट करणे, कोणचाही व्यापार किंवा व्यवसाय करणे, आणि समानतेनें न्याय मिळणे व कायद्याचें संरक्षण मिळणें या बाबतींत प्रत्येक रहिवाशास पूर्ण स्वातंत्र्य असावें.

## कामगार वर्ग

२ ( अ ) आर्थिक जीवनाची व्यवस्था करताना न्यायाचीं तत्त्वें अशा रीतीनें पाळलीं गेलीं पाहिजेत कीं, कामगाराना व्यवस्थित आयुष्य घालवितां यावें.

( ब ) प्रत्येक कामगाराच्या हिताच्या संरक्षणाची सरकारनें जबाबदारी घ्यावी. सोईस्कर कायदे करून आणि इतर सर्व मार्गांनीं त्याना भरपूर पगार, कामाचें आरोग्यपूर्ण वातावरण, कामाचे मर्यादित तास, मालक व मजूर याचे तंटे मिटविण्याची सोईस्कर पद्धति, आणि म्हातारपण, आजारीपणा व बेकारी या आर्थिक संकटाच्या वेळीं संरक्षण, इतक्या गोष्टी त्याना मिळवून देण्याची सरकारनें हमी घ्यावी.

३ गुलामगिरींतून आणि गुलामगिरी सारख्याच परिस्थितींतून मजुराची सुटका व्हावी.

४ स्त्रीकामगाराना विशेष संरक्षण आणि बाळंतपणात रजेची सोय करून देणें.

५ शाळेंत जाण्या इतकें वय असलेल्या मुलांना खाणींत व कारखान्यात कामास जुंपूं नये.

६ आपल्या हिताचें संरक्षण करण्यासाठीं शेतकरी व मजूर यांना संघ करण्याचा अधिकार आहे.

## कर व खर्च

७ भाडेपट्टी, शेतसारा व खंड याची पद्धति सुधारली जाईल. लागवडीखालीं असलेल्या जमिनीवरील ओझें कमी होईल अशा रीतीनें न्याय्य व्यवस्था

होईल. लहान शेतकऱ्यांना जमीन महसुलाच्या व खंडाच्या बाबतींत ताबडतोब सवलत मिळेल. आर्थिक दृष्ट्या तोट्यांत असलेल्या जमीनीवर आवश्यक काळपर्यंत योग्य ती सूट मिळावी. त्याच्यावर त्याच्या प्रत्यक्ष उत्पन्नाच्या मानानें कर लादण्यांत यावा. कमींत कमी ऐन-उत्पन्नाच्यावर चढता कर बसवावा आणि अशा रीतीने ज्या लहान जमीन धारण करणाऱ्यांचें खंड माफीमुळे किंवा कमी केल्यामुळें नुकसान झालें असेल तें भरून काढावें.

८ कमींत कमी उत्पन्नाच्या इस्टेटीवर प्रमाणशीर रीतीनें वारसा-कर लादण्यात यावा.

९ लष्करी खर्च हल्लीं आहे त्यापेक्षां निम्मा होईल अशा प्रमाणात त्यात खूप कपात करावी.

१० मुलकी नोकराचा पगार व खर्च पुष्कळ प्रमाणात कमी करावेत. तज्ज्ञ म्हणून ज्याची नेमणूक केली त्याच्या खेरीज इतर कोणच्याही सरकारी नोकराला ठराविक प्रमाणापेक्षां जास्त पगार नसावा व हें ठराविक प्रमाण ५०० रु. दरमहापेक्षा जास्त नसावें.

११ हिंदुस्थानांत तयार झालेल्या मीठावर कोणचाही कर नसावा.

## आर्थिक व सामाजिक कार्यक्रम.

१२ स्वदेशी कापडाला सरकारनें संरक्षण द्यावें. त्यासाठीं परदेशी कापड व परदेशी सूत याची देशातील आयात कमी करावी. तसेंच परदेशी चढाओढीविरुद्ध संरक्षण आवश्यक असेल त्या देशी उद्योगधंधाना सरकारनें संरक्षण द्यावें.

१३ औषधी उपयोगाखेरीज इतर बाबतींतील मद्य व अंमली पदार्थांचें पूर्ण निर्मूलन करावें.

१४ राष्ट्रहिताच्या दृष्टीनें नाणीं व हुंडणावळ याचे व्यवहार नियंत्रित करावेत.

१५ खनिज संपत्ति, रेल्वे, जलमार्ग, जहाजें व सार्वजनिक व्यापारा दळणवळण या मुख्य धंद्यावर सरकारचें नियंत्रण किंवा मालकी असावी.

१६ शेतकीविषयक कर्जातून शेतकऱ्याची मुक्तता करावी व सावकारांवर प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष नियंत्रण ठेवावें.

१७ सर्व नागरिकाना लष्करी शिक्षण देऊन प्रत्यक्ष लष्कराचा एक भाग होईल असा एक राष्ट्रिय संरक्षकांचा वर्ग तयार करावा.

गांधी--आयर्विन करार व कराचीचे ठराव यानीं गांधी व कॉंग्रेस यांच्यावरील जबाबदारीचें ओझें जास्तच वाढवलें.

कराची कॉंग्रेसमध्यें ठरलेल्या कांहीं गोष्टी वर्किंग कमिटी व ऑ. इं. कॉंग्रेस कमिटी यांच्यावर सोंपवण्यात आल्या. शीखानीं राष्ट्रीय निशाणाचा प्रश्न उपस्थित केला व आपल्याला पसंत असेल तो रंग निशाणाच्या रंगात समाविष्ट करावा असें सुचविलें. लाहोरलाही हा प्रश्न निघालाच होता; पण कराचीला त्याला जास्त महत्त्व आलें. वर्किंग कमिटीनें १ व २ एप्रिल रोजीं कराचीला राष्ट्रीय निशाणात हल्लीं असलेले रंग कोणत्या जातीय दृष्टीनें आक्षेपार्ह आहेत आणि कॅंग्रेसला कोणते रंग स्वीकार्य होतील याचा विचार करण्याबद्दल कमिटी नेमली. राष्ट्रीय निशाणाचा त्या वेळचा रंग जातिविषयक तत्त्वाप्रमाणें ठरविण्यात आला होता. वरील कमिटीनें पुरावा गोळा करून जुलै १९३१ पूर्वी आपला रिपोर्ट सादर करावा असें ठरलें. कराची कॉंग्रेसमध्यें आणखी एका विषयामुळें खळबळ उडाली होती. भगतसिंग, राजगुरु आणि सुखदेव यांच्या मृत शरीराचे तुकडे करण्यात आले आहेत आणि त्याचा अंत्यविधि अत्यन्त अपमानास्पद रीतीनें झाला आहे, अशी एक बातमी त्यावेळीं उठली होती. या गोष्टीची चौकशी करण्यासाठीं वर्किंग कमिटीनें एक कमिटी नेमिली आणि ३० एप्रिलपर्यंत त्या कमिटीनें आपला रिपोर्ट सादर करावा असें ठरलें. भगतसिंगाच्या वडिलाकडून वरील बातमी प्रसृत झाली होती; परंतु त्यांना त्याबद्दल कोणताही पुरावा देता आला नाहीं किंवा ते स्वतःही कमिटीपुढें हजर राहिले नाहींत. त्यामुळें कमिटीच्या कामाचा कांहींही निर्णय लागला नाहीं. मूलभूत हक्क आणि आर्थिक योजना याच्या ठरावावरील विचार खुल्या अधिवेशनात व्यवस्थित तऱ्हेनें झालेला नव्हता. त्यामुळें त्यावरील मतें आणि सूचना प्रांतिक कॉ. कमिटया, इतर संस्था आणि व्यक्ति याच्याकडून मागविण्यासाठीं एक कमिटी नेमण्यात आली होती. आणि मूळ ठरावात ज्या कांहीं सुधारणा करावयाच्या असतील त्याविषयीं ३१ मे पर्यंत कमिटीनें रिपोर्ट करावा असें ठरलें. ब्रिटिशाचे हिंदुस्थानातील आर्थिक व्यवहार एका निःपक्ष-

पाती लवादाकडून स्वतंत्रपणे तपासण्याचा कॉंग्रेसनें अट्टाहास केला होता. त्याप्रमाणें ई. इंडिया कंपनी व ब्रि. सरकार यांच्या आर्थिक व्यवहाराची कसून चौकशी करण्यासाठीं एक कमिटी नेमण्यात आली. आणि यापुढें हिंदुस्थान किंवा इंग्लंड याचा एकंदर सार्वजनिक कर्जाच्या बाबतींतील भाग या कमिटीनें ठरवावयाचा होता. कमिटीनें आपला रिपोर्ट मे महिन्याच्या अखेरीपर्यंत सादर करावयाचा होता जातिविषयक प्रश्नाचा निर्णय लावण्यासाठीं मुसलमान पुढाऱ्यांच्या भेटी घेण्यासाठीं गांधी, वल्लभभाई आणि शेट जमनालाल बजाज याची एक कमिटी किंवा शिष्टमंडळ नेमण्यात आलें होतें. कॉंग्रेसच्या तिसऱ्या ठरावाप्रमाणें अद्याप काहीं राजकीय कैद्यांची मुक्तेची व्यवस्था करावयाची होती. अशा कैद्याविषयीं आणि ठरावात गोवलेल्या इतर व्यक्तींविषयीं सर्व प्रांतांतून पुरावे गोळा करण्याकरता श्रीयुत नरीमन याची योजना करण्यांत आली. शेवटचा मुद्दा गोलमेज परिषदेच्या प्रतिनिधित्वाबद्दलचा होता. वर्किंग कमिटीच्या बहुतेक सभासदांचें असें मत होतें कीं, एकच व्यक्ति प्रतिनिधि असण्याऐवजीं सुमारें १५ सभासद कॉंग्रेसचेच प्रतिनिधि म्हणून पाठवावेत. सरकारनें २० प्रतिनिधींपर्यंत व्यवस्था करण्याचें कबूल केलें होतें. एका व्यक्तीऐवजीं १५ किंवा २० प्रतिनिधि असणें सरकारच्या धोरणाच्या दृष्टीनें निःसंशय फायद्याचें होतें. एकंदरींत चर्चेत असें स्पष्ट झालें कीं, राज्य-घटना ठरविण्यासाठीं गांधी लंडनला जात नाहींत तर समेटातील मूळ तत्त्वाची वाटाघाट करण्यासाठीं जात आहेत. हा मुद्दा अशा रीतीनें स्पष्ट झाल्यानंतर कोणच्याही तऱ्हेचा मतभेद न होता हिंदुस्थानचा एकमेव प्रति-निधि म्हणून गांधींची निवड झाली. कोणच्याही तऱ्हेचे अधिभौतिक हेतु डोळ्यासमोर न ठेवता शांतता आणि सदिच्छा आणि अखिल मानवजातीचें सुख याच एका हेतूनें कॉंग्रेसचा एकमेव प्रतिनिधि असणें ही गोष्ट नैतिक-दृष्ट्या जगामध्यें फार मोठी होती. तिचा मोठेपणा व्यक्त करणें शब्दाच्या आटोक्याबाहेरचें आहे. अशा रीतीनें ' हिंदुस्थानचा अर्धनग्न फकीर ' दिल्ली येथें व्हाइसरॉयच्या बंगल्यावर येरझारा घालूनच थांबला नाहीं तर तो सेंट जेम्स राजवाड्याच्या भव्य दिवाणखान्यात समानतेच्या तहाच्या अटींची वाटाघाट करणार होता आणि ब्रिटनची इभ्रत त्या एका व्यक्तीच्या कर्तृ-त्वावर ठरविली जाणार होती

---

# भाग ६ वा

## प्रकरण १ लें

## समेटानंतर

युद्धाचा काळ संपला होता. शस्त्रास्त्रे खालीं ठेविलीं होतीं परंतु अद्याप शांततेचें मात्र दर्शन होत नव्हतें. शांततेनें मिळविलेले विजय हे युद्धानें मिळविलेल्या विजयापेक्षा नि:संशय मोठे असतात. आणि एका दृष्टीनें कॉंग्रेसनें हे महान विजय मिळविले होते. परंतु कॉंग्रेसच्या विजयातच त्या विजयनाशाचीं बीजे रोविलीं होतीं. कॉंग्रेसच्या नैतिक विजयाचीं विविध दर्शनें दिवसेंदिवस व्यक्त होऊं लागलीं होतीं. अधल्या दिवशींपर्यंत नसलेल्या कॉं. कमिट्या पुन्हा एकदा सुरू झाल्या होत्या. मृतवत झालेलीं झाडें वसंतऋतूमध्यें दुप्पट जोरानें फोफावतात त्याप्रमाणें कॉंग्रेसचें कार्य पुन्हा एकदा सुरू झालें होते. कॉंग्रेसचीं निशाणें पुनः डौलानें फडकूं लागलीं. पूर्वी जप्त केलेला कागदाचा प्रत्येक तुकडा प्रत्येक चिंधी कॉंग्रेसचे अधिकारी पोलीसांकडून हक्कानें परत मागूं लागले. अर्धे लष्करी पोषाखात किंवा आपल्या राष्ट्रीय पोषाखात मिरवत राष्ट्रीय पदें गात गात स्वयंसेवकांच्या मिरवणुकी मिरवूं लागल्या. राष्ट्रीय वृत्तीचीं लहान लहान मुलें आणि मुली, प्रौढ स्त्रिया आणि पुरुष दारूच्या दुकानावर आणि परदेशी कापडाच्या दुकानावर पिकेटिंग करू लागले. आणि दारू न पिण्याविषयीं आणि विलायतीं वस्त्रांनीं आपले देह भूषविण्याचे सोडून देण्याविषयीं लोकांना विनंति करूं लागले. अगदीं अधल्या दिवशींपर्यंत याच स्वयंसेवकांवर लांडग्याप्रमाणें झडप घालणारे पोलीस आज तेथेंच स्तब्ध उभे होते. पोलीसच्या मनोवृत्ती समेटाला अनुकूल होतील इतक्या थंड झाल्या नव्हत्या. वरील देखावे न्यायाधिशाच्या डोळ्यात सलत होते. सनदी नोकराना सिंहासनावरून पदच्युत झाल्यासारखें वाटत होतें. नोकरशाहीला सर्वस्वीं पराभव झाल्याच्या वेदना होत होत्या. 'कायदा आणि शिस्त' याच्या संस्थापकाना निराशा आणि पराभव यांच्या भावना त्रस्त करीत होत्या. दररोज काहीं कैदी सुटत होते. त्याच्या सन्मानार्थ मिरवणुकी निघत. लोक त्याना हारतुरे घालीत.

त्याच्या गौरवार्थ व्याख्याने होत व त्यांत जोरदार विचार मांडले जात आणि अशा रीतीनें कॉंग्रेसचे महत्त्व दिवसेंदिवस जोरानें पटवलें जात होतें. कैद्याच्या सुटकेची मागणी, जप्त केलेल्या मालाची मागणी किंवा एखाद्या सरकारी नोकराला पुन्हा कामावर लावून घेण्याची मागणी अशा तऱ्हेचा कांहींना कांहीं तगादा कॉंग्रेसचे कार्यकर्ते दररोज करीत होते. १८एप्रिल रोजीं लॉर्ड आर्विन यानीं हिंदुस्थानचा किनारा सोडला. त्याचा गांधींनीं मुंबईस निरोप घेतला. नव्या व्हाईस रॉयच्या राजवटींत सर्व अधिकारी एकदम बदलून गेले. जुने स्नेह आणि जुनीं वचनें याच्यावर हरताळ पडला गेला. सोलापूर कैद्याच्या मुक्ततेबद्दल दिलेलें तें वचन असो, स्थानबद्ध करून ठेवलेल्या कांहीं व्यक्तींच्या शिक्षे बद्दल व्यक्तिशः चौकशी करण्याचें तें वचन असो, गुजराथमधे ज्या दोन डेप्युटी कलेक्टरानीं राजिनामे दिले होते त्याना प्रॉ. फंड आणि पेन्शन देण्याची व्यवस्था करण्याचे तें वचन असो, बारडोली येथील जप्त केलेली आणि दुसऱ्याला विकून टाकलेली मालमत्ता परत देण्याविषयीं स्थानिक सरकारला स्वतः पत्र लिहिण्याविषयींचें तें वचन असो, किंवा मीरत कैद्यानीं चौकशीच्या काळांत जी कैद भोगली ती त्याच्या शिक्षेमधें जमा करण्याचें तें वचन असो; लॉर्ड आयर्विनसाहेबानीं दिलेलीं ही सर्व वचनें त्यानीं पाठ फिरवल्यावरोबर निष्फळ ठरलीं. १८ एप्रिल रोजीं त्यानीं हिंदुस्थानचा किनारा सोडला त्याच्या अधल्याच दिवशीं लॉर्ड विलिंग्डन त्यांच्या जागीं रुजू झाले होते. व्हाईसरॉयाची अदलाबदल चालू असते परंतु सेक्रेटरीएटमात्र नेहमीं स्थिर असतें. जिल्ह्यावर अधिकार गाजविणारे सनदी नोकर हेच खरे व्हॉइसरॉय आहेत. २ नोव्हेंबर १९२९ रोजीं जो पुढाऱ्याचा जाहीरनामा दिल्लीस निघाला होता, त्यात त्या दिवसापासून नोकरशाहीचें वर्तन सुधारलें पाहिजे असें म्हटलें होतें. पण एक वर्षाच्या विरोधानंतर सुद्धा इतकेंच काय परंतु गांधी अर्विन करारावर सह्या झाल्यावरही सनदी नोकराच्या प्रवृत्तींत बदल झाला नाहीं. या समेटानें आपल्या इज्जतीस मोठा धोका पोंचला आहे असेंच नोकरशाहीस वाटत होतें. सर्व ठिकाणीं त्याचा हा जळफळाट निरनिराळ्या रूपानें व्यक्त होत होता. समेटाच्या अटी अमलात येत नाहींत अशा तक्रारी कॉंग्रेस कचेऱ्यात दररोज येत होत्या. कॉंग्रेसनें मात्र आपल्याकडून समेटाप्रमाणें वागण्याची शिकस्त चालविली होती. पिकेटिंगविषयीं आणि बहिष्काराचा उपदेश करीत असता ब्रिटिश मालाचा उल्लेख न करण्याविषयीं समेटांत मुख्य निर्बंध होते. या बाबतीत

कोठे एखादी चूक होतांच सरकारचें पाहरेकरी श्वान कॉंग्रेसच्या कार्यकर्त्यांवर गुरगुरू लागत. अद्यापही कोठें कोठें होणारे लाठी हल्ले कॉंग्रेसनें मनावर घेतले नाहींत. समेटानंतर सुद्धा गुंटुर येथें पोलीसानीं आपली हौस भागवून घेतली होती. पूर्व गोदावरी प्रातात वदापल्ली येथें गोळीबार झाला. चार माणसे ठार झाली. आणि कित्येक जखमी झालीं आणि दंग्याचें कारण मात्र येवढेंच कीं एका मोटारवर गांधींचा फोटो लाविला होता आणि पोलिसांनीं त्यास हरकत घेतली. लाठीहल्ले आणि गोळीबार हा जवळ जवळ पोलिसाचा स्वभावच बनला होता. कॉंग्रेसनें समेट पत्करला त्यावेळीं तिला अतिशय मोठी आशा होती कीं, या समेटामध्यें हिंदुस्थानांतील सर्व जातींत एकोपा होईल आणि सरकारसुद्धा या बाबतींत आपणास सहाय्य करील. हिंदुमुसलमानाच्या सलोख्याचे कागद हातीं असल्याखेरीज लंडनला जाण्यापेक्षां घरींच बसलेले बरें याची गांधींनाहीं पूर्ण जाणीव होती. परंतु ९, १० आणि ११ जून १९३१ रोजीं मुंबई येथें व. कमिटीची बैठक झाली, आणि गांधी नको म्हणत असताही व. कमिटीनें असा ठराव पास केला कीं, परिषदेला जाण्याचे हे सर्व प्रयत्न यशस्वी होण्याचा संभव नसला तरी कोणच्याही निमित्तानें कॉंग्रेसविषयींचा गैरसमज टाळण्यासाठीं परिषदेंत भाग घेणें जरूर आहे. कॉंग्रेसची भूमिका स्पष्ट करण्याकरता इतर गोष्टींची अनुकूलता लक्षांत घेऊन गोलमेज परिषदेला गांधींनीं कॉंग्रेसचा प्रतिनिधि म्हणून जावें. निदान इंग्लंडमध्यें काहींतरी तडजोड होईल अशा तऱ्हेची वर्किंग कमिटीस आशा वाटत होती.

आता आपण वर्किंग कमिटीच्या जूनच्या ठरावाकडे वळूं. आपल्याच हातमागावर विणलेलें कापड विकणाऱ्या कापड व्यापाऱ्याना व विणकऱ्याना मान्यतापत्रें देण्याचा कॉंग्रेसचा क्रम काहीं दिवस चालू होता. तो उपक्रम वर्किंग कमिटीनें बंद केला. काहीं कॉंग्रेस संस्थानीं शिल्लक असलेले विलायती कापड विकण्यास परवानगी दिली होती. तोही उपक्रम त्याज्य ठरवण्यांत आला. श्री. नरिमन यानीं समेटाप्रमाणे सुटका होणें जरूर असून न सुटलेले अशा कैद्यांची यादी केली होती ती महात्माजींना सादर करण्याचें ठरलें. कापडाखेरीज इतर वस्तूंना चौकशी करून मान्यता देण्यासाठीं एक स्वदेशी बोर्ड स्थापन करावयाचें ठरलें. बंगाल व दिल्ली येथील निवडणुकीच्या बाबतींत काहीं तेढ उत्पन्न झाली

ाचाही विचार झाला आणि १८८५ पासून झालेले काँग्रेसचे ठराव हिंदींत ाषांतर करण्यासाठीं २५० रु. मंजूर करण्यात आले.

समेटाच्या बाबतींत काँग्रेसचें धोरण आत्मसंरक्षणाचें होतें. कोणचीही ढाईची चळवळ करूं नये आणि राष्ट्राच्या स्वाभिमानास कोणच्याही तऱ्हेनें मीपणाही आणूं नये असें गांधींनीं काँग्रेस कार्यकर्त्यांना बजावलें होतें. ाधींनीं खालील उपदेश केला.

" मद्रासमध्यें बंधन लादण्यात आलें कीं, ५ पेक्षां जास्त स्वयंसेवक पिके- टेंगच्या जागीं नसावेत, मी म्हणतों सध्यां हेंही कबूल करूं या. परंतु यापेक्षां ास्त आपण माघार घेऊं नये. प्रत्येक दाराशीं आपण ५ स्वयंसेवक ठेवावेत. रंतु हें नुसतें तात्पुरतें होईल. हें बंधन त्याना मागें तरी घ्यावें लागेल नाहीं ार ते जास्त वाढवावे तरी लागेल. एवढ्यावरच तें थांबणार नाहीं. समजा ाष्ट्रीय निशाणाच्या मिरवणुकीस त्यांनीं बंदी केली तर ती आपणास मान्य करतां येणार नाहीं. आपण आपला हक्क बजावलाच पाहिजे. मिरवणुकीच्या रवान्यासाठीं प्रथम अर्जही करावा आणि तोही मिळाला नाहीं तर ती बंदी आपण उठवून लावणे जरूर आहे. जेथें दर महिन्याच्या झेंडावंदनाला व नेहमींच्या सार्वजनिक सभा यांनाही बंदी होईल तेथें तर परवानगीसाठीं सुद्धां थांबण्याचें कारण नाहीं. दुबळेपणाचे प्रसंग आपण टाळले पाहिजेत व नैतिक अधःपात होणार नाहीं अशी खबरदारी घेतली पाहिजे.

करबंदीच्या चळवळीविषयीं तुम्हाला फक्त ती चालू ठेवता येईल. लोकांनीं आपणहूनच ती चळवळ हातीं घेतली पाहिजे आणि आपले साथी- दार जमवले पाहिजेत. म्हणजे मग आर्थिक चळवळ ठरेल. आणि जेथें त्या चळवळीस आर्थिक प्रश्नाचे स्वरूप येतें तेथे लोक आपोआप एकत्र होतात.

सरकारनें सुद्धा खूप सहानुभूति दाखविण्याचा क्रम सुरू ठेवला होता. लॉर्ड विलिंग्डन अत्यंत मधुर शब्दाचा वर्षाव करीत होते.

परंतु त्याच्या मधुर वचनाचा अनुभव येण्याचा संभव नाहीं हें लवकरच अनुभवास आलें. जुलै महिन्याच्या पहिल्या आठवड्यांत गांधींनाही हा संशय येऊं लागला. सुलतानपूर येथें १०७ कलमाखालीं ९० माणसावर खटले कर- ण्यांत आले. भवानशहापूर येथें कुळांना राष्ट्रीय निशाण घरावरून काढून टाकण्यास तालुकदारानीं सांगितलें आणि त्यांनीं नाकारतांच तालुक्दार त्यांना

बद्दल लॉर्ड आयर्विन यांनीं नक्की वचन दिलें होतें. तरीसुद्धा त्यांची सुटका केली नव्हती.

परंतु या सगळ्यापेक्षा सरकारनें अतिशय मोठा समेटभंग बार्डोलीच्या बाबतींत केला. बारडोली तालुक्यात करबंदीची चळवळ होती. त्या तालुक्यात एकंदर जमीनमहसूल २२ लाख रुपये येणे होता. त्यापैकी २१ लाख रुपये वसूल झाले होते. या बाबतींत गांधींनीं केलेली तक्रार आणि सरकारनें त्यांस दिलेले उत्तर खाली दिलें आहे.

**गांधींची तक्रार**—चालू येण्यापैकीं २२ लाखांतील २१ लाख रुपये वसूल झाले आहेत. ही सर्व वसुली कॉंग्रेसच्या कार्यकर्त्यांमुळें झालेली आहे, यात शंका नाहीं. ज्यावेळीं वसुलीला सुरवात होई त्यावेळीं चालू पट्टी आणि मागिल बाकी या दोन्हींची मागणी शेतकऱ्यांजवळ केली जात असे. पण चालू पट्टीसुद्धा आपणास देणें शक्य नाहीं असें बहुतेक देणेकऱ्यानीं सांगितलें. नाहीं हो करता करता अधिकारी लोक शेवटीं वसुलाचे पैसे स्वीकारीत आणि चालू वसुलापैकीं पावती देत. ज्याना पैसे देणें शक्य नाहीं त्याच्याजवळ मागील बाकी किंवा चालू देणे मागणें हें वचनभंग करण्यासारखें आहे. ज्याअर्थी धान्याचे भाव एकदम उतरल्यामुळें मागील योग्य देणें माफ करण्यात आलें होतें त्या अर्थी अडचणीच्या कारणासाठींच योग्य नसलेल्या बाबतींतसुद्धां तें धोरण असणें वाजवी होतें. कारण बाकी थकलेले लोक सविनय कायदेभंगाच्या चळवळींत गुंतलेले असल्यामुळें व भाव उतरल्यामुळें झालेल्या नुकसानीबरोबरच स्थलांतरामुळेंही जास्त डबघाईस आले होते. कायदेभंगाच्या चळवळीच्या वेळीं बारडोली येथील कांहीं शेतकऱ्यानीं आपली शेतवाडी सोडून बडोदा संस्थानच्या हद्दींत स्थलांतर केलें होतें, हें वाचकाच्या स्मरणात असेल. वरील शेतकऱ्यांचें झालेलें नुकसान मोजदाद करुन सरकारला कळविण्यात आलें होतें आणि ज्या बाबतींत अधिकाऱ्याना शंका आली त्याची पुन्हां चौकशी करण्याचेंही कॉंग्रेसच्या कार्यकर्त्यांनीं कबूल केलें होतें. कॉंग्रेसचे कार्यकर्ते ज्या गोष्टीचा तिरस्कार करतात त्या म्हणजे जुलूमजबरदस्ती, दंड आणि लोकांच्या घराभोंवतीं गराडा घालणाऱ्या पोलिसाचा देखावा ह्या होत.

**मुंबई सरकारचें उत्तर** :—पैसे देण्याचें सामर्थ्य नाहीं असें सांगणाऱ्या लोकांकडे मागील बाकी किंवा चालू देणें याची मागणी

करणें हा विश्वासघात आहे असें म्हणतां येणार नाहीं. कारण पैसे देण्याची आवश्यकता सिद्ध केली पाहिजे ती नुसती सांगून चालणार नाहीं. या वर्षीच्या योग्य बाकीप्रमाणें अयोग्य बाकयाचाही विचार करावा, या म्हणण्यात काहीं अर्थ नाहीं. ज्या वेळीं पिकें अंशतः किंवा पूर्णपणें बुडतात आणि शेतकऱ्याना नेहमींच्या वेळीं पैसे देता येत नाहींत त्याच वेळीं सरकारी माफी मिळते. त्याच वेळीं बाकी ठेवण्यास सरकार परवानगी देतें. बारडोली तालुक्यातील जी बाकी शिल्लक ठेवण्यास सारकारनें मान्य केलें नव्हतें ती पिकाच्या नुकसानमुळें राहिलेली नाहीं, तर सविनय कायदेभंगाच्या चळवळीच्या तत्वासाठीं शेतकऱ्यानीं कर देण्याचें नाकरल्यामुळें राहिलेली आहे. एखाद्या व्यक्तीला कर देण्याचें सामर्थ्य आहे किंवा नाहीं हा वैयक्तिक चौकशीनें ठरविण्याचा प्रश्न आहे. माफीला योग्य अशा बाबतींत कलेक्टरनें योग्य तो विचार केला आहे हें उघड दिसून येतें. कारण जवळ जवळ १८ हजार रुपयाची सूट कलेक्टरनें दिली आणि १९०० रुपयापर्यंत सारामाफी करण्यात आली आहे. कर वसूल करीत असतां प्रत्यक्ष पोलीसाचा कधींही उपयोग करण्यात आला नाहीं. ज्या ठिकाणीं करवसुलीला जाताना अधिकाऱ्याना थोडीशी धास्ती वाटत होती अशा ठिकाणीं वेळप्रसंगीं केवळ संरक्षण म्हणून पोलीसांना नेलें होतें. मामलेदार किंवा वसुली करणारा मुख्य अधिकारी याच्या शरिराचें संरक्षण करणें, जप्तीचा प्रसंग आल्यास जप्त झालेल्या घरावर राखण करणें आणि एखाद्या ठिकाणीं पैसे न देणाऱ्या इसमाला बोलावताना खेड्यातील हलक्या नोकराबरोबर स्वतः जाणें येवढेंच काम पोलीसाकडे होतें.

या सर्व तक्रारी जुलैच्या दुसऱ्या आठवड्यात गांधी सिमल्यास गेले त्यावेळीं हिंदुस्थानसरकारपुढें मांडण्यात आल्या होत्या. पुढल्या दहा दिवसात झालेल्या घडामोडी अतिशय अनपेक्षित होत्या. बारडोलीहून गांधींनीं थेट सुरतेच्या कलेक्टरला पत्र लिहिलें आणि त्या पत्राची एक प्रत मुंबई सरकारला पाठविली, त्यावर मुंबई सरकारचें उत्तर अतिशय निराशाजनक आलें. सिमल्याहून मुंबईसरकारला पाठिंबा मिळाला होता. नंतर गांधींनीं स्वतंत्रपणें चौकशी करण्याचा प्रश्न उपस्थित केला. या बाबतींत झालेला पत्रव्यवहार साराशानें खालीं दिला आहे.

१४ जून १९३१ रोजीं बोरसद येथून हिंदुस्थान सरकारचें गृहमंत्री मि. एच्. डब्ल्यू. एमरसन याना गांधींनीं पत्र पाठविलें कीं, स्थानिक सरकारच्या

बावतींत मध्यस्थी करणें आपणास शक्य नसेल किंवा आपल्या मध्यस्थीनें मला वाटतें तशी माझ्या कल्पनेप्रमाणें तडजोड होणेंही शक्य नसेल तर समेटाचा बरोबर अर्थ लावण्या साठीं एक स्वतंत्र चौकशी कमिटी नेमण्याची वेळ आली आहे असे मला वाटतें.

१६ जून रोजीं इमरसन साहेबाचें उत्तर आलें. त्या उत्तरास २० जून १९३१ रोजीं गांधींनीं उत्तर पाठविलें कीं—

" आपल्या उत्तरात पिकेटिंगबद्दलचा मद्रास सरकारच्या वृत्तांताचा इतिहास वाचला. परंतु विश्वसनीय अशा तेथील कार्यकर्त्यांकडून त्यानीं प्रत्यक्ष पाहिलेली मला जी हकीगत कळते तिच्यामुळें आपणास कळत असलेल्या हकीगतीवर माझा विश्वास बसत नाहीं. परंतु ह्यामुळें चालू प्रश्नाचा निकाल लागत नाहीं हें मी जाणतों. या सर्व प्रश्नाची चौकशी करण्यासाठीं सरकारनें आणि कॉंग्रेसनें नेमलेल्या प्रतिनिधींची चौकशीकमिटी नेमावी असा आपण स्थानिक सरकारला सल्ला द्याल काय? शांततामय पिकेटिंगचे नियम ज्या ठिकाणीं मोडले गेल्याचें कमिटीला दिसून येईल त्या ठिकाणीं पिकेटिंग पूर्णपणें थाबवावें. परंतु त्याचबरोबर शांततामय पिकेटिंग चालू असताही जेथें जुलूम जबरदस्ती चालू आहे तेथें ती बंद करण्याचीही सरकारची तयारी असली पाहिजे. माझी सूचना आपणास पसंत नसेल तर यापेक्षा चांगली अशी एखादी ग्राह्य योजना आपण कदाचित् सुचवूं शकाल. दरम्यान आपण आपल्या पत्रात केलेल्या आक्षेपाची मी चौकशी करीत आहे. " या पत्राचें ४ जुलै रोजीं उत्तर आलें तें साराशानें खालीं दिलें आहे. गृहमंत्री लिहितात—"१४ जून रोजीं आपण पाठविलेल्या पत्रात आपण असें सुचविलें कीं, तडजोडींच्या अटींचा अर्थ लावण्याकरिता एक लवाद नेमण्याची कदाचित् वेळ आली असावी आणि २० जून रोजीं पाठविलेल्या पत्रात आपण हिंदुस्थानसरकारनें प्रांतिक सरकारला त्याचा एक व कॉंग्रेसचा एक असे पंच नेमण्याचा सल्ला द्यावा असें म्हटलें आहे. कॉंग्रेसनें शांततेच्या पिकेटिंगचा नियम मोडला असला तर पिकेटिंग थाबवावें व सरकारनें निष्कारण खटले केले असले तर ते काढून घ्यावें असें आपलें म्हणणें. आपली सूचना मान्य करून भांडणाचें मूळ काढून टाकावें ही आपली कल्पना स्तुत्य आहे.ज्या ठिकाणीं नेहमींच्या कायद्याला सोडून पिकेटिंग चालू होतें तेथेंच पिकेटिंग करणाऱ्या स्वयंसेवकावर पोलीसानीं खटले भरले.

आपल्या सूचनेचा एक परिणाम असा होईल कीं कायदा अंमलांत येण्यापूर्वीं आपण सुचविलेल्या संयुक्त कमिटीकडून त्याची चौकशी होईल आणि त्यांच्या निर्णयावर पुढील गोष्टी अवलंबून राहतील. दुसऱ्या शब्दात सांगावयाचें म्हणजे कायद्याची अंमलबजावणी करण्याचें काम वरील कमिटीच्या सभासदाकडे दिलें जाईल. त्या सभासदामध्ये वैय्यक्तिक मतभेद होतील. पण पोलिसाना मात्र अगदीं कायद्यावरहुकूम वर्तन करणे जरूर आहे. या बाबतींतील त्याच्या कर्तव्यात कोणच्या तऱ्हेने फेरबदल व्हावा असा समेटात हेतु नव्हता. आणि तसें होणें व्यवहार्यही नाहीं.

अशा ठिकाणीं कायदा पाळला गेला आहे कीं नाहीं हें ठरविण्याची व्यावहारिक कसोटी म्हणजे वरील खटल्यांचा त्या त्या कोर्टांनीं केलेला निर्णय ही होय. आणि जर त्या कोर्टांचे निर्णय अपिलामध्यें फेटाळले गेले नसतील तर त्याचे निर्णय हेंच प्रमाण धरावयास पाहिजेत. त्या निर्णयावरून पिकेटिंगमध्यें सामान्य कायद्याचा भंग होत आहे आणि समेटातल्या मुख्य अटीप्रमाणें पिकेटिंग तावडतोब बंद करावयास पाहिजे हेंही ठरेल. आपल्या पहिल्या सूचनेत वर दाखविलेली अडचण कायम लवादमंडळाच्या बाबतींतही उत्पन्न होणे षक्य आहे. समेटानें कॉंग्रेसवरची लादलेली जबाबदारी प्रचालेत कायद्याच्या क्षेत्रांत येणाऱ्या गोष्टीसंबंधाचीच आहे. प्रत्येक व्यक्तीचें कार्यस्वातंत्र्य आणि राज्यपद्धतीची अंमलबजावणी याविषयींचेच निर्बंध समेटांत कॉंग्रेसनें मान्य केले आहेत. याचाच अर्थ असा होतो कीं, त्या बाबतींत झालेल्या कोणच्याही चुकाची या किंवा त्या स्वरूपात प्रतिक्रिया होणें शक्य आहे. एखाद्या व्यक्तीनें सामान्य कायदा मोडला तर त्याचे परिणाम पिकेटिंगप्रमाणेंच होतील. जर सररहा कायदा मोडला गेला तर कायदा व सुव्यवस्थेच्या धोरणाचा प्रश्न येईल. तसेंच सुव्यवस्थित राज्यकारभार चालविण्याचाही प्रश्न येईल. आणि त्या बाबतींत सरकार आपलें स्वातंत्र्य मर्यादित करून लवादमण्डळावर अवलंबून रहाणार नाहीं. मला असें वाटतें कीं, समेटाची अंमलबजावणी परस्पराच्या विश्वासावर अवलंबून आहे. सरकारच्या बाजूनें असें सागता येईल कीं, समेटाच्या अटी सरकार कसोशीनें पाळीत आहे आणि मिळालेल्या माहितीवरून असें दिसतें कीं स्थानिक सरकारही त्या अटी पूर्णपणें पाळीत नाहीं ? काहीं संशयास्पद गोष्टी उत्पन्न होणे अगदीं अपरिहार्य आहे आणि त्या बाबतींत अतिशय काळजीपूर्वक चौकशी कर-

ण्याचीहि स्थानिक सरकारची तयारी आहे. अशा ज्या कांहीं संशयास्पद गोष्टी हिंदुस्थान सरकारला कळत आहेत त्या स्थानिक सरकारच्या नजरेस जरूर आणण्यात येतील आणि अवश्य असल्यास त्याच्या सत्यासत्यतेबद्दल हिंदुस्थान सरकार स्वतःचीहि खात्री पटवून घेईल.

२१ जुलै १९३१ रोजीं गांधींनी गृहमंत्र्याना पाठविलेल्या पत्राचा सारांश खालीलप्रमाणें आहे:—

गांधी लिहितात:—"समेटाचा अर्थ ठरविण्यासाठीं नेमावयाच्या लवाद-मंडळाची माझी योजना मी येथें नमूद करीत आहे. विशेषतः खालील गोष्टींबद्दल मतैक्य होणें जरूर आहे.

( १ ) पिकेटिंगमध्यें दारू-दुकानावरील पिकेटिंग आणि दारूमक्त्याच्या लिलांवावरील पिकेटिंग याचा समावेश होतो कीं नाहीं ?

( २ ) ज्या दुकानावर पिकेटिंग करावयाचें त्या दुकानाच्या टप्प्यात स्वयंसेवकांना उभे राहता येऊं नये इतक्या अंतरावरून पिकेटिंग करण्याचा निर्बंध घालण्याचा अधिकार प्रांतिक सरकारास आहे काय ?

( ३ ) ज्या दुकानावर पिकेटिंग करावयाचें तेथील सर्व प्रवेशद्वारांवर स्वयं-सेवक असूं शकणार नाहींत अशा रीतीनें त्याची संख्या मर्यादित करण्याचा अधिकार सरकारला आहे काय ?

( ४ ) परवाना नसलेल्या जागीं आणि भलत्या वेळीं दारूविक्री कर-ण्याची दुकानदाराना परवानगी देऊन अशा रीतीनें शांततामय पिकेटिंगचा उद्देश हाणून पाडणें हें सरकारला योग्य आहे काय ?

( ५ ) काहीं खटल्यांचा विचार करताना समेटातील कलम १३ व १४ याचा प्रांतिक सरकारनें जो अर्थ लावला त्याचा वरील कलमात समावेश होत नाहीं व कॉंग्रेसनें त्या कलमांचा अर्थ निराळा घेतला आहे.

( ६ ) कलम १६ ( अ ) यातील 'परत' Return या शब्दाचा अर्थ.

( ७ ) सविनय कायदेभंगाच्या चळवळींत भाग घेतल्याबद्दल ज्याच्या बंदुकाचे परवाने रद्द करून त्या काढून घेण्यात आल्या त्या परत करण्याचा समेटात समावेश होतो कीं नाहीं ?

( ८ ) ९ व्या वटहुकुमाप्रमाणें जप्त केलेली मालमत्ता आणि कर्नाटकांतील वतन जमिनी परत करण्याचा समेटांत समावेश होतो कीं नाहीं ? आणि त्या

परत करतांना त्यावर काहीं अटी लादण्याचा सरकारला अधिकार आहे काय ?

( ९ ) कलम १९ मधील Permanent या शब्दाचा अर्थ.

( १० ) सविनय कायदेभंगाच्या चळवळींत भाग घेतलेल्या विद्यार्थ्यांना एखाद्या शाळेंत प्रवेश मिळण्यापूर्वीच त्याच्यावर कांहीं अटी लादण्याचा शिक्षण-खात्यास अधिकार आहे काय ? किंवा सविनय कायदेभंगाच्या चळवळीच्या काळात जीं कायमचीं बंधनें लादलीं होतीं त्या बंधनाच्या आधारावर त्याना शाळेंत प्रवेशच नाकारणे योग्य आहे काय ?

( ११ ) पेन्शन बंद करणें किंवा म्युनसिपालिटीची ग्रँट वगैरे बंद करणें अशा तऱ्हेची शिक्षा अनुक्रमें एखाद्या व्यक्तीला किंवा संस्थेला त्यांनीं सविनय कायदेभंगाच्या चळवळींत भाग घेतला होता या कारणासाठीं करणें न्याय्य आहे काय ?

लवादापुढें किंवा चौकशी मंडळापुढें मांडावयाच्या गोष्टी फक्त इतक्याच आहेत असें नाहीं. पुढें कदाचित् अनपेक्षित कारणें उत्पन्न होतील आणि त्यांचा समेटातच समावेश होईल.

या गोष्टींचा निर्णय करण्याची पद्धति म्हणजे कॉंग्रेसनें व सरकारनें आप-आपलीं लेखीं विधानें वरील मंडळापुढें माडावींत व त्या मंडळाचा किंवा लवादाचा निर्णय दोघानींही मान्य समजावा.

मी तर अशी आशा करतों कीं, लवादाच्या मध्यस्तीची जरूरही न ठेवता आपणच सर्व मतभेदाचे मुद्दे व्यवस्थित करून मिटवून टाकावेत. "

३० जुलै १९३१ रोजीं व्हाइसरॉयच्या गृहमंत्र्याकडून गांधींना पत्र आलें. त्यातील महत्त्वाचा भाग असा होता—

" व्हाईसरॉयशीं झालेल्या मुलाखतींत काहींशीं चर्चा केल्यानंतर व्हाइसरॉय साहेबानीं आपणास असें सुचविलें कीं, लवादापुढें माडण्यास योग्य असे जे काहीं महत्त्वाचे प्रसंग आपणास आढळले असतील ते आपण कळवावेत आणि ते कळल्यावरोबर हिंदुस्थान सरकार आपल्या सूचनेचा विचार करील.

आपण आता समेटाच्या अटींचा अर्थ लावण्याकरता लवाद नेमा असें म्हणता पण ४ जुलैच्या पत्राप्रमाणें ही आपली सूचना मान्य करता येत नाहीं. जीं काहीं उदाहरणें लवाद नेमून त्याच्यापुढें निर्णयाकरिता माडावी असें म्हटलेंत त्याचाहि लक्षपूर्वक विचार केला. व ज्याचा मस-

खुलासा होणे जरूर आहे, असे आपण दिलेले ११ मुद्देही वाचले. त्या अर्थाचा एखाद्या लवादानें केलेला निर्णय मान्य करणें म्हणजे सरकारची जबाबदारी व मूलभूत कार्यें हींच ( लवादापुढें ठेवून ) त्या निर्णयांत गुंतवण्यासारखीं आहेत.

ज्या योजनेमुळें प्रचलित कायदे थोपवले जातील किंवा राज्यपद्धतींच्या यंत्रास अडथळा होईल किंवा राज्यपद्धतींवर परिणाम करणारे असे निर्णय करण्याची जबाबदारी एखाद्या बाहेरच्या लवादाच्या अधिकारावर सोंपवावी लागेल किंवा प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्षपणें एखाद्या जादा पद्धतीच्या फायद्यावर कॉंग्रेसच्या सभासदांना अधिकार सागता येईल आणि ज्या पद्धतींत जनतेला काहीं अधिकार रहाणार नाहीं आणि जी न्यायकोर्टांच्या न्यायाधिकारावर आणि निर्णयावर अतिक्रमण करील अशा तऱ्हेची कोणचीही योजना पत्करणे सरकारला शक्य होणार नाहीं. हे आपल्याही लक्षात सहज येईलच. ५ मार्च रोजीं झालेल्या समेटात अशा तऱ्हेच्या कोणत्याही योजनेचा उद्देश डोळ्यासमोर नव्हता.

पिकेटिंगच्या बाबतींतही काहीं गोष्टींचा मुद्दाम विचार करावा कीं नाहीं हें त्या त्या गोष्टींच्या विशिष्ट परिस्थितींवर अवलंबून आहे आणि त्या बाबतींत एक्झिक्यूटिव्ह किंवा ज्यूडिशिअल अधिकारी याची कायद्याचे संरक्षण करण्याची जबाबदारी कोणत्याही तऱ्हेनें बदलविली जाईल किंवा त्या त्याच्या अधिकारावर परिणाम होईल किंवा वैयक्तिक स्वातंत्र्यास बाध येईल अशा तऱ्हेचा कोणचाही सामान्य स्वरूपाचा निर्णय मान्य करणें सरकारला शक्य नाहीं. स्थानिक अधिकारी आपण सागतां त्या मार्गानें अबकारीचे कायदे उल्लंघन करीत आहेत, अशा तऱ्हेची कोणतीही हकीगत हिंदुस्थानसरकारच्या कानावर आली नाहीं. अबकारीचा प्रश्न प्रांतिक सरकारच्या कक्षेमधला आहे. तेव्हां त्या बाबतींतलें धोरण ठरविण्याचा अधिकार असलेलें एखादें लवाद उभारणें हें व्यवहार्य ठरणार नाहीं. आपल्या पत्रातील दहा आणि बारा हे मुद्दे अगदीं स्वतंत्र परंतु महत्वाचा मुद्दा उपस्थित करणारे आहेत. समेट ठरविताना झालेल्या संभाषणात त्याची चर्चा झालेली नव्हती. तेव्हा त्याचा विचार आता एखाद्या लवादाच्या हातीं सोपविणें म्हणजे समेटाचें क्षेत्र मुळापेक्षा व्यापक करण्याचा अधिकार, मुळ हेतू बदलून टाकण्याचा अधिकार, आणि तेंही सरकारच्या संमतिवाचून, एखाद्या लवादाला असतो असें एक नवीन तत्व मान्य करण्यासारखें आहे.

या सर्व उदाहरणांवरून सरकारला असें वाटत आहे कीं नुसता समेटाच्या अटींचा अर्थ ठरविण्यासाठींच नेमलेल्या लवादाच्या मार्गांत सुद्धां अनुल्लंघनीय अडचणी आहेत. एखादी गोष्ट अर्थनिर्णयाच्या कक्षेतली आहे कीं नाहीं याबद्दल नेहमीं मतभेद माजतील आणि अशा रीतीनें या लवादाच्या योजनेनें जुन्या अडचणी दूर होण्याऐवजीं नवीनच उत्पन्न होतील.

"समेटातील ज्या सवलतींचा इनकार करण्यांत आला आहे असा आक्षेप आहे त्याची एक यादी आपण सिमल्यास मजजवळ दिली होती. ती यादी थोड्याच दिवसानीं स्थानिक सरकारकडे खऱ्या गोष्टी इकडे कळविण्यासाठीं पोंचविण्यांत आली होती. ती सर्व माहिती मिळाल्यावर समेटातील अटींचें उल्लंघन झालें आहे कीं नाहीं या विषयीं सरकार आपली खातरजमा करून घेईल. याचप्रमाणें समेटाच्या बाबतींत पुढें जें उल्लंघनाक्षेप येतील त्या बाबतींतही सरकार आपली खात्री करून घेण्यास तयार आहे. कारण समेट पूर्णपणें पाळणें हा आपल्या इभ्रतीचा प्रश्न आहे, असें सरकारला वाटतें आणि आपणही तसेंच समजता याबद्दल मला संशय नाहीं. या मनोभूमिकेनें सर्व गोष्टी पाहिल्या म्हणजेच संकटातून मार्ग सापडेल. तो लवादाच्या मार्गानें सापडणार नाहीं असें सरकारास वाटतें."

संयुक्त प्रातात खंडकऱ्यावरचे जुलूम अद्यापही चालू होते. तेथील कुळाविषयीं संयुक्त प्रांतातील वकिलाना फार चिंता लागली होती. त्यात पंडित मदन मोहन मालवीय सुद्धा होते. संयुक्त प्राताचे गव्हर्नर सर माल्कम हेले याना गांधींनीं याविषयीं एक तार पाठविली होती. त्या तारेचें उत्तर अतिशय निराशाजनक आलें. सगळीकडून तक्रारींचा वर्षाव होत होता अशा स्थितींत ११ आगस्ट १९३१ रोजीं व्हॉईसरॉयाना खालील तार करणें गांधींना भाग पडलें.

"मुंबई सरकारचें आलेलें पत्र पाहून माझें लंडनला जाणें अशक्य झालें आहे हें कळविण्यास मला अतिशय खेद होतो. तक्रार करणारे लोक आणि सरकार यांच्यामध्यें जो करार झाला आहे त्या बाबतींत उत्पन्न होणाऱ्या मतभेदाच्या किंवा विरोधाच्या बाबतींत न्याय देणें आणि शिक्षा करणें हे दोन्ही अधिकार सरकारनेंच आपल्याकडे ठेविले आहेत असें दिसतें. कॉंग्रेसला हें परकरणें अगदीं अशक्य आहे. मुंबई सरकारकडून आणि सर माल्कम हेले यांच्याकडून आलेल्या उत्तरावरून आणि संयुक्त प्रात, वायव्य सरहद्दप्रात आणि इतर प्रात

यांमध्यें चालू असलेल्या दडपशाहीचे वृत्तांत ऐकून कबूल केल्याप्रमाणें मी विलायतेस जाऊं नये असाच या सर्व प्रकाराचा अर्थ आहेसें मला वाटतें. शेवटला निर्णय ठरविण्यापूर्वी या सर्व गोष्टी आपणास कळवाव्यात यासाठीं मीं वरील हकीकत आपल्या नजरेस आणिली आहे. आपलें उत्तर येईपर्यंत मीं कांहींही जाहीर करीत नाहीं."

१३ ऑगस्ट १९३१ रोजीं व्हॉइसरॉयानीं गांधींना उत्तर पाठविलें कीं "आपण दिलेलीं कारणें मला स्वीकार्य वाटत नाहींत. सरकारच्या धोरणावरून आपला गैरसमज झाला आहे. त्यामुळें वरील गैरविचार आपल्या मनात उत्पन्न होतात असें मला खात्रीपूर्वक वाटतें. संयुक्तप्रांताविषयींच्या सर्व शंका सर माल्कम हेले याच्या सहा तारखेच्या तारेनें दूर व्हावयास पाहिजे होत्या आणि गुजराथ विषयींचे आपले आक्षेप सर अर्नेस्ट हॉटसन याच्या प्रा. सेक्रेटरीनें १० ऑगस्ट रोजीं पाठविलेल्या पत्रातील चौथ्या पॅरिग्राफमुळें दुरुस्त व्हावयास पाहिजे होते. ३१ जुलै रोजीं मी स्वतः आपणास जें पत्र पाठविलें त्यामध्यें मी आपणास असें आश्वासन दिलें होतें कीं, समेटाविषयींच्या प्रत्येक गोष्टीविषयीं मी व्यक्तिशः कळकळ बाळगीत आहे. आणि भोंवतालच्या कांहीं गोष्टींविषयींच्या कलहावरून आपल्या जाण्यास बाध येणार नाहीं, अशी मला आशा होती. तुमच्या आणि माझ्याही आयुष्यापलीकडचें इतकें देशाचें दीर्घकालीन भवितव्य ज्या भावी शासनपद्धतीनें ठरविलें जाईल, त्या शासनपद्धतीच्या अत्यंत महत्त्वाच्या चर्चेत भाग घेण्यासाठीं आपण जाणार आहा. परंतु जर आपल्या तारेवरून शेवटचा निर्णय व्यक्त होत असेल तर आपण परिषदेला येऊं शकत नाहीं असें मी मुख्य प्रधानाना तावडतोब कळवीन.

## गांधींचें शेवटचें उत्तर "नकार"

१३ आगस्ट १९३१

आपल्या तारेंतील आश्वासनाबद्दल आभारी आहे. जर भोंवतालच्या घडामोडींत समेटाशीं विसंगत असें आपणास कांहीं दिसत नसेल तर समेटाकडे पाहाण्याच्या आपल्या दोघांच्या दृष्टिकोणातच मूलभूत फरक आहे असें दिसतें. तेव्हा या स्थितींत मला माझा निश्चय कायम करण्यापलीकडे कांहीं मार्ग दिसत नाहीं. मी लंडनला जाण्याचा आटोकाट प्रयत्न केला परंतु मला यश आलें नाहीं एवढेंच मी म्हणूं शकेन. मुख्य प्रधानाना आपण त्याप्रमाणें कळवावें. सर्व पत्रव्यवहार व तारा मी प्रसिद्धीसाठीं पाठवीत आहे."

## व्हॉइसरॉयची तार

सिमला १४ आगस्ट १९३१.

" आपला निश्चय मुख्य प्रधानाला कळवला. मी सर्व पत्रव्यवहार आज दुपारीं ४ वाजतां प्रसिद्धीसाठीं पाठवींत आहे. अर्थात् आपणही ते करण्यास मोकळे आहांत. "

गोलमेजपरिषदेत भाग घेण्याच्या मार्गांत कांहीं तरी विघ्नें येतील अशी जून महिन्यापासूनच भीति वाटत होती. परंतु सर्व गोष्टी कदाचित् सुरळीत होतील अशीही सर्वांना आशा वाटत होती. आणि ही आशा अगदींच निराधार होती असे नव्हे. परंतु समेटाची पायमल्ली मुकाट्यानें पहात राहणेंही कॉंग्रेसला शक्य नव्हते.

गांधी व्हाइसरॉय पत्रव्यवहार चालू होता. त्याचवेळीं मुंबई सरकार, संयुक्तप्रांत सरकार व कॉंग्रेसचें कार्यकारी मंडळ हींसुद्धां आपापलीं कामें करीतच होतीं. २० जुलै रोजी वर्किंग कमिटीची बैठक झाली, आणि हिंदी-ब्रिटिश आर्थिक व्यवहाराविषयींचा रिपोर्ट प्रसिद्धीसाठीं मंजूर करण्यांत आला. मच्छलीपट्टण येथें मूलभूत-हक्क कमिटीची बैठक झाली आणि तिनें आपला रिपोर्ट तयार केला, तो ऑ. इं. कॉ. कमिटीपुढें ठेवावा असे वर्किंग कमिटीनें ठरविलें. हिंदुस्थान सेवादलाचा कॉंग्रेसशीं कोणता संबंध आहे याविषयीं कांहीं गैरसमज होते ते दूर करण्यात आले. सेवादल हें कॉंग्रेसचा मध्यवर्ति स्वयं-सेवकसंघ आहे असें मान्य करण्यात आलें. त्याचें कार्य वर्किंग कमिटीच्या किंवा तिनें नेमलेल्या व्यक्तींच्या प्रत्यक्ष देखरेखीखालीं चालावें असें ठरलें. प्रांतिक कोंग्रेस कमिट्यांनीं आपापले स्वयंसेवक संघ काढावेत, त्याचे सर्व स्वयंसेवक कॉंग्रेसचे सभासद असले पाहिजेत आणि मध्यवर्ति स्वयंसेवक संघाचे नियम त्यांनीं पाळले पाहिजेत असे ठरलें. सेवादलाची पहिली अखिल भारतीय परिषद कोकोनाडा येथें झाली. डॉ. हर्डीकर यांच्या नेतृत्वाखालीं त्याचे कार्य अत्यंत उत्कृष्ट तऱ्हेनें चाललें होतें. अशा रीतीनें स्वराज्य-प्राप्तीच्या कॉंग्रेसच्या ध्येयाशीं व मार्गाशीं सेवादल समरूप करून घेण्यात आलें

जातिभेदाच्या प्रश्नाविषयीं एक तडजोडीची योजना जाहीर करण्यांत आली. वर्किंग कमिटीनें खालील पत्रक प्रसिद्ध केलें :—

राष्ट्रीय सभेनें अगदी प्रथमपासून शुद्ध राष्ट्रीयत्वाचें ध्येय आपल्या डोळ्यांसमोर ठेवलें आहे. त्या ध्येयाच्या मार्गात पुष्कळ वेळां पराभव झाला असला तरी ते ध्येय कायम आहे. जातिबंध तोडण्याचा कॉंग्रेसनें कसून प्रयत्न केला आहे. लाहोर येथें झालेला खालील ठराव हा राष्ट्रीयत्वाच्या प्रगतिपथावरील अत्यंत महत्त्वाचा मुद्दा होता.

" नेहरू रिपोर्ट **रद्द झाल्यामुळें** आतां कॉंग्रेसनें आपलें जातिविषयक धोरण जाहीर करण्याची आवश्यकता नाहीं. कारण स्वतंत्र हिंदुस्थानात सर्व जातिविषयक प्रश्न शुद्ध राष्ट्रीयत्वाच्या दृष्टीनेंच सोडवलें जातील. परंतु ज्या अर्थीं मुसलमानानीं, व विशेषतः शीखानीं नेहरू रिपोर्टांतलि जातिविषयक धोरणाबद्दल नापसंति व्यक्त केली त्या अर्थीं ही कॉंग्रेस त्याना व इतर अल्पसंख्यांकाना असें आश्वासन देत आहे कीं, या पक्षाना पूर्ण समाधानकारक नसेल अशी कोणचीही राज्यपद्धति कॉंग्रेसकडून स्वीकारली जाणार नाहीं.

म्हणून यापुढें जातिविषयक प्रश्न सोडविण्याची कोणचीही खटपट कॉंग्रेसनें करूं नये असें ठरलें आहे. परंतु देशातील अत्यंत महत्त्वाची परिस्थिति लक्ष्यात घेता वर्किंग कमिटीनें खालील योजना तयार केली आहे.ती बाह्यरूपात जातिविषयक दिसत असली तरी ती जास्तींतजास्त राष्ट्रीय स्वरूपाचीच आहे आणि सर्व जातींना स्वीकारणीय आहे.

१ (अ) मूलभूत हक्कासंबंधीचा जो प्रश्न आहे त्यात ज्या त्या जातीची संस्कृति, भाषा, लिपी, शिक्षण, व्यवसाय, धर्माचरण, व धार्मिक संस्था हीं कायम टेवण्याची हामी घेतली आहे.

(ब) राज्यघटनेमध्यें विशिष्ट व्यवस्था करून व्यक्तिविषयक कायद्याचें संरक्षण केलें जाईल.

( क ) अल्पसंख्याकाचे निरनिराळ्या प्रांतातील राजकीय व इतर हक्क जे असतील त्याचा फेडरल सरकारच्या न्यायकक्षेंत समावेश होईल.

२ सर्व प्रौढ स्त्रीपुरुषाना मतदानाचा हक्क असेल. प्रौढ स्त्रीपुरुषांना मतदानाचे हक्क याचा स्पष्ट अर्थ असा कीं, कोणच्याही परिस्थितींत मतदानाच्या हक्काची वाटणी समानतेनें होईल व मतदान इतकें व्यापक होईल कीं लोकसंख्येच्या प्रमाणात प्रत्येक जातीला प्रतिनिधित्व मिळवितां येईल.

३ (अ) हिंदुस्थानच्या भावी राज्यघटनेंतील प्रतिनिधित्वाचें मुख्य तत्व **संयुक्त मतदारपद्धति** हे असेल.

(ब) सिंधमधील हिंदूकरता, आसाममधील मुसलमानाकरिता, पंजाब व वायव्यसरहद्दप्रांत येथील शीखाकरिता आणि ज्या प्रांतात हिंदूंचें व मुसलमानाचें लोकसंख्येशीं शें. २५ पेक्षा कमी प्रमाण असेल तेथील हिंदुमुसलमानांकरितां, फेडरल व प्रांतिक कायदेमंडळात लोकसंख्येच्या प्रमाणात राखीव जागा देण्यात येतील, व अधिक जागाकरतां निवणुका लढावता येतील.

४ सर्व पक्षातील अशा पाब्लिक सार्व्हिस कमिशनकडून सर्व नेमणुका होतील. तें कमिशन किमान लायकीचें प्रमाण ठरवील. आणि सार्वजनिक सेवेविषयीं तें योग्य कळकळ दाखवील. तसेंच देशसेवेचा पुष्कळसा भाग उचलण्याची सर्व जातींना सारखीच संधि मिळेल अशीही खबरदारी तें कमिशन घेईल.

५ फेडरमल व प्रांतिक प्रधानमंडळें ठरवितांना अल्पसंख्याकाचे हक्क पूर्वापार रूढीनें ठरविले जातील.

६ बलुचिस्थान व वायव्यसरहद्द प्रांत यांची राजव्यवस्था इतर प्रांताप्रमाणेंच असेल.

७ जर सिंधमधील लोक आपला प्रांत विभक्त केल्यावर त्या विभक्त प्रांताची आर्थिक जबाबदारी घेण्यास तयार असतील तर सिंध प्रांत वेगळा करण्यांत येईल.

८ देशाची भावी राज्यपद्धति फेडरल स्वरूपाची राहील. शेषाधिकार हे प्रांताकडे जातील. जर पुढील तपासणींत तसें करणें हिंदुस्थानच्या हिताविरुद्ध आहे असें आढळलें तर त्यात बदल होईल.

शुद्ध जातिवाद व शुद्ध राष्ट्रीयवाद याचा समन्वय करण्यासाठीं वार्किंग कमिटीनें वरील योजना तयार केली. ही योजना अमान्य झाल्यास दुसरी सर्वसंमत योजना मान्य करण्याची वार्किंग कमिटीनें तयारी दाखविली.

परदेशी कापड व सूत यावर बहिष्कार घालण्याची प्रतिज्ञा परत घेण्यात आली आणि खालील प्रतिज्ञा ही प्रमाण ठरविण्यात आली.

**प्रतिज्ञा**:—आम्ही अशी प्रतिज्ञा करतों कीं, वर्किंग कमिटीनें ठराव करून दुसऱ्या काहीं गोष्टींची परवानगी दिली नाहीं तोंपर्यंत खालील अटी आम्ही प।

( १ ) कोणचेंही परदेशी कापड किंवा कापूस, रेशीम किंवा लोकर यांचें परदेशी सूत किंवा अशा परदेशी सुतापासून केलेले कापड आम्ही खरेदी करणार नाहीं किंवा विकणारही नाहीं.

( २ ) कॉंग्रेसची मान्यता न पत्करणाऱ्या गिरण्यांचें कापड किंवा सूत आम्ही घेणार नाहीं किंवा विकणार नाहीं.

( ३ ) कोणचेंही परदेशी कापड किंवा, कापूस रेशीम किंवा लोकर परदेशी सूत किंवा अशा परदेशी सुतापासून केलेले कापड आमच्या जवळ शिल्लक असलें तर तें आम्ही या देशात विकणार नाहीं.

नंतर वर्किंग कमिटीनें असे ठरवलें कीं, अस्पृश्यतानिवारक कमिटीचें काम पुन्हा सुरू करावे. त्या कामीं श्री. जमनालाल बजाज यानीं जरूर ती व्यवस्था करावी असें ठरलें.

कापड गिरणी एक्झेंपशन कमिटी व मजुराची स्थिति या बाबतींत वर्किंग कमिटीनें असें मत व्यक्त केलें कीं, ज्या गिरण्यानीं कॉंग्रेसच्या प्रतिज्ञापत्रकावर सही केली आहे त्या गिरण्यात जर मजुराचे हाल होत असतील किंवा त्याना नोकरीवरून घालवून देत असतील तर वरील कमिटीनें त्या ठिकाणीं शक्य व आवश्यक असेल तर सलोखा घडवून आणण्याचा प्रयत्न करावा आणि त्या गिरण्यातील मजुराची परिस्थिति सुधारण्याची खटपट करावी. ”

६, ७, ८ ऑगस्ट १९३१ रोजीं ऑ. इं. कॉं. कमिटीची पुन्हा एकदा बैठक झाली आणि काहीं महत्त्वाचे ठराव पास झाले. पहिला महत्त्वाचा ठराव मुंबईचे ॲ. गव्हर्नर याच्यावर झालेला हल्ला आणि बंगालमध्यें जज्ज गार्लिक याच्यावर झालेला हल्ला याविषयीं होता. या दोन्ही प्रसंगाबद्दल दुःख आणि निषेध व्यक्त करून फर्ग्युसन कॉलेजमध्यें एक सन्माननीय पाहुणे या नात्यानें गव्हर्नरसाहेब आले असता त्याच्यावर अशा तऱ्हेचा हल्ला होणें हें अत्यंत गर्हणीय आहे, असें कमिटीने नमूद केलें. राष्ट्रीय निशाण कमिटीनें केलेली चौकशी लक्षात घेऊन असें ठरलें कीं राष्ट्रीय निशाणाचे तीन रंग असावेत. ते रंग पूर्वीप्रमाणेंच समांतर असावेत. केशरी, पांढरा आणि हिरवा अशा अनुक्रमानें वरून खालीं असे ते असावेत. पांढऱ्या भागावर गडद निळ्या रंगामध्यें मध्यभागीं चरखा असावा. हे रंग जातिदर्शक नसून गुणदर्शक आहेत. धैर्य आणि स्वार्थत्याग याचें चिन्ह म्हणून केशरी.

शांतता आणि सत्य याचे निदर्शक म्हणून पाढरा, शौर्य आणि श्रद्धा याचें निदर्शक म्हणून हिरवा आणि गरिबाच्या आशेचा किरण म्हणून चरखा असा या चिन्हाचा अर्थ आहे. नवीन राष्ट्रीय निशाण ३० ऑगस्ट रोजीं उभारावयाचें होतें कारण तो दिवस त्या महिन्यांतला शेवटचा रविवार म्हणून राष्ट्रीय ध्वजावंदनदिन होता.

त्याचवेळीं मुंबई येथें झालेल्या वर्किंग कमिटीच्या वैठकींत भगतसिंगाच्या मृत देहाच्या अवशेषाविषयीं चौकशी झाली आणि शेवटीं असा निर्णय झाला कीं त्याबाबतींत पसरलेल्या भयंकर बातमीबद्दल कांहींही आधार आढळून आला नाहीं. वायव्य सरहद्द प्रांतांतील प्रातिक कॉंग्रेस कमिटीविषयीं आणि अफगाण जिरगा व खुदाई खिदमतगार याच्या विषयीं अत्यंत महत्त्वाचे निर्णय वरील बैठकींत झाले.

खुदाई खिदमतगार ही संस्था कॉंग्रेसस्वयंसेवक संघाचा एक भाग असावा असें ठरविण्यात आलें आणि अफगाण जिरगा ही संस्था सामील करून घेण्यात आली.

वायव्य सरहद्द प्रांतातील कॉंग्रेसच्या कामाविषयीं आणि प्रातिक कॉं. कमिटी अफगाण जिरगा आणि खुदाई खिदमतगार याच्या परस्परसंबंधाविषयीं कांहीं गैरसमज उत्पन्न झाले होते.म्हणून त्या बाबतींत वर्किंग कमिटीनें खान अब्दुल गफूरखान, अलिबुलखान, हकीम अब्दुल जलील, मि. पीरबक्ष, खान अमीर महमदखान आणि श्रीमती निखोदेवी यांच्या भेटी घेतल्या आणि वायव्य सरहद्द प्रातातील पुढील कामाविषयीं चर्चा केली. या चर्चेमध्ये सर्व गैरसमज दूर झाले आणि चर्चेत झालेल्या निर्णयाप्रमाणें काम करण्याचें सरहद्द प्रा. पुढाऱ्यांनीं कबूल केले. चर्चेत असें दिसून आलें कीं अफगाण जिरगा ही संस्था कॉंग्रेसचा कार्यक्रम पार पाडण्याचें काम करीत होती. आणि खुदाई खिदमतगार या कार्यक्रमात स्वयंसेवकाचें काम करीत होते. परंतु अफगाण जिरगा या संस्थेची घटना स्वतंत्र असल्यामुळें कोणच्याही तऱ्हेनें कॉंग्रेसशीं त्याचा संबंध नव्हता. आणि या संस्थेनेंच निरनिराळ्या तऱ्हेचीं निशाणें उपयोगांत आणल्यामुळें कांहीं घोटाळाही उत्पन्न झाला होता.

सरहद्द प्रात पुढाऱ्यांनीं शेवटीं असें कबूल केलें कीं तेथील विद्यमान प्रातिक कॉंग्रेस कमिटी आणि अफगाण जिरगा ही एक करून टाकावींत आणि कॉंग्रेसच्या नियमाप्रमाणे घटना असलेली एक नवीन संस्था उत्पन्न करून तिनें त्या प्रातांत कॉंग्रेसचें कार्य करावें. ती नवीन संस्था म्हणजेच

सरहद्द प्रांत काँग्रेस कमिटी किंवा त्या प्रांताच्या भाषेंत सरहद्द प्रांत जिरगा या नांवानें ओळखली जावी. तसेंच स्थानिक आणि जिल्हानिहाय याचा सुद्धां उल्लेख स्थानिक जिरगा या नावाने व्हावा. खुदाई खिदमतगार ही संस्था काँग्रेसच्या स्वयंसेवकसंघास जोडल्यानंतरही तिचें पूर्वीचें नांव कायम ठेवण्यास हरकत नाहीं. त्या संस्थेनें आपलें निशाण राष्ट्रीय निशाण हेंच ठेवावें.

वर्किंग कमिटीच्या विनंतीवरून सरहद्द पुढारी खान अब्दुल गफूरखान यानीं त्या प्रांतांतील काँग्रेसच्या चळवळीचें नेतृत्व पत्करिलें आहे.

वर्किंग कमिटीनें आणखी असाही ठराव केला कीं राष्ट्राच्या हितासाठीं आणि समेटातल्या अटींप्रमाणें काग्रेसला गोलमेज परिषदेंत भाग घेता येत नाहीं आणि तिनें घेऊं नये. दिल्लीचा करार अद्याप कायम आहे हें जाहीर करतांना कमिटीनें खालील गोष्टी नमूद केल्या.

गोलमेज परिषदेंत भाग न घेण्याबद्दल १३ ऑागष्ट रोजीं जो ठराव पास झाला त्या ठरावाचा अर्थ दिल्लीचा करार संपला असा कोणी करूं नये. म्हणून कॉंग्रेसच्या कार्यकर्त्यांनीं आणि कॉंग्रेस संस्थानीं वरील ठरावात कॉंग्रेसला लागू असलेल्या अटी कॉंग्रेसची दुसरी आज्ञा होइपर्यंत पाळीत रहाव्यात. तसेंच वर्किंग कमिटीची बैठक बोलाविण्यास वेळ मिळाला नाहीं तर कमिटीच्या अध्यक्षानीं कमिटीच्या नावानें आणि कमिटीच्या वतीनें काम करणें असे अधिकार अध्यक्षांना देण्यात आले.

सर तेज बहाद्दूर सप्रू आणि श्री. जयकर याचे सलोखा घडवून आणण्याचें जे शेवटचे प्रयत्न चालले होते त्यामुळें पुष्कळ आशावादी वातावरण उत्पन्न झाले होतें. मणिभुवनमध्यें सर्व काग्रेसचे पुढारी जमले होते. परंतु संध्याकाळीं ज्या वेळीं ते भुवनातून बाहेर पडले त्या वेळीं त्यानीं वर्तमानपत्राच्या बातमीदारांना निराशेचे संदेश सागितले आणि शेवटीं ८॥ वाजता मणिभुवनमधून निघून गांधी ज्या वेळीं गुजराथ मेलच्या तिसऱ्या वर्गाच्या डब्यात बसले त्यावेळीं सर्व लोकाची पूर्ण निराशा झाली. प्रभाशंकर पट्टनी यानीं दुपारीं गांधींची भेट अर्धातास घेतली. १५ आगस्ट रोजीं डॉ. सप्रू, श्रीयुत जयकर, मि. ए. रंगस्वामी अय्यंगार यांनींही गांधींच्या मुंबई येथें एक दोन भेटी घेतल्या व ते निघून गेले. त्या वेळीं प्रसिद्ध झालेला पत्रव्यवहार पाहिला म्हणजे सरकारी अधिका-

त्यांची मनोवृत्ति स्पष्ट दिसून येते. सेक्रेटरीएटनें समेट बाजूस झुगारून दिला होता. कदाचित् पुणें येथें झालेल्या शोकजनक प्रसंगामुळें त्यांचीं मनें क्षुब्ध झालीं असतील. या अत्यंत नाजूक मनःस्थितीच्या काळात सुद्धा सरकारी नोकरांच्या अरेरावीमुळें कॉंग्रेसच्या हालचालीला अडथळे उत्पन्न होते. याच वेळीं पुणें येथील फर्ग्युसन कॉलेजमध्यें मुंबईचे गव्हर्नर सर हॉटसन यांच्यावर एका तरुणानें गोळी झाडली आणि त्या प्रसंगामुळें परिस्थिति जास्त अनिष्टच झाली. पुणें येथें झालेल्या प्रकाराबद्दल गांधींनीं व वर्किंग कमिटीनें दुःख व्यक्त केले आणि जीव बचावल्याबद्दल गव्हर्नरसाहेबाचें अभिनन्दन केलें. या वरवरच्या कारणापेक्षा सुद्धा गांधी-अर्विन समेटभंगाचीं कारणे जास्त खोल होतीं. समेटाच्या अटींचा भंग झाल्याची प्रसंगवार मोजदाद नुकतीच झाली होती. गांधींनीं घेतलेल्या आक्षेपास २४ ऑगस्ट रोजीं सरकारचें उत्तर आलें होतें. त्या उत्तरास प्रत्युत्तर म्हणून आक्टोबरमध्यें कॉंग्रेसने आणखी एक पत्रक प्रसिद्ध केलें. गोलमेज परिषदेस न जाण्याच्या अनेक कारणांपैकीं समेटाचा भंग हें एक मुख्य कारण होतें. ३० जुलै रोजीं आलेलें इमर्सनसाहेबाचें पत्र आणि नंतर १० ऑगस्ट रोजीं आलेलें मुंबई गव्हर्नरचें पत्र आणि तसेंच सर माल्कम हेले यांची तार, या सर्व गोष्टींनीं परिषदेला जाण्याचा निर्णय ठरल्यासारखाच होता. परंतु या सर्व कारणांमध्यें बारडोली करवसुलीच्या वेळीं झालेल्या प्रकारानीं जास्तच भर पडली. चालू देणें आणि बाकी असलेलें देणें हीं दोन्ही वसूल करण्याचा सरकारनें सपाटा चालविला. पोलिसाच्या दंडुकेशाहीच्या जोरावर वसुली करण्याचें काम चालू होतें. सरकारी कर वसूल करणें किंवा न करणें हें सांगण्याचा कॉंग्रेसला कांहींही अधिकार नाहीं, असा सरकारी अधिकाऱ्याचा अट्टाहास होता. कॉंग्रेसची ही अशा तऱ्हेची मध्यस्थी समेटामध्यें उल्लेखिलेली नाहीं आणि ती सरकार चालूही देणार नाहीं असें पत्रव्यवहारातून स्पष्टपणें व्यक्त होत होतें. पोलिसाची जुलूम-जबरदस्ती सिद्ध करण्यास आणि त्यांनीं बळजबरीनें जादा करवसुली केली आहे हें दाखविण्यास कॉंग्रेस केव्हाही तयार होती. सरकारचें म्हणणें असें होतें कीं, करवसुलीच्या बाबतींत कॉंग्रेसनें आम्हांस कांहीं सांगूं नये. सरकार आणि सरकारची सत्ता सर्व गोष्टी ठरविण्यास अद्याप कायम आहे. आपली सत्ता सिद्ध करणें एवढाच सरकारचा हेतु राहिला होता. जमा झालेले पैसे हीसुद्धा केवल नामुली वसुली होती. करवसुलीची सरकारला तिनकीची

फिकीर नव्हती. तर आपली इभ्रत राखण्याची त्याला तळमळ लागली होती.

गांधींच्या न जाण्याचें आणखी एक महत्त्वाचें कारण होतें आणि तें म्हणजे हिं. सरकारनें डॉ. अन्सारी यांची गोलमेज परिषदेत प्रतिनिधि म्हणून नेमणूक केली नव्हती हें होय. डॉ. अन्सारी हे कॉंग्रेसचे कार्यकर्ते असून शिवाय राष्ट्रीय मुसलमानपक्षाचे एक मोठे पुढारी होते. सर्वच मुसलमान प्रतिगामी प्रवृत्तीचे नव्हते. 'मुकमल अझादी' किंवा 'पूर्ण स्वराज्य' यासाठीं तळमळणाऱ्या राष्ट्रीय मनोवृत्तीच्या मुसलमानाचा एक वेगळा वर्ग होता. शिवाय पं. मदनमोहन मालवीय, श्रीमती सौ. सरोजिनी नायडू आणि डॉ. अन्सारी याची नेमणूक करण्याचें लॉर्ड आयर्विनसाहेबानीं स्पष्टपणे वचन दिलें होतें. परंतु शेवटीं पहिल्या दोघांची नेमणूक झाली आणि डॉक्टर-साहेबांचें नांव मात्र वगळण्यात आलें. लॉर्ड विलिंग्डन यांची मोठी केविल-वाणी स्थिति झाली. त्यांना कांहीं माहीत नव्हतें असें असणें शक्य नाहीं. कारण लॉर्ड आयर्विनसाहेबांनीं स्वतः त्याना सर्व गोष्टी सांगितल्या होत्या. परंतु अन्सारींचें नाव वगळून हिंदुस्थानांतील मुसलमान स्वराज्याच्या विरुद्ध आहेत असें दाखविणें इंग्लंडला जास्त हितावह होतें आणि त्यासाठीं वरील गोष्ट घडून आली होती. लॉर्ड आयर्विनसाहेबाचें आश्वासन पूर्ण करण्या-विषयीं लॉर्ड विलिंग्डनसाहेबांकडे मागणी करण्यांत आली. त्या वेळीं त्यानीं असें उत्तर दिलें कीं, इतर मुसलमान प्रतिनिधि डॉ. अन्सारी याच्या प्रति-निधित्वास विरुद्ध आहेत. कॉंग्रेसनें जातिविषयक प्रश्नाविपयींची एक योजना तयार केली होती आणि एक हिंदु आणि एक मुसलमान असे दोन प्रतिनिधि ही योजना गोलमेज परिषदेपुढें माडणार होते. सरकारला हें माहीत होतें आणि म्हणूनच कॉंग्रेसला मुसलमानाचें असलेलें सहाय्य तोडून टाकण्याचा सरकारचा विचार होता. अशा स्थितींत राष्ट्रीय स्वाभिमानास योग्य आणि एकच असा मार्ग गांधींनीं पत्करला आणि गोलमेज परिषदेस जाण्याचें रहित केलें. १५ ऑगस्टला युद्धाचें वातावरण निर्माण झालें होतें. लॉर्ड विलिंग्डनसाहेब पूर्णपणें सामोपचाराची मनोवृत्ति दाखवीत होते. ज्या ज्या वेळीं अडचणी येतील त्या वेळीं मला भेटा. परंतु समेट मोडू नका असें तें गांधीस सांगत होते. परंतु आतां गांधींच्या भेटीचा कांहीं उपयोग होणार नव्हता. सर्व राष्ट्रावर उदासानतेची छाया पसरली होती. सप्रू, जय-कर आणि अय्यंगार ज्या मुलताना बोटीवरून गेले त्याच बोटीनें जाणें

परवाने पं. मालवीय आणि सरोजिनी नायडू यानी रद्द केले. गांधींनी आपली भूमिका खालील शब्दांत जाहीर केली.

" जर सरकार आणि कॉंग्रेस यांच्यामध्ये करार झाला आणि कराराच्या अर्थाविषयीं कांहीं शंका उपस्थित झाल्या, किंवा दोघांपैकीं कोणाकडून तरी करारांतील अटींचा भंग झाला तर इतर कोणच्याही कराराचे नियम याही करारास लागू करणें जरूर आहे आणि पुनः हा करार तर एक अतिशय महान सरकार आणि एका मोठ्या राष्ट्राचा प्रतिनिधि असलेली एक विशाल संस्था याच्यामध्यें झालेला आहे. करारातील अटी कायदेशीर रीत्या लादण्यासारख्या नाहींत यामुळें तर सरकारवर अशी दुप्पट जबाबदारी पडते कीं,जर दोहीं पक्षात एकमत होत नसेल तर एखाद्या निःपक्षपाती लवादाकडून वादग्रस्त मुद्याचा निर्णय करून घेण्यास कबूल झालें पाहिजे. कॅंग्रेसनें ही सूचना केली होती परंतु ही अत्यंत साधी आणि स्वाभाविक सूचना सरकारला रुचली नाहीं."

समेटाचे दरवाजे गांधींनीं कधींही बंद केले नव्हते. मार्ग मोकळा झाला कीं, त्याचक्षणीं मी तावडतोब लंडनला जाईन असें ते म्हणाले. मी परिषदेला हजर रहावें अशी येथील बड्या सनदी नोकरलोकाची इच्छा नाहीं आणि जर त्यांची तशी इच्छा असलीच तर कॉंग्रेससारख्या राष्ट्रीय संस्थेस कधींही मान्य होणार नाहीं, अशा परिस्थितींत मीं जावें अशी त्यांची इच्छा आहे. हे विचार गांधींनीं जाहीरपणें व्यक्त केलें.मुंबईहून अहमदाबादेस जाताना शेवटीं गांधींनीं लॉर्ड विलिंग्डन याना एक पत्र लिहिलें.त्यात त्यांनीं असें कळविलें कीं,"सरकारच्या बरोबरीची एखादी राज्यव्यवस्था उभारावी आणि आपण त्याचे मुख्य व्हावें असा कांहीं माझा हेतू नाहीं. लवादमंडळाविषयीं आपण जी मागणी केली ती एक हक्क म्हणून केली होती त्यात बळजबरी मुळींच नव्हती. आपणास केवळ न्याय पाहिजे यापेक्षा जास्त कांहीं नको." गांधींच्या या पत्रातलि महत्त्वाचा भाग खालीं दिला आहे.

मीं एक जिल्हाधिकारी आहे असें माझें कधींच म्हणणें नव्हतें. ! मी व माझे सहकारी हे आपणहूनच स्वतः पाटलाचें काम करीत आहोंत आणि तें सुद्धा जिल्हाधिकाऱ्याच्या संमतीनें करीत आहोंत.आम्हाला अधिकारी होण्याची तळमळ लागली आहे हा आपला गैरसमज पाहून मला फार वाईट वाटतें.

हें पत्र लिहिण्याचा माझा हेतु निराळा आहे. दिल्ली करार मोडला असें

आपणास वाटूं लागले आहे, कीं गोलमेज परिषदेंत कॉंग्रेसनें भाग न घेण्याचें ठरविल्यानंतरही अद्याप करार कायमच आहे असे आपण समजता हें मला आपणास विचारावयाचें आहे." कॉंग्रेस वर्किंग कमेटीनें १३ ऑगस्ट रोजीं परिषदेंत भाग न घेण्याविषयीं, तरीसुद्धा समेट कायम आहे हे जाहीर करण्याविषयीं, केलेला ठराव नमूद करून गांधी पुढे लिहितातः—

यावरूनही आपणास हें कळेलच कीं सरकारला पेचात आणावे अशी वर्किंग कमिटीची मुळींच इच्छा नाहीं. समेटाचें पालन करण्यास कॉंग्रेस अद्यापही तयार आहे, परंतु जर प्रांतिक सरकारांनीं ही अशीच वृत्ति धारण केली तरच हें होणें शक्य आहे.

परंतु ही अशी वृत्ति प्रांतिक सरकारातून झपाट्यानें मावळत आहे असें मी आपल्या निदर्शनास वेळोवेळीं आणले आहे. वर्किंग कमिटीच्या कचेरींत दररोज येणाऱ्या वातम्या हेंच दाखवतात कीं, कॉंग्रेस सभेचें कार्यकर्ते व कॉंग्रेसच्या नेहमींच्या चळवळी चिरडून टाकण्याचा हेतु सरकारच्या कृत्यात व्यक्त होत आहे.

पत्राच्या शेवटीं गांधींनीं तावडतोव उत्तर पाठविण्याची विनंति केली आणि समेट टिकवावयाचा असेल तर तक्रारींचा निकाल लवकर करणें जरूर आहे. नाहींतर कॉंग्रेसला आपल्या संरक्षणासाठीं योग्य ते उपाय करण्याची परवानगी तरी मिळावी. जनता व सरकार यामध्यें मध्यस्थ होण्याची कॉंग्रेसची भूमिका आहे. राष्ट्राचा प्रतिनिधि म्हणून कॉंग्रेसला आपण मानीत नसलात तरी माझी हरकत नाहीं. परंतु काहीं असलें तरी समेटभंगाची सर्व जबाबदारी सरकारकडेच आहे, हें मात्र खास. सनदी नोकराच्या हेतुपुरस्सर अरेरावीनें सरकार हा समेटभंग करीत आहे. आमचा संपूर्ण स्वातंत्र्याचा हक्क कबूल करण्यास हे नोकर तयार नाहींत, तेव्हा त्यांचीं अंतःकरणें पालटलीं नाहींत तोंपर्यंत स्वातंत्र्यासाठीं कोणचीही तडजोड पत्करणें कॉंग्रेसला शक्य नाहीं. पुढील यातनाचा मार्ग तुडवीत आम्हाला जावें लागणार आहे. मग त्या भावी यातना कितीही भयंकर असोत.

गांधींनीं आपल्या तक्रारीची यादी १४ ऑगस्ट रोजीं व्हाइसरॉयच्या संमतीनें प्रसिद्ध केली होती. तें एक सरकारला आव्हानच आहे असें काहींना वाटलें; त्यामुळें तहाची वाटाघाट अवघड झाली आहे. व व्हाइसरॉय व भारत-

मंत्री याच्याशीं समेटाचें बोलणें करण्यास जागाच नाहीं अशी तक्रार डॉ. सप्रू व जयकर यानीं इंग्लंडहून बिनतारी विद्युत्संदेश पाठवून गांधींकडे केली. सरकारनें कॉंग्रेसवर केलेले आरोप कोणच्याही एकपक्षीय निःपक्षपाती लवादापुढें माडण्यास गाधी तयार होते. व्हाइसरॉयचें म्हणणे असें होतें कीं, गेल्या पाच महिन्यात कॉंग्रेसनें केलेल्या चळवळी दिल्ली-कराराला अक्षरशः व अर्थशः विरोधी होत्या आणि त्यानीं शाततेचा सतत भंग होत होता. विशेषत. संयुक्तप्रात व वायव्य सरहद्द प्रात या ठिकाणी असे प्रसंग जास्त आले. समेटाच्या मुख्य हेतूचें आपल्या कृतीनें उल्लंघन केल्यामुळेंच कॉंग्रेसला गोलमेज परिषदेंत भाग घेणें शक्य राहिलें नाहीं.

शेवटीं व्हाइसरॉयची मुलाखत घेण्याचें गांधींनीं ठरवले व तशी परवानगी मागितली. व्हाइसरॉयनीं परवानगी देताच, गांधी, वल्लभभाई, जवाहरलाल व सर प्रभाशंकर पट्टणी हे व्हाइसरॉयची भेट घेण्यास गेले. व्हाइसरॉयच्या मंत्रिमंडळाची बैठक बसली होती. बरीचशी चर्चा झाल्यावर सर्व गोष्टींचा निर्णय झाला. गाधी सिमल्याहून स्पेशल ट्रेननें निघाले आणि २९ तारखेची विलायतची बोट गाठण्यास ते मुंबईस आले.

संभाषणात ठरलेल्या गोष्टी व झालेली तडजोड सरकारनें पत्रक काढून प्रसिद्ध केली. त्याबरोबरच गाधी व एमर्सन साहेब याचीं पत्रेही जोडलीं होतीं. वरील पत्रकातील व पत्रातील महत्त्वाचा भाग खालीं दिला आहे.

## सरकारी पत्रक

( १ ) ५ मार्च १९३१ रोजीं झालेला समेट कायम आहे.

ज्या बाबतींत करारभंग झाला आहे असें सांगण्यात येतें त्या बाबतींत समेटातील योजनेच्या दृष्टीनें सरकार काळजी घेईल आणि करारभंगाचीं अशीं काहीं उदाहरणें दृष्टोत्पत्तीस आल्यास त्याचा जरूर विचार केला जाईल. कॉंग्रेसहि आपली जबाबदारी पार पाडील.

( २ ) बारडोली तालुका व वलोद महाल येथील विशिष्ट खेड्यात जुलै १९३१ मध्यें करवसुली करीत असता पोलीस बरोबर घेऊन गेलेल्या वसुली अधिकाऱ्यानीं तालुक्यातील इतर खेड्यापेक्षा जादा मागणी केली व विशेष त्रास दिला कीं काय हा वादग्रस्त प्रश्न आहे. मुंबईसरकारच्या पूर्ण संमतीनें त्या बाबतींत पूर्ण चौकशी करण्याचें हिंदुस्थान सरकारनें ठरविलें आहे. खालील बाबतींत चौकशी करण्यात येईल:—

बारडोली तालुक्यातील इतर खेड्यात ५ मार्च १९३१ रोजीं जी करवसुली झाली तींत पोलिसाचें सहाय्य घेतलें नव्हतें. त्या वसुलीच्या प्रमाणापेक्षा जास्त प्रमाणांत तक्रार केलेल्या खेड्यांतील खातेदाराकडून वसुली करण्यात आली व तीही बळजवरीनें पोलिसाच्या सहाय्याने करण्यात आली. या तक्राराबद्दल चौकशी करून अशा तऱ्हेनें कांहीं जादा वसूली झाली असेल तर ती किती रक्कम आहे हेंही ठरविणें.

नाशिकचे कलेक्टर मि. आर. सी. गॉर्डन आय. सी. एस्. याची चौकशी-साठीं मुंबई सरकारनें नेमणूक केली आहे.

( ४ ) कॉंग्रेसनें उपस्थित केलेल्या इतर बाबींची चौकशी करण्यास हिंदु-स्थान सरकार व स्थानिक सरकार तयार नाही.

( ५ ) समेटात समावेश न होणाऱ्या अशा ज्या तक्रारी कॉंग्रेस करील त्याचा निर्णय नेहमींच्या शासनपद्धतीप्रमाणें होईल. आणि जर चौकशीचा प्रश्न उपस्थित झाला तर ती आवश्यक आहे कीं नाहीं, असल्यास तिचें स्वरूप पद्धति कोणती असावी वगैरे गोष्टी स्थानिक सरकार नेहमींच्या कायदेपद्धती-नेंच ठरवील.

गांधींनीं एमर्सन साहेबास पाठविलेल्या पत्रातील महत्त्वाचा भागः–सिमला २७ ऑगस्ट १९३१:–आपण पाठविलेलें योजनापत्रक काळजीपूर्वक वाचलें. खालील अटींवर आम्ही आपली योजना पत्करण्यास तयार आहोंत.

कलम ४ मध्यें सरकारनें घेतलेली भूमिका मी कॉंग्रेसच्या वतीनें पत्करणें शक्य नाहीं. कारण दिल्लीसमेटाच्या या काळात सविनय कायदेभंगाची चळवळ तहकूब आहे, तेव्हा जर समेटाच्या अंमलबजावणीच्या बाबतींत उत्पन्न झालेल्या तक्रारी दूर झाल्या नाहींत तर त्याची चौकशी होणें जरूर आहे. हिंदुस्थानसरकार व स्थानिक सरकार चौकशीची मागणी मान्य करण्यास तयार नसेल. आपल्या पत्रातलि त्या कलमास माझी व माझ्या सहकाऱ्याची कांहींच हरकत नाहीं. सरकारनें ' इतर बाबींची ' चौकशी करण्याचें नाकारलें तर त्याचा परिणाम एवढाच होईल कीं, चौकशीचा आग्रह सोडल्यावर, एखादी तक्रार उपस्थित झाल्यास ती दूर करण्याचा चौकशीशिवाय दुसरा एखादा प्रत्यक्ष क्रियेचा संरक्षक मार्ग शोधणें हें कॉंग्रेसचें कर्तव्यच ठरेल आणि मग सविनय कायदेभंग तहकूब असला तरी वर मागितलेला तक्रारदुरुस्तीचा

कोणताही प्रत्यक्ष मार्ग स्वीकारण्यास कॉंग्रेसलाही कांहीं हरकत राहणार नाहीं. शक्यतोवर प्रत्यक्ष उपाययोजना न करतां चर्चा संभाषण वगैरे मार्गांनींच तडजोड करावी असाच कॉंग्रेस नेहमीं प्रयत्न करीत राहणार.

हिंदुस्थान सरकारचें २७ ऑगस्ट १९३१ रोजीं पत्र आलें त्याचा सारांशः– कोणत्याही प्रत्यक्ष प्रतिक्रियेचा अवलंब केला जाणार नाहीं अशी गव्हर्नर-जनरल-इन् कौन्सिल याना आपल्याप्रमाणेंच आशा आहे.

बारडोली प्रकरणात चौकशी होण्याचें ठरलें होते. इतर ज्या तक्रारींबद्दल चौकशी होत नव्हती त्या बाबतींत प्रत्यक्ष उपाययोजना करण्याचा अधिकार कॉंग्रेसनें पुन्हा एकदा जाहीर केला. पुढें तक्रारी होवोत किंवा न होवोत. झाल्याच तर आणि चौकशी होऊन दूर झाल्या नाहींत तर लोकाच्या हक्कांची बजावणी करण्यासाठीं कॉंग्रेस स्वतःच प्रत्यक्ष संरक्षणाचा मार्ग स्वीकारणार हें निश्चित झाले होते.

कॉंग्रेसकमिट्या व कॉंग्रेसचे कार्यकर्ते याना बजावूनच सागण्यात आलें होतें कीं " दिल्ली समेट चालू आहे आणि अध्यक्षाच्या परवानगीखेरीज समेटाच्या अटींचा भंग त्यानीं करूं नये असेंही त्याना सागण्यात आले होतें. जेथें सरकार किंवा सरकारी अधिकारी याच्या विरुद्ध तक्रार उपस्थित झाली असेल तेथें शाततामय मार्गानें ती दुरुस्त करून घेण्याचा प्रयत्न करावा. त्याही मार्गाचा उपयोग झाला नाहीं. तर अध्यक्षाकडे ती तक्रार कळवावी व त्या बाबतींत त्याचा उपदेश व मार्ग कळवून घ्यावा.

गाधींनीं सरकारकडे पाठविलेल्या तक्रारी,व त्याचे सरकारी उत्तर सर्व कॉंग्रेस कमिटयानीं वाचून आपल्या तक्रारी ऑल इंडिया कॉंग्रेस कामिटी अहमदाबाद येथें कळवाव्यात. पुढें घडणारे समेटभंगाचे प्रसंग व इतर तक्रारीही गाधीकडे तावडतोब पाठवाव्यात असें कळविण्यात आलें.

गाधी लंडनला जावयास तर निघाले परंतु त्याच्या आशावादी प्रवृत्तीलाही त्या वेळीं कांहीं आशा वाटत नव्हती. तथापि प्रातिक सरकार, सनदी नोकर व इंग्लिशाच्या ' वखारी ' हीं कांग्रेसला आपल्या ध्येयाची प्राप्ति करून देण्यास मदत करतील अशी आशा मात्र गाधींना वाटत होती ! गाधी व कॉंग्रेसचे अध्यक्ष यानीं सिमला येथें २७ आगष्ट रोजीं जो नवा करार केला त्यास वर्किंग कमिटीनें अहमदाबाद येथें ११ सप्टेंबर १९३१ रोजीं मान्यता दिली

वरील बैठकींत आणखी एक महत्त्वाचा ठराव पास झाला. तो हिंदुस्थानातील कोळशाच्या खाणीविषयी होता. सर्व औद्योगिक क्षेत्रात व विशेषतः कापडाच्या गिरण्यांत हिंदुस्थानांतील कोळशाच्या खाणींतील कोळसा वापरावा अशी शिफारस करण्यात आली. अर्थात् कोळशाच्या खाणीच्या मालकांनी गिरणी मालकाप्रमाणेंच कॉंग्रेसची प्रतिज्ञा स्वीकारावयास पाहिजे. ती म्हणजे जनतेच्या आकांक्षेविषयीं त्यानीं सहानुभूति दाखवावी. खाणीचे डायरेक्टर्स व भांडवल शें. ७५ प्रमाणांत हिंदी असावें. मॅनेजिंग एजंटांच्या फर्ममध्यें कोणचेंही परदेशी भांडवल असता कामा नये. मालाची किंमत व दर्जा हीं निश्चित करून स्वदेशीच्या प्रसारास त्यानीं सहाय्य करावे. राष्टीय चळवळीस विघातक अशा चळवळीत मॅनेजर्सनीं भाग घेऊं नये. कांहीं विशेष कारण असेल त्या जागांखेरीज इतर सर्व ठिकाणी हिंदी नोकरानाच कामावर घ्यावें. विमा, बँका व नौकानयन हे व्यवहार हिंदी कंपन्यांकडून करण्यात यावेत.

ऑडिटर्स, सॉलिसिटरर्स, शिपिंग एजंट, दलाल, आणि कॉंट्रॅक्टर्स हे सर्व हिंदीच असावेत. धंद्यासाठीं घ्यावा लागणाऱ्या सर्व वस्तू शक्यतोंवर देशी असाव्यांत. सर्व व्यवस्थापकानीं स्वदेशी कापड वापरावें. काम, रहाणी, पगार या बावतींत खाणींतील नोकराना समाधानकारक अशी व्यवस्था असावी. दरवर्षी ऑडिट बॅलन्स शीट " अंदाजपत्रक " कॉंग्रेसकडे पाठविण्यांत यावें. या सर्व अटी पाळणाऱ्या खाणीवाल्याचाच वरील ठरावात समावेश केला होता.

नोव्हेंबर व ऑक्टोबर या महिन्यात इंग्लंड व हिंदुस्थान येथें झालेल्या घडामोडीचें वर्णन करण्यापूर्वी गांधी व त्यांचे सोबती यांचे जलप्रवासवृत्त पाहूं या. गांधींबरोबर, महादेव देसाई, देवदास गांधी, प्यारेलाल आणि मीरा बेन हीं मंडळी होतीं. श्री. सौ. सरोजनी नायडूही त्यांच्याबरोबर होत्या. बरोबर घेतलेलें सामान अगदींच मोजकें होतें. कारण एक तर जाण्याचें अतिशय अल्पावधींत ठरलें, जावें लागेल कीं नाहीं याविषयींच आधीं शंका होती व मुख्य कारण म्हणजे गांधींची कडक शिस्त व देखरेख! एडन येथें या सर्व मंडळींचें अत्यंत सन्मानपूर्वक स्वागत झालें. तेथें अरब व हिंदी लोकांनीं या मंडळींना निरोप दिला, त्या कामीं थोडीशी यातायात करावी लागली होती. रेसिडेंसी सभेत राष्ट्रीय निशाण लावूं देईनात! शेवटीं गांधींनींच येऊन ती अडचण दूर केली. त्यांनीं स्वागत-

कमिटीचे अध्यक्ष मि. फ्रेमरोज कावसजी याना सुचविले कीं रेसिडेंटला टेलि-फोनवरून कळवा कीं, अशा स्थितींत मीं निरोप घ्यावयास तयार नाहीं. हिंदुस्थान सरकार व कॉंग्रेस यांच्यात तह झाला आहे आणि तहासाठीं तरी सरकारने निशाणास बंदी करूं नये. रेसिडेंटला हें तावडतोब पटले आणि शेवटीं ज्याठिकाणीं गांधींना रहिवाशांनीं निरोप दिला त्या सभेंत राष्ट्रीय निशाण फडकूं लागले.

त्यांनीं दिलेल्या ३२८ गिनींचा स्वीकार करूनउत्तरादाखल भाषण करताना गांधी म्हणाले:—आपण माझा जो सत्कार केला त्याबद्दल मी आपला आभारी आहे. हा माझा किंवा माझ्या मित्राचा वैयक्तिक सत्कार नसून ज्या कॉंग्रेसची शिष्टाई राऊंड टेबल परिषदेपुढें करण्यासाठीं मी जात आहे त्या राष्ट्रीय सभे-चाच हा सत्कार आहे याची मला जाणीव आहे. राष्ट्रीय निशाणाबद्दल आपणा-मध्यें काहीं तेढ उत्पन्न झाली होती असें मला कळले. ज्या सभेंत हिंदी लोक जमले आहेत व विशेषतः राष्ट्रीय पुढारी बोलाविले आहेत ती सभा राष्ट्रीय निशाणावाचून होऊं शकेल अशी मला शंका सुद्धा येत नाहीं. हिंदी राष्ट्रीय निशाणाच्या इभ्रतीसाठीं हजारो लोकांनीं लाठीमार सहन केला आहे व काहींनीं आपले प्राणही दिले आहेत, हें तुम्हास माहीत असेलच. शिवाय सरकार व कॉंग्रेस याच्यामध्यें आता समेट झाला आहे व कॉंग्रेसही आता शत्रुपक्षाची नसून सरकारच्या मैत्रीस पात्र ठरली आहे. असें असताना राष्ट्रीय निशाणास नुसती परवानगी मिळणें, किंवा सरकारनें त्याकडे दुर्लक्ष करणे हें पुरेसें नसून ज्या ठिकाणीं कॉंग्रेसचे प्रतिनिधी बोलाविले आहेत, त्या ठिकाणीं राष्ट्रीय निशाणास मानाची जागा मिळणें जरूर आहे.

बोटीवर असताना प्रार्थना चरखा आणि मुलाबरोबर करमणूक हा गांधींच्या आश्रमातील नेहमींचा कार्यक्रम तेथेंही चालूच होता. गांधी हे खरे व्यापारी आहेत. एक दिवस संध्याकाळीं त्यांनीं आपल्या बोटीवरील मित्रास सांगितले कीं एकदा मी सातशें रुपये किंमतीची शाल सात हजार रुपयांस विकली. हें ऐकल्याबरोबर सर्व लोक आश्चर्यानें थक्क झाले. मॅडम झगलूल पाशा आणि वफ्द पक्षाचे अध्यक्ष नाहास पाशा याच्याकडून गांधींना अभिनंदनपर पत्रें आलीं. नाहासपाशाचे पत्र सहृदयतेनें ओथंबलेलें होतें तें खालीं दिले आहे:

महान पुढारी अल महात्मा गांधी
" राजपुताना "

मुक्ततेसाठीं आणि स्वातंत्र्यासाठीं आज झगडत असलेल्या ईजिप्तच्या वतीनें हिंदुस्थानचा एक महान् पुढारी म्हणून मीं आपलें स्वागत करतों. हिंदुस्थान-ही आज त्याच ध्येयासाठीं झगडत आहे. आपला प्रवास सुखरूप होवो अशी मी अंतःकरणापासून इच्छा करतों. आपल्या मार्गांत आपणास यश मिळो आणि तें सुद्धां आपल्या निश्चयाच्या बरोबरीचें स्वराज्य मिळो, अशीही मी परमेश्वराजवळ प्रार्थना करतो.

आपण परत जात असतां आपणास भेटण्याचें भाग्य मला मिळेल अशी मी आशा करतों. आपल्या देशाकडे परत जात असतां ' फेरोहाचा ' हा देश आपल्या भेटीमुळें कृतज्ञ होईल, अशी मी आशा करतों. आपल्या देशाच्या उन्नतीच्या प्रयत्नांत आपण जें उदात्त यश मिळविलें आहे आणि आपल्या तत्त्वासाठीं आपण जो स्वार्थत्याग केला आहे त्याबद्दल आदर आणि अभिनंदन व्यक्त करण्याची संधि आपल्या भेटीमुळें वफ्द आणि ईजिप्शियन राष्ट्रांस मिळेल. परमेश्वर आपणास दीर्घायु करो. आणि आपल्या प्रयत्नास चिरंतन यश देवो. सुएज आणि पोर्ट सय्यद या ठिकाणचे आमचे प्रतिनिधी आमचें स्वागत आणि आमची सदिच्छा आपणास स्वमुखानें व्यक्त करतील.

मुस्तफा अल नहाज पाशा
वफ्दचे अध्यक्ष. "

ईजिप्शियन शिष्टमंडळास पोर्ट सैय्यद येथें गांधींना भेटण्याची परवानगी मिळाली नाहीं. हिंदी शिष्टमंडळ मात्र कैरो येथें गांधींची भेट घेऊं शकलें. नाहाज-पाशाचा फक्त एक प्रतिनिधि मोठ्या प्रयासानें त्यांची भेट घेऊं शकला. गांधीजी मार्सेल्सला पोंचलें त्यावेळीं रोमॉरोलॉं यांच्या भगिनी मॅडम मेडलिन रोलॉं या स्वागत करण्यासाठीं उभ्याच होत्या. रोमॉं रोलॉं आजारी असल्यामुळें स्वतः येऊं शकले नाहींत. त्यांच्या भगिनीबरोबर मि. प्रिवॅट आपल्या पत्नीसह आले होते. मि. प्रिवॅट हे एक स्वित्झर्लंडमधील प्रोफेसर आहेत. १९२२-२३ च्या चळवळीच्या वेळीं शिक्षणाच्या व्यवसायांतील अप्रसिद्ध गृहस्थ असें हिंदुस्थानसरकारनें त्याचें वर्णन केलें होतें. आणि त्या वर्णनामुळेंच ते जास्त प्रसिद्ध झाले. लंडन येथें गांधी किंगले हॉलमध्यें मिस म्युरे लिस्टर यांच्याबरो-

वर रहात होते. तो भाग गरीबाच्या वस्तींनीं गजबजलेला होता. लंडन येथें त्यांना हजारों आमंत्रणें येत होतीं आणि त्याचप्रमाणें एखाद्या रविवारीं शांतपणें खेड्यांत येऊन राहण्याविषयीं असंख्य आमंत्रणे येत होती. ईस्टर्न रोडवरील फ्रेंडस् वेटिंग हाऊसमधील गांधींचें व्याख्यान टाइम्समध्ये वाचून एका मित्रानें गांधींना ५० पौंडाचा एक चेक पाठविला.

ब्रिटिश सरकारच्या आदरातिथ्यापेक्षा गांधींनीं मिस म्युरेल लिस्टर याचें आदरातिथ्य पत्करले.आणि लंडनच्या पश्चिम भागापेक्षां पूर्व भागच पसंत केला. पायांत फक्त वहाणा घालून अंगावरती एक उपरणे टाकून गांधी रस्त्यातून जाऊं लागले कीं दररोज सकाळीं त्या पूर्वभागातील मुलें गांधींच्या भोंवतीं जमत. गांधी आणि त्याच्या सायंप्रार्थना, लँकेशायर मजुराकडे पाहुणे म्हणून गेलेले गांधी, बिशप आणि आर्चबिशप यांचा पाहुणचार घेणारे गांधी, बादशहांना आपल्या नेहमींच्या पोषाखांत जगप्रसिद्ध भेट देणारे गांधी; त्या सर्व गोष्टी आतां जवळ जवळ जगप्रसिद्ध झाल्या आहेत.

फेडरलस्ट्रक्चर कमिटीपुढें झालेलें गांधींचें व्याख्यान गोलमेजपरिषदेतील त्याच्या व्याख्यानाची फार चांगली प्रस्तावना होती. कॉंग्रेसचा इतिहास, घटना दृष्टी पद्धति आणि ध्येय हीं त्यांनीं अतिशय थोडक्यात सांगितली. कॉंग्रेसच्या जन्माच्या वेळीं मदत करणारे आणि बाल्यावस्थेंत तिचें संगोपन करणारे मि. ए.ओ.ह्यूम याचा त्यांनीं आदरपूर्वक उल्लेख केला.कॉंग्रेस व सरकार आणि कॉंग्रेस व इतर पक्ष याच्यामधील मूलभूत भेद त्यांनीं स्पष्ट करून सांगितलें आणि नंतर कराचीचा ठराव वाचून दाखवून त्याचें स्पष्टीकरण केलें. आज अत्यंत आवश्यक असलेल्या गरजेचें स्पष्टीकरण करताना ते म्हणाले, कीं आम्हाला नुसत्या राज्य-पद्धतीची जरूर नाहीं तर समानदर्जाच्या दोन राष्ट्रामधील भागीदारांच्या योजनेची जरुरी आहे. आपण पूर्वी ब्रि. प्रजाजन होतों, आज बंडखोर आहोंत. या दोन भूमिकेतील फरक गांधींनीं स्पष्ट केला. पूर्वीचें साम्राज्यशाही ध्येय आणि हल्लींचें लोकशाही ध्येय यांमधील फरक त्यांनीं वरील शब्दात स्पष्ट करून सांगितला. आणि शेवटींही त्यांनीं असें आश्वासन दिलें कीं इंग्लंडच्या स्वतःच्या अडचणींच्या वेळीं आम्ही उपटसुंभासारखें येथें आलों नाहीं तर ब्रिटनबरोबर दुःखाचा भार उचलण्यासाठीं आम्ही येथें आलों आहोंत. परंतु ही दुःखाची भागीदारी हिंदुस्थानला सत्तेनें ताब्यात ठेवून होणें शक्य नाहीं. तर त्यासाठीं हिंदुस्थानचे आणि इंग्लंडचे संबंध प्रेमसूत्रानीं जोडले गेले पाहिजेत.

मायनॉरिटी कमिटीच्या पुढें बोलतांना गांधींनीं अत्यंत महत्त्वाच्या अशा सत्य गोष्टी उघड करून सांगितल्या. निरनिराळ्या जातींनीं आपापले विचार जोरजोरानें पुढें मांडावेत यासाठीं त्याना प्रोत्साहन देण्यांत आलें आहे. त्यांच्या अट्टाहासाला अवास्तव उत्तेजन देण्यांत आले आहे. असें गांधींनीं स्पष्टपणें विधान केलें आणि नंतर ते म्हणाले, जातिविषयक प्रश्न हा येथील महत्त्वाचा प्रश्न नव्हता तर राज्यघटना तयार करणें हा आपला मूळ हेतू होता. ही गोलमेज परिषद भरवितांना सहा हजार मैलांवरून प्रतिनिधींना आपापलीं घरेंदारें सोडून येथवर आणले ते जातिविषयक प्रश्न सोडविण्यासाठीं कीं काय ? असा गांधींनीं सवाल टाकला. हा किनारा सोडण्यापूर्वीं प्रतिनिधींचें अस समाधान व्हावयास पाहिजे कीं आपण हिंदुस्थानच्या स्वातंत्र्यासाठीं सन्माननीय आणि व्यवहार्य अशी राज्यघटना तयार केली आहे. आणि आता तिला फक्त पार्लमेंटच्या संमतीचा संस्कार व्हावयाचा राहिला आहे. यानंतर गांधींनीं सर ह्यूबर्टकार यानीं सुचविलेल्या अल्पसंख्याकाच्या करारनाम्याची विचिकित्सा केली. त्या वेळीं ते म्हणाले, जें श्रेय मिळाल्यासारखें वाटल्यामुळें सर ह्यूबर्टकार व त्याचे सहकारी ह्याना स्फुरण आलें आहे तें श्रेय मी त्याच्यापासून हिरावून घेऊं इच्छित नाहीं. परंतु मला फक्त येवढेंच सांगावयाचं आहे कीं करारनामा तयार करण्याचें त्याचें हें कृत्य प्रेत विच्छेदन करण्यासारखें आहे. सरकारनें तयार केलेली योजना ही जबाबदार राज्यपद्धति देणारी नसून नोकरशाहीच्या सत्तेंत हिंदूंना भागीदारी देणारी होती. गांधी पुढें म्हणाले जर असाच या करारनाम्याचा हेतू असेल तर तो ज्याचा त्याला लखलाभ होवो. कॉंग्रेसला त्याच्याशीं काहीं एक कर्तव्य नाहीं. स्वातंत्र्य व जबाबदार राज्यपद्धति याचा जोमदार वृक्ष ज्या योजनेनें कधींही वाढीस लागणार नाहीं अशा योजनेस हातभार लावण्यापेक्षां आपल्या ध्येयासाठीं आणखी किती वर्षें रानावनात भटकावें लागलें तरी कॉंग्रेस तें पत्करील. आपल्या भाषणाचा समारोप करताना ज्या व्रतासाठीं त्याना पुढें लवकरच आपले प्राण इरेस लावावे लागले त्या अस्पृश्यता निवारण्याच्या व्रताविषयीं ते म्हणाले अस्पृश्यांबद्दल मी एकच गोष्ट सांगतों. बाकीच्या अल्पसंख्यांकांनीं आपल्या हक्काचा पुरस्कार करावा हें ठीक आहे. परंतु अस्पृश्यांनींही आपल्या हक्काचें घोडें पुढें दामटावें हें मात्र मला अतिनिष्ठुरपणाचें वाटतें या त्याच्या कृत्याचा अर्थ ती एक कायमची

दुही होणार आहे असा मी समजतो. एक निराळा वर्ग म्हणून अस्पृश्यांचें निराळें वर्गीकरण होणें आम्हाला नको आहे. अशा तऱ्हेचे विभक्तीकरण शीखांचे, मुसलमानांचे कायमचें, होत असलें तरी तें खुशाल होवो, परंतु अस्पृश्य आपलें अस्पृश्यत्व चिरकालीन करणार आहेत काय? अस्पृश्यव्यता कायम रहाण्यापेक्षां हिंदुधर्म बुडाला तरी मला चालेल. अस्पृश्यांच्या राजकीय हक्कांबद्दल जे बोलतात त्यांना हिंदुस्थानाबद्दल आणि हिंदुस्थानच्या समान घटनेबद्दल कांहीं माहिती नाहीं म्हणून सर्व आवेश एकवटवून मला हेंच सांगावयाचें आहे कीं या गोष्टीला विरोध करतांना मी विरुद्ध पक्षाला एकटा राहिलों तरी मरेपर्यंत विरोध करीत राहीन." मुख्य प्रधानांनीं सुचविलेल्या लवादाबद्दल गांधी म्हणाले जर त्या लवादाचे निर्णय फक्त मुसलमाम आणि शीख यांनाच फक्त लागू होणार असतील तर त्या मार्गास आपली पूर्ण संमति आहे परंतु इतर जातींच्या स्वतंत्र प्रतिनिधित्वाला आपण कधींही संमति देणार नाहीं. मुख्य प्रधानानीं असा स्पष्ट प्रश्न विचारला कीं आपल्यापैकीं प्रत्येकजण जातिविषयक प्रश्नाची तडजोड करण्याची लेखी विनंति मान्य करावयास आपण तयार आहा काय? आणि माझा निर्णय मान्य करण्याचें आश्वासन आपण द्यावयास तयार आहा काय? गोलमेजपरिषदेच्या प्रतिनिधींनीं अशा तऱ्हेच्या विनंतीवर सह्या करण्याचें नाकारल्यामुळें मुख्य प्रधानाची योजना तशीच राहिली आणि त्यांनीं दिलेले निर्णय हे फक्त शेवटीं सूचनावजा ठरले. १९३२ च्या जूनमध्यें मुख्य प्रधानानीं आपला निर्णय जाहीर केला त्या वेळीं असा एक प्रश्न उपस्थित झाला कीं, श्वेतपत्रिकेंतील इतर सूचनाप्रमाणेंच हा सरकारचा निर्णय आहे कीं हा मुख्य प्रधानाचा निर्णय आहे? १८ नोव्हेंबर १९३१ च्या सुमारास प्रधानमंडळात सर्वत्र गोलमेजपरिषदेचा कंटाळा आला. लॉर्ड सँकी यांनीं एक आश्चर्यकारक बातमी त्या दिवशीं मुख्य प्रधानाकडून आणली कीं, भाषणें संपल्याबरोबर कमिटीचें काम संपेल. आणि पुढल्या आठवड्यांत या बैठकीचा समारोप करण्यात येईल. मि. बेन यानीं यास अतिशय विरोध केला. सर सॅम्युअल होअर यांनीं अशी सूचना केली कीं एकंदर परिस्थिति लक्षांत घेता आपण हें प्रकरण येथेंच थांबवावें आणि पुढील योजनेसाठीं मुख्यप्रधानाच्या पत्रकाची वाट पहावी.

सैन्याच्या प्रश्नावरही बरीच चर्चा झाली गांधी म्हणाले, आजचें हिंदुस्थानातील लष्कर हिंदूचें असो वा युरोपियनांचें असो तें केवळ मुलूख व्यापणारें

सैन्य आहे असें माझें मत आहे.या लष्करचे सैनिक जातीने कोणीही असले तरी ते आम्हांला परकीयच आहेत.मला त्याच्याशीं स्वकीयांसारखें बोलतां येत नाहीं. माझ्याकडे येतांना ते अगदीं लपतछपत येतात आणि माझ्याशीं बोलण्याची सुद्धा त्यांना भीति वाटते. " आम्ही त्यांचें देशबांधव नाहीं " अशीहि शिकवणूक त्यांना देण्यांत येतें. हिंदी सैनिक व जनता हीं एकमेकापासून पूर्णपणें अलग आहेत त्याच्यामध्यें एक प्रचंड भिंत उभी केली आहे. हिंदुस्थानांतील ब्रिटिश सैन्य व त्याचबरोबर हिंदी सैनिक सुद्धा ब्रिटिशाच्या हितसंरक्षणासाठीं व परकीय शत्रुपासून रक्षण करण्यासाठींच ठेवलें आहे. आणि निरनिराळया जातींच्या दोन्या सारख्या प्रमाणांत खेचून कह्यात ठेवण्यासाठींच ब्रिटिश सैनिकांचें हिंदुस्थानात वास्तव्य आहे. सर्व सैन्य पूर्णपणें हिंदी नियंत्रणाखालीं आलें पाहिजे. कदाचित् तें ब्रिटिश सैन्य माझी हुकमत मानणारहि नाहीं, असें मला वाटत नाहीं. ब्रिटिश सेनापति, शीख सैनिक किंवा रजपूत वीर त्या हुकमतीचा अवमानही करतील. परंतु ब्रिटिशाच्या सद्धेतूवर माझा विश्वास असल्यामुळें ही हुकमत मला चालवता येईल अशी माझी अपेक्षा आहे. ही हुकमत आमच्यावर सोपवतांना या सर्व सैनिकाना ब्रिटिश अधिकारी नवे धडे शिकवतील आणि त्यांना समजावून सागतील कीं, हिंदुस्थानातील जबाबदार सरकारची हुकमत यापुढे मानण्यांत तुम्ही स्वतःच्याच देशबांधवाची सेवा करीत आहांत. तेव्हां हुकमतीचा अवमान करूं नका.

हें सर्व गांधींचे स्वप्न होतें. ' हें स्वप्न खरें होण्याची आशा नसली तरी तें माझें स्वप्न मरेपर्यंत अंतःकरणात रहाणारच.'

हिंदुस्थानाविषयीं ब्रिटिशांच्या अंतःकरणात भक्ति उत्पन्न केली पाहिजे, ' अशी वेळ यावयास शंभर वर्षे लागतील ' असें ब्रिटिशाना वाटत असेल तर कॉंग्रेस आणखी एक शतकभरसुद्धा वणवण करावयास तयार आहे. कारण कॉंग्रेसला त्या भयंकर दिव्यातून जायलाच पाहिजे. आमचे खोटे प्रतिनिधित्व व इतर आपत्ति याच्या वादविवादांतून कॉंग्रेसला वाट काढलीच पाहिजे. जरूर पडल्यास व देवाची तशी इच्छा असल्यास गोळ्याचाही वर्षाव आम्हाला सहन केला पाहिजे.

संरक्षकांविषयीं बोलताना गांधी म्हणाले, ' संरक्षकें हिंदुस्थानच्या हिताकरितांच अनावयास पाहिजेत. लॉर्ड आयर्विनसाहेबानीं माझ्या नाकाला उँग

करून सांगितलें कीं, संरक्षकांविषयीं निर्णय हिंदुस्थान व इंग्लंड या परस्परांच्या हितरक्षणाच्या दृष्टीनेंच झाला पाहिजे असे गांधीसुद्धा म्हणाले. होय. मी असेंच म्हणालों. मी आणखी एक पाऊल पुढे जाऊन लॉर्ड अर्विनसाहेबाच्या म्हणण्याला दुजोरा देऊन सांगतों कीं, " जरी दिल्लीचीं संरक्षकें प्रायः हिंदुस्थानच्या हितासाठीं असली तरी त्यांत इंग्लंडच्याहि हिताचा समावेश होणें जरूर आहे. ती संरक्षकयोजना नुसत्या हिंदुस्थानला हितावह होणारी किंवा नुसत्या ग्रेटब्रिटनलाच हितावह होईल अशी परस्परविरोधी असेल असें मला वाटत नाहीं. तर ती योजना म्हणजे ग्रेटब्रिटन व हिंदुस्थान याची पूर्णपणें समानदर्जावर उभारलेली व स्वेच्छेनें संपणारी अशी भागीदारी असावयास पाहिजे. "

कॉंग्रेसमध्येंही गांधी असें स्पष्टपणें म्हणाले होते कीं, वादविवादाने किंवा समेटानें सुद्धा स्वातंत्र्य मिळतें, असा भ्रम मला कधींच झाला नाहीं. गांधी म्हणाले, " परिषदेचे किंवा कमिटीचे निर्णय बहुमतानें ठरविले जातील असें जाहीर करण्यांत आलें होतें; व कमिटीच्या चालकानीं आपल्या रिपोर्टामागून रिपोर्टांत प्रचंड बहुमताचे निर्णय नमूद केले आणि विरुद्ध असणारें ' एक मत ' मात्र नमूद केलें नाहीं. तें एक मत कोणाचें आहे असें आपणास वाटतें ? तेथें जमलेल्या पक्षांपैकीं एक पक्ष एवढीच आपण कॉंग्रेसची लायकी समजता काय ? शें. ८५ लोकांचें प्रातिनिधित्व कॉंग्रेसकडे आहे हें आपणास माहीत नाहीं काय ? सेवाधर्माच्या अधिकारावर मी असें सांगूं शकतों कीं, संस्थानिक व जमीनदार आणि सुशिक्षित लोक यांचेंहि प्रातिनिधित्व कॉंग्रेसकडे आहे. इतर प्रतिनिधि विशिष्ट वर्गांचे हितसंबंध पहाणारे आहेत. जातिभेदातीत अशी कॉंग्रेस ही एकच संस्था आहे. कॉंग्रेसची भूमिका सर्वव्यापी स्वरूपाची आहे. कोणचेंही वंशभेद, वर्णभेद किंवा धर्मभेद कॉंग्रेस जुमानीत नाहीं. कॉंग्रेसचें ध्येय अत्यंत उदात्त आहे. जनतेला अद्याप त्या ध्येयापर्यंत मजल गाठतां आलेली नसली तरी कॉंग्रेस ही दररोज विशाल होणारी संस्था आहे. हिंदुस्थानातील अत्यंत दूरच्या खेड्यापर्यंत तिचा दररोज विस्तार वाढत आहे. तरीसुद्धा एक पक्ष म्हणून कॉंग्रेसला वागविलें जात आहे. परंतु सर्व जातिविषयक दुराग्रहापासून पूर्णपणें अलिप्त असलेली अशी ती एकच संस्था आहे व तीच हा प्रश्न सोडवणार आहे. कॉंग्रेस एक प्रतिस्पर्धी सत्ता स्थापन करीत आहे

असे कांहीं लोकांना वाटत होतें. मी सांगतों कीं, तेंही खरें आहे. गोळ्यांचा वर्षाव होत असतां, अंगावर भाले रोखले जात असता, विषाचे पेले प्राशन करीत असता आणि दडून हल्ले करणाऱ्या मारेकऱ्यांचे सुरे अंगांत भोसकले जात असताही अनत्याचारी राहता येईल तर त्या अनत्याचाराच्या जोरावर अशी "सत्ता स्थापन करण्याचा कॉंग्रेसचा विचार आहे" हा आक्षेप मी मान्य करतों. कलकत्ता कार्पोरेशनबद्दल एक विघातक विधान करण्यात आले आहे. परंतु काँग्रेसनें विचारणा करताच मेयॉर साहेबानीं पुढें येऊन आपल्या चुका कबूल केल्या व अत्याचाराबद्दल प्रायश्चित्त घेतलें. हा चांगुलपणा आपण विसरूं नका. कॉंग्रेस अत्याचाराची तळी उचलण्यासाठीं उभी नाहीं तर अनत्याचाराचा पाठिंबा देण्यासाठीं ती उभी आहे म्हणूनच तर सविनय कायदेभंगाची चळवळ आहे. परंतु तेंसुद्धा सहन करण्यात आलें नाहीं. असो. कोणालाही ती चळवळ थांबवतां येणार नाहीं. जनरल स्मट्स हे सुद्धा ते करूं शकले नाहींत. १९०८ सालीं ज्याला प्रतिकार करण्यात आला त्याच अनत्याचारी तत्त्वापुढें १९१४ सालीं त्याना मान वाकवावी लागली. बोरसद व बारडोली येथें सविनय कायदेभंगाची चळवळ यशस्वी झाली. लॉर्ड चेम्सफोर्ड यानीं सुद्धा हें मान्य केलें.

"हिंदुस्थानबरोबर इंग्लंडला यातना झाल्या नाहींत असें समजूं नका" असें गांधींना सांगणारे प्रो. गिल्बर्ट मरे यांसारखे फार थोडे गृहस्थ इंग्लंडमध्यें होते. लॉर्ड आयार्विन साहेबानीं वटहुकुमानीं हिंदुस्थानची कसोटी पाहाण्याचा प्रयत्न केला. परंतु त्याना अपयशच आलें.

"शेवटच्या क्षणापर्यंत मी तुम्हास सांगतों कीं, कॉंग्रेसच्या भूमिका लक्ष्यात घ्या, स्वातंत्र्य किंवा तुम्ही त्याला कांहीं म्हणा त्यासाठींच कॉंग्रेस सिद्ध झाली आहे" असें गांधी म्हणाले.

परिषदेंत एकमत नव्हतें व कोणत्याही गोष्टीची व्याख्या नव्हती ही गांधींना मुख्य अडचण वाटली. शब्दाचे अर्थ ज्या वेळीं बदलतात आणि त्याचे सूचितार्थ चंचल असतात त्या वेळीं कोणचीही तडजोड अशक्यच असते. एका मित्रानें त्याना 'वेस्ट मिनिस्टर स्टॅट्यूट' ठाऊक आहे काय व डोमिनियन या शब्दाचा अर्थ आपणास माहीत आहे काय असें विचारलें. गांधींनीं 'होय' असें उत्तर दिलें. वसाहतींची यादी केली होती परंतु व्याख्या केली नव्हती. १९२६ सालीं वसाहतीचा जो अर्थ केला होता तो सुद्धा आता सरकार

स्वीकारावयास तयार नव्हतें. १९२६ सालची साम्राज्य परिषदेंत ठरलेली व्याख्या अशी होती:—

" डोमिनियन्स म्हणजे ब्रिटिश साम्राज्यातर्गत स्वायत्त राष्ट्रें; ब्रिटिश साम्राज्याविषयींच्या व बादशहाविषयींच्या राजनिष्ठेनें हें सर्व घटक परस्परांशीं संवद्ध असले तरी संघातील प्रत्येक घटकाचा दर्जा इतर घटकाशीं सर्वथैव समानतेचा असल्यानें अंतर्गत व परराष्ट्रीय बाबतींतही परस्पराची परस्परावर हुकमत चालणार नाहीं. "

एका इंग्लिश मुत्सद्यानें गांधींना म्हटलें की, संपूर्ण स्वातंत्र्य व इंग्लंडबरोबर भागीदारी या आपल्या शब्दाचा अर्थच समजत नाहीं." इंग्लंडबरोबर भागीदारी हाच अर्थ आहे. अर्थात् उभयताना हितावह अशी भागीदारी. सलोख्यासाठीं गांधी अगदीं तळमळत होते. ३५ कोट लोकसंख्येच्या राष्ट्राला सुरा, विषतलवार, भाले किंवा बंदुका याची काय जरूर आहे ? त्या राष्ट्राला फक्त इच्छाशक्ति पाहिजे. नकार फर्मावण्याचें सामर्थ्य पाहिजे. आज असें सामर्थ्य मिळविण्याचें शिक्षण राष्ट्र घेत आहे.

नंतर गांधी संरक्षकाविषयीं बोलताना म्हणाले:—

मला तीन तज्ज्ञांनीं असें सांगितलें कीं, जेथें **उत्पादनाचीं साधनें** शे. ८० प्रमाणात कायमचीं गहाण पडलीं आहेत अशा स्थितींत कोणच्याही जबाबदार प्रधानाला राज्यकारभार करता येणें अगदीं अशक्य आहे. मी हिंदुस्थानासाठीं बेकायदेशीर हितांचें संरक्षण मागत नाहीं. इंग्लंडच्या हितास बाधक होतील अशीं संरक्षणें मी हिंदुस्थानासाठीं स्वीकारणार नाहीं.

मि. जयकराशीं सुद्धा संरक्षकाच्या मुद्यावर गांधींचें एकमत झालें नाहीं. सॅम्युयल होअराशीं मतैक्य होणें तर अशक्यच होतें.

गांधी पुढें म्हणाले:—

मोठमोठाले गोंधळाचे प्रश्न हिंदुस्थानानें सोडवले आहेत. वारंवार उद्भवणाऱ्या प्लेगच्या गाठीसारखे प्रश्न हिंदुस्थानात पदोपदीं उभे रहातात, मलेरियाचा प्रश्न आम्हीं पदोपदीं सोडवला आहे. तुम्हाला अपरिचित असे साप, विंचू, माकडें, वाघ, सिंह, यांच्याशींही आम्हाला पदोपदीं झगडावें लागतें असल्याच अडचणींच्या वातावरणात आम्ही वाढलों आहोंत व त्यामुळें आमचा गोंधळ होत नाहीं.

परंतु कृपा करून ६२ वर्षांच्या या वृद्धाला आपल्या अंतःकरणात थोडीशी जागा द्या व माझ्याप्रमाणेंच कॉंग्रेसवरही विश्वास दाखवा. आपण माझ्यावर विश्वास दाखवता परंतु कॉंग्रेसवर विश्वास ठेवीत नाहीं. ज्या संस्थेच्या मानानें मी समुद्रातील एक बिंदू आहे त्या संस्थेंत व माझ्यामध्यें असा भेद माजवूं नका. त्या विशाल संस्थेपुढें मी अगदीं क्षुद्र आहे आणि जर आपण मला आपल्यामध्यें जागा दिलीत तर त्याचप्रमाणें कॉंग्रेसविषयींच्या श्रद्धेलाहि जागा द्या अशी मी आपणास विनंति करतो. नाहींतर तुमचा माझ्यावरील विश्वास हा अस्थानीं होईल. कॉंग्रेसनें मला दिलेल्या अधिकाराखेरीज माझ्या हातात कांहीं सत्ता नाहीं. जर आपण कॉंग्रेसबरोबर सहकार्य केलें तर तुम्हाला अत्याचाराला रजा देता येईल. आज तुम्हाला अत्याचारी लोकाबरोबर झगडावें लागत आहे. व ते अत्याचार तुमच्या सनदशीर व संघटित दडपशाहीबरोबर जन्माला येत आहेत. नाहीं तर तुम्हाला सत्याची ओळख होणार नाहीं आणि भिंतीवरचीं लाल पत्रकें कळणार नाहींत. हे अत्याचारी लोक आपल्या रक्तानीं भिंतीवर लाल पत्रकें लिहीत आहेत हें तुम्हास दिसत नाहीं काय ? आम्हाला गव्हाची भाकरी नको तर स्वातंत्र्याची भाकरी पाहिजे. आणि ती स्वातंत्र्याची भूक भागेपर्यंत सर्वत्र अशांतता माजवून स्वास्थ्य अशक्य करून टाकावयाचें असा हजारों लोकानीं केलेला निश्चय आपणास अद्याप कळला नाहीं काय ? म्हणून हीं भिंतीवरचीं लाल पत्रकें आपण वाचावींत आणि शातताबादी म्हणून नावाजलेल्या राष्ट्राच्या सहनशीलतेचा अंत पाहूं नये अशी मी आपणास आग्रहाची विनंति करतो."

१ डिसेंबर रोजीं परिषदेच्या समारोपाच्या वेळीं भाषण करताना अध्यक्षाचे आभार मानून गांधी म्हणाले, आपले मार्ग येथून बदलणार आहेत. आयुष्यात होणाऱ्या वादळाना तोंड देणें हेंच मानवी जीविताच्या इभ्रतीचें लक्षण आहे. माझा पुढील मार्ग कोणत्या दिशेला जाईल हें मला माहीत नाहीं परंतु त्याची कांहीं चिंता नाहीं. जरी मला अगदीं विरुद्ध मार्ग पत्करावा लागणार असेल तरीसुद्धा आपण। सर्वांचें मी अंतःकरणपूर्वक आभार मानतों.

या सूचनाशब्दानी गांधींनीं गोलमेज परिषदेला रामराम केला !

हिंदुस्थानातील वातावरण प्रतिकूलच होत गेलें होतें. ज्या अटीवर कॉंग्रेसनें गोलमेज परिषदेंत भाग घेण्याचें कबूल केलें होतें ती सरकारनें पाळलीच

नाहीं. दडपशाही चाललीच होती. बंगालमध्यें व संयुक्तप्रांत येथील परिस्थितीची हकीगत कळल्यावर गांधींना अत्यंत वाईट वाटलें. सत्तेचा त्याग करून हिंदुस्थानला स्वातंत्र्य देण्याची जी इच्छा व्यक्त करण्यात आली, ती येथील परिस्थितीशीं अगदीं विसंगत आहे हें त्याना आढळून आलें.

गांधी लंडनला जाण्यास निघाले त्या वेळीं बारडोली येथे करवसुली करताना पोलिसानीं केलेल्या अत्याचाराची चौकशी व्हावयाचें ठरलें होतें. मि. आर. जी. गॉर्डन याच्या अध्यक्षतेखालीं ५ आक्टोबर १९३१ रोजीं चौकशीस सुरुवात झाली होती. श्री. भुलाभाई देसाई व काँग्रेसचे अध्यक्ष सरदार वल्लभभाई हे तेथें हजर होते. श्री. देसाई हे काँग्रेसच्या वतीने हजर होते. चौकशीच्या आरंभींच सरकारी वकीलांनीं आक्षेप घेतला कीं, श्री. देसाईचें प्रतिनिधित्व बेकायदेशीर आहे. काँग्रेसनें एक जादा बैठक बोलावून एक ठराव पास करून आपला प्रतिनिधि निवडावयास पाहिजे, परंतु हा आक्षेप टिकला नाहीं. दोन्ही पक्षात असें ठरलें कीं लोकांनी शक्य असेल तेवढा सारा भरावा. सत्याग्रहात भाग न घेतलेले व सर्वस्वी नुकसान न झालेले असे जे लोक असतील त्यांनीं प्रसंगीं कर्ज काढून सुद्धां वसूल भरावा. अद्यापही चालु असलेल्या अरेरावीच्या हकीगतीबद्दलच्या तारा व पत्रें श्री. देसाई आधारादाखल वाचून दाखवीत असत. बारडोलीहून एक तार आली होती, त्यांत, रायम खेड्यावर वसूली अधिकाऱ्यानें १५ पोलिसासह हल्ला केल्याचें वृत्त होतें. तिवेवी, राजपुरे, लाभा, मगनपूर, नवाफली, अलघोड, आणि जमानिया येथेंही असेच अत्याचार झाले. इकडे चौकशीचें काम लांबत होतें. ५ मार्च ते २८ ऑगस्टपर्यंत मुंबई सरकारनें जे हुकूम सोडले त्या सर्वांची काँग्रेसनें मागणी केली. कारण त्या हुकुमावरून समेटांत सांगितलेलें प्रमाण कोणचें धरलें आहे हें कळणार होतें. काँग्रेसला ज्या गोष्टी सिद्ध करावयाच्या आहेत त्यासाठीं पुरावा दाखल करण्याची सरकारकडे मागणी का करण्यांत यावी असा मि. गॉर्डन यानीं सवाल केला. मि. गॉर्डन म्हणाले, ज्या वेळा काँग्रेसनें हे आक्षेप घेतले त्या वेळीं सर्व पुरावा काँग्रेसजवळच होता, तेव्हा त्यानींच आपले पुरावे दाखल करून आपली बाजू सिद्ध करावी."

चौकशी करणारे अधिकारी म्हणाले कीं, सरकारचा एखादा विशिष्ट हुकूम वगैरे पहावयास काँग्रेसला पाहिजे असेल तर गोष्ट निराळी. काँग्रेसनेंही आपल्या

मागणीचा अर्थ स्पष्ट केला व प्रतिवादीजवळ म्हणजे सरकारजवळ असलेले जे कागदपत्र आपणास पाहिजे आहेत त्याचें स्वरूप स्पष्ट सांगितले. मि. गॉर्डन यानीं १२–११–३१ रोजीं उत्तर दिले कीं, या मोघम व गैरसमजुतदारपणाच्या मागणीचा विचार करता येत नाहीं. श्री. देसाई यांनीं या हुकुमाचा इनकार केला. या फर्मानावरून सरकारनें चौकशीचा एकंदर आपला विचारच उघड केला होता. सार्वजनिक हितासाठीं सरकारला किती कळकळ आहे हेंही यावरून दिसले आणि हें पाहिल्यानंतर आपण काढलेला निर्णय जास्त सबळ झाला आहे हेंही श्री. देसाई यानीं जाहीर केलें. श्री. वल्लभभाईंनीं शेतकऱ्याना उद्देशून लिहिलें:—" चौकशीचा एकंदर कल अगदीं प्रतिकूल व एकागीं आहे. परंतु चौकशीचा फार्स अगदीं फोल आहे अशी पक्की खात्री होईपर्यंत आपण हें कार्य शेवटपर्यंत चालू देणार आहोंत.

सरकारनें आपल्या जवळचें कागदपत्र दाखविण्याचें नाकारल्यानें सरकारच्या साक्षीदाराची जी उलटतपासणी करावयाची होती त्यावर काहीं निर्बंधच राहिला नव्हता ! आणि असली लंगडी चौकशी सर्वस्वी निरुपयोगी आहे. यामुळें वल्लभभाई चौकशींतून अलग झाले आणि गांधींना त्यानीं लंडनला खालील विद्युत्-संदेश १३ नोव्हेंबर १९३१ रोजीं पाठविला.

चौकशीची परवानगी असलेल्या एकंदर ११ खेड्यापैकीं ७ खेड्यातील ६२ खातेदार व ७१ साक्षीदार याची चौकशी झाली. ५ खेडेगावाना चौकशीची परवानगी मिळाली नाहीं. पहिला सरकारी साक्षीदार मामलतदार होता. त्याची उलटतपासणी काहींशी झाली होती व त्यात काहीं कबूली जबाब मिळाले होते तोंच चौकशीसंबंधाचे कोणचेही सरकारी कागदपत्र पहावयास देण्याचें चौकशी अधिकाऱ्यानीं नाकारलें. चौकशीची पद्धत स्पष्टपणें प्रतिकूल व एकागी आहे. भुलाभाईच्या संमतीनें चौकशींतून अंग काढून घेतलें.

वल्लभभाई

संयुक्त प्रातात याचवेळीं अत्यंत महत्वाची घडामोड चालू होती. त्या घडामोडीनें हिंदुस्थानचे पुढील काहीं वर्षांचें राजकीय भवितव्यच ठरवलें गेलें. संयुक्तप्रातातील तालुकदार व जमीनदार याच्या कुळाची स्थिति फार केविलवाणी झाली होती. वसुलीच्या बाबतींत काहींही सूट दिली गेली नाहीं. जमीनदाराना जबाबदारीची जाणीव नव्हती किंवा त्याना कुळाच्या भयंकर

परिस्थितीचीही कल्पना करता आली नाहीं. ते सुखवस्तु होते. सरकारी संरक्षणाच्या खालीं ते आनंदांत होते. मजुरांची चिंता व दु खें याची त्याना ओझरतीही कल्पना नव्हती. कुळाच्यासाठीं यातायात करणारे असे जे कोणी हितचिंतक असतील त्यांच्यावर राजद्रोह, असहकार, बेकायदेशीरपणा, बंडखोरी, वगैरे अपराध लादून ते नेहमीं सरकारला चिथावणी देत. हिंदुस्थानातील लोकाचें दुर्दैवच आहे कीं, लक्षावधि दीनाना जी कांहीं थोडीफार राजकीय किंवा शासनविषयक बाबतींत मदत व्हावयाची ती कॉंग्रेसच्या कार्यकर्त्यांकडून होणार; कारण इतर मताचे संघ रयतेसाठीं भाडतात, त्यांच्या गरजांबद्दल सहानुभूति दाखवतात, परंतु प्रत्यक्ष मदत करण्याच्या भूमिकेपर्यंत ते कधींच उतरत नाहींत! त्याप्रमाणें संयुक्तप्रातांतील कॉंग्रेसचे कार्यकर्ते रयतेच्या बाजूनें पुढे येतांच जमीनदार व तालुकदार यांनीं सरकारच्या प्रत्यक्ष सहाय्यानें त्याच्यावर क्रोधास्त्र फेकलें!

दिल्लीचा समेट झाल्याबरोबर संयुक्तप्रात प्रातिक कॉंग्रेस कमिटीनें प्रातिक सरकारशीं पत्रव्यवहार जारीनें सुरू केला. लोकाच्या सर्व तक्रारी व कॉंग्रेसचा दृष्टिकोन सरकारपुढें माडण्याच्या कामीं गोविंद वल्लभ पंत याची नेमणूक कॉंग्रेसनें केली. शेतकऱ्याच्या वाढत्या संकटाकडे प्रातिक कॉंग्रेस कमिटीनें जास्त लक्ष पुरविलें आणि त्या बाबतींत खूप पत्रव्यवहार केला. पं. जवाहिरलाल नेहरूही वारंवार स्थानिक सरकारकडे पत्रव्यवहार करीत होते. व पं. गोविंद वल्लभपंत याच्यासह त्यानीं चीफ सेक्रेटरी व इतर अधिकारी याच्या पुष्कळ मुलाखतीही घेतल्या. सर मालकम हेले यांचीही भेट घेण्याचा पं. जवाहरलाल नेहरूंनीं दोनदा प्रयत्न केला परंतु भेट घेण्याचें जमलें नाहीं. महात्मा गाधी यानीं ही या बाबतींत व्यक्तिशः लक्ष घातलें आणि हिंदुस्थान सरकार व प्रातिक सरकार यांच्याशीं पत्रव्यवहार करून शिवाय सर मालकम हेले याचीही भेट घेतली.

दिल्ली-समेटानंतर संयुक्तप्रातातील शेतकऱ्याची स्थिति अत्यंत हलाखीची होत गेली. सरकारच्या दंडनीतीनें त्यात भर पडत होती. धान्याचे भाव भयंकर घसरले तरी पुरेशी सूट सरकारकडून मिळाली नाहीं. त्यातच कुळाकडून जमीनी काढून घेणें, त्याना छळणें इत्यादि प्रकार सुरू झाले. विपद्ग्रस्त जिल्ह्यात जाऊन तेथील शेतकऱ्याच्या अडचणींची चौकशी करण्यासाठीं

कॉंग्रेसनें पुष्कळ चौकशीकमिट्या नेमल्या आणि त्या कमिट्यांचे रिपोर्ट जमवण्याचें काम सुरु ठेवलें. एक खास प्रांतिक चौकशीमंडळही होतें. त्या मंडळापुढें हे रिपोर्ट जाऊन शिवाय तेथल्या तेथें. कांहीं पुरावेही गोळा केले जात असत. या खास चौकशीकमिटीचा उल्लेख '**पंच कमिटी**' या नांवानें होतो. तिचा रिपोर्ट सप्टेंबर १९३१ मध्यें प्रसिद्ध झाला.

आगस्ट १९३१ मध्यें हिंदुस्थान सरकारशीं झालेल्या संभाषणांत व संयुक्त प्रांतातील शेतकीविषयक संकटांचा खास विचारविनिमय गांधींनीं केला होता व चौकशीच्या मार्गानें दाद न मिळाल्यास सत्याग्रह किंवा तसलाच दुसरा प्रत्यक्ष प्रतिकाराचा मार्ग अवलंबिण्यास आम्ही मोकळे होऊं असेंही २७ आगस्ट १९३१ रोजीं मि. एमर्सन याना लिहिलेल्या पत्रांत जाहीर केले होतें.

कॉंग्रेसचे अध्यक्ष सरदार वल्लभभाई पटेल यांनींही हिंदुस्थान सरकारशीं संयुक्तप्रांतातील शेतकीविषयक संकटाबद्दल पुष्कळ प्रसंगीं पत्रव्यवहार केला होता.

परंतु या सर्व पत्रव्यवहारांतून व मुलाखतींतून कांहींही निष्पन्न झालें नाहीं. दडपशाही व दंडुकेशाही चालूच होती. वसूलीच्या नेहमींच्या काळानंतरही ही अरेरावी चालू रहात असे.

गेल्या हंगामातील संकटाचा परिहार होण्यापूर्वीच फसली सन १३३९ उजाडला व त्या नव्या वर्षाबरोबर नव्या सालच्या वसुलीची संक्रात शेतकऱ्याकडे फिरली! सरकारनें एक निर्वाणीचा खलिता प्रसिद्ध केला कीं, एक महिन्याच्या आंत खंड दिला नाहीं तर आर्धी दिलेली सूटही काढून घेण्यात येईल. कुळाच्या काहीं तक्रारी असल्याच तर आधीं वसूल देऊन मग त्यानीं तक्रारी सरकारपुढें माडाव्यांत. आणि वर सागितलेली सूट ठरवतांनासुद्धा सरकारने कॉंग्रेसचा किंवा जनतेच्या एकाही पुढाऱ्याचा सल्ला घेतला नव्हता.

वरील सरकारी हुकूम जाहीर झाल्यावरोबर अलाहाबाद जिल्हा कॉंग्रेस कमिटीनें हा प्रश्न हातीं घेतला व मागितलेली रक्कम देण्यास शेतकरी समर्थ नाहींत असें जाहीर केलें. पुन्हा एकदां प्रांतिक सरकारची भेट घेण्यांत आली व वसूलीच्या जमीनी काढून घेण्याच्या व मागील बाकींच्या बाबतींत शेतकऱ्यावर होत असलेला अमानुष जुलूम त्याच्यापुढें माडण्यात आला. अलाहाबाद जिल्हा हा एक नमुन्यादाखल चौकशीकरता घेऊन तेथलि घडामोडीची चर्चा

करण्यासाठीं एक परिषद बोलाविण्याचें ठरलें. कांहीं स्थानिक अधिकारी व सेटलमेंट कमिशनर एका बाजूस व कॉंग्रेस प्रातिनिधी दुसऱ्या बाजूस असें परिषदेचें स्वरूप ठरविण्यात आलें. परंतु महत्त्वाच्या मुद्याचीच चर्चा करण्याचें सरकारनें नाकारलें व परिषदेचा खटाटोप निष्फळ झाला. नियमाची अंमलबजावणी कशी करावी याची फक्त चर्चा करण्यास सरकार तयार होतें. पुन्हा नियमही सरकारनेंच आधीं तयार करून ठेवलेले तेच. मुख्य मुद्याला हातच घातला नव्हता.

परंतु सं. प्रां. कॉं. कमिटीनें परिषदेचे आणखीही प्रयत्न केले. सरकारशी तडजोड करण्यासाठीं एक खास कमिटीही प्रां. कॉं. कमिटीनें नेमली परंतु हेही प्रयत्न फसले.

शेतकऱ्याचीं दुःखें निवारण करणारी योजना फक्त पाहिजे मग ती कोणच्याही स्वरूपाची व कोणच्याही मार्गानें मिळत असली तरी ती पत्करण्यास आपण तयार आहोंत असें कॉंग्रेसनें आपल्या पत्रव्यवहारात वारंवार लिहिलें होतें. वसुलीचे दिवस आले तेव्हां आपण काय करावें याबद्दल कुळांनीं कॉंग्रेसचा सल्ला विचारला. तडजोडीचे प्रयत्न तर इकडे चाललेच होते. तोंपर्यंत कांहीं प्रत्यक्ष प्रतिकारी चळवळ केली तर तडजोड होत असलेली फिसकटणार! इकडे कुळांनीं सल्ला विचारल्यावर त्यानाही मार्ग दाखविणें जरूर होतें. सरकारी मागणी सर्वस्वी अन्यायाची आहे, अशी आपली खात्री असताना वसूल देऊन टाका असं सागणेंही कांग्रेसला शक्य नव्हतें. आणि सागून तरी शेतकरी कोठून देणार! असा पेंच कॉंग्रेसकार्यकर्त्यांना पडला! शेवटीं त्यानीं कॉंग्रेसच्या अध्यक्षाची परवानगी काढली व करबंदीची चळवळ जाहीर केली! उपदेश एकीकडे शेतकऱ्यास देत असतांनाच कॉंग्रेसनें सरकारलाही कळविलें कीं, वाटाघाट चालू आहे तोंपर्यंत वसुली थांबवित असाल तर हा सल्लाहि परत घेऊं. सरकारही हट्टास पेटलेलें! आधी सल्ला परत घ्या मग पुढें बाकीचें असें सरकारनें उत्तर दिलें. यानंतर करबंदीच्या उपदेशाचा प्रसार करण्यापलीकडे सं. प्रांतिक कॉं. कमिटीला मार्गच उरला नाहीं. करबंदीची चळवळ थांबवलीत तर प्रसिद्ध पुढाऱ्यांची परिषद बोलावून त्यांची भेट घेण्यास आमची तयारी आहे असेंही बोलणें सरकारनें सुरू केलें. आणि त्यान वेळीं शेकडों अस्सल देशभक्त तुरुंगात रवाना करण्याचाही सपाटा सरकारनें चालवलाच होता.

याच तडाख्यांत पं. जवाहरलाल, शेरवाणी, आणि पुरुषोत्तमदास तंडन हेही सांपडले. आणि त्यानंतर ५ च दिवसांनीं गांधी इंग्लंडहून परत आले. शेरवाणी व जवाहरलाल यांना आपापलें ठिकाण सोडून जाण्याची त्यांना सरकारनें बंदी केली होती. परंतु पं. जवाहरलालना हा हुकूम मानणें अगदीं अशक्यच होतें. हजारो सार्वजनिक ठिकाणीं त्याच्या हजेरीची जरूर होती. व गाधी मुंबईस येताच वर्किंग कमिटीच्या बैठकीच्यासाठीं ते मुंबईस निघून गेले. अशा रीतीनें सरकारी हुकूम मोडल्याबरोबर त्याना व त्याच्याबरोबरच शेरवानी यानाही अटक झाली व शिक्षा झाली.

युद्धाचें तिसरें केंद्र बंगालमध्यें होतें. समेटाच्या दिवसात क्रांतिकारकाच्या चळवळी हाणून पाडण्याच्या निमित्तानें चित्तागाग जिल्ह्यांत भयंकर दडपशाही चालूच होती. चित्तागांग येथें ३१ आगष्ट व १-२-३ सप्टेंबर रोजीं झालेल्या प्रकाराची चौकशी करण्यासाठीं एक बिनसरकारी कमिटी नेमण्यात आली. काहीं बिन-सरकारी युरोपियन व लुटारू रात्रीं एका छापखान्यात शिरले आणि मोठ-मोठ्या हातोड्यानीं व घणानीं त्यानीं तेथील यंत्रें मोडून टाकून, मॅनेजर व इतर लोक याना बेदम मारही दिला. या सर्व प्रसंगाचा रिपोर्ट लक्ष्यात घेऊन २७-२८-२९ नोव्हेंबर १९३१ रोजीं दिल्ली येथें वर्किंग कमिटीनें या सर्व प्रकाराचा धिक्कार केला. दंगेखोरानीं दंग्याला जातीविषयक दंग्याचें स्वरुप आणण्याचा प्रयत्न केला होता. तरी चित्तागाग येथें जातिविषयक दंगे नाहींत याबद्दल वर्किंग कमिटीनें समाधान व्यक्त केलें. ज्याना या दंग्यात उपद्रव झाला त्याची नुकसानभरपाई करणें आणि या दंग्याबद्दल जबाबदारी ज्याच्यावर शाबीत झाली त्याना शिक्षा करणें एवढें बंगाल सरकारचें कमीत कमी कर्तव्य आहे असें मत वर्किंग कमिटीनें जाहीर केलें.

तुरुंगाबाहेर असा कहर चालु होता व तिकडे तुरुंगात याहीपेक्षा जास्त छळ चालला होता. अपराधी लोक अडकवून ठेवण्यासाठीं हिजली येथें एक छावणी होती. त्या छावणींत झालेल्या छळात दोन इसम ठार झाले व २० लोक जखमी झाले.

सरकारनें या प्रकरणीं नेमलेल्या चौकशी कमिटीच्या निर्णयाची वर्किंग कमिटी वाट पहात होती. परंतु तो निर्णय प्रसिद्ध व्हावयाच्या पूर्वीच वर्किंग कमिटीनें आपलें मत असें नमूद केलें कीं, पोलिसाच्या ताब्यात (Custody) अस-

हाय असलेल्या लोकांच्या जीविताची व सुरक्षिततेची सर्व जवाबदारी विशेषतः सरकारवर आहे. वरील लोकाच्या निर्बंधाबद्दल सर्व राष्ट्रानें तीव्र निषेध केला होता. आणि हीं आद्यकर्तव्यें बेगुमानपणे ज्यानीं बाजूस सारलीं त्या अपराध्याना योग्य तें शासन व्हावयास पाहिजे.

याच बैठकींत संयुक्त प्रातातील परिस्थितीबद्दलही वर्किंग कमिटीनें विचार केला. प्रथम खंड व सारा वसूलीच्या बाबतींत जो जुलूम होत आहे व शेतकऱ्याची जी दैन्यावस्था झाली आहे त्यावर उपाय म्हणून प्रत्यक्ष प्रतिकार करण्याची परवानगी अलाहाबाद जिल्हा कॉं. कमिटीने कॉंग्रेसच्या अध्यक्षाना मागितली होती. वर्किंग कमिटीनें असें सुचविलें कीं, अध्यक्षाना विचारण्यापूर्वी प्रांतिक कमिटीनें आधीं या बाबतींत आपला विचार नक्की करावा. आणि हा विचार ठरल्यानंतर अध्यक्षाकडे सत्याग्रहाच्या परवानगीसाठीं अर्ज करावा. त्या अर्जाचा योग्य तो निर्णय करण्याचे अधिकार वर्किंग कमिटीनें अध्यक्षाना दिले.

दिल्ली समेटाच्या बाबतींत वचनभंग केला व मीठावरील कर आणखी वाढवावा या सूचनेचा वर्किंग कमिटीनें निषेध केला. चलन व हुंडणावळ या विषयींच्या धोरणाविषयीं वर्किंग कमिटीनें एक ठराव पास केला. सोन्याचा तुटवडा पडल्यामुळें बँक ऑफ इंग्लंडनें २१ सप्टेंबरपासून तीन दिवस सुटी घेतली होती, आणि इंग्लंडमध्यें सोन्याच्या भावात भयंकर खळवळ झाली. हिंदुस्थानातील रुपया हें चलन स्टार्लिंग पौंडाच्या किंमतींशीं निगडीत करावें; कीं त्याची सोन्याच्या भावात जी किंमत होत राहील ती होऊं द्यावी असा मुख्य प्रश्न होता- सरकारनें पहिला मार्ग पत्करला होता. त्यात हिंदुस्थानात ब्रिटिश मालाची आयात वाढविण्यासाठीं एक गुप्त दालन खुलें करून इंग्लंडचें हित साधावें व हिंदुस्थानांतील सोन्याचा साठा कमी करावा असा हेतु होता. या बाबतींत वर्किंग कमिटीनें एक ठराव पास केला.

वायव्य सरहद्दींत सरकारनें आणखी एक नवथी आग पेटवली होती. खुदाई-खिदमतगारानीं देशाच्या इतिहासात उल्लेखनीय कामगिरी चालविली होती. राष्ट्रीय असहकारितेच्या तत्त्वाची शिकवण व शिस्त अंगात मुरलेले असे पुष्कळ लोक सरहद्द प्रांतात होते. खान अबदुलगाफर खानसाहेब याच्या नेतृत्वाखालीं असे एक लाख लोक कार्य करीत होते. ऑगस्ट महिन्यापर्यंत त्याना कॉंग्रेसमध्यें सामील करून घेतलें नव्हतें. अलौकिक कामगिरी

केलेल्या सरहद्द प्रातात जाण्याबद्दल तह झाल्या दिवसापासून गाधी परवानगी मिळविण्याचा प्रयत्न करीत होते. परंतु ' इतक्यांत नाहीं ' असेंच त्याना उत्तर मिळे. एक वर्षभर हेंच उत्तर मिळत राहिलें, तेव्हा शेवटीं गांधींनीं आपला मुलगा देवदास गाधी यास तिकडे पाठविलें. देवदास गांधींनीं वरील संस्थेविषयीं अत्यन्त उज्वल हकीकत सांगितल्यावरून कॉंग्रेसनें ती संस्था आपल्यात सामील करून घेतली. अर्थात् सरकारला हें पटलें नाहींच. निमलष्करी अशा लोकाची ती संस्था कॉंग्रेसच्या स्वयंसेवकांची असली तरी सरकारला ती जबरदस्त वाटली. " बॅन्ड व ब्युगल हातीं घेतलेले, नखशिखांत लाल पोषाखाचे, एका असामान्य व्यक्तीला आपला पुढारी म्हणून वंदन करणारे आणि तो गृहस्थ आधींच सरहद्द गाधी या नावानें प्रसिद्ध झालेला. हा सर्व प्रकार सरकार दबकतच पहात होतें. कोणी सागावें, या सौम्य व सत्याग्रही चेहऱ्याच्या आत सरहद्दीवर एखादी मध्यस्थ [ बफर ] संस्था स्थापण्याचेही विचार उसळत असतील आणि अमीराशीं व सरहद्द टोळ्याशीं दोस्ती करून हिंदुस्थानवर हल्ला करण्याचीही ही योजना असेल ! " अशी धास्ती सरकारला वाटावी इतकी खरोखरच भव्य अशी ती संघटना व तिचे घटक होते.

वायव्य सरहद्द प्राताचे चीफ कमिशनर यानीं बोलावलेल्या दरबारला खान अबदुल गफारखान हजर राहिले नाहींत. यावरून सरकारशीं ते सहकार्य करूं इच्छित नाहींत, हें निमित्त शेवटीं सरकारला सापडलें व खानसाहेब व त्याचे बंधू डॉ. खानसाहेब याना गाधींचें हिंदुस्थानात आगमन होण्यापूर्वी १९३१ मध्यें काहीं दिवस आधीं अटक झाली.

अशा रीतीनें हिंदुस्थानकडे महात्माजी येत होते, त्या वेळीं त्याच्या स्वागताचीच जणूं काय ही सरकारी तयारी चालली होती. ते हिंदुस्थानात येईपर्यंत त्याना याची दाद लागणार नाहीं अशी व्यवस्था करण्याचा सरकारचा प्रयत्न होता. पं. जवाहरलाल व श्री. शेरवाणी याच्या अटकेची बातमी गाधींना बोटीवरच बिनतारी तारायंत्रानें पाठविली होती; परंतु ती त्याना न मिळण्याची व्यवस्था सरकारनें केली होती.

गफारखान व त्याचे बंधू यांना राजकीय कैदी म्हणून ठेवण्यात आलें.

अशा वातावरणांत गाधी २८ डिसेंबर १९३१ रोजीं सकाळीं मुंबईस उतरले !

---

# भाग ७ वा

## प्रकरण पहिलें

### पुन्हां परत अरण्यांत

राष्ट्रप्रतिनिधीचें थाटाचें स्वागत करण्याकरितां हिंदुस्थानच्या निरनिराळ्या प्रांतातील प्रतिनिधी मुंबईला जमले होते. आगबोटीवर जाऊन ज्या मित्रांनीं महात्मा गांधींचें स्वागत केलें त्यांपैकीं कांहींच्या पाठीवर थापा मारून तर कांहींच्या पाठीवर चापट्या लगावून तर आब्बास तय्यबजीसारख्या वृद्ध पुढाऱ्याची दाढी ओढून त्यांनींही त्याचें अभिनंदन केलें. कस्टम हाउसच्या हॉलमध्यें स्वागत झाल्यानंतर शहरांतून त्याची प्रचंड मिरवणूक काढण्यात आली. या मिरवणूकीचा बादशहांनींही हेवा करावा एवढी ती प्रचंड होती. मिरवणूक रस्त्यांतून जात असतां मुंबईतील लाखों स्त्रीपुरुषांनीं त्यांचें उत्साहपूर्वक स्वागत केलें. या आगमनानंतर गांधीजींनीं केलेली पहिली गोष्ट म्हणजे आझाद मैदानावर जमलेल्या प्रचंड जनसमुदायापुढें त्यांनीं व्याख्यान दिलें व " शांतीकरितां मीं आपलें शक्तिसर्वस्व खर्च करीन " असें तें अंतःकरण ओकून म्हणाले. हिंदू समाजांतून अस्पृश्यांना वेगळे काढण्याचा प्रयत्न झाल्यास आपण त्याचा प्राणांतिक प्रतिकार केल्याशिवाय राहणार नाहीं या प्रतिज्ञेचा त्यांनीं भर सभेंत पुनरुच्चार केला. लंडन येथील अल्पसंख्याकाचें व कमिटीच्या सभेंत त्यांनीं याच प्रतिज्ञेची घोषणा केली होती, पण तेव्हांपासून म. गांधी या गोष्टीच्या प्रतिकारार्थ प्राणांतिक उपोषण जाहिर करतील असें कोणालाही वाटलें नव्हतें, हें कबूल केलें पाहिजे. सर्व सामान्य अलंकारिक उद्गार या नात्यानें महात्माजींच्या या घोषणेचा श्रोत्यांच्या व वर्तमानपत्रवाचकाच्या मनावर कांहींच परिणाम झाला नाहीं. गांधीजी अतिशयोक्तीनें बोलतात पण कधींही उच्छृंखल किंवा बेजबाबदारपणाचे उद्गार ते काढीत नाहींत, ही गोष्ट प्रत्येकाला माहीत आहे.

त्यांचा होकार म्हणजे होकार व नकार म्हणजे नकार असतो. हिंदुस्थानातील निरनिराळ्या प्रांतावर कोणकोणत्या आपत्ति ओढवल्या आहेत त्या त्यांनीं तीन दिवसपर्यंत समजावून घेतल्या. बंगालचे सुभाष बाबू व त्याचे चार मेहुी

यांनीं महात्माजींची वेगवेगळी मुलाखत घेतली व जादा कायद्यामुळें बंगाल-मध्यें चालू असलेल्या दडपशाहीची एकच एक कहाणी त्यांनीं निवेदन केली. सं. प्रांत व सरहद्द प्रांत येथील मित्रांनींही जादा कायद्याचे असेच प्रताप गायिले. तहाच्या कालांत हिंदुस्थानचे सर्व क्षेत्र या कायद्यांनीं व्यापून टाकले होतें. लॉर्ड विलिंग्डन यांनीं जादा कायद्याच्या रूपानें हिंदुस्थानास नव्या वर्षाच्या देणग्या दिल्या आहेत असें खेळाडू वृत्तीनें महात्मा गांधी म्हणाले. खऱ्या सत्याग्रह्याप्रमाणें शांतीचा प्रत्येक मार्ग चोखाळल्याशिवाय राष्ट्राला आत्म-भोगाच्या खोल गर्तेत लोटणारे ते गृहस्थ नव्हते. सकाळपासून संध्याकाळपर्यंत प्रांतामागून प्रांतांनीं आपापल्या शिष्टमंडळामार्फत आपल्यावर होत असलेल्या अधिकाऱ्यांच्या अत्याचाराचीं तींच तीं वर्णनें केलीं. देशात सर्वत्र दडपशाही चालू होती. कर्नाटकानें बरेंच दिवस लढा चालविला होता. पण त्याला कोणत्याही प्रकारचा आराम मिळालेला नव्हता. आंध्र प्रांतांत फेरतपासणीनंतर शे. १८।।। टक्के साऱ्याची वाढ व्हावयाची होती. सारा तहकुबीच्या गोष्टी लोक बोलूं लागल्यास जादा कायदा लागू करण्यात येईल, अशी मद्रासच्या गव्हर्नरांनीं धमकी दिली होती. गांधीजींना त्यांच्या दोस्तांनीं राष्ट्रावर ओढव-लेल्या अनेक आपत्तींची कहाणी कथन केली. पण लंडनहून त्यांनीं स्वतः आणलेली एक कहाण्याची पोथीही त्यांना आपल्या दोस्तापुढें मांडावयाची होती. गोलमेजपरिषदेस जाण्यास ते केव्हांही राजी नव्हते. परंतु वर्किंग कमिटीनें त्यांनीं या परिषदेला हजर राहिलेच पाहिजे असा आग्रह धरला, तहनाम्याचा करार मोडल्याचें कारण दाखवून लंडनची भेट टाळण्याची ही संधि त्यांना प्राप्त झाली होती. पण कसेंही करून त्यांना आगबोटीवर चढविण्यास मजूरसरकार उत्सुक झालें होतें. ते लंडनला गेले व प्रत्यक्षच तेंथील परिस्थितीचा त्यांनीं अनुभव घेतला. तर्क व प्रत्यक्ष अनुभव या अगदीं वेगळ्या गोष्टी आहेत, असें त्यांनीं आपल्या दोस्तांना समजावून दिलें. हिंदुस्थानातील नेमस्तांचीं मनें आपण जाणतों. पण लंडन-मध्यें त्यांनीं जें नाटक केलें त्याला त्याची तयारी नव्हती असें ते म्हणाले. मुसलमानांची प्रतिरोधी विचारसरणी त्यांना माहीत होती पण गोलमेज परिषदेंत त्यांनीं जी चीरफाड चालविली ती मात्र आपणाला पसंत पडली नाहीं असें त्यांनीं उद्गार काढले. जातिप्रतिष्ठेला कोणत्याही प्रकारची वाव कॉंग्रेसतर्फे देता कामा नये असा तर त्यांनीं निश्चय केला होता.

शुद्ध व निर्भेळ राष्ट्रीयत्व हेंच कॉंग्रेसचें ब्रीद असलें पाहिजे, असें त्याचें म्हणणे होतें. जुन्यापुराण्या पद्धतीनेंच जातीविशिष्ट प्रश्नाचा विचार करीत राहिल्यास हिंदुस्थानास पूर्ण स्वराज्य संपादनाची संधि मिळावयाची नाहीं, असें त्यांनीं बोलून दाखविलें. जातिविशिष्ट विचाराच्या गिटाळापासून अलिप्त असलेल्या शुद्ध राष्ट्रीयत्वावर हिंदुस्थानची भावी राज्यघटना उभारण्यात यावी असें अभिवचन त्याना शीखापासून व मुसलमानापासून घ्यावयाचें होतें. जातिविषयक विचारानीं व या बाबतींत लंडन येथें आलेल्या अनुभवानीं त्याचें मन व्यथित झालें होतें. त्यामुळे तेथील परिस्थितीला त्याना शांतपणें व समचित्तत्वानें तोंड द्यावे लागलें. पण या उदात्त गुणानीं त्याना कधींच सोडलें नव्हतें. त्याचा आत्मविश्वास जबर होता व आपल्या राष्ट्रबंधूंच्या सामर्थ्याबद्दलही त्याना विश्वास वाटत होता. हिंदी लोकांनीं महात्माजींवर विश्वास ठेवला होता व त्यानींही विश्वासाचा हा ठेवा जशाचातसा परत केला. आपल्यासमोर त्याना एक खंदक दिसत होता. या खंदकावर आपल्याला पूल बाधता येईल का आपल्या अनुयायाना या खंदकांत उडी टाकण्यास सांगून त्याच्या जिवंत व मृत देहावरून चालून जाऊन पलीकडे जावें लागेल असा त्याच्यावर प्रसंग येणार होता, हें सागता येत नाहीं. पण अशा प्रकारच्या विचारानीं त्याच्या हृदयात वादळ उठवून दिलें असता ते पुन्हा आपल्या कामाला लागले. वर्किंग कमिटी त्याच्याशीं सहमत होती. कमिटींतील चौदा इसमावरच त्याचा भर नव्हता तर वर्किंग कमेटी म्हणजे सर्व राष्ट्र आहे अशी त्यांची भावना होती. याप्रमाणें वर्किंग कमिटीच्या वतीनें त्यानीं लॉर्ड विलिंग्डन याना एक तार पाठविली. व्हॉइसरायाचेही त्याना तारेनें लावलकचक, विस्तृत व धमकीवजा उत्तर आलें. गाधींजींनीं त्याना एक पुन्हा उत्तर पाठविलें पण त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. या ताराचा साराश खालीं दिला आहे—

१ म. गांधीं यांनीं व्हाइसरायाना पाठविलेली तार २९ डिसेंबर १९३१.

सरहद्द व सं. प्रातांना जादा कायदा लागू करण्यात आला. या दोन्ही प्रातातील माझ्या जिवलग दोस्तांना पकडण्यात आले, व सर्वांत विशेष म्हणजे बंगाल प्रातांतही जादा कायदा जारी करण्यात आला. हे सर्व अनर्थ हिंदुस्थानात माझी वाट पहात राहिले आहेत. अशी या देशात मी परत पाऊल टाकलें त्यावेळीं मला कल्पनाही नव्हती. आपणामधील दोस्तीचें नातें तुटलें

आहे, असें मी यावरून समजूं कां ? आपण माझी अद्यापि भेट घेऊं इच्छिता व या बाबतींत मला वाट दाखवूं इच्छिता असें मी समजूं काय? आपण मला मार्ग दाखवून दिला तर कॉंग्रेसला मला त्याप्रमाणें सल्ला देता येईल. आपलें तारेनें उत्तर येईल, अशी मला आशा आहे.

२ व्हाइसरायाचे प्रायव्हेट सेक्रेटरी याच्याकडून म. गांधींना तार. ३१ डिसेंबर १९३१.

आपल्या ता. २९ च्या तारेबद्दल आपले आभार मानण्यास व्हाइसरॉयांनीं मला सांगितलें आहे. या तारेंत आपण बंगाल, सं. प्रांत व सरहद्दप्रांत येथील जादा कायद्याचा उल्लेख केला आहे. सरकारी अधिकाऱ्यांच्या व नागरिकांच्या भ्याडपणाच्या खुनांना प्रतिबंध करण्याकरितां शक्य ते सर्व उपाय सरकारला योजणें भाग झालें आहे.

" अगदीं अविलंबित्वानें हिंदुस्थानास लागू करण्यात येणाऱ्या सुधारणा योजनांच्या कामीं देशांतील सर्व पक्षांच्या सहकार्याची सरकारला अपेक्षा आहे. सहकार्य दोन्ही पक्षांकडून व्हावें लागतें. हिंदुस्थानच्या हिताच्या दृष्टीनें सं. प्रांत व सरहद्द प्रांत येथील कॉंग्रेसच्या चळवळींकडे सरकार कानाडोळा करूं शकत नाहीं. "

"सं. प्रांतात उत्पन्न झालेल्या परिस्थितींत शक्य ती मदत करण्याचे कामीं स्थानिक सरकार गुंतलें असतां तेथील प्रा. कॉं. कमिटीनें खंडबंदीच्या चळवळीला सुरवात केली व प्रांतभर जोरानें या चळवळीचा प्रचार करण्यास ही सुरवात केली. असल्या चळवळी सुरू झाल्यास वर्गद्वेष व जातिद्वेष वाढेल व त्यामुळें सर्वत्र अव्यवस्था माजेल म्हणून या परिस्थितीला आळा घालण्याकरितां सरकारला कायदेशीर उपाय योजावे लागले. कॉंग्रेस संस्थानींच सरकारला असें करण्यास भाग पाडलें आहे. "

" सरहद्दप्रांतांत अबदुल गफारखान व त्यांच्या नियंत्रणाखालीं चालू असलेल्या संस्थानीं सरकारविरुद्ध सारख्या चळवळी चालविल्या आहेत व जातिद्वेष पसरविण्याचें कामही त्या करीत आहेत. तेथल्या कमिशनरांनीं त्यांना व त्यांच्या दोस्तांना सहकार्याबद्दल केलेल्या सूचना त्यांनीं धाब्यावर बसविल्या. मुख्य प्रधानांच्या घोषणेला न मानतां पूर्ण स्वातंत्र्याचें ध्येय त्यांनीं जाहीर केलें. अबदुल गफारखान यांनीं तर लोकांना क्रांतीला प्रवृत्त करणारीं

पुष्कळ भाषणे केली व सरहद्दीवरील टोळ्याच्या मुलखात त्याच्या अनुयायांनीं दंगल उडविण्याच्या प्रयत्न केला. इतके असूनही तेथील चीफ कमिशनरानीं सहनशीलता दाखविली. बादशहा सरकारच्या हेतूप्रमाणें प्रातात लागू होणाऱ्या सुधारणा योजनाच्या बाबतींत अब्दुल गफारखान याची मदत मिळवण्याचा प्रयत्न केला, पण या पुढे असेच थाबून राहिल्यास प्रातांतील शाततेस धोका उत्पन्न होईल असें त्याना वाटले. त्यावेळींच अब्दुल गफारखान व त्यांचे दोस्त याच्या विरुद्ध उपाय योजण्यात आले. गेल्या ऑगस्टमध्यें सरहद्द प्रातात कॉंग्रेसची चळवळ अब्दुल गफारखान यानीं सुरू केली व या स्वयंसेवक संस्थाना ऑ. इं. कॉ. कमिटीनेंही मान्यता दिली. गोलमेज परिषदेच्या कामाकरिता गेल्यामुळें आपण हिंदुस्थानात नव्हता. त्याच प्रमाणें ज्या प्रकारचें धोरण तुम्हीं त्या ठिकाणीं स्वीकारले होतें त्याचा विचार करता सरहद्दप्रात व सं. प्रात येथें चालू असलेल्या अलीकडच्या चळवळींबद्दल व्यक्तिशः तुम्हीं जबाबदार आहा किंवा त्या तुम्हाला पसंत आहेत असें मानावयास व्हाइसराय तयार नाहींत. हें जर खरें असेल तर ते तुमची भेट घेण्यास तयार आहेत, व गोलमेज परिषदेच्या वेळीं तुम्ही जें धोरण स्वीकारलें त्याला अनुसरून सहकार्याची भावना कायम ठेवण्याच्या बाबतींत आपलें विचार सागण्यासही व्हाइसरॉय तयार आहेत. परंतु सं. प्रात, सरहद्दप्रात व बंगाल या भागात बादशहा सरकारच्या संमतीनें जे जादा कायदे लागू करण्यात आले आहेत त्या बाबतींत मात्र ते आपल्याशीं वाटाघाट करण्यास तयार नाहींत. सुराज्याला अवश्य असलेली शातता व सुव्यवस्था रक्षण करण्याच्या हेतूनें योजण्यात आलेले हे कायद्याचे उपाय तो हेतु साध्य होईपर्यंत अमलात राहिलेच पाहिजेत. तुमचें उत्तर आल्यावर हा पत्रव्यवहार प्रसिद्ध करावा, असें व्हाइसरॉयाचें म्हणणें आहे."

३ म. गांधींची व्हाइसरॉयाच्या प्रायव्हेट सेक्रेटरीना उत्तरादाखल तार १ जानेवारी १९३२.

माझ्या २९ तारखेच्या तारेला व्हाइसरॉयानीं उत्तर दिलें, याबद्दल मी त्यांचा आभारी आहे. मैत्रीच्या भावनेनें पुढें केलेला हात व्हाइसरायानीं झिडकारला याबद्दल मला वाईट वाटत आहे. मी उल्लेखिलेल्या असामान्य कायद्याच्या बाबतींत सरकारचें म्हणणें काय आहे हें समजून घेण्याच्या इच्छेनेंच मी आपल्याकडे धाव घेतली, सरकारकडे जी मी मागणी केली, त्याबद्दल

अभिनंदन करण्याऐवजीं माझ्या दोस्ताच्या कृत्यांबद्दल मी नापसंती दर्शवावी असें व्हाइसरॉय मला सांगत आहेत व अशा प्रकारचा अप्रामाणिक गुन्हा करूनही मी जरी व्हाइसरायाची मुलाखत घेतली तरी राष्ट्राला अत्यंत महत्त्वाच्या वाटणाऱ्या प्रश्नासंबंधानें माझ्याशीं चर्चा करण्यास व्हाइसराय तयार नाहींत."

" फर्मानी कायदे व अधिकाऱ्यांचीं कृत्यें या दृष्टीनें सुधारणाचा प्रश्न अत्यंत गौण आहे व या कायद्याना जोराचा प्रतिरोध करण्यांत आला नाहीं तर राष्ट्राचा नैतिक अधःपात होतो, असें माझें मत आहे. ज्या सुधारणाची अंमलबजावणी करण्यास राष्ट्रात त्राणहि उरणार नाहीं, असल्या सुधारणा मिळण्याचा संभव आहे, या भरंवशावर कोणताही स्वाभिमानी हिंदी इसम राष्ट्रीय भावनेचा घात करण्यास तयार होणार नाहीं. सरहद्द प्रांताच्या बाबतींत आपण आपल्या तारेंत जी माहिती दिली आहे तीवरून लोकप्रिय पुढाऱ्याना अटक करणें, फर्मानी कायदे जारी करणें, जीवित व मालमत्ता असुरक्षित करणें, आपल्या विश्वासू पुढाऱ्याच्या अटकेविरुद्ध शांतियुक्त मिरवणुका काढण्याबाबत लोकांच्या गर्दीवर गोळीबार करणें, जरूरीचें होतें असें दिसत नाहीं. खानसाहेब अबदुल गफार यानीं पूर्ण स्वातंत्र्याचा पुरस्कार केला असेल तर तो जन्मसिद्ध हक्कच आहे. लाहोर येथें १९२९ सालीं काँग्रेसनें याच ध्येयाची घोषणा केली आहे. काँग्रेसच्या आज्ञापत्रात या हक्काचा उल्लेख असताहि काँग्रेसचा प्रतिनिधि म्हणून मला लंडनला गोलमेज परिषदेला बोलाविलें होतें. दरबारला हजर राहण्याचें नाकारलें म्हणून त्याना तडकाफडकी का पकडावें व तुरुंगात का टाकावें तें समजत नाहीं. खानसाहेब जातिद्वेष पसरवीत असतील तर ती निःसंशय दिलगिरी प्रदर्शित करण्याजोगी गोष्ट आहे. पण मला जे त्याचे जाहीर उद्गार पहावयास मिळाले ते तर याच्या उलट आहेत. समजा; त्यानीं जातिद्वेष प्रसृत केला असला तर त्याची उघड चौकशी करण्यास हरकत नव्हती. म्हणजे आपल्या आरोपाचें निरसन त्याना करता आलें असतें. संयुक्त प्रांताच्या बाबतींत तर व्हाइसरॉयाना खाचित चुकीची माहिती मिळाली आहे. कॉंग्रेसच्या पुरस्कर्तृत्वाखालीं खंडबंदीची चळवळ त्या ठिकाणीं चालू नव्हती. सरकार व काँग्रेसचे प्रतिनिधि याच्यात तडजोडीच्या वाटाघाटी चालू होत्या आणि खंड भरण्याची प्रत्यक्ष वेळ येऊन ठेपली त्या वेळीं काँग्रेसच्या लोकाना वाटाघाटींचा निकाल होईपर्यंत खंड तहकूब ठेवावा असा सल्ला देणें भाग पडलें. खुद्द अधिकारीच वाटाघाटी संपेपर्यंत खंड गोळा करण्याचें

तहकूब करीत असले तर आपण लोकाना दिलेला हा सल्ला परत घेतों, असें मि. शेरवाणी यांनीं कॉंग्रेसच्या तर्फे सरकारला कळविलें होतें. तडकाफडकी निकालात काढण्याजोगी अशी ही आपल्या तारेप्रमाणें गोष्ट नव्हती. संयुक्त-प्रांतात याबावत पुष्कळ दिवस वादविवाद चालू आहे. आर्थिकदृष्ट्या चिरडल्या गेलेल्या लाखों शेतकऱ्याचे हितसंबंध यात गुंतलेले आहेत. बहुजन-समाजाच्या कल्याणाकरिता दक्ष असलेल्या सरकारनें, कॅंग्रेससारखी एखादी संस्था या बाबतींत आपण होऊन सहकार्य करण्यास पुढें आली असता, तिचें स्वागत केलें असतें. बहुजनसमाजावर कॅंग्रेसचें पुष्कळ वजन आहे, ही गोष्ट खरी आहे. असह्य आर्थिक जुलूम झाला असता त्याच्या निवारणार्थ केलेले इतर सगळे उपाय थकल्यावर करबंदी करणें हा प्राचीनकालापासून आलेला जन्मसिद्ध हक्क आहे. कोणत्याही प्रकारें अव्यवस्था माजावी अशी कॅंग्रेसची यत्किंचितही इच्छा नाहीं. कॅंग्रेसवर असा दुरूनही कोणी आरोप करीत असेल तर तो साफ नाकारीन."

"बंगालच्या बाबतींत म्हणाल तर कॅंग्रेस व सरकार ही एकाच पातळीवर आहेत. खुनाचा निषेध सरकारप्रमाणें कॅंग्रेसही करीत असून असले गुन्हे नष्ट करण्याकरिता जरूर ते उपाय करण्याच्या कामीं सरकारशीं अंतःकरणपूर्वक सहकार्य करण्यास कॅंग्रेस तयार आहे. कॅंग्रेस दहशतवादाचा पूर्णपणें निषेध करते. म्हणून जादा कायद्याच्या आधारानें लोकांना घालण्यात येणाऱ्या दहशतीच्या कामात कॅंग्रेस सरकारशीं कधींहीं सहकार्य करणार नाहीं. परंतु अहिंसेच्या मर्यादेंत राहून सरकारच्या ह्या कृत्याचा व सरकारच्या कायदेशीर उपायाचा प्रतिरोध कॅंग्रेसनें केला पाहिजे. उभय पक्षांनीं सहकार्य करण्यास तयार असले पाहिजे असा सिद्धांत आपण आपल्या तारेंत मांडला आहे. त्याला माझी अंतःकरणपूर्वक संमती आहे.परंतु तुमच्या तारेवरून माझी अशी समजूत झालेली आहे कीं, कॅंग्रेसशीं सहकार्य करण्याची तयारी नसता व्हॉईसरॉय कॅंग्रेसचें मात्र सहकार्य मागत आहेत. कोणत्याही प्रश्नाला दोन बाजू असतात. कॅंग्रेसची बाजू मी माझ्या समजुतीप्रमाणें मांडली, तेव्हा या प्रश्नाच्या बाबतीं-तील सरकारी बाजू समजावून घ्यावी मग काय तो नक्की निर्णय द्यावा असें मी ठरविलें.मी ज्या मित्रत्वानें मुलाखतीची मागणी केली तिला व्हॉईसरॉयांनीं दिलेलें उत्तर योग्य नव्हते. आपल्या निर्णयाचा पुन्हां एकदा विचार करावा.एक मित्र या नात्यानें त्यांनीं मला मुलाखत द्यावी.वाटाघाटीच्या बाबतींत अमुक एकच विषय

असावा किंवा नसावा अशी अट घालूं नये, अशी व्हॉईसरॉयांना माझी विनंति आहे. ज्या गोष्टी व्हाईसरॉय माझ्यापुढे ठेवतील त्यांचा मी खुल्या दिल्यानें विचार करीन असे मी माझ्यापुरतें वचन देतों. ज्या प्रांतांना ऑर्डिनन्सें लागूं करण्यांत आली आहेत, त्या प्रांतांतून जाऊन सरकारी अधिकाऱ्याच्या मदतीनें तेथील चौकशी करीन व ही चौकशी केल्यानंतर जर लोकांकडेच दोष आहे असें आढळून आलें तर वर्किंग कमिटी आणि मी सुद्धां फसविले गेलो, व सरकार जे सांगत होतें तेच खरें असें म्हणावें लागेल, अशी उघड कबुली देण्यास कांकूं करावें असे मला वाटत नाही; त्याचप्रमाणें कॉंग्रेसलाही सल्ला देण्यास मी मागे पुढें पहाणार नाही. सरकारशीं सहकार्य करण्याचें बाबतींत मी राजी असलों तरी माझ्या मर्यादा व्हॉईसरॉयपुढें मला मांडल्याच पाहिजेत. अहिंसा हा माझा धर्म आहे.सरकारी राजकारभारात परिणामकारक मतप्रदर्शन करता येत नाहीं. अशा वेळीं आपल्या जन्मसिद्ध हक्काकरता लढण्यास कायदेभंग हा एकच एक उपाय आहे. सशस्त्र बंड व रक्तपात ह्यांच्या ऐवजीं कायदेभंग हा एकच परिणामकारी उपाय आहे असे माझें मत आहे, म्हणून मी माझ्या धर्माचा कधींही त्याग करणार नाहीं. दुसरा इलाज खुंटल्यामुळें वर्किंग कमिटीनें माझा सल्ला मान्य करून कायदेभंगाच्या योजनेला अनुकूलता दर्शविली.कमिटीनें या बाबतींत केलेल्या तात्पुरत्या ठरावाची एक प्रत मी आपल्याकडे पाठवीत आहे. माझी मुलाखत घेणें योग्य आहे, असें व्हॉइसरॉयना वाटलें तर आमच्या-तील चर्चा चालूं असेपर्यंत या ठरावाची अंमलबजावणी तहकूब करण्याबद्दल मी वर्किंग कमिटीला सल्ला देईन. शेवटीं हा ठराव विचारांत घेण्याचेंही कारण कदाचित पडणार नाहीं. व्हॉइसरॉय व मी स्वतः ह्यांच्यामधील पत्रव्यवहार इतका महत्त्वाचा आहे कीं, तो प्रकाशित न करता तसाच रहाणें, हे बरें होणार नाहीं. म्हणून माझी तार, तुमचें उत्तर, पुन्हां आपल्याकडे मी पाठविलेल्या उत्तराची तार व वर्किंग कमिटीचा ठराव, हे सर्व मी प्रकाशनार्थ देत आहे.

### वर्किंग कमिटीचा ठराव

पाश्चात्य देशात महात्माजी गेले असतांना तेथें घडलेली हकीकत वर्किंग कमिटीनें महात्माजींकडून समजून घेतली. बंगाल, संयुक्तप्रांत, व सरहद्दप्रांत याना खास कायदे लागू करण्यांत आले; अब्दुल गफारखान, मि. शेरवानी, पं. जवाहिरलाल नेहरू, याना अटक करण्यांत आली व सरहद्द प्रांतांतील

निरपराधी लोकावर गोळीबार करण्यात आला. या गोळीबारात किती मेले व किती जखमी झाले हें बाहेर आलें नाहीं, वगैरे गोष्टींचा विचार केला. महात्माजींच्या तारेला उत्तर म्हणून आलेली व्हॉइसरॉयांची तार वर्किंग कमिटीनें पाहिली आहे. या प्रांतांतून झालेले अनेक अत्याचार तसेच इतर प्रातातील झालेल्या कृत्याबद्दलचीही माहिती वर्किंग कमिटीला मिळाली आहे. सरकार कॉंग्रेसबरोबर सहकार्य करण्यास तयार आहे असें म्हणतें; परंतु सरकारचें धोरणात मुळापासून फरक झाल्याशिवाय सरकारला कॉंग्रेसचें सहकार्य मिळणें मुळींच शक्य नाहीं. आपल्या हातातील सत्ता दुसऱ्याच्या हातीं देण्यास नोकरशाही तयार नाहीं, उलट देशाच्या नैतिक अधःपाताला ती कारणीभूत होत आहे. सरकार कॉंग्रेसपासून सहकार्याची अपेक्षा करते पण सरकारचा कॉंग्रेसवर विश्वास नाहीं असेंही या तारेवरून दिसून येतें. बंगालमध्यें नुकत्याच घडून आलेल्या कृत्याचा व दहशतवादाचा तिरस्कार करण्याच्या कामीं कॉंग्रेस कोणालाही हार जाणार नाहीं. परंतु त्याजबरोबर सरकारी अधिकाऱ्याच्या कृत्यामुळें व जादा कायद्यामुळें होत असलेल्या अत्याचाराचा व तिच्यामागें असलेल्या दहशतवादी शक्तीचा कॉंग्रेस तितक्याच जोरानें निषेध करीत आहे. कोमिला येथें दोन मुलींनीं एक खून पाडला. या गोष्टीमुळें राष्ट्राच्या अब्रूला काळिमा लागला आहे, असें या कमिटीचें मत आहे. अशा गुन्ह्यामुळें राष्ट्राचें अत्यंत नुकसान होतें. विशेषतः कॉंग्रेससारख्या अत्यंत श्रेष्ठ प्रतिनिधिभूत राजकीय संस्थेनें स्वराज्य संपादनाचे कामीं अहिंसेचें व्रत घेतलें असता असले गुन्हे होणें, हें तर अत्यंत हानिकारकच आहे, असें कमिटीला वाटत आहे; तथापि काहीं थोड्या लोकाच्या गुन्ह्याकरता सर्व जनतेलाच शिक्षा करणारे जादा कायदे बंगालमध्यें जारी करणें समर्थनीय आहे असें कमिटीला वाटत नाहीं. असल्या गुन्ह्याना प्रवृत्त करणाऱ्या प्रसिद्ध कारणाचाच निराम करणें हा या बाबतींतील खरा उपाय आहे.

" बंगालमध्यें जादा कायदा जारी करणें जसें समर्थनीय ठरत नाहीं तसें सं. प्रात व सरहद्दप्रात यातून असले कायदे जारी करणें मुळींच समर्थनीय ठरणार नाहीं. सं. प्रातातील शेतकऱ्याना मदत करण्याच्या कामीं कॉंग्रेसनें जे उपाय योजले आहेत ते अगदीं योग्य आहेत, असेंच कमिटीचें मत झालें आहे. भयंकर आर्थिक आपत्ति प्राप्त झाली असताना व तिच्या निवारणार्थ इतर सर्व सनदशीर उपाय थकले असतां, सं. प्रातांतील शेतकऱ्यांवर आज असा

आला आहे. त्यांनीं खंड देण्याचें तहकूब ठेवणे हा जनतेचा निःशंकनीय हक्क आहे, असें या कमिटीला निश्चितपणे वाटत आहे. ”

“ सं. प्रांत कॉं. कमिटीचे अध्यक्ष मि. शेरवानी, व कॉंग्रेसचे जनरल सेक्रेटरी पं. जवाहरलाल हे म. गांधींची भेट घेण्याकरिता व वर्किंग कमिटीच्या सभेत हजर राहण्याकरितां मुंबईस येण्यास निघाले असता सरकारनें त्याना अटक करून तुरुंगांत टाकलें. सरकारनें जादा कायद्याच्याही मर्यादेबाहेरची ही गोष्ट केली आहे. हे गृहस्थ मुंबईच्या सभेंत भाग घेणार होते. सं प्रातातील खंडबंदीच्या चळवळीशीं त्याच्या या कृत्याचा काहीं संबंध नव्हता.”

“ सरहद्द प्रांतांच्या बाबतींतही सरकारने स्वतः होऊनच जे कारण दाखविलें आहे, त्यावरून त्या प्रांतात तेथें जादा कायदा जारी करण्याइतकी किंवा अब्दुल गफारखान व त्याचे दोस्त यांना पकडण्याची किंवा विना चौकशी तुरुंगांत डांबण्याची जरुरी होती, असें दिसत नाहीं. त्या प्रातांतील निःशस्त्र व निरापराधी लोकावर जो गोळीबार करण्यांत आला तो तर अगदीं अविचाराचा व अमानुष होता.सरहद्द प्रांतातील शूर लोकांनीं यावेळीं जें धैर्य व शक्ति दाखविली त्याबद्दल त्याचें ही कमिटी अभिनंदन करीत आहे.गंभीर स्वरूपाचे व प्रक्षोभजनक प्रसंग आले असताही हीच अहिंसेची भावना या प्रांतांतील लोक जागृत ठेवतील तर त्याच्या आत्मकष्टानें हिंदुस्थानच्या स्वातंत्र्याच्या कार्याची प्रगति झाल्याशिवाय राहणार नाहीं. हे खास कायदे का काढावे लागले, सामान्य कायदे बाजूस ठेवून असल्या कायद्याची जरूरी का भासली याची चौकशी करण्याकरितां व या कायद्यान्वयें जीं कृत्यें करण्यांत आलीं त्यांच्या संबंधानेंहि चौकशी करण्याकरिता सार्वजनिक व निःपक्षपातीपणानें चौकशी करावी, अशी हिंदुस्थानसरकारपाशीं वर्किंग कमिटीची मागणी आहे. योग्य ती चौकशी सुरू झाली व तिच्यापुढें पुरावा माडण्यास वर्किंग कमिटीला योग्य त्या सवलती मिळाल्या तर या चौकशीकरता पुरावा ठेवण्याच्या कामीं वर्किंग कमिटी सरकारला मदत करील.

“ गोलमेज परिषदेपुढें मुख्य प्रधानांनीं जाहीर केलेल्या मताचा व मुख्य प्रधानाच्या या जाहीर उद्गारावर पार्लमेंटच्या दोन्ही सभांतून जी चर्चा झाली, तिचाही वर्किंग कमिटीनें विचार केला असून मुख्य प्रधानाचे हे विचार कॉंग्रेसच्या मागणीच्या दृष्टीनें अत्यंत असमाधानकारक व अपुरे आहेत, असें

कमिटीचें मत झालें आहे. राष्ट्रसंरक्षण, परराष्ट्रीय कारभार व तिजोरी यांवर नियंत्रण ठेवण्यास व राष्ट्रहिताच्या दृष्टीनें अत्यंत आवश्यक भासणारीं संरक्षक बंधनें राखण्यास पूर्ण स्वातंत्र्याशिवाय दुसरा मार्ग उरलेला नाहीं, असें वर्किंग कमिटी आपलें मत नमूद करून ठेवीत आहे.

" जात, धर्म, वर्ण असे भेदभाव न ठेवता अखिल राष्ट्राची प्रतिनिधी: या दृष्टीनें बोलण्यास काँग्रेस ही एकच संस्था आहे, असें मानण्यास ब्रिटिश सरकार गोलमेज परिषदेच्या वेळीं तयार नव्हतें. ही गोष्ट वर्किंग कमेटीच्या लक्षात आलेली आहे. तसेंच या परिषदेंत जातीय ऐक्य साधता आलें नाहीं, ही गोष्टही वर्किंग कमिटीच्या अंतःकरणाला बोंचून राहिली आहे. म्हणून अखिल राष्ट्राचे प्रतिनिधित्व कोंग्रेसला प्राप्त होईल, राष्ट्राच्या वतीनें अधिकारानें ती बोलूं शकेल, अशी योग्यता व सामर्थ्य तिच्यात उत्पन्न करण्याकरितां लोकानीं अविश्रांत प्रयत्न करावे व राष्ट्रातील अनेक जमातींना मान्य होईल अशा शुद्ध राष्ट्रीय तत्त्वावर स्वराज्याची घटना तयार करण्यास लागणारें वातावरण निर्माण करावें, अशी वर्किंग कमिटीची लोकांना विनंति आहे. त्याचप्रमाणें व्हाइसरॉय आपल्या तारेचा पुन्हा विचार करतील, जादा कायदे व त्यांच्या अन्वयें झालेल्या कृत्यामुळें लोकांवर होत असलेले जुलूम नाहींसे करण्याच्या बाबतींत सरकार मदत करण्यास तयार असेल,पूर्ण स्वातंत्र्याच्या बाबतींत वाटाघाट करण्यास कॉंग्रेसला पूर्ण वाव देण्यांत येईल व हें स्वातंत्र्य मिळेपर्यंत लोकाच्या प्रतिनिधींच्या अनुमतीनें देशाचा राज्यकारभार चालेल तर वर्किंग कमिटी सरकारशीं सहकार्य करण्यास तयार आहे.

" वरील बाबतींत सरकारचें समाधानकारक उत्तर आलें नाहीं तर दिल्ली करार सरकारनें मोडला असें वर्किंग कमिटी समजेल व पुढील अटी मान्य करून करबंदीसह कायदेभंगाचा अवलंब करण्यास वर्किंग कमिटी राष्ट्राला विनंति करील.

( १ ) या झगड्याचें अहिंसात्मक स्वरुप तिच्या सर्व उपांगासह, जनतेला पटलेलें नसेल किंवा जीवित व मालमत्ता यांच्या हानीसह आत्मकष्ट सहन करण्याची जनतेची तयारी नसेल तर कोणताही प्रांत, जिल्हा, तालुका किंवा खेडें सत्याग्रहाचा अवलंब करण्यास बांधलें गेलें आहे, असें समजूं नये.

( २ ) अत्यंत गंभीर स्वरूपाचा प्रक्षोभकारक प्रसंग प्राप्त झाला तरी काया-वाचामनें करून अहिंसेचें व्रत पाळण्यांत आलें पाहिजे. जुलूम करणाराना जखमी करणें किंवा त्यांचा सूड घेणें या बुद्धीनें ही चळवळ सुरू करण्यात आलेली नाहीं तर आत्मकष्ट साहून व आत्मशुद्धि करून त्याच्या अंतःकरणांत क्रांति घडवून आणण्याच्या दृष्टीनें ही चळवळ सुरूं करण्यात आली आहे.

( ३ ) सरकारी अधिकारी, पोलीस व राष्ट्रविरोधी याना दुखविण्याकरितां सामाजिक बहिष्कार घालूं नये. असला बहिष्कार अहिंसेच्या भावनेशीं पूर्ण विसंगत आहे.

( ४ ) अहिंसायुक्त चळवळी द्रव्यसहाय्यावर अवलंबून नसनात हें लक्षात ठेवणें जरूर आहे. म्हणून भाडोत्री स्वयंसेवक याकामीं उपयोगात आणूं नयेत. पण शक्य असेल त्या ठिकाणीं उदरनिर्वाहास अगदीं जरूर असेल इतकीच मदत ते तुरुंगात गेले असताना किंवा मरण पावले असता त्याच्यावर अवलं-बून असलेल्या पुरुषाना व स्त्रियाना करावी. हालअपेष्टा झाल्या तरीं चळव-ळींत पडलेले कार्यकर्ते आपला झगडा असाच चालू ठेवतील अशी वर्किंग कमिटीला अपेक्षा आहे.

( ५ ) कोणत्याही परिस्थितींत ब्रिटिश व इतर परदेशी मालावर बहिष्कार घालणें अवश्य आहे असें समजावें.

( ६ ) सर्व कॉंग्रेसवाल्या स्त्रीपुरुषानीं हातसुताची व हातविणीची खादी वापरावी. स्वदेशी गिरण्यातील कापड वापरूं नये.

( ७ ) दारूच्या दुकानावर व परदेशी कापडाच्या दुकानावर पिकेटिंग करण्याची चळवळ जोरानें सुरूं करावी; ही चळवळ विशेषतः स्त्रियानीं करावी, व पूर्ण अहिंसा पाळण्यात येईल अशी खबरदारी मात्र घेण्यात यावी.

( ८ ) बिगरपरवाना मीठ तयार करावें व जमा करावें.

( ९ ) सभा व मिरवणुकी काढावयाच्या असतील तर जे लोक आपा-पली जागा न सोडता लाठीमाराला व गोळीबाराला तोंड देण्याला समर्थ असतील त्यानींच त्याला तोंड द्यावें.

(१०) जुलूम करणारानीं तयार केलेल्या मालावर बहिष्कार घालणें हें अहिंसा युद्धात देखील पूर्णपणें कायदेशीर आहे. त्याचप्रमाणें त्याच्याशीं व्यापारी संबंध

न ठेवणें जुलमाला वळी पडलेल्या माणसाचें कर्तव्य आहे. म्हणून ब्रिटिश माल व त्याचे कारखाने ह्याच्यावरील बहिष्काराची चळवळ पुन्हा जोराने हातीं घ्यावी.

( ११ ) ज्या ठिकाणीं योग्य व शक्य असेल त्या ठिकाणीं अनैतिक व जनतेला उपद्रवकारक अशा कायद्याचा सविनय भंग करावा.

( १२ ) खास कायद्यान्वयें केलेले सर्व अन्याय्य हुकूम मोडावे.

४. व्हाइसरॉयाचें प्रायव्हेट सेक्रेटरी ह्यानीं म. गांधींना केलेली तार. २ जानेवारी १९३२.

" १ जानेवारीची आपली तार पोहोंचली. व्हाइसरॉय व त्याचे सरकार यानीं तिच्यासंबंधीं विचार केला.

" काहीं विशिष्ट अटी मान्य करण्यात आल्या नाहींत तर पुन्हा कायदे-भंगाला सुरवात करावी असा ठराव तुमच्या सल्ल्यानें वर्किंग कमिटीनें केला याबद्दल त्याना फार दिलगिरी वाटत आहे.

" बादशहा सरकारनें आपले हेतु जाहीर केले असतां व मुख्य प्रधानाच्या जाहीर पत्रकाप्रमाणें सुधारणायोजना हिंदुस्थानात लागूं करण्याचें हिंदुस्थान सरकारनें ठरविलें असता, अशा प्रकारचें धोरण तुम्हीं स्वीकारावें ह्याबद्दल त्याना अधिकच दिलगिरी वाटत आहे.

" एखाद्या राजकीय संस्थेनें बेकायदेशीर कृत्य करण्याची धमकी दिली म्हणून कोणतेंही सरकार आपल्यावरील जबाबदारीला विसंगत असें कृत्य करणार नाहीं. चालू परिस्थितींत सरकारला जे उपाय योजणें आवश्यक वाटलें व शक्य ते इतर सर्व उपाय थकल्यानंतर अत्यंत काळजीपूर्वक व कसोशीनें पूर्ण विचार करून सरकारनें ज्या उपायाचा अवलंब करण्याचें ठरविलें, त्या बाबतींत तुमचा निर्णय घ्यावा व त्यावर आपलें धोरण अवलंबून ठेवावें, ही गोष्ट हिंदुस्थान सरकारलाही मान्य होणें शक्य नाहीं.

" कायदेभंगाचा पुन्हा अवलंब करण्याची धमकी दिली असतां व्हॉइस-रॉयानीं तुम्हाला मुलाखतीकरता बोलावणें ही गोष्ट फायद्याची होईल, असें तुम्हाला किंवा वर्किंग कमिटीला वाटेल, या कल्पनेवर व्हाइसरॉय किंवा त्याचे सरकार याचा मुळींसुद्धा विश्वास बसत नाहीं.

" कॉंग्रेसनें जी चळवळ करण्याचें जाहीर केलें आहे तिच्या सर्व प्रकारच्या परिणामाबद्दल तुम्हाला व कॉंग्रेसला जबाबदार धरलें जाईल व या परिस्थितीचा बंदोबस्त करण्याकरितां सरकार जरूर ते सर्व उपाय योजील. "

(५) गांधींची व्हाइसरॉयांच्या प्रायव्हेट सेक्रेटरींना तार, ३ जानेवारी १९३२.

"तुमची २ तारखेची तार पोहोंचली. आभारी आहे. व्हाइसरॉय व त्यांचे सरकार याच्या निर्णयाबद्दल अत्यंत दिलगिरी प्रदर्शित केल्याशिवाय राहावत नाहीं. प्रामाणिकपणे आपलें मत प्रदर्शित करणे हें धमकी दिल्यासारखें आहे, असें समजणे खरोखर चुकीचें आहे. कायदेभंग चालू असतांनाच दिल्लीच्या वाटाघाटी सुरूं झाल्या व त्या संपल्या. याची मी सरकारला आठवण देऊं इच्छितों. आणि ज्या वेळीं दिल्लीकरार झाला त्या वेळीं कायदेभंग अजिबात बंद करण्यांत आला नाहीं तर तो फक्त तहकूब ठेवण्यात आला, हेंही मी सरकारला कळवूं इच्छितों. लंडनला जाण्यापूर्वी सिमला येथें सप्टेंबरमध्यें ही गोष्ट व्हाइसरॉयाच्या व त्यांच्या सरकारच्या पुन्हा एकदां मी लक्षात आणून दिली होती. कॉंग्रेसला विशिष्ट परिस्थितींत पुन्हा कायदेभंगाचा अवलंब करावा लागेल असेंहीं मी सरकारला त्यावेळीं स्पष्टपणें बजाविलें होतें. इतकें असूनही सरकारनें वाटाघाटी करण्याचें टाळलें नाहीं. सरकारनें कायदेभंग केल्यास शिक्षा होते हें सांगणें म्हणजे कायदेभंग करणाराना काय बदला मिळतो हें सिद्ध करणें आहे; पण त्याचा माझ्या युक्तिवादावर काहीं परिणाम होत नाहीं. माझें धोरण सरकारला पसंत नसतें तर त्यांनीं मला लंडनला पाठविलें नसतें. उलट, मी गेलों त्या वेळीं व्हाइसरॉयांनीं मला आशीर्वादपर संदेश पाठविले. सरकारचें कोणतेंही धोरण माझ्या निर्णयावर अवलंबून रहावें असा हक्क मी सांगतों, असें सुचविणें हें रास्त व न्याय्यही नाहीं. परंतु सार्वजनिक संस्थाकडून किंवा त्याच्या प्रतिनिधींकडून आलेल्या सूचनाचा कोणतेंही प्रातिनिधिक व सनदशीर सरकार विचार करतें व लोकाना जे कायदे पसंत नसतील त्याबद्दल अशा संस्थांना शक्य ती माहिती पुरविण्याची मदत करतें, असें सांगावयास मला हरकत वाटत नाहीं. शेवटल्या व्याख्यात मी जें माझें मत कळविलें आहे त्याचा याशिवाय दुसरा काहीं अर्थ नाहीं. कोणाचें म्हणणें योग्य व न्याय्य होतें हें एकटा कालच ठरवील. मी एवढें सांगूं इच्छितों कीं, कॉंग्रेस ही चळवळ अगदीं निर्मत्सरबुद्धीनें व पूर्ण अहिंसायुक्त मार्गानें चालवील. कॉंग्रेसतर्फे मी हें आश्वासन सरकारला देत आहे. आमच्या कृत्याचें जे काहीं परिणाम होतील त्याबद्दल कॉंग्रेस व तिचा नम्र प्रतिनिधी असलेला मी स्वतः जबाबदार आहें, हें सांगण्याची आवश्यकता होती, असें मला वाटत नाहीं.

या तारा परस्पराकडे पाठविण्याचें काम ६ दिवस चालूं होतें, पण सोयीच्या

दृष्टीनें त्या सर्व एकत्र दिल्या आहेत. ३० सप्टेंबर रोजीं गोलमेज परिषदेला हिंदुस्थानतर्फे व्यापारी प्रतिनिधी म्हणून हजर असलेले मि. बेन्थॉल महात्मा गांधींना भेटले व महात्मा गाधींशी त्याचें बरेच बोलणें झाले. व्यापारी वर्गाच्या दृष्टीने गांधीचें धोरण भयप्रद होते यात शंका नाहीं. यापुढें ज्या गोष्टी घडून आल्या व जो अनुभव मिळाला त्यावरून बहिष्कार हे राष्ट्राच्या हातांतील किती प्रबल शस्त्र आहे, हें सिद्ध झाले. पण मि. बेंथॉल व त्याचे राजनिष्ठ दोस्त यांनीं ज्या भाषेंत आपले विचार प्रगट केले त्यातलि तीक्ष्णपणा इतक्या काळानंतरही नष्ट झाला नाहीं. या लोकांनीं गोलमेज परिषदेहून आल्यानंतर जे खासगी सर्क्युलर काढलें त्यातील सारांश खालीं देत आहों.

शक्य झालें तर कांहीं तरी तडजोड घडवून आणावी या निश्चयानें आम्हीं लंडनला गेलों होतों. पण त्याचवेळीं आर्थिक व व्यापारविषयक संरक्षक निर्बंध ठेवण्याच्या बाबतींत युरोपियन असोसिएटेड चेंबर्स ऑफ कामर्स व युरोपियन असोसिएशन या संस्थानीं ठरविलेल्या धोरणात माघार घ्यावयाची नाहीं, असा आम्ही निश्चय केला होता, कॉंग्रेस, हिंदुमहासभा, व इंडियन फेडरेटेड चेंबर्स ऑफ कामर्स यांचें संयुक्तबल पूर्वी सुचविण्यात आलेल्या संरक्षक निर्बंधाची छाटाछाट करण्याच्या कामीं उपयोगात आणलें जाईल ही गोष्ट आम्हाला उघड दिसत होती.

या अखेरच्या अधिवेशनाच्या परिणामांकडे पहाल तर तुम्हाला असें दिसून येईल कीं, गाधी व इंडियन फेडरेटेड चेंबर्सचे प्रतिनिधि सेंट जेम्स राजवाड्यात जाऊन बादशहाची मुलाखत घेऊन आले तरीसुद्धां ब्रि. सरकार पासून एकही सवलत ते मिळवूं शकले नाहींत.गाधी रिक्त हस्तानें पुन्हा हिंदुस्थानात परत आले.

आणखी एक प्रसंग या वेळीं घडून आला व त्यातही त्याना यश आलें नाहीं. जातीय प्रश्न सोडविण्याचें काम त्यानीं हातीं घेतलें, पण त्यातही सर्व जगापुढें त्याची फजिती झाली.

मुसलमानाचा भरभक्कम उत्साही गट तेथें हजर होता. अली इमाम हे राष्ट्रीय मुसलमान गृहस्थ त्यात फूट पाडूं शकले नाहींत. पहिल्यापासून शेवटपर्यंत मोठ्या कुशलतेनें ते डाव खेळत होते, आम्हाला पाठिंबा देण्याचें त्यांनीं

वचन दिलें. या वचनाप्रमाणे ते पूर्णपणें वागले. त्यानीं भरपूर पाठिंवा दिला. आणि याच्या मोबदला म्हणून त्यांनीं आम्हाला अशी विनंति केली कीं, बंगालमधील मुसलमानाची आर्थिक हीन स्थिति लक्षात घेऊन त्याना आम्ही विसरूं नये, युरोपियन कंपन्यातून व कारखान्यातून मुसलमानांना जागा द्याव्या, आर्थिक स्थिति सुधारण्याची व एकंदरीनें मुसलमान समाजाची सामान्य राहाणी सुधारण्याची त्याना संधि द्यावी.

एकंदरींत ब्रिटिश राष्ट्राचें व हिंदुस्थानातील ब्रि. समाजाचें एकच सामान्य धोरण ठरलेलें होतें व तें म्हणजे आपल्या राष्ट्रीय धोरणाला चिकटून राहाणें हें होय. परंतु जनरल इलेक्शननंतर सरकारच्या बहुमतवाल्या पक्षानें परिषद मोडण्याचें व परिषद व कॉंग्रेस याच्याशीं दोन हात करण्याचें ठरविलें. मध्यवर्ती सरकारात मुसलमानाना जबाबदारी नको होती त्यामुळें त्यांना आनंदच झाला. सरकारनें निःसंशय आपलें धोरण बदललें. वरिष्ठ सरकारात कांहीं सुधारणा व प्रांतिक स्वराज्य यावरच भागविण्याचें त्यानें ठरविलें. कॉंग्रेसशीं दोन हात करणें अगदीं अपरिहार्य आहे हें तर आम्ही आमच्या मनाशीं निश्चित केलें होतें. हा प्रसंग जितका लवकर येईल तितकें चागलेंच असें आम्हाला वाटत होतें आणि कॉंग्रेसवर पूर्ण विजय संपादन करावयाचा असेल तर हिंदुस्थानातून आलेले जे जे पुढारी आपल्याला मिळण्याचा संभव असेल त्या सर्वांना आपलेसें करून टाकण्याचा आम्ही निश्चय केला होता. मुसलमान तर खंबीर होते. मायनॉरिटी पॅक्ट व सरकारचें सामान्य धोरण आम्हाला अनुकूल होतें. व त्याचप्रमाणें संस्थानिक व अल्पसंख्याक लोक आमचे बाजूस होते.

रस्त्यावरून जाणाऱ्या येणाऱ्या हिंदूला आपल्या बगलेंत कसें मारावयाचें, हा आमच्यापुढें महत्वाचा प्रश्न होता. सप्रू, जयकर, पेट्रो व इतर कांहीं पुढारी या हिंदूंचे प्रतिनिधी म्हणून लंडनला आले होते. कॉंग्रेसविरुद्ध लढा चालविण्यास हे लोक आम्हाला मिळवितां आले नाहींत तरी निदानपक्षीं कॉंग्रेसला पाठिंवा देण्यास ते तयार होणार नाहींत अशी खात्रीलायक परिस्थिति निर्माण करता येईल असें आम्हाला वाटत होतें. याकरिता अगदीं साधा उपाय होता. फेडरल योजनेच्या मार्गे सरकार जाणार नाहीं याबद्दल त्याचीं मनें निःशंक करता आलीं तर तेवढ्यानें हें काम भागणार होतें; युरोपियन जमातीनेंही या योजनेला सामान्यपणें संमति दिली होती. आम्ही

बरोबर त्याप्रमाणे वागलों. या लोकांचे समाधान करावयाचें असल्यास प्रांतिक व वरिष्ठ सरकारच्या योजना एकत्र निगडित केल्या पाहिजेत ही गोष्ट आम्ही सरकारच्या मनावर बिंबविली. प्रांतिक स्वायत्तता हिंदुस्थानावर लादतां याव-याची नाहीं. एकटे मुसलमान तिची अमलबजावणी करूं शकणार नाहात. कोंग्रेसचे प्रांत मान्य केल्यास गंभीर स्वरूपाच्या अडचणी उपस्थित होतील हे आम्हाला माहित होते. प्रत्येक प्रांत कलकत्ता कॉरपोरेशनच बनेल. म्हणून आम्ही दुसऱ्याच अपरिचित मित्राशीं संगममत केले व ही परिषद हिंदू राजकीय हिंदुस्थान आमच्या विरुद्ध गेल्यामुळे शेंकडा १०० टक्के मोडून अयशस्वी होण्याऐवजीं शे. ९९ टक्के सहकारितेचीं अभि-वचने मिळून समाप्त झाली. या सहकारवाद्यात पं. मालवीयही होते. खुद्द गांधी मात्र स्टॅडिंग कमिटींत काम करण्यास तयार झाले नाहीत.

मुसलमान युरोपियनांचे कट्टे दोस्त झाले. त्यांना जीं अभिवचनें मिळाली होतीं,तेवढ्यावरच ते खुष होते. ते आमच्याबरोबर काम करण्यास तयार झाले.

सुधारणा आवश्यक आहेत असें आम्हीं ज्या वेळी म्हणतों त्या वेळीं प्रत्येक प्रांतांत लोकसत्तात्मक तत्त्वावर सुधारणायोजना लागूं कराव्या, असें आम्ही म्हणत नाहीं. आमचें म्हणणे एवढेंच कीं, सरकारच्या राज्यपद्धतींत असाच फरक घडवून आणावा कीं त्यामुळे सरकारी कामकाजातला चोखपणा अधिक वाढेल.

हिंदुस्थानच्या दर्जाप्रमाणे स्वराज्याचे हक्क देण्यात येतील, असे मजूर सरकारनें जाहीर आश्वासन दिलें होतें; पण हा हेतू मोडून काढण्याच्या कामीं टोरी सरकारनें कसे प्रयत्न केले, हे या खासगी पत्रकावरून पूर्णपणें कळून येण्यासारखे आहे. तसेंच मासाच्या तुकड्याकरितां आपलें राष्ट्र विक-ण्यास तयार असलेल्या* राष्ट्रविरोधी मुसलमानांनीं व युरोपियनानीं आपसात जो करार केला तो अगदीं एकाएकीं झाला. त्याच्या पूर्वी कांहींच कारवाई झालेली नव्हती असें समजणें चुकीचें आहे. हेंही या पत्रकावरून

* गोलमेज परिषदेंत बजावलेल्या कामगिरीबद्दल बक्षीस म्हणून हिंदुस्था-नांतील एखाद्या प्रांताचे आपल्याला राजे बनवावे अशी मागणी सर आगाखान यांनीं केली होती, अशी बातमी असेंब्लीच्या बैठकींत बाहेर आली त्यावरून वरील विधानाच्या सत्यतेवर बराच प्रकाश पडतो.

समजून येण्याजोगें आहे. या कटाचा पाया परिषदेच्या दुसऱ्या अधिवेशना-पूर्वीच हिंदुस्थान व इंग्लंड यांच्यात रचण्यात आला होता. म. गांधी व लॉर्ड आयर्विन यांच्यांत करार झाला ही गोष्ट हिंदुस्थानांतील ज्या प्रतिरोधी लोकां-ना आवडली नाहीं त्यांनीं तावडतोब आपली जमवाजमव केली व हिंदी राष्ट्रीय पक्षाला पराभूत करण्याकरिता संघटित तयारी केली.

हिंदुस्थानसरकारचें मुख्य ठाणें सिमला येथेंच या कटांतील कारस्थानें करण्यात आलीं होतीं.

मि. इमर्सन व लॉर्ड विलिंग्डन यांनीं दिलेलें आव्हान वर्किंग कमिटीनें स्वीकारलें व कमिटीचे सभासद आपापल्या गांवीं गेले व त्यानंतर त्यांना फारसें काम पडलेंच नाहीं. ४ मार्च १९३१ रोजीं हातातून खालीं ठेवलेली दडपशाहीची सूत्रें सरकारनें पुन्हा हातीं घेतलीं. तहकुबीच्या काळात हजारों लोकांची मागणी सरकारनें केलेली होती. तहकुबीचा काल म्हणजे सरकारच्या तयारीचाच काल होता. पुन्हा झगडा सुरू झाल्याबरोबर त्याला तोंड देण्या-साठीं जय्यत तयारी सरकारनें करून ठेवली होती. तहकुबीच्या कालात कोण-त्याही महिन्यांत लढाईला तोंड लागलें असते. गांधीजींच्या आगमनानंतर तर हा झगडा सुरूं होणार हें निश्चितच होतें. तीन फर्मानी कायदे जारी करण्यात आलेच होते व मागणी केल्याबरोबर पुरवठा करण्याकरिता बाकीचे कायदे व्हाइसरॉयांनीं आपल्या खिशात तयार ठेवले होते. ४ जानेवारी १९३२ रोजीं सरकारतर्फें चढाईला सुरुवात झाली. कॉंग्रेसची प्रत्येक संस्था व तिच्याशीं संबंध असलेल्या सर्व संस्था सरकारनें बेकायदा ठरविल्या. कॉंग्रेसवाल्यास मग त्यांनीं सामान्य कायदा व खास कायदा मोडलेला असो वा नसो सर्वांना पकडण्यात आलें व तुरुंगात टाकण्यात आलें. आम्हाला तक्रार करण्यास जागाच नव्हती. विरामाचा काल संपला होता व ड्रिल मास्तरानें "जैसे थे" चा हुकूम दिलेला होता. खरोखरीच कॉंग्रेसवाल्यानाच त्यांच्या इच्छेप्रमाणें सर्व गोष्टी करूं दिल्या असत्या तर आपापल्या जुन्या तुरुंगाची त्याची वाट धरली असती व आपापल्या बराकींतून व खोल्यातून ते जाऊन राहिले असते. पण असली असामान्य व बेकायदा कृति करण्यास लागणारें धैर्य सरकारच्या अंगीं नव्हतें. परंतु कायदेभंगाच्या चळवळींत जे नाट्यमय प्रसंग घडून येतात तसलेही प्रसंग घडून यावे, अशी सरकारची इच्छा नव्हती.

सरकारनें खालीं ठेवलेलीं सूत्रें पुन्हा हातात घेतलीं, पण कॉंग्रेसला मात्र पुन्हा पहिल्यापासून सर्व गोष्टींना आरंभ करावा लागला. १९३० च्या पहिल्या मोहिमेंत लाठीमाराचा प्रवेश अखेरच्या अंकांत झाला. परंतु १९३२ मध्यें या दोस्तानें सत्याग्रहीचे अगदीं पहिल्यादाच स्वागत केले. ही चळवळ सहा आठवड्यात मोडून काढावयाची, अशी लॉर्ड विलिंग्डन याची उमेद होती, असें म्हणतात; पण सत्याग्रहासारख्या लावट व चिवट चळवळीच्या दृष्टीनें सहा आठवडे फारच कमी पडतात, यामुळें लॉर्ड विलिंग्डन याची उमेद पूर्ण होणें शक्यच नव्हतें. १९३० सालीं गुजराथेंतील ज्या तालुक्यानीं अत्यंत हालअपेष्टा सहन केल्या त्याना भेट देण्याचा म. गांधींचा विचार होता. परंतु असें करण्यापूर्वी ते व त्याचे लेफ्टनन्ट सरदार वल्लभभाई पटेल याना ४ जानेवारी रोजीं पहाटे पकडण्यात आलें व राजकीय कैदी गुप्तपणें लांबविण्यांत आले खानसाहेब व जवाहरलाल यानीं यापूर्वीच आघाडी मारली होती.बाकीचे हिंदी राजकीय पुढारी त्याच्या मागून पकडण्यात आले.हजारों सत्याग्रही यावेळीं पुढें आले. १९२१ सालीं ३०००० ही फार मोठी संख्या असें मानण्यात येत होते. १९३०–३१ सालीं अवघ्या१० महिन्यांत९०००० स्त्री, पुरुष व मुलाना शिक्षा झाल्या व तुरुंगवास सहन करावा लागला. किती लोकाना लाठ्यांचा मार खावा लागला याची गणना करता यावयाची नाहीं, परंतु ही संख्या तुरुंगात जाणाऱ्या लोकापेक्षा तीन किंवा चार पटीनें मोठी असली पाहिजे यात शंका नाहीं. लोकाना बेदम मारून काढून त्यांना निकामी करून टाकण्यात येत असे किंवा उंदीर माजराचा खेळ करून त्यांना दमवून टाकण्यांत येत असे. तुरुंगातील कैयाना मारण्याचा सपाटा पुन्हा सुरू करण्यात आला. कॉंग्रेस ऑफिससंबंधाच्या सर्व गुप्त गोष्टी बाहेर काढण्याकरिता कैयाचा छळ करण्यात येऊं लागला. तुमचे कागदपत्र कोठें आहेत, तुमचीं पुस्तकें कोठें आहेत, तुमच्या वर्गणीदाराच्या व स्वयंसेवकाच्या याद्या कोठें आहेत? असें तरुण लोकाना विचारण्यात येऊं लागले व नाना प्रकारच्या अवर्णनीय व असह्य शिक्षा त्याना देण्यात येऊं लागल्या.

नवेनवे प्रसंग गाठून नवेनवे फर्मानी कायदे जारी करण्यांत आले. हे कायदे वेळोवेळीं जारी करण्यात आले तरी त्याचा एके ठिकाणींच नामनिर्देश करणें सोयीचें होईल. गांधीजी लंडनमध्यें असतानाच बंगालमध्यें जादा कायदा लागू करण्यांत आला आहे हें मागें सांगण्यात आलें आहे.

वंगालमधील दहशतवादी चळवळ हाणून पाडण्याकरितां व त्या भागांत होणाऱ्या गुन्ह्याची चौकशी करणें सोपें जावें म्हणून हा कायदा जारी करण्यात आला, असें त्यावेळीं जाहीर करण्यांत आलें होतें. ज्या इसमावर वहीम असेल त्याला पकडण्याचा व एक दिवसभर अटकेंत ठेवण्याचा अधिकार कोणत्याहि सरकारी अधिकाऱ्याला या कायद्यानें देण्यात आला होता. या इसमाला अटक करण्याकारिता जरूर वाटेल त्या साधनाचा उपयोग करण्याची मुभा या अधिकाऱ्याना देण्यात आली होती. कोणत्याही इमारतीच्या मालकानें आपली सर्व इमारत आंतील सामानसुमानांसह कोणत्याही मुदतीपर्यंत नुकसानभरपाईचा विचार न करता सरकारी अधिकाऱ्याच्या ताब्यात दिली पाहिजे असें या कायद्यात नमूद करण्यात आलें होतें. तसेंच नुकसानभरपाई देऊन किंवा न देऊनही कोणतीहि वस्तु आपल्या ताब्यात देण्याबद्दल तिच्या मालकाला हुकूम करण्याचा अधिकार डि. मॅजिस्टेटला देण्यात आला होता. कोणत्याही इमारतींत किंवा जागेंत रेलवे वगैरे सुद्धा प्रवेश करावा किंवा न करावा असा हुकूम करण्याचा अधिकार। डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेटला देण्यात आला होता. लोकाच्या रहदारीवरही त्याला नियंत्रण ठेवता येत असे व कोणत्याही इसमापासून त्याचीं वाहनाचीं साधनें आपल्या ताब्यात घेण्याचा अधिकार त्याला देण्यांत आला होता. कायदा व व्यवस्था राखण्याच्या कामीं मदत करण्यास कोणत्याहि जमीनदाराला किंवा शिक्षकाला डि. मॅजिस्ट्रेट या कायद्याच्या जोरावर भाग पाडूं शकत असे. तो झडतीची वारंटें काढूं शकत असे व विशिष्ट क्षेत्रात राहणाऱ्या लोकाना सामुदायिक दंड करण्याचा अधिकार या कायद्यामुळें स्थानिक अधिकाऱ्याना मिळालेला होता. या कायद्याचा भंग केल्यास ६ महिन्याची कैद व दंड अशा शिक्षा ठेवलेल्या होत्या. आर्डिनन्स खालीं झालेल्या कोणत्याही शिक्षेविरुद्ध सिव्हिल कोर्टांतून अपील करण्याचा अधिकार नसे; स्थानिक अधिकाऱ्याना जरूर वाटेल त्या खटल्याची चौकशी करण्याकारितां स्पेशल ट्रायब्यूनल नेमण्याचा अधिकार देण्यात आला होता. या स्पेशल ट्रायब्यूनल पुढें खटले चालविण्याकरिता नवे नियम करण्याचा अधिकारही त्याना देण्यात आला होता. आरोपी हजर नसतानाही काहीं विशिष्ट परिस्थितींत स्पेशल-ट्रायब्यूनललाच खटले चालविण्याचा अधिकार दिला होता.

युनायटेड प्रॉव्हिन्सेस इमर्जन्सी पॉवर्स ऑर्डिनन्स १४ डिसेंबर १९३१ रोजीं जारी करण्यात आला. खंडबंदीच्या चळवळीला आळा घालण्याच्या दृष्टीनें या कायद्यानें अनेक जादा अधिकार स्थानिक अधिकाऱ्याना दिले होते. २४ डिसेंबर १९३१ रोजीं सरहद्द प्रांतांत तीन फर्मानी कायदे जारी करण्यात आले. खंडबंदीच्या बाबतींत जीं कलमें सं. प्रांतातील खास कायद्यात नमूद करण्यात आलीं होतीं तीं या कायद्यापैकीं एका कायद्यात घालण्यात आलीं होतीं. बाकीच्या दोन कायद्यापैकीं एक एन्. डब्ल्यू. एफ्. पी. इमर्जन्सी पॉवर्स ऑर्डिनन्स व दुसरा एन. डब्ल्यू. एफ्. पी. अनलॉफुल असोसिएशन ऑर्डिनन्स या नांवानें प्रसिद्ध होता. या कायद्यानें स्थानिक अधिकाऱ्याना अत्यंत व्यापक प्रमाणावर जादा अधिकार बहाल करण्यात आले होते. वैयक्तिक जीवन व त्याचप्रमाणें सामुदायिक जीवन ह्याच्यावर स्थानिक अधिकाऱ्याचेंच नियंत्रण या कायद्यानें घालण्यात आलें होतें. कोणालाही, केंव्हाही वहिमा-वरून अटक करण्याचा व तुरुंगात डाबून ठेवण्याचा अधिकार स्थानिक अधिकाऱ्याना मिळाल्यामुळें ते 'कर्तुमकर्तुं अन्यथाकर्तुम्' असें वागण्यास समर्थ झाले होते. समाजाचें जीवित व मालमत्ता जिल्हाधिकाऱ्याच्या पूर्ण-पणें ताब्यात देण्यात आली होती आणि हें सर्व शांति व व्यवस्था राखण्या-च्या निमित्तानें सरकार करीत होतें.

४ जानेवारी १९३२ रोजीं चार नवे खास कायदे जारी करण्यात आले. [१] इमर्जन्सी पॉवर्स ऑर्डिनन्स. [ २ ] अनलॉफुल इन्स्टिगेशन ऑर्डिनन्स, [३] अनलॉफुल असोसिएशन ऑर्डिनन्स, [ ४ ] प्रिव्हेन्शन ऑफ मोलेस्टेशन आणि बॉयकॉट ऑर्डिनन्स हे ते चार खास कायदे होत. ह्या सर्व कायद्याचें स्वरूप थोडक्यात पुढीलप्रमाणें देता येईल. कोणत्याही इसमाला वहिमावरून अटक करणें, त्याला तुरुंगात डावून ठेवणें, त्याच्या हालचालीवर निर्बंध घालणें, इमारती ताब्यात घेणें, इमारतींत कोणी जावें व कोणी जाऊं नये, यावर निर्बंध घालणें, व्यापारव्यवहारावर निर्बंध घालणें, रेल्वेच्या वहातुकी-वर नियंत्रण ठेवणें, सामान्य उपयोगाच्या मालाचा पुरवठा व विक्री यांच्या-वर नियंत्रण घालणें, स्पेशल पोलीस ऑफिसर नेमणें, जमिनदार व शिक्षक याच्याकडून शांततारक्षणाचीं कामें करून घेणें, लोकोपयोगी साधनावर नियं-त्रण ठेवणें, पोस्ट ऑफिस, तारायंत्र व वैमानिक दळणवळण याच्यावरही ताबा चालविणें, रेल्वे-आगबोटी याच्यातील उतारूंवर नियंत्रण, या बाबतीं-

तही जरूर ते नियम करणें, सभांच्या वेळीं पोलिस-अधिकाऱ्यांना हजर ठेवणें, स्पेशल कोर्ट निर्माण करणें, ह्या कोर्टांतून काम चालविण्याकरिता नवीन नियम तयार करणें, नवे गुन्हे करणाराना खास शिक्षा देणें, वगैरे.

एकंदरींत वरील सर्व अधिकारांचा विचार केला असतां ह्या कायद्यांचें स्वरूप किती भयंकर होतें याची कल्पना करतां येण्याजोगी आहे. मोलेस्टेशन व प्रिव्हेन्शन ऑफ बॉयकॉट ऑर्डिनन्स या जादा कायद्यात आणखी एक विशेष होता. एकाद्या माणसानें एकाद्याला त्रास दिला, त्याच्यावर बहिष्कार घातला किंवा हा त्रास देण्याच्या कामीं किंवा बहिष्कार घालण्याच्या कामीं मदत केली तर असल्या गुन्ह्याला ६ महिन्याची शिक्षा व दंड ठेवण्यांत आला होता. एकाद्यानें एकाद्याला त्रास दिला याची व्याख्या तर फारच विचित्र करण्यांत आली होती. एकाद्याच्या कामात अडथळा केला, धमकी दिली, त्याच्या घराभोंवतीं तो हिंडला, घराजवळून गेला, एकादा एकाद्याच्या मागून गेला, ह्या सर्व गोष्टी त्रास देण्याच्या सदरात घालण्यात आल्या होत्या. बहिष्काराची व्याख्या देखील अशीच होती. एकाद्याशीं व्यवहार करण्याचें नाकारणें, त्याला माल न देणें, एकाद्याचा माल विकत न घेणें, घर किंवा जमीन भाड्यानें घेण्याचें नाकारणें, एकादी नेहमींची चालत आलेली नोकरी करण्याचें नाकारणें, आपल्या धंद्याचें काम करण्याचें नाकारणें, व्यावहारिक संबंध न ठेवणें, और्ध्वदेहिक समारंभासारखे खोटे समारंभ करणें, हीं सर्व कृत्यें बहिष्काराच्या क्षेत्रात गुन्हा म्हणून समजलीं जात होतीं व असले गुन्हे करणारांना ६ महिन्यांची शिक्षा किंवा दंड करावा असें या कायद्यात म्हटलें होतें.

हे खास कायदे जवळ जवळ सर्व देशालाच लागूं करण्यात आले. जेंव्हा ह्या कायद्याची मुदत संपली त्या वेळीं १९३२ नोव्हेंबरमध्यें ती पुन्हा वाढविण्यात आली व त्याना कायदेमंडळातून कायमच्या कायद्याचें स्वरूप देण्यात आलें. वृत्तपत्रें व छापखानेसुद्धा या कायद्यांतून सुटले नाहींत.

२६ मार्च १९३२ रोजीं कॉमन्स सभेंत भाषण करतांना हे कायदे भयंकर व कडक आहेत असें सर सॅम्युअल होअर यानीं कबूल केलें. "हिंदी लोकांच्या जीवनातील प्रत्येक हालचालीवर ह्या कायद्यामुळें नियंत्रण घालण्यात आलें आहे. हिंदुस्थानसरकारनें आपल्याला मिळालेल्या माहितीवरून असे कायदे जारी करणें जरूर आहे असें म्हटलें आहे. सरकारच्या राज्यपद्धतीच्या

मुळावरच घाव घालण्यांत येत आहे आणि असले कायदे न केल्यास हिंदुस्थानांत अराजकता माजेल असें हिंदुस्थानसरकारला प्रामाणिकपणें वाटूं लागलें आहे, " असें सर सॅम्युअल होअर, या प्रसंगीं म्हणाले. पं. मदनमोहन मालवीय यानीं अकराशें शब्दाची एक तार इंग्लंडला पाठविली. परंतु पोस्टाच्या अधिकाऱ्यांनीं ठरलेल्या दराप्रमाणें ती पाठविण्याचें नाकारलें. वृत्तपत्राच्या कायद्याची मुदत ९ आक्टोबर १९३१ रोजीं संपली. प्रेस-लॉ कायदेबुकात कायमचा नमूद करण्यात यावा अशीं कलमें १९३२ च्या क्रि. लॉ. अमेंडमेंट बिलामध्यें घालण्यांत आलीं होतीं. १९१० सालच्या प्रेसअॅक्टाप्रमाणेंच ह्या प्रेसलॉमधील कलमें होतीं. गव्हर्नमेंट ऑफ इंडिया ऑर्डिनन्सेस व ऑर्डिनन्स बिल याशिवाय १९३२ च्या नोव्हेंबरमध्यें मुंबई सरकारनें प्रॉव्हिन्शिअल ऑर्डिनन्स बिल पास करून घेण्याचें ठरविलें. करबंदीच्या चळवळीला विरोध करण्याकरिता लागणाऱ्या सर्व अधिकाराची तरतूद या कायद्यात मुंबई सरकारनें करून घेतली होती. १९३१ सालींच असले जादा कायदे व दडपशाहीचे उपाय योजण्याचें ठरविण्यात आलें होतें. युरोपियन असोसिएशनच्या मुंबई शाखेच्या सेक्रेटरीनें मुंबई सरकारच्या होम डिपार्टमेंटच्या सेक्रेटरीला एक पत्र १५ आक्टोबर १९३१ च्या सुमारास पाठविलें होतें. पुण्यातील युरोपियनानीं मुंबईच्या गव्हर्नराना मानपत्र दिल्यानंतर हा पत्रव्यवहार सुरू झाला होता. या समारंभाच्या प्रसंगीं ना. गव्हर्नरांच्याकडे युरोपियनाचें जें शिष्टमंडळ गेलें होतें त्यानें कायदेभंग पुन्हां सुरू झाल्यास सरकारनें तावडतोब कणखर व निश्चित स्वरूपाचें धोरण स्वीकारलें पाहिजे, असें त्या शिष्टमंडळानें ना. गव्हर्नरसाहेबाना सुचविलें होतें. युरोपियन असोसिएशनच्या सेक्रेटरीनींहि आपल्या पत्रात हाच उपाय सुचविला होता. गोलमेज परिषदेचें काम चालू असता हिंदुस्थानांत असे प्रयत्न चालले होते ही गोष्ट लक्षात ठेवण्यासारखी आहे. युरोपियनाच्या शिष्टमंडळानें पुढील प्रकारच्या निश्चित सूचनाही केल्या होत्या.

कॉंग्रेसच्या झेंड्याला मनाई करण्यात यावी, स्वयंसेवकाच्या कवायतीला व परेडला बंदी करण्यांत यावी, पूर्वी कायदेभंग केलेल्या लोकाना अटक करण्यांत यावी, युद्धाच्या काळात पाडाव करून आणलेल्या शत्रुपक्षाच्या लोकाप्रमाणेंच या कायदेभंगी लोकांना मानण्यांत यावें, त्यांना त्याच तऱ्हेनें वागविण्यात यावें, कॉंग्रेसच्या फंडाचें उगमस्थान शोधून काढून त्याचा

तिथल्या तिथें बंदोबस्त करावा, ज्या गिरण्यांनीं कांग्रेसच्या अटी मान्य केल्या आहेत त्यांनीं जर ही मान्यता झुगारून दिली नाहीं तर त्या गिरण्यांना वाहतुकीच्या बाबतींतील सवलती देण्यांत येऊं नयेत. राजकीय चळवळ व बहिष्कार यांचा आर्थिक दृष्टया फायदा करून घेण्याची कोणालाही संधि घेऊं देऊं नये.

१९३०-३१ सालीं ज्या धोरणानें हा लढा चालू होता, त्याच धोरणाबरहुकूम १९३२-३३ सालींहि चळवळीला सुरवात झाली. फरक एवढाच होता कीं १९३२ सालचें युद्ध त्यापेक्षा अधिक तीव्र होतें व यात सामील झालेले स्वयंसेवक पूर्वीपेक्षा अधिक निश्चयानें या लढ्यांत सामील झाले होते. या वेळची दडपशाहीसुद्धा अधिक तीव्र स्वरूपाची होती व या वेळच्या हाल-अपेष्टाचें स्वरूपही अधिक खडतर होतें.

महात्मा गांधी व कॉंग्रेसचे अध्यक्ष सरदार वल्लभभाई पटेल यांना अटक करून सरकारनें आपल्या चढाईच्या हल्ल्याला सुरुवात केली. ४ जानेवारी रोजीं पहाटे त्यांना पकडण्यात आले व वर निर्दिष्ट केलेले खास कायदेही त्याच-दिवशीं जाहिर करण्यात आले. दुसऱ्या अनेक प्रांतानाही हे कायदे लागू कर-ण्यात आले होते. पुढें थोड्याच दिवसात सर्व देशाला ते लागू करण्यात आले. पुष्कळ प्रांतिक व त्या खालच्या कॉंग्रेस कमिट्या, आश्रम, राष्ट्रीय शाळा, व इतर राष्ट्रीय संस्था बेकायदा ठरविण्यांत आल्या व त्याच्या इमारती, सामान-सुमान, पैसा व इतर जंगम माल जप्त करण्यात आला. देशातील प्रसिद्ध कॉंग्रेसच्या पुढाऱ्याना तावडतोब पकडण्यात येऊन त्याना जेलमध्यें कोंबण्यात आलें. जो ज्या ठिकाणीं होता तेथेंच त्यानें कामाला सुरुवात केली. १९३० मध्यें वर्किंग कमिटींत ज्याप्रमाणें रिकाम्या झालेल्या जागा भरण्यांत येत तशा भरण्यांत येऊं नयेत असें ठरविलें व सरदार वल्लभभाई यानीं आपल्या मागें एकामागून एक कोणी जागा स्वीकाराव्या याची यादी तयार केली होती. वर्किंग कमिटीनें आपले सर्वाधिकार अध्यक्षाना अर्पण केले होते आणि अध्यक्षानींहि त्याचप्रमाणें आपल्या मागून येणाऱ्या अध्यक्षाला आपले सर्वाधिकार दिले होते व या अध्यक्षानीं पुढें तसेंच करावयाचें ठरविण्यात आलें होतें. प्रांतात सुद्धा ज्या ठिकाणीं हीं गोष्ट शक्य होती त्या ठिकाणीं प्रां. कॉं. कमिटीचे सर्वाधिकार एका व्यक्तीच्या हातींच देण्यात आले व त्याचेंच अनुकरण जिल्हा, तालुका, पेटा, व खेड्यात

देखील करण्यांत आलें- याच व्यक्तींची डिक्टेटर या नावानें लोकांत प्रसिद्धि झाली. कायदेभंगाकरितां कोणत्या कायद्याची निवड करावयाची ही या चळवळींतील पुढाऱ्याना एक अडचणीची गोष्ट असते. कोणताही कायदा किंवा प्रत्येक कायदा मोडावयाचा नसतो हें तर उघडच आहे. अनेक भानगडी असलेल्या जादा कायद्यांनीं कॉंग्रेस पुढाऱ्यांना भासत असलेली ही अडचण दूर केली. निरनिराळ्या प्रांतांत यांपैकीं निरनिराळ्या कलमांचा भंग करण्याचें ठरविण्यांत आलें. कॉंग्रेसचे हंगामी अध्यक्षही वेळोवेळीं कोणत्या कलमांचा भंग करावयाचा हें दाखवून देत असत. दारू, परदेशी कापड व ब्रिटिश माल याच्या दुकानावरील पिकेटिंग हें कलम सर्व प्रातांत सामान्य होऊन बसलें होतें. सं. प्रांतांत मोठ्या प्रमाणावर व बंगालमधील कांहीं भागात खंडबंदी हें महत्त्वाचें कलम कायदेभंगाकरिता निवडण्यांत आले होतें. बिहार व बंगाल मध्ये चौकीदारी कर देण्याचें नाकारण्यांत आलें होतें. मध्यप्रांत, वऱ्हाड, कर्नाटक, सं. प्रांतांतील कांहीं ठिकाणीं, मद्रास इलाखा व बिहार या प्रांतातून जंगलकायदे मोडण्यात आले. मीठ तयार करून, जमा करून किंवा बेकायदा मीठ विकून कांहीं ठिकाणीं कायदेभंग करण्यात आला. सभा व मिरवणुकी यांना मनाई करण्यांत आली तेव्हा हे मनाई हुकूम मोडण्यात आले. या लढ्याच्या प्रारंभींच्या दिवसात कांहीं खास दिवस पाळणें हा एक लोकप्रिय विषय होऊन बसला होता. काहीं विशेष प्रसंगाच्या स्मरणार्थ किंवा एकाद्या प्रसिद्ध व्यक्तीच्या गौरवार्थ हे दिवस पाळण्यांत येत असत. याप्रमाणें गांधीदिन, मोतीलाल दिन, सरहद्ददिन, हुतात्मा दिन, झेंडावंदन दिन वगैरे अनेक दिन पाळण्यांत आले. कॉंग्रेस कचेऱ्या व आश्रम सरकारनें आपल्या ताब्यात घेतल्या हें मागें सांगितलेंच आहे. परंतु पुष्कळ ठिकाणीं सरकारला नांवाला ताबा देऊन त्या इमारती पुन्हां आपल्या ताब्यात घेण्याचे प्रयत्न करण्यात आले. या प्रयत्नालाच पुढें ' रेड ' ( हल्ला ) असें नाव पडलें. खास कायदे जारी असल्यामुळें कॉंग्रेसला छापखान्याची मदत मिळणें शक्य नव्हतें. बुलेटिन, पत्रकें, वातमीपत्रें, व रिपोर्ट प्रसिद्ध करून ही उणीव भरून काढण्यात आली. हीं पत्रकें व रिपोर्ट सायक्लोस्टाइलवर काढण्यांत येत असत तर कांहीं प्रसंगीं प्रेसमध्यें ही छापून घेण्यांत येत असत. छापखान्यातून छापून घेतल्यास त्याचें नांव घालण्यात येत नसे. कधीं कधीं अस्तित्वात नसलेल्या छापखान्याच्या मुद्रकाचीं नांवेंही त्यावर छापण्यात येत.

पोलीसांची करडीनजर असतांही ही वातमीपत्रें व बुलेटिन्स अगदीं नियमितपणे बाहेर पडत असत. व सर्व देशाला या चळवळींत रोजच्यारोज कोणत्या गोष्टी घडून येत आहेत हें कळवीत असत, ही लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट आहे. पोस्ट व तार आफिसांनीं कॉंग्रेसचें काम करण्याचें नाकारलें, त्यावेळीं कॉंग्रेसनें आपली दळणवळणाची पद्धति संघटित केली. प्रातांत ठिकठिकाणीं आपल्या वातम्या पोंचविण्याची व्यवस्था कॉंग्रेसनें केली. एवढेंच नव्हे तर अखिल भारतीय कचेरींतून सर्व प्रांतांशीं आपला संबंध निगडित राखण्याची व्यवस्था तिनें केली.संदेशवाहक कागदपत्र व इतर जिन्नस पोलेसांना स्वयंसेवकांपाशीं सापडले त्यावेळीं त्यांना स्वाभाविकच अटक करण्यांत आली किंवा इतर रीतीनें त्यांचा वंदोबस्त करण्यांत आला. १९३०च्या शेवटीं शेवटीं ही पद्धति खरोखरी सुरू करण्यांत आली होती. परंतु १९३२ सालीं ती अगदीं पूर्णतेला पोंचली होती. ऑ. इं.कॉं. कमिटीची व प्रां कॉं. कमेटीची कचेरी कोठें आहे हें शोधून काढण्यास सरकार समर्थ झालें नाहीं. या कचेऱ्यांतून सर्व प्रकारचीं पत्रकें बाहेर पडत असत व त्याचप्रमाणें यापुढें चळवळ वेळोवेळीं कशी चालवावयाची याच्याही सूचना बाहेर पडत असत. एखादे वेळीं ही कचेरी किंवा तिचें काम चालविणारा इसम उघडकीला येऊन त्याला पोलिसानें अटक केली व ती कचेरी पोलिसानें ताब्यात घेतली तर दुसरीकडे तसलीच सर्व व्यवस्था व सामुग्री निर्माण करण्यात येत असे व काम अव्याहत चालू ठेवण्यांत येत असे. आणखी एका कार्यक्रमामुळें लोकांच्या उत्साहांत भर पडली व पोलिसखात्याला सळो कां पळो करून सोडलें. तो कार्यक्रम म्हणजे कॉंग्रेसचें अधिवेशन व त्याचप्रमाण प्रांतिक व जिल्हा अधिवेशनें भरविणें हा होय. कांहीं ठिकाणीं स्वयंसेवकांनीं धोक्याच्या सूचना देऊन व गाड्या थावबून रेल्वेचें नियमित वहातुकीचें कामही बंद पाडलें. पुष्कळ लोकांनीं तिकिटाशिवाय डब्यातून चढावयाचें व रेल्वेच्या कामांत अडचणी उत्पन्न करावयाच्या व रेल्वेखात्याला नुकसान पोंचवावयाचें असले कार्यक्रमही कांहीं ठिकाणीं अमलात आणण्याचे प्रयत्न झाले. पण जबाबदार मंडळींकडून या कार्यक्रमाला उत्तेजन न मिळाल्यामुळें ते थावविण्यात आले.

बहिष्काराची चळवळ अत्यंत मोठ्या प्रमाणावर हातीं घेण्यात आली, व आपली संघटित शक्ति खर्ची घालून ठिकठिकाणीं ही चळवळ चालू ठेवण्या-

करितां जागा मोकळ्या करण्यांत आल्या. याप्रमाणें परदेशी कापड, ब्रिटिश औषधें ब्रिटिश बँका, विमा कंपन्या, परदेशी साखर, रॉकेल व सर्वसामान्यतः ब्रिटिश माल ह्यांच्यावर बहिष्कार घालण्याची चळवळ तीव्र स्वरूपाची करण्याकरतां निरनिराळे आठवडे वेळोवेळीं ठरविण्यांत आले.

पुढाऱ्यांना पकडल्यानंतर सरकार स्वस्थ व शांत राहिलें अशी कोणीही कल्पना करूं नये. जादा कायद्यानें जितके अष्टाधिकार स्थानिक अधिकाऱ्यांना प्राप्त झाले होते, त्या सर्वांचा सर्रास उपयोग करण्यात आला. याशिवाय जादा कायद्यात नसलेले व हे कायदे करताना कल्पनाही करनां न आलेले दडपशाहीचे इतर कित्येक उपायही होते. पुष्कळ लोकाना ठिकठिकाणीं पकडण्यांत आलें, पण तेंसुद्धा निवड करूनच पकडण्यात आले. या सत्याग्रहाच्या कालांत शिक्षा झालेल्या सत्याग्रहींची संख्या लाखावर गेली होती. कँप जेल किंवा हंगामी जेल उघडूनही त्या ठिकाणीं ह्या सर्व कैद्यांची व्यवस्था करणे सरकारला शक्य झालें नाहीं. या मुळेंच अटक करताना निवड करणें सरकारला आवश्यक वाटूं लागलें. ज्या लोकांच्या ठिकाणीं संघटना करण्याची थोडीशी पात्रता आहे व कॉंग्रेस संस्थांमध्यें ज्याना थोडेसें वजन आहे, त्यानाच तेवढे पकडून तुरुंगांत टाकण्यात आलें. तुरुंगातही या राजबंदींना वागविणें सोपी गोष्ट नाहीं, असें अधिकाऱ्यांना आढळून आलें. शिक्षा झालेल्या सत्याग्रहींपैकीं शें. ९५ लोकाना 'क' वर्गात ठेवण्यांत आलें होतें. अगदीं कांहीं तुरळक कॉंग्रेसवाल्यांनाच 'ब' वर्ग देण्यात आला. 'अ' वर्ग तर केवळ नावाचा ठेवण्यात आला होता. अतिशय काटकसरीनें या सवलतींचा फायदा राजबंदीना देण्याची व्यवस्था करण्यात आली होती. १९३० च्या आरंभीं ह्या वर्गवारीला सुरवात झाली होती व राजकीय बंदींचा स्वतंत्र वर्ग म्हणून त्याना मान्यता देण्याचें सरकारनें स्पष्टपणें नाकारलें. या कैद्याच्या जबान्यावरून त्याचें शिक्षण, त्याचा सामाजिक दर्जा व त्यांची राहणी याचा विचार करून त्याना 'ब' वर्गात ठेवणें जरूर होतें असेंही लोकाना वाटलें ग्रॅज्युएट, प्रोफेसर, वकील, संपादक, सुखवस्तु व वजनदार व्यापारी, जमिनदार, व उच्च वर्गातले शेतकरी, व सामाजिक कार्यकर्ते तसेंच, ज्या लोकाकडून सरकारनें हजारापासून पुढे दंड वसूल केले त्याना सामान्य कैद्याप्रमाणे अन्नवस्त्र देऊन तुरुंगात डावण्यांत आलें. ज्या लोकानीं तत्त्वाकरता, व आपल्या राष्ट्राला स्वातंत्र्य मिळवून देण्याच्या उदात्त

कार्याकरतां कारागृहवास पत्करला. त्यांना जेलमधील एका विशिष्ट पद्धतीनें बसणें, व हात उचलणे वगैरे अपमानास्पद वागणुकी सहन होणें शक्य नव्हतें. तसेच राहणसंबंधानें ज्यांच्या विशिष्ट प्रकारच्या कल्पना आहेत, त्यानाही कारागृहांतील हें अपमानास्पद जीवन सहन होणे शक्य नव्हतें. यामुळे जेलच्या अधिकाऱ्यार्शी ह्या लोकांचे वारंवार खटके उडूं लागले व जेलच्या नियमाप्रमाणें या राजबंदींना जेलमधील शिक्षा देण्यांत येऊं लागल्या. कांहीं लोकाना वेदम मारण्यांत आलें व काहींचा अनेक प्रकारें छळ करण्यांत आला. जेलच्या चार भिंतींत कांहीं केले तरी कोणी पहाणार नाहीं, या कल्पनेमुळेंहि या छळाला अधिक उत्तेजन मिळत असे. एका विशिष्ट तऱ्हेनें बसलें पाहिजे ही अपमानास्पद अट पाळण्याचें नाकारल्यावरून एका कैद्याला ( अमृतलाल ) वेदम मारण्यांत आलें. त्यामुळें नाशिक जेलमधील जेलर, ( रोश ) असिस्टंट जेलर ( जॅकसन ) ह्यांच्यावर खटला भरण्यात येऊन त्यांना शिक्षाही झाल्या. हंगामी जेलातील जीवन तर अतिशयच खडतर झालें होतें. पत्र्याच्या छपरातून राजबंदींना रहावें लागत होतें. या पत्र्याखालीं राहून मे व जूनमधील उन्हाळा किंवा डिसेंबर व जानेवारीमधील हिंवाळा सहन करणें शक्य नव्हतें. तसेच, अतिशय गर्दी झाल्यामुळेंही अनारोग्यकारक परिस्थिति निर्माण झाल्यामुळें हें जीवन कंठणे, सत्याग्रहींना काहीं वेळा अगदीं असह्य होऊन गेले होतें. कांहीं जेलमधील अधिकाऱ्याची वागणूक सह्य होती पण असले जेल अपवादभूत होते. काहीं कायम जेलमधील व्यवस्थाही चांगल्या प्रकारची नव्हती. कॅंप जेलमधील राजबंद्यांची स्थिति आरोग्यदृष्टीनें समाधान-कारक नव्हती. विशेषत. कॅंप जेलमध्येच अशी परिस्थिति निर्माण झाली होती. वर्षाच्या सर्व ऋतूंमध्यें आमांशाची साथ सत्याग्रही कैद्यात चालूच असावयाची, पावसाळ्यांत व हिंवाळ्यात तर न्युमोनिया व फुप्फुसाचे भयंकर रोग ह्यानींही पुष्कळ सत्याग्रही पछाडले जात. पुष्कळ कैदी यामुळें कारागृहातच मरण पावले. जवळच्या जेलच्या अधिकाऱ्याच्या स्वभावावरच कैद्याना बरेंवाईट रीतीनें वागविणें अवलंबून असतें. यामुळें कांही थोडें चांगले अपवाद खेरीज करून हे अधिकारी विवेकी, किंवा रास्त वर्तनाचे देखील आढळले नाहींत.

चळवळीच्या आरंभापासूनच लोकांच्या जमावावर व मिरवणुकींवर पोलिसानीं लाठीहल्ले चढविण्यास सुरवात केली होती. सत्याग्रही मिरवणुकींत रांगेनें चालले असता, त्यानीं सभा भरविली असता, त्यानीं हल्ला केला असतां किंवा

ते पिकेटिंग करीत असता हे प्रकार पहाण्यास साहाजिकच लोक एकत्र जमत. त्यावेळीं गर्दी मोडण्याकरतां ह्या प्रेक्षकांवरही लाठीहल्ले करण्यात येत असत. ज्या प्रांतातील एखाद्या महत्त्वाच्या ठिकाणीं चालू असलेल्या चळवळींत जिवंतपणा दिसून आला त्या त्या ठिकाणीं लाठीहल्ले चढविण्यात आले. या हल्ल्यांत कांहीं लोकाना भयंकर स्वरूपाच्या जखमाही झाल्या. व अशा लोकाची संख्याही कांहीं ठिकाणीं जास्त प्रमाणात आढळून आली. लाठीमार चालविताना कायदेभंग करण्याकरता कोण आलेला आहे किंवा नुसता प्रेक्षक म्हणून त्या ठिकाणीं कोण उभा आहे असा भेदभाव करण्यात येत नसे. यामुळें या प्रेक्षकांनाही भरपूर मार खावा लागत असे. सत्याग्रही गर्दीतच मिसळलेले असले तर त्याना लाठीचा प्रसाद मिळावयाचा, नाहीं तर ठरल्याप्रमाणें त्याना अटक होऊन लॉक-अपकडे किंवा तुरुंगाकडे त्याची रवानगी व्हावयाची. पुष्कळ ठिकाणीं अवर्णनीय अत्याचार व छळ करण्यात आले असे त्या वेळीं बाहेर आले. या छळाचे निरनिराळे प्रकार कांहीं हुषार अधिकाऱ्यानींच शोधून काढलेले असल्यामुळें हे छळ निरानिराळ्या ठिकाणीं निरानिराळ्या स्वरूपात प्रगट झाले. बायकामुलांनाही हे छळ सोसावे लागले. त्याचीही पर्वा करण्यात आली नाहीं. तुरुंगवास लाठीमार, इतर प्रकारचे छळ व प्रसंगीं बंदुकीची गोळीही सहन करण्यास सत्याग्रही तयार होते. परंतु त्यांच्या मालमत्तेला धक्का लागल्यास ते गयावया होऊन वठणीवर येत ही गोष्ट सरकारच्या लक्षांत आलेली होती. यामुळें शिक्षा करताना भरपूर दंडही करण्यात येत असत. कधींकधीं हा दंड दहाहजारांपर्यंत चढत असे. ज्या ठिकाणीं साराबंदीची किंवा खंडबंदीची चळवळ चालू होती, त्या ठिकाणीं हे कर, खंड किंवा दंड वसूल करण्याकरितां सत्याग्रहींच्या मालमत्तेवर गदा येत होती. शिवाय या शिक्षा झालेल्या सत्याग्रहींच्या एकत्र कुटुंबाच्या व कधींकधीं नातेवाईकांच्याही मालमत्ता जप्त करण्यांत येत, व विकून टाकण्यात येत. कायदेशीररीत्या जप्त्या आणणें व मालाची विल्हेवाट लावणें जरूर होतेंच, पण बेकायदेशीरपणें जो छळ चालू होता व जी मालमत्ता विकली जात होती, तिला तुलनाच नव्हती. घरांतील लांकूडसामान, घरचुनीं भांडीं, दागदागिने असल्या जंगममालावर जप्ती आणण्यात येत होतीच पण शिवाय, शेतीचीं जनावरें व उभीं पिकें जप्त करून तीं लिलाव करून टाकण्यात येत व कधींकधीं त्याचा नाशही करून

टाकण्यांत येत असे. यामुळें गुजराथ, संयुक्तप्रांत व कर्नाटक येथें कितीतरी लोक आज निराधार झालेले आहेत. जे सरकारदेणें सहज देऊन टाकतां आले असतें व स्वतःचें व आपल्या मालमत्तेचें रक्षण करता आलें असतें तें देण्याचें नाकारून त्यांनीं राजीखुषीनें आपणांवर या आपत्ती ओढून घेतल्या आहेत. केवळ सरकारदेणेंच वसूल करावयाचें असाच उद्देश असतां तर ह्या लोकांवर असल्या आपत्ती येण्याचें कांहींच कारण नव्हतें. कायद्याच्या आधारानेंही हें देणें त्याच्याकडून सहज वसूल करतां आलें असतें. ह्या सारावंदीच्या व खंडवंदीच्या चळवळींत ज्या गुजराथी शेतकऱ्यांनीं भाग घेतला त्याच्या हालअपेष्टांचें वर्णन करणें अशक्य आहे. इतकें होऊनही त्यानीं आपली मान खालीं वांकविली नाहीं. ह्या वेळीं जादा पोलिसही बसविण्यांत आले होते. जादा प्युनिटिव्ह कर लादून तेथील रहिवाश्याकडून तो वसूल करण्यांत आला. एकट्या बिहारमध्येंच ४१५ ठिकाणीं असे पोलीस बसवून ४ लाख ७० हजार रुपये जादा कर म्हणून वसूल करण्यांत आले. असले जादा लष्कर बसविण्यांत आल्यामुळें मिदनापूर ( बंगाल ) जिल्ह्यातील कांहीं भागात इतका कहर उसळला कीं, तेथील दोन तालुक्यातील हिंदू लोकाना प्रत्यक्ष आपलीं घरेदारें सोडून देऊन शेजारच्या तालुक्यांतून जाऊन रहावें लागलें. या प्रसंगीं ह्या लोकाना अवर्णनीय हालअपेष्टा भोगाव्या लागल्या व त्यात काहीं स्त्रियाही मृत्युमुखीं पडल्या.

या जादा कराशिवाय काहीं ठिकाणच्या लोकाकडून सामुदायिक दंडही वसूल करण्यात आला. हा दंड वसूल करतांना गोळीबार करण्यात आले व त्यात पुष्कळ लोक मृत्युमुखीं पडले व जखमी झालेल्यांचे बाबतींत सरहद्द प्रातातील लोकाचें अत्यंत नुकसान झालें.

तपशीलवार हकीकती सागून हें वर्णन लांबवीत बसण्याची आवश्यकता नाहीं. सरकारनें व त्याच्या अधिकाऱ्यांनीं कायद्यानें, बेकायद्यानें किंवा जादा कायद्याच्या आधारानें सत्याग्रहींवर जे जुलूम केले व काँग्रेसवाल्या स्त्रीपुरुषांनीं त्यांना जें धैर्यानें तोंड दिले व ज्या हालअपेष्टा सोसल्या त्यांचें वर्णन करीत बसल्यास तो एक स्वतंत्र ग्रंथच होईल. ही चळवळ सर्व देशभर पसरली होती व ती चालू ठेवण्याच्या कामीं आपल्या प्रयत्नाची शिकस्त करावयाची असा देशांतील निरनिराळ्या प्रातांनीं निश्चय केला होता व या बाबतींत त्यांची जणूं काय स्पर्धाच लागली होती. ही चळवळ केवळ ब्रिटिश हिंदुस्थानांतच चालू होती असें नाहीं. वाघेल खंड वगैरे संस्थानांनींही या

चळवळींत भाग घेतला होता. संस्थानांतील स्वयंसेवकांनीं देशांत निरनिराळ्या ठिकाणीं चालू असलेल्या चळवळींत सामील होऊन कष्ट सहन केले.

सरकारनें जे आश्रम व कॉंग्रेसकचेऱ्या जप्त करून ताब्यांत घेतल्या होत्या त्याचा नाश करण्यांत आला.

वर्तमानपत्राच्या धंद्याला या चळवळींत जबरदस्त धक्का बसला. पुष्कळ वर्तमानपत्राकडून जामीन मागण्यात आले. पुष्कळांच्या जामीनकीच्या रकमा जप्त करण्यांत आल्या. पुष्कळाना पुन्हा डिपॉझिट भरता न आल्यामुळें आपलीं वर्तमानपत्रें बंद ठेवावीं लागलीं. आपले छापखाने जप्त होतील व सरकार आपल्याविरुद्ध खटला भरील या भीतीनेंही काहींनीं आपलीं पत्रें बंद केलीं.

अशा रीतीनें सर्वत्र दहशत घालण्यात आली व दडपशाहीचा कहर उसळला तरी एक गोष्ट विशेष लक्षात ठेवण्याजोगी आहे; व ती गोष्ट म्हणजे लोक कोणत्याही प्रकारें हिंसेला प्रवृत्त झाले नाहींत ही होय. अहिंसेची भावना लोकांच्या अंतःकरणांत खोलवर रुजलेली होती; त्यामुळेंच महिनोगणती ही चळवळ चालू ठेवणें शक्य झालें व कांहीं थोड्या आठवड्यात ही चळवळ बंद करण्याचा सरकारचा निश्चय तडीस जाऊं शकला नाहीं. जादा कायदे व वटहुकूम काढून सरकारनें आपल्या अधिकाऱ्याना त्याची मदत दिली नसती व कायद्याच्या मूळ तत्त्वालाच हरताळ फांसणारे व सुधारलेल्या सरकारास न शोभणारे दडपशाहीचे उपाय योजण्यात आले नसते तर ही चळवळ नियंत्रित करणें याहूनही कठिण गेलें असतें, असें म्हटल्यास ती अतिशयोक्ति होईल असें आम्हास वाटत नाहीं. दळणवळणाचीं सर्व साधनें नष्ट झाल्यामुळें कॉंग्रेसकार्यकर्त्यांनीं अजाणतां व गुप्त पद्धतीचा अवलंब केला पण त्यातही साधे पोलीस, गुप्त पोलीस व खास पोलीस व त्याच्या अनेक शाखा व उपशाखा याना दाद न देता अक्कलहुषारीनें त्याच्यावर ताण केली. कॉंग्रेसच्या कचेऱ्या चालविणें, नियमित वेळीं पत्रकें प्रसिद्ध करणें व पुढील कार्यक्रमासंबंधीच्या सूचना देणें वगैरे कामें कशीं करण्यात येत हें मागें सांगितलेंच आहे. सत्याग्रहाची चळवळ चालविण्याकरिता फारसा पैसा लागत नाहीं हें खरें, परंतु पैशाची काहीं तरी मदत असल्याशिवाय एवढ्या मोठ्या प्रमाणावर चळवळ चालविणें शक्य झालें नसतें. परंतु केवळ पैशाच्या अभावा-

मुळेंच ही चळवळ कोणत्याही वेळीं थांबून राहिली नाहीं. हे पैसे कोठून आले तें कोणालाही माहित नाहीं. गुप्त दान करणारानें आपण कोणाला पैसे देत आहोंत याची वास्तपूस्त न करतां पैसे दिले. परंतु विशेष लक्षात ठेवण्यासारखी गोष्ट ही कीं, या गडबडीच्या कालात काँग्रेसच्या कार्यकर्त्यांना आपल्या कचेऱ्या खिशात वागविण्याचा प्रसंग आला असतां हे सर्व पैसे ज्या कामाकरिता दिले त्याच्याकरिताच खर्चीं पडले व त्याचा हिशेबही अगदीं कसोशीनें ठेवण्यांत आला.

दिल्ली व कलकत्ता येथें १९३२-३३ एप्रिलमध्यें कॉंग्रेसची जीं अधिवेशनें झालीं त्यांच्या हकीकती आतां सांगावयाच्या आहेत. पोलिसची नजर असतांही दिल्लीचें अधिवेशन भरविण्यात आले. दिल्लीकडे चाललेल्या बऱ्याच प्रतिनिधींना पोलिसांनीं ओळखून काढून त्याना अटक केली.

चांदणी चौकातील क्लॉक टॉवर खालीं हें अधिवेशन भरविण्यात आलें. पोलीसची नजर चुकवून ५०० प्रतिनिधी सभेच्या जागीं हजर झाले होते. चांदणी चौकांत कॉंग्रेसचें अधिवेशन भरविण्यांत येणार आहे ही जाहीर झालेली बातमी निव्वळ हुलकावणी आहे. असा पोलिसाना संशय आला व नव्या दिल्लींत कॅंग्रेसच्या प्रतिनिधींचा ते शोध करूं लागले. दुसऱ्या एका ठिकाणीं अकाली शिखाची मिरवणूक निघणार होती. तिकडे काहीं पोलीस गुंतून राहिले यामुळें अधिवेशनाच्या जागीं पुरेसे पोलीस येऊन दाखल होईपर्यंत प्रतिनिधींची जमवाजमव होऊन अधिवेशनाच्या कामाला सुरुवातही झाली. अमदावादचे शेठ रणछोडदास अमृतलाल यांनीं या अधिवेशनाचें अध्यक्षस्थान स्वीकारलें होतें असें म्हणतात. या अधिवेशनांत वार्षिक रिपोर्ट सादर करण्यात आला, व चार प्रस्ताव मंजूर करण्यात आले. पूर्ण स्वातंत्र्याच्या ध्येयाला पहिल्या ठरावांत पुष्टि देण्यांत आली. कायदेभंगाच्या चळवळीच्या पुनरुज्जीवनाला दुसऱ्या ठरावात अंतःकरणपूर्वक पाठिंबा देण्यांत आला. तिसऱ्या ठरावानें म. गांधींची आज्ञा राष्ट्रानें उत्तम रीतीनें पाळली यावद्दल अभिनंदन करण्यात आलें व महात्माजींच्या नेतृत्वावर पूर्ण विश्वास प्रकट करण्यांत आला. चौथ्या ठरावानें अहिंसेवरील पूर्ण श्रद्धा प्रकट करण्यांत आली व अधिकाऱ्यांनीं अत्यंत प्रक्षोभकारक कृत्यें केलीं असतांही सरहद्द प्रांतातील शूर पठाणांनीं अहिंसेच्या व्रताचा त्याग केला नाहीं यावद्दल त्याचें अभिनंदन केलें.

पं. मदनमोहन मालवीय यांची अधिवेशनाचे अध्यक्षस्थानीं योजना करण्याचें ठरविण्यात आलें होतें. पण दिल्लीकडे येताना वाटेंतच त्याना पकडण्यात आलें. चळवळीच्या या सर्व कालात कॉंग्रेसचें नाव घेण्याजोगे असे हे एकच पुढारी बाहेर होते. गोलमेज परिषदेहून परत आल्यानंतर ते स्वस्थ वसून राहिले नव्हते. वृद्धावस्थेमुळें ते थकले होते. त्याची प्रकृति नाजुक झाली होती. तथापि वेळोवेळीं वर्तमानपत्रांतून लेख प्रसिद्ध करून त्यांनीं अधिकाऱ्याच्या दडपशाहीच्या कृत्याना उजेडात आणलें व कॉंग्रेसच्या कार्यकर्त्यांनीं दाखविलेल्या अदम्य उत्साहाबद्दल त्यानीं त्याचे अभिनंदन केलें. कांहीं शंका किंवा विकट परिस्थिति उत्पन्न झाली असता कॉंग्रेसचें जें कार्यकर्ते सल्ला विचारण्याकरिता त्याच्याकडे जात ते कधींही निराश होऊन परत येत नसत.

---

## प्रकरण दुसरें.

## पुन्हां सौम्य धोरणाला सुरवात

जातीय निर्णयाच्या बाबतींत दुसऱ्या गोलमेज परिषदेस हजर असलेल्या सर्व सभासदांनीं त्या वेळचे मुख्य प्रधान मि. मॅकडोनल्ड याना एकमतानें सरपंच नेमलें नाहीं व श्वेतपत्रिकेंतील इतर सूचनाप्रमाणें अल्पसंख्याकाच्या बाबतींतही सरकारनें आपला निर्णय दिला. यामुळें जातीय प्रतिनिधींच्या बाबतींत दिलेला हा निर्णय अर्थातच पंचानीं दिलेला निवाडा ( अवॉर्ड ) नव्हता ही गोष्ट स्पष्ट आहे. त्याचप्रमाणें अस्पृश्याना हिंदुसमाजापासून अलग काढण्यात आल्यास आपण त्या गोष्टीला प्राणांतिक प्रतिकार करूं. असें गांधीजींनीं दुसऱ्या गोलमेज परिषदेच्या वेळीं जाहीर केलें होतें. गांधीजींच्या या घोर प्रतिज्ञेची कसोटी लागण्याचा प्रसंग आतां प्राप्त झाला होता. १९३२ मार्चमध्यें स्टेटसेक्रेटरींना गांधीजींनीं या बाबतींत एक पत्र लिहिलें होतें. मतदानहक्क व प्रातिनिधिक जागाचें प्रमाण या संबंधानें विचार करण्याकरिता लोथियन कमिटी १७ जानेवारी रोजीं हिंदुस्थानांत दाखल झाली होती. काल तर भराभरा चालला होता. या कमिटीचा रिपोर्ट केव्हाच बाहेर पडेल व आम्हीं एखाद्या गोष्टीसंबंधीं विचार करीत बसलों आहों तोंपर्यंत ब्रिटिश सरकार आपला निर्णय देऊनही मोकळें होईल, हें जाणून महात्माजींनीं ११ मार्च १९३२ रोजीं सर सॅम्युअल होअर याना एक पत्र लिहिलें. अस्पृश्य व मागासलेल्या

वर्गांकरितां स्वतंत्र मतदारसंघ देण्याचें ब्रिटिश सरकारनें ठरविल्यास आपण प्राणांतिक उपवास करूं, असें महात्माजींनीं या पत्रांत लिहून कळविलें. सर सॅम्युअल होअर यानीं १३ एप्रिल रोजीं वरील पत्राचें उत्तर पाठविलें. तें नेहमींप्रमाणें पाषाणहृदयी शिष्टाचारानें भरलें होतें. लोथियन कमिटीच्या शिफारशी बाहेर पडेपर्यंत गांधीजींनीं थांबून राहावें असें या पत्रात म्हटलें होतें. योग्य वेळीं गांधीजींचें म्हणणें विचारांत घेण्यांत येईल, असें या पत्रांत आश्वासन देण्यांत आलें होतें. १७ आगस्ट रोजीं मि. मॅकडोनल्ड यांचा जातीय प्रश्नाबाबतचा निर्णय जाहीर करण्यात आला. मि. मॅकडोनल्ड यांच्या निर्णयाला अवार्ड, पंचानें दिलेला निकाल असें चुकीनें म्हणण्यांत येतें, हें लक्षात ठेवलें पाहिजे. गांधींनीं या बाबतींत विरोध केल्यास त्याचा दोष त्यांच्या माथींच फोडावा या बुद्धीनें मि. मॅकडो-नल्ड यानीं हा एक स्वैर प्रयत्न केला. स्वतंत्र मतदारसंघच केवळ नव्हे तर आणखी अधिक मतें व साधारण मतदारसंघातर्फेही उभे राहण्याचा हक्कही या निर्णयाप्रमाणें अस्पृश्य समाजाला मिळावयाचा होता. इतर समाजावर सूड उगवण्याच्या बुद्धीनेंच जणूं काय अस्पृश्यसमाजाला ही देणगी देण्यांत आली होती. १८ आगष्ट रोजीं गांधीजींनीं या बाबतींत काय करावयाचें तें निश्चित केलें व तो निर्णय त्यानीं मुख्य प्रधानाला कळविला. हा उपवास २० सप्टेंबर ( १९३२ ) रोजीं दोनप्रहरीं सुरू व्हावयाचा होता. मि. मॅकडोनल्ड यानीं ता. ८ सप्टेंबर रोजीं थोड्याशा स्वस्थपणानेंच गांधीजींच्या या पत्राला उत्तर दिलें आणि हा सर्व पत्रव्यवहार १२ सप्टेंबर रोजीं प्रसिद्ध झाला. अस्पृश्यवर्गांच्या बाबतींत गांधी शत्रुत्वाच्या भावनेनें वागतात अशा हेतूंचा आरोप त्यांच्यावर लादणें मुख्य प्रधानांना योग्य वाटावें या गोष्टीचा उल्लेख येथें निषेधाकरताच करीत आहों.

जातीय निर्णयातील गुणदोषाची चर्चा या ठिकाणीं आम्हाला करावयाची नाहीं.पुणें करारात या निर्णयातील काहीं भाग रद्द करण्यात आला,तर काहीं भाग या करारात पुनरुज्जीवित करण्यांत आला व काहीं भाग अद्याप रद्द करावयाचा राहिलाच आहे.हा पुणें करार कसा घडविण्यात आला हें आता पहावयाचें आहे. गांधीजींच्या प्राणांतिक उपवासाचा तो प्रत्यक्ष परिणाम आहे. हा उपवास ता. २० सप्टेंबर रोजीं सुरू व्हावयाचा होता. हा पत्रव्यवहार प्रसिद्ध झाल्यानंतरच्या एक आठवड्याच्या या उपासाच्या कालात केवळ हिंदी राष्ट्राच्याच नव्हे

तर आखिल जगाच्या मनावर एक प्रकारचा ताण पडला होता.या वेळीं जगांतील सर्व लोकानीं,संस्थानीं व राष्ट्रानीं आपल्याला तावडतोब जें सुचलें तें केल. मुलाखती मागण्यात आल्या व नाकारण्यात आल्या. जगाच्या टोंकापासून कितीतरी विद्युत्संदेशांनीं पुण्याकडे धाव मारली. गांधीजींनीं आपला निर्णय मागें घ्यावा, म्हणून त्याना विनंत्या करण्यात आल्या. व त्याच्याशीं बुद्धिवादही करण्यात आला. त्याचे प्राण वांचावे याबद्दल मित्राना काळजी वाटत होती तर शत्रू तुच्छ बुद्धीनें या प्राणोत्क्रमणाच्या मार्गाकडे पहात उभे होते. गाधीजींनीं मुख्य प्रधानाकडे पाठविलेल्या वरील उत्तरामुळें सर्व देश संत्रस्त झाला. आठ वर्षांपूर्वी महात्माजी अपेंडिसाइटिसनें एकाएकीं याच जेलमध्यें आजारी झाले पण या वेळीं मुद्दाम आपण होऊन त्यांनीं उपवास जाहीर करून हें प्राणसंकट आपणावर ओढवून घेतलें होतें. अशा परिस्थितींत अर्धांगवायूचा झटका आल्याप्रमाणें सर्व राष्ट्राची स्थिति झाली असल्यास त्यात नवल नाहीं. मृत्युशय्येचा स्वीकार करणाऱ्या या रोग्यानेंच या राष्ट्रात नवजीवन ओतून त्याला जागें केलें होतें. मुख्य प्रधानाच्या निर्णयाच्या त्याना चिंधड्या उडवायच्या होत्या पण ही गोष्ट ते स्वत. करूं इच्छित नव्हते. हिंदूंनींच आपसात संगनमत करून ही गोष्ट घडवून आणावयास पाहिजे होती, म्हणून या प्रसंगीं एक परिषद भरविणें जरूरीचें झालें होतें. ही परिषद १९ तारखेस का २० तारखेस भरवावी, याचा विचार चालू होता. गाधीजींचे प्राण वाचविलेच पाहिजेत हाच या परिषदेपुढील मुख्य प्रश्न होता. या बाबतींत अस्पृश्यसमाजाचे पुढारी रा. ब. एम्.सी. राजा यानींच प्रथम पुढाकार घेतला ही अभिनंदनीय गोष्ट होय. या रावबहादुरानीं स्वतंत्र मतदारसंघाच्या कल्पनेचा तत्त्वतःच निषेध केला. मग्रूनीं गाधीजींना मुक्त करण्यात यावें, अशी मागणी केली. कॉंग्रेसवाल्यानीं तडजोड घडवून आणण्याकरिता निरनिराळ्या मताचे लोक एकत्र आणण्याचा प्रयत्न केला. पं. मालवीयजींनीं तावडतोब पुढाऱ्याची एक बैठक भरविण्याचें ठरविलें. इंग्लंडमध्यें ॲन्ड्र्यूज्, पोलक व लॅन्सबरी यानीं या गंभीर प्रश्नाकडे तेथिल जनतेचें लक्ष वेधलें.व सर्व देशभर खास प्रार्थना करण्याकरिता वजनदार व नामांकित पुढाऱ्याच्या सहीचें एक पत्रक काढलें. २० सप्टेंबर हा दिवस सर्व हिंदुस्थानभर उपवासाचा व प्रार्थनेचा दिवस पाळण्याचें ठरविण्यात आलें. शांतिनिकेतनानेंहि हा दिवस पाळला.

मुख्य प्रधानांच्या निर्णयांत दुरुस्ती सुचविण्याकरितां सुरू झालेल्या या चळवळीचें अस्पृश्यतानिवारणाच्या व्यापक चळवळींत रूपांतर होण्यास वेळ लागला नाहीं. कलकत्ता, दिल्ली व इतर शहरातील मंदिरें अस्पृश्याना मोकळीं करण्यात आलीं. गांधीजींनीं उपवासाला आरंभ केल्यावरोवर त्याना मुक्त करण्यात येईल, अशी आशा लोकांना वाटत होती; पण गांधीजींना या वेळीं मुक्त करण्यात आलें तर त्या मुक्ततेला स्थानबद्धतेचें स्वरूप प्राप्त झालें असतें. अर्थात् त्याना कोणत्या तरी खासगी वाड्यांत ठेवण्यांत येईल व त्यांच्यावर कांहीं निर्बंधही घालण्यांत येतील, हें उघड होतें. तेव्हा सरकारला या त्रासात पाडूं नये व त्याला खर्चांतही घालूं नये असा गांधीजींनीं विचार केला व त्याना तसें लिहून कळविलें. त्याचप्रमाणें आपल्यावर कांहीं निर्बंध घातल्यास ते पाळण्यासही आपण असमर्थ आहोंत, असेंहि त्यांनीं त्याच वेळीं सरकारला कळविलें. सरकारनें तावडतोब ही गोष्ट मान्य केली व गांधीजींना जी गोष्ट आवडत नाहीं ती करून त्या बाबतींत व्यवस्था करीत बसण्याची दग-दग टाळली.

पुणें-करार तयार होईपर्यंत कोणकोणत्या गोष्टी घडून आल्या, हें विस्तृत रीतीनें सांगत वसणें शक्य नाहीं. पं. मालवीय यांनीं बोलावलेली परिषद प्रथम मुंबई येथें भरली व नंतर तिनें लवकरच पुण्यास आपलें ठाणें दिलें. ज्यांना या बाबतींत विस्तृत माहिती पाहिजे असेल त्यांनीं गांधीजींचे प्राय-व्हेट सेक्रेटरी श्री. प्यारीलाल यांनीं लिहिलेलें " दि एपिक फास्ट " हें पुस्तक वाचावें. पण या ठिकाणीं एवढें सांगावयास हरकत नाहीं कीं, डॉ. अंबेडकर लवकरच या वाटाघाटींत सामील झाले व श्री. अमृतलाल ठक्कर, श्री. राजगोपालाचारी, श्री. चुनीलाल मेथा, पं. मालवीय, बिरला, सरदार पटेल, सरोजिनी देवी नायडू, जयकर, अंबेडकर, एम्. सी. राजा, राजेंद्र-प्रसाद, हृदयनाथ कुंझरू वगैरे मंडळींच्या सहाय्यानें खालील योजना तयार करण्यात आली व उपवासाच्या पांचव्या दिवसापर्यंत त्यावर वाटाघाटी होऊन जी शेवटीं उभयपक्षाला पसंत ठरली, ती योजना अशीः— अस्पृश्य-वर्गानें स्वतंत्र मतदारसंघाचा नाद सोडावा व सामान्य हिंदु मतदारसंघा-वरच त्यांनीं संतोष मानावा. ब्रिटिश अवार्डच्या योजनेप्रमाणें त्याना या संघात समाविष्ट करण्यात आलेंच आहे, मात्र सवर्ण हिंदूंनीं त्यांच्या हित-संबंधाच्या रक्षणाकरिता महत्त्वाच्या संरक्षक निर्बंधाना मान्यता दिली पाहिजे.

देशांतील निरनिराळ्या कायदेमंडळातून त्याच्याकरितां विशिष्ट प्रमाणांत [ १४८ ] राखीव जागा ठेवण्यात याव्या. प्रत्येक राखीव जागेकरिता त्यानीं चार उमेदवार निवडावे आणि सामान्य मतदारसंघातर्फे यापैकीं उमेदवार निवडण्यात यावा. सर्वांच्या संमतीनें यांत काहीं बदल घडून येईपर्यंत हा तडजोडीचा करार कायम रहावा. अस्पृश्यवर्गाच्या या प्राथमिक निवडणुकीची मुदत दहा वर्षेपर्यंत असावी.

पुणे-कराराला ब्रिटिश सरकारनें मान्यता दिली. मुख्य प्रधानाच्या निर्णयान्वयें जितक्या जागा अस्पृश्यवर्गाला मिळणार होत्या त्याच्या दुप्पट जागा या करारामुळें मिळाल्या याबद्दल अस्पृश्यवर्गाच्या पुढाऱ्यानीं कृतज्ञता व्यक्त केली असल्यास त्यात काहीं नवल नाहीं. दहा वर्षानंतर या प्रश्नावर सार्वत्रिक मत [ रेफरेंडम् ] घेण्यात यावें. या विषयावर शेवटच्या घटकेला बराच वादविवाद झाला. परंतु सार्वत्रिक मतच घ्यावयाचें असेल तर दहा वर्षांच्या ऐवजीं ही मुदत ५ वर्षे करण्यात यावी असें गांधींनीं सुचविलें. पण ही मुदत दहा वर्षापर्यंत लोटण्यात आली तर सवर्ण हिंदूंच्या कळकळीची कसोटी डॉ. आंबेडकर याना पहावयाची नसून हें सार्वत्रिक मत ह्या कराराच्या विरुद्ध पडावें, अशा रीतीनें अस्पृश्य वर्गांची संघटना डॉ. आंबेडकराना करावयाची आहे, असें लोकाना वाटत होतें. " पाच वर्षे अथवा माझे प्राण " हें गांधीजींचें ह्या बाबतींत शेवटचें उत्तर होतें. शेवटीं हा सर्व प्रश्न भविष्यकाळीं उभय पक्षाच्या संमतीनें निर्णीत करण्यात यावा, असें ठरविण्यात आलें. श्री. राजगोपालाचारी ह्यानीं तयार केलेला मसुदा 'उत्कृष्ट' ठरून महात्मा गांधीजींनीं त्याला संमति दिली. ता. २६ रोजीं श्री. रवींद्रनाथ टागोर ह्यानीं गांधीजींची भेट घेतली. पुणें कराराला ब्रिटिश प्रधानमंडळानें संमति दिली आहे, अशी बातमी ह्याच वेळीं पुण्याला येऊन थडकली. २६ रोजीं सकाळीं इंग्लंड व हिंदुस्थान ह्या दोन्ही देशातून पुणें कराराला संमति मिळाली अशा मजकुराचीं दोन जाहीरपत्रकें प्रसिद्ध करण्यात आलीं. मि. हेग ह्यानीं असेंब्लीमध्यें पुढील मुद्यावर भाषण केलें.

( १ ) मुख्य प्रधानांच्या स्वतंत्र मतदारसंघाच्या निर्णयाऐवजीं येरवडा-करारात मान्य करण्यात आलेली अस्पृश्य वर्गाकरितां प्रांतिक मंडळांतून देण्यांत आलेल्या जागांची योजना पार्लमेंटपुढें शिफारशीकरिता मांडण्यात यावी, असें ठरविण्यात आलें आहे.

( २ ) येरवडा करारांत ठरविण्यात आलेले प्रांतिक कायदेमंडळांतील अस्पृश्य वर्गाच्या राखीव जागांचें प्रमाण मान्य करण्यात आले आहे.

( ३ ) अस्पृश्य वर्गाच्या हितरक्षणार्थ हमी घेण्याबाबतच्या येरवडा करारातील कलमांनाही सवर्ण हिंदूंनीं या बाबतींत अस्पृश्याना नक्की आश्वासन दिल्यामुळें मान्यता देण्यात आली आहे.

( ४ ) वरिष्ठ कायदेमंडळांतील अस्पृश्य वर्गाच्या जागासाठीं निवडणुकीची जी पद्धत येरवडा करारांत ठरविण्यात आली आहे, तिलाही सरकारची मान्यता आहे.

( ५ ) अस्पृश्यसमाज व सवर्ण हिंदू ह्याच्यांत झालेल्या कराराप्रमाणें वरिष्ठ कायदेमंडळात शें. १८ या प्रमाणांत अस्पृश्य वर्गाकरिता जागा राखून ठेवण्यांत याव्या ह्या गोष्टीलाही सरकारची मान्यता आहे. सरकारनें दिलेला निर्णय मान्य करण्याच्या बाबतींत गांधीजींना थोडीशी अडचण वाटली. अस्पृश्य वर्गाच्या पुढाऱ्याचेंही ह्या बाबतींत समाधान झालें पाहिजे, असें त्याना वाटत होतें. आपल्यातील शारीरिक प्राण बाचावें, हाच त्याच्यापुढें प्रश्न नसून ज्यांच्याकरता त्यानीं ह्या उपवासाला आरंभ केला होता त्या लाखों लोकाच्या नैतिक जीवनाचें रक्षण करणें, हाही त्याच्यापुढें एक महत्वाचा प्रश्न होता. अखेर पं. हृदयनाथ कुंझरू व श्री. राजगोपालाचारी ह्यांनीं गांधींची ह्या बाबतींत समजूत पटविल्यानंतर गांधीजींनीं ता. २६ रोजीं सायंकाळीं ५। वाजतां प्रार्थना व वैदिक मंत्र ह्याचें गायन झाल्यावर उपवास सोडला. त्या क्षणापुरते गांधींचे प्राण वाचविण्यात आले ही गोष्ट खरी परंतु त्याच वेळीं एका विशिष्ट कालमर्यादेंत अस्पृश्यता निवारण्याचा प्रश्न सोडविण्यात आला नाहीं तर आपण पुन्हा असाच उपवास करूं, असें त्यानीं सांगितलें. कांहीं तरी निश्चित कालमर्यादा घालावी, असें त्याना वाटलें होतें. परंतु त्याच्या अंतरात्म्यानें त्याना तसा नक्की संदेश दिला नाहीं. " जर प्रत्येक खेड्यातून या सुधारणा घडून येतील तर स्वातंत्र्याचा संदेश प्रत्येक अस्पृश्याच्या घरीं जाऊन पोहोंचेल" असें म. गांधी म्हणाले. या बाबतींतील ध्येय आपण पूर्णपणें संपादन करूं शकलों तर हिंदुस्थानातील निरनिराळ्या जमातींत ऐक्य घडवून आणण्याचें कार्यही अधिक सोपें जाईल, अशी महात्माजींना आशा वाटत होती. ह्या उपवासाच्या औचित्याबद्दल व त्याच्या अंतर्भूत असलेल्या सामर्थ्याबद्दल लोकाना शंका वाटत होती. गांधीजींना ह्या बाबतींत कांहीं

सांगावयाचें होते. ता १५ व २० सप्टेंबर रोजीं प्रसिद्ध झालेल्या पत्रकांत गांधीजींनीं पुढील विचार प्रगट केले आहेत.

" ज्ञानाकरितां व तपश्चर्येकरिता उपवास करणे हा जुनापुराणा विधि आहे. ख्रिश्चन व इस्लाम धर्मांत अशा प्रकारचा उपवास करण्यात येतो. परंतु हिंदु-धर्मांत आत्मशुद्धीकरता उपवास केल्याची कितीतरी उदाहरणे आहेत. आत्म-शुद्धीचे अनेक कळकळीचे प्रयत्न केल्यानंतर अंतःकरणातील शांत व सूक्ष्म संदेश स्पष्टपणें व विनचुक रीतीनें ऐकण्याचें थोडेसे सामर्थ्य मी संपादन करूं शकलो आहे. या आंतरानिनादाची आज्ञा पालन करण्याकरितां मी हें तप आचरीत आहे. उपवास हा एक प्रकारचा जुल्मच आहे, असें कोणी म्हणतील. गांधीजींनीं त्याला पुढील उत्तर दिलें आहे. " प्रेम माणसाला अमुक एक गोष्ट करावयाला लावतें; तें त्याच्यावर जुलूम करीत नाहीं. " सत्य आणि न्याय याचेही असेच आहे. हीं तत्वें कोणावर जुलूम करीत नाहींत. न्यायाच्या एका तराजूंत मी माझा उपवास टाकूं इच्छितों. वरवर पहाणाऱ्या प्रेक्षकाना ही गोष्ट पोरकटपणाची वाटेल. परंतु मला तसें वाटत नाहीं. हा शाप दूर करण्याकरिता माझ्यापाशीं माझ्या प्रमाणापेक्षां अधिक किंमतीचें दुसरें काहीं असतें तर तेंही मी या तराजूंत टाकलें असतें. पण तशी वस्तु माझ्यापाशीं नाहीं. " हा उपवास ज्या लोकाचा माझ्यावर विश्वास आहे त्याच्या करता आहे; ज्याचा माझ्यावर विश्वास नाहीं, त्यांच्याकरता नाहीं. मग ते हिंदी असोत वा परकी असोत.

ह्याप्रमाणें आपला उपवास इंग्रजी अधिकारी वर्गाविरुद्ध नव्हता. हिंदु-स्थानातील आपल्या विरोधकाविरुद्ध, मग ते हिंदू असोत किंवा मुसलमान असोत त्यांच्या विरुद्ध नव्हता. परंतु एका न्याय्य कार्याकरतां हा उपवास करण्यांत येत आहे, असा ज्याचा विश्वास आहे, अशा असंख्य हिंदी लोका विरुद्ध हा उपवास करण्यात आला होता. एकंदरींत गांधींचें म्हणणें असें कीं हिंदूंच्या सदसद्विवेकबुद्धीला जागृत करण्याकरिता व न्याय्य धर्मकार्य करण्या-करितां लोकानीं प्रवृत्त व्हावें याकरिता हा उपवास होता. आपल्या हृदयांत मत्सर व क्रोध ठाणें देऊन बसले आहेत, हें गांधीजी आपलें अंतःकरण शोधून पहात होते. आपल्या हृदयात द्वेषाला व क्रोधाला जागा नाहीं, अशी जाणिव झाल्यानंतरच त्यांनीं शुद्ध हेतूनें व सरळ हितबुद्धीनें या तपाला आरंभ केला होता.

पुणें-करार मुख्य प्रधानांनीं चालून पाहिला व गांधीजींनीं आपला उपवास सोडला. यानंतर लगेंच मुंबई येथें एक परिषद भरविण्यात आली. या परिषदेंत हिंदू समाजानें अस्पृश्यतानिवारण्याची प्रतिज्ञा केली अशा अर्थाचा ठराव पास झाला. हरिजन-सेवक-संघ, ह्याच ठरावाच्या आधारानें प्रस्थापित करण्यांत आला. श्री. घनश्यामदास बिर्ला यांना ह्या संघाचे अध्यक्ष व भारत-सेवक समाजाचे श्री. अमृतलाल ठक्कर ह्यांना ह्या संघाचे सेक्रेटरी निवडण्यात आलें. २५ सप्टेंबर १९३२ रोजीं मुंबई येथें पं. मालवीयांच्या अध्यक्षतेखालीं भरलेल्या सभेंत पुढील ठराव पास करण्यात आला. "हिंदु समाजात कोणालाही केवळ जन्मतः अस्पृश्य मानण्यात येऊं नये आणि ज्या लोकाना जन्मतः आज अस्पृश्य मानण्यांत येत आहे त्याना सार्वजनिक विहीरी सार्वजनिक शाळा, रस्ते व इतर लहानमोठ्या सार्वजानिक संस्था ह्याच्या बाबतींत इतर हिंदूंप्रमाणें समान हक्क देण्यांत यावे. स्वराज्य प्राप्त होण्यापूर्वी अस्पृश्यांच्या या हक्काना मान्यता मिळाली नाहीं तर स्वराज्याच्या पार्लमेंटांत जे पहिले कायदे मंजूर करण्यात येतील त्यांत हा कायदा मंजूर करण्यात येईल व अस्पृश्यांच्या या हक्कांना कायदेशीर स्वरूप देण्यात येईल. मंदिरप्रवेशाच्या बाबतींत अस्पृश्य म्हणविल्या जाणाऱ्या लोकांवर सामाजिक रूढीमुळें जीं बंधनें घालण्यांत आलीं आहेत तीं सर्व न्याय्य व शांततायुक्त मार्गानें दूर करण्याकरितां सर्व प्रकारचे प्रयत्न करणें हें आपलें कर्तव्य आहे, असें सर्व हिंदु पुढाऱ्यांनीं मानावें.

इतक्या शुद्ध हेतूनें आचरण्यात आलेलें हें तप शेवटीं पूर्णपणें फळास आलें. अस्पृश्यतानिवारणाच्या कार्याकरतां चळवळ करण्याची तयारी सर्व देशानें दाखविली. ह्या नव्या कार्यक्षेत्रात काम करण्यांच्या बाबतींत लोकांनीं अत्यंत हुरूप दाखविला. कायदेभंगाच्या चळवळींत ज्यानीं तुरुंगवास पत्करला नव्हता किंवा ज्याना दुसऱ्या किंवा तिसऱ्या वेळीं तुरुंगात न जाण्याला सबब पाहिजे होती किंवा जे जाऊं शकत नव्हते, त्यांना हें कार्य अंगावर घेणें पसंत पडलें व यांतच त्यांना समाधान वाटूं लागलें. कॉंग्रेस अस्पृश्य चळवळींत पडल्यामुळें कॉंग्रेसच्या कार्यापासून कॉंग्रेसवाले परावृत्त होत आहेत याबद्दल धोक्याची सूचना देण्यांत यावी असेंही लोकाना वाटूं लागलें; परंतु कॉंग्रेसच्या हक्कावर गदा न येतां अस्पृश्य चळवळीचें काम करण्याकरिता लागणारे भरपूर कार्यकर्ते मिळाले. अस्पृश्यतानिवारणाच्या कार्याची संघटणा करण्याचें काम श्री. बिर्ला व श्री. ठक्कर ह्याच्याकडे देण्यात

आलें. त्यावरूनच हें काम कॉंग्रेसवाले नसलेल्या लोकाकरतांच आहे, असें गांधीजींनीही स्पष्टपणे जाहीर केलें होतें. काहीं झाले तरी एकीकडे कॉंग्रेसच्या कामात कदाचित् कमीपणा आला तर अस्पृश्यतानिवारणाच्या चळवळीला उत्तेजन मिळालें आणि गांधीजींच्या उपवासानें ही चळवळ अत्यंत नेटानें सुरू झाली असें म्हणण्यास हरकत नाहीं. अत्यंत द्रुतगतीनें जाऊं पाहणाऱ्या तरुणाच्या उत्साहामुळेंच या बाबतींत थोडेसें भय उत्पन्न झालें होतें. पण गांधीजींनीं हा लगाम आंखडून धरला होता. अस्पृश्याना मंदिर-प्रवेश मिळावा म्हणून बऱ्याच मंडळींनीं प्राणांतिक उपवास सुरू केला होता. असहकारितेच्या चळवळींत लोकांनीं भाग घेतला त्याप्रमाणें या चळवळींतही भाग घेण्यास पुष्कळ उत्साही तरुण पुढे आलें पण असलें खडतर तप आचरण्याचा विचार करतांना आपली योग्यता काय आहे व आजूबाजूची परिस्थिति काय आहे याचा विचार त्यानीं केला नाहीं. १९२१–२२ सालीं गांधीजींनीं आपल्या नियंत्रणशक्तीच्या जोरावर अनेक विकट प्रसंगांतून देशाचें रक्षण केलें. त्याचप्रमाणें ह्या वेळींही गांधीजींना करावें लागलें. या प्रसंगीं इतके स्त्रीपुरुष ह्या चळवळीस सामील होण्यास तयार झाले कीं, या चळवळीचें स्वरूप मिनिटामिनिटाला बदलूं लागलें. हिंदुधर्मांतील सुधारणाचळवळीला भोपाळच्या नबाबानीं ५००० रुपयांची देणगी देऊं केली. फादर विन्स्लो यानीं आपल्या ख्रिश्चन बंधूंच्या सहाय्यानें एक पत्रक प्रसिद्ध करून हिंदी ख्रिश्चन समाजाकरतां स्वतंत्र मतदारसंघ निर्माण करण्याच्या कल्पनेचा निषेध केला. गांधीजींची मुक्तता करावी अशी दुसरीकडे मौलाना शौकतअल्ली यानीं खटपट सुरू केली व हिंदु–मुसलमानाच्या प्रश्नाचाही तडजोडीनें निकाल लावावा, अशी विनंति केली. देशातील निरनिराळ्या जमातींची एकी करण्यात यावी, या विचारानीं देशाचें वातावरण भरून गेलें होतें. सरकारनें आपलें धोरण एकाएकीं बदललें नसतें व मुलाखतींच्या बाबतींत उपवास चालू असताना ज्या सवलती महात्माजींना देण्यात आल्या होत्या, त्या २९सप्टेंबरला काढून घेतल्या नसत्या तर वरील ऐक्याच्या प्रयत्नाला चांगलेंच यश आलें असतें. श्री. जयकर याना महात्मा गांधींची मुलाखत घ्यावयाची होती, परंतु त्याना परवानगी मिळाली नाहीं. सरोजिनी नायडू याना परत त्याच्या स्त्रियाच्या जेलमध्यें पाठवून देण्यात आलें. श्री. कस्तुरबाई गांधी याना गांधीजींपासून दूर करण्यांत आलें. सर्व मुलाखती बंद

करण्यांत आल्या व १३ सप्टेंबर पूर्वी गांधी जसे होते तसेच त्यांना पुन्हां कैदी बनविण्यात आलें. परंतु शिक्षेची मुदत भरण्यापूर्वी ५ दिवस श्री. कस्तुरबाई गांधी यांनी सुटका झाल्यामुळें त्यांनाच फक्त दुसऱ्या दिवसापासून गांधी जवळ राहण्यास परवानगी मिळाली, याबद्दल सरकारचे आभार मानणें जरूर आहे. हरिजनकार्य चालविण्याच्या बाबतींत आपल्याला ज्या सवलती मिळाल्या होत्या. त्या एकाएकीं काढून घेण्यांत आल्या याबद्दल गांधीजींनीं तक्रार केली. पुणें कराराच्या अगदीं विरुद्ध अशी ही गोष्ट होती. या बाबतींत शेवटीं सरकारशीं बराच पत्रव्यवहार होऊन हरिजन चळवळ चालविण्याकरतां महात्मा गांधींना जरूर त्या सवलती देण्यांत आल्या. भेटीच्या बाबतींतही सर्व निर्बंध काढून घेण्यांत आले.मुलाखती,पत्रव्यवहार व प्रकाशन या बाबतींत घातलेल्या निर्बंधासंबंधानें ७ नोव्हेंबर रोजीं असेंब्लींत भाषण करतांना गृहमंत्री मि.हेग म्हणाले कीं अस्पृश्यतानिवारणाच्या बाबतींत चळवळ चालविण्याकरता आपल्याला सवलती मिळाल्या पाहिजेत,असें मि.गांधी ह्यांनीं म्हटलें आहे.सरकारही गांधींच्या ह्या प्रयत्नात अडथळे उत्पन्न करूं इच्छित नाहीं.गांधींच्या म्हणण्याप्रमाणें अस्पृश्यतानिवारण हा नैतिक व धार्मिक सुधारणेचा प्रश्न आहे. कायदेभंगाच्या चळवळीशीं त्याचा काहीं संबंध नाहीं, ही गोष्ट सरकारलाही मान्य आहे;म्हणून सरकारनें मुलाखती, पत्रव्यवहार, प्रकाशन व या चळवळीशीं निगडित असलेलीं इतर सर्व कामें करण्याकरता गांधींवरील पूर्वीचे सर्व निर्बंध काढून घेऊन त्याना पूर्ण मोकळीक देण्यात आली आहे. राजकीय प्रश्नांच्या बाबतींत निर्बंध ठेवण्याच्या बाबतींतील सरकारचें धोरण बदललेलें नाहीं."

या उपवासासंबंधात झालेला पत्रव्यवहार व पुणें करार जसाचा तसा खालीं देत आहों:—

दुसऱ्या गोलमेज परिषदेच्या वेळीं मॉयनॉरिटी कमिटीपुढें गांधीजींनीं जें भाषण केलें ( १३–११–१९३१ ) त्यातील महत्त्वाचा भाग पुढें दिला आहे.

## " प्राणांतिक प्रयत्न करून प्रतिकार करीन."

" इतर अल्पसंख्याक वर्गानीं आपल्या हक्काची जी मागणी केली, त्यातील अर्थ मला समजतो. परंतु अस्पृश्याच्या वतीनें करण्यांत आलेली मागणी अत्यंत निर्दयपणाची आहे. अशा प्रकारची मागणी करणें म्हणजे आपल्यावर असलेला अमंगळ बहिष्कार कायम रहावा असें म्हणण्यासारखेंच आहे.

हिंदुस्थानाला स्वातंत्र्य मिळत असलें तरी त्यांच्या मोबदला अस्पृश्यांच्या हितसंबंधाचा बळी देण्यास मी तयार होणार नाहीं. अस्पृश्य जनतेचा प्रतिनिधि या नात्यानें हें मी बोलत आहे. केवळ कॉंग्रेसचा प्रतिनिधि म्हणून मी हें बोलत नाहीं. उद्या सार्वत्रिक मत ( रेफरेंडम् )घेण्याचे ठरविण्यात आलें तर अस्पृश्यावरील असंगळ निर्बंध नाहींसे करण्यास अस्पृश्यांकरतां राखीव जागा किंवा स्वतंत्र मतदारसंघ मिळविणें हा मार्ग नव्हे असें मी हिंदुस्थानच्या या टोंकापासून त्या टोंकापर्यंत चळवळ करून अस्पृश्याना पटवून देईन आणि ह्या मतदानाचे वेळीं पोलत्नर माझेंच मत सर्वांत प्रभावी असल्याचें दिसून येईल.

अस्पृश्यता हा सनातन हिंदुधर्मावर एक कलंक असून हा लज्जास्पद काळिमा नाहींसा करण्याकरता हिंदु सुधारक कटिबद्ध झाले आहेत, हे मी आज ह्या कमिटीलाच नव्हे तर सर्व जगाला जाहीर करून सांगत आहे. आमच्या मतदाराच्या यादींत व लोकसंख्येच्या गणतीच्या वेळीं स्वतंत्र वर्ग म्हणून अस्पृश्याची गणना करण्यांत यावी, ही गोष्ट आम्हाला पसंत नाहीं. शीख भले आमच्यापासून कायमचे वेगळे होवोत. मुसलमान व युरोपियन वेगळे होवोत. परंतु अस्पृश्यानीं कायमचे अस्पृश्य रहावें ही गोष्ट मला कधींही मान्य होणार नाहीं. अस्पृश्यता जिवंत रहावयाची असली तर हिंदुधर्म नष्ट झाला तरी चालेल, असें मी म्हणेन.

डॉ. आंबेडकर ह्याच्या संबंधानें मला आदर वाटतों. अस्पृश्याचा उद्धार व्हावा ह्या त्यांच्या इच्छेबद्दलही मला आदर वाटतों. त्याच्या बुद्धिमत्तेबद्दलही मला आदर आहे. परंतु त्याना मिळालेल्या कटु अनुभवामुळें त्यांची विवेकबुद्धि या क्षणापुरती झाकाळली गेली आहे व म्हणून अशा प्रकारची एक मोठी चूक ते आज करीत आहेत, असें मला म्हणावें लागत आहे. हरिजनाचें कार्य प्राणापेक्षाही मला प्रिय असल्यामुळें मी जर असें स्पष्ट बोललों नाहीं तर त्या कार्याच्या बाबतींत मी अप्रामाणिकपणें वागलों, असें होईल. सर्व जगाचें राज्य मला मिळालें तरी अस्पृश्यांचे हक्क त्याच्या मोबदल्यांत मी देणार नाहीं ! हिंदुस्थानातील सर्व अस्पृश्यातर्फे आपण ही मागणी करीत आहों, असें डॉ. आंबेडकर म्हणत आहेत. पण त्याचें हें म्हणणें उचित नाहीं, असें मी माझ्यावरील जबाबदारीची योग्य जाणीव ठेवून बोलत आहे. यामुळें हिंदुधर्मांत फूट पडेल या गोष्टीमुळें मला समाधान होणार नाहीं व तें माझ्याच्यानें पाहवणारही नाहीं.

अस्पृश्य लोक मुसलमान किंवा ख्रिश्चन झाले तर त्याची मला पर्वा नाहीं; तें मला सहन होईल. परंतु प्रत्येक खेड्यांतील हिंदूंत दोन कायमचे तट निर्माण झाले तर तें मला सहन होणें शक्य नाहीं. अस्पृश्यांच्या राजकीय हक्कासंबंधानें जे लोक बोलत असतात त्यांना ' हिंदुस्थान ' म्हणजे काय हें माहीत नाहीं. हिंदुसमाजाची रचना काय आहे हें त्याना माहीत नाहीं. म्हणून या गोष्टीचा मला एकट्यालाच प्रतिकार करावा लागला तर प्राणांतिक प्रयत्न करून मी तिचा प्रतिकार करीन असें माझ्या शब्दांच्या मागें जितकें सामर्थ्य असेल त्या सर्व सामर्थ्याचा उपयोग करून मी आपल्याला सांगत आहे.

## गांधी-होअर-मॅकेडोनल्ड पत्रव्यवहार-
## गांधींचें सर सॅम्युअल होअर यांना पत्र.

येरवडा सेंट्रल प्रिझन

११ मार्च १९३२

प्रिय सर सॅम्युअल,

अस्पृश्यवर्गाला स्वतंत्र मतदारसंघ देण्यांत आल्यास त्या गोष्टीचा मी प्राणांतिक प्रयत्न करून प्रतिकार करीन असें गोलमेजपरिषदेच्या प्रसंगीं भाषण करताना शेवटीं मी बोललों होतों हें आपल्याला आठवत असेल. या प्रश्नासंबंधानें मला त्या क्षणीं जी तीव्रता भासली त्यामुळें मी असें बोललों नाहीं किंवा अलंकार म्हणूनही मी भाषा मी वापरली नाहीं. या बाबतींत मला जें वाटतें तें कळकळीनें पुढें मांडावें याच हेतूनें मी असें बोललों. माझ्या भाषणाला अनुसरून अस्पृश्यांच्या बाबतींत तरी स्वतंत्र मतदारसंघ निर्माण करण्यांत येऊं नयेत याबद्दल सर्व देशांतील लोकमत एकीकृत करावें, असा माझा उद्देश होता. पण तसें घडून यावयाचें नव्हतें.

मला जीं वर्तमानपत्रें वाचावयास मिळतात त्यावरून बादशहा सरकार कोणत्याही वेळीं या बाबतींत आपला निर्णय जाहीर करील असें मला दिसून आलें आहे. अस्पृश्य वर्गाकरिता स्वतंत्र मतदारसंघ निर्माण करावें, असाच निर्णय करण्यात आल्यास माझी ही प्रतिज्ञा पूर्ण करण्याकरिता जरूर ते उपाय योजावे, असें मी प्रथम ठरविलें होतें. परंतु या बाबतींत पूर्व सूचना दिल्याशिवाय तसें करणें हें सरकारच्या बाबतींत अन्यायाचें होईल असें मला वाटतें.

माझ्या शब्दाना मी जितकें महत्त्व देतों तितकें महत्त्व ब्रिटिश सरकार देणार नाहीं, हें स्वाभाविक आहे.

## स्वतंत्र मतदारसंघ हानिकारक

अस्पृश्यांच्या बाबतींत स्वतंत्र मतदारसंघ निर्माण करण्याविरुद्ध माझे जे आक्षेप आहेत; त्यांचा पुनरुच्चार करण्याची मला गरज वाटत नाहीं. मी त्याच्यापैकींच एक आहे, असें मला वाटतें. इतर जमातीपेक्षां त्यांची परिस्थिति अगदीं वेगळ्या स्वरूपाची आहे. कायदेमंडळात त्यांचे प्रतिनिधी असावे, या बाबतींत माझा विरोध नाहीं. इतराच्या बाबतींत मतदानाचा हक्क कडक स्वरूपाचा असला तरी अस्पृश्यांच्या बाबतींत तो ढिला असावा व शिक्षण, मालमत्ता वगैरेंचा मुळींसुद्धा विचार न करतां या समाजातील प्रत्येक वयांत आलेल्या स्त्री-पुरुषाचें नांव मतदाराच्या यादींत नोंदण्यात यावें, असें माझें मत आहे. परंतु त्याच्याकरिता स्वतंत्र मतदारसंघ निर्माण करणें हें त्यांच्या दृष्टीनें व हिंदुधर्माच्या दृष्टीनेंही हानिकारक आहे असें माझें मत आहे.अगदीं राजकीय हक्काच्या दृष्टीनें विचार केला तरीदेखील ही गोष्ट हानिकारक आहे, असे माझें मत झालें आहे. स्वतंत्र मतदारसंघामुळें या समाजाची किती हानि होईल हें समजून घ्यावयाचें असल्यास सवर्ण हिंदूंत ते कसे वांटले गेले आहेत व त्याच्यावर ते किती अवलंबून आहेत, याचें ज्ञान करून घेणें आवश्यक आहे. हिंदुधर्माचा विचार केल्यास स्वतंत्र मतदारसंघामुळें या समाजाच्या चिंधड्या उडाल्याशिवाय राहणार नाहींत.

हिंदुसमाजांतील हा वर्गभेदांचा प्रश्न मुख्यतः नैतिक व धार्मिक स्वरूपाचा आहे, असें माझें मत आहे. राजकीय दृष्टीनें या प्रश्नाचा विचार करणें महत्त्वाचें असलें तरी नैतिक व धार्मिक दृष्टीनें त्याचें काहीं महत्त्व नाहीं,असेंच मी म्हणेन.

या बाबतींत माझ्या ज्या भावना आहेत त्याना तुम्हाला मान्यता द्यावीच लागेल. या वर्गाच्या परिस्थितीसंबंधानेंच मी लहानपणापासून विचार करीत आलों आहे आणि त्याच्याकरिता अनेक प्रसंगीं माझें सर्वस्व मी पणाला लावलें आहे. केवळ अहंकाराच्या भावनेनें प्रेरित होऊन मी हें सांगत आहे असें नाहीं; शतकानुशतकें अस्पृश्यसमाजाला ज्या अधोगतीला हिंदूंनीं पोंचविलें आहे त्याची नुकसानभरपाई कसल्याही प्रकारचें तप केलें तरी होणार नाहीं असें मला वाटत आहे.

## " प्राणांतिक उपवास करीन. "

परंतु अस्पृश्यसमाज ज्या अधोगतीला पोंचला आहे त्यातून त्यांचा उद्धार करण्याचा स्वतंत्र मतदारसंघ हा मार्ग नव्हे किंवा त्याच्याकरितां आचरलेले हें तपही नव्हे हें मी जाणतों; म्हणून अस्पृश्यवर्गाकारितां स्वतंत्र मतदारसंघ निर्माण करण्याचें ठरविण्यांत आल्यास **मी प्राणांतिक उपवास केल्याशिवाय राहाणार नाहीं.**

मी कैदी असेपर्यंत या मार्गाचा अवलंब केल्यास बादशहासरकारला मी बिकट परिस्थितींत आणून टाकलें असें होईल, या जाणीवेनें माझें अंतःकरण कष्टी झालें आहे. माझ्यासारख्या दर्जाच्या माणसानें अशा उपायाचा अवलंब करावा, हें अत्यंत अनुचित आहे; राजकीय क्षेत्रांत असल्या उपायाचा अवलंब करणें वेडेपणाचें आहे, असेंही कांहीं लोकांना वाटेल, हें मी जाणून आहे. या आक्षेपांच्या समर्थनार्थ मी एवढेंच सांगूं इच्छितों कीं, या बाबतींत मीं जें काय करण्याचें ठरविलें आहे तो एकादा उपाय नसून माझ्या जीवनापैकींच तो एक भाग आहे. माझ्या विवेकबुद्धीनें मला सांगितलेला तो एक संदेश असून ही आज्ञा मी मोडूं शकत नाहीं. अशा परिस्थितींत माझ्या विवेकीपणामुळें मी जी अब्रू संपादन केली आहे ती गेली तरी त्याची मला पर्वा नाहीं. मला जी काय परिस्थिति आज दिसत आहे त्यावरून मी तुरुंगातून मुक्त झालों तरीसुद्धां उपवास करण्याचें कर्तव्य मला केलेंच पाहिजे असें मला वाटत आहे. मला वाटणारें भय सर्व प्रकारें असमर्थनीय असून अस्पृश्यवर्गाकरिता स्वतंत्र मतदारसंघ निर्माण करण्याचा ब्रि. सरकारचा हेतु नसावा अशीही मला आशा वाटत आहे.

## सरकारचा दहशतवाद

यासारखाच आणखी एकादा उपवास मला करावा लागेल, अशा दुसऱ्या एका गोष्टीचा मला उल्लेख करावयाचा आहे. ज्या पद्धतीनें आज दडपशाही चालू आहे त्यावरून माझ्या अंतःकरणाला केव्हां धक्का बसेल व मला पुन्हा अशाच प्रकारचा यत्न केव्हा करावा लागेल, याची मला कल्पना नाहीं. दडपशाही आपल्या न्याय्य मर्यादा ओलांडून पुढें चालली आहे, असें मला वाटूं लागलें आहे. सरकारी दहशतवाद आज देशभर पसरत चालला आहे. इंग्रज व हिंदी अधिकारी आज पशुवत् आच-

रण करीत आहेत. आपल्या लोकाबरोबर व आपल्या आप्तेष्टांबरोबर अमानुष आचरण करणें हें पुण्यकारक आहे हीच राजनिष्ठा आहे अशा समजुतीनें हिंदी वरिष्ठ व खालच्या अधिकाऱ्याचा नैतिक अधःपात झालेला आहे. हे अधिकारी अंतःकरणहीन झालेले आहेत. भाषण स्वातंत्र्याची मुस्कटदाबी करण्यांत आली आहे. कायदा व व्यवस्था याच्या नावाखालीं गुंडगिरी करण्यात येत आहे. सार्वजनिक कार्य करण्यास प्रवृत्त झालेल्या स्त्रियांना आपल्या अब्रूला धक्का लागेल अशी भीति वाटूं लागली आहे.

आणि हें सर्व कशाकरितां तर कॉंग्रेसनें जी स्वातंत्र्याची वृत्ति निर्माण केली तिचा नायनाट करण्याकरता. सामान्य कायद्याचा विनयपूर्वक भंग केल्याबद्दल शिक्षा देण्यापुरतीच दडपशाहीची मर्यादा थाबून राहिलेली आहे.यामुळें लोकाचा अपमान करण्याच्या उद्देशानें अरेरावीपणानें काढलेले नवेनवे हुकूम मोडण्याकडे लोकाची प्रवृत्ति वाढत चालली आहे.

या सगळ्या कृत्यामध्यें लोकसत्तात्मक भावनाचा मला गंधही दिसत नाहीं. मी नुकताच इंग्लंडला जाऊन आलों. या भेटीनें तुमची लोकसत्ताही वरवरची व आकुंचित स्वरूपाची आहे, हें माझें मत अधिक दृढ झालें. अत्यंत महत्त्वाच्या गोष्टींचा निर्णय एकादी व्यक्ति किंवा व्यक्तींचा गट लावतात. पार्लमेंटची त्या बाबतींत मुळींसुद्धां संमति घेण्यात येत नाहीं आणि आपण काय करीत आहों, याची कल्पनाही नसतांना पार्लमेंटचे सभासद या निर्णयाला मान्यता देत असतात. इजिप्तच्या बाबतींत असेंच झालें. १९१४ च्या महायुद्धाच्या बाबतींत हीच गोष्ट अनुभवास आली आणि हिंदुस्थानच्या बाबतींतही आज तसेंच घडत आहे. लोकसत्ताक म्हणविणाऱ्या राज्यपद्धतींत एका व्यक्तीच्या हातात इतका अमर्याद अधिकार असावा कीं, त्यानें ३० कोटी लोकावर सत्ता गाजवावी, व त्याच्या निर्णयास पाठिंबा देण्याकरता भयंकर नाशाचीं शस्त्रें सज्ज असावीं या कल्पनेविरुद्ध माझ्या सर्व अंतःकरणप्रवृत्ती बंड करून उठतात. ही लोकसत्ताक पद्धतीच नव्हे असेंच माझें मत झालें आहे.

### श्रद्धेचें तत्त्व

आणि ही दडपशाही अशीच चालू राहिली तर दोन्ही राष्ट्रांत आज जें वितुष्ट वाटलें आहे तें अधिकच वाढत जाईल. मला या बाबतींत जितकी

जबाबदारी वाटते किंवा मदत करतां येते त्या दृष्टीनें त्या पद्धतीला मी आळा कसा घालूं शकेन ? कायदेभंग बंद करून ही गोष्ट मी करूं शकणार नाहीं. माझ्या श्रद्धेला तो विषय बनला आहे. मी स्वभावतःच लोकसत्तावादी आहे असें मला वाटतें. आपली इच्छा लोकांवर शारीरिक शक्तीच्या जोरावर लादणें हें लोकसत्तेची माझी जी कल्पना आहे त्या कल्पनेशीं विसंगत आहे असें मला वाटतें. ज्या ज्या वेळीं शारीरिक शक्ति उपयोगात आणणें हें सामान्यतः आवश्यक व समर्थनीय आहे असें वाटेल त्या त्या वेळीं या शक्तीच्या ऐवजीं सविनय प्रतिकार हाच योग्य मार्ग आहे, हा आत्मक्लेशाचा मार्ग आहे आणि प्रसंगीं प्राणांतिक उपवास करून देखील सविनय प्रतिकार करणाऱ्यानें आत्मयज्ञही करावा, हाही या मार्गाचा एक भाग आहे. तो प्रसंग अद्यापि आलेला नाहीं. या बाबतींत मी या मार्गाचा अवलंब करावा असा निर्विवाद ध्वनि माझ्या अंतःकरणातून मला मिळालेला नाहीं; परंतु बाहेर जे प्रकार घडून येत आहेत त्यावरून माझा अंतरात्मा खवळून जाईल अशी मला भीति वाटत आहे म्हणून अस्पृश्यांच्या बाबतींत उपवासाच्या शक्यतेसंबंधानें लिहितांना या दुसऱ्या उपवासाच्या शक्यतेबद्दलही मी आपणाला लिहिलें नाहीं तर तुमच्या बाबतींत मी खोटेपणानें वागलों असें होईल असें मला वाटतें.

तुमच्याबरोबर जो मी पत्रव्यवहार केला, त्या बाबतींत पूर्ण गुप्तपणा मी माझ्याकडून राखला आहे, हें सांगावयास नको. अर्थात् माझ्याबरोबर रहावयास पाठविलेले सरदार वल्लभभाई पटेल व महादेव देसाई यांना ही गोष्ट माहीत आहे. तुम्ही या पत्राचा निःसंशय कसाही उपयोग करूं शकता.

एम्. के. गांधी.

## सर सॅम्युअल होअर यांचें उत्तर

इंडिया ऑफिस, व्हाइटहॉल
१३ एप्रिल १९३२.

प्रिय मि. गांधी,

तुमच्या ता. ३१ मार्चच्या पत्राला मी हें उत्तर पाठवीत आहे. अस्पृश्यवर्गाला स्वतंत्र मतदारसंघ देण्याच्या बाबतींत आपल्या भावना किती तीव्र आहेत याची मला पूर्ण कल्पना आलेली आहे. एखाद्या प्रश्नाच्या गुणदोषाचा विचार करूनच जरूर तो निर्णय देण्याचा

आमचा हेतू असतो एवढेंच मला या बाबतींत सांगता येईल. लोथियन कमि-टीनें आपला दौरा अद्याप संपविलेला नाहीं. या कमिटीनें केलेला रिपोर्ट हातीं येण्यास आणखी काहीं आठवडे तरी खास लागतील. आम्हाला तो रिपोर्ट मिळाल्यानंतर त्यातील शिफारशींसंबंधानें अत्यंत काळजीपूर्वक विचार करावा लागेल आणि असें केल्याशिवाय आम्ही त्या बाबतींत निर्णयही देणार नाहीं. असें करतांना तुम्ही व तुमच्याशीं सहमत असलेले लोक ह्यानीं या बाबतींत जी नेटाची विचारसरणी मांडली आहे, तिचाही आम्हाला विचार करावा लागेल. तुम्ही जर माझ्या ठिकाणीं असता तर आम्ही या बाबतींत जें कर-ण्याचें ठरविलें आहे तेंच तुम्हीही केलें असतें. कमिटीचा रिपोर्ट बाहेर पडेपर्यंत तुम्हाला वाट पाहता येईल. त्यासंबंधानें तुम्हांला पूर्ण विचारही करता येईल. आणि अखेरचा निर्णय करण्यापूर्वी या बाबतींत दोन्ही पक्षांचीं मतें विचारांत घ्यावीं लागतील. ह्यापेक्षा मला जास्त काहीं सांगता येत नाहीं. यापेक्षां माझ्यापासून आपण अधिक अपेक्षा केली असेल असें मलाही वाटत नाहीं.

## दहशतवाद्याची आवश्यकता.

जादा कायद्यासंबंधानें बोलावयाचें झालें तर सार्वजनिक रीतीनें व खासगी-रीतीनें पूर्वी जें मी बोललों त्याचाच मला पुनरुच्चार करावा लागेल. प्रस्था-पित सरकारच्या पायावरच उघडउघड आघात होत असतांना असल्या कायद्याचा उपयोग करणें जरूरीचें आहे अशी माझी खात्री झाली आहे. त्याचप्रमाणें हिंदुस्थानसरकार व स्थानिक सरकार आपपल्या हातीं असलेल्या विस्तृत अधिकाराचा दुरुपयोग करीत नाहींत किंवा सूडबुद्धीनेंही त्याचा उपयोग करीत नाहींत. कायदा व व्यवस्था सुरक्षित राखण्याकरिता त्याचप्रमाणें आमचे अधिकारी व समाजातील इतर वर्गांतील लोक ह्यांचें दहशतवाद्यांच्या अत्याचारापासून संरक्षण करण्याकरता आवश्यक म्हणूनच हे कायदे जारी कर-ण्यात आले आहेत. ही आवश्यकता नष्ट झाल्यावर फर्मानी कायद्याची अंमल-बजावणी पुढें केव्हाही करण्यात येणार नाहीं. सॅम्युअल होअर.

## गांधींचें मुख्य प्रधानांना पत्र.

एरवडा सेंट्रल प्रिझन

प्रिय मित्र, १८ आगट १९३२

अस्पृश्य वर्गाच्या प्रतिनिधित्वासंबंधानें ११ मार्च रोजीं सर सॅम्युअल होअर ह्यांना मी जें पत्र पाठविलें तें त्यांनीं आपणाला व प्रधानमंडळाला निःसंशय

दाखविलें असेल. तें पत्र या पत्राचाच एक भाग आहे असें समजून तेंही या पत्राबरोबरच वाचण्यांत यावें.

## उपवास करण्याचा निश्चय.

ब्रिटिश सरकारचा अल्पसंख्याकाच्या प्रतिनिधित्वाबद्दलचा निर्णय मी वाचला व त्यावर रात्रभर विचारही केला. सर सॅम्युअल होअर याच्या पत्रांत लिहिल्याप्रमाणें व मॉयनॉरिटी कमेटीपुढें भाषण करतांना मी जें सांगितलें, त्याचा विचार करतां आपल्या निकालाला प्राणांतिक विरोध मला करावा लागत आहे. तेव्हां प्राणांतिक कायमचा उपवास करणें हा केवळ एकच मार्ग आतां मला मोकळा राहिला आहे. त्या उपवासांत कोणत्याही प्रकारचें अन्न मी घेणार नाहीं. फक्त पाणी घेईन. व तें कधीं कधीं त्यांत मीठ व सोडा टाकूनही घेईन किंवा न टाकतांही घेईन ब्रिटिश सरकार स्वतःच्या इच्छेनें किंवा लोकमताचा दाब पडून आपला निर्णय बदलेल त्याचवेळीं हा उपवास थांबविण्यांत येईल. तसेंच अस्पृश्याचे प्रतिनिधि सामान्य मतदारसंघातर्फेच निवडण्यांत यावे, त्याच्याकरता निर्णीत केलेली स्वतंत्र मतदारसंघाची योजना सरकार मागें घेईल, त्याचवेळीं हा उपवास मागें घेण्यांत येईल. येत्या २० सप्टेंबर रोजीं दोन प्रहरीं या उपवासाला मी सुरवात करणार आहे वर दर्शविलेल्या पद्धतीप्रमाणें हा निर्णय बदलण्यांत आला तर उपवास सुरू करण्यांत येणार नाहीं. हें माझें पत्र तुमच्याकडे केबलनें पाठवावें, असें मी अधिकाऱ्यांना सागत आहे. असें केल्यास तुम्हांला भरपूर नोटीस मिळाल्यासारखें होईल.

हें पत्र व सर सॅम्युएल होअर याना मी पाठविलेलें पत्र हीं दोन्हीं पत्रें शक्य तितक्या लवकर प्रसिद्ध करण्यांत यावीं. जेलचे नियम मी दक्षतेनें पाळले आहेत. माझे दोन सोबती सरदार वल्लभभाई पटेल व महादेव देसाई यांच्याशिवाय या पत्रांतील मजकूर दुसऱ्या कोणाला माहीत नाहीं. तुम्ही शक्य केलें तर माझ्या पत्रासुळें लोकमतावर परिणाम घडवून आणावा अशी माझी इच्छा आहे. म्हणून हीं पत्रें लवकर प्रसिद्ध करावीं अशी मी विनंति करीत आहें.

## मुक्ततेकरितां माझा हा प्रयत्न नाहीं.

हा निश्चय मला करावा लागला याबद्दल मला दिलगिरी वाटते. पण मी

धर्मप्रवण आहें असें मला वाटत असल्यामुळे याशिवाय दुसरा कोणताही मार्ग मला शिल्लक राहिलेला नव्हता. आपली दगदग वाचावी म्हणून बादशहा-सरकारनें जरी मला मुक्त केलें तरी माझा उपवास चालूंच राहील. सर सॅम्युएल होअर यांच्या पत्रात मी असेंच लिहिलें आहे. कारण सरकारच्या या निर्णयाचा प्रतिकार करण्यास याशिवाय दुसरा कोणताही उपाय उरलेला नाहीं, असें मला वाटतें. कोणत्याही अपमानास्पद मार्गाचा अवलंब करून माझी सुटका करून घ्यावी, अशीही माझी इच्छा नाहीं. अस्पृश्यवर्गाकरिता स्वतंत्र मतदारसंघ निर्माण करणें हें त्या वर्गाच्या व हिंदुधर्माच्या दृष्टीनें हानिकारक आहे असें वाटण्यात माझ्या बुद्धीला भ्रमहि झाला असण्याचा संभव आहे. तसें असेल तर माझ्या जीवनाच्या तत्त्वज्ञानातील इतर विषयाच्या बाबतींतहि माझीं मतें चुकीचीं असतील. असें असेल तर माझ्या उपवासामुळें मला आलेला मृत्यु हा माझ्या चुकीचा प्रायश्चित्तरूप यज्ञच ठरेल व माझ्या विवेक-बुद्धीवर शिशुतुल्य श्रद्धा असलेल्या असंख्य स्त्रीपुरुषांच्या मनावरील ओझें दूर होईल. आणि जर माझा हा निर्णय बरोबर असेल तर, आणि तो निःसंशय न्याय्य आहे, असें माझें मत आहे मी जो उपाय योजण्याचें मनात आणलें आहे तो माझ्या जीवनोद्देशाचें परिपक्व फल आहे असेंच मी समजेन. या जीवितहेतुकरितांच मी गेलें पावशतक झगडत आलों आहे व या झगड्यात मी बरेंच यशहि संपादन केलें आहे.

तुमचा विश्वासु मित्र,
—एम्. के. गांधी.

## मुख्य प्रधानांचें उत्तर.

१० डाउनिंग स्ट्रीट,
८ सप्टेंबर १९३२.

प्रिय मि. गांधी,

आपलें पत्र वाचून मला फार आश्चर्य वाटलें व अतिशय वाईटही वाटलें. अस्पृश्यवर्गासंबंधानें बादशहा सरकारनें दिलेल्या निर्णयांतील खऱ्या अंतर्गत हेतूबद्दल गैरसमज झाल्यामुळेंच आपण हें पत्र लिहिलें आहे असें मला वाटतें. अस्पृश्यवर्गाला हिंदुसमाजापासून कायमचें अलग करण्याबाबत आपण अत्यंत विरुद्ध होता ही गोष्ट आम्ही सदैव जाणून होतों. गोलमेज परिषदेच्या

मायनॉरिटीज् कमिटीपुढें आपण आपलें मत स्पष्टपणें मांडलें व ११ मार्च रोजीं सर सॅम्युएल होअर यांना पाठविलेल्या पत्रातही आपण आपले मत पुनः एकदां प्रदर्शित केलें. हिंदुसमाजांतील पुष्कळ लोक तुमच्या मताचेच आहेत हेंही आम्ही जाणून आहों. म्हणूनच आपल्या मताचा अत्यंत काळजीपूर्वक अस्पृश्यवर्गाच्या प्रातिनिधित्वाच्या प्रश्नाचे वेळीं आम्ही विचार केला.

## सरकारी निर्णयाचें स्पष्टीकरण.

अस्पृश्यवर्गाच्या अनेक संस्थाकडून आमच्याकडे पुष्कळ विनंतिअर्ज आले. सामाजिक रूढीमुळें अस्पृश्यवर्गावर अनेक प्रकारचे अन्याय होत आहेत ही गोष्ट आपणही अनेक वेळा कबूल केली आहे. अशा परिस्थितींत कायदे-मंडळांतून अस्पृश्यवर्गाच्या प्रतिनिधींचें योग्य प्रमाण असणें जरूरीचें आहे व तो त्याचा हक्कही आहे हें जाणून त्यांच्या संरक्षणाची तजवीज करणें आमचें कर्तव्य आहे असें आम्हाला वाटलें; पण त्याच वेळीं हिंदुसमाजापासून ते फुटून निघतील असें कोणतेंही कृत्य करूं नये, अशीहि आम्ही अत्यंत काळजी घेतली. कायदेमंडळातून त्याचे प्रतिनिधि असावेत हें तत्त्व तुम्हालाही मान्य आहे, असें आपण खुद्द आपल्या ११ मार्चच्या पत्रात म्हटलें आहे.

सरकारी योजनेप्रमाणें अस्पृश्यवर्गाचे लोक हिंदुसमाजाचाच एक भाग म्हणून मानले जातील व समानतेच्या हक्कावर हिंदुमतदारसंघातर्फे ते आपलीं मतेंहि देतील. परंतु मतदारीच्या हक्काच्या दृष्टीनें हिंदुसमाजातील एक घटक राहूनही पहिलीं वीस वर्षे खास मतदारसंघामार्फत कांहीं मर्यादित प्रमाणात त्याना आपले प्रतिनिधि निवडून देता येतील. आजच्या स्थितींत त्याचे हक्क व हितसंबंध रक्षण करण्याचा हाच एक मार्ग आहे अशी आमची खात्री झाली आहे.

ज्या ठिकाणीं अशा प्रकारचे खास मतदारसंघ निर्माण करण्यांत आले आहेत तेथील अस्पृश्यवर्गाच्या लोकांचा सामान्य हिंदुमतदारसंघातर्फे मत देण्याचा अधिकार काढून घेण्यात आलेला नाहीं. त्याना दोन मतें देण्यात आलीं आहेत. हिंदुसमाजाशीं असलेल्या त्याच्या नात्यात बिघाड येऊं नये, याच हेतूनें असें करण्यात आलें आहे.

ज्याला तुम्ही जातीय मतदारसंघ म्हणता तशा प्रकारचा संघ अस्पृश्य-वर्गाकरिता आम्ही मुद्दाम निर्माण केलेला नाहीं आणि सर्व अस्पृश्याना

सामान्य किंवा हिंदुमतदारसंघात अंतर्भूत केलें आहे, त्यामुळें सामान्य हिंदु-मतदारसंघातर्फे मत देण्याचा त्याचा अधिकार कायम राहिल्यामुळे उच्च-वर्णीय उमेदवारानाही मतें मागण्याकरिता त्यांच्याकडे यावें लागेल व अस्पृश्यांना उच्चवर्णीयांकडे जावें लागेल. याप्रमाणे हिंदुसमाजातील ऐक्य कायम ठेवण्यास हरएक प्रकारची काळजी घेण्यात आली आहे.

## संरक्षक निर्बंध हंगामी स्वरूपाचे आहेत.

जबाबदारीच्या प्रांतिक सरकारांत आरंभींच्या कालात कायदेमंडळातून ज्याचें मताधिक्य होईल त्या पक्षाच्या हातीं सर्व प्रकारचे अधिकार जातील हें उघड आहे. अशा परिस्थितींत आपल्यावर होणाऱ्या अन्यायाना तोंड देण्याकरिता, आपलीं ध्येयें सिद्धीस नेण्याकरिता, आपल्या हिताविरुद्ध होणाऱ्या निर्णयाना प्रतिबंध करण्याकरितां व आपली परिस्थिति कायदेमंडळापुढें मांडण्याकरिता काहीं विशिष्ट प्रमाणात या समाजानेंच खुद्द निवडलेले प्रतिनिधि कायदेमंडळातून असणें जरूर आहे. कोणत्याही विचारी माणसाला ही गोष्ट खात्रीनें पटल्याशिवाय रहाणार नाहीं. आजच्या परिस्थितींत राखीव जागा ठेवून खास प्रतिनिधि निवडून देण्याच्या पद्धतीचा आम्ही विचार केला नाहीं. कारण या लोकाना जबाबदार असणारे खरे प्रतिनिधि उच्चवर्णीय हिंदूंच्या मताधिक्यावर ते निवडून येतील.

खास मतदारसंघ निर्माण करून मर्यादित संख्येत अस्पृश्य समाजाचे प्रतिनिधि निवडून द्यावयाचे व सामान्य हिंदु मतदारसंघातर्फे मत देण्याचा अस्पृश्यांचा नेहमींचा हक्क कायम ठेवावयाचा ही पद्धति मुसलमानासारख्या अल्पसंख्याकाकरिता स्वतंत्र मतदारसंघ निर्माण करण्याच्या पद्धतीहून अगदीं निराळी आहे. उदाहरणार्थ, कोणताही मुसलमान सामान्य मतदारसंघातर्फे मत देऊं शकत नाहीं किंवा उमेदवारही उभा राहूं शकत नाहीं. पण अस्पृश्य हा सामान्य मतदारसंघातर्फे मत देऊं शकतो व उमेदवारही होऊं शकतो.

## कमींत कमी राखीव जागा

मुसलमानाना त्यांच्या लोकसंख्येच्या प्रमाणात कायदेमंडळातून जागा देण्यात आल्या आहेत व काहीं प्रातात त्याच्या लोकसंख्येच्या प्रमाणापेक्षांही अधिक जागा त्याना मिळालेल्या आहेत. परंतु अस्पृश्यांच्या प्रतिनिधींचें प्रमाण अल्प आहे. त्यांच्या प्रतिनिधित्वाचें प्रमाण त्याच्या लोकसंख्येवर ठरविण्यात आलें

नाहीं, तर सर्वस्वी अस्पृश्य समाजानें निवडून दिलेले त्यांचे पुढारी कमींतकमी संख्येंत कां होईना कायदेमंडळांत यावे या दृष्टीनें अस्पृश्यप्रतिनिधींचें प्रमाण ठरविण्यांत आलें आहे. अस्पृश्य समाजाच्या खास जागांचें प्रमाण त्यांच्या लोकसंख्येच्या प्रमाणापेक्षां प्रत्येक ठिकाणीं कमी आहे.

मरेपर्यंत आपली उपासमार करून घेण्याचा अखेरचा उपाय योजण्याचें तुम्ही जें ठरविलें आहे तें इतर हिंदूंबरोबर संयुक्त मतदारसंघातर्फे अस्पृश्याना मत देतां यावें म्हणून नव्हे. कारण तशी तरतूद पूर्वीच करण्यात आली आहे. किंवा हिंदूंची एकी कायम रहाण्याकरितां तुम्ही असें करीत आहा असें म्हणावें तर तशीहि व्यवस्था झालेली आहे. परंतु हा जो उपाय अंमलात आणण्याचें तुम्ही ठरविलें आहे तो केवळ काहीं मर्यादित प्रमाणात अस्पृश्यवर्गातर्फे कायदेमंडळात बोलणारे प्रतिनिधी त्यानींच निवडून द्यावे ह्याला प्रतिबंध करण्याकरताच योजीत आहा. या वर्गावर आज भयंकर अन्याय होत आहेत ही गोष्ट सर्वमान्यच आहे. तसेंच कायदेमंडळांचा या वर्गाच्या भविष्यावर विशेष दाब राहील, ही गोष्ट लक्षात घेऊनच अत्यंत सावधगिरीनें रास्त सूचना केल्या असता आपण वरील प्रकारचा निश्चय का करावा, हेंच मला समजत नाहीं. प्रत्यक्ष परिस्थितीसंबंधानें गैरसमज झाल्यामुळेंच तुम्ही असें करीत आहा, असें मला वाटतें.

### सरकारचा निश्चय कायम आहे.

आपसात तडजोड करण्याचे प्रयत्न फुकट गेल्यामुळें व हिंदी प्रतिनिधींनीं बरीच सर्वसामान्य विनंति केल्यामुळेंच सरकारनें अगदीं नाखुषीनें अल्पसंख्याकाच्या प्रश्नाचा निर्णय करण्याचें काम पत्करलें. तो निर्णय त्यानीं आता दिला आहे. या बाबतींत जी अट ठेवण्यात आली आहे, ती पुरी झाल्याशिवाय हा निर्णय सरकार बदलील, अशी अपेक्षा करणें शक्य नाहीं. म्हणून या बाबतींत सरकारचा निर्णय कायम आहे, असेंच उत्तर मला दिलें पाहिजे. सरकारनें जी निवडणुकीची पद्धति ठरविली आहे तींत बदल करावयाचा असल्यास ह्या बाबतींत नेमलेल्या कमिट्यानींच आपसात करार करून व नवीन निवडणुकीची पद्धत सुचवून केला पाहिजे.

हा पत्रव्यवहार व सर सॅम्युअल होअर याना तुम्हीं पाठविलेले पत्र प्रसिद्ध करण्यात यावें, असें तुम्ही विचारता. परंतु तुम्ही उपवास का करीत आहा,

याचें कारण लोकांना स्पष्ट करून सांगण्याची संधि तुम्हाला तुमच्या आजच्या बंदिवासात मिळणें शक्य नसल्यामुळें तसें करणें अन्यायाचें होईल, असें मला वाटतें; म्हणून मी ही गोष्ट एकदम तुम्ही पुनः सांगितल्यास मान्य करतों. सरकारच्या निर्णयांतील प्रत्यक्ष तपशिलाचा पुन्हां एकदा आपण विचार करावा आणि जी गोष्ट करण्याचें तुम्हीं योजिले आहे ती खरोखरी समर्थनीय आहे काय हाही प्रश्न तुम्ही स्वतःला खोल विचार करून विचारावा, असें माझें तुम्हाला पुन्हा आग्रहाचें सांगणें आहे.

जे. रॅम्से मॅक्डोनल्ड.

## गांधीजींचें अखेरचें उत्तर.

येरवडा सेंट्रल प्रिझन,
९ सप्टेंबर १९३२

प्रिय मित्र,

आज तारेनें आलेलें तुमचे पत्र मला पोचलें. तुम्ही मोकळेपणानें व विस्तृत रीतीनें आपलें मत मला कळविलें ह्याबद्दल मी आपला आभारी आहे. मी जी गोष्ट करण्याचें ठरविलें आहे, तिचा आपण जसा अर्थ केला आहे, तसा माझ्या मनांत कधींच आला नाहीं, हें कळविण्यास मला वाईट वाटतें. ज्यांच्यातर्फे बोलण्याचा माझा हक्क आहे, असें मी म्हणतों त्यांच्या हितसंबंधाचा बळी देण्याकरितां मी प्राणांतिक उपवास करीत आहे, असा आरोप तुम्ही मजवर केला आहे. हा जो निर्वाणीचा उपाय मी योजीत आहे, त्यावरूनच या बाबतींत कोणत्याही प्रकारचा स्वार्थी आरोप केला जाणार नाहीं अशी मला आशा होती. जास्त कांहीं न बोलतां मी एवढेंच निश्चितपणें सांगतों कीं, ही गोष्ट म्हणजे एक शुद्ध धर्मकृत्य आहे. अस्पृश्य वर्गांतील लोकांना दोनदां मतें देता येतील एवढ्यानें त्याचें रक्षण होईल, किंवा हिंदू समाजांत फूट पडणार नाहीं असें मला वाटत नाहीं. अस्पृश्य वर्गाकरतां स्वतंत्र मतदारसंघ निर्माण करणें म्हणजे ह्या समाजाच्या अंगांत विषारी औषध टोचण्यासारखें असून त्यामुळें हिंदु समाजाचा नाश होईल, व अस्पृश्य समाजाचेंही कोणत्याही प्रकारें कल्याण होणार नाहीं. या बाबतींत आपल्याला कितीही सहानुभूति वाटत असली तरी असल्या अत्यंत धार्मिक, महत्त्वाच्या व जिव्हाळ्याच्या प्रश्नाच्या बाबतींत बरोबर निर्णय देणें आपणांला शक्य

नाहीं, असें मी आपणांला नम्रपणें कळवितो. अस्पृश्य समाजाला वाजवीपेक्षां अधिक प्रतिनिधी मिळाले म्हणून मी त्याविरुद्ध असतां कामा नये. अस्पृश्य लोक जोंपर्यंत हिंदुधर्मांत राहूं इच्छितात, तोंपर्यंत मर्यादित प्रमाणात कां होईना कायद्यानें हिंदुसमाजांतून त्याना अलग करण्यांत येत आहे, ह्या गोष्टीविरुद्ध मी आहे. तुमचा निर्णय कायम ठरून सुधारणायोजना अंमलात आली तर दलित वर्गाच्या उद्धाराकरतां ज्यानीं आपल्याला वाहून घेतलें आहे, त्या हिंदु सुधारकांच्या कामात अडथळा उत्पन्न होईल ही गोष्ट तुमच्या लक्षांत आली आहे काय ?

## निश्चय कायम आहे.

म्हणून मी जो निश्चय आपणाला कळविला आहे, त्यालाच नाखुषीनें चिकटून रहाणें मला भाग पडत आहे. तुमच्या निर्णयापैकी अस्पृश्याचा प्रश्नच तेवढा वेगळा काढला एवढ्यावरून ह्या निर्णयातील इतर भागाना माझी संमति आहे, व ह्या भागाच्या बाबतींत माझें समाधान झालेलें आहे असा गैरसमज होणार आहे. या निर्णयांतील दुसऱ्या भागासंबंधानेंही असेच गंभीर आक्षेप घेता येण्याजोगे आहेत. अस्पृश्यांच्या प्रश्नाच्या बाबतींत आत्माहुति देण्यास माझ्या सदसद् विवेक बुद्धीनें मला प्रवृत्त केलें तितकी तीव्रता मला इतर भागाच्या बाबतींत वाटत नाहीं.

एम्. के. गांधी.

## मुंबई सरकारला गांधीजींचें पत्र

अस्पृश्य वर्गाच्या प्रश्नासंबंधात गांधीजींनी उपवास करण्याचा निश्चय केला त्याबादत १५ सप्टेंबर रोजीं मुंबई सरकारला त्यांनीं एक पत्र पाठविलें. हें पत्र २१ सप्टेंबर रोजीं वर्तमानपत्रातून प्रसिद्धीकरितां पाठविण्यात आलें.

परमेश्वराचें स्मरण करून त्याच्याच कार्यप्रीत्यर्थ आणि अतिशय नम्रपणानें सांगावयाचें म्हणजे त्याच्याच प्रेरणेनें उपास करण्याचा मी निश्चय केला आहे. लोकमत संघटित करण्याकरता संधि द्यावी म्हणून मी उपवासाची तारीख तहकूब करावी असें काहीं मित्रानीं आग्रहानें सांगितलें. उपवासाची वेळ देखील आतां बदलणें शक्य नाहीं. मुख्य प्रधानाच्या पत्रात ज्या कारणाचा मी

निर्देश केला आहे त्या कारणाशिवाय ही वेळ बदलणें शक्य नाही असें मला मोठ्या दुःखानें सांगावें लागतें.

ज्या लोकांचा मग ते हिंदी असोत वा परकीय असोत माझ्यावर विश्वास आहे त्यांच्याविरुद्ध हा उपवास आहे आणि ज्यांचा तसा विश्वास नाहीं त्यांच्याकरतांही आहे. इंग्रजी अधिकाराविरुद्ध तर तो नाहींच नाहीं. हा अधिकारीवर्ग विपरीत उपदेश करीत असतांही ज्या इंग्रज स्त्रीपुरुषांनीं माझ्यावर विश्वास ठेवला व ज्या कार्याकरतां मीं झटत आहे त्या कार्याच्या न्याय्यपणावरही ज्यानीं विश्वास ठेवला त्यांच्याविरुद्ध हा उपवास आहे. ज्या लोकांचा मग ते हिंदू असोत वा इतर कोणीही असोत माझ्यावर विश्वास नाहीं त्याच्याविरुद्ध हा उपवास नाहीं परंतु माझ्या न्याय्य कार्यावर ज्याचा विश्वास आहे अशा हिंदी लोकाविरुद्ध हा उपवास आहे. थोडक्यात सांगावयाचें म्हणजे सत्यधर्माकडे प्रवृत्ति व्हावी या हेतूनें हिंदुलोकांच्या सदसद्विवेक बुद्धीला दंग करण्याच्या उद्देशानें हा उपवास सुरु करण्यांत आला आहे.

केवळ भावनेला आळवावें म्हणूनच केवळ हा उपवास नाहीं. शुद्ध व सरळ न्यायाच्या तराजूंत माझें जें काय सामर्थ्य असेल तें टाकण्याकरता हा उपवास मीं करीत आहे.म्हणून माझा जीव वाचविण्याच्या काळजीनें या बाबतींत वाजवीपेक्षा फाजील चिंता करण्याची गरज नाहीं. " ईश्वरी इच्छेशिवाय झाडाचें पानही हालत नाहीं, " या म्हणींतील सत्यतेवर माझा पूर्ण विश्वास आहे. या माझ्या देहाकडून आणखी अधिक सेवा घ्यावी, अशी परमेश्वराला आवश्यकता वाटत असेल तर ती त्याचें रक्षण करील. त्याच्या इच्छेविरुद्ध कोणीही त्याचें रक्षण करूं शकणार नाहीं. सर्वसाधारण अनुभवावरून पहाता माझें शरीर कांहीं दिवस तग धरूं शकेल, असा मला विश्वास वाटतो.

स्वतंत्र मतदारसंघ ही केवळ शेवटची काडी आहे. सवर्ण हिंदूंचे पुढारी व अस्पृश्यवर्गाचे पुढारी त्यांच्यात कशीतरी ठिगळें जोडून केलेल्या करारानें माझा उद्देश साध्य व्हावयाचा नाहीं. हा करार भरभक्कम स्वरूपाचा व्हावयाचा असल्यास तो खरा असला पाहिजे. जर हिंदू जनतेला मूळ शाखांसह अस्पृश्यता नष्ट करावयाची नसेल तर यत्किंचितही संकोच न वाळगता त्यांनीं माझा बळी दिला पाहिजे.

संयुक्त मतदारसंघाविरुद्ध जे लोक आहेत, त्यांच्यावर कोणत्याही प्रकारचा जुलूम होऊं नये. तें या बाबतींत इतका कसून विरोध कां करीत आहेत,

तें मला समजतें. माझ्यावर अविश्वास ठेवण्याचा त्यांना पूर्ण हक्क आहे. अस्पृश्य म्हणविल्या जाणाऱ्या वर्गाला चिरडून टाकणाऱ्या चुकीनें म्हटलें जाणाऱ्या उच्चवर्णीय हिंदू लोकांपैकींच मी एक नाहीं काय? असें असूनही अस्पृश्य वर्गाचे लोक अद्याप हिंदू समाजांत राहिले आहेत हेंच आश्चर्य आहे! परंतु त्यांचा हा विरोध समर्थनीय असला तरी ते एक चूक करीत आहेत असें मला वाटतें. त्यांची इच्छा असल्यास ते लांछनभूत दलित वर्गाला हिंदूंपासून निराळे करूं शकतील व त्याचा अलग वर्गही निर्माण करतील. असेंही करून खरोखरींच त्यांच्या हितसंबंधांचें रक्षण होतें, असें असतें तर मी त्या गोष्टीकडे लक्ष दिलें नसतें. परंतु अस्पृश्यवर्गाच्या रूढींशीं माझा जो निकट परिचय आहे त्यावरून त्याचें जीवित सवर्ण हिंदूंशीं इतकें निगडित झालें आहे कीं, त्यांच्यापासून अस्पृश्यांना अलग करणे अशक्य आहे. ज्या सवर्ण हिंदूंमध्यें ते राहातात व ज्यांच्या करतां ते जगतात त्याच्यापासून ते अलग होणें अशक्य आहे. अविभक्त कुटुंबांतील ते एक घटक आहेत. ज्यांच्या बरोबर ते राहतात त्या हिंदूंविरुद्ध ते बंड करून उठले आहेत व हिंदू धर्माचा त्याग करावा असें त्याना वाटत आहे. ह्याच्या मुळाशीं कोणत्या भावना आहेत हें मी जाणतों, परंतु या बाबतींत माझा जो अनुभव आहे, त्यावरून ही गोष्ट मी साध्य करूं शकणार नाहीं. हिंदुधर्मामध्यें असेंच काहीं अनिर्वचनीय तत्त्व आहे कीं, त्याच्या योगानें त्यांच्या मनांत आलें तरी ते त्या धर्माचा त्याग करूं शकणार नाहीं. अशी वस्तुस्थिति असतांना ज्याला या गोष्टीचा पुरेपूर जिवंत अनुभव आला आहे त्यानें स्वस्थ बसणें शक्य नाहीं. अस्पृश्यवर्गाला हिंदुसमाजापासून अलग करण्याचा जो विचार चालू आहे, त्यात त्याचा प्रतिकार करणें हें त्यांचें कर्तव्य आहे. हें करताना प्राण गेला तरी त्याची त्यानें परवा करतां कामा नये. या प्रतिकाराविरुद्ध जोराचें आक्षेप घेण्यात येतील. अस्पृश्य समाजाला अलग काढण्याचा जो विचार चालू आहे, त्याला योग्य प्रकारें प्रतिरोध करावयाचा असल्यास हिंदुसमाजात अस्पृश्यवर्गाला बिनधोकपणें पूर्ण स्वातंत्र्य मिळेल, अशाच प्रकारची तडजोड झाली पाहिजे. या बाबतींत विश्वासघात करण्यात आल्यास माझ्या किंवा माझ्याशीं सहमत असणाऱ्या लोकाचा बलिदानाचा दिवस थोडा लांबणीवर पडेल इतकेंच. सामाजिक, राजकीय व नागरिकत्वाच्या दृष्टीनें अस्पृश्यवर्गाचा आज जो छळ होत आहे, त्याच्या प्रतिकारार्थ प्राणांतिक उपवासाचा सत्याग्रह

मी एकटाच करणार आहे, असें नसून माझ्यासारखाच विचार करणारे किती तरी हिंदू सुधारक आज हिंदुस्थानात आहेत व तेही या मार्गाचा अवलंब केल्याशिवाय राहणार नाहींत. तेव्हा या सत्याग्रहांना तोंड देण्याचा प्रसंग आपल्यावर येणार आहे याचा विचार जबाबदार हिंदू लोकांनीं करणें जरूर आहे.

ज्या सुधारकांनीं माझ्याबरोबर आजपर्यंत काम केले त्यांनींही या उपवासातील मर्म जाणले पाहिजे.

माझ्या मनात हा भ्रम उत्पन्न झाला असेल किंवा ज्ञानाचा उदयही झाला असेल. जर हा भ्रम असेल तर त्याबद्दल शांत मनानें प्रायश्चित घेण्यास मला मोकळीक मिळाली पाहिजे. त्यामुळें हिंदुधर्मावर पडलेले एक मृत ओझें उचलून टाकल्यासारखें होईल. आणि जर हा ज्ञानोदय असेल तर माझ्या कष्टानें हिंदुधर्माला शुद्ध व निष्कलंक स्वरूप प्राप्त होईल आणि ज्या लोकाना माझ्या संबंधानें अविश्वास वाटत आहे त्याचें अंतःकरणही वितळून जाईल.

मी कशाकरितां उपवास करीत आहे यासंबंधानें गैरसमज झालेला दिसून येत असल्यामुळें त्या बाबतींत स्पष्ट कल्पना देणें जरूर आहे. अस्पृश्य वर्गाकरिता कोणत्याही स्वरूपात कायदेशीर रीतीनें स्वतंत्र मतदारसंघ निर्माण करण्याविरुद्ध हा माझा उपवास, हें मी पुन्हा एकदा सांगतों. ही भीति कायमची नष्ट झाल्याबरोबर मी उपवास करण्याचें सोडून देईन. राखीव जागा ठेवण्याच्या बाबतींत व हा सर्व प्रश्न योग्य मार्गानें सोडविण्याच्या बाबतींत माझीं ठाम मतें बनलीं आहेत. परंतु माझ्या सूचना पुढें मांडण्यास कैदी या नात्यानें मी नालायक आहे असें मी समजतों. सवर्ण हिंदू व अस्पृश्य वर्गांतील पुढारी याच्यात संयुक्त मतदारसंघाच्या तत्त्वावर करार झाल्यास व सर्व हिंदूंच्या जाहीर सभातून त्याला मान्यता देण्यात आल्यास त्याप्रमाणें वागण्यास मी तयार आहे.

एक गोष्ट मला स्पष्ट केली पाहिजे. अस्पृश्य वर्गासंबंधाचा प्रश्न समाधानकारकरीतीनें सुटला व तो मला मान्य झाला तर तेवढ्यावर जातीय प्रश्नासंबंधानें बादशहा सरकारनें जो निर्णय दिला आहे त्यांतील इतर जातिविशिष्ट भागही मला मान्य आहेत, असा त्याचा कोणत्याही प्रकारें अर्थ करण्यात येऊं नये.

त्यातील इतर पुष्कळ भागांना माझा वैयक्तिक विरोध आहे. हा निर्णय अमलांत आल्यास कोणतीही स्वतंत्र व लोकसत्ताक राज्यपद्धति चालू राहणें अशक्य होईल असें माझें मत आहे. या प्रश्नाचा समाधानकारक निकाल लागला म्हणून जी सुधारणायोजना पुढें आंखण्यात येईल तिलाही मान्यता देण्यास मी वद्ध आलो आहे, असें-ही मानण्याचें कारण नाहीं. हे राजकीय प्रश्न असून कॉंग्रेस त्या संबंधानें विचार करील व आपलें निश्चित मत देईल. वैयक्तिक दृष्टीनें हे प्रश्न पूर्णपणें माझ्या आवाक्यावाहेरचे आहेत किंवा मी कैदी असल्यामुळें या प्रश्नाच्या बाबतींतील माझे वैयक्तिक विचार मी व्यक्त करणार नाहीं.

माझ्या उपवासाला मी याप्रमाणें संकुचित मर्यादा घातली आहे. अस्पृश्य वर्गाचा प्रश्न हा मुख्यतः धर्मविषयक प्रश्न आहे. या प्रश्नासंबंधानें मी आजन्म विचार केलेला असल्यामुळें तो माझा खास प्रश्न आहे, असें मी मानतों. हा माझा पवित्र ठेवा आहे. त्याची जबाबदारी मी टाळूं शकत नाहीं.

ज्ञानप्राप्ति व तपाचरण म्हणून उपवास करणें ही जुनी पुराणी संस्था असून ख्रिश्चन व इस्लामी धर्मांत ती रूढ असल्याचें मी पाहिलें आहे. आत्मशुद्धी-करिता व प्रायश्चित्ताकरिता उपवास केल्याचीं पुष्कळ उदाहरणें हिंदुधर्मांत आहेत पण असा उपवास करणें कर्तव्यही आहे असें ठरल्यास ती एक माना-स्पद्व गोष्ट आहे असें मानलें पाहिजे, शिवाय माझ्या समजुतीप्रमाणें या विषयाला मी शास्त्रीय स्वरूप दिलें आहे. म्हणून या विषयातील तज्ज्ञ या नात्यानें माझ्या मित्राना व माझ्या सहानुभूति वाटणाऱ्या लोकाना माझी अशी धोक्याची सूचना आहे कीं, त्यानीं माझ्यावरील अंधविश्वासानें किंवा माझ्याबद्दल वाटणाऱ्या खोट्या व वेडेपणाच्या सहानुभूतीच्या भावनेला बळी पडून माझें अनुकरण करूं नये. या सर्व लोकांनीं निःस्वार्थ बुद्धीनें व अंग-मेहनतीनें अस्पृश्य समाजाची सेवा करावी. उपवास करण्याचा त्याच्यावरही प्रसंग येईल त्यावेळीं त्याना स्वतंत्रपणें स्फूर्ति मिळेल.

कोणत्याही विशिष्ट व्यक्तीविरुद्ध वाटत असलेल्या मत्सराने किंवा क्रोधानें प्रेरित होऊन हा उपवास करण्यात येणार नाहीं. अत्यंत शुद्ध हेतूनें तो कर-ण्यात येत आहे, हें मला शेवटीं सांगितलें पाहिजे. माझ्या मतें अहिंसेवर मारण्यांत आलेला हा शेवटचा शिक्का आहे. अहिंसेचें हें प्रकट स्वरूप आहे. म्हणून या विवादप्रसंगीं जे लोक, त्यांच्या मतें माझ्याशीं व माझ्या कार्याशीं

शत्रुत्वानें वागणाऱ्या लोकांविरुद्ध हिंसेचा प्रयोग करतील ते केवळ अविलंबित्वानें माझा शेवट करण्यास कारणीभूत होतील. इतर कोणत्याही बाबतींत नसलें तरी या बाबतींत यश यावें अशी इच्छा असल्यास विरोधकांशीं पूर्ण नम्रतेनें व सहानुभूतीनें वागणें अत्यंत अवश्य आहे. ”

## “ मानवतेकरतां लढा ”

२० सप्टेंबर रोजीं वर्तमानपत्रांच्या प्रतिनिधींना जेलमध्यें गांधीजींची मुलाखत घेण्यास परवानगी देण्यांत आली होती. २१ सप्टेंबरच्या “ टाइम्स ऑफ इंडिया ” पत्राच्या अंकात या बाबतींत जो मजकूर प्रसिद्ध झाला त्याचा साराश खालीं दिला आहे.

या प्रकरणाचा गोड शेवट होईल काय असें महात्मा गांधींना विचारलें असतां ते म्हणाले कीं, “ मी अनिवार्य आशावादी आहे. परमेश्वरानें मला सोडलें नसेल तर हा उपवास प्राणांतिक होणार नाहीं अशी मला आशा आहे.

“ मला सहानुभूति दाखविण्याकरिता उपवास करण्याचा निश्चय केलेल्या पुष्कळ लोकांकडून मजकडे तारा आल्या आहेत. सहानुभूति दाखविण्याकरिता म्हणून कोणी उपवास करूं नये, हें मी आग्रहपूर्वक सांगत आहे. ईश्वरी प्रेरणेनें मी या उपवासाला आरंभ केला आहे. म्हणून ज्याना याप्रमाणें निश्चित संदेश मिळाला नसेल त्यानीं या उपवासाच्या भानगडींत पडूं नये. आत्मशुद्धीकरिता किंवा अस्पृश्याच्या कार्याशीं समरस होण्याकरिता एक दिवस उपवास करणें योग्य आहे. तेवढें बस झालें. असा उपवास करणें, हें एक प्रकारचें कर्तव्य आहे व तो एक प्रकारचा हक्कही आहे व ज्या लोकानीं कडक शिस्त लावून घेऊन आपल्याला लायक बनविलें असेल त्यानाच तसा हक्क प्राप्त होईल. ”

नंतर अस्पृश्य वर्गाच्या प्रतिनिधित्वासंबंधानें प्रश्न निघाला असता उपवासापूर्वी पाच दिवस मुंबईसरकारकडे पाठविलेलें पत्र अद्याप प्रसिद्ध कसें झालें नाहीं याबाबत त्यानीं आश्चर्य प्रदर्शित केलें. पुढें ते म्हणाले कीं,

“ माझें म्हणणें मी जनतेपुढें स्पष्टपणें मांडलें आहे. परंतु आजच्या प्रश्नाच्या दृष्टीनें विचार करता कारागृहांत असताना मला या बाबतींत माझे विचार प्रदर्शित करणें शक्यच नव्हतें. आता माझ्यावरील निर्बंध काढून टाकलेले असल्यामुळें वर्तमानपत्राच्या प्रतिनिधींची मागणी मी प्रथम मान्य केली आहे.

केवळ स्वतंत्र मतदारसंघाविरुद्धच मी हा उपवास करीत आहे. कायदेशीर रीतीनें राखीव जागा ठेवाव्या याविरुद्ध माझा उपवास नाहीं. कायदेशीर रीतीनें राखीव जागा ठेवण्याच्या बाबतींत मी विरोध करीत आहे व कोण-त्याही तडजोडीला मी तयार नाहीं असें म्हणण्यात फार थोडा सत्यांश आहे. या बाबतींत मी विरुद्ध होतों व आहेही. परंतु या बाबतींत कोणतीही योजना माझ्यापुढें विचाराकरिता आलेली नाहीं. म्हणून त्या बाबतींत निर्णय देण्याचा प्रश्नच उरत नाहीं. या प्रश्नावर बराच वेळ विचार केल्यानंतर माझी निराशाच झाली. सेवाशुद्धीची भावना मुळाशीं नसतांना या जागा राखून ठेवण्यांत आल्यात त्यामुळें एका दृष्टीनें नुकसानच होईल.स्वाभाविक विकासाला तें प्रति-बंधक होईल. राखीव जागा हा माणसाला दिलेला आधार आहे. या आधा-रावरच तो कोणत्याही प्रकारें अवलंबून राहील तर तो स्वतःला दुबळें बनवील.

लोक मला हंसणार नाहींत तर मी नम्रपणें असें हक्कानें सांगेन कीं, मी जन्मानें स्पृश्य आहे परंतु माझ्या आवडीनें मी अस्पृश्यतेचा स्वीकार केला आहे. अस्पृश्य वर्गांतील उच्च जातीचा नव्हे तर अदर्शनीय व अगणनीय अशा त्यांच्यातील हीन जातीचा मी प्रतिनिधि आहे असें मी समजत आलों आहे. मलबार व ओरिसा भागात मी असे लोक पाहिले आहेत. जर या लोकांचा उद्धार व्हावयाचा असेल तर राखीव जागा ठेवून तो व्हावयाचा नाहीं. जर हिंदु सुधारकानीं त्यांच्यात मिसळून काम केलें तरच तो होईल; राखीव जागा ठेवल्यानें होणार नाहीं, अशी माझी खात्री झाली आहे. या अलगपणामुळें त्यांच्या सुधारणेची सर्व आशा नष्ट झाली आहे. माझ्या सर्वात्म्यानें याविरुद्ध बंड केलें आहे आणि स्पष्ट सांगावयाचें म्हणजे स्वतंत्र मतदारसंघाची योजना मागें घेतल्यास माझी प्रतिज्ञा शब्दशः पुरी होईल हें खरें; पण त्याच्या माग-चा आत्मा मात्र संतुष्ट होणार नाहीं. स्वतः होऊन अस्पृश्यतेचा स्वीकार केलेल्या माझ्यासारख्या माणसाचें अस्पृश्य व स्पृश्य याच्यातील ठिगळें जोडून केलेल्या तडजोडीनें समाधान होणार नाहीं.

## माझ्या जीविताचें स्वप्न.

अस्पृश्यता समूळ नष्ट व्हावी हीच गोष्ट मला पाहिजे आहे. याकरितांच मी जगत आहे व याकरिताच मरण्यांत मला आनंद वाटेल. म्हणून या दोन्ही जमातींत जिवंत करार व्हावा व त्या करारावर अस्पृश्यानीं व स्पृ-

त्यांनीं दोघांनीं एकत्र जमून केवळ नाटकी देखाव्यानें नव्हे तर खऱ्या बंधु-भावानें परस्पराना आलिंगन देऊन शिक्कामोर्तब करावें, अशी माझी इच्छा आहे. गेल्या ५० वर्षांच्या माझ्या जीविताचें हें स्वप्न पूर्ण करण्याकरिता मी आज अग्निदिव्य करीत आहे. ब्रिटिशसरकारचा निर्णय ही शेवटची काडी होती. हें एक निश्चयात्मक लक्षण होतें आणि असल्या बाबतींत बिनचुक निदान करणाऱ्या माझ्यासारख्या वैद्यानें हें लक्षण बरोबर जाणलें होतें. म्हणून स्वतंत्र मतदारसंघाच्या निष्कृतीपासून माझ्या कार्याला खरा प्रारंभ होईल. या-करिता मुंबई येथील पुढाऱ्याना व इतरानाही माझी अशी सूचना आहे कीं त्यांनीं या बाबतींत घाईघाईनें कोणताही निर्णय करूं नये.

## न्यायाकरितां आक्रोश.

माझ्या प्राणाला मी फारसें महत्त्व देत नाहीं. आपल्या धर्मांतील असहाय्य स्त्रीपुरुषावर हिंदूंनीं आजवर जे घोर अन्याय केले आहेत त्याच्या प्रायश्चितार्थ शंभर प्राण बळी दिले तरी तें एक अल्पसेंच प्रायश्चित्त होईल. म्हणून न्याय्य पथापासून त्यानीं यत्किंचितही ढळूं नये, असें मी त्याना आग्रहानें सांगेन. न्यायाच्या तराजूंत माझा उपवास मला टाकावयाचा आहे. सवर्ण हिंदूंना त्यानें जागें केलें व त्याना स्वकर्तव्याची जाणीव करून दिली तर त्यानें आपलें कार्य केलें असें मी म्हणेन. परंतु माझ्यावरील प्रेमामुळें ते कसावसा ओबडधोबड करार घडवून आणतील तर ते एक भयंकर चूक करतील व त्यामुळें माझें जीवित अधिकच दुःखमय होईल. स्वतंत्र मतदारसंघ काढून टाकल्यानें माझा उपवास मला सोडावा लागेल, परंतु मी ज्या जिवंत करा-राकरिता प्रयत्न करीत आहे तो जर घडून आला नाहीं तर त्या परिस्थितींत मला जिवंतपणीं मरण आल्यासारखेंच वाटेल. याचा अर्थ इतकाच होईल कीं, हा उपवास बंद केल्यानंतर माझ्या प्रतिज्ञेंतील भाव पूर्णांशानें सफल होण्या-करिता मला पुनः दुसरा उपवास जाहीर करावा लागेल.

वरवर पाहणाऱ्या माणसाला ही गोष्ट पोरकटपणाची वाटेल; परंतु मला तसें वाटत नाहीं. माझ्यापाशीं यापेक्षा अधिक महत्त्वाची कांहीं वस्तु असती तर मी या शापाच्या निरसनार्थ दिली असती. परंतु माझ्या प्राणापेक्षा अधिक महत्त्वाचें असें माझ्यापाशीं काहीं नाहीं. अस्पृश्यता समूळ नष्ट झाल्यास हिंदु धर्मावरील काळिमा त्यामुळें धुऊन जाईल, इतकेंच नव्हे तर त्याचा परिणाम

सर्व जगावर झाल्याशिवाय रहाणार नाहीं. अस्पृश्यतेविरुद्ध मी चालविलेला लढा म्हणजे मानवी समाजांत जें जें अशुद्ध आहे त्याविरुद्ध चालविलेला लढा होय."

हा उपवास असाच चालू ठेवावा लागला तर त्यावद्दल तुम्हाला खरेखरें काय वाटतें असें विचारलें असतां ते म्हणाले कीं, "इतर कोणाही इसमाप्रमाणें जिवंत राहण्याची माझीही इच्छा आहे. पाण्यामध्यें आयुष्य वाढविण्याची अलोट शक्ति आहे आणि मला गरज लागेल त्या त्या वेळीं मी तें घेत जाईन. माझ्या प्राणांचें रक्षण होईल अशा प्रकारचे जोराचे प्रयत्न मी करीन. त्यामुळें हिंदूंची व ब्रिटिशाची विवेकबुद्धि जागी होईल. या माझ्या वेदनांचा शेवट होईल आणि माझी ही हाक सर्वशक्तिमान् परमेश्वराच्या सिंहासनापर्यंत जाऊन पोंचेल.

## येरवडा करार.

पुढें दिलेला करार पुणें येथें आखिल भारतीय स्पृश्य हिंदूंचे व अस्पृश्य हिंदूंचे पुढारी याच्यामध्यें ता. २४ सप्टेंबर रोजीं झाला. व त्याला म. गांधींनीं आपली संमति दिली. या करारास अस्पृश्य वर्गांच्या प्रतिनिधींची संख्या निरनिराळ्या प्रांताच्या कायदेमंडळात किती असावी, हें ठरविलें आहे. तसेंच अस्पृश्याच्या कल्याणाच्या इतर कांहीं बाबतींबद्दलहि या समेटात शर्ती आहेत. त्या शर्ती पुढीलप्रमाणें आहेत.—

(१) पुढीलप्रमाणें निरनिराळ्या प्रांताच्या कायदेमंडळात अस्पृश्य वर्गांकरिता म्हणून जागा राखून ठेविल्या जातील. सर्वसाधारण मतदारसंघाना ज्या जागा दिल्या आहेत, त्या जागामध्यें या राखीव जागाचा अंतर्भाव करण्यात आला आहे.

मद्रास ३०, सिंधसह मुंबई १५, पंजाब ८, बिहारओरिसा १८, मध्यप्रांत व वऱ्हाड २०, आसाम ७, बंगाल ३०, संयुक्तप्रांत २०; एकूण १४८.

(२) या जागाकरिता प्रतिनिधींची निवडणूक संयुक्त मतदारसंघातर्फे होईल; मात्र निवडणुकीची पद्धति पुढें दिल्याप्रमाणें राहील—

मतदारसंघाच्या सर्वसाधारण यादींत ज्या अस्पृश्य मतदारांचीं नावें नोंदलीं गेलीं असतील, त्या अस्पृश्य मतदाराचा एक संघ मानला जाईल. या संघांतील

प्रत्येक मतदार आपलें एक मत देऊन राखीव जागापैकीं प्रत्येक जागेकरिता चार उमेदवारांचीं नांवें निवडील. ज्यांना या प्राथमिक निवडणुकींत जास्तींत जास्त मतें या संघातील मतदाराकडून मिळतील तेच चार गृहस्थ प्रत्येक राखीव जागेकरिता म्हणून सर्वसाधारण मतदारसंघातर्फे निवडून येण्याकरिता उमेदवार म्हणून कबूल केले जातील.

(३) वरिष्ठ कायदे कौन्सिलांत अस्पृश्यवर्गातर्फे जे प्रतिनिधि निवडले जातील तेहि संयुक्त मतदारसंघातर्फे परंतु राखीव जागाकरिता म्हणून निवडले जातील व या निवडणुकीकरिता प्रांतिक कायदेमंडळाच्या प्रतिनिधींच्या निवडणुकीच्या-प्रमाणेंच वर कलम दोनमध्यें सांगितलेल्या पद्धतीनें प्राथमिक निवडणुकी होऊन मग संयुक्त मतदारसंघातर्फे निवडणुकी होतील.

( ४ ) वरिष्ठ कायदे कौन्सिलात ब्रिटिश हिंदुस्थानातील सर्वसाधारण मतदार संघाकरिता ज्या जागा दिल्या जातील त्यापैकीं १८ टक्के जागा अस्पृश्य वर्गाकरिता म्हणून राखून ठेवण्यात येतील.

( ५ ) प्रांतिक कायदेकौन्सिलात व वरिष्ठ कायदेकौन्सिलात अस्पृश्यवर्गातर्फे प्रतिनिधी वर सांगितलेल्या पद्धतीप्रमाणे निवडून देताना, प्राथमिक निवडणूक होऊन उमेदवार ठरविण्याची जी पद्धत सांगितली आहे ती दहा वर्षांनंतर बंद होईल. खालीं दिलेल्या सहाव्या कलमात सांगितल्याप्रमाणें स्पृश्य व अस्पश्य हिंदूंनीं परस्पर नवा करार केल्यास दहा वर्षांच्या अगोदरहि ही पद्धति बंद करण्यात येईल.

( ६ ) प्रांतिक वरिष्ठ कायदेमंडळात अस्पृश्य वर्गाकरिता ज्या राखीव जागा ठेवल्या आहेत. त्याच्या निवडणुकीची कलम १ व कलम ४ मध्यें जी पद्धत सांगितलेली आहे, ती पद्धत या करारावर सही करणारे जे समाज आहेत त्याच्या ऐक्यमतानें हा करार बंद होईपर्यंत चालू राहील.

( ७ ) वरिष्ठ व प्रांतिक कायदे कौन्सिलातील निवडणुकीकरिता मतदानाचा हक्क प्राप्त होण्यासाठीं, लोथियन कमिटीच्या शिफारशीमध्यें अस्पृश्याकरिता म्हणून जे गुण सांगितले आहेत ते ज्या अस्पृश्याना असतील त्यानाच मताधिकार मिळेल.

( ८ ) स्थानिक स्वराज्य संस्थाच्या बाबतींत निवडणुकीबाबत किंवा सर-

कारी नोकरीबाबत कोणालाही तो अस्पृश्य आहे या सबबीवर नालायक समजण्यांत येणार नाहीं.

( ८ ) वरील निवडणुकीबाबत व सरकारी नोकरीबाबत अस्पृश्यवर्गांना योग्य प्रमाणांत जागा मिळाव्या म्हणून शक्य तितका प्रयत्न केला जाईल. फक्त सरकारी नोकरीकरितां शिक्षणाच्या ज्या अटी सरकारनें ठरविल्या असतील त्या मात्र पुऱ्या झाल्या असल्या पाहिजेत.

प्रत्येक प्रांतांतील शिक्षणखात्याकरतां मंजूर झालेल्या रकमेपैकीं अस्पृश्य-वर्गांतील मुलाच्या शिक्षणाच्या सोयीकरता योग्य ती रक्कम राखून ठेवण्यात यावी. -

मदन मोहन मालवीय, तेजबहादुर सप्रु, एम्. आर. जयकर, बी. आर. आंबेडकर, श्रीनिवासन् ,एम्. सी. राजा, सी. व्ही. मेथा,सी. राजगोपाळाचारी, राजेंद्रप्रसाद, जी. डी. बिरला, रामेश्वरदास बिर्ला, बी. एस. कामत, जी. के. देवधर, ए. व्ही. ठक्कर, आर. आर. बखले, पी. जी. सोळंकी, पी. बाळू, गोविंद मालवीय, देवदास गांधी, विश्वास, पी. एन राजभोज, गवई, शंकरलाल बँकर. २५ सप्टेंबर रोजीं मुंबई येथें भरलेल्या हिंदू परिषदेंत सह्या करारावर घेण्यांत आल्या. लल्लूभाई सामळदास, हंसा मेथा, के. नटराजन्, कामकोटी नटराजन्, पुरुषोत्तमदास ठाकूरदास, मथुरादास वसनजी, वालचंद हिराचंद, एच् . एन् . कुंझरू, के. जी. लिमये, पी. कोदंडराव, जी. के. गाडगीळ, मनू सुभेदार, अवंतिकाबाई गोखले, के. जे. चितळीया राधाकांत मालवीय, ए. आर. भट, कालया, प्रधान.

पहिला मोठा उपवास व पुणें करार याची हकीकत संपविण्यापूर्वीं याच विषयाशीं संबंध असलेली आणखी एक गो' सांगितली पाहिजे. या विषयानें आपल्याकडे लोकाचें लक्ष वेधून घेतलें होतें. मलबारमध्यें हरिजनकार्य करीत असलेले मि. केलापन यानीं अंतःस्फूर्तीनें प्राणांतिक उपवास करण्याचें ठरविलें होतें. गांधीजींचें चिरस्मरणीय उपोषण सुरू झालें त्याचवेळीं हाही उपवास सुरू झाला होता. गुरुवायुर मंदिर अस्पृश्याना खुलें करून ठेवण्याच्या बाबतींत ट्रस्टींचें मन वळविण्याकरिता हा उपवास सुरू करण्यात आला होता. गांधींनीं या प्रकरणाची पूर्ण चौकशी केली, त्यावेळीं ट्रस्टींना या बाबतींत पुरेशी नोटिस देण्यात आलेली नव्हती, असें त्याना आढळून आलें. या उप-

वासाला यश मिळणार असें दिसत असतांही गांधींजीना तें पसंत पडलें नाहीं. तावडतोबींचें यश हा या बाबतींत मुख्य प्रश्न नाहीं. नीतिदृष्ट्या आपलें आचरण शुद्ध आहे कीं नाहीं हें पाहिलें पाहिजे असें गांधींजींचें म्हणणें होतें. म्हणून त्यांनीं केलापन यांना पुढील दोन तारा पाठविल्या.

येरवडा सप्टेंबर २९

" काहीं महिनेपर्यंत तुम्ही आपला उपवास तहकूब करावा असें तुम्हाला सांगण्याबद्दल झामोरीन मला तारेनें विनंति करीत आहेत. अस्पृश्य लोक आज मंदिरात शिरले तर सनातन्यांची सदसद्विवेकबुद्धि त्यामुळें दुःखी होईल आणि असें दुःख देणें हा जुलूमच आहे. या योग्य कारणाकरिता तुमचा उपवास तहकूब करणें हें तुम्हाला योग्य वाटतें कीं नाहीं याचा विचार करा आणि झामोरिनच्या तारेंत निर्दिष्ट केलेल्या अटीच्या दृष्टीनें या शेवटच्या उपायाचा अवलंब करण्यापूर्वी झामोरिनला तुम्ही पुरेशी नोटिस दिली होती काय याचाही विचार करा.

येरवडा आक्टोबर २

तुमची तार पोंचली.तावडतोब यश मिळण्याची आशा असली तरी आपला निश्चय करण्याच्या कामीं ती आड येऊं देता कामा नये. केवळ शुद्ध नीतीच्या दृष्टीनें विचार करता माझ्या तारेप्रमाणें नोटीस देऊन तुम्ही आपला उपवास तहकूब करावा. ईश्वराची कृपा असल्यास माझ्या वाट्याचें ओझें मी सहन करीन. संमतीची तार पाठवावी. "

केलापन याना पुढील उपवास सुरू करणें जरूर पडल्यास त्यात आपणही भाग घेण्याचें गाधीजींनीं स्पष्ट वचन दिलें होतें व त्याचा उल्लेख त्यांनीं आपल्या पत्रकातही केला होता. योग्य नोटीशीचा अभाव हा दोष जेव्हां गांधीजींना दिसून आला तेव्हा त्यानीं तो मि. केलापन त्याना कळविला आणि केलापन यानींही उपवास सोडला.

१९३२ सालीं झालेल्या कायदेभंगाच्या चळवळीचा इतिहास व त्याचप्रमाणें पुणें कराराची हकीगत सागितली. अस्पृश्यता निवारणाच्या बाबतींत गाधींजींनीं केलेल्या विनंतीचा कायदेभंगाच्या चळवळीच्या प्रगतीवर निःसंशय विपरीत परिणाम झाला.

परंतु असें असलें तरी कॉंग्रेसचा कार्यक्रम चालूच राहिला. कायदेभंगाची चळवळ मंदावण्यास आणखी एक कारण झालें. त्यावेळीं जी परिस्थिति होती, तिचा विचार करता गुप्त पद्धतीचा अवलंब करून ही चळवळ चालू ठेवण्यांत

आली होती, हें मागें सांगितलेंच आहे. ह्या गुप्तपद्धतीचा अवलंब करणें हें सत्याग्रहाच्या मूलतत्त्वाविरुद्धच आहे. गांधींच्या उपवासासंबंधांत विचार करण्याकरितां कांहीं मित्रमंडळी पुण्यास जमली. ह्या कॉंग्रेसवाल्या पुढाऱ्यांत अर्थातच कायदेभंगाच्या चळवळीसंबंधानें चर्चा झाली. त्यांनीं दोन पत्रकें प्रसिद्ध केलीं. कायदेभंग करणें हा कॉंग्रेस-वाल्याचा पहिला हक्क आहे. आणि ज्या कॉंग्रेसवाल्यांना एकनाएक कारणा-करितां तुरुंगांत जाणें शक्य नाहीं त्या लोकांनीं–कॉंग्रेसवाले नसलेल्या राष्ट्रीय वृत्तीच्या लोकांनीं–अस्पृश्यतानिवारणाचें काम घ्यावें, असें ह्या पहिल्या पत्रकांत म्हटलें होतें. कायदेभंग चालू असतांना ह्या चळवळींत गुप्त पद्धतीचा जो शिरकाव झाला होता तो बंद करणें इष्ट आहे, असें ह्या दुसऱ्या पत्रकांत आग्रहानें सांगण्यांत आलें होतें.

१९३२ जानेवारी ४ तारखेस सरकारनें चढाईच्या हल्ल्याला सुरवात केली होती. राजगोपालाचारी ह्यांच्यामागून आलेले कॉंग्रेसचे अध्यक्ष बाबू राजेंद्र-प्रसाद यांनीं ह्या चळवळीचा वार्षिक–दिवस पाळावा त्या दिवशीं सर्वत्र पाठवि-लेलीं खादी पत्रकें वाचून दाखवावींत अशा सूचना कॉंग्रेसकमिट्यांना केल्या होत्या. ह्या सूचनाप्रमाणें देशांत पुष्कळ ठिकाणीं सभा भरविण्यांत आल्या, व हें पत्रक वाचून दाखविण्यांत आलें. ह्या सभांच्या वेळीं धरपकड करण्यांत आली, व लाठीमारही झाला, हें सांगावयास नकोच. ६ जानेवारी १९३३ रोजीं खुद्द अध्यक्षांनाही पकडण्यांत आलें. त्यानंतर श्री. अणे हे हंगामी अध्यक्ष झाले.

१९३२ च्या जानेवारींत लढ्याला सुरवात झाली, त्यावेळीं वल्लभभाई पटेल हे कॉंग्रेसचे अध्यक्ष होते. वर्किंग कमिटीनें ठरविल्याप्रमाणें वर्किंग कमिटींत रिकाम्या झालेल्या जागा भरून काढण्यांत आल्या नाहींत. वल्लभभाई पटेल ह्यांनीं आपल्या मागें एकामागून एक कोणी अध्यक्ष व्हावें याची यादी तयार केली, व त्याप्रमाणें बाबू राजेंद्रप्रसाद, डॉ. अन्सारी, सरदार शार्दूलसिंग कवी-श्वर, गंगाधरराव देशपांडे, डॉ. किच्लू, राजगोपालाचारी, राजेंद्रप्रसाद, व अणे हे १९३२ जानेवारीपासून ते १९३३ जुलैपर्यंत म्हणजे कॉंग्रेस संस्थेनें आपलें काम थांबवीपर्यंत एकामागून एक अध्यक्ष झाले. या कालामध्यें अनेक अवर्णनीय अडचणी उत्पन्न झाल्या असताही जयप्रकाश नारायण, लालजी मेहेरोत्रा, गिरधारी कृपालानी, जुगुल किशोर आग्रावाला व अनंत चौधरी यांनीं कॉंग्रेसच्या सेक्रेटरीचें काम केलें.

१९३३ च्या हकीकतींत कलकत्ता काँग्रेसची हकीकत अत्यंत महत्त्वाची आहे. या अधिवेशनाची हकीकत व सप्टेंबरच्या मध्यापर्यंत झालेल्या इतर हकीकती ह्यांचा रिपोर्ट जनरल सेक्रेटरींनीं काँग्रेसपुढे सादर केला, त्यातील कांहीं उतारे खालीं दिले आहेत.

## कलकत्ता काँग्रेस

मनाई हुकूम असतांही १९३२ एप्रिलमध्ये दिल्ली येथें कॉंग्रेसचें अधिवेशन भरले. त्याचप्रमाणें कलकत्ता येथेंही अशाच परिस्थितींत हे अधिवेशन भरविण्यांत आले. कायदेभंगाचे चळवळीला उतरती कळा लागली तरी दिल्ली येथील अधिवेशनापेक्षा या अधिवेशनांत लोकांची उत्साहशक्ति व प्रतिकाराची भावना अधिक प्रमाणात दिसून आली. देशांतील बऱ्याच प्रांतानीं आपल्या वाट्याचे वहुतेक सगळे प्रतिनिधी कॉंग्रेसला पाठविले होते. देशाच्या निरनिराळ्या भागातून २२०० प्रतिनिधी ह्या अधिवेशनाकरतां निवडण्यात आले होते. पं मदनमोहन मालवीय या अधिवेशनाचे अध्यक्ष होणार या कल्पनेमुळें लोकातील उत्साहशक्ति अधिकच वाढली होती. म्हातारपण झाले असतांही पंडित मोतीलाल नेहरू याच्या पत्नींनीं काँग्रेसला हजर राहण्याचें जाहीर केल्यामुळें काँग्रेसला येणाऱ्या प्रतिनिधींना अधिकच स्फुरण चढलें होतें. ३० मार्च रोजीं कलकत्ता येथें हें अधिवेशन भरलें. सर्व वातावरण जणूं काय विद्युत् शक्तीनें भरून गेलें होतें. डॉ. प्रफुल्ल घोष हे स्वागत कमिटीचे अध्यक्ष होते. हें अधिवेशन भरून देण्याविषयीं सरकारनें आपल्या हातीं असलेल्या सर्व उपायाचा अवलंब केला. पं. मदन मोहन मालवीय याना कलकत्त्यात जाऊं दिलें. नाहीं. असनसोल नावाच्या मधल्याच एका स्टेशनावर त्याना अटक करण्यात आली. त्याच्या बरोबरच मोतिलाल नेहरू ह्याच्या पत्नी, डॉ. सय्यद महंमद व अध्यक्षाच्या बरोबर असलेली इतर मंडळी ह्याना पकडण्यात आलें ह्या सर्वांना असनसोल जेलमध्यें पाठविण्यात आलें. कलकत्त्याला जात असता कॉंग्रेसचे हंगामी अध्यक्ष श्री. अणे ह्यांनाही पकडण्यात आलें. स्वागतमंडळाच्या लोकांनाही अटक करण्यांत आली. बऱ्याच कॉंग्रेस पुढाऱ्याना कलकत्ता सोडून जाऊं नये, असे निर्बंध घालण्यात आले. ह्या पुढाऱ्यांत मिसेस सेनगुप्त व डॉ. महमद आलम हे मुख्य होते. कलकत्त्याच्या वाटेमध्यें याप्रमाणें जवळजवळ १०००

प्रतिनिधी सरकारनें पकडले. बाकीचे प्रतिनिधी कलकत्त्याला येऊन पोहोंचले. मनाई हुकूम असतांही ११०० प्रतिनिधींनीं पूर्वी ठरविलेल्या जागेंत अधिवेशनाला सुरवात केली. पोलीस त्या जागीं लवकरच दाखल झाले व त्यांनीं ह्या कॉंग्रेस-वाल्याच्या शांत जमावावर लाठीचा हल्ला चढविला. पुष्कळ प्रतिनिधींना गंभीर स्वरूपाच्या जखमा झाल्या. मिसेस सेनगुप्त व इतर कॉंग्रेसचे पुढारी ह्याना अटक करण्यांत आली. हें अधिवेशन जबरदस्तीनें मोडण्याचा पोलिसांनीं प्रयत्न केला पण त्यात त्याना यश आलें नाहीं. पोलिसाचा लाठीमार चालू असतांही प्रतिनिधींच्या आतील गटानें अधिवेशनापुढील सातही ठराव वाचे-पर्यंत व ते मंजूर होईपर्यंत आपल्या जागा सोडल्या नाहींत. कलकत्ता अधिवेश-नाच्या प्रसंगीं ज्या लोकांना पकडण्यात आलें होते त्यापैकीं पुष्कळाना हें अधिवेशन संपताच मुक्त करण्यात आलें. बाकीच्यांवर रीतसर खटले होऊन त्याना शिक्षा देण्यात आल्या. मिसेस सेनगुप्त याना सहा महिन्याची शिक्षा देण्यात आली. ३ एप्रिल रोजीं तुरुंगांतून बाहेर पडताच पं. मालवीय कलकत्त्याला गेले व कॉंग्रेसचें अधिवेशन मोडण्याच्या कामीं पोलिसांनीं जे अत्याचार केले त्याची सप्रमाण हकीगत त्यांनीं जनतेपुढे मांडली. सरकारनें या बाबतींत उघड चौकशी करावी, असें पंडितजींनीं आव्हान दिलें पण त्याचा मुळींच स्वीकार करण्यांत आला नाहीं. कलकत्ता अधिवेशनांत मंजूर झालेले ठराव पुढे दिले आहेत:—

कलकत्ता येथें भरलेल्या ४७ व्या कॉंग्रेसमध्यें मंजूर झालेले ठराव, ३१ मार्च १९३३.

## १ स्वातंत्र्याचें ध्येय.

१९२९ सालीं लाहोर येथें मंजूर झालेल्या स्वातंत्र्याच्या ध्येयाच्या ठरावाला ही कॉंग्रेस मान्यता देत आहे.

## २ कायदेभंग-न्याय्य शस्त्र:—

लोकांच्या हक्काचें रक्षण करण्यास, राष्ट्रीय स्वाभिमानाची भरपाई करण्यास व राष्ट्रीय ध्येयाचें संपादन करण्यास कायदेभंग हेंच पूर्ण न्याय्य साधन आहे असें या कॉंग्रेसचें मत आहे.

## ३. कायदेभंगाचा कार्यक्रम चालू ठेवणें.

१ जानेवारी १९३२ रोजीं वर्किंग कमिटीनें जो निर्णय दिला त्यास ही काँग्रेस पाठिंबा देत आहे. गेल्या पंधरा महिन्यात ज्या हकीगती घडून आल्या त्या सर्वांचा विचार करता काँग्रेसचें असे ठाम मत झालें आहे कीं, देशाच्या आजच्या परिस्थितींत कायदेभंगाच्या चळवळीला आणखी बळकटी आणावी व तिचा आणखी अधिक प्रसार करावा. म्हणून वर्किंग कमिटीच्या ठरावाप्रमाणें लोकांनीं ही चळवळ यापेक्षां अधिक नेटाने चालवावी; अशी या काँग्रेसची विनंति आहे.

## ४. बहिष्कार.

परदेशी कापडावर पूर्ण बहिष्कार घालावा. खादीला अधिक आश्रय द्यावा व ब्रिटिश मालावर बहिष्कार घालावा, अशी या काँग्रेसची देशांतील सर्व वर्गांच्या व जमातींच्या लोकाना विनंति आहे.

## ५ श्वेतपत्रिका

सरकारनें जोंपर्यंत निर्दयपणानें दडपशाही चालविली आहे, लोकांच्या विश्वासातल्या पुढाऱ्याना व त्याच्या हजारों अनुयायांना सरकार तुरुंगात टाकीत आहे व स्थानबद्ध करीत आहे, भाषणस्वातंत्र्य व सभास्वातंत्र्य यांसारख्या जन्मसिद्ध हक्काना सरकार दडपून टाकीत आहे, वर्तमानपत्राच्या स्वातंत्र्यावर कडक निर्बंध घालण्यात आले आहेत, महात्मा गांधी इंग्लंडहून परत आल्याबरोबर राष्ट्रीय भावना चिरडून टाकण्याकरितां सामान्य कायदा बाजूला ठेवून प्रत्यक्ष लष्करी कायदाच सरकारनें जारी केला आहे तोंपर्यंत ब्रिटिश सरकारनें तयार केलेली कोणतीही योजना विचारार्ह किंवा स्वीकारण्यालायक आहे, असें हिंदुस्थानचे लोक केव्हांही समजणार नाहींत.

नुकत्याच प्रसिद्ध करण्यात आलेल्या श्वेतपत्रिकेंत जी स्वराज्याची योजना तयार करण्यात आली आहे ती हिंदुस्थानच्या हितरक्षणास विघातक असून हिंदुस्थानावरील परकीय सत्ता कायम ठेवण्याकरितां तयार करण्यांत आली आहे, हें लक्षात ठेवून हिंदुस्थानचे लोक या योजनेनें फसून जाणार नाहींत, असा या काँग्रेसला विश्वास वाटत आहे.

## ६ गांधीजींचा उपवास.

महात्मा गांधींचा सप्टेंबर १९३२ मधील उपवास यशस्वी रीतीनें पार

पडला याबद्दल ही कॉंग्रेस देशाचें अभिनंदन करीत आहे आणि अस्पृश्यता ही गतकालांतील एक गोष्ट व्हावी, अशी या कॉंग्रेसची आशा आहे.

### ७ मूलभूत हक्क.

" स्वराज्य " म्हणजे काय याची स्पष्ट कल्पना सामान्य जनतेला येण्यासाठीं १९३१ सालीं कराची कॉंग्रेसमध्यें मंजूर झालेल्या जन्मसिद्ध हक्कांच्या ठरावाला ही कॉंग्रेस मान्यता देत आहे

### गांधीजींचा उपवास.

कलकत्ता कॉंग्रेसनंतर एक अनपेक्षित गोष्ट देशांत घडून आली. ८ मे रोजीं म. गांधींना सरकारने एकाएकीं मुक्त केलें. हरिजनचळवळींत वाढत्या संख्येनें सामील होणाऱ्या कार्यकर्त्यांना मदत करण्याकरितां व त्यांच्या कार्यांत अधिक शुद्ध व अधिक सत्य स्वरूपाची सेवावृत्तीची भावना निर्माण करण्याकरिता महात्मा गाधींनीं ८ मे १९३३ पासून आत्मशुद्धीकरिता २१ दिवसाच्या उपवासाला प्रारंभ केला होता.

सरकारने त्याच दिवशीं एक पत्रक काढून गांधीजींना मुक्त करण्यात आल्याचें जाहीर केले व त्याप्रमाणें ८ मे रोजीं सायंकाळीं गाधींजी मुक्त झाले. मुक्त झाल्याबरोबर गांधीजींनीं पुढील पत्रक प्रसिद्ध करून कायदेभंगाची चळवळ सहा आठवडे तहकूब ठेवण्यात यावी अशी शिफारस केली.

" या मुक्ततेमुळें मला मुळींसुद्धा आनंद वाटणें शक्य नाहीं. कायदेभंगाची चळवळ चालविण्याच्या कामीं किंवा तिच्या बाबतींत सल्ला देण्याच्या कामीं या मुक्ततेचा मला कसा फायदा घेतां येईल, असें सरदार वल्लभभाई काल अगदीं बरोबर बोलले.

" म्हणून या मुक्ततेमुळें माझ्यासारख्या सत्याचा प्रयोग करणाऱ्या व सन्मान्य गृहस्थावर एक मोठें ओझेंच येऊन पडलें आहे. हा उपवास आता यापुढेंच चालावयाचा आहे. कोणत्याही कारणामुळें मला त्रास होऊं नये म्हणून कसल्याही प्रकारचा वादविवाद न करण्याचें मीं योजिलें आहे. इतर कोणत्याही विषयासंबंधाचा म्हणजे हरिजनकार्याशिवाय इतर कोणत्याही विषयाच्या विचारानें माझें मन मी व्याप्त करूं दिलें तर उपवासाचा हेतु पूर्णपणें निष्फळ होईल.

असे असलें तरी मी मुक्त झालों असल्याकारणाने कायदभंगाच्या चळवळीचा अभ्यास करण्याकडे मला माझी थोडी तरी उत्साहशक्ति खर्च करावीच लागेल.

अर्थात् कायदेभंगाच्या चळवळीसंबंधाने माझ्या विचारांत यत्किंचितही बदल झालेला नाहीं एवढेच फक्त मी यावेळीं सागूं शकतों. कायदेभंग करणाऱ्य पुष्कळ लोकांनीं जें शौर्य दाखविलें व जो स्वार्थत्याग केला त्याबद्दल स्तुति-शिवाय माझ्याजवळ दुसरे कोणतेही शब्द नाहींत. इतकें सांगितल्यानंतर या चळवळींत जी गुप्तता शिरली आहे ती तिच्या यशाला विघातक आहे असें म्हटल्याशिवायही राहावत नाहीं. म्हणून ही चळवळ पुढें चालवावयाचीच असेल तर देशातील निरनिराळ्या भागांतलि ही चळवळ चालविणाऱ्या लोकांनीं गुप्ततेचा सर्वतोपरी त्याग करावा, असें मी आग्रहानें सागत आहे. असें केल्यानें एकही कायदेभंग करणारा मनुष्य मिळणें मुष्कील होईल, अशी परिस्थिति आली तरी मला त्याची पर्वा नाहीं.

सामान्य जनतेचीं मनें भयानें ग्रासून गेलीं आहेत याबद्दल शंका उरलेली नाहीं. जादा कायद्यानीं त्याना भेडसावून सोडलें आहे व या नैतिक अधः-पाताला गुप्त पद्धतीच पुष्कळ अंशानें कारणीभूत झाल्या आहेत असें माझें मत झालें आहे.

कायदेभंगाची चळवळ संख्येवर अवलंबून नाहीं. या चळवळींत भाग घेणाऱ्या स्त्रीपुरुषांच्या गुणावरच ती अवलंबून आहे. आणि मी जर ही चळवळ चालवीन तर संख्येपेक्षा गुणावरच मी अधिक भर देईन. जर असें करतां आलें तर चळवळीचा दर्जा तावडतोब वाढल्याशिवाय राहणार नाहीं. या-शिवाय दुसऱ्या कोणत्याही रीतीनें जनतेला शिक्षण देणें अशक्य आहे. प्रत्यक्ष चळवळीसंबंधानें मी काहीं बोलूं शकत नाहीं. मीं जे विचार आता प्रदर्शित केले ते गेले कित्येक महिने माझ्या हृदयात कोंडून ठेवले होते व मी जें बोललों त्यांत सरदार वल्लभभाईही सहमत आहेत, हें मी सागूं शकतों.

मला आवडो न आवडो एक गोष्ट मला सागितलीच पाहिजे, ती म्हणजे पुढील तीन आठवडे कायदेभंग करणाऱ्या लोकांना भयंकर दुःख्यांत राहावें लागेल ही होय. कॉंग्रेसचे अध्यक्ष श्री. बापुजी अणे हे ही चळवळ एक महिना किंवा सहा आठवडे तहकूब ठेवण्यात आली आहे असें जाहीर करतील तर बरें होईल.

आतां मी सरकारलाही एक विनंति करणार आहे. देशांत शांतता राहावी असें सरकारला खरोखरी वाटत असेल, देशात खरी शांतता नाहीं असें जर सरकारला वाटत असेल, जादा कायद्याच्या आधारावर राज्य करणें हें राज्य करणेंच नव्हे असें जर सरकारला वाटत असेल, तर या तहकुबीचा त्यानें फायदा घ्यावा व सर्व कायदेभंग करणाऱ्या लोकाना विनशर्त मुक्त करावें.

या तपांतून मी वाचलो तर देशातील परिस्थितीची पाहणी करण्यास मला वेळ सांपडेल व कॉंग्रेसच्या पुढाऱ्यांना व सरकारलाही मी सल्ला देईन. इंग्लंडहून आल्यानंतर चळवळीच्या सूत्राचा मी ज्या ठिकाणीं त्याग केला, तेच टोंक मी आपल्या हातीं घेईन.

माझ्या प्रयत्नामुळें सरकार व कॉंग्रेस याच्यात तडजोड घडून आली नाहीं व कायदेभंगाची चळवळ पुनः सुरु करावी लागली तर जादा कायद्याचें राज्य पुन्हा चालू करण्यास सरकार मोकळेंच आहे. सरकारची इच्छा असेल तर कांहीं तरी मधला मार्ग निघेल, याबद्दल मला शंका वाटत नाहीं.

कायदेभंग करणारे पुष्कळ लोक तुरुंगात आहेत. सरदार वल्लभभाई पटेल, खानसाहेब अबदुल गफारखान, पं. जवाहरलाल व इतर लोक जोंपर्यंत तुरुंगात जिवंत पुरण्यात आले आहेत तोंपर्यंत कायदेभंगाची चळवळ मागें घेणें शक्य नाहीं.

तुरुंगाबाहेर असलेल्या कोणत्याही मनुष्याला कायदेभंगाची चळवळ मागें घेण्याचा अधिकार नाहीं. त्या वेळीं जी वर्किंग कमिटी काम करीत होती तिलाच ही गोष्ट शक्य आहे. मला ज्या वेळीं पकडण्यात आलें त्या वेळच्या वर्किंग कमिटीचा मी उल्लेख करीत आहे. कायदेभंगाच्या चळवळीसंबंधानें मी जास्त कांहीं बोलणार नाहीं. कदाचित् आता जें मी बोललों तेंच जास्त बोललों. परंतु मला जर कांहीं बोलावयाचें असेल तर जोंपर्यंत माझ्या अंगात ताकद आहे तोंपर्यंतच बोलता येईल.

वर्तमानपत्राच्या लोकानीं यापुढें मला त्रास देऊं नये असें त्याना माझें आग्रहाचें सागणें आहे. तसेंच माझी भेट घेऊं इच्छिणाऱ्या लोकानींहि असाच पुन्हा एकदा आत्मसंयम करावा, अशी माझी इच्छा आहे. मी अद्याप तुरुंगातच आहे, असें त्यानीं समजावें. राजकीय किंवा इतर प्रश्नांवर चर्चा करण्यास मी नालायक आहे. मला पूर्ण शातता मिळेल तर फार बरें होईल. या

मुक्ततेचा मी दुरुपयोग करणार नाहीं, असेंही मी सरकारला सांगूं इच्छितों. या व्रतातून मी सुरक्षित पार पडलों व कायदेभंगाची चळवळ चालविण्याकरिता कोणत्याही गुप्त किंवा उघड उपायाचा अंमल न करता राजकीय वातावरण जर असेच कुंद राहिले तर ज्या तुरुंगातील स्नेह्याचा मी जवळ जवळ त्याग करून आलों त्याना भेटण्याकरिता सरकारनें मला पुन्हा तुरुंगात न्यावें असें मी त्याना सांगेन.

सरदार वल्लभभाईबरोबर मला रहावयास सांपडले हे मी माझें मोठें भाग्य समजतो. त्याचे निरुपमेय शौर्य व राष्ट्राबद्दलचें त्याचें उज्ज्वल प्रेम याची मला जाणीव होतीच. परंतु त्याच्या जवळ राहण्याचा मला प्रसंग आला नव्हता. पण गेले १६ महिने तें भाग्य मला लाभले. ज्या प्रेमानें त्यांनीं मला वागविलें, त्याचा विचार केला असता मला माझ्या आईची आठवण होते. त्याच्या ठिकाणीं आईचे गुण आहेत हें मला कधींही समजून आलें नव्हते. मला जरा काहीं झाले कीं, त्याच्या मनाची खळवळ उडून जात असे. माझ्या सुखसोयी करण्याबद्दल ते अगदीं कसून काळजी घेत असत. वल्लभभाई व माझे दुसरे स्नेही यानीं मला काहीं करूं द्यावयाचे नाहीं, याबद्दल जणूं काय कटच केला होता. आणि ज्या ज्या वेळीं आम्हीं राजकीय प्रश्नावर चर्चा करीत असूं त्या त्या वेळीं सरकारपुढें असलेल्या अडचणींची त्यानाही पूर्ण कल्पना होती असें जर मीं सांगितलें तर सरकार त्यावर विश्वास ठेवील, अशी मला आशा आहे. बार्डोली व खेडाभागातील शेतकऱ्यासंबंधानें त्यांना जी काळजी वाटत होती, तिचें तर मला कधींच विस्मरण होणें शक्य नाहीं."

गांधींच्या या जाहीरपत्रकानंतर कॉंग्रेसचे हंगामी अध्यक्ष श्री. अणे यांनीं कायदेभंगाची चळवळ ६ आठवडे तहकूब ठेवण्यात आली आहे, असें जाहीर केलें. आपले उत्तर प्रसिद्ध करण्यात सरकारनेंही दिरंगाई केली नाहीं.

"कायदेभंगाची चळवळ केवळ तहकूब केली एवढ्यानेंच कैद्याची मुक्तता करण्याच्या बाबतींत जरूर असणाऱ्या अटी पूर्ण झाल्या, असें म्हणता यावयाचें नाहीं. या बाबतींत कॉंग्रेसशीं वाटाघाट करण्यास सरकार तयार नाहीं.

९ मे रोजीं हिंदुस्थानसरकारनें पुढील एक सरकारी जाहीरपत्रक प्रसिद्ध केलें:—

" मि. गांधी यांनीं बऱ्याच मोठ्या मुदतीचा उपवास करण्याचें ठरविल्यामुळें त्यांना मुक्त करण्यांत आलें आहे. या उपवासाशीं सरकारचा कांहीं संबंध नाहीं. हरिजनचळवळीकरितांच केवळ हा उपवास करण्यांत येत आहे असें त्यांनींच म्हटले आहे. तेव्हा मि. गांधी यांच्या मुक्ततेमुळें कायदेभंग केलेल्या कैद्यांच्या मुक्ततेसंबंधानें किंवा जे लोक या चळवळीला मदत करीत आहेत त्यांच्यासंबंधानें सरकारच्या सामान्य धोरणात कोणताही बदल घडून आलेला नाहीं.

गेल्या १ एप्रिल रोजीं असेंब्लीमध्यें गृहमंत्र्यानीं कायदेभंग केलेल्या कैद्यांच्या मुक्ततेच्या बाबतींत सरकारचें काय धोरण आहे, तें स्पष्टपणें सागितलें आहे.

ते आपल्या भाषणात म्हणाले कीं, " कॉंग्रेस जर हा लढा पुनरुज्जीवित करूं इच्छित नाहीं तर तसें स्पष्टपणे का म्हणूं नये ? आपल्या मनाप्रमाणें सरकार जर आपलें धोरण बदलणार नाहीं तर कायदेभंगाची चळवळ सुरू करण्याची धमकी सरकारच्या डोक्यावर लोंबकळत ठेवावयाची अशी कां कॉंग्रेसची इच्छा आहे ? कायदेभंग पुनः सुरूं होईल असें भय जोंपर्यंत कायम आहे तोंपर्यंत कोणत्याही प्रकारें सहकार्य करणें अशक्य आहे.

परिस्थिति अनुकूल झाल्यावर या कैद्याना तुरुंगात ठेवण्याची आमची इच्छा नाहीं, परंतु हे कैदी बाहेर सुटून आल्यावर पुनः कायदेभंगाची चळवळ सुरूं होणार असेल तर त्याना न सोडण्याचा आमचा तितकाच निश्चय आहे. कॉमन्स सभेमध्ये सेक्रेटरी ऑफ स्टेट यानीं आमची परिस्थिति स्पष्टपणें मांडली आहे.

ते म्हणाले, " हे कैदी सुटल्यानंतर पुन्हां कायदेभंगाची चळवळ सुरू होणार नाहीं अशी आमची खात्री झाली पाहिजे. कायदेभंगाची चळवळ काहीं काळ तहकूब करण्यात आली एवढ्यानें सरकारचें समाधान झालें व कॉंग्रेसच्या पुढाऱ्यांशीं वाटाघाट करण्याइतकी परिस्थिति निर्माण झाली असें म्हणता यावयाचें नाहीं. कायदेभंगाची चळवळ निश्चितपणे बंद करण्यात आली पाहिजे. कॉंग्रेसनें कायदेभंगाची चळवळ मागें घ्यावी म्हणून कॉंग्रेसशीं वाटाघाट करावयाची नाहीं किंवा या बेकायदा चळवळीच्या बाबतींत तडजोड घडवून आणावयाची आहे, म्हणून कैद्यानाहि मुक्त करावयाचें नाहीं. "

सिमल्याहून याप्रमाणे नकारात्मक उत्तर प्रसिद्ध झाले. त्याच वेळीं श्री. विठ्ठलभाई पटेल व सुभाषचंद्र बोस ह्याच्या सहीचें एक पत्रक व्हिएन्नाहून प्रसिद्ध झालें. "कायदेभंगाची तहकुबी करण्याचें गांधींचे हें कृत्य म्हणजे आपल्या अपयशाची कबूली देणेंच होय." या पत्रकात पुढें असेंही म्हटलें होतें कीं, " राजकीय पुढारी या दृष्टीनें मि. गांधी हे अपयशी ठरले आहेत, असें आमचें स्पष्ट मत झालें आहे; म्हणून नवीन तत्त्वे व नवीं साधनें यांच्या पायावर काँग्रेसची पुनर्घटना करण्याची वेळ आली आहे. अर्थात् या कामाकरता नव्या पुढाऱ्याचीही जरूरी आहे. गांधीजींनीं आजन्म ज्या तत्त्वाचा पुरस्कार केला त्यांच्याशीं विसंगत असलेला कार्यक्रम अमलात आणण्याचे कामीं मि. गांधी याचा उपयोग होईल अशी अपेक्षा करणें चुकीचें होईल.

काँग्रेसमध्ये याप्रमाणें समूळ फरक होइल तर ते चांगलेंच. तसें न झाल्यास एक नवीन जोरदार पक्षच भरीव तत्त्वावर स्थापन करावा लागेल."

गांधींच्या मुक्ततेमुळें जी संधि मिळाली आहे तिचा फायदा घेऊन काँग्रेसवाल्यानीं एकत्र जमावें व देशाच्या परिस्थितीचा विचार करावा अशी-हि कल्पना या वेळीं निघाली. अशा प्रकारची परिषद भरविणें जरूरीचें आहे असें वाटल्यामुळें व गांधींची प्रकृति सुधारून ते या परिषदेला हजर रहावे या इच्छेनें काँग्रेसच्या हंगामी अध्यक्षांनीं कायदेभंगाच्या तहकुबीची मुदत आणखी ६ आठवड्यानीं वाढविली. उपवासाची लाववरची मुदत व पुढें कोणता मार्ग स्वीकारण्यात येईल यासंबंधाने उत्पन्न झालेली अनिश्चितता यामुळें गांधीजी पुण्यात ज्या ठिकाणीं राहात होते त्या लेडी ठाकरसींच्या पर्णकुटीकडे राष्ट्राचें लक्ष वेधून राहिले होतें. गांधींचा उपवास सुटला व कोणताही अनिष्ट प्रसंग न येता गांधीजी या तपश्चर्येतून सुरक्षित पार पडले याबद्दल देशात सर्वत्र आनंद व्यक्त करण्यात आला.

## ४ पुणें-परिषद

देशांतील राजकीय परिस्थितीचा विचार करण्याकरतां पुणें येथे १२ जुलै १९३३ रोजीं काँग्रेसवाल्याची एक सामान्य परिषद भरली. श्री. अणे यानीं प्रास्ता-विक भाषण करून परिषदेच्या कामाला सुरवात केली. देशातील स्थितीसंबं-धानें महात्माजींनीं आपले विचार थोडक्यात सभेपुढें मांडले. नंतर चर्चेला सुरवात झाली व त्या दिवसाचें सभेचें काम तहकूब झालें. दुसरे दिवशीं परि-

'षदेंतील सभासदांनीं पुढें माडलेल्या मुद्यावर गांधीजींनीं आपलें म्हणणे विस्तारानें माडलें. यानंतर सभेपुढें आलेल्या ठरावासंबंधानें चर्चा सुरू झाली. कायदेभंगाची चळवळ विनशर्त मागें घेण्यांत यावी हा ठराव नामंजूर करण्यांत आला त्याप्रमाणें वैयक्तिक कायदेभंगाचा पुरस्कार करणारा ठरावही फेंटाळण्यांत आला शेवटीं सरकारशीं तडजोड घडवून आणण्याकरतां व्हाइसरॉयाची मुलाखत घेण्याचा अधिकार गांधीजींना देण्यात आला. या ठरावाप्रमाणें गांधीजींनीं मुलाखतीकरता व्हाईसरॉयना तारेनें विनंति केली. पुण्याच्या परिषदेसंबंधानें वर्तमानपत्रांतून जे अनेक चुकीचे रिपोर्ट प्रसिद्ध झाले, त्याच्याकडे व्हाइसरॉयानीं बोट दाखविलें. व कॉंग्रेस जोंपर्यंत कायदेभंगाची चळवळ मागें घेत नाहीं तोंपर्यंत गांधीजींना मुलाखत देण्याचें त्यानीं नाकारलें. त्यावर गांधींनीं उत्तर पाठविलें. पुण्याच्या परिषदेंत ज्या अनेक प्रकारच्या खाजगी चर्चा झाल्या, त्याच्यासंबंधानें प्रसिद्ध झालेल्या अनधिकृत रिपोर्टावरून सरकारनें आपलें हें मत बनविलें आहे. या परिषदेंत जी चर्चा झाली, ती सन्माननीय तह घडवून आणण्यास अनुकूल अशीच होती असें आपल्याला मुलाखतीची परवानगी मिळाल्यास आपण दाखवून देऊं, असें महात्माजींनीं व्हाइसरॉयांना उलट तारेनें कळविलें. गांधीजींचे शांतीचे हे सर्व प्रयत्न फुकट गेले, व राष्ट्राला आपली अब्रू राखण्याकरतां हा लढा पुढें चालवावा लागला. सामुदायिक कायदेभंग तहकूब करण्यात आला. व ज्यांना कायदेभंग करण्याची इच्छा आहे, व सामर्थ्य आहे त्यानीं वैयक्तिक कायदेभंग करावा, असा सल्ला देण्यांत आला. सामुदायिक कायदेभंग बंद करण्यात आल्यामुळें सर्व कॉंग्रेससंस्था व युद्धमंडळें बंद करण्यात आली.

### ५ वैयक्तिक कायदेभंग

गांधीजींनीं आपल्याला अत्यंत प्रिय असलेल्या वस्तूंचा त्याग करून वैयक्तिक कायदेभंगाच्या चळवळीला आरंभ केला. साबरमती आश्रम मोडून टाकून तेथील आपल्या सहकाऱ्यांना इतर सर्व चळवळी बंद ठेवून या लढ्यांत सामील होण्याबद्दल विनंति केली. आश्रमातील जंगम मालमत्ता काहीं सार्वजनिक संस्थांना त्यांनीं देऊन टाकली, व दुसऱ्यांना सारा भरण्यास लागूं नये म्हणून आश्रमाची जागा जमीन व त्यांवरील पिकें त्यानीं सरकारच्या स्वाधीन करण्याचें ठरविलें.

गांधीजींनी ह्या बाबतींत सरकारला एक पत्र पाठविले पण तें पोंचल्याचें तेवढेंच सरकारने गांधीजींना एका ओळींत कळविले.

## गांधीजी साबरमती आश्रमाचा त्याग करतात.

सरकारनें जेव्हा याप्रमाणे आश्रम ताब्यात घेण्याचें नाकारले त्यावेळीं गांधीजींनीं तो हरिजन चळवळीकरितां देऊन टाकला. गांधीजी दांडी मार्चकरता ज्यावेळीं निघाले त्यावेळीं त्यानीं जें पत्रक काढलें होतें त्याची आठवण आम्ही यावेळीं देऊं इच्छितो. स्वराज्य मिळेपर्यंत आपण पुन्हा आश्रमाला येणार नाहीं असा त्यांनीं त्यावेळीं खरोखरी निश्चय केला होता आणि या प्रतिज्ञेला अनुसरून १२ एप्रिल १९३० पर्यंत ते आश्रमाला आलेही नव्हते. फक्त एकाच वेळीं आपल्या दुखणाइत मित्राच्या समाचाराकरता ते तेथें आले होते. हरिजनसंघाला हा आश्रम देऊन टाकून इहलोकातील परिग्रहाच्या ह्या वस्तूचा त्यानीं कायमचा त्याग केला.

१ आगष्ट १९३३ रोजीं गांधीजी रासखेड्याकडे जाण्यास निघणार होते परंतु आदल्याच दिवशीं त्याना व त्याच्या आश्रमांतील ३४ इसमाना सरकारनें अटक करून त्यांना येरवड्यास पाठविलें. पण ता. ४ रोजीं सकाळीं त्याना मुक्त करण्यात आलें व येरवडा खेड्याची हद्द सोडून त्यांनीं बाहेर जावें व पुण्यात जाऊन रहावें असा त्याच्यावर हुकूम बजावण्यात आला. हा हुकूम अर्थात् पाळण्यात आला नाहीं. अर्ध्या तासात गांधीजींना पकडण्यात आलें व त्याना एक वर्षाची शिक्षा देण्यात आली.

गांधीजींना अटक होऊन शिक्षा झाल्यानंतर सर्व प्रातातून वैयक्तिक कायदेभंगाची चळवळ सुरु झाली. पहिल्या आठवड्यातच शेंकडों कार्यकर्ते तुरुंगात गेले. कॉंग्रेसचे हंगामी अध्यक्ष श्री. अणे हे १३ कार्यकर्त्यांसह अकोल्याकडे चालले असतां त्या सर्वांना १४ आगष्ट रोजीं पकडण्यात आलें. त्यांच्या मागून आलेले हंगामी अध्यक्ष सरदार शार्दूलसिंग कवीश्वर यानींही लगेच तुरुंगाची वाट धरली. तुरुंगात जाण्यापूर्वीं वैयक्तिक कायदेभंगाची चळवळ तिच्या अर्थाप्रमाणें सत्यस्वरूपात चालणें सोयीस्कर जावें म्हणून हंगामी अध्यक्षाची जागा त्यांनीं रद्द केली व त्यामुळें निरानिराळ्या प्रांताच्या व जिल्ह्यांच्या डिक्टेटराची परंपरा बंद झाली. गांधीजींनीं दाखवून दिलेल्या या मार्गाप्रमाणें आगष्ट १९३३ ते मार्च १९३४ पर्यंत सर्व

देशातून अनेक कार्यकर्त्यांनीं ही चळवळ सारखी चालू ठेवली. प्रांतिक केंद्रांतून या बाबतींत पूर्ण माहिती न मिळाल्यामुळें या चळवळीचा सर्व इतिहास सांगणें अशक्य आहे. कायदेभंगाच्या चळवळींतील या शेवटच्या कार्यक्रमांत कोणत्या प्रांतांतून किती कार्यकर्ते तुरुंगांत गेले याची पूर्ण नोंदही करण्यांत आलेली नाहीं. या बाबतींत इतकेंच सांगितलें म्हणजे बस्स होईल कीं, या कायदेभंगात हजारों लोकांनीं भाग घेतला. प्राप्त परिस्थितींत स्वातंत्र्याच्या चळवळीची सेवा करण्याकरितां निरनिराळ्या प्रांतांनीं आपल्या प्रयत्नांची शिकस्त केली.

## ६ गांधीजींची मुक्तता

तुरुंगात ठेवल्यानंतर थोड्याच दिवसात गांधीजींना पूर्वी मे महिन्यात ज्या सवलती दिल्या होत्या त्या त्याना न देण्यात आल्यामुळें त्याना पुन्हा उपवासास प्रारंभ करणें भाग पडलें. सरकारनें आपलें हृदय वज्राप्रमाणें कठिण केलें. गांधीजींची प्रकृति झपाट्यानें बिघडत चालली व ता. २० आगष्ट रोजीं म्हणजे गांधीजींच्या उपवासाच्या पाचव्या दिवशीं त्याना कैदी या नात्यानेंच पुण्याच्या सासून हॉस्पिटलमध्यें आणण्यात आलें. २३ आगष्ट रोजीं गांधीजींचे प्राण धोक्यात आहेत, असें दिसून आल्यावरून त्याना बिन-शर्त मुक्त करण्यांत आलें. या अनपेक्षित प्रसंगामुळें गांधीजी मोठ्या पेंचात सापडले. अटक, उपवास व मुक्तता या बाबतींत मांजर उंदराला खेळवितें त्याप्रमाणें सरकारनें आपल्याशीं जें वर्तन केलें तें सर्व लक्षात घेऊन गांधीजींनीं आपण खरोखरी मुक्त झालों आहों असें मानलें नाहीं व आपल्या शिक्षेची मुदत संपेपर्यंत म्हणजे ३ आगष्ट १९३४ पर्यंत आपल्या चळवळीवर स्वतःच त्यांनीं नियंत्रण घालण्याचें व तुरुंगात जावें लागेल असा कोणत्याही प्रकारचा चढाईचा कायदेभंग न करण्याचें निश्चित केलें. तसेंच आपण चढाईचा कार्यक्रम करणार नसलों तरी चळवळीच्या बाबतींत आपल्याला कोणी सल्ला विचारल्यास तो त्याला आपण दिल्याशिवाय राहणार नाहीं व चुकीच्या मार्गानें राष्ट्र जात असल्यास त्यालाही आपण प्रतिबंध केल्याशिवायही राहणार नाहीं असें त्यांनीं स्पष्टपणें जाहीर केलें आणि हा मधला काल हरिजनचळवळीच्या प्रसाराकरितांच मुख्यत्वें घालविण्याचा त्यांनीं आपला निश्चय प्रगट केला.

## ७ जवाहरलाल यांची मुक्तता

पं. मोतिलाल नेहरूंच्या पत्नींची प्रकृति बिघडत चालली होती आणि या वेळीं तर ती अधिकच चिंताजनक झाली होती म्हणून सं. प्रांतीय सरकारनें पं. जवाहरलाल नेहरू याना त्यांची शिक्षेची मुदत संपण्यापूर्वीच कांहीं दिवस अगोदर मुक्त करण्याचें ठरविलें. त्याप्रमाणें ३० आगष्ट रोजीं त्यांची मुक्तता केली. आपल्या मातोश्रींची प्रकृति सुधारतांच पं.जवाहरलाल पुण्यास आले. म. गांधी यांची प्रकृति सुधारत चालली होती. गांधीजी १९३१ सालीं गोलमेज परिषदेला गेल्यानंतर त्यांची व पंडितजींची ही पहिलीच भेट होती. साहजिकच देशाच्या परिस्थितीसंबंधाने व राष्ट्रापुढील कार्यक्रमासंबंधानें दोघामध्यें चर्चा झाली. या चर्चेनंतर पुढें दोघांमध्यें या बाबतींत पत्रव्यवहारही झाला. कॉंग्रेसवाल्याच्या व सामान्य जनतेच्या माहितीकरिता व मार्गदर्शनाकरितां हा पत्रव्यवहार पुढें प्रसिद्धही करण्यात आला.

## ८ हरिजन-दौरा

शुद्ध राजकीय क्षेत्रात काम न करण्याची सक्ति महात्माजींनी आपल्यावर लादून घेतल्यामुळे व हरिजनकार्याला वाहून घेण्याचें ठरविल्यामुळे १९३३ च्या नोव्हेंबरात ते हरिजनदौऱ्यावर निघाले. हा दौरा १० महिने चालू होता. या दौऱ्यामुळें प्रत्येक प्रांतातील अस्पृश्यांच्या स्थितीचें महात्माजींना निरीक्षण करता आलें व हा प्रश्न कशा रीतीनें सोडवावयाचा याचाही विचार त्याना चांगल्या प्रकारें करता आला. मतप्रसाराच्या दृष्टीनें या दौऱ्याला असामान्य महत्त्व प्राप्त झालें होतें. महात्माजींच्या या दौऱ्यात अस्पृश्यता निवारण्याच्या कार्याकरतां ८ लक्ष रु. जमा झाले. हा दौरा पूर्ण यशस्वी रीतीनें पार पडला, पण दोनच प्रसंगानीं या यशाला काळिमा लावला. २५ जून १९३४ रोजीं गांधीजी पुण्यास गेले होते. त्यावेळीं पुणें म्युनिसिपालिटीतर्फे देण्यात येणारें मानपत्र स्वीकारण्याकरिता म्युनीसिपालिटीजवळच्या रस्त्यावर ते आले असतां त्यांच्या मोटारींवर कोणीतरी बॉंब टाकण्याचा प्रयत्न केला. त्या अपघातातून गांधीजी अगदीं थोडक्यांत वाचले. नाहींतर राष्ट्रावर ती एक मोठी आपत्तीच कोसळली असती. हा बॉंब कोणी टाकला याचा मुळींसुद्धां पत्ता लागला नाहीं. हा बॉंब टाकणारा इसम अस्पृश्यतेविरुद्ध गांधींनीं काढलेल्या दौऱ्यामुळे संतापून गेलेल्या लोकांपैकीं एक होता अशी समजूत आहे. गांधीजींची मोटार समजून

तिच्या पूर्वी कांही सेकंद आलेल्या मोटारीवर त्यानें बॉंब टाकला. दुसऱ्याच्या मोटारीवर चुकून पडलेल्या या बॉंबमुळें सात निरपराधी माणसें जखमीं झालीं. पण या जखमा गंभीर स्वरूपाच्या नव्हत्या. दुसरा प्रकार यानंतर एका पंधरवड्यानें अजमीर येथें घडून आला. या ठिकाणीं एका संतापी सुधारकानें हरिजनचळवळीविरुद्ध असलेल्या बनारसचे पं. लालनाथ यांच्या डोक्यावर लाठीचा प्रहार केला. या दुसऱ्या प्रकाराचें प्रायश्चित्त म्हणून गांधीजींनीं ७ दिवस उपवास केला.

सर्व हिंदुस्थानभर हरिजन दौरा काढण्याचें महात्माजींनीं ठरविलें होतें. परंतु डिसेंबरचा महिना त्यांना कसोटीचा गेला. गुरुवायुर मंदिराबाबत तेथल्या ट्रस्टींना मि. केलापन ह्यांनीं ३ महिन्याची नोटीस दिली होती. १ जानेवारी १९३४ रोजीं या प्रश्नाचा अखेरचा निकाल लागावयाचा होता आणि ह्या दिवशीं मि. केलापन आणि गांधी ह्या दोघानाही कदाचित् प्राणांतिक उपवास करण्याची पाळी आली असती. ह्याकरिता मंदिरांत जाऊन ईश्वराची पूजा करणाऱ्या लोकाचें ह्या बाबतींत सार्वत्रिक मत ( रेफरेंडम् ) घेण्याचें ठरविण्यात आलें. हिंदुस्थानात या प्रकारचा हा पहिलाच प्रयोग होता. हा प्रयोग शैक्षणिकदृष्ट्या उपयुक्त व यशस्वीही झाला. याच वेळीं मद्रास कायदेकौन्सिलपुढें मंदिरप्रवेश बिल मांडण्याची डॉ. सुब्बारायन यांनीं नोटिस दिली. या बाबतींत सरकार काय निकाल देतें ह्याकडे लोकाचें लक्ष लागलें होतें. गुरुवायुर येथें झालेल्या सार्वजनिक मतमोजणींत शें. ७७ मतदारांनीं मंदिर-प्रवेशाला अनुकूल अशीं मतें दिलीं.

एकंदर २०१६३ मतें ह्या बाबतींत देण्यात आलीं. त्यांची वर्गवारी खालीलप्रमाणें आहे.

| | | | | |
|---|---|---|---|---|
| अनुकूल | १५५६३ | अथवा | शेंकडा | ७७ |
| विरुद्ध | २५७९ | ,, | ,, | १३ |
| तटस्थ | २०१६ | ,, | ,, | १३ |

ह्या सार्वजिक मतमोजणींतील एक महत्त्वाची गोष्ट म्हणजे मंदिर-प्रवेशाच्या बाबत ८ हजार स्त्रियानीं अनुकूल मतें दिलीं हें होय.

नवें वर्ष शंकित मनःस्थितींतच उजाडलें. गांधीजींनीं गुरुवायुर मंदिराबाबत ठरविलेला उपवास करण्याचें कारण आतां उरलें नव्हतें. परंतु कायदेभंगाच्या बाबतींत सुरू असलेली चळवळ मात्र समाधानकारक रीतीनें चाललेली नव्हती.

तुरुंगातून सुटून आलेले कैदी थकून गेले होते. सामुदायिक कायदेभंग बंद होऊन वैयक्तिक कायदेभंग सुरू झाल्यास प्रांतिक पुढाऱ्यांनीं आपापल्या प्रांतात ही चळवळ चालवावी असें ठरलें होतें. परंतु कांहीं थोडे लोक खेरीज-करून बाकीच्यांनीं आपलें वचन पूर्ण केलें नाहीं. जे लोक तुरुंगांतून सुटून आले होते, त्यापैकीं कांहीं लोक दुसऱ्यांदा कैदेंत जाण्यास नाखुष होते तर कांहीं असमर्थ होते. आणि जे लोक तुरुंगांत जाण्याकरितां सज्ज झाले त्यांना तुरुंगवास प्राप्त झाला नाहीं. सरकारनें या बाबतींत एक नवीनच युक्ति काढली होती. कायदेभंग करणाऱ्या लोकांवर कधीं लाठीमार करावा, कधीं त्याचा छळ करावा, कांहींना अटक करावी व नंतर लगेच सोडून द्यावें, असे प्रकार सरकारी अधिकारी करीत होते. ही पद्धत दमवून टाकणारी होती. शिक्षा झाल्यामुळे जी विश्रांति मिळावयाची ती या पद्धतीमुळें मिळत नव्हती. मांजराने उंदीर पकडावा, तो पुन्हा सोडावा पुन्हां पकडावा व पुन्हां सोडावा असा प्रकार होता. ठार मारणें नव्हे किंवा मुक्तहि करणें नव्हे असा हा प्रकार होता. १६ जानेवारी रोजीं बिहारवर भूकंपानें एक अभूतपूर्व महासंकट आलें. कांहीं थोड्या मिनिटांच्या अव-काशांत संबंध प्रांताचें स्वरूप ओळखता न येईल इतके ते बदलून गेलें. हजारों इमारती धुळीला मिळाल्या, किंवा पृथ्वीमध्यें गडप झाल्या. जमीनीमधून वाळूचे ढीगचे ढीग बाहेर पडले व त्यांनीं सर्व भरारलेलीं पिकें पुरून टाकलीं. ११० डिग्री उष्णतामानाचें पाणी १५०० फुटाखालीं असलेल्या तळातून जोरानें वर उसळून आलें, एका क्षणापूर्वी ज्या ठिकाणीं सुंदर पिकें डुलत होतीं व लाखो लोकांचे प्राण रक्षण करीत होती तीं सर्व ठिकाणें वाळूनें भरून गेलीं. हजारों कुटुंबें अनाथ झालीं. कांहीं थोड्या मिनिटांत बिहारमध्यें जो अनर्थ झाला, त्याची खरी कल्पना रुक्ष आकड्यावरून यावयाची नाहीं. तथापि कांहीं आकडे देण्यास हरकत नाहीं. ह्या भूकंपामुळें ३० हजार चौरस मैल प्रदेश उध्वस्त झाला व दीड कोटी लोकांना त्याचे परिणाम भोगावे लागले. सुमारें २० हजार लोक ह्या भूकंपाला बळी पडले. दहा लाखावर घरें धुळीला मिळालीं. ६५ हजार विहिरी व तळीं बुजून गेलीं. सुमारें १० लाख बिघ्यांवरील पीक वाळूखालीं गडप झालें.

ह्या संकटाला तोंड देण्याकरता बिहार व सर्व हिंदुस्थान कटिबद्ध झालें.

एक कोटीवर रुपये निरनिराळ्या फंडाच्या रूपानें जमा करण्यांत आले. विहार सेंट्रल रिलीफ कमिटीकडे जून अखेरपर्यंत २७ लाख रुपये जमा झाले होते. हिंदुस्थानांतील सगळ्या भागांतून जनतेचे पुढारी व कार्यकर्ते या ठिकाणीं धांवून गेले व त्यांनीं लोकांना मदत देण्याची व्यवस्था केली. या कमिटीनें नुकत्याच प्रसिद्ध केलेल्या रिपोर्टावरून ह्या संकटाचे वेळीं लोकाचे किती नुकसान झालें व त्याना कशी मदत करण्यांत आली हे चागल्या रीतीनें समजून येण्याजोगें आहे. २००० कार्यकर्त्यांनीं २५८ केंद्रे उघडून भूकंपग्रस्ताना मदत केली, असें या रिपोर्टांत म्हटले आहे.

वाहेरून जे पुढारी ह्या उध्वस्त प्रदेशात लोकाना मदत करण्याकरतां आले त्यांत पंडित जवाहरलाल हे एक होते ही भेट केवळ सहानुभूतीचें निदर्शक म्हणून देण्यात आली नव्हती. ती प्रत्यक्ष वैयक्तिक सेवा करण्याच्या बुद्धीनें देण्यांत आली होती. पडलेल्या घराखालीं जीवंत माणसें पुरलीं गेलीं आहेत असें त्याना समजले. त्यावेळीं त्यानीं स्वयंसेवकाचा बिल्ला छातीवर लावला. खांद्यावर फावडे टाकलें आणि स्वयंसेवकांच्या तुकडीबरोबर जाऊन त्यानीं ती जागा खणून काढली. बिहार भूकंपामुळें गांधींच्याही कार्यक्रमात बदल करावा लागला. भूकंपामुळें उत्पन्न झालेल्या व पुढील वर्षी महापुरामुळें उपस्थित होणाऱ्या प्रश्नांना विहारमध्यें गेलेल्या कार्यकर्त्यांना तोंड द्यावयाचें होतें. या लोकाना सल्ला देण्याकरता व योग्य मार्ग दाखविण्याकरता गाधीजींनीं एक महिना खर्चीं घातला. शेवटीं देशाच्या सर्व भागातून आलेल्या प्रातिनिधींची एक परिषद भरविण्यांत येऊन विहार सेन्ट्रल रिलीफ कमिटी स्थापन करण्यात आली आणि मदतीचे सर्व काम तिच्याकडे सोपविण्यात आलें. कॉंग्रेसनें संकटग्रस्ताना मदत केल्याचें हें अलीकडल्या काळातील प्रचंड कार्य होतें. गांधीजी बिहारमध्ये असताना त्यानीं भूकंपग्रस्त अनेक शहराना व खेड्यांना भेटी दिल्या. लोकावर ओढवलेल्या संकटाची त्यानीं प्रत्यक्ष माहिती करून घेतली व या कमिटीला तिच्या कामाची रूपरेषा आंखून दिली. अपल्या मंडळीपैकी काहीं हुशार कार्यकर्ते त्यानीं विहारला बोलावून घेतले व त्याच्या हातीं हें सेवेचे काम सोपविलें. ह्या प्राताला अद्यापि बऱ्याच प्रश्नाना तोंड द्यावयाचें आहे, वाहेरच्या लोकाना त्याची योग्य कल्पना येणें कठीण आहे.

पं. जवाहरलाल नेहरु बाहेर पडतात न पडतात तोंच ते सरकारचे पाहुणे बनले. कलकत्त्याला ते गेले असता त्यानीं त्या ठिकाणीं बंगालची परिस्थिति व मिदनापूर जिल्ह्यातील ताज्या घडलेल्या हकीकती ह्या विषयावर दोन भाषणें केलीं. प्रांतातील दहशतवाद्याची पूर्ण निदाच करण्यात आली पाहिजे, असें सरकारचें मत होतें. दहशतवाद निर्माण कां होतो ह्याची मानसिक मीमासा पंडितजींनीं केली होती आणि ती नाहीशी करण्याकरितां अधिकाऱ्यानीं जे उपाय योजले होते त्यावरही त्यानीं आपले विचार स्पष्टपणे प्रगट केले होते. विहारमध्यें तेथील लोकाना मदत करण्याकरता पंडितजी जात असतांना बंगाल पोलिस त्याना पकडूं शकले नाहींत; शिष्टाचाराच्या कल्पना त्याच्या आड आल्या.

पंडितजी बिहारमधून अलाहाबादला आपल्या घरीं गेले न गेले इतक्यात त्याना पकडण्यात आलें व कलकत्यातील दोन भाषणाच्या बाबतींत त्यांच्या-वर खटला होऊन दोन वर्षांची कडक शिक्षा त्याना देण्यात आली.

जादा कायद्यामुळे देशात आज जी परिस्थिति निर्माण झाली आहे व देशाची आज जी कुचंबणा होत आहे त्यातून बाहेर पडण्यास कौंसिलांत शिरणें आवश्यक झालें आहे, असें १९३३ जुलैमध्ये झालेल्या पुण्याच्या परिषदेनंतर बरेच कॉंग्रेसवाले म्हणूं लागले होते. अर्थात् या मताच्या मंडळीं-नीं कॉंग्रेसनें स्वीकाराव्याच्या या नवीन धोरणाचा विचार करण्याकरिता कॉंग्रेसच्या पुढाऱ्याची एक परिषद भरविण्याचे ठरविलें. ही परिषद ३१ मार्च १९३४ रोजीं दिल्ली येथे डॉ. अन्सारी यांचे अध्यक्षतेखालीं भरली व ज्या लोकानीं वैयक्तिक कायदेभंग करावयाचा नाहीं त्यानीं मत-दारसंघ संघटित करण्याचें कार्य हातीं घ्यावें व महात्मा गांधी यांनीं पुण्याच्या पत्रकात (जुलै १९३३) जो विधायक कार्यक्रम सुचविला आहे तो पार पाड-ण्याचा प्रयत्न करावा व कौंसिलप्रवेशाला अनुकूल असलेल्या कॉंग्रेसवाल्याना मदत व्हावी म्हणून अस्तंगत झालेली स्वराज्यपार्टी पुनरुज्जीवित करावी असा ठराव करण्यात आला. लवकरच होणाऱ्या असेंब्लीच्या निवडणुकींत आपल्या पक्षाने भाग घेणें जरूरीचें झालें आहे असेंही या परिषदेंत ठरविण्यात आलें. या दृष्टीनें पुढील दोन मुख्य मुद्द्यावर या निवडणुकी लढविण्यांत याव्या असेंही ठरलें— (१) सर्व दडपशाहीचे कायदे रद्द करण्यात यावे. (२) श्वेतपत्रिकेंतील सूचनाचा त्याग करावा व म. गांधी यांनीं गोलमेज परिषदे-

च्या वेळी दिग्दर्शित केलेल्या राष्ट्रीय मागणीनुसार स्वराज्याची योजना तयार करण्यात यावी. अशा प्रकारचे अजमावणीचे ठराव केल्यानंतर या परिषदेतर्फे डॉ. अन्सारी, श्री. भुलाभाई देसाई, डॉ. विधन रॉय यांचें एक शिष्टमंडळ गांधीजींकडे पाठवावें व या ठरावांच्या अंमलबजावणीचें कार्य हातीं घेण्यापूर्वी या बाबतींत त्यांचें मत घ्यावें असाहि एक ठराव या परिषदेंत मंजूर करण्यांत आला.

गांधीजी या वेळीं बिहारमधील भूकंपग्रस्त भागांत दौऱ्यावर होते. साहारिया या आडवळणाच्या गांवीं त्यांनीं आपला मौनाचा दिवस घालविला. ( २ एप्रिल १९३४ ) या ठिकाणीं असतांना दिल्ली येथें काय झालें याचें ज्ञान नसतांना त्यांनीं स्वतंत्रपणें वर्तमानपत्रांत प्रसिद्ध करण्याकरतां एक पत्रक तयार केलें. हें पत्रक आतां ठरल्याप्रमाणें वर्तमानपत्राकडे प्रसिद्धीकरतां पाठविण्यांत येणार, इतक्यांत डॉ. अन्सारी यांचा निरोप महात्माजींना पोंचला. आधल्या दिवशीं दिल्ली येथें भरलेल्या परिषदेनें नियुक्त केलेलें शिष्टमंडळ पाटणा येथे त्याची मुलाखत घेणार आहे असें या निरोपात म्हटलें होतें. या मंडळींशीं चर्चा होईपर्यंत गांधींजींनीं हें पत्रक प्रसिद्ध करण्याचे तहकूब ठेवलें व त्याच्याबरोबर पूर्णपणें चर्चा झाल्यानंतर ता. ७ रोजीं तें प्रसिद्ध करण्यात आलें. हें पत्रक प्रसिद्ध झाल्यानंतर म. गांधींनीं डॉ. अन्सारींना एक पत्र पाठविलें. हें पत्र व हें पत्रक आम्हीं पुढें देत आहों.

## डॉ. अन्सारींना गांधीजींचें पत्र

प्रिय डॉ. अन्सारी, पाटणा ५-४-३४

नुकत्याच भरलेल्या कांहीं कॉंग्रेसवाल्याच्या खासगी सभेंत जे ठराव करण्यात आले त्या संबंधानें माझे मत घेण्याकरिता आपण, भुलाभाई व डॉ. विधन, पाटण्यास आला हें आपण फार चांगलें केलें. स्वराज्यपार्टी पुनरुज्जीवित करण्यात आल्यास तिचें स्वागत करण्याच्या कामीं मी मुळींसुद्धा काकू करणार नाहीं. त्याचप्रमाणें येत्या असेंब्लीच्या निवडणुकींत भाग घेण्यासंबंधानें या परिषदेंत जो ठराव करण्यात आला त्यालाही मान्यता देण्यास मला संकोच वाटणार नाहीं.

आजच्या परिस्थितींत कायदेमंडळाचा कितपत उपयोग होईल या संबंधानें माझे विचार जगजाहीर आहेत. १९२० सालीं माझें या बाबतींत जे विचार

होते ते आजही कायम आहेत. परंतु ज्या कॉंग्रेसभक्ताला एक ना दुसऱ्या कारणाकरितां कायदेभंगाच्या चळवळीत भाग घ्यावयाचा नाहीं व कौंसिल-प्रवेशावर ज्यांचा विश्वास आहे त्यानीं कौंसिलात शिरांवें व देशाला हितकारक असे कार्यक्रम अमलात आणण्याकरितां कौंसिलांत आपले गट तयार करावे, हाच त्याचा हक्क नव्हे तर कर्तव्यही आहे असें मला वाटतें. वर जें मी माझें मत सांगितलें त्याच्याशीं कोणत्याही प्रकारें विसंगत न होईल अशा रीतीनें केव्हांही मी पक्षाच्या सेवेला तयार आहे व माझ्या सामर्थ्यानुसार त्याला मदत करण्यासही मी तयार आहे.

एम्. के. गांधी

## गांधीजींचें पत्रक

( पाटणा ७ एप्रिल १९३४ )

हें पत्रक मीं साहारिया येथें माझ्या मौनाच्या दिवशीं म्हणजे ईस्टरमधील सोमवारीं ता. २ रोजीं लिहिलें. मी तें राजेंद्रबाबूंना दिलें आणि नंतर तेथें हजर असलेल्या इतर मंडळींत तें फिरविण्यात आलें. या पत्रकाच्या मूळच्या मसुद्यात बराच फरक करण्यात आला आहे. तें संक्षिप्तही करण्यात आलें आहे. पण तत्त्वतः सोमवारीं तें जसें होतें तसेंच तें आतां राहिलें आहे. माझ्या सर्व मित्राना व सहकाऱ्याना मीं तें दाखवूं शकलो नाहीं याबद्दल मला दिलागिरी वाटतें. त्यांना हें दाखविता आलें असतें तर मला बरें वाटलें असतें. परंतु माझ्या निश्चयांतील खरेपणासंबंधानें मला शंका नसल्यामुळें व कांहीं मित्र कायदेभंग करण्यास उद्युक्त झालेले असल्यामुळें मित्राच्या अभिप्रायांची वाट पाहत राहून त्याच्या प्रसिद्धीकरणास विलंब लावण्याचें धाडस करण्यास मी तयार नाहीं. हा निर्णय व ह्या पत्रकांतील प्रत्येक शब्द सूक्ष्म अंतर्निरीक्षणाचें व ईश्वरावर भार टाकून केलेल्या हृदयसंशोधनाचें फल आहे. कोणत्याही एका विशिष्ट व्यक्तिसंबंधानें ह्या निर्णयात विचार केलेला नाहीं. माझ्या स्वतःच्या मर्यादित शक्तीची कबुली मी यात दिली आहे, व इतकीं वर्षे मी माझ्या खांद्यावर जी प्रचंड जबाबदारी वागविली तिची योग्य जाणीव ठेवूनच हा निर्णय मी दिला आहे. सत्याग्रह आश्रमातील माझ्या सहकाऱ्यांशीं झालेल्या वैयक्तिक स्वरूपाच्या गप्पागोष्टींतून या पत्रकातील विचार मला सुचले. ही मंडळी नुकतीच जेलमधून बाहेर आलीं होतीं. व राजेंद्रबाबूंच्या सांगण्यावरून

ह्या मंडळींना बिहारमध्ये मी पाठविलें होतें. विशेषतः पुष्कळ दिवसाच्या माझ्या एका सन्माननीय मित्राशीं झालेल्या भाषणावरून व त्यांनीं दिलेल्या माहितीवरून हे विचार मला सुचले. हा माझा मित्र तुरुंगांतील आपल्या वाट्याचें काम पूर्ण करण्यास नाखुष असलेला आढळून आलें. आपल्या वाट्याचें काम पुरें करण्यापेक्षां आपला खाजगी अभ्यास करणें हेंच त्याला आवडलें. सत्याग्रहाच्या नियमाशीं हें वर्तन निःसंशय विसंगत आहे. ज्या मित्रांवर आजवर मी प्रेम करीत आलो त्याच्या मधील हा दोष नसून हा माझा स्वतःचाच दोष आहे. असें मला आढळून आलें. त्याच्या दुर्बलतेची जाणीव मला होती ही गोष्ट आपल्याला माहीत होती असें तो मित्र मला म्हणाला. मी आधळा झालों होतों, पुढाऱ्यामधील अंधत्व अक्षम्य आहे, म्हणून चालू असलेल्या कायदेभंगाचा मीच एक केवळ प्रातिनिधि असावयास पाहिजे असें मला आढळून आले.

गेल्या जुलैमध्यें पुण्यास अनौपचारिक परिषद चालू होती त्यावेळीं, पुष्कळ वैयक्तिक कायदेभंग करणारे लोक पुढें आले तर बरें; परंतु एक मनुष्यसुद्धा सत्याग्रहाचा संदेश जिवंत ठेवण्यास पुरेसा होईल असे मी म्हणालों होतों. परंतु बराच वेळ अंतःसंशोधन करून मीं या निर्णयाला येऊन पोहोंचलों कीं, आजच्या परिस्थितींत फक्त एकट्यानेंच म्हणजे मी स्वतःच काहीं कालपर्यंत कायदेभंगाची जबादारी अंगावर घ्यावी.दुसऱ्या कोणीही ती घेऊं नये.पूर्ण स्वराज्य संपादनाचें साधन ह्या दृष्टीनें कायदेभंगाला यश यावयास पाहिजे असेल तर असेंच करणें जरुरीचें आहे.

सामान्य जनतेला सत्याग्रहाचा संदेश भेसळ स्वरूपात दिला गेला, यामुळें त्याचें पूर्ण व शुद्ध स्वरूप तिला कळलें नाहीं, असें मला वाटूं लागलें आहे. अध्यात्माचा उपदेश ज्या लोकाची अध्यात्माकडे प्रवृत्ति नाहीं अशा लोकाकडून दिला गेल्यास तो निरुपयोगी होतो याची मला स्पष्ट जाणीव झाली आहे. अध्यात्मिक संदेशांचा स्वयंस्फूर्तीनेंच प्रसार होत असतो. सामान्य जनतेंत याचा कसा उलट परिणाम झाला आहे ही गोष्ट हरिजनदौऱ्यांत अनुभवास आली आहे. जनतेने या कार्याला दिलेला पाठिंबा स्वयंस्फूर्तीनें दिलेला होता. ज्या प्रचंड जनतेपर्यंत कार्यकर्ते जाऊन पोंचले नव्हते, त्याचा जमाव व उत्साह पाहून तेही आश्चर्यचकित झाले.

सत्याग्रह हें शुद्ध अध्यात्मिक साधन आहे, आधिभौतिक हेतूच्या सिध्यर्थहि याचा उपयोग करून घेतां येईल; आणि ज्या स्त्रीपुरुषाना त्यातील अध्यात्मिक भावनेची जाणीव झाली नाहीं, अशा लोकांच्या हातूनही या साधनाचा उपयोग करून घेता येईल. मात्र हें साधन अध्यात्मिक आहे अशी जाणीव कर्त्या नेत्याला असली पाहिजे. सर्जरीचीं हत्यारें प्रत्येकाला उपयोगात आणता यावयाचीं नाहींत. तज्ज्ञ इसम त्याचा उपयोग कसा करावा, हें सांगण्याकरता मागें उभा असेल तर पुष्कळाना तीं वापरतां येतील. सत्याग्रहाच्या निर्मितीच्या बाबतींत मी तज्ज्ञ आहे असे मी हक्कानें सांगतों. आपल्या शास्त्रात पूर्ण निष्णात असणाऱ्या तज्ज्ञ सर्जनपेक्षाही मी कितीतरी अधिक काळजी घेतली पाहिजे. अद्याप मी एक साधक आहे. सत्याग्रहशास्त्राचें मूळ स्वरूपच असें आहे कीं, तें त्याच्या अभ्यासकालीं अगदी निकटवर्ती परिस्थितीपलिकडे पाहूं देत नाहीं. आश्रमातील मंडळींशीं झालेल्या भाषणावरून मीं जे आत्मनिरीक्षण केलें, त्यातून असा निष्कर्ष निघाला कीं, सर्व कॉंग्रेसवाल्यानीं स्वराज्याकरतां चालू असलेला कायदेभंग–विशिष्ट अन्यायाकरता चालू असलेला नव्हे—तहकूब करावा असा मी त्याना सल्ला दिला पाहिजे. त्यांनीं तो मजवर सोंपवावा. माझ्या आयुष्यात इतराना त्याचा उपयोग करता येईल. परंतु तो केवळ माझ्याच नेतृत्वाखालीं करता येईल. माझ्यापेक्षाही ह्या शास्त्राचें अधिक ज्ञान झालेला दुसरा कोणी मनुष्य पुढें येईपर्यंत व त्याच्या ज्ञानासंबंधानें विश्वास वाटूं लागेपर्यंत असें करावें लागेल. सत्याग्रहाचा निर्माता व विधाता या नात्यानें मी हें मत देत आहे. म्हणून यापुढें प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष रीतीनें पूर्ण स्वराज्याकरता कायदेभंग करण्यास प्रवृत्त झालेल्या सर्व लोकानीं या कृत्यापासून परावृत्त व्हावें. हिंदुस्थानच्या स्वातंत्र्ययुद्धाच्या यशाच्या दृष्टीनें हाच उत्तम मार्ग आहे, अशी माझी खात्री झाली आहे.

मानवी समाजाच्या हातीं असलेल्या ह्या उत्तमोत्तम साधनाचा सदुपयोग व्हावा, असें मला अंतःकरणापासून वाटत आहे. हिंसा व युद्ध याच्या बदला सत्याग्रह हें पूर्णतेला पोंचलेलें साधन आहे, असें अभिमानपूर्वक सांगण्यास हरकत नाहीं. दहशतवादी म्हणविणाऱ्या लोकाच्या व सर्व देशाला नामर्द बनवून दहशतवाद्याना उखडून टाकूं पहणाऱ्या राजकर्त्यांच्या अंत.करणाला हालवून सोडणारें असें हें शस्त्र आहे. परंतु पुष्कळ लोकानीं निष्काळजीपणानें कायदेभंगाच्या शस्त्राचा उपयोग केला आहे. त्याचे परिणाम

दिसायला भव्य दिसत असले तरी त्याचा दहशतवाद्याच्या किंवा अधिकारी वर्गाच्या अंतःकरणावर कांहींच परिणाम झालेला दिसत नाहीं. निर्भेळ शुद्ध सत्याग्रह या दोघांच्या अंतःकरणापर्यंत पोहोंचलाच पाहिजे. या सिद्धांतातील सत्यतेची प्रचीति पहावयाची असल्यास प्रत्येक वेळीं एकच अधिकारी पुरुषानें या साधनाचा अवलंब केला पाहिजे. हा प्रयोग कधींही झालेला नाहीं, तो आता केला पाहिजे. केवळ सविनय प्रतिकार म्हणजे सत्याग्रह नव्हे, ही गोष्ट वाचकानें लक्षांत ठेवली पाहिजे. सविनय प्रतिकारापेक्षा ह्या सत्याग्रहाचें स्वरूप किती तरी अधिक व्यापक आहे. सत्य आणि ज्ञान ह्याचें अखंड शोधन म्हणजेच सत्याग्रह होय आणि हें शोधनही साधकाला कडक अहिंसामय साधनानींच करावें लागेल.

याप्रमाणे आपल्या जबाबदारींतून मुक्त झालेल्या सविनय कायदेभंग करणाऱ्या लोकांनीं काय करावें ? राष्ट्राकडून ज्या ज्या वेळीं सत्याग्रहाची आज्ञा मिळेल त्या त्या वेळीं तयार रहाण्याकरता त्यांनीं ह्या कलेचा अभ्यास करावा,व निरहंकार बुद्धीनें व स्वखुषीनें पत्करलेल्या दारिद्र्यात किती मौज आहे ह्याचा त्यांनीं अनुभव घ्यावा, राष्ट्रवर्धनाच्या चळवळींत त्यांनीं भाग घ्यावा. स्वतः सूत कातून व विणून खादीचा प्रसार करावा. जातीय ऐक्याच्या प्रसारासंबंधानें अंतःकरणपूर्वक खटपट करावी. कोणत्याही स्वरूपात अस्पृश्यता रहाता कामा नये, या संबंधानें प्रयत्न करावा. मद्य व मादक द्रव्यें ह्याना पूर्ण आळा बसेल असाही प्रयत्न करावा.कायदेभंग हा ज्या लोकांना कायदा व अधिकार ह्याना स्वखुषीने मान देणें हें आपले कर्तव्य आहे असें समजतें त्यांच्याकरता आहे.

अशा प्रकारचें पत्रक प्रसिद्ध करून कोणत्याही तऱ्हेनें काँग्रेसच्या कामाचीं सूत्रें मी आपल्या हातीं घेतलेलीं नाहींत हें सांगावयास पाहिजे असें नाहीं. सत्याग्रहाच्या बाबतींत मार्गदर्शक या नात्यानें जे लोक माझ्याकडे पहातात त्यांनाच केवळ मी हा सल्ला दिला आहे.

महात्मा गांधींचे हें पत्रक म्हणजे अंतःकरणाची कसून तपासणी व परमेश्वरावरील विश्वास याचें फळ होतें.

महात्मा गांधींच्या ह्या पत्रकाचा असा परिणाम झाला कीं, सामुदायिक चळवळ या दृष्टीनें कायदेभंग तहकूब करण्यात आला.डॉ.अन्सारी यांनींही याच वेळीं एक पत्रक प्रसिद्ध केलें.महात्मा गांधींनीं कौन्सिलप्रवेशाच्या कार्यक्रमाला अंतःकरणपूर्वक व स्वयंस्फूर्तीनें पाठिंबा दिल्यामुळें या बाबतींतील सर्व विरोध

नाहींसे झाले आहेत. कॉंग्रेसमध्यें फूट पडण्याचेही टळले आहे व कौन्सिलच्या आत व बाहेर चळवळ चालवितां आल्यामुळें देशांतील बुद्धिमान लोकांच्या व जनतेच्या अंतःकरणांत उत्पन्न झालेले राजकीय जाड्य, औदासीन्य व असमाधान हें सर्व नाहींसें होईल असें या पत्रकात म्हटलें होतें. स्वराज्य पार्टीला पुन्हा जिवंत करण्यासाठीं कोणते उपाय योजावे याचा विचार करण्याकरतां २ व ३ मे १९३४ रोजीं रांची येथे एक परिषद भरविण्यात आली. ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटीचा ह्या गोष्टीला पाठिंबा व संमति घ्यावी हाही ह्या परिषदेचा एक मुख्य हेतू होता. स्वराज्यपक्षाला पुनरुज्जीवित करावें, श्वेतपत्रिकेचा त्याग, स्वराज्याची योजना तयार करण्याकरता घटना परिषदेची तयारी व दडपशाहीचे कायदे रद्द करणें ह्या तीन मुद्यावर असेंब्लीच्या निवडणुकी लढविण्यात याव्या या दिल्ली परिषदेच्या ठरावाना पहिल्याच ठरावात मान्यता देण्यात आली. स्वराज्यपार्टीची सुधारलेली घटना मान्य करण्यांत आली. पक्षाच्या अंतर्गत कारभारात व पैशाच्या व्यवहारात कॉंग्रेसच्या नेतृत्वाची जरूरी राहूं नये याच उद्देशानं वरील गोष्ट करण्यात आली. सर्वसामान्य धोरणाच्या बाबतींत कॉंग्रेसचा सल्ला घेण्यात यावा, असें स्पष्टपणें नमूद करण्यात आलें.

३ मे रोजीं भरलेल्या रांची परिषदेमध्यें स्वराज्यपक्षाचा पुढील कार्यक्रम मुक्रर करण्यात आला. राष्ट्राच्या वाढीच्या कामीं व पूर्ण स्वराज्याचें ध्येय संपादन करण्याचे कामीं अडथळा आणणारे सर्व कायदे रद्द करून घ्यावे. सर्व राजकीय कैद्यांच्या मुक्ततेचा प्रयत्न करावा, देशाची पिळणूक करणाऱ्या सर्व कायद्याना व ठरावाना विरोध करावा, ग्रामसंघटना करावी मजूर, चलन, हुंडणावळ, शेतकी या बाबतींत सुधारणा घडवून आणाव्या, व कॉंग्रेसचा विधायक कार्यक्रम अमलांत आणण्याचा प्रयत्न करावा.

या सर्व ठरावांवर १८ व १९ मे रोजीं पाटणा येथें भरलेल्या ऑल इं. कॉं. कमिटीच्या सभेंत अखेरची चर्चा झाली. कॉंग्रेसच्या संस्थापैकीं ऑ. इं. कॉं. कमिटी तेवढीच सरकारनें बेकायदा ठरविली नव्हती हें लक्षात ठेवण्यासारखें आहे. म. गांधींच्या शिफारशीप्रमाणें कायदेभंग तहकूब करण्यात आला व स्वराज्य पक्षासंबंधानें पुढील ठराव करण्यांत आला.

"राष्ट्राचें ध्येय संपादनाच्या दृष्टीनें कायदेमंडळात प्रवेश करणें अगत्याचें आहे, असें कॉंग्रेसमधील बऱ्याच मंडळींना वाटत असल्यामुळें ऑ. इं. कॉं. कमिटी पं. मदनमोहन मालवीय, डॉ. एम्. ए. अन्सारी (अध्यक्ष) याना

२५ कॉंग्रेस सभासदांपेक्षा जास्त नाहीं, इतक्या सभासदांचें एक बोर्ड नेमण्याचा अधिकार देत आहे.

कॉंग्रेसच्या वतीनें हें बोर्ड कायदेमंडळाच्या निवडणुकी लढवील किंवा त्यावर नियंत्रण ठेवील. त्याचप्रमाणें या कामाकरिता पैसा जमविणें व त्याचा विनियोग करणें याचा अधिकारही कॉंग्रेस या बोर्डाला देत आहे. हे बोर्ड ऑ. इं. कॉं. कमिटीच्या नियंत्रणाखालीं राहील व बोर्डाचें काम चालू राहण्याकरिता वेळोवेळीं नियम करण्याचा व पक्षाची घटना तयार करण्याचा अधिकार ऑ. इं. कॉं. कमिटीला राहील. पक्षाची घटना व नियम वर्किंग कमिटी पुढें तिच्या संमतीकरिता ठेवावे लागतील पण वर्किंग कमिटीची संमति मिळेपर्यंत ते अंमलात राहतील.

कॉंग्रेस वेळोवेळीं जे धोरण ठरवील तें अमलात आणण्याचें अभिवचन देणारे उमेदवारच बोर्डानें कायदेमंडळाच्या निवडणुकीकरिता मुक्रर करावे.

---

राष्ट्रीय सभेचें अधिवेशन लवकरच भरवावें अशी सार्वत्रिक उत्सुकता होती. त्याप्रमाणें मुंबईस आक्टो. १९३४ च्या पाहिल्या आठवड्यात राष्ट्रीय सभेची साधारण बैठक बोलावण्याचें ठरलें; पण पावसाच्या अनिश्चिततेमुळे आक्टोबरच्या शेवटच्या आठवड्यापर्यंत ती लांबवण्यात आली.

वर्किंग कमेटीच्या बैठकी पाटणा येथें १८-१९-२० मे १९३४ रोजीं झाल्या. सविनय प्रतिकाराची चळवळ थांबविण्यात येऊन कौन्सिलप्रवेशाची शिफारस करण्यात आली. ती शिफारस ऑ. इं कॉ. कमेटीनेंही मान्य केली. २० मे १९३४ पासून सविनय कायदेभंगाची चळवळ थांबविण्यात आली. जुलै १९३३ रोजीं पुणें येथें राष्ट्रीय सभेच्या ॲक्टिंग प्रेसिडेंटनीं केलेला हुकूम दुरुस्त करून सर्व कॉंग्रेससंस्थानीं कॉंग्रेसच्या सर्वसामान्य चळवळी हातीं घ्याव्यात असें वर्किंग कमिटीने ठरविलें आणि त्या कामीं काहीं प्रमुख कार्यकर्त्यांची निरनिराळ्या प्रांतात नेमणूकही करण्यात आली. सविनय कायदेभंग चळवळ थांबल्यामुळें ॲक्टिंग प्रेसिडेंटची जागा रद्द झाली व सरदार वल्लभभाई तुरुंगात असल्यानें जमनालाल बजाज याना वर्किंग कमिटीनें अध्यक्ष पदावर स्थापन केलें आणि कॉंग्रेसच अधिवेशन होईपर्यंत त्यांनीं कॉंग्रेसचें सर्व नेतृत्व हातीं घ्यावें असें ठरलें.

पाटणा येथें ऑ. इं. बैठकींत ठराव पास होतांना वादविवादाचे समारंभ झालेच. कॉंग्रेसचा कायदेभंगाचा कार्यक्रम मुळींच बदलूं नये अशा मताचे कट्टर नाफेरवाले कौन्सिलप्रवेशास सर्वस्वी प्रतिकूल होते. त्याप्रमाणें त्याच

बैठकींत सोशॅलिझमचा पक्षही डोकावत होता. गांधीच्या तत्त्वज्ञानाला त्याचा विरोध होताच परंतु कौन्सिलप्रवेशालाही ते पूर्ण प्रतिकूल होते. परंतु गांधी उभे राहिल्याबरोबर किंबहुना भाषण करून खालीं बसल्याबरोबर सर्व विरोध मावळले. गांधीजी ओरिसा प्रांतांत हरिजनकार्यासाठी पायीं प्रवास करीत होते. पायीं प्रवास करण्याचा त्यांचा नवा प्रयोग चालू होता. अर्थात् या नव्या पद्धतीनें प्रवासाचे क्षत्र फार कमी होई व फंड गोळा करण्याचें कामही फारच मंदपणें चालें. परंतु आपण मोटारनें किंवा आगगाडीनें प्रवास करणे म्हणजे आपण फंड गोळा करण्याचें एक यंत्र आहोंत असेंच म्हणवून घेण्यासारखें आहे, असे महात्माजींचें त्यावेळीं विचार होते. कांहीं लोकांनीं त्याना विमानानें प्रवास करण्याचें सुचवून अगदीं कमालच केली. या सूचनांचा गांधींना उद्वेग वाटला. त्यांनीं आपली प्रवासाची योजना अगदीं निश्चयानें सुरू केली. परंतु पाटणा येथील भूकंपानें बऱ्याच बाबतींत त्याना त्रास झाला. ७ एप्रिल १९३४ रोजा काढलेल्या पत्रकांत त्यांनीं आपली भूमिका स्पष्ट केली होती. सत्याग्रह चळवळीला सुरवात झाली तशीच ती चळवळ थांबलीही आणि पाटणा यथें ऑ. इं. पुढें केलेल्या आपल्या दोन हृदयस्पर्शी भाषणात गांधींनीं आपले अंतःकरण जनतेपुढें उघडें केलें.

१९३४ मे रोजीं हिंदुस्थानात सोशॅलिस्ट पक्षाचा जन्म झाला. १७ मे १९३४ रोजीं त्याची पहिली अखिल भारतीय परिषद पाटणा येथे झाली. आचार्य नरेंद्र देव हे तिचे अध्यक्ष होते. कापडगिरणींतील संप व कौन्सिलप्रवेश या प्रश्नाबरोबरच, कॉंग्रेसमध्यें सोशॅलिझमला राष्ट्रीय प्रमाणावर सुरवात करण्याची वेळ आली आहे असें त्या परिषदेनें ठरवलें आणि मुंबई येथिल राष्ट्रीय सभेच्या आधिवेशनात आपली योजना व घटना मांडण्यासाठीं एक रूपरेखा तयार करणारी कमिटी नेमण्यात आली. पाटणा येथील बैठकीनंतर सोशालिस्ट पक्षाच्या निरनिराळ्या शाखा निरनिराळ्या प्रातात सुरू झाल्या.

पाटणा येथील ठरावानंतर कॅंग्रेस चळवळींतील कार्यक्रमाचें केंद्र बदललें. सविनय कायदेभंगाची चळवळ बंद होऊन कौन्सिलप्रवेशाची चळवळ सुरू झाली व एकंदर वातावरण बदललें.

साविनय कायदेभंगाची चळवळ करण्यास फक्त गांधीच एकटे राहिले. त्यांचे अनुयायी संपले होते असें नव्हे परंतु पाटणा येथें ऑ. इं. कॉं. कमिटीच्या

ठरावांनीं अशी परिस्थिति उत्पन्न झाली होती. गांधींनीं उत्कल प्रातांत आपली हरिजनचळवळ पुन्हा चालू केली. तेथून ते संयुक्तप्रातात गेले. राजकीय चळवळीपासून अलिप्त राहण्याचा त्यांचा काल ४ आगष्ट रोजीं संपत आला होता. पुढें महात्माजी काय करणार याबद्दल सर्व देशभर अंदाज चालले होते. हिंदुस्थानसरकारची बंदी न जुमानता ते वायव्य सरहद्द प्रांतात जातील काय ? नाहींतर सविनय कायदेभंगाची चळवळ करण्याचा आपल्यापुरता वैयक्तिक अधिकार कशासाठीं राखून ठेवला ? परंतु देशाला कौन्सिलप्रवेशाच्या बाजूस लावून आपण मात्र कायदेभंगाच्या मार्गानें तुरुंगांत जाऊन देशाला ऐन आणीबाणीच्या वेळीं महात्माजी संशय व दुःख याच्या कोलाहलात टाकून जाणार काय ? हें शक्य नाहीं असेंही एकदां वाटले. गांधी असे करणारे नव्हत अशी खात्री वाटे. गांधींचा कार्यक्रम कांहींही ठरो किंवा कौन्सिलासाठीं लोक झटोत वा न झटोत काँग्रेसला त्याव्यतिरिक्त बरेंच काम पडलें होतें. ऑ. इं. कॉ. कमिटीखेरीज इतर कॉंग्रेससंस्था १९३२ सालापासूनच बेकायदेशीर ठरविण्यांत आल्या होत्या. ती बंदी सरकारनें १२ जून १९३४ रोजीं उठवली. फक्त वायव्य सरहद्दप्रांत,बंगाल येथील संस्था आणि हिंदुस्थान सेवादलासारख्या कांहीं संस्था अद्याप बेकायदेशीर राहिल्या. होत्या सविनय कायदेभंगाच्या चळवळींची प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष अशीं कांहीं कार्यक्षेत्रें सरकारनें अद्याप आपल्या कुंपणांत अडकावून धरलीं होतीं आणि त्यांतलीं कित्येक १९३५ साल अर्धअधिक उलटलें तरी मोकळी केली.नाहींत सविनय कायदेभंगाच्या चळवळींतील कैदी सोडून देण्याचें धोरण जाहीर होऊन बरेच दिवस झाले होते तरी अद्याप विशेषतः गुजराथेंतील तुरुंग सत्याग्रहींनीं भरलेलेच होते. गुजराथेंतील ( व इतर ठिकाणच्या ) कित्येक कार्यकर्त्यांना आजन्म ब्रिटिश प्रजाजन असूनही गुजराथेंत ( व आपल्या गांवीं ) येण्याची बंदी होती. सविनय कायदेभंगाच्या चळवळीशीं संबंध असलेल्या कित्येकांना सनदशीर व्यवसायासाठीं सुद्धा हिंदुस्थानचा किनारा सोडण्याचें परवाने मिळत नव्हते.

परंतु पाटणा येथील बैठक झाल्याबरोबर काँग्रेसच्या कार्याच्या संघटनेस सुरवात झाली व १९३२ सालापूर्वीच सर्व संस्थाचे नेहमींचें कार्य सुरुही झालें होतें. १२ व १३ जून रोजीं वर्धा येथें व पुन्हा १७ व १८ जून रोजीं मुंबई येथें वर्किंग कमिटीची बैठक झाली. त्या बैठकींत काँग्रेसच्या नवीन विधायककार्यक्रमाची योजना जाहीर झाली. तींत स्वतः सूत काढून खादी तयार करणें

व त्याचा त्याच प्रांतांत प्रसार करणे, अस्पृश्यतानिवारण, जातजातींचे एकीकरण, मद्यपानांचा पूर्णपणें प्रतिबंध, राष्ट्रीय शिक्षणाचा प्रसार, लहान लहान उद्योगधंद्यांचा विस्तार, आर्थिक, सामाजिक, आरोग्य या दृष्टीनें खेडेगावातील जीवनाची पुनर्रचना व संघटन; खेडेगावातील प्रौढ समाजात उपयुक्त ज्ञानाचा प्रसार, औद्योगिक चळवळींचा प्रसार, अशा तऱ्हेचें कार्य प्रामुख्यानें उल्लेखिलें होतें. हें कार्य करीत असताना काँग्रेसच्या ध्येयाशीं किंवा सामान्य धोरणाशीं विसंगत होणार नाहीं किंवा त्यात सविनय प्रतिकाराचे प्रसंग उद्भवणार नाहींत अशा रीतीनें तें करावें असें ठरलें. काँग्रेस संस्थावरील बंदी उठवताना काहीं गफलती सरकारकडून झाल्या होत्या. उदाहरणार्थ, खुदाई खिदमतगार ही संस्था १९३१ सालापासून काँग्रेसशीं संलग्न असता तिच्यावरील बंदी उठवली नव्हती. यासारख्या काहीं इतर संस्था अद्याप बंदीच्या कायद्यांत बद्ध आहेत हें सरकारी धोरणास विसंगत असल्याचें वार्किंग कमिटीनें दाखवून दिलें. सरकारनें ही विसंगति कबूल केली खरी परंतु खुदाई-खिदमतगार व अफगाण जिर्गा यावरील बंदी उठवण्याचें मात्र नाकारलें.

मुंबई येथील बैठकींत, श्वेतपत्रिका ( White Paper ) व कम्युनल अवार्ड ( जातिप्रतिनिधिप्रमाणनिर्णय ) हे महत्त्वाचे विषय होते. काँग्रेस पार्लमेंटरी बोर्डानें वार्किंग कमिटीला या बाबतींतील आपल्या धोरणाचा पुरस्कार करण्याची शिफारस केली होती. वार्किंग कमिटीनें आपल्याऱ्या विषयींचा प्रसिद्ध ठराव त्या बैठकींत पास केला. त्या ठरावावरील चर्चेत पं मालवीय आणि श्री. अणे याच्या व वार्किंग कमिटीच्या दृष्टिकोणांतील विरोध स्पष्टपणें व्यक्त झाला. त्या विरोधामुळें काँग्रेस पार्लमेंटरी बोर्ड व वार्किंग कमिटी याच्याशीं आपल्याला संबंध कायम ठेवता येणार नाहीं असें पं. मालवीय व श्री. अणे याना वाटून त्यानीं राजीनामे दिले. परंतु आणखी विचारविनिमय करून हा प्रसंग टाळता येईल असे वाटल्यावरून त्याच्या सहकारी मित्रानीं त्याना राजीनामे परत घ्यावयास लावले.

श्वेतपत्रिकेविषयीं वार्किंग कमिटीने खालील ठराव पास केला:—

' श्वेतपत्रिकेंत हिंदुस्थानची कोणचीही इच्छा नमूद झालेली नाहीं. सर्व हिंदी राजकीय पक्षानीं ती पत्रिका धिक्कारली आहे. काँग्रेसच्या प्रगतिवर त्या

पत्रिकेचा कोणच्याही तऱ्हेनें परिणाम होत नाहीं.जरी ती पिच्छेहाट करीत नाहीं तरी ती कॉंग्रेसच्या ध्येयाच्या मानानें अत्यंत कमी दर्जाची आहे. श्वतपत्रिकेच्या ऐवजी एकच योजना सुचवितां येईल. ती म्हणजे प्रौढ मतदारांच्या मतांनीं किंवा जवळजवळ त्यासारख्या पद्धतीनें निवडलेली एक कॉंस्टिट्युअंट असेंब्ली असावी. त्या सभेंत आपापले प्रतिनिधि पाठविण्याचा अल्प संख्याकाना अधिकार असावा.ते प्रतिनिधि अल्पसंख्याकाच्या मतदारानींच निवडलेले असावेत.

श्वेतपत्रिका रद्द ठरल्यावर जातीय निवाडाही रद्द व्हावयासच पाहिजे. अल्पसंख्याकांचे प्रतिनिधि निवडण्याची पद्धत व त्यांच्या हितसंबंधाचें संरक्षण करण्याची व्यवस्था या गोष्टींची जबाबदारी वरील कॉंस्टिट्युअंट असेंब्लीवर असावी.

कम्युनल अवार्डविषयीं सर्व जातींत तीव्र मतभेद आहेत, त्यामुळें त्याविषयीं आपलें धोरण ठरवणे कॉंग्रेसला जरूर वाटत आहे हिंदी राष्ट्रातील सर्व जातींचें प्रतिनिधित्व कॉंग्रेसकडे आहे. वरील मतभेद लक्षात घेता ते जोंवर आहेत तोंवर कम्युनल अवार्डला पसंती किंवा नापसंती कॉंग्रेसला देता येत नाहीं. तरी जातिविषयक प्रश्नाविषयींचें कॉंग्रेसनें आपलें धोरण व्यक्त करणें जरूर आहे.

पूर्णपणे राष्ट्रीय नसलेली अशी कोणचीही योजना कॉंग्रेस पत्करूं शकत नाहीं. परंतु जर एखादी योजना तत्संबंधीं सर्व पक्षाना पसंत असली तर ती राष्ट्रीयत्वाच्या दृष्टीनें थोडीशी कमी असली तरी कॉंग्रेस ती पत्करील आणि उलट त्या योजनेला एका पक्षाचा जरी विरोध असला तरी कॉंग्रेसला मान्य होणार नाहीं.

'राष्ट्रीयत्वाच्या दृष्टीनें विचार करता कम्युनल अवार्ड अगदीं असमाधानकारक आहे. आणि त्याखेरीज इतर दृष्टीनेंही त्यात तीव्रपणें आक्षेपार्ह अशा गोष्टीही बऱ्याच आहेत.

'कम्युनल अवार्डचे अनिष्ट परिणाम टाळण्याचा एकच मार्ग आहे व तो म्हणजे सर्वांचें एकमत होण्याचा मार्ग व साधनें शोधून काढणें हा होय. या विशेष घरगुती प्रश्नाविषयीं ब्रिटिश सरकारला किंवा दुसऱ्या तऱ्हाच एखाद्या परकीय सत्तेला विनंति करणें हा तो मार्ग नव्हे.'

सविनय कायदेभंगाची चळवळ तहकूब झाल्यामुळें सरकारही हळूहळू सवि-

नय कायदेभंग केलेल्या कैद्याची मुक्तता करीत होतें. परंतु सरदार वल्लभभाइ पटेल, पं. जवाहरलाल नेहरू किंवा खान अबदुल गफूरखान याना सोडण्याचा मात्र सरकारचा मुळींच विचार नव्हता. त्यात सरदार वल्लभभाई आणि खान अबदुल गफूरखान याची कैद बेमुदत होती. दोघानाही १९३२ सालपासून कैद झाली होती आणि सरकारची खुषी असेल तोंपर्यंत ते राजकैदी होते. परंतु परिस्थितीची घटना अशी होत गेली कीं, शेवटीं सरकारला काहीं गोष्टी करणें भाग पडले. सरदार वल्लभभाईंना बरेच दिवसाचा नाकाचा रोग होता तो आता जास्त बळावला व जुलै महिन्याच्या सुमारास त्याचे स्वरूप अत्यंत गंभीर झालें.सरकारनें नेमलेल्या वैद्यमंडळाने (Medical Board) ऑपरेशन तावडतोब करण्याची आवश्यकता व्यक्त केली व ते मोकळे असल्याखेरीज ऑपरेशन मुळींच शक्य नाहीं असाही त्यानीं अभिप्राय दिला. त्यामुळे त्याना १४ जुलै रोजीं बंधमुक्त केलें. बनारसला २७ ते ३० जुलैपर्यंत चाललेल्या वर्किंग कमिटीच्या बैठकींत श्री. अणे व पं. मालवीय याच्याबरोबर पुन्हा चर्चा झाली. कम्युनल अवार्डचा स्वीकार किंवा नकार काहींच न करण्याचें वर्किंग कमिटीचें धोरण होतें. त्या धोरणांत बदल करण्याखेरीज इतर सर्व मार्गांनीं पं. मालवीय व श्री. अणे याच्याशीं समेट करण्याचे व त्याना काँग्रेस-मध्यें ठेवण्याचे प्रयत्न करण्यात आले. काहीं काँग्रेस पुढाऱ्याची मतदारसंघा-संबंधीं जी फार दिवसापासून अंतःकरणपूर्वक निश्चित मतें बनलीं आहेत त्याचा विचार करता वर्किंग कमिटीचें कम्युनल अवार्डविषयींचें जें धोरण होतें त्याच्याशीं ज्याचा प्रामाणिक मतभेद आहे अशा उमेदवाराना अपवाद म्हणून मान्य करावें असा एक समेटाचा मार्ग महात्माजींनीं सुचविला.परंतु तोही ग्राह्य न वाटल्यावरून पं. मालवीय यानीं काँग्रेस पार्लमेंटरी बोर्डाचा राजीनामा दिला व श्री. अणे यानीं वर्किंग कमिटीच्या सभासदत्वाचाही राजीनामा दिला. हरि-जनाना दिलेल्या जादा जागाबद्दल बंगालची तक्रार होती व अशा रीतीनें बंगालचा विरोध फक्त कम्युनल अवार्ड पुरताच नव्हता तर पुणें-कराराशींही होता.

स्वदेशीच्या धोरणाविषयीं काँग्रेसमध्यें शंका उपस्थित झाली होती. म्हणून वर्किंग कमिटीनें निःसंदिग्धपणें स्वदेशीविषयींचें आपलें धोरण खालील शब्दांत नमूद केलें.

गिरणीचे कापड व हातसुताची व हातविणीची खादी यात काँग्रेसच्या पिठा-वर प्रदर्शनांत कोणच्याही रीतीनें चढाओढ होतां कामा नये. काँग्रेसच्या

कार्यकर्त्यांनीं हातसुताची व हातविणीची खादी या कापडाखेरीज दुसरें कोणचें-हीं कापड वापरूं नये.

कापडाखेरीज इतर वस्तूंच्या बाबतींत वर्किंग कमिटी काँग्रेसच्या कार्यकर्त्यांसाठीं मार्गदर्शक म्हणून खालील गोष्टी नमूद करीत आहे.

हिंदी लोकांचे घरगुती व्यवसाय व इतर अल्प व्यवसाय आहेत, त्या व्यवसायांना सहाय्य करण्यासाठीं सार्वत्रिक ज्ञानाची आवश्यकता आहे.ते व्यवसाय करणाऱ्याना आपल्या मालाच्या किंमती ठरविण्याच्या कामीं व त्या व्यवसायांतील मजुरांच्या सुस्थितीसाठीं काँग्रेसच्या सहकार्याची जरूर आहे.यासाठीं अशा व्यवसायांत उत्पन्न होणाऱ्या वस्तूंचा ' स्वदेशी ' मध्ये हटकून समावेश व्हावयास पाहिजे व अशा वस्तूंचा प्रसार करणें हेंच स्वदेशीच्या प्रसाराचें मुख्य कार्य असावें असें वर्किंग कमिटीचें मत आहे.

या धोरणाचा प्रसार करताना कोणच्याही तऱ्हेनें देशात स्वदेशीविषयींच्या वृत्तीचा परिपोष होण्यास विरोध होण्याचें कारण नाहीं. किंवा या धोरणानें स्वदेशीचा अर्थ फक्त व्यक्तीपुरता मर्यादितही करूं नये. वरील धोरणाचा अर्थ फक्त एवढाच आहे कीं, ज्या स्वदेशी मालाला सरकारी मदत आहेच किंवा मिळणें शक्य आहे, त्यांच्या प्रसारासाठीं काँग्रेसच्या विशेष प्रयत्नांची जरूर नाहीं.

काँग्रेसच्या कार्यकर्त्यांच्या शिस्तीविषयीं वर्किंग कमिटीनें खालील आभिप्राय व्यक्त केला.

काँग्रेसच्या धोरणावर व कार्यक्रमावर विश्वास असो वा नसो, सर्व काँग्रेस-कार्यकर्त्यांनीं तो कार्यक्रम त्यानीं पार पाडावयास पाहिजे अशी अपेक्षा आहे व काँग्रेसच्या जागांवर काम करणारे कार्यकारीमंडळाचे सभासद याच्यावर तें एक मानाचें बंधनच आहे. कार्यकारीमंडळाचे जे सभासद व इतर जागांवर काम करणारे लोक यांनीं घटनेच्या ३१ व्या कलमाप्रमाणें २४ मे १९२९ रोजीं ऑ. इं. काँ. कमिटीनें जे नियम केले आहेत त्या नियमांच्या विरुद्ध जर कार्य केलें किंवा प्रसार केला तर तें त्याचें कृत्य शिस्तीचा भंग करणारें होईल.

श्री. अणे याच्या राजिनाम्याचा स्वीकार करतांना त्याच्या उदात्त हेतूला मान्यता देऊन मोठ्या दिलगिरीनें तो मान्य करण्यात आला व वर्किंग कमि-

टीला त्यानीं केलेलें अमोल सहाय्य नमूद करण्यात आलें. डॉ. महंमद अलम यांनीं राजिनामा पाठविला होता. परंतु त्याचीं कारणे निराळीं होतीं.

राजीनामा दिल्यानंतर श्री. अणे व पं. मालवीय यानीं काहीं कॉंग्रेसच्या कार्यकर्त्यांची व इतर लोकांची एक परिषद कलकत्ता येथें १८ व १९ ऑगस्ट रोजीं भरविली. पं. मालवीय अध्यक्षस्थानीं होते. कम्युनल अवार्ड व श्वेत-पत्रिका यांना कायदेमंडळांतून व बाहेर विरोध करण्यासाठीं एक पक्ष स्थापन करावा व लेजिस्लेटिव्ह असेंब्लीच्या निवडणुकीसाठीं उमेदवार उभे करावेत व त्या कार्याकरितां एक पक्ष स्थापन करावा असें त्या परिषदेनें ठर-विलें. आपल्या पक्षाचे उमेदवार निवडण्याचें धोरण नमूद करून व श्वेत-पत्रिका व कम्युनल अवार्ड याचा निषेध एका ठरावानें परिषदेंत व्यक्त झाला. नंतर कम्युनल अवार्डविषयींच्या ठरावाचा फेरविचार करण्यासाठीं ऑ. इं. कॉंग्रेस कमिटीची एक बैठक बोलावण्याची वर्किंग कमिटीस विनंतीही कर-ण्यांत आली.

सविनय कायदेभंगाची चळवळ थांबल्यावरही सरकारची दडपशाही चालूंच होती व त्यामुळें राजकीय वातावरण प्रक्षुब्ध होतें. ती प्रक्षुब्धता ऑगस्टच्या शेवटच्या आठवड्यात एका महत्त्वाच्या घडामोडीनें अंशतः कमी झाली. ती घडामोड म्हणजे अबदुल गफूरखान व त्याचे बंधु डॉ.खानसाहेब यांची सरकारनें एकदम केलेली आकस्मिक मुक्तता ही होय! १९३० सालीं व १९३२-३४ सालीं सुद्धा वायव्य सरहद्दप्रातानें राष्ट्रीय युद्धाचा भार उचलला होता. लढाऊ वृत्तीच्या पठाणाची अनत्याचारानें व निःशब्दपणें चाललेल्या सहन-शीलतेनें अगदीं कसोटी घेतली होती आणि प्रक्षोभाचे हजारों प्रयत्न भोंव-तालीं चालू असताही त्यानीं तें व्रत अचलपणें पाळलें हीच सरहद्द पुढाऱ्याच्या अभिमानाची गोष्ट आहे. यामुळें त्या प्रांताच्या पुढाऱ्याना झालेली बंदी अन्यायाची आहे, अशी सर्व देशाची भावना होती. सरहद्द प्रश्नाविषयीं गांधींचें मन व्यग्र झालें होतें आणि स्वतः त्या प्रांताची माहिती मिळविण्या-साठीं काय मार्ग काढावा याचा ते सारखा विचार करीत होते आणि अशा विचारांत खानबंधूंची मुक्तता झाल्यानें क्षणभर सर्व देशास हायसें वाटलें. खानबंधू मुक्त झाले होते तरी आपल्या प्रांतात किंवा घरीं जाण्याची त्याना परवानगी नव्हती. सरकारनें त्यांना सरहद्द प्रांतात प्रवेश करण्याची मनाई केली होती. तरी त्या प्रांतानें सविनय कायदेभंग थांबविण्याची आज्ञा अगदीं

अक्षरशः पाळली होती. सप्टेंबरच्या २५ तारखेस वर्धा येथे वर्किंग कमिटीची बैठक झाली. काहीं लोकांच्या मनात पूर्ण स्वराज्याच्या ध्येयाविषयींच्या एकनिष्ठेबद्दल शंका उत्पन्न झाल्या होत्या. त्या दूर करण्यासाठी कमिटीनें कराची येथें ध्येयाविषयीं केलेला ठरावच पुन्हां पास केला. येत्या निवडणुकीच्या दृष्टीनें काँग्रेससंस्थांनी निवडणुकीच्या चळवळीच्या कामीं काँग्रेस पार्लमेंटरी बोर्डाला मदत करावी अशी वर्किंग कमिटीनें आग्रहपूर्वक विनंति जाहीर केली.

काँग्रेसच्या अधिकृत धोरणास विरोधी अशा उमेदवारास किंवा पक्षास मदत करण्यास काँग्रेससंस्था मुखत्यार नाहींत असें वर्किंग कमिटीनें ठरविलें. प्रामाणिक मतभेद नसला तर प्रत्येक काँग्रेसभक्तानें येत्या निवडणुकीचे कामीं काँग्रेसपक्षीय उमेदवारास सहाय्य करावें अशी वरील बैठकींत विनंति करण्यात आली.

श्री. अणे यानीं स्थापिलेल्या नव्या पक्षामुळें एक नाजूक परिस्थिति निर्माण झाली होती. कम्युनल अवार्डच्या ठरावाचा फेरविचार करण्यासाठीं ऑ. इं. कॉं. कमिटीची बैठक बोलावण्याची या नव्या पक्षाने वर्किंग कमिटीला विनंति केली होती. त्या विनंतीचा विचार करण्यासाठीं अध्यक्षानीं पं. मालवीयजी व श्री. अणे याना वर्किंग कमिटीच्या चालू बैठकीस आमंत्रण केलें. वर्किंग कमिटीनें त्याच्याबरोबर कित्येक तास विचारविनिमय केला; परंतु शेवटीं ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटीच्या नवीन निवडणुकी चालू असता बैठक बोलावणें शक्य नाहीं असेंच वर्किंग कमिटीनें ठरवलें. तथापि वर्किंग कमिटीच्या वरील ठरावाविषयीं ऑ. इं कॉ. कमिटीच्या सभासदाची काहीं तक्रार असेल तर तसि सभासदानीं तसा अर्ज वर्किंग कमिटीकडे पाठवावा म्हणजे ऑ. इं. कॉ. कमिटीची बैठक बोलावणें भागच पडेल हें वर्किंग कमिटीनें स्पष्टपणें निदर्शनास आणलें. जर एखाद्या सभासदाला वर्किंग कमिटीचा जातिविषयक निर्णय प्रामाणिकपणें अमान्य वाटत असेल तर त्यानें आपली त्या निर्णयास मान्यता न देतांही असेंब्लीच्या निवडणुकीस उभें राहिलें तर हरकत काय असा मुद्दा निघाला व वर्किंग कमिटीनें तसा ठराव झाला नसल्यामुळें अपवाद करता देणार नाहीं असें स्पष्ट मत दिलें.पंडितजींनीं श्री. अणे याच्याबरोबर गांधींना एक पत्र पाठवून आपला निरोप कळविला होता. त्यास उत्तर म्हणून असें सुचविलें कीं, दोन्ही पक्षानीं आपापले उमेदवार निवडून येण्याचा

बाबू राजेंद्रप्रसाद.

सध्याचे राष्ट्राधिपति

१९३४ मुंबई कॉंग्रेसचे अध्यक्ष

कितपत संभव आहे याची नीट चिकित्सा करावी व ज्या पक्षाच्या उमेदवाराना यशस्वी होण्याचा संभव कमी असेल त्या पक्षानें निवडणुकींतून आपलें अंग काढून घ्यावें. परंतु कोणच्याही तऱ्हेच्या समेटाचा संभव उरला नाहीं त्याच-वेळीं बोर्डानें ठरविले कीं, जेथें पंडितजी व श्री. अणे उमे आहेत तेथे स्पर्धाच करावयाची नाहीं. तसेंच सिंधप्रांत व कलकत्ता शहर येथेंही चढाओढ करा-वयाची नाहीं असें ठरले.

कॉंग्रेसच्या इतिहासात याचवेळीं एक महत्त्वाची गोष्ट घडून आली. गांधी कॉंग्रेसमधून जाणार अशी दाट वंदता पसरली होती. गांधींनीं जुलै महिन्यांत ७दिवसाचा उपवास केला होता त्यावेळीं त्यानीं स्वतःच पुष्कळ बंगाली, आंध्र-प्रातीय व इतर मित्राजवळ हें बोलूनही दाखविले होतें. परंतु वर्तमानपत्रांनीं ही बातमी वळेंच पुढें आणीपर्यंत याविषयीं इतर कोणास वार्ता नव्हती. यासंबंधीं गांधींनीं एक विस्तृत पत्रक प्रसिद्ध केलें तें खालीं दिलें आहे. कॉंग्रेस सोडण्या-च्या गांधींच्या निश्चयाचा लोकानीं निरनिराळ्या तऱ्हेने अर्थ केला होता. ते साधे सभासदत्व सोडून देतील असें फारच थोड्यांना वाटले. कांहीं म्हणत निवडणुकीच्या ऐनवेळीं गांधींनीं बाजूस होणे अविचाराचें आहे. कांहीं म्हणत गांधींच्या घटनेविषयींच्या सूचना कॉंग्रेसनें मान्य केल्या तर गांधी अजूनही राहतील. कांहीं म्हणत आक्टोबरच्या शेवटच्या आठव-ड्यात मुंबईस अधिवेशन होईल त्यात सर्व उलगडा होईल. कांहीं याहीपुढें जाऊन म्हणाले कीं, जर कॉंग्रेस सोडण्याचा त्यानीं आधींच निश्चय केला असेल तर त्यांनीं अधिवेशनास हजर तरी कशाला रहावें, तर कांहींचें म्हणणें असें कीं, स्वतःच्या मताप्रमाणें घटना बदलून ठेवून त्या बदललेल्या स्वरूपात दुसऱ्याना काम करताना गांधींनीं अडचणींत का पाडावें? परंतु गांधींचें पत्रक पाहिल्याबरोबर सर्व अंदाज व टीका मावळल्या. त्या महान् व्यक्तित्वापुढें आपण अगदीं दुबळे आहोंत ही जाणीव सर्वांनाच झाली व गांधींनीं आपला निश्चय तर्कशास्त्रानें केला नसून अंतःस्फूर्तीनें केला आहे हेंही सर्वांना पटलें.

### म. गांधींचें पत्रक.

वर्धागंज, सप्टेंबर १७, १९३४

मी कॉंग्रेसशीं प्रत्यक्ष संबंध तोडण्याचा विचार ठरविला आहे ही बातमी

खरी होती. परंतु वर्किंग कमिटीच्या व पार्लमेंटरी बोर्डाच्या बैठकीसाठीं गेल्या आठवड्यांत जे मित्र वर्ध्यास आले होते त्याच्या सल्ल्याप्रमाणे मी असें ठरवले कीं, काँग्रेस सोडायचीच असेल तर येतें अधिवेशन झाल्यावर सोडावी. संघटनेच्या प्रत्यक्ष कार्यांत भाग न घेतां काँग्रेसमध्यें रहावें असा एक मधला मार्ग पं. गोविंदवल्लभ पंत आणि मि. रफी अहंमद किडवाई यांनीं सुचवला; परंतु सरदार वल्लभभाई व मौ. अब्दुल कालम अझद यांनीं त्या मार्गाचा तीव्र निषेध केला. मी आता कॉंग्रेस सोडावी अशी वेळ आली आहे असें सरदार वल्लभभाईंचें माझ्यासारखेंच मत पडलें; परंतु पुष्कळाना हें मत पटलें नाहीं. सर्व विचार केल्यावर मी असें ठरविलें कीं, आक्टोबरमधील अधिवेशन संपण्यापूर्वी काहींच निर्णय करूं नये हाच सर्वांत सोईस्कर व शहाणपणाचा मार्ग आहे. कॉंग्रेसमधील बरेच लोक माझीं मतें व कार्यक्रम याना कंटाळले आहेत. काँग्रेसला सहाय्यक होण्याऐवजीं मी तिच्या प्रगतीच्या मार्गांत अडचण होऊन बसतों, माझ्या व्यक्तित्वाच्या दडपणामुळें चाललेली एक प्रातिनिधिक व लोकायत्त संस्था एवढेंच काँग्रेसचें स्वरूप राहणार, तिच्यांत विवेकाला फारसा वाव रहात नाहीं असा माझा जो ग्रह झाला आहे, तो कितपत बरोबर आहे हें पहाता यावें हाही एक आकर्षक विचार येऊन मी पुढील अधिवेशनापर्यंत निर्णय तहकूब करण्यास तयार झालों.

माझें वरील मत व त्यावरून केलेल्या माझ्या सूचना याची सत्यासत्यता मला अजमावून पहाता यावी म्हणून काँग्रेसनें त्यावर मत द्यावें व आपला अभिप्राय नमूद करावा.

जितक्या थोडक्यात हें सर्व करतां येईल तितक्यात तें करण्याचा मी प्रयत्न केला पाहिजे. माझ्या व काँग्रेस कार्यकर्त्यांच्या दृष्टिकोनात महत्त्वाचा व वाढता फरक पडत चालला आहे असें मला आढळून आले आहे. माझ्यावरील असामान्य भक्तीमुळें त्याना अडचण झाली नसती तर कॉंग्रेसमधील किती तरी विचारवंत लोक मोठ्या आनंदानें व उत्साहानें जिकडे गेले असते त्याच्या अगदीं विरुद्ध दिशेनें मी जात आहे असें त्याना दिसतें. मी कॉंग्रेसपुढें माडलेल्या राजकारणाचा त्यानीं निषेध केला असला व आपली नापसंती व्यक्त केली असली तरीसुद्धा त्यानीं माझ्याविषयीं एवढी प्रचंड निष्ठा बाळगली आहे कीं, तेवढी कोणच्याही पुढाऱ्याला आपल्या अनुयायाकडून अपेक्षितां येणार नाहीं.

या निष्ठेचा मी आता यापुढें जास्त काळ उपभोग घेत राहणे म्हणजे त्याच्यावर अवास्तव दडपण पाडण्यासारखें आहे. त्याच्या व माझ्यामधील मूलभूत फरक असे जे मला वाटतात त्यांच्याकडे वरील भक्तीच्या बळावर मी डोळेझाक करूं शकत नाहीं.

## भोंदूपणा आणि टाळाटाळी.

ते महत्त्वाचे फरक मी मांडावयास पाहिजेत. चरखा व खादी याचा मी प्रथम उल्लेख करतों. कॉंग्रेसच्या जबाबदार सभासदांनीं सूत काढणें सोडून दिलें आहे. त्याच्यापैकीं बहुतेकांचा त्यावर विश्वास नाहीं आणि जर त्याच्या विवेकशक्तीवर मी ताबा चालवूं शकलों तर चार आणे देऊन मताधिकार मिळवण्याऐवजीं दररोज सूत काढणे ही अट मताधिकारास ठेवावी असें मी म्हणेन. कॉंग्रेसच्या घटनेंतील खादीचें कलम जवळ जवळ पहिल्यापासून कागदावरच राहिलें आहे, आणि खादीच्या बाबतींत जो भोंदूपणा व उडवाउडवी माजली आहे, त्याबद्दल मलाच जबाबदार धरणारे लोक कांहीं थोडे-थोडके नाहींत. खादीकार्याला मिळालेली मान्यता ही लोकांनीं स्वतःची खात्री होऊन दिली नव्हती तर माझ्या वैयक्तिक श्रद्धेमुळें दिली होती हें माझ्या लक्ष्यात यावयास पाहिजे होतें असेंही पुष्कळ लोक म्हणतात त्याच्या म्हणण्यात बरेंच स्वारस्य आहे हें मला कबूल केलें पाहिजे. माझी दिवसेंदिवस खात्री होत चालली आहे कीं, जर लक्षावधि कष्टाळू गरीबासाठीं आणि शुद्ध अनत्याचाराच्या मार्गानें हिंदुस्थानला पूर्ण स्वराज्य मिळावयाचें असेल तर अर्धपोटी व अर्धवट बेकार अशा लाखों लोकांप्रमाणेंच अल्पसंख्याक सुशिक्षितांना सुद्धां खादी व रहाट हीं चिरपरिचित झालीं पाहिजेत. कारण देवानें ज्या उद्देशानें माणसाला हात दिले आहेत त्या उद्देशाप्रमाणें त्यांनीं हाताचा उपयोग न केल्यानें आज ते सर्व भारवाही पशूंच्या दर्जाला येऊन पोहोंचले आहेत. या अर्थानें चरखा हें मानवी इभ्रतीच्या समानतेचें अगदीं खऱ्या स्वरूपाचें निदर्शक आहे. चरखा ही शेतकीची दासी आहे. राष्ट्राचें तें दुसरें फुप्फुस आहे. आपण एकाच फुप्फुसाचा उपयोग करीत आहोंत म्हणूनच आपला नाश होत आहे आणि असें असूनही चरख्यातील भारतव्यापी सामर्थ्या-विषयीं कॉंग्रेसमधील फार थोड्या लोकांना श्रद्धा वाटत आहे. कॉंग्रेसच्या घटनेंतून खादीचें कलम काढून टाकणें म्हणजे कॉंग्रेस व लक्षावधि लोक यांच्या-

मधील जिवंत धागा काढून टाकण्यासारखें आहे. त्या लक्षावधि लोकांच्याच-साठीं खादीचा जन्म झाला व ती अट राहिली तर ती सक्तीनें लादली गेली पाहिजे. परंतु कॉंग्रेसमधील प्रचंड बहुमताचा खादीवर जातिवंत विश्वास नसेल तर ते होणें शक्य नाहीं.

## पार्लमेंटरी बोर्डाचें आतां उदाहरण घ्या.

मी स्वतः जरी असहकारितेचा जनक असलों तरी माझी अशी खात्री झाली आहे कीं, देशाची हल्लींची परिस्थिति लक्ष्यात घेता आणि सविनय प्रति-काराची कोणचीही सर्वसामान्य योजना नसताना कॉंग्रेसनें उभारलेल्या कार्यक्रमाचा एक आवश्यक भाग या दृष्टीनें कॉंग्रेसचा अंतर्गत भाग म्हणून पार्लमेंटरी पक्ष असणें जरूर आहे. परंतु त्या मुद्याविषयीं आमच्यांत फार तीव्र मतभेद आहेत. पाटणा ऑ. इं. कॉं. क.त मी या कार्यक्रमाचा जोरानें पुरस्कार केला व त्यामुळें पुष्कळाना जुलूम झाला असें वाटलें. पण ते आपल्या निश्चित मताप्रमाणें वागले नाहींत. विद्वत्तेनें किंवा अनुभवानें जे श्रेष्ठ गणले गेले आहेत त्याच्यासाठीं आपल्या मताना मुरड घालणें हें संघटनेच्या पूर्णत्वाकरता एका विशिष्ट मर्यादेपर्यंत उपकारक आणि आवश्यक असेल. परंतु ही मताची मुरडणी एखाद्याला क्षणोक्षणीं करण्याचा प्रसंग आला तर तो एक भयंकर जुलूमच होतो. अशा तऱ्हेच्या अप्रिय परिणामाची मला कधींही इच्छा नव्हती. तरी मला अनुभव मात्र असाच आला हें मला स्वत. किंवा लोकापासून लपविता येत नाहीं. मला विरोध करण्यात कित्येक नामोहरम झाले आहेत. लोकशाहीच्या पुरस्कर्त्या व्यक्तीला ही गोष्ट अत्यंत लाजिरवाणी वाटते. सर्व मनुष्यात अत्यंत दरिद्री अशा व्यक्तीशीं मी एकरूप झालों आहे, हें मी अधिकारी वाणीनें सागूं शकतों. त्याच्यापेक्षां कोणच्याही तऱ्हेनें उच्चतर रहाणी नसावी अशी माझी तीव्र इच्छा आहे व स्वतःमधील सर्व सामर्थ्य खर्च करून ती राहणी मिळविण्याचा मनापासून प्रयत्न मी करतों.

सोशालिस्ट पक्षाच्या निर्मितीचें मी आनंदानें स्वागत केलें आहे. त्यांच्या-तील काहींजण सहकारी, त्यागी व सन्मान्य गृहस्थ आहेत. हें सर्व असूनही त्यानीं प्रसिद्ध केलेल्या पत्रकातील कार्यक्रमाशीं माझा मूलभूत विरोध आहे. तथापि त्याच्या वाङ्मयातील कल्पनाच्या विस्तारास आळा घाण्यासाठीं मी मज-जवळ जें काहीं असेल नसेल तें नैतिक वजन उपयोगात आणणार नाहीं.

त्यांच्या काहीं कल्पना मला कितीही कटु वाटत असल्या तरी त्यांनीं मुक्तपणें त्या मांडू नयेत असें मला म्हणता येणार नाहीं. जर त्यांनीं कॉंग्रेसमध्यें वर्चस्व मिळवलें तर तें त्यांनीं खुशाल मिळवावें. मी मात्र मग कॉंग्रेसमध्यें राहू शकणार नाहीं. कारण त्यांनाही प्रत्यक्ष विरोध करण्याची कल्पनाही मी मनात आणणार नाहीं. मी लोकाची इतकीं वर्षें सेवा करीत असता, पुष्कळ संस्थांबरोबर मतभेदाचे प्रसंग आले तथापि प्रत्यक्ष विरोधाची भूमिका मात्र मी कधींही स्वीकारली नाहीं.

याशिवाय काहीं लोकाचें संस्थानांविषयींचें जें धोरण आहे तें माझ्या मताच्या अगदीं विरुद्ध आहे. मी पुष्कळ विचार करूनसुद्धां मला माझें त्या विषयींचें मत बदलता आलें नाहीं.

अस्पृश्यतानिवारणच्या धोरणात सुद्धा बहुतेक जरी नाहीं तरी पुष्कळ लोक माझ्या विरुद्ध धोरणाचे आहेत. मला तो अत्यंत महत्त्वाचा धार्मिक व नैतिक प्रश्न वाटतो आणि पुष्कळाना ती एक मोठी चूक वाटते. त्या प्रश्नाचा विचार करताना सविनय प्रतिकाराच्या चळवळींत अडथळे उत्पन्न झाले आहेत असें लोक म्हणतात परंतु मला वाटतें कीं, मी दुसऱ्या कोणच्याही मार्गाचा अवलंब करण्यात स्वतःची फसवणूक केल्यासारखें झालें असतें.

तसेंच अनत्याचाराविषयीं पहा. १४ वर्षें त्या तत्त्वाचा अवलंब करूनही कॉंग्रेसमधील बहुतेक लोकाना तें एक धोरण वाटतें. पण मला त एक आदितत्त्व वाटतें. कॉंग्रेसला तें ध्येयाच्या दर्जाचें वाटूं नये हा त्यांचा दोष नाहीं. मीच त्या तत्त्वाचा पुरस्कार अचूकपणें केला नाहीं व त्याहूनही चुकीच्या स्वरूपात मी तें तत्त्व अमलांत आणलें ही माझी चूक आहे. मला त्या प्रमादाची जाणीव नाहीं. परंतु ज्याअर्थीं तें तत्त्व कॉंग्रेसच्या कार्यकर्त्यांच्या आयुष्याचें एक सूत्र झालें नाहीं त्या अर्थी त्या तत्त्वाचा प्रचारक या नात्यानें माझीच चूक झाली असेल असें मी अनुमान काढतों.

अनत्याचाराविषयींच अनिश्चितता असेल तर सविनय प्रतिकाराविषयीं तर कितीतरी पटीनें जास्त अनिश्चितता असणार. २७ वर्षें त्या तत्त्वाचा अभ्यास व अनुभव घेऊन सुद्धां मला तें पूर्ण कळलें आहे असें मी म्हणूं शकत नाहीं. सविनय प्रतिकाराचे प्रसंग मानवी आयुष्यात वारंवार येतां कामा नयेत आणि त्यामुळें अहिंसातत्त्वाचें प्रयोगक्षेत्रही मर्यादित

असणार. आईबाप, गुरू किंवा इतर वडील माणसें अथवा धार्मिक किंवा अधिकारी वर्ग याच्या आज्ञाचें पालन केल्यानंतरच सविनय प्रतिकाराचे प्रसंग येतात. मी स्वतः कितीही अपूर्ण असलो तरी सविनय प्रतिकारापुरताच मात्र एकटा तज्ज्ञ असल्यानें आणखी कांहीं काल तरी त्याचे प्रयोग मी स्वत.पुरतेच मर्यादित ठेवावेत असें मी अनुमान काढले तर त्यात आश्चर्य वाटण्याचें कारण नाहीं. त्या तत्त्वाचें प्रयोग चालू असताना होणाऱ्या चुकांची संख्या मर्यादित करण्यासाठीं व त्यापासून होणारे उपद्रव कमी करण्यासाठीं व त्याच-प्रमाणें त्या तत्वाचेंसुद्धा परिणाम शोधून काढण्यासाठीं मी त्याचे प्रयोग मर्यादित करणें जरूर होतें. त्यात कॉंग्रेसवाल्याचा कांहीं दोष नाहीं. अनत्याचाराविषयीं जे ठराव नुकतेच पास झाले, त्या ठरावाना कॉंग्रेसवाल्यानीं अत्यंत उदारपणें दुजोरा दिला हें खरें आहे. परंतु ते होत असता त्याच्या विवेकशक्तीला माझ्या बाजूला वळवणें क्षणोक्षणीं जास्त अवघड झालें आहे.

त्या ठरावावर आपला बौद्धिक विश्वास नसता त्याना दुजोरा देताना त्याना जो जुलूम सहन करावा लागला त्याची नुसती आठवणसुद्धां त्यांच्या इतकीच मला त्रासदायक होते. आपलें सर्वांचें जें सामान्य ध्येय आहे तें गाठण्यासाठीं ते व मी असल्या दडपशाहींतून मुक्त व्हावयास पाहिजे. एवढ्यासाठीं आपापल्या विश्वासाप्रमाणें मोकळ्या मनानें निर्भ्रांतपणें वागण्यास प्रत्येकजण स्वतंत्र असावयास पाहिजे.

पाटणा येथें एका पत्रकात सविनय प्रतिकाराची चळवळ थांबविण्याचा मी सल्ला दिला व उद्दिष्ट ध्येय गाठण्याच्या कामीं सविनय प्रतिकाराचा उपयोग होत नाहीं हें लोकांच्या लक्ष्यात आणून दिलें. जर अनत्याचाराचें तत्त्व आपल्या वृत्तींत बाणलें असतें तर तें आपोआप व्यक्त झालें असतें व सरकारच्याही नजरेंतून तें सुटलें नसतें. त्यानीं काढलेले वटहुकूम आपल्या दुष्कृत्यामुळें काढावे लागले नाहीत तर आपल्यातील धैर्य खचवण्यासाठींच ते काढले होते, यात मुळींच शंका नाहीं. परंतु सविनय प्रतिकारकही पूर्णपणें निर्दोष आहेत अशी आपली कल्पना असेल तर तेही चूक आहे. जर आपण पूर्णपणें अनत्याचारी असतों तर त्याचें प्रतिबिंब उमटलें असतें. अत्याचारी मार्गापेक्षा आपल्या अनत्याचारी मार्गावर आपली दृढतर श्रद्धा आहे, असें क्रांतिकारकाना आपण पटवूं शकलों नाहीं. उलट त्याच्या

अत्याचारी प्रवृत्तीचे कांहीं आपल्यांतही आहेत हें त्याना वाटावें असे आपण वागलों आहोंत. आपला फक्त प्रत्यक्ष अत्याचारावर विश्वास नव्हता एवढेंच. आणि जेव्हा क्रांतिकारक म्हणाले कीं, जर अत्याचारावर सर्वांचा विश्वास असेल तर तो करावा कीं न करावा हा फक्त मताचा प्रश्न आहे, तेव्हा त्याचा युक्तिवाद योग्यच होता. अनत्याचारी मार्गाकडे देशानें फार प्रगति केली आहे व पुष्कळानीं अतुल धैर्य व अमोल स्वार्थत्याग केला आहे. हें मी पूर्वी म्हटलेंच आहे. तें पुन्हा सांगण्याची जरूर नाहीं. मला म्हणावयाचें आहे तें एवढेंच कीं विचार, शब्द व आचार या तिन्हीं बाबतींत अत्यंत पूर्णत्वानें आपल्यात अनत्याचाराचें तत्त्व बिंदलें नाहीं. सरकारला व क्रांतिकारकाना अनत्याचाराचें सामर्थ्य दाखविणें व पूर्णार्थानें स्वातंत्र्य व इतर कोणचीही सत्याधिष्ठित गोष्ट मिळविण्याचें तें एक साधन आहे हें त्याना पटवणें यासाठीं मार्ग व साधनें शोधणें हें माझें आतां मुख्य कर्तव्य आहे.

या प्रयोगासाठीं माझें आयुष्य अर्पण झालें आहे. तो प्रयोग करण्यासाठीं मला पूर्णपणें विभक्त व्हावयास पाहिजे व कार्यस्वातंत्र्य असावयास पाहिजे. सविनय प्रतिकाराचा सत्याग्रह हा फक्त एक भाग आहे. सत्याग्रह हा जीविताचा सार्वत्रिक नियम व्हावयास पाहिजे. सत्य हाच माझा परमेश्वर आहे आणि मी फक्त अनत्याचाराच्या मार्गानें त्याचा शोध करूं शकेन, दुसऱ्या कोणच्याही मार्गानें नाहीं. माझ्या देशाच व जगाचेंही स्वातंत्र्य त्या सत्यसंशोधनात खात्रीनें समाविष्ट झालें आहे. कोणच्याही ऐहिक किंवा पारलौकिक कारणासाठीं मला तें संशोधन थांबविता येणार नाहीं. सत्यसंशोधनासाठीं मी राजकारणाकडे वळलों. या सत्यसंशोधनात या देशाचें संपूर्ण स्वातंत्र्य आणि सत्याचा एक अंश असलेल्या इतर गोष्टीही समाविष्ट झाल्या आहेत अशी जर सुशिक्षित कॉंग्रेसवाल्याच्या मनाची व बुद्धीची मला खात्री पटवता येत नसेल तर मी एकटाच राहून तें कार्य करावयास पाहिजे हे अगदीं उघड आहे. एकटा कार्य करीत असताही माझी अशी श्रद्धा आहे कीं, आज माझ्या देशबांधवाना जे पटवतां आलें नाहीं तें आज ना उद्यां त्यांचें त्यानाच पटेल किंवा जर देवानें माझ्या वाणींत सामर्थ्य दिलें किंवा कृतीची स्फूर्ति दिली तर माझ्या शब्दानें वा कृतीनें ही तें त्याना पटेल. एखादें वरकरी मिळालेलें मत, नाखुषीची कबुली किंवा संमति ही जरी कार्यविघातक नसली तरी अपुरी आहे. मी आपल्या समान

ध्येयाचा वर उल्लेख केला आहे; परंतु संपूर्ण स्वातंत्र्य या शब्दाचा सर्व जण माझ्याच सारखा अर्थ घेतात कीं नाहीं याबद्दल मला शंका येऊं लागली आहे. Complete Independence या इंग्रजी शब्दाचा इंग्रजींत जो पूर्ण अर्थ आहे तोच अर्थ पूर्णपणे लक्ष्यात घेऊन त्या अर्थाचें संपूर्ण स्वातंत्र्य हिंदुस्थानसाठीं पाहिजे आहे असे मी समजतो. पूर्ण स्वराज्य या शब्दाला Complete Independence या शब्दापेक्षा पुष्कळच जास्त अर्थ आहे असें मी समजतों. परंतु पूर्ण स्वराज्य हा शब्दसुद्धा स्वतः अर्थवाहक नाहीं. सर्वांना समजणारा अर्थ असेल असा शब्द किंवा शब्दप्रयोग असणें शक्य नाहीं. म्हणून मी निरानिराळ्या प्रसंगीं स्वराज्य या शब्दाच्या निरानिराळ्या व्याख्या दिल्या आहेत. परंतु त्या सर्व एकत्र केल्या तरी त्या अपूर्णच आहेत. परंतु त्यावर भर देण्याची माझी इच्छा नाहीं. पूर्ण व्याख्या देणें अशक्य नाहीं परंतु तें कठीण आहे असें पुष्कळ लोक म्हणतात. त्याची ही अडचण पाहून कॉंग्रेसवाल्यात व माझ्यात असलेल्या एका महत्त्वाच्या विरोधाचीच मला जाणीव होते. १९०३ सालापासून मी सांगत आलों आहे कीं, ध्येय व साधनें हे परिवर्तनीय शब्द आहेत. म्हणून जेथें साधनें निरनिराळीं आहेत आणि विसंगतही आहेत तेथें ध्येयेंही विविध आणि विसंगतच होणार! साधनावर आपला अधिकार चालतो परंतु ध्येयावर आपण सत्ता गाजवूं शकत नाहीं. परंतु जर आपण सर्वांनीं एकाच साधनाचा एकाच अर्थानें उपयोग केला तर ध्येयाच्या अर्थाबद्दल आपणास रुखरुख बाळगण्याचें कारण नाहीं. परंतु हें अत्यंत स्पष्ट असें सत्यही पुष्कळ कॉंग्रेसवाल्याना मान्य नाहीं हें कोणासही पटेल. त्याचें म्हणणें असें कीं, साधनानीं ध्येय ठरवलें जातें मग तीं साधनें कोणचींही असोत.

या मतभेदामुळेंच कॉंग्रेसचा कार्यक्रम थंडावला आहे. कारण त्या कार्यक्रमावर विश्वास नसता ज्या सभासदानीं त्याला शाब्दिक अनुमति दिली त्याना तो कार्यक्रम अंमलात आणतां आला नाहीं; तरी कॉंग्रेसच्या कार्यक्रमाखेरीज मजजवळ दुसरा कार्यक्रम नाहीं. तो कार्यक्रम म्हणजे अस्पृश्यानिवारण, हिंदु-मुसलमानाचें ऐक्य, पूर्ण मद्यपाननिषेध, खादी व हातानें सूत काढणें वापरणे स्वदेशीचा अर्थ असा कीं, खेडेगावातील उद्योगधंद्याचें पुनरुज्जीवन व ७ लाख खेड्याची पुनर्घटना करून प्रत्येकाला देशभक्तीचें पूर्ण समाधान मिळवून देणें. एखाद्या हिंदी खेड्यातच माझ्या देहाला शेवटीं विश्रांति मिळावी

व तीही विशेषतः सरहद्द प्रांतातील सेव्यात मिळावी अशी माझी वैयक्तिक इच्छा आहे. जर खुदाई खिदमतगार हे खरे अनत्याचारी असतील तर अनत्याचाराचा प्रसार व हिंदु–मुसलमान ऐक्य या कार्यास त्यांचें फार मोठें सहाय्य होईल. शब्दानें विचारानें व कृतीने ते अनत्याचारी असले व हिंदु–मुसलमान ऐक्याबद्दल त्यांना जिव्हाळा वाटत असला तर देशास अत्यंत जरूर असलेल्या दोन गोष्टी त्यांच्यात आपण प्रत्यक्ष पाहूं शकूं. गतकालापासून अफगाणाची जी आपणास दहशत वसली आहे ती एक नामशेष गोष्ट होऊन जाईल. म्हणून अनत्याचार व हिंदु–मुसलमान व इतर लोकाचे ऐक्य यांचीं तत्त्वें त्यांनीं अंतःकरणांत बिंबवलीं असल्याचे ते जे आधिकाराने सागतात ते एकदा प्रत्यक्ष पाहण्यासाठीं मला तळमळ लागली आहे. चरख्याचा संदेश त्याना एकदा समक्ष सागावा अशी माझी इच्छा आहे. मी कॉंग्रेसमध्यें असलों किंवा बाहेर असलो तरी माझ्या कल्पनेप्रमाणें नम्रपणें कॉंग्रेसची सेवा करण्यात मला नेहमीं आनंदच वाटेल.

आपल्या इभ्रतीला जी भ्रष्टाचारानें कीड लागत आहे त्याचा उल्लेख मीं येथें अगदीं शेवटपर्यंत केला नाहीं. त्याचा उच्चार मी लोकात पुष्कळ वेळां केला आहे. परंतु काहीं असलें तरी, देशातील अत्यंत सामर्थ्यवान् व प्रातिनिधिक संस्था असाच मान माझ्या मनात कॉंग्रेसबद्दल वावरत आहे. उदात्त सेवाधर्म व स्वार्थत्याग याची अखंड परंपरा कॉंग्रेसच्या इतिहासात आहे आणि दुसऱ्या कोणच्याही संस्थेनें शमविलीं नसतील इतकीं वादळें कॉंग्रेसनें शमविलीं आहेत. कोणच्याही देशास भूषणावह व्हावा असा प्रचंड आत्मत्याग कॉंग्रेसच्या कार्य-क्षेत्रात झालेला आहे. संशयातीत चारित्र्याच्या स्त्रीपुरुषांची जास्तींत जास्त संख्या आज कॉंग्रेसच्या अनुयायात आहे. आणि जर अशी संस्था सोडण्याचा मला प्रसंग येणार असेल तर माझ्या अंतःकरणास पीळ पडल्यावाचून रहाणार नाहीं आणि बाहेर राहूनच मला कॉंग्रेसची म्हणजेच देशाची जास्त सेवा करता येईल अशी माझी ज्यावेळीं खात्री होईल त्याचवेळीं मी कॉंग्रेस सोडणार.

वर सागितलेल्या विचारांचे काहीं ठराव विषयनियामक कमिटीपुढें ठेवून मी कॉंग्रेस भावनाची पारख करूं इच्छितों. पहिली उपसूचना अशी कीं, न्याय्य व शांतताप्रधान या शब्दाऐवजीं सत्यमय व अनत्याचारी हे शब्द घालावेत.

मी या विशेषणाचा मूळच्या विशेषणाऐवजीं अगदीं निर्हेतुकपणें उपयोग केला म्हणून माझा विरोध उत्पन्न झाला. तो झाला नसतां तर मी ही सूचनाही माडली नसती. आपल्या ध्येयप्राप्तीसाठीं अनत्याचार व सत्य यांची जरूरी आहे अशी कॉंग्रेसवाल्यांची श्रद्धा असली तर ही विशेषणें स्वीकारण्यास त्यांनीं कचरूं नये।

दुसरी उपसूचना अशी कीं, मताधिकारासाठीं ४आणे वर्गणीची अट ठेवण्याऐवजीं प्रत्येक सभासदानें दर महिन्यास चांगलें पिळदार असें २००० तार स्वतः कातलेलें १५ नंबरचें सूत कॉंग्रेस कचेरींत द्यावें. अशी अट असावी. या अटीला अनकूल वा प्रतिकूल असलीं विचारें येथें पुन्हा सांगण्याची आवश्यकता नाहीं. कमींत कमी प्राप्ति असलेल्या मजुरांचे प्रतिनिधित्व करणारी लोकसभा असें जर राष्ट्रीय सभेचें स्वरूप व्हावयाचें असेल तर श्रमावर उभारलेली अट मताधिकारास लागूं करण्यापेक्षा दुसरा चागला मार्ग नाहीं हातानें सूत कांतणें हा कमींत कमी प्राप्तीचा व्यवसाय आहे हें सर्वांना मान्य आहे आणि तरी तो व्यवसाय भारदस्त आहे. देशासाठीं दररोज एक तास श्रम करण्याची तयारी असलेल्या प्रत्येक प्रौढ इसमास मताधिकार मिळवून देण्याची ही अट, हा एक सगळ्यात जवळचा मार्ग आहे. श्रमाच्या प्राप्तीची रुखरुख न बाळगतां बुद्धिमान व श्रीमान् समाजानें श्रमाचें सौंदर्य मान्य करावें अशी अपेक्षा केली तर ती अयोग्य ठरेल काय ? ज्ञानाप्रमाणेंच श्रम हेंच श्रमाचें फळ नाहीं काय ? जर आपण गरीबांचे खरे सेवक असलों तर त्यांच्यासाठीं सूत काढण्यात आपणास अभिमान वाटला पाहिजे.

मौलाना महमदअली नेहमीं म्हणत कीं, तलवार हे पाशवी शक्तीचें चिन्ह आहे तर चरखा किंवा टकळी हें अनत्याचार सेवा व विनय यांचें चिन्ह आहे. त्याच्या शब्दाची मला येथें आठवण होते. राष्ट्रीय निशाणाचा एक भाग म्हणून ज्यावेळीं चरखा स्वीकारण्यात आला, त्या वेळीं प्रत्येक घरात चरख्याचा आवाज ऐकूं येईल असाच त्यात अभिप्रेत हेतू होता. जर कॉंग्रेसवाल्यांना चरख्याच्या संदेशावर विश्वास नसेल तर राष्ट्रीय निशाणावरून तो पुसून टाकावा व संघटनेंतून खादीचें नांव वगळावें. खादीची अट पाळण्यात लज्जास्पद फसवेगिरी व्हावी ही अगदीं असह्य गोष्ट आहे.

माझी तिसरी उपसूचना अशी कीं, ज्यांचें नाव कॉंग्रेसच्या रजिस्टरमध्यें

कमीत कमी सहा महिनेपर्यंत सततपणें नाहीं आणि त्या काळात ज्यानें निरपवादपणें खादी वापरली नाहीं त्याला कॉंग्रेसच्या कोणच्याही निवडणुकीस मतदानाचा अधिकार नसावा. खादीची अट अमलात आणण्यात अत्यंत अडचणी अनुभवास आल्या आहेत. त्या दूर करण्यासाठीं कॉंग्रेसच्या अध्यक्षाकडे निर्णयाचे अधिकार द्यावेत व त्या निर्णयावर अपीलाचीही सोय असावी. तसेंच ज्या त्या कमिटीच्या अध्यक्षाकडेही अधिकार द्यावेत. त्या अधिकारांत त्यानीं एखादा उमेदवार घटनेतल्या नियमाप्रमाणे खादी वापणारा आहे कीं नाहीं ते ठरवावें. मतदानाच्या वेळीं ज्यानें पूर्णपणें खादी परिधान केली नाहीं तो मतदार समजूं नये. परंतु जर पुष्कळ लोकानीं स्वतःच ही अट पाळली नाही तर मोठ्या दक्षतेनें रचलेले कोणचेही नियम उपयोगी पडणार नाहींत.

कॉंग्रेसच्या प्रतिनिधींची संख्या ६००० आहे, तरी तेवढ्याच संख्येनें कॉंग्रेस ही संस्था अनावर बोजा झाली आहे. कॉंग्रेसच्या अधिवेशनास सर्व प्रतिनिधी कधींच हजर राहिले नाहींत आणि कॉंग्रेसजवळही खऱ्या प्रतिनिधींची नोंद नव्हती. प्रतिनिधित्व हें नुसतें नावापुरतेंच राहणार! म्हणून मीं अशी दुरुस्ती सुचवितों कीं प्रतिनिधींची संख्या१०००पर्यंत मर्यादित करावी.प्रत्येक हजार मतदारास एकापेक्षा जास्त प्रतिनिधी असूं नये. प्रतिनिधींची संख्या पूर्ण करण्यासाठीं १० लाख मतदार लागतील. ३१५ दशलक्ष लोकसंख्येच्या देशात १० लाख मतदार म्हणजे काहीं असंभाव्य आशा नाहीं. अशा रीतीनें प्रतिनिधींची संख्या मर्यादित केल्यानें कॉंग्रेसच्या संख्याबलाचा देखावा कमी झाला तरी त्याऐवजीं कार्याचा भरीवपणा वाढेल. अधिवेशनाचा दिखाऊ भाग हा प्रेक्षकासाठीं भरपूर सोय करून तसाच कायम ठेवावा परंतु असंख्य प्रतिनिधींची व्यवस्था ठेवण्याची स्वागत मंडळाची वणवण कमी होईल! आपण हें लक्षात ठेवलें पाहिजे कीं कॉंग्रेसचें वैभव व सत्ता लोकशाही स्वरूपाची आहे. वार्षिक समारंभाकडे खेचलेले लक्षावधि प्रेक्षक व प्रतिनिधी यावर कॉंग्रेसचें मोठेपण व महत्त्व नाहीं, तर प्रतिक्षणीं वाढत्या प्रमाणावर जनसेवा करण्यात तिचें खरें मोठेपण व महत्त्व आहे. लोकशाहीचें पाश्चिमात्य स्वरूप आता कसोटीला लागलें आहे. जर तें निष्फळ आहे असें ठरलें तर लोकशाहीचें खरें आदर्श स्वरूप दाखविण्याचा मान हिंदुस्थाननें मिळवावा. लाचारी व भोंदुपणा हीं आज लोकशाहीचीं अपरिहार्य फळें दिसतात तशीं तीं नसावींत. मोठा विस्तार हीही लोकशाहीची

म्हणून नव्हे. आपल्या मतदाराचें आशास्थान असे खरे तत्त्वनिष्ठ प्रतिनिधि थोडेच असले तर लोकशाहीला ते विसंगत नाहीं. बळजबरीच्या मार्गानें लोकशाही उभारतां येत नाहीं असें माझें मत आहे. लोकशाहीची प्रवृत्ति बाहेरून उत्पन्न करतां येत नाहीं, ती अंतःकरणातच उत्पन्न व्हावी लागते.

मला अशी धास्ती वाटते कीं कॉंग्रेसला हजर राहिलेले हजारो लोक माझ्या उपसूचनांना क्वचितच दुजोरा देतील; परंतु जर मला कॉंग्रेसचें नेतृत्व पत्करावयाचे असेल तर माझ्या उपसूचना मला सोडता येणार नाहींत; आणि आपलें ध्येय कमीत कमी काळांत गांठण्यासाठीं, माझ्या सूचनाच्या अनुरोधाने ठराव होणेंही आवश्यक आहे. संस्थेच्या सभासदानीं त्या संस्थेच्या ठरावांचें व धोरणाचे अंत.करणपूर्वक आचरण केल्याखेरीज कोणचीही स्वयंसिद्ध संस्था टिकाव धरणें शक्य नाहीं आणि जर अनुयायानीं श्रद्धेनें, विनतकारपणे व बुद्धिपुरस्सर आपल्या पुढाऱ्याचें अनुकरण केलें नाहीं तर कोणच्याही पुढाऱ्याला आपलें कार्य नीटपणें करतां येणार नाहीं. सत्य व अनत्याचार यांनीं मिळेल त्या सामर्थ्याखेरीज दुसरी कोणचीही सत्ता हातीं नसलेल्या एका पुढाऱ्याचा हा ठेवा आहे.

वरील कलमांत कार्यक्रमाचेच जे आवश्यक भाग मी सुचवले आहेत त्यात देवघेवीला व तडजोडीला मुळींच जागा नाही हें अगदीं ओघानेंच स्पष्ट होतें. म्हणून कॉंग्रेसवाल्यानीं त्यांचा निर्विकारपणें विचार करावा.

वरील सूचनाच्या गुणावरच त्यांनीं लक्ष द्यावें व माझ्या व्यक्तीविषयींच्या विचाराना रजा द्यावी आणि स्वतःच्या विवेकबुद्धीच्या निर्णयास मान द्यावा."

## मुंबई अधिवेशन [ २६ ते २८ आक्टोबर १९३४ ].

गांधींचें एकाएकीं कॉंग्रेस सोडून जाणें आणि कॉंग्रेसच्या घटनेंत बदल होण्याचा दाट संभव हीं दोन कारणे त्या वेळीं नसतीं तर मुंबईचे अधिवेशन अगदीं शुष्क व कंटाळवाणें झालें असतें. साडेतीन वर्षांनंतर हें अधिवेशन होत असल्यानेंहि एक प्रकारचा उत्साह लोकांत दिसत होता. मध्यंतरींच्या काळीं एक लहानसा पक्षाघाताचा झटका कॉंग्रेसला बसला व त्यातून सहीसलामत बाहेर आल्यानें जनतेंत थोडेसें नवचैतन्य होते. पार्लमेंटरी बोर्ड, सोशॅलिझम् व कम्युनल अवार्ड या गोष्टीही आता काहींशा गिळ्या झाल्या होत्या. जो तो निराळ्याच गोष्टींची चर्चा अधिवेशनाच्या पूर्वीच करीत होता. कॉंग्रेस यापुढे

नुसती दिखाऊ संस्था राहणार नाहीं. आता फक्त एक हजार कॉंग्रेसचे प्रतिनिधी राहणार आणि ते प्रतिनिधी अधिवेशनानंतर एकत्रित होऊन प्रांतिक कॉंग्रेस कमिटीसारखे त्याच्या एकीकरणाचें स्वरूप होणार वगैरे विचार कॉंग्रेसवाल्याच्या डोक्यांत घोळत होते. गांधींची कल्पना अशी होती कीं, प्रांतिक प्रतिनिधींनीं ऑ. इं. कॉं. कमिटींत एकदा एकत्र जमावें व कार्य-क्रम ठरविल्यावर तो पार पाडण्यासाठीं आपापल्या प्रांतांत जावें. तसेंच कॉंग्रेसचें सभासदत्व केवळ शारीरिक श्रमाच्या तत्त्वावर मिळणार होतें. त्या श्रमाचीं फळें कॉंग्रेसला अर्पण करावयाचीं व अशा रीतीनें सेवा व स्वार्थत्याग याचें प्रतीक म्हणून ते श्रम करावयाचे. सेवा व स्वार्थत्याग हीच कॉंग्रेसची भूमिका होती व प्रत्येक कॉंग्रेसभक्तानें तें कर्तव्य आपल्या दररोजच्या दिनक्रमांत एक धर्मकृत्य म्हणून पाळावयाचें. तसेंच मताधिकारासाठीं सहा महिने पटावर असण्याचीहि अट होती. वजनदार लोक आपले हेतु साधून घेण्या-साठीं मतदानाच्या वेळीं वाटेल त्याचें सभासदत्व पैदा करीत व मतें मिळवीत त्या प्रकारास आळा घालण्यासाठीं ही अट होती. नंतर अध्यक्ष हा जणूं काय प्रधानमंडळाचाच अध्यक्ष असणार व तें प्रधानमंडळ त्यानेच निवडलेलें असणार. नेहमीं खादी वापरण्याचीहि अट होतीच. कॉंग्रेसचें ध्येय संदिग्ध असल्यानें त्याचे हजारों अर्थ उत्पन्न होतात ते काढून टाकण्यासाठीं शांतता-मय व न्याय्य शब्दाऐवजीं सत्यमय व अनत्याचारी मार्ग हे शब्द घालून त्या मार्गाशीं आपली अचल निष्ठा कॉंग्रेसनें नमूद करावी असें गांधींचें म्हणणें होतें. या नवीन विचारप्रवाहामुळें अधिवेशनापूर्वी व अधिवेशनाचे वेळींहि वादळें उत्पन्न झालीं. परंतु तुफानाच्या वेळीं गांधींइतकें मनःस्वास्थ्य व कार्यतत्परता दुसऱ्या कोणाही व्यक्तीच्या ठिकाणीं नसते. तुफान गर्दीच्या वेळीं गांधी आपले मन.स्वास्थ्य व कल्पकता एकत्रित करतात आणि पराजयाच्या वाता-वरणांत विजयाला वाट काढतात. हें करतांना कांहीं कल्पत्या आणि डावपेंच त्याना करावे लागत नाहींत. सत्य व अनत्याचार हा एकच डाव सर्व आयुष्यभर ते खेळत आले आहेत. आपल्या उपसूचनात घटनात्मक सूचना सत्याग्रहविषयक सूचनांपासून त्यांनीं निराळ्या काढल्या होत्या. सत्याग्रही सूचनाचा विचार वर्किंग कमिटीनें आपल्या मतास वाटेल तसा करावयाचा होता आणि घटनात्मक सूचना ते स्वतः पुढें मांडणार होते आणि नवे अध्यक्ष व त्यांचे सहकारी याचा विश्वास ते अजमावून पहाणार होते.

परंतु अनपेक्षितपणें नसलें तरी आश्चर्यकारक रीतीनें वर्किंग कमिटीनें गांधींच्या दोन्ही प्रकारच्या सूचना सोइस्कर फेरफार करून मान्य केल्या व कॉंग्रेसमध्येंही त्या सूचनांचा मथितार्थ गांधींचेंही समाधान होण्याइतका मान्य झाला.

ध्येयामधील फरक करण्याची सूचना प्रांताप्रांतांत प्रसृत करणें जरूर होतें आणि त्याचा निर्णय आतां १९३६ सालच्या अधिवेशनात होणार आहे. श्रमाच्या लायकीवर असलेला मताधिकार मान्य झाला आणि नेहमीं खादी वापरण्याच्या सूचनेलाही दुजोरा मिळाला. कॉंग्रेसच्या प्रतिनिधींची संख्या दोन हजारपर्यंत उतरविण्यांत आली आणि खेडेगावें व शहरें याच्यात त्यांची वांटणी अनुक्रमे १४८९ व ५११ अशी करण्यांत आली. ऑ. इं. कॉं. कमिटीच्या सभासदांची संख्या निमपट करण्यात आली व दर हजार मतदारास एक प्रतिनिधि असें गांधींनीं सुचविलेलें प्रमाण होतें, त्याऐवजीं पांचशें मतदारास एक प्रतिनिधि असें प्रमाण ठरविण्यात आलें. याप्रमाणें प्रतिनिधि हे यापुढें नुसते प्रेक्षक म्हणून जमणार नव्हते तर राष्ट्राचे खरे प्रतिनिधि म्हणून जमणार होते व राष्ट्रीय सभेचें कार्यकारीमंडळ निवडण्याचे कामीं त्याना या अधिवेशनात करावयाचें होतें.

कॉंग्रेसपुढे मुख्य प्रश्न असा होता कीं, घटनेंत बदल कां करावा, तो आताच का करावा, आणि गांधी कॉंग्रेस सोडीत असताच तो का करावा. ज्या कॉंग्रेसचें सेनानायकत्व गेलीं १४ वर्षे गांधींनीं पत्करलें होतें, त्या कॉंग्रेसमध्यें कांहीं चुका होत असल्यास त्या सांगणें हें गांधींचें कर्तव्यच होतें. तसेंच शांततेच्या काळांत आपल्या परिस्थितीची पहाणी करून भावी संकटासाठीं तरतूद करणें हें कॉंग्रेसचेंही कर्तव्य होतें.

नवीन घटना, पार्लमेंटरी बोर्डाच्या जुन्याच घटनेला संमती विधायक कार्यक्रम, जातीय निवाडा एवढ्याच त्या वर्षीच्या महत्त्वाच्या घडामोडी होत्या, असें मानता येणार नाहीं. वरील गोष्टी या निःसंशय महत्त्वाच्या प्रगतिपर घडामोडी आहेतच. परंतु याहीपेक्षा महत्त्वाच्या घडामोडी त्या वर्षी झाल्या. यातली एक मुख्य म्हणजे ऑल इंडिया व्हिलेज इंडस्ट्रीज् असोसिएशन ( अखिल भारतीय ग्रामोद्योग संघ ) या संस्थेची स्थापना. या संघाचें कार्य गांधींच्या उपदेशाप्रमाणें व नेतृत्वाखालीं चालणार आहे. आणि राजकारणापासून तो पूर्णपणें अलिप्त आहे. खादी कार्यक्रमाची ही

तात्त्विक परिपूर्तीच आहे. कारण ग्रामोद्योगांपैकीं खादी. एक प्रमुख व्यवसाय आहे व त्यानें खेडे व देश स्वयंपूर्ण होतात. कला व हुन्नर हीं राष्ट्राच्या संस्कृतीचीं मुख्य चिन्हें आहेत.

शास्त्रीय ज्ञान हे सर्व जगाच्या मालकीचें आहे. कारण ज्ञान ही सर्वांची समाधिक संपत्ति आहे. परतु कला व हुन्नर यात राष्ट्राचा आत्मा प्रगट होतो व तीं नामशेष झालीं कीं राष्ट्राचें व्यक्तित्वच नाहींसें होतें. मग राष्ट्र प्राणिशास्त्रदृष्ट्या जिवंत राहिलें तरी त्याची उत्पादनशक्ति नाहींशीच झालेली असणार व ती कधींही परत येत नसते ! म्हणून खेडेगावातील मृतप्राय व्यवसायाचें पुनरुज्जीवन करण्याची गाधींची योजना ही संस्कृति पुनरुज्जीवनाचीच चळवळ होती. त्याने हिंदुस्थानाचें आर्थिक वैभव व राष्ट्रीय शिक्षण याचाही उद्धार होणार होता. संपत्तीचे गगनचुंबी ढीग उभे करण्याचा गांधींचा हेतु नाहीं किंवा महासागरावर व्यापारी आक्रमण करण्याचाही हेतु नाहीं तर अर्धपोटीं हिंदी मजुरांच्या भाकरीवर थोडेसें लोणी पडून ती मऊ व्हावी एवढाच हेतु आहे. आखिल भारतीय चरखासंघ व अखिल भारतीय ग्रामोद्योग संघ या संस्थांच्या द्वारें ते ध्येय गांठण्याचा त्याचा हेतु आहे.

गाधींनीं कॉंग्रेसमधून जाण्याचा आपला निश्चय स्पष्टपणें जाहीर केला होता तरी तो शब्दशः खरा होईल असें त्यांच्या शत्रूंना किंवा मित्रानाहीं वाटले नव्हतें. परंतु गांधी बोलतात ते करतात व करावयाचें तेंच बोलतात हें अनुभवास येण्यास फार वेळ लागला नाहीं. आपले शब्द अक्षरशः लोकांनीं खरे मानावेत हेंच तर त्यांना नेहमीं पाहिजे असतें.

त्यांचा हा निश्चय ही नुसती लहर नव्हती. तर त्याच्या मागें एक प्रवृत्ति होती. १९२९ सालीं हे अनुभवास आलें होतें. त्यानीं लाहोरच्या अधिवेशनाचे अध्यक्षस्थान स्वीकारावें, जवाहरलालना तें देऊं नये अशी सर्व लोकाची तीव्र इच्छा त्यासालीं होती. त्या वेळींही गांधींनीं एकदां ठरवलें तेंच शेवटास नेलें.तोच अनुभव मुंबईस आला.कॉंग्रेसचे साधे सभासदसुद्धां ते राहणार नाहींत ही बातमी ऐकून व वाचून तर लोक स्तंभितच झाले. तरी सुद्धां ते जाताना त्याच्याबद्दल पूर्ण विश्वासाचा ठराव कॉंग्रेसनें पास केला व पुन्हां येण्याचें त्याना सन्मानपूर्वक आमंत्रणहि देऊन ठेवलें. कॉंग्रेसनें आपली इच्छा पूर्ण होण्याची पात्रता दाखवावयाची होती. आपलें शुद्धीकरण करणें जरूर

होतें व शुद्धता, कळकळ व प्रामाणिकपणा म्हणजेच खादी व कॉंग्रेस इतकें ऐक्य उत्पन्न करावयास पाहिजे होतें. आणि तसें होण्यासाठीं कॉंग्रेसमधील सुज्ञ लोकांनीं आपण कोणच्याही स्वार्थी हेतूनें प्रेरित झालो नसून सेवा व स्वार्थत्याग हाच आपला एकमेव हेतू आहे, हें आपल्या पुढाऱ्याना पटविणें जरूर होतें. ते ध्येय गांठण्यासाठीं दररोज श्रम करून महिन्यातून ८ तास तरी खपून त्या श्रमाचे फळ कॉंग्रेसला अर्पण करणें हाच एक मार्ग ठरवावयास पाहिजे होता. या मार्गानें कॉंग्रेसनें सोशालिस्टाचा हल्ला परतविण्याचा प्रयत्न केला असा या अटीचा कांहीं लोकानीं गैर-अर्थ केला. परंतु तसा तो नाहीं. गरीब शेतकरी व मजूर याची सेवा व शारीरिक श्रमाचें तत्त्व हें गेल्या १४ वर्षे कॉंग्रेसचें ब्रीदवाक्य आहे. कॉंग्रेसचा दृष्टिकोण सोशालिस्टासारखाच आहे. खादी, ग्रामोद्योग, सत्य, अनत्याचार हीं देशाचें ध्येय गाठण्यासाठीं दैनिक कार्यक्रमात एक आवश्यक भाग म्हणून मान्य करण्याची जर सोशालिस्टाची तयारी असेल तर सोशालिस्ट जितकें कॉंग्रेसवाले आहेत तितकीच कॉंग्रेसही सोशालिस्ट होईल आणि खरें पाहिलें तर ज्यानें आपली संपत्तिच नव्हे तर रक्ताची नातीसुद्धा तोडून टाकलीं त्या महात्मा गांधींपेक्षा खरा सोशालिस्ट कोण आहे ? म्हणून श्रमावर मताधिकार हें तत्त्व सोशालिझमचा नुसता देखावा नाहीं तर कॉंग्रेसभक्ताच्या दैनिक आयुष्यात वावरणारें सोशॅलिझमचें तें तत्त्व आहे.

गांधी पुढें काय करणार हा प्रश्न मुंबईच्या अधिवेशनात सर्वत्र दुमदुमत होता. गांधींनीं राजकारण सोडलें काय ? आणि गांधी बाहेर गेल्यावर जर त्याच्या बरोबरच चरखासंघ व ग्रामोद्योगसंघ याही संस्था कॉंग्रेसमधून गेल्या तर कॉंग्रेस कोणचें राजकीय कार्य करणार ? असे प्रश्न जनतेपुढें वावरत होते. जर सत्याग्रही समजतात त्याप्रमाणें कॉंग्रेसचा विधायक कार्यक्रम मुख्यतः राजकीय स्वरूपाचाच असला तर गांधींनीं मुंबई अधिवेशनानंतर राजकारण सोडलें असें होत नाहीं. कारण सविनय कायदेभंगाचा वैयक्तिक हक्क त्यांनीं कॉंग्रेसच्या ठरावाप्रमाणेंच आपल्याकडे ठेवलाच होता. म्हणजे त्यानीं राजकारण सोडलें तर नाहींच पण उलट विधायक व विध्वंसक अशा दोन्ही मार्गांचें राजकारण आपल्याबरोबरच घेतलें आहे. अशा स्थितींत कॉंग्रेसच्या हातीं काय राहिलें असाच प्रश्न उत्पन्न होतो. विधायक कार्यक्रम नेहमीं आहेच आणि कॉंग्रेसबाहेर असलेल्याच्याच सहाय्यानें तो कार्यक्रम नेहमीं पूर्ण केला जातो. आणि विधायक

कार्यक्रमसुद्धा कॉंग्रेसच्या हातींच आहे. कारण सविनय कायदेभंगाची चळवळ केव्हाही सुरू करण्याचा अधिकार कॉंग्रेसने आपल्याकडे ठेवलाच आहे. सविनय कायदेभंगात भाग घेऊन यातना सहन करणाऱ्याचें कॉंग्रेसनें अभिनंदन केले. यात स्वराज्यसाधन या दृष्टीने क्रांतिकारकाच्या मार्गापेक्षा अनत्याचार आणि सविनय कायदेभंग यावर आपला जास्त विश्वास आहे हेच कॉंग्रेसनें दाखवले आहे. गांधी ही काँग्रेसमधील फार महान् शक्ति आहे. ही महान् शक्ति आता कॉंग्रेसमधून जात होती. पिता वानप्रस्थाश्रमीं जाताना मुलावर सर्व भार पडतो खरा, परंतु त्यामुळे मुलाचें सामर्थ्य जबाबदारीमुळें वाढतच जातें, तसें गांधींच्या मागें कॉंग्रेसचें सामर्थ्य स्वावलंबनानें वाढेल. आणि जेव्हा गांधी बाहेर गेल्यावरही कॉंग्रेसला जरूर पडेल तेव्हा मार्ग दाखवावयास तयार आहेतच, तेव्हा कॉंग्रेसला स्वावलंबनाचे सामर्थ्य सुखरूपणें मिळविणे शक्य झालें आहे. राष्ट्रीय सभा हें देशातलें एक शक्तिकेंद्र व्हावें अशीच गांधींची इच्छा आहे. संस्था हें सामर्थ्याचें गमक नाहीं तर संस्था तयार करणाऱ्या व्यक्तींच्या नैतिक सामर्थ्यावर संस्थेचें सामर्थ्य अवलंबून असते. आणि हें सामर्थ्य जबाबदारीच्या जाणिवेबरोबर वाढत जातें. आपल्या अटी पाळल्या गेल्याबरोबर गांधी केव्हाही परत कॉंग्रेसमध्यें येण्यास तयार आहेतच. कॉंग्रेसनें आपल्या कार्याचें स्वरूप व्यवस्थित करावें. सचोटीचे सभासद मिळवावेत आणि संख्येनें थोडे असले तरी कामाची खूप कळकळ असलेले अशा लोकांचीं कार्यकारी मंडळें तयार करावींत. त्या कार्यकारी मंडळानीं वर्षभर कार्य करीत रहावें, त्यामुळें कॉंग्रेसचें शुद्धीकरणच होईलच. असें पुनरुज्जीवन व शुद्धीकरण झालें कीं, गांधी पुन्हा कॉंग्रेसचें नेतृत्व पत्करावयास तयारच आहेत. गांधी हे एका नव्या कॉंग्रेसचे संस्थापक आहेत. आणि ती नवी कॉंग्रेस सेवाधर्माचें आचरण करणारी आहे, सत्ता गाजवणारी नाहीं. गांधींनीं सार्वजनिक आयुष्याची व्याप्ति खेडेगावापर्यंत पोहोंचविली आहे आणि हिंदुस्थानातील खेडीं ही राष्ट्रीय प्रवृत्तीस मुख्य आधार करून टाकलीं आहेत. राजकारणाचा अर्थ त्यांनीं इतका व्यापक केला कीं, त्यात राष्ट्रीय प्रवृत्तींचीं सर्व स्वरूपें समाविष्ट होतात. राष्ट्राला त्यानीं ध्येय, ध्वजा व धुरीण इतक्या गोष्टी मिळवून दिल्या. गांधी आज सेवानिवृत्त झाले असले तरी पहिले भारतसेवक म्हणून त्यांचें स्थान तेथें कायमच आहे. ज्यानीं

अत्यंत उदात्त तत्त्वें काँग्रेसच्या कार्यांत प्रसृत केलीं व त्या तत्त्वानुसार राष्ट्राच्या भवितव्याला वळण लावलें असे ते आद्य भारतसेवक आहेत.

बाबू राजेंद्रप्रसाद हे मुंबई अधिवेशनाचे अध्यक्ष होते व त्याच्या व्यक्तिनिष्ठ गुणामुळें मुंबईच्या अधिवेशनास बरेंच यश मिळालें. त्यांनीं अध्यक्षपदावरून काँग्रेसला जो संदेश सांगितला त्याचें राजकीय वातावरणावर चिरस्मरणीय संस्कार झाले आहेत. श्वेतपत्रिकेवर त्यांनीं केलेली टीका मुद्देसूद व सविस्तर होती आणि काँग्रेसच्या कार्यक्रमाविषयींचे त्याच विचार फार उद्‌बोधक होते. आपल्या छोट्या पण परिणामकारक भाषणाचा समारोप करताना अध्यक्ष म्हणाले:—

हिंदुस्थानात स्वातंत्र्याची चळवळ ज्यासाठीं चालू आहे त्या चळवळीचा संपूर्ण स्वातंत्र्य हा अगदीं नैसर्गिक परिणाम आहे. तें स्वातंत्र्य म्हणजे एकलकोंडेपणा नव्हे. तें स्वातंत्र्य असहकाराच्या मार्गानें मिळवावयाचें आहे हें लक्ष्यात घेतलें पाहिजे. एका देशानें दुसऱ्या देशाची व एकाच देशातील एका लोकसमूहानें दुसऱ्या लोकसमूहाची चालविलेली लूट थांबवणें म्हणजेच संपूर्ण स्वातंत्र्य इतर राष्ट्रांशीं परस्पराच्या हितासाठीं सलोख्याचें नातें जोडणें हे त्या स्वातंत्र्याचें उद्दिष्ट आहे. त्यात कोणाच्याही अहितासाठीं प्रयत्न करावयाचे नाहींत. लूटमार करणाऱ्याचेंही अहित त्यात चिंतावयाचें नाहीं. सदिच्छेपेक्षा अपहरणावरच ज्याचा जोर आहे त्याच्याखेरीज इतरांशीं त्या स्वातंत्र्यात वितुष्ट माजवावयाचें नाहीं. हे स्वातंत्र्य अनत्याचारावर आधिष्ठित झालें आहे. अनत्याचाराचा जगाच्या मतावर कसा परिणाम होत आहे हें आपणास दिसूं लागलें आहे. हा परिणाम अपरिहार्य झाला पाहिजे. भीतीमधून उत्पन्न होणारा अविश्वास व संशय हीं नाहींशी होऊन त्या ऐवजीं हिंदुस्थानच्या हिताबद्दल सदिच्छा व त्यातून व्यक्त होणारी सुरक्षितता जगास वाटूं लागली पाहिजेत. हिंदुस्थानला दुसऱ्याचें काहींही घ्यावयाचें नाहीं त्यामुळें परकीयापासून संरक्षण करण्यासाठीं किंवा अंतःस्थ शांतता टिकविण्यासाठीं अफाट सैन्य ठेवण्याची जरूरच उत्पन्न होणार नाहीं. कारण हिंदी रहिवाशाच्या सद्भावनामुळें अंतर्गत शांतता हमखास नेहमीं नांदत राहील. दुसऱ्याच्या अपहाराची इच्छा नसल्यानें परचक्रापासूनही हिंदुस्थान अलिप्तच राहील आणि एकंदर जागतिक

कल्याणाच्या भूमिकेवर हिंदुस्थानचे संरक्षण टिकून राहील या दृष्टीनें विचार केला तर आमच्या स्वातंत्र्याची ब्रिटिशानासुद्धा दहशत बसण्याचें कारण नाहीं. जर चालू अनैसर्गिक परिस्थिति अशीच टिकवून धरण्याचा त्यांचा अट्टाहास असेल तर मात्र गोष्ट निराळी.

आमचे मार्ग सूर्यप्रकाशाइतके स्पष्ट आहेत. सामुदायिक स्वरूपाचा अनत्याचार हाच तो मार्ग. एकदा दोनदां आमचा पराभवही होईल, परंतु आज ना उद्या आम्ही यशस्वी होणारच.

आतापर्यंत पुष्कळानीं आपलें जीवित व सर्वस्व अर्पण करून टाकलें आहे. स्वातंत्र्याच्या युद्धात कित्येकांनीं आत्मार्पण केलें आहे. आपणाला अडवणाऱ्या संकटांनीं आपण कुंठित होतां कामा नये किंवा भीतीमुळें अथवा बेभानपणानें आपण आपल्या धोपट मार्गापासून इतस्ततः बहकतां कामा नये. आपणाजवळ असामान्य हत्यारें आहेत आणि आपल्या प्रयोगाच्या फलश्रुतीकडे जगाचें डोळे लागले आहेत. आपण आपल्या ध्येयाशीं एकनिष्ठ राहूं या व आपले निश्चय अचल ठेवूं या. सत्याग्रहाच्या बाह्य स्वरूपात कदाचित् पराभवाचे प्रसंग आल्यासारखे दिसतील परंतु सत्याग्रहाला अपजय माहीत नाहीं. सत्याग्रह फक्त विजयच मिळवितो. सत्याग्रह हाच एक स्वयंसिद्ध विजय आहे.

जेम्स लॉवेलनें म्हटले आहे--

Truth for ever on the scaffold
Wrong for ever on the throne
Yet that scaffold sways the future
And behind the dim unknown
Standeth God within the shadow
Keeping watch above his own.

**Truth for ever—**

सत्य सदा फासावर दिसतें असत्य सिंहासनीं ।
सत्य परी उजाळिते भविष्या ईश तया रक्षणीं ।
ज्ञाताच्या परि पल्याड राहुनि छायेपरि भासतो ।
सद्भक्तावरि नजर ठेवुनी अंतरिं तो राहतो ।

मुंबई अधिवेशन बाबू राजेंद्रप्रसाद यांच्या अध्यक्षत्वाखालीं व श्री. के. एफ्. नरीमन याच्या स्वागताध्यत्वाखालीं २६ ते २८ आक्टोबर १९३४ रोजीं झाले. त्यात पास झालेल्या ठरावाचा साराश खालीं दिला आहे:—

सुरवातीस वर्किंग कमिटीने मे १९३४ सालीं पास केलेल्या ठरावास मान्यता देण्यात आली. आणि त्यातही विशेषत: पार्लमेंटरी बोर्ड, त्याचे धोरण व योजना, विधायक कार्यक्रम, परदेशातील हिंदी रहिवाशाची स्थिति, दुखवट्याचे ठराव व स्वदेशीचे ठराव याना काँग्रेसनें दुजोरा दिला.

शहरातून व खेड्यातून जे हजारों स्त्रीपुरुष सविनय प्रतिकारक म्हणून पुढें आले व ज्यानीं अनंत यातना धैर्याने सहन केल्या व वीरास शोभेसा आत्मत्याग केला त्याच्याबद्दल काँग्रेसनें राष्ट्रास धन्यवाद दिले. अनत्याचारी असहकारिता व सविनय कायदेभंग या दोन मार्गाखेरीज राष्ट्रात एवढी प्रचंड जागृति कधींही झाली नसती हेंही काँग्रेसनें नमूद केलें. गांधी खेरीज इतरानीं सविनय कायदेभंगाची चळवळ थांबविणें जरूर आहे हें सागून काँग्रेसनें पुढें असें स्पष्ट जाहीर केलें कीं, अनत्याचारी असहकारिता व सविनय कायदेभंग याखेरीज स्वराज्यप्राप्तीस जास्त उपयुक्त साधनें नाहीत आणि हीं साधनें अत्याचारी मार्गापेक्षा जास्त उपयुक्त आहेत असा आमचा दृढ विश्वास आहे.

अखिल भारतीय ग्रामोद्योगसंघाबद्दल पुष्कळ चर्चा झाली व खालील लांबलचक ठराव पास झाला —

काँग्रेसवाल्याच्या सहाय्यानें किंवा सहाय्याखेरीजही सर्व देशभर स्वदेशीचा प्रसार या नावाखालीं सर्वत्र चळवळी सुरू आहेत, त्यामुळें स्वदेशीच्या कल्पनेबद्दल लोकाच्या मनात गोंधळ माजला आहे. सामान्य जनतेशीं प्रगतिपर मार्गानीं एकजीव होत जाणें हें काँग्रेसचें मूळपासूनचें ध्येय आहे. खेड्याचें पुनरुज्जीवन आणि पुनर्घटना हीं विधायक कार्यक्रमाचा एक भाग आहेत व या कार्यक्रमातच, हातसुताच्या मुख्य व्यवसायाखेरीज मृत किंवा मृतप्राय झालेल्या ग्रामोद्योगाचें पुनरुज्जीवन याचाही समावेश होतो. हें कार्य हातसुताच्या व्यवसायाप्रमाणेंच कोणच्याही राजकीय चळवळीपासून अलिप्त राहून एकोप्यानें केंद्रीभूत प्रयत्न करूनच होणारें आहे. म्हणून श्री. जे. सी. कुमाराप्पा यानीं गांधींच्या अनुरोधानें ऑ. इं. व्हिलेज इंडस्ट्रिज् असोसिएशन काढावी

असा त्यांना ही कॉंग्रेस अधिकार देत आहे. ती संस्था कॉंग्रेसच्याच कार्याचा एक भाग असावी. त्या संस्थेला स्वत:ची घटना करण्याचा, फंड उभारण्याचा आणि आपला उद्देश साधण्यासाठीं आवश्यक त्या गोष्टी करण्याचा अधिकार आहे. प्रदर्शनें व मिरवणुकी याबद्दल खालील ठराव त्याच अनुषंगानें पास झाला:—

प्रदर्शनें व एकंदर बाह्य देखावा या गोष्टी कॉंग्रेसच्या वार्षिक अधिवेशनाच्या वेळीं करण्याचा खर्च व खटाटोप स्वागतकमिटीला करावा लागतो. त्यातून स्वागतकमिटीची सोडवणूक होणें जरूर आहे. दुसरें असें कीं वरील गोष्टींमुळेंच लहानसहान गावात अधिवेशनें भरविणें अशक्य होतें. म्हणून या सर्व कामातून स्वागतकमिटीची यापुढें मुक्तता झाली आहे व हीं कामें घडवून आणण्याची जबाबदारी चरखा व ग्रामोद्योगसंघ यावर असावी. या संस्थांनीं वरील कार्यें हातीं घेऊन सामान्य जनतेला विशेषतः ग्रामवासी जनतेला मार्गदर्शक व मनोरंजक व लोकप्रियही करावींत, आणि ग्रामवासीयांचेंसुद्धा सामर्थ्य राष्ट्रापुढें नजरेस आणावें.

पार्लमेंटरी बोर्डाबद्दल बरीच भवति न भवति झाली. बोर्डाचेंच असें मत पडलें कीं, हें बोर्ड काहीं प्रासंगिक जरूरीसाठीं उभारले आहे त्याअर्थी तें एक वर्षापुरतेंच असावें आणि म्हणून निवडणुकीच्या पद्धतीनें त्याची घटना व्हावी. बोर्डानें आपलें हें म्हणणें वर्किंग कमिटीकडे मान्यतेकरता पाठविलें व कांग्रेसनें वर्किंगकमिटीची शिफारस मान्य केली. आणि चालू बोर्डाची मुदत १ मे १९३५ पर्यंत ठरविण्यात आली. त्यानंतर ऑ. इं. का. कमिटीनें २५ सभासदांची निवडणूक करावी. त्या निवडलेल्या सभासदाच्या बोर्डाला ५ सभासदापर्यंत जादा सभासद जोडून घेण्याचा अधिकार असावा असें ठरलें.

कॉंग्रेसच्या प्रत्येक अधिवेशनाच्या वेळीं नवें पार्लमेंटरी बोर्ड निवडावें व त्यास जादा सभासद जोडून घेण्याचे पूर्वीप्रमाणेंच अधिकार असावेत. निवडलेल्या सभासदाच्या बोर्डाला हल्लीं असलेल्या बोर्डासारखेच सर्व अधिकार ठेवले होते.

खादीच्या अटीबद्दल खालील निराळा ठराव पास करण्यात आला.—

" संपूर्ण हातसुताची व हातविणीची खादी नेहमीं वापरणारा असल्या-

खेरीज कोणच्याही जागेसाठीं किंवा कमिटीसाठीं निवडणुकीस उभे राहतां येणार नाही."

श्रमाधिष्ठित मताधिकाराची खालील अट पहिल्या प्रथमच काँग्रेसने मान्य केली:—

काँग्रेस कमेटीच्या कोणच्याही जागेच्या निवडणुकीसाठीं उमेदवार असलेला स्त्री किंवा पुरुष नाव नोंदवण्याच्या तारखेपूर्वी ६ महिने काहीं तरी शारीरिक श्रम करीत असलेला पाहिजे. ते शारीरिक श्रम म्हणजे काँग्रेसकरिता किंवा काँग्रेसच्या वतीनें १० नंबरापेक्षा जास्त नंबरचें सूत दर महिन्यास ५०० यार्ड इतकें व महिन्यात साधारणपणें ८ तास श्रम करून काढलेले असें असावें. सूत काढण्याच्या कामाऐवजीं इतर कोणच्या स्वरूपाचे श्रम मान्य ठरतील तें प्रांतिक काँग्रेस कमिटी व आखिल भारतीय ग्रामोद्योगसंघ यांच्या संमतीनें वर्किंग कमिटी ठरवील.

गाधीजींच्या जाण्याबद्दलही एक ठराव झाला. त्यात गांधींना आपल्या निश्चयाचा पुन्हा एकदा फेरविचार करण्याविषयीं त्याना विनंति करण्यांत आली. आणि नंतर असें नमूद करण्यांत आलें कीं, ज्या अर्थी त्यांचें मन वळविण्याचे सर्व प्रयत्न फोल झाले आहेत त्या अर्थी राष्ट्रीय सभा अत्यंत नाखुषीनें त्यांचा निर्णय स्वीकारीत आहे. त्यानीं केलेल्या अपूर्व राष्ट्रसेवेचा मुद्दाम उल्लेख करून उपदेश करण्याच्या व मार्ग दाखविण्याच्या त्याच्या आश्वासनाबद्दल राष्ट्रीय सभेनें अत्यंत संतोष व्यक्त केला.

संयुक्त प्राताने दिलेलें पुढील अधिवेशनाचें आमंत्रण स्वीकारण्यांत आलें.

मुंबईचें अधिवेशन आटोपल्याबरोबर सर्व राष्ट्रभर असेंब्लीच्या निवडणुकीची धादल सुरूं झाली.

## सर्व जागांकरितां उमेद्वार उभे केले.

प्रत्येक जिल्ह्यात व प्रत्येक तालुक्यात दौरे सुरु झाले. शैक्षणिक व प्रचारक स्वरूपाची मोहिम सर्वत्र सुरु झाली. पंडित मालवीय व श्री. अणे याच्या नेतृत्वाखालीं काँग्रेस नॅशनॅलिस्ट पक्षाचे उमेदवार उभे राहिले. सर आर के. षण्मुखम् चेट्टी हे ज्या जागेसाठीं उभे होते त्या जागेकडे लोकाचें फार लक्ष वेधलें होतें. हिंदुस्थानांतील व्यापारी उमेदवाराची ती जागा होती. साम्राज्याला सवलती मिळाव्या अशा तऱ्हेची व्यापारी नातीं जोडण्यासाठीं सरकारनें श्री.

षण्मुखम् चेट्टी यांना ओटावा येथे पाठविले होतें. आणि ते परत आल्यावर असेंब्लीचे अध्यक्ष झाल. मद्रास सरकार व हिंदुस्थान सरकार यांचा त्यांना पाठिंबा होताच. कॉंग्रेसनें स्वामी वेंकटाचलम् चेट्टी याना त्याच जागेसाठीं उभे केलें होतें. आणि शेवटी कॉंग्रेसच्या उमेदवारानें सरकारी उमेदवारावर प्रचंड जय मिळविला. नैतिक सामर्थ्याचा आर्थिक व भौतिक सामर्थ्यावरच हा विजय होता. मद्रासने सर्व जागा काबीज केल्या कॉंग्रेसने एकंदर ११ च्या ११ प्रांतिक जागा प्रचंड बहुमताने मिळविल्या.संयुक्त प्रांताने सर्वसामान्य जागा पट- कावल्या. बंगालमध्ये नॅशनॅलिस्टांनीं तेच केले. उलट सं.प्रांतांत तर एक मुसलमान उमेदवारखुद्धां कॉंग्रेस पक्षांत विजयी झाला. वऱ्हाड, मध्यप्रांत, महाराष्ट्र, गुजराथ, कर्नाटक आणि आसाम येथेंही कॉंग्रेसचा पूर्ण जय झाला. पंजाबमध्यें मात्र कॉंग्रेसचा एकच उमेदवार निवडून आला. एकंदर कॉंग्रेसनें ४४ जागा मिळविल्या. कॉंग्रेस नॅशनॅलिस्टांचे उमेदवार निराळेच होते. त्याच्यात व कॉंग्रेसमध्ये कम्युनल अवार्डविषयींचा निकाल हेंच मतभेदाचें कारण होतें. बाकी सर्व मुद्यांवर एकी होती. कॉंग्रेसनें टी. ए. शेरवाणी याना अध्यक्षपदाकरतां उभें केलें पण ते यशस्वी झाले नाहींत. कॉंग्रेसच्या विजयी झालेल्या उमेदवारापैकीं तीन उमेदवार निवड झाल्यावर मरण पावले. ते म्हणजे श्री. अभ्यंकर,शेरवाणी आणि सासमल हे होत, श्री. सासमल हे नॅशनॅ- लिस्ट पक्षाचे होते. वरील तिन्ही गृहस्थ ऐन तारुण्यात निघून गेले. देशाची त्यानीं बहुमोल सेवा केली होती.

२१जानेवारी रोजीं असेंब्लीला सुरवात झाली व काँग्रेसचेही कार्य सुरू झालें. श्री शरश्चंद्र बोस हे स्थानबद्ध कैदी होते. ते असेंब्लींत आता विनाविरोध निवडून आले होते. सरकारनें असेंब्लीत हजर राहण्याची त्याना परवानगी दिली नाहीं त्याबद्दलची उपसूचना ५८ विरुद्ध ५४ मतानीं पास झाली काँग्रेस पक्षाचें नेतृत्व श्री. भुलाभाई देसाई याच्याकडे होते. श्री. देसाईनीं पं. मोतिलालजी प्रमाणें असेंब्लींत दरारा व वैभव उत्पन्न केलें.-ते स्वत. मुंबईला ॲडव्होकेट जनरल होते.त्याच्या वकिलीच्या व्यवसायातील अत्युच्च स्थान मिळविण्याचा त्याचा अधिकार होता.

कॉंग्रेसनें असेंब्लींत दुसरा हल्ला हिंदी-ब्रिटिश व्यापारी करारावर केला. तो करार रद्द करण्याचा ठराव ६६ विरुद्ध ५८ मतानीं पास झाला. भारतमंत्री व प्रधानमंडळातील बोर्ड ऑफ ट्रेडचे सेक्रेटरी यांच्यातच तो करार झाला

होता. हिंदुस्थानांतील व्यापाराची लूट वाटून घेण्याचे प्रधान मंडळातील सदस्यानीं ठरवलें आणि त्या कराराला इंडो-ब्रिटिश ट्रेड ॲग्रीमेंट असें भारदस्त नाव ठेवून दिलें. नवीन सुधारणेंत ज्या काहीं व्यापारी संरक्षणांची शिफारस जॉईंट पार्लमेंटरी कमिटीकडून होणार होती त्याची हा करार म्हणजे एक प्रस्तावनाच होती. त्या करारात असें स्पष्ट नमूद केलें होतें कीं, हिंदी उद्योगधंद्याना जें संरक्षण द्यावयाचें तें आयात मालावर ठरवावें.तो आयात माल हिंदुस्तानात तयार झाला असेल तर ज्या किंमतीला विकला जाईल त्या किंमतीइतकेंच संरक्षण हिंदी उद्योगधंद्याना द्यावें आणि तसेंच ब्रिटिश साम्राज्यात तयार झालेल्या मालावर शक्य तोंवर कमी कर-लादावेत. साम्राज्यांतर्गत माल व बाहेरील माल याच्या करारामधील फरक हा साम्राज्यातर्गत मालास कधींही नुकसानकारक होता कामा नये. ज्या ज्या वेळीं एखाद्या हिंदी उद्योगधंद्याला सरक्षण देण्याचा प्रश्न टॅरिफ बोर्डापुढें येईल त्या वेळीं युनायटेड किंगडममधील तो धंदा करणाऱ्या कारखानदाराचेंही म्हणणें ऐकून घेण्यास हिं. सरकार संधि देईल. हिंदुस्थानात जें लोखंड व पोलाद येतें त्यावर असलेले कर जोंपर्यंत साम्राज्यहिताला जास्त विघातक होत नाहींत तोंपर्यंत हिंदुस्थानातून ब्रिटिश साम्राज्यात जाणाऱ्या लोखंडावरील कराची माफी चालू राहील. या असामान्य करारावर ३० जाने. १९३५ रोजीं सह्या झाल्या आणि असेंब्लीकडून त्या कराराची मागें सागितल्याप्रमाणें तावडतोब संभावनाही झालीच. खुदाई खिदमतगारावरील बंदी उठविण्याची सूचना ७४ विरुद्ध ४६ मतानीं पास झाली. सरकारचे कर बसाविण्याचें धोरण हा पुढला वादाचा मुद्दा होता. आणि त्याच्या मागोमाग सयामांतील तादूळ व इतर २५-३० लहान मोठे विषय निघाले.

श्वेतपत्रिकेची बेडकी आता या वेळपर्यंत जाइंट पार्लमेंटरी कमिटी रिपोर्ट होण्याइतकी फुगली होती. दोन्ही सभातून पास होऊन तो कायदे बुकान नोंदला गेला होता. त्या रिपोर्टावर असेंब्लींत झालेला ठराव व चर्चा थोड-क्यात खालीं दिली आहे.

प्रातिक कौन्सिलानीं जॉ. पा. कमिटी रिपोर्टावर ज्या पद्धतीनें चर्चा केली

तापेक्षा निराळ्याच पद्धतीनें असेंब्लींत झालें. प्रांतिक कौन्सिलांत सरकारी सभासदांनीं चर्चेत मुळींच भाग घेतला नाहीं. त्यामुळें फक्त हिंदी मतेंच व्यक्त झालीं. असेंब्लींत वादविवादांत भाग घेण्याचें व रिपोर्टाविषयीं आपण मांडलेल्या ठरावाच्या उपसूचना व दुरुस्त्या याच्याविरुद्ध मतें देण्याचें सरकारी सभासदांनीं ठरविलें होतें. सरकारी धोरण असें आधीं ठरलें नसतें तर मात्र या योजनेच्या आधारावर कायदे करण्याचें काम बंद करावें ही कॉंग्रेसची उपसूचना पासही झाली असती !

परंतु श्री. जीना यांनीं आणलेली उपसूचना असेंब्लींत मान्य झाली. मतासाठीं त्या सूचनेचे दोन भाग केले होते. पहिला भाग कम्युनल अवार्ड स्वीकारण्याविषयीं होता. श्री. जीना यांच्या सूचनेला उपसूचना म्हणून कॉंग्रेसनें तटस्थपणाची सूचना पुढें आणली ती नापास झाली, कारण कॉंग्रेसच्या बाजूच्या सभासदांपैकीं फक्त कॉंग्रेसचींच ४४ च मतें अनुकूल पडलीं. ही उपसूचना नापास झाल्यावर कॉंग्रेसपक्ष तटस्थच राहिला व श्री. जीना यांच्या उपसूचनेचा पहिला भाग सरकारी सभासद व मुसलमान सभासद यांचीं मतें मिळून पास झाला.*

श्री. जीना यांच्या सूचनेचा २ रा व ३ रा भाग खालीलप्रमाणे होता तो ७४ विरुद्ध ५८ मतांनीं पास झाला. कॉंग्रेसनें अनुकूल मतें दिलीं व सरकारपक्षानीं विरुद्ध मतें दिलीं. जिनांच्या उपसूचनेंतील पहिला भाग असा होता.

( १ ) जोंपर्यंत निरनिराळ्या जातींमध्यें मतैक्य होऊन नवी योजना निर्माण झाली नाहीं तोंपर्यंत जातीय निवाडा या कायदेमंडळाला मान्य आहे.

( २ ) प्रांतिक सरकारविषयींची योजना अतिशय असमाधानकारक व निराशाजनक आहे. सेकंड चेंबर्स, गव्हर्नराचे खास व असामान्य अधिकार, पोलीस व गुप्तपोलीस यांच्याबद्दलचे खास नियम या गोष्टींवरच एक्झिक्यूटिव्ह व कायदेमंडळें यांचें नियंत्रण व जबाबदारी अवलंबून असणे आणि त्याविषयींचे वरील योजनेंतील नियम अत्यंत आक्षेपार्ह आहेत. आणि ते आक्षेपार्ह स्वरूप दूर झालें नाहीं तोंपर्यंत वरील योजनेस हिंदी प्रजेचीं मतें अनुकूल होणार नाहींत. ( ३ ) मध्यवर्ती सरकार किंवा ज्याला ऑल इंडिया

---

टीप.—( श्री. एन्. एम्. जोशी यांनीं उपसूचनेच्या बाजूनें मत दिलें [प्रकाशक]

फेडरेशन असें नांव दिले आहे. त्यांचे स्वरूपही मूलतःच त्याज्य व हिंदुस्थानातील ब्रिटिश प्रजाजनांना तें सर्वस्वी अग्राह्य आहे. हिंदुस्थान सरकारला ही सभा असें सुचवीत आहे कीं, या योजनेप्रमाणें कायदे न करण्याचा सल्ला त्यांनीं बादशाही सरकारला द्यावा. ब्रिटिश हिंदुस्थानांत खरी जबाबदारराज्यपद्धति स्थापन करण्याविषयी अत्यंत कसोशीने तातडीचे प्रयत्न व्हावेत व त्या साठीं आज हिंदुस्थानांत प्रचलित असलेल्या सर्व पक्षाची सल्लामसलत घेऊन सर्व परिस्थितीचें पुनः निरीक्षण करावें.

या नं. २ व ३ च्या उपसूचनाचा सरकारानें अगदीं निराळ्या दृष्टीनें विचार केला. त्या सूचना पूर्वीच्या योजनेऐवजीं एक स्वतंत्र योजना सुचविणाऱ्या आहेत असें सरकारने प्रतिपादन केलें व लॉ-मेंबरच्या द्वारें असें सांगितलें कीं, काँग्रेसप्रमाणे याही सूचना जॉ. पा. कमिटीच्या रिपोर्टाला नकार देणाऱ्या आहेत. लॉ-मेंबर म्हणाले कीं, श्री. देसाई यानीं प्रामाणिकपणें प्रत्यक्षच आघाडीवर हल्ला केला आणि श्री. जीना हे तोच प्रकार परंतु अप्रत्यक्षपणे करीत आहेत. दोघाचाही हेतु एकच आहे. तेव्हा कॉंग्रेसच्या पुढाऱ्यांचा विरोध व श्री. जीना याचा विरोध यात काहींच अंतर नाहीं.

रेल्वेचे अंदाजपत्रक चर्चेस निघालें त्यावेळीं सरकारचे लागोपाठ पराभवच होत गेले. असेंब्लीच्या सभासदानीं रेल्वेच्या व्यवस्थेतील सरकारी धोरणाची निरनिराळ्या दृष्टींनीं छाननी केली. विरोधी. पक्षाचे पुढारी ( Leader of the opposition ) श्री. भुलाभाई देसाई यानीं रेल्वेबोर्ड ग्रँट फक्त १ रु० असावी अशी कपातीची सूचना आणली. श्री. देसाई टीका करतांना म्हणाले, सरकारचें चालू धोरण १९३० सालीं सरकारला सुचलें आहे. त्यासाठीं सरकारी धोरणाच्या समर्थनार्थीं कारणे अशीं सागण्यात आलीं कीं ( १ ) राजकीय कोलाहलाच्या वेळीं लष्करी अधिकाऱ्यांची तावडतोब सोय करणें ( २ ) हिंदी रेल्वेंत गुंतलेलें अवाढव्य भांडवल सुरक्षित करणें ( ३ )भारतमंत्र्यानीं नेमलेल्या अधिकाऱ्याना उच्च दर्जाच्या जागा पुरवणे ( ४ ) लष्करी व इतर क्षेत्रातील युरोपियनाच्या जागा कमी करण्याची शक्यता उत्पन्न करणें ( ५ ) नोकरीकरणाऱ्या ॲंग्लोइंडियन नोकरांच्या हिताची जपणूक करणें.

वरील हेतूसाठीं पुढें आलेल्या इंडिया बिलानें रेल्वेच्या प्रश्नाची खास जबाबदारी गव्हर्नर जनरलवर टाकली आहे.

श्री. देसाई यानीं नुसतो कपातीची सूचना केली नाहीं तर पूर्ण नामंजूरीची सूचना पुढे आणली. ती सूचना ७५ विरूद्ध ४७ मतानीं पास झाली. वास्तविक स्वतंत्र देशात रक्कम नामंजूर करण्याची सूचना पास झाली असती तर सरकारवर त्याचा परिणाम होणें अगदी अपरिहार्य झाले असतें. रेल्वेच्या नोकरींत हिंदीकरणासंबंधानें रेल्वेबजेटाचा जो भाग होता, त्याचीहि नामंजुरी ८१ विरुद्ध ४४ मतानी मान्य झाली. तसेंच तिसऱ्या वर्गाच्या उतारूंच्या सोयी वाढवणें, व्हिटले कमिशनच्या शिफारशी, शेतकी मालाच्या वाहतुकीचे दर कमी करणें याही प्रश्नांची वरीलप्रमाणेंच वासलात लागली.

वर्किंग कमिटीची पहिली बैठक ५-६-७ डिसेंबर १९३४ रोजीं पाटणा येथें झाली. मि. बी. एन्. सासमल याच्या मृत्यूबद्दल कमिटीनें दुःख व्यक्त केलें. ज्या दिवशीं मि. सासमल असेंब्लींत निवडून आल्याचें जाहीर झालें त्याच दिवशीं त्याना मृत्यु आला!

जॉ. पार्लमेंटरी कमिटीबद्दल वर्किंग कमिटीने आपला अभिप्राय व्यक्त केला कीं, व्हाइटपेपर ( श्वेतपत्रिका ) मध्यें सुचविलेली भावी राज्यघटना त्याज्य आहे व **कॉंस्टिट्युअन्ट असेंब्लीने** आखलेली राज्यघटनाच स्वीकार्य होईल.

जॉ. पार्लमेंटरी कमिटीने सुचविलेल्या काहीं शिफारशी तर श्वेतपत्रिकेपेक्षाहि त्याज्य आहेत आणि त्या शिफारशी प्रतिक्रियात्मक व अग्राह्य असल्याबद्दल हिंदुस्थानातील प्रत्येक पक्षानें आपला निषेध व्यक्त केला होता.

गोंडस पांघरुणाखालीं परकीय लोकानीं हिंदुस्थानची लूट करावी व सत्ता गाजवावी अशा तऱ्हेच्या वाटा जॉ. पार्लमेंटरी कमिटीनें आपल्या योजनेंत ठेवल्या आहेत. त्यामुळें प्रचलित शासनपद्धतीपेक्षाहि ती योजना जास्त खोडसाळ स्वरूपाची व विघातक आहे.

कॉंग्रेसच्या ठरावाप्रमाणें कॉन्स्टिट्युअन्ट असेंब्लीची योजना तयार होईपर्यंत जॉ. पार्लमेंटरी कमिटीच्या योजना फेटाळून लावाव्यात असें ठरलें. सुधारणेच्या नावाखालीं ही योजना लोकांच्या गळीं उतरविण्याच्या सरकारी

प्रयत्नास असेंब्लींतील सभासदानी कसून प्रतिकार करावा आणि पूर्ण स्वरा ज्याचें ध्येय गाठण्याच्या कामीं कॉंग्रेस जी जी हालचाल करील तीस जनतेनें सहाय्य करावें.

असेंब्ली निवडणुकीच्या वेळीं जनतेनें कॉंग्रेसवर जो विश्वास व श्रद्धा व्यक्त केली त्यावद्दल वर्किंग कमिटीनें अभिनंदनपूर्वक उल्लेख केला. नंतर पुढील ३ महिने खालील गोष्टींवर कॉंग्रेससंस्थानीं व कार्यकर्त्यांनीं आपले लक्ष केंद्रीभूत करावें अशी विनंति केली.

(१) कॉंग्रेसचे सभासद वाढवणें आणि नवीन घटनेप्रमाणें कॉंग्रेसचीं प्रचार-केंद्रें काढणें.

(२) ग्रामोद्योगासाठीं उपयुक्त व अचुक अशी स्थानिक माहिती गोळा करणे.

(३) मूलभूत हक्क व कराची कॉंग्रेसनें हातीं घेतलेली आर्थिक योजना याविषयीं जनतेस माहिती देऊन त्याना त्याचें शिक्षण देणें.

आपल्या वडिलाच्या मृत्यूच्या वेळीं सुभाषचंद्र बोस हिंदुस्थानांत आले होते त्या वेळीं सरकारनें ज्या अपमानास्पद व संतापजनक अटी त्याच्यावर लादल्या त्याचा कमिटीनें तीव्र निषेध केला कॉंग्रेसपक्षाच्या असेंब्लींतील सभासदानीं नेहमीं खादीचा पोषाख करावा आणि खादीचा नियम सक्तीनें पाळावा अशी कमिटीनें विनंति केली. असेंब्लीच्या निवडणुकींत बंगालमधील मतदारानीं कम्युनल अवार्डवद्दलच्या कॉंग्रेसधोरणाविषयीं प्रतिकूल मतें व्यक्त केलीं हें लक्षात घेऊन आपल्या धोरणाचा कॉंग्रेसनें फेरविचार करावा असें बंगालमधील नॅशनॅलिस्ट पक्षानें सुचविलें होतें. परंतु मुंबई येथील अधिवेशनात त्याविषयीं झालेला प्रचंड बहुमताचा ठराव आता सर्वत्र जाहीर झाल्यानंतर त्याविषयीं आपलें धोरण वदलणें शक्य नाहीं असें वर्किंग कमिटीनें नमूद केलें.

१९३५ साल हें कॉंग्रेसचें पन्नासावें वर्ष आहे. त्या सालातील कॉंग्रेसच्या महत्त्वाच्या घडामोडी थोडक्यात पुढें दिल्या आहेत.

आचार्य गिडवाणी व श्री. अभ्यंकर [ नागपूर ] याच्या कुटुंबाना सहानुभूति व दुःखप्रदर्शन कळविण्यासाठीं ता. १६ ते १८ जाने. १९३५ रोजीं वर्किंग कमिटीची बैठक झाली. वरील दोघानींहि देशसेवेंत यातना भोगल्या होत्या व ते आदर्श देशसेवक होते.

या वर्षी पूर्णस्वराज्यदिन किंवा स्वातंत्र्य-दिन पूर्वीप्रमाणे पाळण्यात आला आणि त्या दिनोत्सवानिमित्त एक विशिष्ट ठराव पास करण्यांत आला. तो ठराव व दिनोत्सवाबद्दलच्या सूचना खालीलप्रमाणे आहेत.

" कायदेभंगाची चळवळ तहकूब असल्याने या दिवशी कायदे किंवा वट-हुकूम किंवा स्थानिक अधिकाऱ्याच्या आज्ञा उल्लंघू नयेत. अगाऊ जाहीर केलेल्या सभास्थानापर्यंत शांत मिरवणूक काढावी. तेथे अध्यक्षांनी खालील ठराव हिंदुस्थानीत किंवा स्थानिक भाषेत वाचून दाखवावा. कोणीहि भाषणें करूं नयेत.

जेथे सभाबंदीचे हुकूम असतील तेथें प्रत्येक घरी ठरलेल्या वेळी सभा व्हावी व ठराव पास करून त्याबद्दलची खबर जवळच्या कॉंग्रेसकमिटींत कळ-वावी. ठराव पास होण्यापूर्वी राष्ट्रध्वज उभारावा.

**ठराव**:—

या पवित्र राष्ट्रीयदिनाच्या दिवशी आम्ही असा निर्धार करतो कीं, संपूर्ण स्वातंत्र्य हा आमचा जन्मसिद्ध हक्क आहे व तो मिळवीपर्यंत आम्ही प्रयत्न सोडणार नाहीं.

तें ध्येय गाठीपर्यंत आम्ही सत्य व अनत्याचार - वाचा-विचार व कृति या तिन्हींत टिकविण्याच्या सामर्थ्याची आम्ही पराकाष्ठा करूं आणि त्यासाठीं कोणचाहि स्वार्थत्याग किंवा कितीहि यातना भोगाव्या लागल्या तरी ध्येयापुढे त्याची आम्ही क्षिति बाळगणार नाहीं

सत्य व अनत्याचार या अत्यावश्यक गुणाचें निदर्शक म्हणून आम्ही—

( १ ) जाती जातींत अंतःकरणाचे ऐक्य घडवून आणू व जातगोत लक्ष्यात न घेता सर्वत्र समानता स्थापण्याचा प्रयत्न करूं.

( २ ) मद्यपानास किंवा असली पदार्थास स्पर्श करणार नाही.

( ३ ) हातमागाचा व इतर ग्रामोद्योग याचा उद्धार करण्याचा प्रयत्न करूं आणि स्वतः खादी व इतर ग्रामात मिळणारे पदार्थ याचाच स्वीकार करूं.

( ४ ) अस्पृश्यता नाहींशी करू.

( ५ ) उपाशी राहणाऱ्या लक्षावधि लोकासाठीं शक्य तितक्या मार्गांनें सहाय्य करू.

( ६ ) इतर राष्ट्रीय व विधायक कार्यक्रमांला वाहून घेऊं.

स्वातंत्र्य दिनाचे दिवशीं हरताळ पाळू नये.

नंतर पंचम जॉर्ज ज्युबिलीविषयीं कमिटींत चर्चा झाली.

त्या बाबतींत आपला दृष्टिकोन स्पष्ट करण्यासाठीं कॉंग्रेसनें खालील ठराव पास केलाः—

बादशहांच्या वैयक्तिक कल्याणाविषयीं कॉंग्रेस सदिच्छा करीत आहे व नेहमीं सदिच्छाच व्यक्त करीत राहील परंतु, हिंदुस्थानांतील सत्ता स्वाभाविकपणेंच बादशहांशीं संलग्न झाली आहे. ती सत्ता आतां या राष्ट्राच्या राजकीय, नैतिक व आर्थिक उन्नतीस प्रतिबंध करीत आहे. ती सत्ता आता एका शासनपद्धतींत रूपांतरित होऊं पाहात आहे. तें रूपांतर झालें व ती शासनपद्धति प्रचारात आली कीं, राष्ट्राची लूट होणार आहे. शिल्लक राहिलेली संपत्ति देशोधडीस लागणार आहे. आणि पूर्वी कधींही प्राप्त झालें नाहीं असें अभूतपूर्व राजकीय पारतंत्र्य लादलें जाणार आहे.

म्हणून निषेधात्मक मार्गांनीं या समारंभांत भाग घेऊन इंग्लिश लोकांच्या व समारंभात भाग घेणाऱ्या इतर व्यक्तींच्या भावना दुखविण्यासारखा उपदेश वर्किंग कमिटी करणें शक्य नाहीं. सर्वसामान्य जनतेला व कॉंग्रेसच्या जागां-वर असलेल्या अधिकाऱ्यांना ही कमिटी असें सुचवित आहे कीं, त्यानीं केवळ समारंभापासून अलिप्त राहण्यांतच समाधान मानावें.

सरकारी अधिकारी व जबाबदार इंग्लिश लोक वर्किंग कमिटीच्या या अपरि-हार्य मतांतील कळकळ व प्रामाणिकपणा लक्ष्यांत घेतील आणि समारंभांत भाग घेण्याबद्दलची अप्रत्यक्षपणें किंवा प्रत्यक्षपणें सक्ति करून राष्ट्राच्या स्वाभिमानास ढिवचणार नाहींत असा वर्किंग कमिटीस विश्वास वाटत आहे.

बहुतेक सर्व कापड-गिरणीवाल्यांनीं आपापल्या प्रतिज्ञा मोडल्याचें आढळून आल्यानें प्रशास्तिपत्रें देण्याची पद्धति बंद झाल्याचें वर्किंग कमिटीनें जाहीर केलें. आणि जुनीं प्रशास्ति पत्रें रद्द केलीं. सर्व कॉंग्रेसभक्तांनीं व कॉंग्रेसच्या कार्याबद्दल सहानुभूति बाळगणाऱ्या इतर सर्वांनीं हातसुताची व हातमागावर विणलेलीच खादी वापरणें हें त्यांचें कर्तव्य आहे, असें वर्किंग कमिटीनें एका विनंतिद्वारें जाहीर केलें.

ब्रह्मदेशाचा प्रश्न जॉ. पा. कमेटीच्या शिफारशीची चर्चा होत असता निघाला. व शेवटीं पूर्वीप्रमाणेंच ब्रह्मदेश प्रां. कॉं. कमेटीचें काम कांहीं काळ तसेंच राहावें असें ठरलें.

७ फेब्रुवारी १९३५ हा दिवस जॉ. पा. कमेटी निषेध दिन म्हणून सर्व हिंदु-स्थानभर पाळण्यांत आला. सर्व राष्ट्राच्या अंतःकरणाचा एकोपा व कृतींतील

शिस्त पुन्हां एकदां व्यक्त झाली. प्रत्येक प्रांतांत ठिकाठिकाणीं सभा झाल्या व अध्यक्षांनीं सुचविलेला ठराव त्या सभांतून पास करण्यांत आला.

ब्रह्मदेश प्रां. कॉ. कमेटीच्या नेतृत्वाखालींही निषेध दिनाचा कार्यक्रम झाला. व ब्रह्मदेश व हिंदुस्थान यांचें रिपोर्टाला इनकार करण्यांत एकच मत व भूमिका आहे, हें फार चांगल्या तऱ्हेनें व्यक्त झालें.

जाने. व फेब्रुवारी १९३५ मध्यें एकीच्या वाटाघाटी चालल्या होत्या. कॉंग्रेसचे अध्यक्ष बाबू राजेंद्र प्रसाद व ऑ इं मुस्लीम लीगचे अध्यक्ष श्री. जीना यांच्यांत सारखे दोन महिनेपर्यंत बोलणीं चालणीं होत होतीं. त्यांत कम्युनल अवार्डच्या ऐवजीं दुसरी एकादी योजना सुचवून, जातीय कलह व मतभेद दूर करावेत व सर्व राष्ट्रानें एकजुट करून अभेद्य आघाडी उभारावी अशा हेतूनें विचार-विनिमय चालूं होते. परंतु २३ जानेवारी पासून १ मार्च १९३५ पर्यंत कांहींही समेटाची भूमिकाच उत्पन्न न झाल्यानें हीं बोलणी फोल झालीं व देशाची फार निराशा झाली.

कॉंग्रेसनें चढाईचें धोरण सोडलें तरी सरकारी अरेरावी चालूच होती. बंडाचा बीमोड करण्यासाठीं प्रतिपक्षाच्या शांतवृत्तीच्या काळांतही दंडुकेशाहीची उठावणी करणें हा नेहमीं सुलतानशाहीचा विशेषच असतो. जॉ. पा. कमेटीच्या रिपोर्टाचा व पार्लमेंटपुढे असलेल्या बिलाचा सार्वत्रिक निषेध पाहिल्यावर सरकार प्रक्षुब्ध होणें अगदी साहाजिक होतें. कलकत्ता येथें ऑ. इं. ट्रेड युनियन कॉंग्रेस भरणार होती तिला हिंदुस्थानसरकारनें बंदी केली. व कांहीं जिल्ह्यातून पोलीस व कॉंग्रेसचा शांततामय कार्यक्रम यांचे झगडे पूर्ववत् सुरू झाले.

१९३५ सालीं सरकारी धोरणांत कांहीं बदल दिसलाच नाहीं. कॉंग्रेसबद्दल संशयग्रस्त वृत्ति व शत्रुत्वाची भावना कायमच आहे. क्रांतिकारकांच्या चळवळीशीं संबंध असल्याच्या केवळ संशयावरून पकडलेले असे एकट्या बंगालमध्यें २७०० लोक आहेत व ते विनाचौकशी अद्याप डांबून ठेवले आहेत. घराच्या झडत्या होत आहेतच. बिहारमध्यें तर ऑ. इं. कॉं. कमेटीचीं व प्रां. कॉं. कमिटीचीं आफिसें सुद्धां तपासण्यांत आलीं.

अबदुल गफुरखान याना मुंबई येथील एका भाषणावरून दोन वर्षांची सजा झाली आणि निवडणुकींतील दौऱ्यावरील एका भाषणाबद्दल डॉ. सत्यपाल यांनाही २ वर्षांची शिक्षा झाली.

बंगालमधील स्थानबद्ध कैद्यांची संख्या हजारांनीं मोजण्याइतकी आहे. त्याच्या

कुटुंबांची वाताहात झाली आहे. कारण कुटुंबातील तरुण माणसेंच सरकारनें उचललीं आहेत. वर्षेच्या वर्षे ना सजा, ना चौकशी अशा स्थितींत हे लोक डांबले आहेत. २४ व २५ एप्रिल रोजीं ऑ. इं. कॉ. कमिटीची जबलपूर येथें बैठक झाली. त्यांत वरील कैद्याबद्दल सहानुभूतिपर ठराव पास करण्यात आला.

१९ मे हा दिवस याबद्दलचा निषेध म्हणून पाळण्यांत आला आणि त्या कैद्याच्या व त्यांच्यावर अवलंबून असणाऱ्या कुटुंबियांसाठीं पैसे जमवण्यासाठीं अध्यक्षांनीं देशभर विनंतिपत्रें पाठविलीं. बंगाल सरकारनें इंडियन प्रेस अॅक्ट जादा अधिकाराच्या २ (अ) कलमान्वयें या स्थानबद्ध कैदी-दिनाची कोणचीही हकीकत प्रसिद्ध करण्याची बंदी केली. आणि याला प्रत्युत्तर म्हणून बंगालमधील वृत्तपत्रकारानीं एक दिवस हरताळ पाळला.

जबलपूरच्या बैठकींत कॉ. पार्लमेंटरी बोर्डाची व निवडणूक वादनिर्णय मंडळाची निवडणूक झाली. श्री. टी. ए. के. शेरवाणी यांच्या मृत्यूबद्दल दुःखप्रदर्शन करण्यात आलें. असेंब्लींत कॉंग्रेस पक्षानें केलेल्या कार्याबद्दल समाधान व्यक्त करण्यांत आलें. वायव्य सरहद्दप्रांत येथील कॉंग्रेस चळवळीवर बंदी चालू होती व मिदनापूर येथील सर्व कॉंग्रेस कमेटया बंद करण्यात आल्या. खुदाई खिदमतगार, गुजराथ व बंगालमध्यें हिंदुस्थान सेवादल, बंगाल मुंबई पंजाब व इतर कांहीं इलाखे या मधील मजूर संघ व युवकसंघ या संस्था केवळ संशयास्पद हेतूवरूनच बंद करण्यात आल्या. या गोष्टीकडे वरील कमिटीनें राष्ट्राचें मुद्दाम लक्ष वेधलें.

'फॉरिनर्स अॅक्ट' (संस्थानी रहिवाशांबद्दलचा कायदा) या प्राचीन कायदेकानूचा सर्रास दुरुपयोग होत होता व त्या कायद्यान्वयें कॉंग्रेस कार्यकर्त्यांची ब्रिटिश हिंदुस्थानांतून हकालपट्टी होत होती, त्याचा कमिटीनें निषेध केला. सरकारनें स्थानबद्धांना सोडावे किंवा त्यांची योग्य चौकशी करावी असा ठराव केला. त्याचप्रमाणें बंगाल प्रा. कॉंग्रेस कमिटीनें वर्किंग कमिटीस बंगालमधील स्थानबद्ध कैद्यांची यादी कळवावी. त्यांत स्थानबंदीच्या काळाची पूर्ण हकीकत आणि त्याच्या कुटुंबाची आर्थिक परिस्थिति नमूद करावी व त्या प्रमाणें त्या कैद्याच्या कुटुंबसंरक्षणार्थ वर्किंग कमिटीच्या नेतृत्वाखालीं एक अखिल भारतीय फंड उभारावा असें ठरलें.

फिरोझाबाद येथें डॉ. जीवराम यांचे सर्व कुटुंब मुलाबाळांसह व दवाखान्यांतील रोग्यांसह जिवंत जाळण्यांत आलें. या लोकक्षोभाबद्दल कमिटीनें अत्यन्त

खेद व्यक्त केला. आणि जातिनिष्ठ प्रवृत्तीचें माथेफिरूपणांत कसें रूपांतर होतें हें लोकांच्या निदर्शनास आणून बंधुत्वाची जरूरी पटवली.

ब्रिटिश हिंदुस्थानच्या हिताइतकीच संस्थानी प्रजेचीही कळकळ आहे व त्यांच्या स्वातंत्र्य प्रयत्नास आपली पूर्ण सहानुभूति आहे असें कमिटीनें नमूद केलें.

त्याच वेळीं जबलपूर येथें वर्किंग कमिटीचीही बैठक झाली. तींत नवीन घटनेप्रमाणें प्रत्येक प्रांतानें पाठवावयाच्या प्रतिनिधींची जास्तीत जास्त संख्या ठरविण्यांत आली. आणि काँग्रेसच्या चळवळीचे, पुढील अधिवेशनाच्या ऑ. इं. कॉं. कमेटीच्या प्रतिनिधींच्या निवडणुकीचें वेळापत्रक ठरविण्यांत आलें. प्रांतिक निवडणुकींतील कांहीं भांडणें होतीं तीं मिटवून वायव्य सरहद्द प्रांत व मिदनापूर जिल्हा यांच्या प्रतिनिधित्वाची सोय केली. कारण त्या प्रांतांत काँग्रेस संस्थावर बंदी असल्यानें निवडणूक होणें शक्य नव्हतें.

१५ जानेवारी १९३४ रोजीं बहारमध्यें भूकंप झाला होता. त्यास १। वर्ष सुद्धां लोटलें नाहीं तोंच ३१ मे १९३५ रोजीं क्वेट्टा येथें भूकंप झाला. क्वेट्टा हें लष्करी ठाणें असल्यानें सरकारनें साहाय्याची चळवळ करण्यांत पुढाकार घेणें स्वाभाविक होतें. परंतु तें तर राहोंच पण बाहेरून कोणच्याही तऱ्हेचें साहाय्य येऊ देण्याचीच सरकारी बंदी झाली! काँग्रेसचे अध्यक्ष किंवा म. गांधी यांना सुद्धां त्या प्रांतांत जाण्याची बंदी झाली. म्हणून फक्त बंदी झालेल्या मर्यादेवरच मदत पोहोंचविणें शक्य होतें. काँग्रेसच्या अध्यक्षांनीं क्वेट्टा सेंट्रल रिलीफ फंड कमिटी नेमून तिच्या शाखा सिंध, पंजाब व वायव्य सरहद्द प्रांत येथें सुरू केल्या. त्या प्रांतांत क्वेट्टाहून आलेल्या लोकांना साहाय्य करण्यांत आलें. २० जून हा दिवस क्वेट्टा दिन म्हणून सहानुभूतिसाठीं पाळण्यांत आला व मृतात्म्याबद्दल प्रार्थना करण्यांत आल्या. या बाबतींतलें सरकारी धोरण संशय व अविश्वास यावर उभारलेल्या धोरणाची अगदीं परमावधि आहे. त्या धोरणाचा निषेध करणारा ठराव वर्किंग कमिटीनें १-८-३५ रोजीं पास केला. त्यांत क्वेट्टा व बलुचिस्तानांतील इतर भाग येथील लक्षावधि जीवाची प्राणहानि व सर्वनाश झाला त्याबद्दल कमिटीनें सहानुभूतिपूर्वक दुःख व्यक्त केलें. सरकारी व बिनसरकारी अधिकाऱ्यांनीं समक्ष पाहून प्रसिद्ध केलेल्या हकीकतीवरून वर्किंग कमिटीनें असा अभिप्राय व्यक्त केला कीं, जर मातीचे ढीगारे उकरण्याचे प्रयत्न जास्त व्यापक

प्रमाणांत केले असते, तर मातीखालीं दडपलेलीं कित्येक माणसें वाचवतां आलीं असतीं. जर हें काम दोन दिवस चालू ठेवलें असतें व जनतेनें देऊं केलेलें साहाय्य घेतलें असतें तर आणखी पुष्कळ लोकांना जीवदान देतां आलें असतें. लोकांनीं केलेल्या व कांहीं अंशीं सरकारी पत्रकावरून सिद्ध होणाऱ्या आक्षेपांची चौकशी करण्यासाठीं सरकारनें सरकारी व बिनसरकारी अधिकाऱ्यांचें एक कमिशन नेमावें.

लोकांच्या आक्षेपाला आधारभूत झालेलीं सरकारी पत्रकें खालीलप्रमाणें आहेत.

(१) लोकांनीं मदत देऊं केली त्या वेळीं, सरकारनें असें पत्रक प्रसिद्ध केलें कीं, सरकारजवळ भरपूर साहाय्य आहे. परंतु, या सरकारी म्हणण्यास प्रत्यक्ष पुरावा कांहीं दिसला नाहीं.

(२) देऊ केलेली मदत सरकारनें अन्यायानें झिडकारली.

(३) सरकारनें शेजारच्या प्रांतांतून जरूर ती माणसांची मदत मिळविणें जरूर होतें.

(४) आपद्ग्रस्तन प्रांतांतील प्रत्येक युरोपियन रहिवाशाची सरकारनें जशी चौकशी केली तशी हिंदी लोकवस्तींत केली नाहीं. तसेंच मुक्तता, आश्रय व निवारण या बाबतींतही असाच भेद स्पष्ट झाला.

कॉंग्रेसच्या कार्यकर्त्यांना व विशेषतः असेंब्लीतील कॉंग्रेस सभासदांना प्रक्षुब्ध करणारी आणखी एक घडामोड या वेळीं झाली. नवीन सुधारणांची योजना पार्लमेंटपुढेंच अद्याप होती तोंच अधिकारांच्या जागांबद्दल देशांत बोलणीं सुरू झालीं. त्याचा प्रतिपक्षानें फायदा असा घेतला कीं बिलाला साहाय्य करणाऱ्यांनीं पार्लमेंटला असें पटविलें कीं, बिल पास झालें कीं, नवीन सुधारणांचें कार्य करण्यासाठीं लोक तयार आहेत. या सुधारणाविषयींचें आपलें मत १९३४ च्या मुंबई अधिवेशनांत कॉंग्रेसनें स्पष्टच सांगितलें होतें. आणि पुढील अधिवेशनाखेरीज या बाबतींत मतें व्यक्त करण्यास कोणीही समर्थ नव्हता. म्हणून जुलै महिन्यांत वर्धा येथें वर्किंग कमिटीनें खालील ठराव पास केलाः—

नवीन सुधारणेंत जागा पत्करावयाची कीं पत्करावयाची नाहीं याबद्दल कांहीं कॉंग्रेस कमिट्यांनीं ठरावही करून टाकले. ते वाचून वर्किंग कमिटी आपला असा अभिप्राय देते कीं, या प्रश्नाची अकालीं चर्चा होत आहे. तो प्रश्न पुढील

काँग्रेसच्या अधिवेशनावर सोंपवावा. कोणच्याही काँग्रेसवाल्यांचें या बाबतींतील वैयक्तिक मत हें काँग्रेसचें मत नव्हे.

श्री. भुलाभाई देसाई हे पार्लमेंटरी बोर्डाचे अध्वर्यु होते. त्यांनीं हिंदुस्थान सरकारच्या बिलास अनुसरून फेडरेशनच्या बाबतींत आपलें मत हिंदी संस्थानासंबंधीं म्हैसूर येथील व्याख्यानांत वकील या नात्यानें व्यक्त केलें. तें बिल त्या वेळीं कॉमन्स सभेंतच होतें. गांधींनीं दुसऱ्या गोलमेज परिषदेंत केलेल्या विधानावरून संस्थानी प्रजाजनांनीं मागणी केली. गांधी गोलमेज परिषदेंत असें म्हणाले होते कीं, फेडरल कायदेमंडळांत आपले प्रतिनिधि पाठविण्याचा हक्क हिंदी संस्थानांतील लोकांना मिळत नसेल अशी कोणचीही घटना काँग्रेसला मान्य होणार नाहीं.

संस्थानी प्रजेच्या या प्रश्नाचा विचार करण्यासाठीं जुलै महिन्यांत ऑ. इं. कॉं. कमेटीची बैठक बोलावण्यांत आली.

२९-३० व ३१ मे रोजीं वर्धा येथें वर्किंग कमिटीची बैठक झाली. तींत खालील ठराव पास झाला:—

### हिंदी संस्थानें:—

काँग्रेसच्या धोरणाच्या स्पष्टीकरणाबद्दल संस्थानी प्रजेकडून एकसारखी मागणी होत आहे. म्हणून संस्थानिक व संस्थानी प्रजा या विषयींचें आपलें धोरण स्पष्ट करण्यासाठीं वर्किंग कमिटी खालील पत्रक प्रसिद्ध करीत आहे:—

ब्रिटिश हिंदुस्थानांतील लोकाइतकाच संस्थानी प्रजेचाही स्वराज्य हा मूलभूत आहे, असें काँग्रेसचें मत आहे, त्यास अनुसरून संस्थानांत प्रातिनिधिक जबाबदार राज्यपद्धति असावी असा आपला अभिप्राय काँग्रेसनें व्यक्तही केला आहे. आपल्या प्रजेला भाषणस्वातंत्र्य, व्यक्तिस्वातंत्र्य, मुद्रणस्वातंत्र्य, यासारखे नागरिकत्वाचे मूलभूत हक्क देऊन जबाबदार राज्यपद्धतिची स्थापना करण्याविषयीं काँग्रेसनें संस्थानिकांना फक्त विनंति केली इतकेंच नव्हे तर संस्थानी प्रजेकडून एतद्विषयक जे कायदेशीर व शांततामय प्रयत्न होतील त्यासही सहानुभूती व पाठिंबा देण्याचे काँग्रेसनें आश्वासन दिलें आहे. संस्थानिकांनीं स्वहितासाठीं-सुद्धां आपल्या हद्दींत जबाबदार राज्यपद्धति ताबडतोब सुरू करावी व जनतेला नागरिकत्वाचे पूर्ण हक्क द्यावे असें काँग्रेसला वाटतें.

अर्थात् संस्थानच्या हद्दींत चळवळ करण्याची सर्व जबाबदारी संस्थानी प्रजेवर

आहे. कॉंग्रेस फक्त आपलें नैतिक व मित्रत्वाचें वजन संस्थानांवर घालील आणि शक्य तितक्या ठिकाणीं आपलें नैतिक सामर्थ्य कॉंग्रेस उपयोगांत आणील. जरी भौगोलिक व ऐतिहासिक दृष्ट्या, संस्थानिक, ब्रिटिश प्रजाजन व संस्थानी किंवा इतर कोणचीही हिंदी प्रजा ही एकरूप व अभेद्य आहे तरी, प्रचलित परिस्थितींत मात्र कॉंग्रेसला संस्थानांत यापेक्षां जास्त कांहीं करतां येणें शक्य नाहीं.

लवकरच होणाऱ्या घटनाविषयक सुधारणाबद्दल असें सुचविण्यांत येतें कीं, फेडरेशन व हिंदी संस्थानें यांच्या संबंधाविषयीचा इंडिया बिलांत जो भाग आहे, त्या बाबतींत कांहीं उपसूचना कॉंग्रेसनें सुचवाव्या. परंतु हिंदी लोकांच्या इच्छेचा कांहींही आविष्कार त्या योजनेंत नाहीं. या व्यापक दृष्टिकोनानें ती योजना सर्वस्वीं त्याज्य ठरविली आहे, हें कॉंग्रेसनें अनेकवार जाहीर केलें आहे. आणि त्या योजनेऐवजीं घटना परिषदेनें तयार केलेली एखादी योजना करावी असाही आग्रह कॉंग्रेसनें धरला आहे. तेव्हां वरील योजनेंतील एखाद्या उपसूचनेची मागणी करण्याची कॉंग्रेसला आता जरूरच नाहीं. कारण तशी मागणी करणें हें कॉंग्रे-सचें धोरण मागे खेंचण्यासारखें होणार.

संस्थानिकाचें साहाय्य मिळविण्यासाठीं कॉंग्रेसनें संस्थानी प्रजेच्या हिताला दूर लोटलें असा आक्षेप कॉंग्रेसवर कधींही येणें शक्य नाहीं, हें संस्थानी प्रजेस पटाविणें जरूर आहे असें नाहीं. आरंभापासूनच संस्थानी प्रजेच्या हितासंबंधीच्या लढ्यांत कॉंग्रेस उतरली आहे."

नंतर, कॉंग्रेसची ज्युबिली—५० वा वाढदिवस—भव्य प्रमाणावर करावा असें ठरलें. ५० वर्षांपूर्वी १८८५ सालीं पहिली कॉंग्रेस ज्या दिवशीं भरली त्या दिवशींच ५० वी ज्युबिली समारंभ करण्याचें ठरून कार्यक्रम वगैरे ठरविण्या-साठीं वर्किंग कमिटीनें एक पोट कमिटीही नेमली.

वर्धा येथील सभेनंतर व हें वर्ष संपण्यापूर्वी तीन महत्त्वाच्या गोष्टी घडून आल्या. त्यापैकीं पहिली गोष्ट म्हणजे जवाहिरलाल नेहरू यांची अलमोरा जेल-मधून अकस्मात् झालेली सुटका ही होय. पं. जवाहिरलाल यांच्या पत्नींची प्रकृती चिंताजनक झाल्यामुळें त्यांना ३ सेप्टेंबर रोजीं मुक्त करण्यांत आलें. त्यांनीं थेट युरोपला जावे आणि जर ते त्यांच्या शिक्षेची मुदत संपण्याच्या आंत परत आले तर त्यांनीं पुन्हां आपली राहिलेली शिक्षेची मुदत संपेपर्यंत पुन्हां

कारागृहवास पत्करावा असा त्यांच्या सुटकेच्या वेळीं त्यांना हुकूम देण्यांत आला होता. दुसरी महत्त्वाची गोष्ट म्हणजे असेंब्लीनें स्पष्ट बहुमतानें क्रिमिनल लॉ-अमेंडमेंट बिल फेटाळून लावलें असतांही व्हॉइसरॉयांनीं सर्टिफिकेशनच्या जोरावर सप्टेंबर १९३५ मध्यें तें पास करून घेतलें. तिसरी महत्त्वाची गोष्ट म्हणजे मद्रास येथें ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटीची बैठक १७।१८ आक्टोबर रोजीं भरली. अधिकाराच्या जागांचा स्वीकार व कांग्रेस व संस्थानें ह्या प्रश्नावर या बैठकींत कडाक्याचे वादविवाद होतील असा लोकांचा अंदाज होता. ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटीची स्वतंत्रपणें भरलेली अशी सभा मद्रास शहरांत ही पहिलीच होती. वर्किंग कमिटीनें कॉंग्रेस व संस्थानें ह्यांच्या बावतींत जें पत्रक प्रसिद्ध केलें होतें त्याला संमति द्यावी, असें मद्रासच्या सभेंत ठरविण्यांत आलें. "नवीन घटनेप्रमाणें प्रांतिक कायदेकौन्सिलांच्या निवडणुका होण्यास अद्याप बराच वेळ असल्यामुळें, त्याचप्रमाणें या मधल्या काळांत देशाच्या राजकीय परिस्थितींत कोणते फरक होतील, याची खात्री नसल्यामुळें अधिकारांच्या जागा स्वीकारण्याच्या प्रश्नावर कांहींतरी निर्णय देणें हें केवळ अप्रासंगिकच आहे असें नसून, तें अनुचित व गैरेमुत्सद्देगिरीचें आहे," असा ठराव करण्यांत आला. मद्रासच्या ह्या सभेंतील घडून आलेली एक लहानशी पण महत्त्वाची गोष्ट येथें सांगणें जरूर आहे. बंगाल प्रांतिक कॉंग्रेस कमिटीनें आपल्या वांट्याचे ५०० रुपये ऑ. इं. कॉंग्रेस कमिटीला न दिल्यामुळें ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटींतील बंगाली सभासदांना या बैठकींत बसता यावयाचे नाहीं असें कळविण्यात आलें. कलकत्ता सेंट्रल डिस्ट्रिक्ट कमिटीला मान्यता देण्याच्या बावतींत वर्किंग कमिटीनें दिलेल्या सूचना उघडपणें झिडकारण्यात आल्या, तेव्हा कॉंग्रेसची शिस्त मोडल्याबद्दल शासन करण्यांत का येऊ नये, अशी नोटीस बंगाल प्रांतिक कॉंग्रेस कमिटीच्या कार्यकारी मंडळाला कॉंग्रेसच्या वर्किंग कमिटीनें दिली.

शेवटीं जातां जातां सांगावयाचें म्हणजे गव्हर्मेंट ऑफ इंडिया ॲक्ट पार्लमेंटमध्यें मंजूर करण्यांत आला व २ जुलै १९३५ रोजीं त्याला बादशहाचीही मंजुरी मिळाली. या कायद्यावर टीका करून या पुस्तकाचीं पानें वाढविण्याची आमची इच्छा नाहीं. फक्त कॉमन्स सभेंत ह्या ॲक्टवर झालेल्या वादविवादाच्या प्रसंगीं शेवटीं बोललेल्या एका सभासदाच्या भाषणांतील एक लहानसा उतारा देण्याचा मोह आम्हांला आवरत नाहीं. ५ जून १९३५ रोजीं मेजर मिल्नर यांनीं इंडिया

बिलावर बोलतांना मि. चर्चिल व सर सॅम्युअल होअर यांची नाटकांतील खल-नायक व नायक ह्यांच्यांशीं तुलना केली. ते म्हणाले कीं, "नायक (सर सॅम्युअल होअर) यानें खलनायकाला (मि. चर्चिल) चीत केला असून ते त्याचा आज (५-६-३५) अगदीं रक्ताचा एक थेंबही न सांडतां निकाल लावतील. व नंतर हीं दोन्हीही मुख्य पात्रें हातांत हात घालून रंग-भूमीवरून आंत जातील" असें ते म्हणाले. खरोखरी पार्लमेंटमध्यें १९३५ मध्येंच हें नाटक करण्यांत आलें असें नाहीं तर, १९२० सालींही असेंच नाटक करण्यांत आलें होतें. इंग्लिश पार्लमेंटमध्यें कट्टर कॉन्झर्व्हेटिव्हांचा एक पक्ष आहे हें खरें; तथापि, मँचेस्टर गार्डियननें एकदां म्हटल्याप्रमाणें हिंदुस्थानच्या लोकांना स्वराज्य दिसावें व इंग्लंडच्या लोकांना ब्रिटिश राज्य दिसावें असें चित्र रंगविणें, हाच इंग्लंडांतील सगळ्या पक्षातील अखेरचा हेतु असतो. हा हेतु साध्य करण्याकरितां पार्लमेंटांतील निरनिराळे पक्ष पार्लमेंटच्या रंगभूमीवर आपसांत लढाईचें नाटक करून दाखवितात. कांहींनीं हिंदुस्थानास कांहींतरी देण्यास तयार असल्याचें दाखवावयाचें व कांहींनीं त्याला प्रतिकार करण्याचा आव आणावयाचा. अशा परिस्थितींत दुसरा पक्ष त्यांच्यापुढें जाऊं देत नाहीं तेव्हां जें काय मिळणें शक्य असेल तें स्वीकारण्याबद्दल हिंदुस्थानांतील नेमस्तपक्षाला पहिल्या पक्षानें सांगावयाचें, असें हें नाटक चाललेलें असतें. हीं दोनही पात्रें वेस्ट-मिनीस्टरच्या चार भींतींच्या आंत लढाईचें नाटक करतात व तेथून बाहेर पडले म्हणजे आपल्या ढोंगीपणाच्या मतभेदाना आपण कसें हुबेहुब भव्य स्वरूप देऊन दाखविले, ह्याबद्दल ते एकमेकाचें अभिनंदन करतात. या दोन्ही नाटक्यांत मधल्यामध्यें हिंदुस्थानाला मात्र मूर्ख बनविण्यांत येतें.

हें प्रकरण संपण्यापूर्वी सालोसाल आपणांवरील जबाबदारी वाढत आहे हें कॉंग्रेसच्या अध्यक्षांनीं कसें सिद्ध करून दाखविलें त्याबद्दल आपण दोन शब्द लिहूं. मिसेस बेझंट ह्यांनीं सर्व वर्षभर आपण कॉंग्रेसच्या अध्यक्ष आहों या कल्पनेवर जोर दिला. तेव्हांपासून त्यांनीं घालून दिलेला हा धडा पुष्कळ अध्यक्षांनीं पूर्णपणें गिरवला. कॉंग्रेस संपल्याबरोबर लोकांपासून तोंड लपवून अदृश्य झाले-ल्या एक-दोन अध्यक्षांशिवाय बाकीच्या सर्व अध्यक्षांनीं जबाबदारीची पूर्ण जाणीव ठेऊन, खऱ्या कळकळीनें वर्षभर आपलें कर्तव्य बजावलें आहे. हें उदात्त उदाहरण पुढें ठेवूनच आपली प्रकृति नादुरुस्त असताही बाबू राजेंद्र-

प्रसाद यांनीं देशभर दौरा काढून देशांतील चळवळीशीं व तिच्यांत काम करणाऱ्या लोकांशीं प्रत्यक्ष संबंध ठेवण्याचें एक नवीनच उदाहरण घालून देण्याचें ठरविलें आहे. त्यांची बिहारभूकंपग्रस्तांना मदत करण्यासंबंधीच्या कामाची जबाबदारी त्यांच्यावर पूर्वीचीच आहे. शिवाय क्वेटा भूकंपानेंही त्यांच्यावरील कामाचा बोजा वाढविला आहे. इतके असूनही महाराष्ट्र, कर्नाटक, तामीळ नाडू, आंध्र व केरळ या प्रांतांतून त्यांनीं दौरा काढला. त्यांची प्रवृत्ती नाफेरवादी असूनही निवडणुकीच्या चळवळींत त्यांनीं कमी भाग घेतला असें नाहीं. महात्माजींनीं राजकारणांतून अंग काढून घेतल्यामुळें त्यांच्या खांद्यावरील ओझें अधिकच वाढलें आहे. याप्रमाणें कॉँग्रेसचें अध्यक्षस्थान म्हणजे जबरदस्त काळजींनीं व जबाबदारींनी युक्त अशा अधिकारांचें सिंहासनच बनलें आहे. यापुढें आणखी एक पाऊल पुढे टाकून असें म्हणण्यास हरकत नाहीं कीं, सरकारप्रमाणें कॉँग्रेसही देशातील समबल संस्था बनली आहे. कॉँग्रेस आपल्यापुढे ध्येयें ठेवून त्यांच्या सिध्यर्थ चळवळ करीत आहे तर सरकार ती दडपून टाकूं पाहात आहे. कॉंग्रेसनें ग्रामोद्धाराची योजना आंखली आहे तर सरकार तिला आपल्या प्रयत्नानें मागे टाकूं पाहात आहे. कॉँग्रेस ही सत्य व अहिंसा या तत्वज्ञानावर अधिष्ठित झाली आहे तर भौतिक शक्तीशीं संबंद्ध झालेलें सरकार त्याची कुचेष्टा व हेटाळणी करूं पाहात आहे. यश मिळो वा अपयश मिळो ! कॉँग्रेसच्या राजकारणांत सत्याग्रह ही नवी शक्ति निर्माण झाली आहे, तिची अद्याप कसोटी पाहाणें सुरूं आहे. परंतु, जनतेचें अंतःकरण आपणाकडे वेधून घेण्याइतकें पुष्कळ काम या शक्तीनें केलें आहे. ध्येयांमधील ही क्रांति व चळवळीच्या पद्धतींमधील व साधनांमधील हा बदल एका पुरुषाच्या प्रयत्नामुळें घडून आला आहे. हा पुरुष हिंदुस्थानांत जन्मला व त्याचें शिक्षणही हिंदुस्थानांतच झालें. परंतु, जीविताला घडण मिळत असतांना तो या देशांतून एखाद्या हद्पाऱ्याप्रमाणें बाहेर जाऊन राहिला होता. तो. द. आफ्रिकेंत राहात होता व या परक्या देशांत सत्याचे अद्भुत प्रयोग करीत होता. कॉँग्रेस अयशस्वी झालेली नाहीं काय, सत्याग्रहाची परीक्षा होऊन तो अपुरा पडतो असा अनुभव आलेला नाहीं काय, आणि शेवटीं गांधींही आतां संपलेले नाहींत काय, असें लोक विचारतात. या प्रश्नांपैकीं प्रत्येक प्रश्नाला उत्तर देऊन आम्ही हें पुस्तक संपविणार आहों.

---

## प्रकरण चवथें

# उपसंहार

आतांपर्यंत आपण गेल्या पन्नास वर्षांतील राष्ट्राच्या प्रगतीचें विहंगम दृष्टया निरीक्षण केलें; व त्यांत पहिल्या कालखंडापेक्षां दुसऱ्या कालखंडाचा जरा अधिक उहापोह केला. तेव्हां प्रश्न असा आहे कीं, कॉंग्रेस अयशस्वी झाली काय ? ही एक गोष्ट कोणालाही कबूल होईल कीं, गेल्या दहा वर्षांत राजकारण व संस्कृति या संबंधींच्या आजपर्यंत मान्य झालेल्या सिद्धांतावर उदयोन्मुख नव्या कल्पनांचें नियंत्रण पडत आहे. खुद्द राजकारणाच्या क्षेत्रांतही हिंदुस्थानांतच नव्हे तर सर्व जगांत सामाजिक व आर्थिक प्रश्नांचा समावेश होत आहे. आणि या सर्वांच्यावर जेव्हां सुसंस्कृततेच्या व नीतिमत्तेच्या कल्पना यांची आम्ही राजकारणांत भर टाकतों, त्यामुळें आम्ही राजकारणाला एकोणिसाव्या शतकांतील घाणेरड्या खड्यांतून उचलून घेऊन गेल्या पंधरा सोळा वर्षांतील समाजपुष्टीच्या व नीतीच्या उच्च दर्जाला पोहोंचवितों; आणि हें आज जगप्रसिद्ध अशा महात्मा गांधींच्या मार्गदर्शकत्वाखालीं करीत आहोंत. या महात्म्याचें अजिंक्यपण प्रो. गिलबर्ट मेरे यानीं पुढील शब्दांत यथार्थ व सूत्ररूपानें वर्णिलें आहे.

" या इसमाशीं वागतांना फार सावधगिरीनें रहा, कारण हा शारिरीक सुखाची मुळींच पर्वा करीत नाहीं. तसेंच स्वास्थ्याची अगर स्तुतीची किंवा वैभवाची कशाचीच पर्वा करीत नाहीं; मनाला रास्त वाटेल तेंच करण्याचा त्याचा दृढनिश्चय असतो. तो फार भयंकर व चैन पडूं न देणारा शत्रु आहे. कारण त्याचें शरीर जरी तुम्ही जिंकलें—व तें तुम्हांला नेहमीं सहज जिंकतां येईल—तरी त्यामुळें त्याची आत्मशक्ति तुमच्या ताब्यांत बिलकूलच येऊं शकत नाहीं. "

अशा एका थोर गुरूच्या मार्गदर्शित्वाखालीं कॉंग्रेसनें राजकारणाच्या स्वरूपांत लोकसेवेचें तत्व ठसविलें आहे, समाजातील निरनिराळ्या वर्गांत अधिक व्यापक स्वरूपाच्या संस्कृतीची व अधिक उच्च दर्जाच्या देशभक्तीची जरूरी बिंबविली आहे व देशाच्या संसारांत खेड्यांचें अग्रेसरत्व स्थापन करण्याचे श्रम चालविले आहेत. सारांश, कॉंग्रेसनें हा एक नवा धर्म स्थापन केला आहे.

## राजकारणाचा धर्म

मानवी हितसंबंधाचा कोणताही महत्त्वाचा प्रश्न धर्माच्या कक्षेबाहेर असूंच शकत नाहीं; कारण धर्म हा कांहीं एकाद्या विशिष्ट मतसांप्रदायासाठीं किंवा विशिष्ठ तऱ्हेच्या पूजाविधीसाठीं नसतो, तर धर्म हा उदात्त जीवनासाठीं त्यागवृत्तीसाठीं आणि आत्मसमर्पणाच्या मार्गासाठीं असतो. यादृष्टीनें जेव्हां आम्ही राजकारण धर्मस्वरूपीं आहे असें म्हणतों त्यावेळीं आम्ही जगातील प्रचलित घाणेरड्या राजकारणाला पवित्र करतों, आजच्या संकुचित राजकारणाला व्यापक बनवतों, सध्यांच्या स्पर्धेच्या राजकारणाला सहकारितेचें स्वरूप देतों.

याच मनोवृत्तीला अनुसरून आम्ही हिंदी राष्ट्रीयत्वाची उभारणी सत्य व न्याय्य याच दोन आधारभूत सिद्धांतावर करण्याचा आग्रह धरीत आलों आहोंत. मानवी संसारात असत्याला यश झटकन व अप्रायासानें मिळालेलें दिसतें; ढोंग व दुटप्पीपणा यांनीं बुद्धिवाद व प्रामाणिकपणा यांवर सहज मात केलेली दिसते. एवढेंच नव्हे तर पूर्वी अनेकदा कायदा व तर्कशास्त्र यांनीं प्रत्यक्ष मानवीजीवनावर सत्ता गाजविलली दिसते. परंतु हें सर्व यश व हें विजय जितकें क्षणभंगूर तितकेच अपुरे ठरले; व त्यामुळें या जेत्यांची स्थिति हेवा करण्याऐवजीं कींव करण्यासारखीच झाली. हिंदुस्थांन पादाक्रांत करून इंग्लंडला चिरकालिन सुख लाभलें नाहीं, गोलमेज परिषदेचीं अनेक सोंगें उभारणाऱ्या मुत्सद्यांना हिंदुस्थान हें आपलें कायमचें विश्रामधाम ठेवतां आलें नाहीं. सरकारी दडपशाहीच्या प्रत्येक लाटेनें सरकारच्या हितसंबंधाविरुद्धच प्रतिक्रिया उत्पन्न केली व हिंदी जनतेंत प्रतिकार वृत्ति वाढविली. मग ती कधीं सविनय कायदेभंगाच्या स्वरुपात तर कधीं तरुण पिढीच्या अधिक भीषण व कठोर विरोधात व्यक्त होत आली. या दृष्टीनें आम्ही असहकारितेच्या कार्यक्रमात अपयशी झालों असें म्हणणें म्हणजे पराभूत होण्याची आमची इच्छा आहे असें म्हणणें आहे. कारण मागील इतिहासाकडे पाहिलें असता प्रत्येक पराभव हा वरवर पाहणाराला पराभव दिसला तरी वस्तुत: ती यशाचीच पायरी आहे. यश हें अपयशांच्या मालिकेतील शेवटली अवस्था आहे.

याच दृष्टीनें आम्ही कॉंग्रेसच्या कार्यक्रमाचा विचार करतों. कॉंग्रेसचा कार्यक्रम हा दुटेरी स्वरूपाचा आहे. चढाईच्या स्वरूपाकडे पाहतां, कॉंग्रेसनें सरकारशीं अशा रीतीनें संग्राम केला आहे कीं; त्याला जगांतील कोणत्याही सुधारलेल्या

सरकारला दोष देतां येणार नाहीं. विचार आचार व उच्चार या तीनही बाबतींत अनत्त्याचारी राहणें हेंच आमच्या लक्ष्याचें मूल तत्व आहे. आणि गांधींजी हे आज अखिल भारताचे सर्वमान्य मुख्य पोलीस आहेत. त्यांच्या सत्याग्रह सिद्धांताचा सरकार द्वेष करण्याचें ढोंग करो, पण आज सत्य व अहिंसा यांची जनतेवर जी छाप पडली आहे त्याला कोण दोष देणार ? ज्या आजच्या कालांत राजघराण्यांचा नायनाट करण्यांत येत आहे, राजसत्ता उलथून टाकण्यांत येत आहेत व लोकशाही ठिकठिकाणीं हार खात आहे; तसेंच ज्या कालांत राजकारणांतील जुनी दोन किंवा तीन पक्षी प्रधानपद्धति नाहींशी होत आहे आणि विरोधी पक्षाच्या उठावणीचा निकाल निवडणुकींत पराजय करून न लावतां, पक्षाचा शब्दशः नायनाट करूनच केला जातो अशा कालांत अनत्याचारासंबंधीं बोलणें म्हणजे चेष्टाच वाटेल. परंतु आपणांस अलीकडे मिळालेल्या अनुभवानीं आपणांला वेळींच योग्य धोक्याची सूचना दिली आहे. प्रतिपक्षाच्या रक्तपातानें मिळविलेले विजय रक्तपातानेंच टिकवावे लागतात व अखेरीस पूर्वीपेक्षांही अधिक रक्तपातानें ते नष्टही होतात. राष्ट्रांराष्ट्रांतील भांडणें तोडण्यासाठीं 'पाशवी-शक्ति' हाच लवाद मान्य केला म्हणजे तो ओघानेंच जातीजातींच्या व अखेरीस व्यक्तीव्यक्तींच्या भांडणांतही सर्व प्रसंगीं लवाद होऊन बसतो.

विधायक कार्यक्रमाच्या बाजूनें पाहातां कॉंग्रेसचा कार्यक्रम अगदीं सोपा- विश्वास बसणार नाहीं इतका सोपा-आहे. देशांतील पोकळ युक्तिवाद्यांचा वर्ग, जो शहरोंशहरीं राहतो, जो परदेशी कापड वापरतो, परदेशी भाषा बोलतो व परदेशी धन्याची चाकरी करतो त्याला हा कार्यक्रम पटला नाहीं हें आपण कबूल केलें पाहिजे. आपण शहरांची खानेसुमारी घेतली तर असा आश्चर्य-कारक प्रकार दृष्टोत्पत्तीस येईल कीं, शहरांतील प्रत्येक एकाआड एक इसम हा आपल्या पोटासाठीं, आपल्या वैभवासाठीं, आपल्या नांवलौकिकासाठीं, सर्वस्वीं परकीय राज्यकर्त्यांच्या कृपेवर अवलंबून आहे ! ही सत्यास्थिति पुष्कळ वेळां आपले धनी कोण याचें नेमकें ज्ञान आपणाला नसल्यामुळें आपल्या ध्यानांत येत नाहीं. साध्या हवालदारापासून अबकारी इन्स्पेक्टर, बँकेचे एजंटस्, इंग्रज शिंपी येथपर्यंत सर्व जण आज आमचे धनी आहेत. पी. डब्ल्यु. डीचे खलाशी, पट्टी वसूल करणारा, ऑनररी मॅजिस्ट्रेट, बिलें वसूली करणारा, इत्यादि सर्वजण 'ब्रिटिश साम्राज्य लिमिटेड कं.' चे निर्वेतन प्रतिनिधि आहेत. या कं. चे

स्थानिक डायरेक्टरांचें बोर्ड हिंदुस्थानसरकार असून त्याच्या शाखा म्हणजे प्रत्येक प्रांत आहेत! ब्रिटिश सरकार हें लष्कर, पोलिस आणि इतर सरकारी नोकर, कोर्टें, कौन्सिलें, कॉलेजें, स्थानिक स्वराज्यसंस्था व पदव्या धारण करणारा सरदार इनामदार वर्ग अशा सात तटांच्या मागें भक्कम पाय रोंवून बसलेलें आहे. देशांतील शें. ८० टक्के समाज खेड्यापाड्यांतून जमीनमहसुलाच्या अधिकाऱ्यांच्या भीतींत आहे. व बाकीचा शहरांतील समाज म्युनिसीपालिटी, लोकलबोर्डें, इन्कमटॅक्स अधिकारी, अबकारी अधिकारी आणि पोलिस यांच्या भीतींत जीवन कंठीत आहे.

अशा स्थितींत सत्तेमुळें जनतेच्या अंतःकरणांत उत्पन्न झालेलें भय झुगारून देणें व त्या ऐवजीं अनत्याचारावरील खऱ्याखुऱ्या प्रेमानें उत्पन्न होणारी आशा व धैर्य याची स्थापना करणें हें अत्यंत महत्त्वाचें होतें. म्हणून विधायक कार्यक्रमात कॉंग्रेस कार्यकर्त्यांचा बहुजन समाजाशीं दाट परिचय व्हावा या हेतुनें तीन जातीचे कार्यक्रम घेतले आहेत. म्हणून जेव्हां आम्ही खादीसंबंधीं बोलूं लागतों तेव्हां गरिबांना दुय्यम धंदा अगर भर मजूरी मिळण्यासाठीं त्यांना मदत तर करतोंच परंतु, त्यांना आपल्या पाठीवरील दास्याचें चिन्ह झुगारून देऊन आंगीं स्वाभिमान बाळगण्याची संधी प्राप्त करून देतों. आम्ही गृहसंस्थेचें पावित्र्य राखतों व कारागिरांना आपल्या कलेच्या द्वारा वस्तुनिर्मितीचा आनंदही प्राप्त करून देतों; हा आनंद हेंच संस्कृतीचें खरें द्योतक आहे. तसेंच खादी महाग आहे म्हणून दोन पैसे अधिक द्या असें लोकांना सागतांना आम्ही त्यांना राष्ट्रीय उद्योगधंद्यांना स्वखुषीनें देणगी देण्यास शिकवितों. वास्तविक हें काम सरकारचें आहे; पण सरकार तें करीत नाहीं. याशिवाय आम्ही जनतेला साध्या राहाणीचें शिक्षण देतों व त्या साध्या राहाणीच्या बरोबरच उदात्त विचारसरणी, स्वाभिमानवृत्ति, स्वावलंबन, स्वयंपूर्तता व आत्मसामर्थ्य–प्रचिती त्यांच्या ठिकाणीं वाढतात.

अशा रीतीनें आर्थिक बाबतींत खादीप्रचारामुळें जें आम्ही करूं चाहातों तेंच नैतिक बाबतींत दारुबंदी व सामाजिक बाबतींत अस्पृश्यतानिवारण यांचा प्रचार करून साधूं पाहातों. दारूबंदीचाच प्रश्न घ्या. समाजामध्यें दारुबंदीची संघटना होण्यास जें सरकार अडथळा करतें तें सांगतां येत नाहीं इतक्या हलक्या वृत्तीचें आहे. या देशांतील दोन मोठ्या जातींच्या हिंदु–मुसलमानांच्या–

धर्मांनींही दारू पिणें निषिद्ध मानलें आहे. असें असतां जेव्हां जेव्हां राष्ट्रानें हा नैतिक प्रश्न राजकीय दृष्ट्या हातीं घेतला व निरोधनाला सुरुवात केली, तेव्हां तेव्हां सरकारनें काँग्रेसवर झडप घातली आहे!

तीच स्थिति आमच्या राजकारणांत सामाजिक कार्यक्रमाच्या दृष्टीनें हातीं घेतलेल्या अस्पृश्यतानिवारणासंबंधींची. ब्रिटिश मुख्य प्रधानांनीं आपल्या जातीय निर्णयांत हरिजनांचा स्वतंत्र मतदार संघ निर्माण करून, "परमेश्वरानें एक बनविलेल्यापैकीं काहींना फोडून बाहेर काढलें." पण ही आपात्ति हिंदुस्थानच्या त्या अद्वितीय पुढाऱ्याच्या प्राणांतिक उपोषणानें टळली इतकेंच. तसेंच हरिजनांना मंदिर–प्रवेशाची आडकांठी स्थानिक स्पृश्य हिंदूच्या सार्वत्रिक मत नोंदणीनें मंजूर होईल तर दूर व्हावी अशा तऱ्हेचा सवलतीच्या स्वरूपाचा कायदा व्हावा असा कॉंग्रेसनें प्रयत्न सुरू करतांच हिंदुस्थानसरकारनें तें बिल पुढें येण्यास मंजुरीही न देऊन त्या प्रश्नाच्या मुळाशींच घाव घातला.

आज देशाला जो प्रश्न सोडवावयाचा आहे तो अत्यंत गुंतागुंतीचा व बिकट आहे. आज एका बाजूला समाजांत अनेक प्रकारांनीं फूट पाडून राज्य करूं इच्छिणारें सरकार, दुसऱ्या बाजूला खेड्यांच्या विरुद्ध सज्ज असलेलीं शहरें, बहुजन समाजाच्या हितसंबधाशीं विरोधी असणारे निरनिराळ्या वर्गांचे हितसबंध, साध्या प्राथमिक स्वरूपाच्या सुधारणांना होणारा अपवित्र विरोध, खादी प्रसाराला प्रतिकूलता, जातीजातीमधील समानतेला अडथळा आणि समाजांत नैतिक सद्गुणांची जोपासना करण्यासही अटकाव असा हा कठिण प्रश्न आहे.

वरील अडचणीमुळें एक गोष्ट स्पष्ट कळून चुकली आहे कीं, स्वराज्य मिळणें हें शक्य असेल–तर तें कांहीं इंग्रजी शिक्षणाच्या पूजकाकडून, बुद्धिप्रधान धंदे करणारांकडून किंवा व्यापार सम्राटांकडून अथवा विराट प्रमाणावर उद्योगधंदे करणारांकडून मिळावयाचें नाहीं. यासाठीं नवीन तत्त्वज्ञानाची उभारणी झाली पाहिजे. यासाठीं खेडयांतून राहणाऱ्या बहुजनसमाजाच्या ठिकाणीं राष्ट्रीय भावना जागृत करून वाढविली पाहिजे व त्यांचा विश्वास संपादन केला पाहिजे. अर्थात नुसत्या व्याख्यानांनीं अगर वर्तमानपत्रांतील लेखांनीं नव्हे–तर रोजच्यारोज त्यांची प्रत्यक्ष सेवा केल्यानें. अशा रीतीनें एकदां विश्वास संपादन केला म्हणजे कॉंग्रेसनें स्वातंत्र्यप्राप्तीवरच आंखलेला कार्यक्रम सहज अमलांत येईल. तरीपण तेवढ्यानेंच स्वराज्य कांहीं एकाद्या पक्व फळाप्रमाणें हातांत पडणार नाहीं.

पण एवढें मात्र स्पष्ट दिसून येईल कीं; बहुजन समाजाच्या सेवेचें प्रत्येक कृत्य म्हणजे स्वराज्यमंदिराच्या पायांत एकेक भक्कम दगड बसविण्यासारखें होईल, व समाजांतील निरनिराळे दोष नाहींसें झाले म्हणजे या मंदिराचे तितके मजले चढले असें होईल. अर्थात् हें कार्य निःसंशय वेंगट आहे; परंतु त्याचे परिणाम खात्रीचे व टिकाऊ ठरतील. याच समजुतीनें कॉंग्रेसनें आपला संदेश खेडयापाडयांतून पोहोंचविला आहे व हिंदी राजकारणांत आम्ही मागे म्हटल्याप्रमाणें 'खेडयांचें पुढारीपण' स्थापन होऊं लागलें आहे.

## सत्याग्रह-मीमांसा

आतां आपण कॉंग्रेसनें आपला कार्यक्रम अमलांत आणण्यासाठीं जें एक नवीन तंत्र (Technique) स्वीकारलें आहे त्याचा विचार करूं. आपण सर्वजण अद्यापि त्या तंत्राच्या वाढीच्या प्राथमिक अवस्थेंतच असल्यामुळें व आपली चळवळ अद्यापि अपूर्णावस्थेंत असल्यामुळें, या तंत्रासंबंधींचा संपूर्ण अभ्यास करणें अवघड आहे. त्यांतूनही ज्याना या नवीन तंत्राच्या अचाट शक्तीबद्दल विश्वास वाटतो व त्यामुळें विरोधकाकडून ज्यांची थट्टा होते व शत्रूंकडून द्वेष होतो, त्यांना तर या तंत्राचा पूर्ण अभ्यास अशक्यप्रायच होतो. परंतु, बहुतेक चळवळींना थट्टा, उपहास, द्वेष यातूनच जावे लागते. अशीच स्थिति 'सत्याग्रहा' च्या या नव्या चळवळींची झाली आहे. या चळवळींच्या अगदीं प्राथमिक अवस्थेंतील ओबडधोबड स्वरूप व त्यांतील दोष हेंच सत्याग्रहाचें स्वरूप म्हणून विरोधक विरोध करतात. परतु, रसायन प्रयोगशाळेंत ज्याप्रमाणें हिरा हा रासायनिक दृष्टया कोळशाच्या जातीचा ठरला म्हणून व्यवहारात तो कोळसा ठरत नाहीं. या चळवळीचें हिंदुस्थानातील पहिलें स्वरूप निःसंशय प्रतिकाराचें दिसलें. यामुळें नि.शस्त्रप्रतिकार म्हणजेच सत्याग्रह असें अनेकांकडून भासविण्यांत आलें. सत्याग्रह व निःशस्त्रप्रतिकार हे अगदीं विरुद्ध टोंकाला आहेत. महात्मा गांधींनीं नि·शस्त्रप्रतिकाराच्या कल्पनेनें या चळवळीस सुरुवात केली नाहीं ही गोष्ट खरी; परतु १९१७ मध्यें श्रीमती ॲनि बेझंट यांना अटक झाली असतां, कॉंग्रेसनें आम्ही निःशस्त्रप्रतिकार करूं असें बजावलें. परतु त्याची लगेच सुटका झाल्यामुळें तो प्रश्न मुळातच थांबला. त्यानंतर जेव्हां म. गांधींनीं पुढे येऊन रौलेट कायद्याविरुद्ध व खिलाफतीचा अन्याय व पंजाबांतील हत्याकांड यांविरुद्ध सत्याग्रहाची मोहीम सुरू केली, त्यावेळीं बहुतेक

काँग्रेसभक्तांची व बहुजन समाजाची अशी कल्पना झाली कीं, निःशस्त्र-प्रतिकाराचें हें जुनेंच अस्त्र आज बाहेर काढले आहे.

यानंतर अलीकडील राजकीय घडामोडीमुळें या चळवळीचें स्वरूप बदलत चाललें. निःशस्त्रप्रतिकाराच्या स्वरूपांत त्या चळवळींत तिखटपणा व अहंकार बुद्धि असून त्याबरोबरच द्वेष व अत्याचाराचीही पुसट भावना असावी. असहकारितेच्या स्वरूपांत ही चळवळ सुरू झाली तेव्हां तींत आपल्या राज्यकर्त्यांवर रागावलेल्या, व तिला जखमी करण्याची इच्छा असूनही हात उचलण्यास नाखुष असलेल्या खिन्न व दुर्मुखलेल्या जनतेची वृत्ति दिसून आली. जेव्हां सविनय कायदेभंग सुरु झाला त्या वेळीं कायदेभंगाला त्याच्या विशेषणांत घातलेल्या मर्यादेचें महत्त्व जनतेच्या लक्षांत येण्यास बराच वेळ लागला. एकंदरीनें पाहातां सविनयत्वाची कल्पना आरंभीं जरी यथातथाच समजली गेली, तरीपण हलके हलके ती कल्पना दृढमूल होत जाऊन अखेरीस ती दुसऱ्या अवस्थेंत सत्याग्रहाच्या कल्पनेच्या जवळ जवळ येऊन भिडली. कारण लौकरच आपणां सर्वांना आढळून आलें कीं, सत्याग्रहाचा पाया प्रेम व अनत्याचार यांवरच संपूर्णतेनें भरला आहे. " अनत्याचाराची कल्पनाही केवळ अभावात्मक आहे असें नसून, ती एक प्रत्यक्ष शक्ति आहे; आणि तिची बरोबरी फक्त त्या प्रेमशक्तीशी आहे कीं, ' जी दुसऱ्यांना जाळीत नाहीं, तर स्वतःलाच मरेपर्यंत जाळून घेतें' या सिद्धांताची प्रचीति आपणांस, जेव्हां चौरीचौऱ्याच्या दंग्यामुळें १९२२ फेब्रुवारीमध्यें बार्डोली सत्याग्रह तहकूब केला, त्यावेळींच आली. जर जालियनवाला बागेंत सरकारनें केलेल्या कत्तलीमुळें सत्याग्रहासारखी विशाल चळवळ आपण देशभर सुरू करूं शकतों तर चौरीचौरा येथें लोकांनींच केलेल्या कत्तलीमुळें आपणांस सत्याग्रह बंद केला पाहिजे, हें कळण्यास आपणांस बराच वेळ लागला. सत्याग्रह हा मनुष्याला माहित असलेल्या सर्व सद्गुणांचा एकवटलेला अर्क आहे; कारण सत्यांतूनच या सर्व सद्गुणांचा उगम होत असून, अनत्याचार म्हणजे प्रेम हें त्या सत्याचें आवरण आहे. अशा रीतीनें सबंध देश एका नव्या जगांतच गेल्यासारखा झाला; त्या जगांतील नीतिविषयक कल्पना वेगळ्या वाटू लागल्या; त्यांत द्वेष व तिरस्कार, भय व भितरेपणा, क्रोध व सूड-बुद्धि या भावना एकदम दूर जाऊन त्या ऐवजीं प्रेम, धैर्य, शांति, आत्मक्लेश आणि पावित्र्य हीं विराजमान झाली आहेत. तसेंच त्यांत द्रव्यलोभाची जागा

सेवावृत्तीनें घेतली आहे; व त्यांत शत्रूला नामोहरम करावयाचा नसून त्याचा हृदय पालट करावयाचा आहे. आपणांस असें शिक्षण मिळालें आहे कीं, आपल्या भोंवतींच भीति घिरट्या घालीत असून आपणच जर भीति टाकली व स्वार्थ सोडला तर आपण प्रत्यक्ष मृत्यूलाही कवटाळूं. या दृष्टीनें प्रत्येक सत्याग्रही हा सत्याचा शोधक असतो व म्हणून त्यानें माणसाची, सरकारची, समाजाची, दारिद्र्याची किंबहुना मृत्यूचीही भीति सोडलीच पाहिजे. आपलें ध्येय गांठण्यासाठी आपल्या अंगीं शिस्त बाणली पाहिजे, ही शिस्त किंवा साधना असहकाररूपांत नम्रतेनें स्वीकारल्यास स्वार्थत्यागाच्या वृत्तीची वाढ होते, व त्यामुळेंच धैर्य वाढतें. अशा रीतीनें या सत्याग्रह चळवळीच्या द्रष्ट्यानें एका झापेसरशीं आजकाल रूढ असलेलें हिणकस राजकारण उदात्त केलें, अध्यात्म-मय बनविलें.

हिंदी समाजरचनेचा पाया समजून घेण्याचें दृष्टीनें वरील सत्याग्रह सिद्धांताचा भावार्थ आणखी सूक्ष्मदृष्टीनें पाहूंया. हिंदी समाजाचा पाया 'अहिंसा परमो धर्मः' या सूत्रावर व 'लोकाःसमस्ताः सुखिनो भवन्तु' या प्रार्थनेवर उभारला आहे. या मुळें त्यांत आत्मविलोभन आहे. एवढेंच नव्हे तर आपला द्वेष करणारांवर प्रेम करा, अशी प्रत्येकाला प्रेरणा करण्याची शक्ति आहे. आपल्याशीं चांगलें वागणारांबरोबर आपण चांगलें वागणें यास फारतर 'व्यापार धंद्याची देवाण घेवाण वृत्ति म्हणतां येईल. प्रेमळ व दयाळू माणसावरोवर अनत्याचारीत्वानें वागणें म्हणजे आपण पशुवृत्तीचें अगर सैतान नाहींत असें सांगण्यासारखें आहे. या दृष्टीनें सत्त्याग्रह हा वशिष्ठ जनकादिसारख्या विरुद्ध लढण्यासाठीं नाहीं तर पाशवी वृत्तींशीं झगडण्याकरितां सत्याग्रहशस्त्र आहे. अर्थात् आपल्या जुन्यापुराण्या कल्पनांमुळें आपणांला सत्याग्रह पाशवी शक्तिविरुद्ध कसा यशस्वी होईल या बद्दल शंका उत्पन्न होते; व निराशाही वाटते. कारण जीवन कलहांत बलिष्ठालाच जगण्याचा हक्क आहे. दुर्बलांना नाहीं. या पाश्चात्य शिकवणुकीचा आपल्या मनावर इतका जबरदस्त पगडा बसला आहे कीं, त्या मुळें आपले क्रोधादि विकार प्रक्षुब्ध होतात आणि अहंकार व त्याचे सोबती या दुर्गुणांचें प्राबल्य आपल्या ठिकाणीं वाढते, व त्या मुळेंच भय व अत्याचार जोरावतात.

परंतु हें ध्येय आम्ही कसें गांठणार? आम्ही त्यासाठीं कोणती साधना केली पाहिजे? सत्याग्रहवृत्ति बाणण्यासाठीं कोणतें तप आचरावयाचें असेल तर तें

सत्य आणि शौच, दान आणि धर्म, दम आणि यम, क्षमा आणि दया हेंच होय. शरीराचें कोड पुरविलें-कीं, मनोविकार बळावतात व अहंकार आणि क्रोध यांच्या सामर्थ्यामुळें आपणास अत्याचार व सूड या भावनांच्या मार्गावर लोट-तात. त्यामुळें स्वार्थ, संपत्ति व सन्मान यांचा लोभ जोरावतो. तेव्हां खरी जरूरी समाधान वृत्तीची आहे. ही वृत्ति म्हणजे संसार सोडून वैरागी बनण्याची नाहीं, तर ती आपल्या गरजा नेमस्त ठेवून, आपले मनोविकार ताब्यांत ठेवून तपस्वी होण्याची आहे. या नव्या सिद्धांतामुळें नैतिक शक्तिचा प्रचंड प्रवाह मोकाट वाहूं लागला; व त्यामुळें देशांतील जुन्या पोचट तात्त्विक शिकवणुकीमुळें दुबळ्या बनलेल्या समाजात नवचैतन्य संचरू लागलें आहे. या नवीन सिद्धांताप्रणाणें आपल्या शत्रूबरोबर परस्पर संबंध ठेवण्याचा प्रयत्न करणें व स्वाभिमान राखला जाईल अशा प्रसंगाखेरीज इतर सर्वत्र त्यांच्याशीं असहकार करणें हें आपलें कर्तव्य ठरतें. या सिद्धांताप्रमाणें नित्य यज्ञ म्हणून शारीरिक श्रमाचा आपला हिस्सा उचलण्याचा व गरिबांना अन्नवस्त्र मिळवून देण्यास मदत करण्याचा आपणाला अग्रह आहे. हें साध्य होण्यासाठीं मनाचा शरीरावर तावा पाहिजे आणि आपली शरीर मनावर अशी हुकमत पाहिजे कीं बुद्धि जें जें नको म्हणेल त्यापैकीं कशाचीही वासना इंद्रियें करणार नाहींत आणि अंतःस्फूर्ति मनाई करील अशा कशावरही कल्पना वावरणार नाहीं. आणि ही स्थिति साध्य होण्याच्या दृष्टीनें भोग-त्यागासारखें दुसरें कोणतें साधन अगर मार्ग आहे ? ही भोग-त्याग वृत्ती अन्नाचें बाबतींत उपवास कल्पना व भाषण यांचें बाबतींत मौन व मनो-विकार आणि भावना यांचें बाबतींत ब्रह्मचर्य या स्वरूपांत व्यक्त होतें.

असें या नव्या सिद्धांताचें स्वरूप आहे; तरीपण कोणत्याही नव्या सिद्धांतांच्या प्रचाराप्रमाणें यावरही टीकेचा व उपहासाचा मारा होत आहे. उदाहरणार्थ उपवास म्हणजे शरीराचा अकारण छळ, मौन म्हणजे कांहीं तरी एक सोंग व ब्रह्मचर्य तर, अशक्यच असल्यामुळें एक ढोंग अशा रीतीनें या सत्याग्रह-सिद्धांताचा उपहास झाला आहे, तरी पण गेल्या सोळा वर्षांत हिंदुस्थानांतील सार्वजनिक जीवन या सिद्धांतामुळें पुष्कळच सुधारलें आहे.

येथवर या सिद्धांताची मीमांसा झाली; तरीसुद्धा राजकीय झगडा मिटवि-ण्याच्या दृष्टीनें अनत्याचाराचा मार्ग कितपत योग्य व यशदायी होईल अशी एक शंका आहेच. त्याचें उत्तर असें आहे कीं, जीवनसिद्धांत या दृष्टीनें अत्या-

चार हें मान्य असेल तर प्रत्यक्ष व्यवहाराच्या दृष्टीनें पाहातां आपण ज्या विशिष्ट परिस्थितींत आज आहोंत त्या परिस्थितींत तर अनत्याचारी धोरणाशिवाय गत्यंतरच नाहीं. आज आम्ही निःशस्त्र आहोंत ही गोष्ट सोडून दिली तरीसुद्धां बहुजनसमाजांत नवचैतन्य उत्पन्न करण्याचें जें महत्वाचें कार्य आज आपण करूं शकलों तें अनत्याचारी मार्गाच्या घोषणेशिवाय व त्याला चिकटून राहिलों नसतों तर झालें नसतें. तरीपण अनत्याचारी असहकारिता अयशस्वी आहे असा युक्तिवाद करणारे कांहीं लोक आहेत, परंतु एकाच हप्त्यात यश मिळवून देण्याची हमी अद्याप कोणीच घेतलेली नाहीं. सारांश, अनत्याचार हें एकच तत्व असें आहे कीं जें झगडणाऱ्या दोन्ही पक्षांना समाधान व शांति देईल; कारण झगडयातील लवादपंच म्हणून एकदा अत्याचाराची स्थापना झाली कीं जित व जेत्याची अत्याचारानें दुसऱ्याला दडपण्याची वृत्ति बळावत जाते व सूडाचा प्रयोग सुरूं होऊन दोघाचेंही जीवन कायमचें या दुष्टचक्राच्या फेऱ्यांत फिरत राहातें.

आज कोटयावधि स्त्री, पुरुष मुलें याच्यावर गांधिजींचें वजन कायम टिकून राहिलें आहे याचें -इंगित तरी काय असलें पाहिजे? गाधीजी अशा युगात जन्माला आले आहेत कीं, या युगांत सर्वत्र राजकीय दृष्टया नुसता क्षोभ आहे इतकेंच नव्हे तर राजकीय अंदाधुंदी -अराजकता आहे. सुप्रसिद्ध ग्रंथकार लॉवेल यानें एके ठिकाणीं असें म्हटलें आहे कीं, "परमेश्वराची अशी इच्छाच दिसते कीं मानवी जातीला कधीं भयंकर संकटांत टाकून तर कधीं सुवर्णसंधि देऊन वेळोंवेळीं तिची परीक्षा पहावी. अशा प्रसंगीं मानवसमाजात पुरुषार्थ असेल तर तो भयंकर संकटें ही सुवर्ण संधि आहे असें करून दाखवितो, व उलटपक्षीं तसा पुरुषार्थ नसेल तर चालून आलेली सुवर्ण संधि महासंकटासारखी त्याचेवर कोसळतें." याच न्यायानें महात्मा गांधींनीं देशावरील एका भयंकर संकटाचे प्रसंगीं आपल्या पराक्रमानें सुवर्णसंधि निर्माण केली व एका नव्या क्रांतीची प्राणप्रतिष्ठा केली. मात्र ती क्रांति रक्तपाताची नाहीं, तर शत्रू जखमी न करतां स्वतः आत्मक्लेश भोगून, शत्रूला वठणीवर न आणतां त्याला वळविणारी क्रांति आहे. गांधीजींनीं ठिकठिकाणीं जाहीर घोषणा करून सांगितलें आहे कीं, सविनय बंड करणें हा प्रत्येकाचा हक्क आहे एवढेंच नव्हे तर तें प्रत्येकाचें कर्तव्य आहे; व त्याचबरोबर अद्यांना फांसावर चढविणें हाही प्रत्येक सरकारचा हक्क आहे. हिंदुस्थानांतील गुलामगिरी नष्ट करणें एवढेंच एक निकटचें साध्य गांधीजींनीं

डोळयापुढें ठेवलेलें नाहीं तर जगांतील यच्चयावत जे मत सांप्रदाय आहेत कीं ज्याच्या योगें समाजांत शारीरिक, राजकीय किंवा आर्थिक इत्यादि कोणत्याही स्वरूपांत गुलामगिरी रूढ आहे त्या सर्वांचें समूळ उच्चाटण करणें हें गांधीजींचें उदिष्ट आहे. गांधीजींनीं हें स्पष्टपणें दाखवून दिलें आहे कीं गुलाम ठेवणें व गुलाम राहणें हा नैतिक अन्याय आहे, ही राजनैतिक घोडचूक आहे; व व्यवहारदृष्ट्या आपत्ति आहे. या दृष्टीनें गांधीजींनीं आजपर्यंत लोकांच्या शुद्ध बुद्धिलाच जागृत करून एकसारखें विनविलें आहे, त्यांच्या ठिकाणच्या विकारवशतेला किंवा विकृत कल्पनांना नाहीं; तर त्यांच्या सद्सद्विवेक बुद्धिलाच आळविलें आहे. त्यांच्या स्वार्थबुद्धिला किंवा अज्ञानाला नाहीं. त्यांच्या मतें नैतिक अन्याय हा परिणामाच्या दृष्टीनें तेवढ्यापुरताच राहूं शकत नाहीं, व तसेंच सत्य व अहिंसा या तत्वाशीं विसंगत तत्त्वें परिणामीं राष्ट्राला कधींही शांति व वैभव देऊं शकणार नाहींत.

हिंदी राजकारणांत अगदीं प्रथम हा सिद्धांत अमलांत जो आणला तो १९१९ च्या अमृतसर काँग्रेसमध्यें महात्माजींनीं आणला. पंजाबातील दंग्यांत लोकांनीं चार इंग्लिश लोकांना ठार केलें व नॅशनल बँकेची व इतर इमारती जाळल्या त्याबद्दलचा निषेधाचा ठराव पास करण्याचा आग्रह गांधीजींनीं धरला होता. हा ठराव पास न कराल तर मला काँग्रेस सोडावी लागेल असें गांधीजींनीं विषयनियामक कमिटीला बजावलें. अखेरीस दुसरे दिवशीं मोठ्या नाखुषीनें तो ठराव मान्य करण्यांत आला. तेव्हांपासून महात्माजी अहिंसेचा मंत्रघोष काँग्रेसच्या कानीं करीत आहेत. त्या वेळीं ज्या काँग्रेसची स्वराज्याची कल्पना इंग्रजांना देशाबाहेर हाकलून काढावें अशी होती, त्या काँग्रेसला महात्माजींनीं उपदेश दिला कीं इंग्रज हे आमचे सहनागरिक आहेत व त्याच नात्यानें ते येथें राहिले पाहिजेत. आणि म्हणून कोणाही परदेशीय इसमाच्या केसाला सुद्धां धक्का लावतां कामा नये! योगायोग असा कीं लवकरच जनतेच्या सत्यपरीक्षेची वेळ आली, परंतु चौरीचौऱ्याच्या दंग्यांत सत्य हरण झालें. परंतु, म्हणून त्यामुळें काँग्रेस निराश झाली नाहीं. बार्डोली सत्याग्रह तहकूब केल्याबद्दल चोहों बाजूंनीं विरोधाचा गिल्ला झाला. परंतु, महात्माजी मेरुप्रमाणें अचल राहिले. कारण सत्याग्रहीला शत्रूंचेंच काय पण प्रत्यक्ष सहकाऱ्याचें मित्राचें सुद्धां भय वाटत नाहीं, तो फक्त सत्याला भितो.

यानंतरच्या हिंदी राजकारणांतील घडामोडी सर्वांच्या परिचयाच्या आहेत. व त्यावरून राष्ट्राला सत्याग्रहाच्या गूढ शक्तीची प्रचितीही आली आहे. गेल्या पन्नास वर्षांतील आपल्या राजकीय प्रगतीचें जर रेखाचित्र काढलें तर त्यांत अनेक चढउतार दृष्टोत्पत्तीस येतील. खरें म्हटलें म्हणजे आपली प्रगति नागमोडी गतीनें होत आहे, आपण पुनः पुन्हां १९०६ सालांतील स्वदेशी बहिष्कार राष्ट्रीय शिक्षण व स्वराज्याच्या कार्यक्रमावर येत आहोंत; परंतु प्रत्येक वेळीं आपण वरवर चढत आहोंत. तोच कार्यक्रम पुन्हां १९१७ सालीं घेतला पण निःशस्त्रप्रतिकाराच्या भूमिकेवर घेतला. १९१९-२१ मध्यें तोंच कार्यक्रम, परंतु सविनय कायदेभंगाच्या भूमिकेवरून सुरू झाला; व नंतर १९३०३४ मध्यें 'सत्याग्रहा'च्या अधिक उच्च भूमिकेवरून तोच कार्यक्रम हातीं घेतला आहे. स्वराज्य' मंदिराची चढण चढतां चढतांना कधीं सत्याग्रह-संग्रामाचा कष्टप्रद कार्यक्रम तर कधीं कौन्सिलप्रवेशाचा कमी दगदगीचा कार्यक्रम असें आळीपाळीतें चालूं आहेत, ही नागमोडींची चढण सारखी चालू आहे व स्वराज्याकडे आपण जात आहों.

परंतु स्वराज्य हा राष्ट्रप्रगतीचा एक महत्वाचा टप्पा आहे, प्रगतीची अखेर नाहीं, स्वराज्य ही एक दिशा आहे ध्येय नव्हे, असें मानलें तर मग या ध्येयाचा पाया भक्कम रीतीनें भरण्याचें काम सुरू ठेवलेल्या कारागिराला 'तूं अजून मंदिर कां उभारलें नाहींत' असा प्रश्न विचारणें योग्य होणार नाहीं; कारण साध्या इमारतींचे पाये भरण्यास जर वर्ष दोन वर्षे थांबावें लागतें, तर स्वराज्य मंदिराचा पाया भरण्यास व इमारत उठविण्यास किती तरी काळ लागेल !

येथपर्यंत गेलीं पन्नास वर्षे आम्ही कसें झगडत आलों याचें वर्णन केलें आहे, या पुढील आमची उपाययोजना स्पष्ट आहे. घरगुती उद्योगधंदे वाढवून घर हेंच कारागिरीचें केंद्र, व खेडें हेंच हिंदी राष्ट्रीय जीवनाचें केंद्र बनवूं या, व त्या दृष्टीनें घर व खेडें हीं दोन्हीही स्वावलंबी व स्वानंदी बनविण्याची खटपट करूं या. "आपल्या राष्ट्रमंदिराची इमारत आपण अशी उभारूं या कीं, समता हा तिचा पाया, स्वातंत्र्य हें तिचें शिखर व बंधुभाव हा दगडमाती एकत्र घट्ट धरून ठेवणारा सिमेंट राहील; मात्र समता म्हणजे एकदम फुटून जाणारी ढिली समता नव्हे किंवा सर्वांची वाढ एका पातळींतच ठेवणारी समता नव्हे; म्हणजेच ज्या समाजांत काड्यांच्या उंचीचें गवत व लहान झाडांच्या उंचीचे वटवृक्ष-

किंवा परस्परांना दुर्बल करणाऱ्या वैमनस्यानें बुजबुजलेली नव्हे–तर ती समता कीं जींत माणुसकीच्या दृष्टीनें निरनिराळ्या वृत्तींना वाढीसाठीं समान संधि मिळेल, जींत राजकीय दृष्ट्या सर्व मतांना महत्त्व असेल आणि जींत धार्मिक दृष्ट्या प्रत्येकाच्या सदसद्विवेक बुद्धिला समान हक्क सांपडेल. अशा रीतीनें सार्वजनिक व लोकहिताचीं कार्यें करण्यास प्रचंड क्षेत्र आपणांपुढें पसरलें आहे; आणि आपणा सर्वांची एकवटलेली शक्ति आज 'अर्थकारी' व 'अर्थकांक्षी' यांच्यांत समतोलपणा राखण्यासाठीं 'कष्टाप्रमाणें 'भोगा'चें व 'गरजे प्रमाणें पुरवठ्याचें प्रमाण ठेवण्यासाठीं कामीं लागली आहे. तात्पर्यार्थ असा कीं आपल्या या पुरातन समाजरचनेंतून दुःखांत व अज्ञानांत पडलेल्या आपल्या बांधवांच्या फायद्यासाठीं आपण घरांतून ज्ञानाचा प्रकाश व कुटुंबांतील मंडळींना अधिक आनंद मिळवून देऊं या.

अशी परिस्थिति घडवून आणणें हें आपल्यावरील आद्य ऋण आहे व राजकीय दृष्ट्या हीच पहिली गरज आहे. हें कॉंग्रेसनें पूर्ण ओळखलें आहे, व म्हणून जन्माला आलेल्या प्रत्येक तरुण इसमाचा ज्या दोन गोष्टींबद्दल वारसा हक्क असतो त्या दोन हक्कांची–त्याला स्वतंत्र राहतां येईल अशी श्रमयोजना व तो उदात्त विचारांचा होईल असें ज्ञान–तरतूद सर्वांसाठीं होईल अशी ग्वाही कॉंग्रेस देत आहे.

अशा रीतीनें १८८५ सालीं मुंबईंत अल्पप्रमाणांत उगम पावलेला हा कॉंग्रेस-गंगेचा ओघ आज सतत पन्नास वर्षें वहात आला आहे–तो कधीं कालव्या-सारखा चिंचोळा तर कधीं नदीसारखा रुंद, कोठें जंगलावनांतून वाट काढीत तर कोठें दऱ्याखोऱ्यांतून मार्ग कापीत वहात असतां, एकाद्या ठिकाणीं आपला पाण्याचा लोंढा एकाद्या शांत जलाशयांत किंवा क्वचित् प्रसंगीं एकाद्या डबक्या-सारख्या कोंडलेल्या जलाशयांत सोडीत, तर दुसऱ्या स्थळीं प्रचंड बनून गर्जना करीत चालला आहे. दरसाल पडणाऱ्या नव्या कल्पनांच्या व नव्या ध्येयांच्या सतत वर्षावाचा पूर मिळत येत गेल्यामुळें प्रवाह एकसारखा फुगत व त्यांतील गुणसंपत्तीही एकसारखी वाढत तो प्रवाह वेगानें चालला आहे; व अखेरीस आपली राष्ट्रीय संस्कृती तावून सुलाखून शुद्ध झाल्यानंतर ती अन्तर्राष्ट्रीय किंवा जगद्राष्ट्रीय व्यापक संस्कृतींत मिळून संपूर्णतः एकजीव होऊन जाईल अशा नेमलेल्या ध्येयाकडे धावत आहे.

---

# मूळ इतिहासांत कांहीं हकिगतींची भर

## मुळशीपेटा—सत्याग्रह

टाटा कंपनीनें जी. आय्. पी; बी. बी. सी. आय् .रेल्वे व मुंबई शहर यांना विजेचा पुरवठा करण्याकरतां मुळशींत धरण बांधण्याचें ठरविलें. सरकार किंवा शेतकरी यांच्याबरोबर करारमदार न करतां कंपनीनें धरणाचा पाया खोदण्यास सुरवात केली. मुळशींत मजुरांची सेना दाखल होतांच मावळे घाबरले व पुण्यास धावाधाव करूं लागले. आपली जमीन कशी वाचणार याची त्यांना चिंता लागली. त्या वेळीं असहकारितेची चळवळ जोरांत होती. या धरणांत ५१ गांवे बुडणार होतीं व ११००० बायकांमुलें शेतावरून व घरा-वरुन उठणार होतीं. पुण्यांतील पुढाऱ्यांनीं हा सर्व टापू धुंडाळला, माव-ळ्यांना परिस्थिति समजावून सांगितली व त्यांचें काय म्हणणें आहे हें सम-जूत घेतलें. मुळशी पेट्यांत श्री. न. चिं. केळकर यांच्या अध्यक्षतेखालीं सभा झाली आणि मावळ्यांनीं 'जान किंवा जमीन' असा निर्धार केला. त्यांचा हा निग्रह पाहून पुण्यांतील पुढाऱ्यांनीं त्यांच्या लढ्याचें नेतृत्व घेण्याचें ठरविलें. त्या वेळीं प्रतिज्ञेचा नमुना तयार करण्यांत आला व त्यावर १२०० मावळ्यांनीं सह्या केल्या तर लढा चालवावा असें ठरलें. दरम्यान पुणें जिल्हा कॉंग्रेस परिषद बारामतीस भरली. या परिषदेंत दोन मतें दृष्टीस पडलीं. एक पक्ष तावडतोव लढा सुरू करावा असें म्हणणारांचा, व दुसरा पावसाळ्यापर्यंत थांबावें, कंपनी-बरोवर तडजोड निघते कीं काय हें पहावें, असें म्हणणाऱ्यांचा होता. ह्या दुसऱ्या पक्षांचें मताधिक्य झालें, पण प्रतिज्ञापत्रिकेवर सह्या घेण्याचें काम सुरूच होतें. श्री. भुस्कुटे हे सर्व पेटा हिंडले व १३०० सह्या गोळा झाल्या. त्यामुळें बारामतीचा ठराव बाजूस सारून लढा सुरू करावा असें ठरविण्यावाचून गत्यंतरच उरलें नाहीं. सारा महाराष्ट्र खडबडून उठला. पैसा, धान्य, स्वयंसेवक यांचा भराभर पुरवठा होऊं लागला. खुद्द मावळ्यांनीं १००० रु. चें धान्य गोळा केलें. १६ एप्रिल १९२१ रोजीं रामनवमीला सत्याग्रह सुरू झाला. हा सत्या-ग्रह असहकारितेचा एक कार्यक्रम म्हणूनच स्वीकारण्यांत आला हें लक्षांत ठेवलें पाहिजे. हा सत्याग्रह यशस्वी झाला तर कॉंग्रेसचें सामर्थ्य व इभ्रत वाढणार होती व गांधींच्या तत्वाचा विजय होणार होता.

रामनवमीला १२०० मावळे स्त्रीयांमुलांसह व बाहेरच्या पुढाऱ्यांसह तेथें आले व धरणांत जाऊन बसले. त्याबरोबर ५००० मजुरांनीं काम थांबविलें. महात्मा गांधींच्या अनत्याचारानें हा सत्याग्रह महिनाभर चालला आणि यशस्वी झाला.

पुढें पावसाळा आला व पुढाऱ्यांना, सरकारला, सावकारांना, व कंपनीला विचार करण्यास सवड सांपडली. मुंबईस डॉ. मुंजे यांचे अध्यक्षतेखालीं मुळशी परिषद जून महिन्यांत भरली व लढा चालविण्याचें ठरलें. इकडे सावकारांना अशी चिंता वाटूं लागली कीं, जर सत्याग्रह सुरू राहिला तर आपल्याला कंपनी-कडून कमी पैसा मिळेल. त्यांच्या या म्हणण्याचा पुरस्कार पुण्यांतील कांहीं पुढाऱ्यांनीं केला. कंपनीच्या मॅनेजर व इंजिनिअर्स बरोबर तडजोडीचीं बोलणीं सुरू झालीं. मावळ्यांना याची दादही नव्हती. कंपनीनें ह्या तडजोडीच्या बोल-ण्याचा फायदा घेऊन सढळ हातानें पैसे देण्याचें कबूल केलें. याच वेळीं कंपनीनें सरकारबरोबर करार केले व त्या टापूला ॲक्विझीशन कायदा लावून घेतला. मावळ्यांना जमीन पाहिजे होती, सढळ हातानें दिलेले पैसे नको होते.

इतर ठिकाणाप्रमाणेंच महाराष्ट्रांत तेव्हां फेर व नाफेर पक्ष निर्माण झाले होते. बरेच नाफेरवादी गांधींचे अनुयायी होते व मावळ्यांकरितां लढा लढण्यास अनुकूल होते. त्यांना आतां सावकार व कंपनी या दोघाबरोबर लढावें लागलें. हा लढा एकंदर २॥ वर्षे चालला. दुसरा सत्याग्रहाचा लढा डिसेंबर १९२१ मध्यें सुरू झाला. धरपकड, शिक्षा, छळ, धाकदपटशा, जुलूम यांचा कहर झाला. शिवरामपंत परांजपे, डॉ. फाटक, सी. के. दामले, शंकरराव देव, दास्ताने, वासुकाका जोशी, बाळुकाका कानीटकर, सेनापति बापट, रानडे, हरी-भाऊ फाटक, डॉ. पळसुले, तात्यासाहेब करदीकर व इतर अनेक लोकांना शिक्षा झाल्या. एकंदर १२५ मावळे व ५०० पुढारी व स्वयंसेवक या वेळीं तुरुंगांत गेले. त्यांत अनेक स्त्रियाही होत्या. ह्या लढ्याकरतां ७५००० रुपये खर्च झाले. इतर जिल्ह्यांतून व प्रांतांतूनही स्वयंसेवक व पैसे आले. जेव्हां सर्व पुढारी तुरुंगांत गेले तेव्हां मावळ्यांना जमीनी विकण्यास सावकारानीं वळविलें. जे पुण्याचे पुढारी लढा लढविण्यास मोठेसे उत्सुक नव्हते, त्यांनींही ह्या सावका-रांना मदत केली व अशा रितीनें हा सत्याग्रह अयशस्वी झाला. तथापि सेनापति बापटांनीं हा लढा नंतरही निराळ्या वळणावर चालू ठेवला व त्या लढ्यांत

आत्यंतिक स्वार्थत्याग केला. ह्या लढ्यामुळें शेतकऱ्यांना इतर ठिकाणापेक्षां अधिक नुकसानभरपाई मिळाली खरी; पण तो सारा पैसा सावकारांच्या तिजोरींत पडून मावळे जमिनीला व घरादाराला मुकले.

## सोलापूर लष्करी कायदा सत्याग्रह

सोलापूरला दंगा झाल्यावर तेथें सरकारनें लष्करी कायदा पुकारला होता. ह्या लष्करी कायद्यामुळें लोक हादरून गेले. तेथें राष्ट्रीय निशाणाचा अपमान होऊं लागला. ही परिस्थिती असह्य होऊन पुण्यांतून ह्या लष्करी कायद्याचा भंग करण्याकरतां श्री. वा. वि. साठे, अ. वि. काळे व गिरीनारायण हे तिघेजण गेले. सरहद्दप्रांताशिवाय लष्करी कायदा पुकारला गेला असा सोलापूरलाच; तेव्हां तेथें लष्करी कायद्यांचा भंग करणें सोपें नव्हतें. पण हे तिघेजण तेथें निशाणासह गेले. त्यांना त्यांच्या धाडसाबद्दल अत्यंत त्रास झाला व शिक्षाहि झाल्या. सुमारें अर्डीचशें सत्याग्रहींनीं लष्करी अमलाच्या खाईत कायदेभंग केला व अनान्वित छळ सोसला.

## कुंडीकामाबद्दल प्रायोपवेशन

आप्पासाहेब पटवर्धन हे रत्नागिरी तुरुंगांत असतां त्यांनीं कुंडीकाम मागून घेतलें, पण अधिकारी त्यांना तें काम देईनात. तेव्हां त्यांनीं अत्यल्प अन्न सेवन करण्याचा सत्याग्रह ता. २ डिसेंबर १९३२ रोजीं आरंभिला. ते १९३० सालीं तुरुंगांत असतां ह्या कामाकरतां असाच सत्याग्रह करणार होते; पण त्यांना महात्माजींचा निरोप आल्यामुळें तो सत्याग्रह त्यांनीं थांबविला. युद्धतहकुबीच्या काळांत गांधीना त्यांनीं आपलें म्हणणें समजावून सांगितलें व गांधींनीं पुनः असा सत्याग्रह केला गेल्यास आपणही तुमच्याबरोबर उपवास करूं असें आश्वासन दिलें होतें. महात्मा गांधींना अण्णाच्या उपवासाची हकिगत कळताच त्यांनीं ३ तारखेला उपवास सुरू केला. इतक्यांत सरकारनें ह्या प्रश्नांत लक्ष घालण्याचें कबूल केल्यामुळें श्री. पटवर्धन व महात्मा गांधी यांनीं उपास सोडला. पुढें सेक्रेटरी ऑफ स्टेटनें तुरुंगाच्या कायद्यात दुरुस्ती करून तुरुंगाच्या अधिकाऱ्यांना स्पृश्य हिंदूंनाहि हें काम द्यावयास अडथळा नसावा अशी दुरुस्ती केली.